KÂVYASANGRAHA. 49.

THE

# MAHÂBHÂRATA

OF

# MOROPANTA.

( THE GREAT MARÂTHÎ POET OF THE MAHÂRÂSHTRA. )

## 8. KARṆAPARVA.

Second Edition

*REVISED AND ENLARGED WITH*

Critical and Explanatory Notes, Introduction and Appendices &c.

BY

DÂMODAR KESHAVA OKA, B. A.

PRINCIPAL, NORMAL SCHOOL, AMARAOTI,

MEMBER OF THE COURT OF THE NAGPUR UNIVERSITY.

AND

SOMETIME EXAMINER IN MARATHI LANGUAGE,

UNIVERSITIES OF ALLAHABAD & NAGPUR.

PUBLISHED

BY

PÂNDURANG JÂWAJÎ,

PROPRIETOR OF THE 'NIRNAYA SAGAR' PRESS,

BOMBAY.

1932.

*Price 3 Rupees.*

काव्यसंग्रह. ४९.

महाराष्ट्रकविवर्यमोरोपंतकृत

# महाभारत.

## ८. कर्णपर्व.

(द्वितीयावृत्ति.)

हें


दामोदर केशव ओक, बी. ए.

प्रिन्सिपाल, नार्मल स्कूल, उमरावती,

नागपुर विश्वविद्यालयाच्या कोर्टाचे मेंबर,

व

अलाहाबाद व नागपुर येथील विश्वविद्यालयांतील

मराठी भाषेचे परीक्षक


यांनीं

शोधून, अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या विपुल टीपा देऊन

व उपोद्घात, परिशिष्टें वगैरे जोडून तयार केलें.


तें

मुंबईत 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक पांडुरंग जावजी

यांनीं छापून प्रसिद्ध केलें.

सन १९३२.

किंमत ३ रुपये.

महाराष्ट्रभाषेचा आस्थापूर्वक अभ्यास
करूं इच्छिणाऱ्यांस
हें पुस्तक
सप्रेम व सादर अर्पण केलें आहे.

# प्रस्तावना.

हें पर्व '**काव्यसंग्रह**' मासिकांत खंडशः छापून सन १९०३ मध्यें पूर्ण झालें. हें प्रसिद्धीकरणाचें काम मध्यंतरीं कांहीं अडचणी आल्यामुळें बरींच वर्षे चालू होतें. त्या वेळीं त्याचें संपादन 'काव्यसंग्रहा'चे त्या वेळचे संपादक कै० **नारायण चिंतामण केळकर**, बी. ए. यांनीं व कै० **के. व्ही.** लक्ष्मणराव, एम्. ए. यांनीं मिळून केलें होतें. ह्या पर्वाची ही नवीन आवृत्ति काढण्याचा सुप्रसंग सुमारें तीस वर्षांनंतर येत आहे, ही मोठ्या आनंदाची गोष्ट होय. परंतु तीवरून आपल्या प्राचीन वाङ्मयाच्या भोक्त्यांची संख्या किती लहान आहे, हें स्पष्ट दिसून येतें. हैद्राबाद ( दक्षिण ) येथील संस्थानिक निजाम-सरकार यांनीं स्थापन केलेल्या उस्मानिया युनिव्हर्सिटींत हें पर्व इ. स. १९२७ व १९२८ मध्यें झालेल्या बी. ए. परीक्षेस नेमण्यांत आलें होतें. अशा रीतीनें प्रस्तुत पर्वाचा सरस्वती-मंदिराच्या वरील दालनांत प्रवेश झाल्यामुळें ही आवृत्ति तीस वर्षांनीं तरी प्रकाशित होत आहे, नाहींतर कदाचित् आणखी पांच दहा वर्षे वाट पाहावी लागली असती !

पूर्वीच्या संपादकांनीं मोठ्या काळजीपूर्वक आपलें काम करण्याची शिकस्त केली होती. तथापि स्वतंत्रपणें प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथांत जो एकसूत्रीपणा आढळतो, तो एकाद्या नियत-कालिकांत ठरींव पृष्ठसंख्येस अनुसरून कित्येक वर्षे चालू असलेल्या ग्रंथांत आढळणें प्रायः शक्य नसतें. तेव्हां अशा परिस्थितींत त्या वेळीं ह्या पर्वांत कांहीं दोष राहणें साहाजिकच होतें. प्रस्तुत आवृत्तींत ते दोष काढून टाकिले आहेत. कांहीं टीपा गाळल्या आहेत, कांहीं टीपांत आम्हांस योग्य वाटले ते फेरफार केले आहेत व पुष्कळशा नवीन टीपा दिल्या आहेत. सारांश, आम्हांस सुचल्या त्या सुधारणा यथामति करून ही आवृत्ति तयार केली आहे. तथापि प्रथमावृत्तींतील दोन टीपा तशाच ठेविल्या आहेत. त्यांखेरीज ह्या पर्वांत कोठें कांहीं कमज्यास्त कोणास आढळल्यास त्याबद्दलची सर्व जबाबदारी आमच्यावर आहे.

ज्या टीपा आम्ही मूळच्याच कायम ठेविल्या आहेत, असें वर सांगितलें, त्यांत कै० **वामन दाजी ओक**, 'काव्यसंग्रहा'चे पूर्वीचे संपादक, यांच्या हातच्या टीपांत संपा-दकद्वयास आढळेल्या दोषांचा (?) उल्लेख आहे. कै० ओक हे सन १८९७ सालीं स्वर्गवासी झाल्यानंतर त्यांच्या कृतींत नसते दोष धुंडाळून काढण्यांत आनंद मानणारे व त्यांच्या

आंगीं काल्पनिक दोष चिकटविणारे 'केरळकोकिळ'कारांसारखे पंडितंमन्य महाभाग बरेच अवतीर्ण झाले होते. अशा काळीं ह्या पर्वाच्या तरुण संपादकद्वयानें मोठ्या मेहनतीनें कै० **ओक** यांच्या लिखाणांतील चुका (?) दाखविण्याचें श्रेय संपादिलें, ह्यांत कांहीं विशेष नाहीं. तेणेंकरून त्यांना आपली जाडी विद्वत्ता व अगाध शोधकबुद्धि अनायासें वाचकांस दाखवितां आली. हे कै० **ओक** यांच्यासंबंधीं करण्यांत आलेले उल्लेख आम्ही गाळून टाकिले असते, परंतु संपादकद्वयांचे परिश्रम वायां जाऊं नयेत म्हणून ते तसेच ठेवणें, आम्हांस बरें वाटलें. कै० **ओक** कांहीं विश्वविद्यालयांतील उच्च परीक्षा देऊन बी. ए. किंवा एम्. ए. झालेले नव्हते, तेव्हां त्यांच्या कृतींत, त्यांच्यापेक्षां जाड्या–एकच नव्हे तर दोन–विद्वानांस दोष आढळले, तर त्यांत कोणास आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं.

कै० **ओक** यांचा ज्या टीपांत ह्या संपादकद्वयानें उल्लेख केलेला होता, त्या पुढें देऊन त्यांच्या संबधीं दोन शब्द लिहिण्याचें योजिलें आहे:—

( १ ) पृष्ठ १७६ टीप २१......*ही गीति संबंधातिशयोक्तीचें* **उदाहरण आहे,** असें कै० **वामन दाजी ओकांचें** म्हणणें आहे. ( पहा काव्यसंग्रहांतील मोरोपंतकृत उद्योगपर्व, पृष्ठ २५५ ) [ कर्णपर्व, प्रथमावृत्ति, पृष्ठ १६४ टीप २० ]

ह्या टीपेसंबंधानें वाचकांच्या नजरेस एक गोष्ट आणावयाची आहे, ती ही कीं, ज्या संपादकद्वयानें कै० **ओकांची** *हेटाळणी करण्याच्या इरायानें ही टीप लिहिली, त्यांनीं सदर्हू पद्यांत ( कर्णपर्व, अध्याय २५।१४ ) कोणता अलंकार आहे, हें सांगण्याचें स्वतः टाळलें* आहे. अलंकारशास्त्र हें रसिकतागम्य असल्याकारणानें प्रसंगविशेषीं अलंकार निश्चित

---

१ रा. रा. **विश्राम लक्ष्मण कोरगांवकर** ( मुंबई ) यांनीं 'केरळकोकिळाला काव्यसंग्रहाची सलामी' *ह्या नांवाचें लहानसें पुस्तक इ. स. १८९९ मध्यें प्रसिद्ध केलें होतें. वाचकांपैकीं पुष्कळांना त्या पुस्तकाची आठवण अद्याप असेल, असें वाटतें.* 'पंचवटीस्थलनिर्णयपरीक्षण करितांना कोकिळानें प्रदर्शित केलेला निरहंपणा, व निष्पक्षपातीपणा आणि पूरेपूर सरलता हीं जराशीं लोकोत्तर वाटल्यावरून त्यासंबंधानें, व कै० रा० **ओकांची** विद्वत्ता, रसिकता व सरलता बरेचदां पाहाण्यांत आल्यामुळें, त्यांच्याविषयीं मनामध्यें उत्पन्न झालेला पूज्यभाव व प्रेमभाव यांच्या प्रोत्साहनानें, लेखणी उचलण्याविषयीं ईर्षा उत्पन्न झाल्यामुळें' आपण हा टीकाविषयक लेख लिहिला, असें रा० **कोरगांवकर** यांनीं सदर्हू पुस्तकाच्या प्रस्तावनेंत सांगितलें आहे. 'मोठे लोक,......विद्वान् व थोर पुरुष अशांना आपल्या कदीमकाळाच्या शत्रूवर देखील त्याच्या पश्चात् नुसतें तोंडसुख घेण्याची वासना व्हावयाची नाहीं. मग आपल्या सन्मान्य व विद्वद्वर्य मित्रावर त्याच्या मृत्युपश्चात् लेखणी उचलावयाला त्यांचा हात सरसावेल, अशी मुळीं शंका देखील मनामध्यें आणावयास नको !' अशी सरळ स्वभावाचे रा० **कोरगांवकर** यांची भोळीभाबडी समजूत होती, पण ती समजूत नसून गैरसमजूत होती. हें त्यांच्या प्रत्ययास आलें म्हणूनच त्यांना 'काव्यसंग्रहा'ची बाजू घेऊन 'सलामी'ची फैर झाडावी लागली.

करण्याच्या बाबतींत आलंकारिकांचा मतभेद होण्याचा संभव असतो. हें रसिकांस माहितच आहे, म्हणून जेथें कै० ओकांच्या हातून अलंकारांची परीक्षा करण्यांत चुकी झाली आहे, असें नवीन संपादकद्वयास वाटलें, तेथें त्यांनीं ती सरळपणें दुरुस्त करून मोकळें व्हावयास पाहिजे होतें. वस्तुतः कै० ओकांची चूक झालीच नाहीं, हें जरा विचार करून पाहिलें असतें, तर तें संपादकद्वयास सहज कळलें असतें. उद्योगपर्वांतील टीपेंत जीं उदाहरणें दिलीं आहेत, त्यांत कर्णपर्व, अध्याय २५ गीति १४ व १५ ह्या उतरून घ्यावयाच्या त्या न घेतां फक्त १४ वी गीति उतरून घेतली गेली आहे, असें आम्हास वाटतें. बारकाईनें विचार करून पाहिलें असतां संबंधातिशयोक्ति हा अलंकार मुख्यतः कै० ओकांच्या म्हणण्याप्रमाणें अध्याय २५ गीति १४ मध्येंच आहे. कारण तींत अंतकाचा अर्जुनाचें रक्षण करण्याच्या क्रियेशीं संबंध कल्पिला आहे. वास्तविक अंतकाचें काम रक्षण करण्याचें नाहीं, पण येथें असंबंध असून संबंधाची कल्पना केलेली आहे. अशा रीतीनें गीति १४ मध्यें असंबंधाची कल्पना करून पंतांनीं घडविलेला अलंकार कै० ओकांस जितका प्रतीत झाला, तितका तो संपादकद्वयास झाला नाहीं, हें स्पष्टच आहे. गीति १५ ही केवळ गीति १४ मधील विधानास पुष्टि देण्याकरितांच पंतांनीं रचिलेली आहे. वस्तुस्थिति अशी असतां नुकत्याच संपादकस्थानापन्न झालेल्या अननुभवी विद्वानांच्या दोषैकदृष्टीला कै० ओकांची चुकी आहे असें वाटलें, हें योग्यच झालें!

*( २ ) पृष्ठ २८९ टीप १८······प्रस्तुत स्थळीं 'पंकऱ्हद' शब्दांत 'ऱ्ह' ( ह+र ) या संयुक्ताक्षरानें मागील 'क' ह्या अक्षरास गुरुत्व आलें व छंदोभंग झाला असें वाटण्याचा संभव* आहे. कै० वामन दाजी ओक यांसारख्या काव्यशोधनपटु विद्वानासही ही शंका आली, म्हणून याची प्रस्तुत स्थलीं जरा विस्तारानें मीमांसा करितों.······या प्रयोगावरून पंतांस छंदःशास्त्रांतील बारीक सारीक नियम–जे ओकांसारख्या विद्वानांसही माहीत नव्हते ते— माहित होते असें सिद्ध होतें. [ कर्णपर्व, प्रथमावृत्ति, पृष्ठें २६३–२६४ ]

*वस्तुतः कै० ओकांस काय माहीत नव्हतें हें सांगण्यावांचून संपादकद्वयाचें कांहीं नडलें* होतें, असें नाहीं व तें प्रस्तुत पर्वावरील टीपांत सांगत बसण्याचें त्यांस कांहीं कारणही नव्हतें. वाचकांसही हें समजल्यानें कांहीं ज्ञानप्राप्ति होण्याचा संभव होता, असेंही नाहीं. कै० ओकांनीं आपण पंतांपेक्षां मोठे विद्वान आहों, असें कधीं जाहीरही केलें नव्हतें. पण कै० ओकांपेक्षां आम्हीं कितीतरी ज्यास्त ग्रंथ पाहिले आहेत व त्यांच्यापेक्षां

---

१. अशा प्रकारच्या मतभेदाचें एक उदाहरण येथें देतों. पंतांच्या आदिपर्वांतील गीति 'राजसुतेचें यश जें, येइल तुज काय गे! दरिद्रे! तें?। पाहसि विकावया तूं केसरमोल्यें कसें हरिद्रेतें?' ॥ ( अध्याय १०।१८ ) हींत मराठींतील अलंकारशास्त्रांवरील ग्रंथांचे लेखक आपापल्या मताप्रमाणें निरनिराळे अलंकार आहेत, असें सांगतात. एक म्हणतो 'निदर्शना', दुसरा सांगतो 'प्रतिवस्तूपमा' व तिसरा लिहितो 'अप्रस्तुतप्रशंसा'! सारांश, अलंकारांच्या बाबतींत एखाद्या पद्यांतील कल्पनेकडे निरनिराळे आलंकारिक ज्या ज्या भावनेनें पाहतात, त्या त्या रूपांत ती त्यांना दिसते. असाच प्रकार आणखी कितीतरी पद्यांत आढळणें शक्य आहे.

छंदःशास्त्राचें अध्ययन आम्हीं ज्यास्त केलें आहे, हें सांगण्याचा मोह विद्वान संपादकद्वयास आवरतां आला नाहीं, त्याला त्यांचा तरी काय उपाय? वस्तुतः त्यांनीं एकाद्या तत्कालीन नियतकालिकांत कै० ओकांच्या लेखनांतील दोषांचें दिग्दर्शन करणारा लेख लिहिला असता, तर कित्येक वाचकांच्या वाचनांत तो लेख आला असता व लेखकांच्या श्रमांचें खात्रीनें चीज झालें असतें.

कै० ओकांनीं अमुक टीप अमुक ठिकाणीं अशी कां लिहिली, हें त्यांच्याखेरीज इतरांस सांगतां येणें शक्य नाहीं. अमुक प्रयोग अप्रशस्त होय, असें लिहिण्यापूर्वी त्यांनीं कांहींच विचार केला नसेल, असें आमची मनोदेवता आम्हांस सांगत नाहीं. तें कसेंही असलें, तरी कै० ओकांस पिंगलमुनीचें विकल्पविधायक सूत्र माहीत नव्हतें, असें म्हणणें मोठ्या धाडसाचें आहे. कारण पंतकृत ऋषिरामायणांतील—

ती पां खरासि प्रेषी माराया प्रभुसि हा तया शमवी।
कार्य सुरांचें सत्वर करितों ऐसें सुराधिपा गमवी. ॥ २८

ह्या गीतीवर कै० ओकांनीं दिलेल्या टीपेचा (मोरोपंतकृत रामायणें, भाग २, अधिक टीपा–पृष्ठ ६७) पुढील भाग पहाः—

'आतां येथें 'प्रे' ह्या जोडाक्षरामुळें मागील अक्षरावर गुरुत्व येऊन छंदोभंग होतो. हा दोष 'प्रऱ्हेवा' ह्या पिंगलमुनीच्या विकल्पविधायक सूत्रानें टाळावा.'

ही टीप पंतकृत रामायणांच्या दुसऱ्या भागांतील कोणत्या पद्यावर दिलेली आहे, हें वर दर्शविलेंच आहे. हा रामायणांचा भाग सन १८९५ मध्यें छापून तयार झाला होता. तेव्हां कै० ओकांस पिंगलसूत्रें माहीत होतीं किंवा नव्हतीं, हें वाचकांनींच आपल्या मनाशीं ठरवावें हें बरें. तसेंच संपादकद्वयानें 'काव्यसंग्रहा'चें संपादकत्व स्वीकारण्यापूर्वी सदर्हू मासिकांत प्रसिद्ध झालेले मोरोपंतांचे ग्रंथ किती काळजीपूर्वक वाचिले होते, हेंही दिसून येतें.

कै० ओक यांच्यासंबंधीं संपादकद्वयानें लिहिलेल्या टीपांविषयीं आम्ही वर जें लिहिलें आहे, त्यावरून समंजस वाचकांनीं ह्या सर्व प्रकारांतील इंगित ताडलेंच असेल. जार्ज वाशिंग्टन ह्यास त्याच्या वडिलांनीं दिलेल्या कुऱ्हाडीचा त्यानें जसा आपल्या बापाचें आवडतें झाड तोडण्याच्या कामीं उपयोग केला, तसाच प्रकार 'निर्णयसागर' छापखान्याच्या मालकांनीं दिलेल्या लेखणीचा संपादकद्वयानें केला आहे. कै० ओक यांची महाराष्ट्रवाङ्मयांतील कामगिरी इतकी भरींव आहे, कीं आपल्या पांडित्यप्रकर्षाचें प्रदर्शन करणाऱ्यांनीं अशा रीतीनें जरी कांहीं गोष्टींच्या अज्ञानाविषयीं त्यांच्यावर दोषारोप करण्याचा प्रयत्न केला, तरी त्यांच्या कीर्तिमंदिराचा पाया इतका भक्कम आहे, कीं त्यास यत्किंचितही ढका लागावयाची भीति नाहीं.

मनुष्यप्राणी स्खलनशील आहे. परंतु ही गोष्ट ज्यांना खरोखर समजते, अशा सुज्ञ व्यक्ति जगांत फारच विरळ आढळतात. स्वतः संपादक एवढे मोठे पंडित व एकानें लिहिलेला मजकूर दुसऱ्याच्या नजरेखालून गेलेला, असें असल्यामुळें कर्णपर्वाच्या प्रथमावृत्तींतील टीपा

अगदीं निर्दोष असावयास पाहिजे होत्या. परंतु दुःखाची गोष्ट ही, कीं संपादकद्वयाच्या हातच्या टीपांत कितीतरी चुका आढळून आल्या. त्यांतील कांहीं टीपा पुढें देत आहों. त्या देण्याचा हेतु एवढाच आहे, कीं त्या कशा होतात, हें थोडेंसें वाचकांच्याही ध्यानांत यावें:—

( १ ) अध्याय १३ गीति २२ मधील 'तोत्रें' शब्दावरील टीपः–अंकुशानें. [ हत्तीच्या बाबतींत अंकुशाचा व बैलाच्या बाबतींत अंकुशाचा उपयोग करितात कीं काय ? ]

( २ ) अध्याय १३ गीति २७ मधील 'महारथ' ह्या शब्दावरील टीपः–महारथ म्हणजे अकरा ( ? ) हजार वीरांशीं भांडणारा. [ महारथाची व्याख्याः–एको दशसहस्राणि योधयेद्यस्तु धन्विनाम् । शस्त्रशास्त्रप्रवीणश्च महारथ इति स्मृतः ॥ म्हणजे–जो शस्त्रविद्येमध्यें प्रवीण असून एकटा दहा हजार धनुर्धर वीरांशीं युद्ध करितो, त्यास 'महारथ' असें म्हणतात. येथें 'एको दशसहस्राणि' ह्या शब्दांनीं संपादकद्वयास दगा दिला, हें स्पष्टच आहे !]

( ३ ) अध्याय ५० गीति ७५ वरील टीपेचा भाग–'स्वपित्याची जरा घेतल्यामुळें भीष्माचार्यांवर शंतनूचा पूर्ण अनुग्रह होऊन ते इच्छामरणी झाले'.

[ भीष्माचार्यांनीं जरा ( वार्धक्य ) कोणाची घेतली ? केव्हां घेतली व कां घेतली ? ]

ह्या टीपा आम्हीं त्या त्या ठिकाणीं शुद्ध केल्या आहेत व अशाच अन्यत्र आढळलेल्या चुकीच्या टीपाही दुरुस्त केल्या आहेत.

एकादा लेखक जें काय लिहितो, तें जितकें निर्दोष करितां येईल तितकें तो करीतच असतो. आपल्या लेखांत दोष राहावे, असें कोणासही वाटत नाहीं. पण एकादे वेळेस लेखकाची स्मरणशक्ति त्याला दगा देते, तर कधीं त्याची नजरचूक होते.[1] अशा चुका कदाचित् कोणाच्या हातून झाल्याच, तर त्या दुरुस्त करणें हें सरळ स्वभावाच्या, खऱ्या व विनीत विद्वानाचें कर्तव्य होय. पण विद्वत्ता व मनाचा मोठेपणा ह्या गुणांची सांगड देवानें नेहमीं घातलेली असतेच असें नाहीं. कै० ओक यांनीं मराठी काव्यांचें संशोधन व त्यांच्या अर्थाचें प्रकटीकरण ह्या क्षेत्रांत केलेलें काम इतकें भव्य व विविध आहे, कीं त्यांत क्वचित् दोष राहिले असले, तरी ते 'खंडींत पाव रति' ह्या प्रमाणांतच आढळतील. कै० ओकांसंबंधानें संपादकद्वयानें निष्कारण केलेल्या अव्यापारेषु व्यापारामुळें इतकें नाइलाजास्तव लिहावें लागलें आहे. पण आमचे समंजस व सुखभावी वाचक त्याबद्दल आमच्यावर रागावणार नाहींत, अशी आशा आहे.

एकंदर ह्या सर्व प्रकरणांत आम्हाला एका गोष्टीचा मोठा आनंद वाटतो. पंतांच्या सुदैवानें संपादकद्वयानें त्यांची बाजू नेहमीं उचलून धरावयाचीच असें ठरविलें होतें, म्हणून बरें झालें. नाहींतर 'गीती'लाच 'आर्या' म्हणणारे पंत ह्या संपादकद्वयाच्या टीकास्त्राच्या माऱ्यांत सांपडून जर्जर झाले असते व त्यांस छंदःशास्त्राचें ज्ञान विशेष नव्हतें, असा ठराव करण्यांत आला असता. पंतांचें नशीब शिकंदर म्हणूनच त्यांच्यावर असा प्रसंग यावयाचा योग टळला, असें म्हणावयास हरकत नाहीं.

---

१. पंतांच्या हातून घडलेली एक मजेदार नजरचूक प्रस्तुत पर्वाच्या ३८ व्या अध्यायाच्या ४७ व्या गीतींत वाचकांस आढळेल.

# आभारप्रदर्शन.

श्री. रा. रा. **पांडुरंग जावजी,** जे. पी., यांच्या कृपेनें आम्हाला ही महाराष्ट्रकविवर्य मोरोपंतांची अल्पसेवा करण्याची संधी मिळाली. पंतवंशज रा. रा. दत्तात्रय रामकृष्ण पराडकर यांनीं पंतलिखित पोथीबरहुकूम प्रसिद्ध केलेल्या प्रतीचा शुद्ध पाठ निर्णीत करण्याच्या कामीं आम्हांस फार उपयोग झाला. तसेंच पंतवंशज रा. रा. वैद्यरत्न शंकरशास्त्री पराडकर (पुणें) यांच्या प्रोत्साहनानें पुणें येथें स्थापन झालेल्या 'मयूरमंडळा'नें पंतांच्या आर्याभारतावर केलेल्या चर्चेपैकीं कर्णपर्वावरील चर्चेचा कांहीं भाग आमच्या पाहाण्यांत आला, त्याचा क्वचित् उपयोग आम्हीं करून घेतला आहे. सदर्हू चर्चा साप्ताहिक 'ज्ञानप्रकाश' व दैनिक 'नवाकाळ' ह्या पत्रांत मधून मधून प्रसिद्ध होत असल्यामुळें ती समग्र आमच्या पाहांण्यांत आली नाहीं, आणि कदाचित् ती आमच्या पाहाण्यांत आली असती, तरी तिचा स्थलाभावामुळें आम्हाला पूर्णपणें उपयोग करून घेतां आला नसता. कारण चर्चा म्हटली, कीं तींत पाल्हाळ असावयाचाच. ही चर्चा 'तुकारामाच्या अभंगांच्या चर्चे'प्रमाणें पुस्तकरूपानें प्रसिद्ध होण्याचा कधीं काळीं योग आल्यास तिचा पंतांच्या भक्तांस व त्यांच्या काव्यांच्या रसिक भोक्त्यांस फार आनंद होईल. ह्याखेरीज आमचे मित्र रा. रा. नामदेव श्रीधर मुळे, निवृत्तसेवाशिक्षक, अध्यापनकलापाठशाला, उमरावती, ह्यांनीं कठीण पद्यांचा अर्थ लावण्याच्या कामीं आमच्या बरोबर वारंवार चर्चा केली व हें पर्व निर्दोष छापलें जावें म्हणून आम्हांस अनेक सूचना केल्या. कै० केळकर यांच्याविषयीं माहिती त्यांचे पुतणे रा. रा. यशवंत नरसिंह केळकर (पुणें) यांनीं व कै० के. व्ही. लक्ष्मणराव यांच्याविषयीं माहिती त्यांचे मित्र रा. रा. नीळकंठ बळवंत भवाळकर बी. ए. एल्. एल्. बी, वकील, (नागपुर) यांनीं मिळवून दिली. तसेंच प्रस्तुत पर्वाची ही आवृत्ति तयार करण्याच्या कामीं आम्हाला अनेक विद्वान ग्रंथकारांचे लेख मार्गदर्शक झाले. अशा रीतीनें अनेक सज्जनांकडून आम्हांस निरनिराळ्या प्रकारें झालेल्या साहाय्याबद्दल आम्ही त्यांचे फार आभारी आहों.

उमरावती<br>
वर्षप्रतिपदा, शके १८५४<br>
तारीख ७-४-१९३२

दा. के. ओक.

# उपोद्घात.

उत्साह, तेज, विद्या, शिक्षा, बळ, धैर्य, शौर्य दोघांचें ।
तुल्यचि, ज्यापरि गंगायमुनांच्या पावनत्व ओघांचें. ॥

( कर्णपर्व, अध्याय ४६ गीति ४ )

एकाद्या ग्रंथासंबंधीं अशा कांहीं गोष्टी असतात कीं, तो ग्रंथ वाचावयास आरंभ करण्यापूर्वी जर त्या वाचकांस माहीत असल्या, तर त्यांतील विषय किंवा कथासंदर्भ त्यांस समजावयास अडचण पडत नाहीं. तोच न्याय प्रस्तुत पर्वासही लागू आहे. याकरितां ह्या पर्वाचा नायक जो वीराग्रणी कर्ण त्याचा जन्म, त्याचें बाळपण, पालन, पोषण व शिक्षण आणि त्यानें केलेले पराक्रम इत्यादि कर्णपर्वातील कथाभागापूर्वींच्या कर्णविषयक गोष्टी व प्रस्तुत पर्वाशीं संबद्ध असलेले आणखी कांहीं मुद्दे वाचकांस सादर करीत आहों.

## १. कर्णाच्या चरित्राचा पूर्वार्ध.

यदुकुलोत्पन्न शूर नामक राजाची कन्या पृथा ही होय. तिला कुंतिभोजराजानें दत्तक घेतल्यामुळें तिचें नांव कुंति असें पडलें, व प्रचारांत तेंच नांव विशेष रूढ झालें. ती कुमारी असतां दुर्वासऋषि एकदां कुंतिभोजराजाकडे आले होते. त्या वेळीं त्या कोपिष्ठ ऋषींची तिनें उत्तम प्रकारें सेवा केल्यामुळें ते प्रसन्न झाले व त्यांनीं तिला सूर्य, यमधर्म, वायु, इंद्र व अश्विनीकुमार ह्या देवतांचे मंत्र देऊन सांगितलें, कीं, 'कारणपरत्वें तुला जेव्हां पुत्र असावे अशी इच्छा होईल, तेव्हां तूं यांपैकीं ज्या कोणाचा जप करिशील तो देव प्रगट होऊन तुझें इच्छित तुला प्राप्त करून देईल.' एकदां हिच्या मनांत आलें कीं, आपण मंत्रप्रभावाचा खरेखोटेपणा पाहावा, व त्याप्रमाणें तिनें सूर्याचा मंत्र जपून त्याचें आवाहन केलें. तेव्हां मनुष्यदेहधारी सूर्य तिच्यापुढें येऊन उभा राहिला व आपलें आवाहन कां करण्यांत आलें यासंबंधीं विचारपूस करूं लागला. तेव्हां तिनें त्याचें आवाहन करण्याचा हेतु त्यास सांगितला. नंतर सूर्याच्या कृपेनें हिच्या पोटीं 'सहजकवचमणिकुंडलधर रुचिर' असा पुत्र जन्मास आला ( पंतकृत आदिपर्व, अध्याय १७ ). परंतु ती अविवाहित असल्यामुळें तिनें लज्जेमुळें त्याला एका पेटींत घालून नदींत सोडून दिलें.

ती पेटी त्या जलप्रवाहांतून वाहात जात असतां अधिरथ नामक सूतास सांपडली. ती उघडून पहातां तींत एक सुंदर बालक त्यास आढळला. तो निपुत्रिक असल्यामुळें त्या मुलास पाहून त्याला फार आनंद झाला, व त्याला घरीं आणून त्याचें पालनपोषण करण्यास त्यानें आपल्या राधा नामक पत्नीस सांगितलें. त्या मुलाला पाहून तिलाही फार आनंद झाला व तिनें पतीकडून त्याचें नालच्छेदन, जातकर्म इत्यादि संस्कार करविले व त्याचें नांव वसुषेण असें ठेविलें. ( त्याचें नांव कर्ण असें कां पडलें तें पुढें सांगितलें आहे ). वसुषेण प्रौढ

झाल्यावर त्याला अधिरथानें धनुर्विद्या शिकण्याकरितां द्रोणाचार्यांकडे पाठविलें. तेथें त्याच वेळीं दुर्योधनादि कौरव व अर्जुनादि पांडव यांस धनुर्विद्या शिकण्यासाठीं भीष्माचार्यांनीं नेऊन ठेविलें होतें. हे सर्व शिष्य धनुर्विद्येंत प्रावीण्य संपादन करीत असतां वसुषेण देखील अर्जुनाच्या बरोबरीचा झाला. इतकेंच नाहीं, तर तो प्रसंगविशेषीं अर्जुनापेक्षांही ज्यास्त प्रावीण्य दाखवी. तेणेंकरून ते एकमेकांचा मत्सर करूं लागले, व पुढें तो वाढतां वाढतां दोघांमध्यें वैमनस्य उत्पन्न झालें. त्यांतही द्रौपदीस्वयंवराच्या वेळीं तिनें 'हा सूतपुत्र असल्यामुळें कर्णास मी वरणार नाहीं,' असें म्हटल्यामुळें त्यास फार दुःख झालें व तेव्हांपासून त्याचा पांडवांविषयीं असलेला द्वेषाग्नि अत्यंत प्रज्वलित झाला. हा प्रकार पाहून दुर्योधनाला फार आनंद झाला व तो वसुषेणावर फार ममता करूं लागला. पुढें त्यानें त्यास आपल्या आश्रयासच ठेविलें.

द्रोणाचार्यांनीं आपल्या शिष्यांच्या आंगचें क्षात्रधर्माचें प्रावीण्य भीष्मादिकांस दाखविण्यासाठीं एक समारंभ घडवून आणिला. त्या प्रसंगीं आपण अर्जुनाबरोबर द्वंद्वयुद्ध खेळावें अशी कर्णास इच्छा झाली, परंतु तो राजपुत्र नसल्यामुळें त्याला तसें करण्यास परवानगी मिळाली नाहीं. तेव्हां दुर्योधनानें, तेथल्या तेथें रंगमंडपांत, त्यास अंगदेशाचें राज्य देऊन तत्काल राज्याभिषेकही करविला. परंतु सूर्यास्त झाल्यामुळें तो समारंभ आटोपला व सर्वजण आपापल्या ठिकाणीं गेले. ह्या आणीबाणीच्या वेळीं दुर्योधनानें कर्णास अंगदेशाचें राज्य दिल्यामुळें त्यानें कृतज्ञतापूर्वक 'मी तुझा कोणत्या रीतीनें उतराई होऊं?' असें दुर्योधनास विचारिलें. तेव्हां त्यानें उत्तर दिलें कीं—

> भूप म्हणे, 'अत्रुटिता धारा सरळी जशीच तैलाची ।
> यावज्जीव असावी त्वन्मैत्री, स्थिति धरूनि शैलाची.' ॥
>
> (पंतकृत आदिपर्व, अध्याय २६।५२)

ह्या दुर्योधनानें प्रदर्शित केलेल्या इच्छेस अनुसरून, मध्यंतरीं अनेक अडचणी आल्या, तरी त्यांस न जुमानतां, तो दुर्योधनाच्या पक्षासच अगदीं एकनिष्ठपणानें चिकटून राहिला. दुर्योधनानें पांडवांशीं जें कपटाचरण केलें, त्यांचा नाश करण्याकरितां जे जे प्रयत्न केले, व द्रौपदीची विटंबना केली, त्या नीतिन्यायास सोडून करण्यांत आलेल्या सर्व अत्याचारांमध्यें कर्णाचें अंग होतें.

हा मोठा सूर्योपासक होता. सूर्याच्या मंत्रप्रभावानें याचा जन्म झालेला असल्यामुळें सूर्यही याच्यावर पुत्राप्रमाणें प्रेम करी. एकदां ब्राह्मणवेषानें सूर्य कर्णाकडे येऊन त्यास म्हणाला, कीं, 'इंद्र ब्राह्मणवेषानें तुझ्याकडे येऊन तुझ्या अंगास उपजतच वज्राप्रमाणें अभेद्य असलेलें कवच व तुझ्या कानांत असलेलीं देदीप्यमान कुंडलें तो मागणार आहे, तर त्याला तूं तीं देऊं नको'. परंतु कर्ण मोठा दानशूर असल्यामुळें त्यानें सूर्यास सांगितलें, कीं ब्राह्मणानें माझीं कवचकुंडलें मागितल्यास माझ्यानें त्यास 'नाहीं' असें उत्तर देववणार नाहीं. त्यावर सूर्यानें त्यास सांगितलें, कीं कवचकुंडलें दिल्यावर इंद्रापासून एकादी अमोघ शक्ति (अस्त्रविशेष) तरी मागून घे. पुढें इंद्र ब्राह्मणवेषानें कवचकुंडलें मागावयास

आला असतां सूर्याच्या सांगण्याप्रमाणें ह्यानें त्याच्याजवळून एक अमोघ शक्ति मागून घेतली, व त्यास आपलीं कवचकुंडलें कर्तन करून दिलीं ( मोरोपंतकृत वनपर्व, अध्याय १४ ). तेव्हांपासून यास 'कर्ण' असें नांव पडलें.

कवचकुंडलें गेल्यावर परशुरामाकडे जाऊन धनुर्वेदांत व इतर युद्धविषयक कलाकौशल्यांत विशेष प्रावीण्य संपादन करावें, असा कर्णाच्या मनांत विचार आला व त्याप्रमाणें तो परशुरामाकडे गेला. परंतु तेथें त्यानें आपण ब्राह्मण आहों, असें सांगून परशुरामास फसविलें व शस्त्रास्त्रविद्या संपादन केली. यामुळें त्याची इच्छा सफळ न होतां, उलट परशुरामाची त्याच्यावर इतराजी झाली व त्यानें त्यास शाप दिला, कीं, 'जी विद्या तूं माझ्याजवळून संपादन केली आहेस, ती तुला समरांगणांत आठवणार नाहीं' ( कर्णपर्व, अध्याय २९ गीति ४-११ ). एकदां कर्ण मृगया करीत असतां त्याचा बाण एका ब्राह्मणाच्या होमधेनूस लागल्यामुळें ती मरण पावली. ह्या त्याच्या अपराधाबद्दल त्यानें त्या ब्राह्मणाची क्षमा मागून त्यास अनेक गाई देण्याचें कबूल केलें. परंतु त्या शीघ्रकोपी ब्राह्मणानें तें अमान्य करून त्यास शाप दिला, कीं, 'युद्धसमयीं तुझ्या रथाचें चाक जमिनींत गढून जाईल' ( कर्णपर्व, अध्याय २९ गीति २५-३१ ). अशा प्रकारें, केवळ दुर्दैवानें, कर्ण शापदग्ध झाला.

अज्ञातवासांतून पांडव प्रकट झाल्यावर धर्मराजानें दुर्योधनाजवळ आपलें अर्धें राज्य मागितलें; परंतु त्यानें सुईच्या अग्रावर ठेवण्याइतकीही माती मिळणार नाहीं, असें सांगितल्यामुळें धर्मराजानें कृष्णास दुर्योधनाची समजूत घालण्याकरितां पाठविलें. परंतु त्याच्या दुराग्रहापुढें कृष्णाचें कांहीं चाललें नाहीं, तेव्हां तो परत जाण्यास निघाला. त्या वेळीं त्यानें कर्णास एकांतांत गांठून त्यास सांगितलें कीं, 'तूं दुर्योधनाचा आश्रय केला आहेस खरा, परंतु तुझा जन्म कुंतीपासून झाला असून तूं तिचा ज्येष्ठ पुत्र आहेस. सर्व पांडव तुझे भ्राते आहेत, व तूं धर्मराजाचा ज्येष्ठ भ्राता आहेस. हें तुझें नातें त्यास समजलें, तर त्यास फार आनंद होईल व सर्व बंधूंसह तुला आपला वडील भाऊ असें मानून योग्य तो मान देईल व तुझ्या आज्ञेंत वागेल. यास्तव तूं माझें ऐक व पांडवांकडे चल.' यावर कर्णानें त्यास उत्तर दिलें कीं, 'कृष्णा! तूं जें काय सांगतोस तें सर्व खरें आहे. परंतु कुंतीनें माझा त्याग केला असतां राधेनें मला स्तन्य पाजिलें. अधिरथानें माझें लालनपालन करून माझें लग्नही केलें आहे. शिवाय दुर्योधनानें माझ्या बळावर पांडवांशीं युद्ध करण्याचें योजिलें आहे. तेव्हां त्याला मी कसें सोडूं? अशा प्रसंगीं मीं विश्वासघात केला, तर लोक तरी मला काय म्हणतील? तूं सुद्धां मला काय म्हणशील? तेव्हां पांडवांकडे जाणें मला श्रेयस्कर वाटत नाहीं. म्हणून आतां तूं परत जाऊन युद्धाचीच सिद्धता कर. कारण सर्व क्षत्रिय उन्मत्त झाले आहेत. दुर्योधनही फार दुष्ट असून राज्यादि वैभवामुळें उन्मत्त झाला आहे. तेव्हां हे सर्व युद्धांत मरण पावल्यास पृथ्वीवर अधिक पाप होणार नाहीं. आपलें दोघांचें झालेलें भाषण अगदीं गुप्त ठेव; कारण तें धर्मराजास कळलें तर तो युद्धच करणार नाहीं. पांडव धर्मानें वागणारे असल्यामुळें त्यांस युद्धांत जय मिळेलच'.

अशा रीतीनें कर्णास पांडवांकडे घेऊन येण्याचा प्रयत्न फसल्यामुळें व कौरव-पांड-

वांचें युद्ध होऊन त्यांत कदाचित् पांडवांचा नाश होण्याचा संभव आहे, हें जाणून गुप्त-पणानें कुंति कर्णाकडे गेली व तिनें त्यास त्याचें जन्मवृत्त सांगून त्यानें पांडवांकडे यावें म्हणून त्याचें मन वळविण्याची खटपट केली. परंतु त्यानें तिचें म्हणणें मान्य केलें नाहीं. कौरवांचा पक्ष न सोडण्याविषयीं त्याचा निश्चय पाहून तिनें त्यास म्हटलें कीं, 'धनुर्विद्येंत अर्जुन जसा तुझ्या बरोबरीचा आहे, तसे इतर पांडव नाहींत. म्हणून तूं त्यांच्या वाटेस जाऊं नको'. हें सर्व भाषण ऐकून कुंतीला कर्णानें पुढीलप्रमाणें वचन दिलें, तेव्हां ती स्वगृहीं परत गेलीः—

मारीन अर्जुनास चि समरीं, धर्मादिकां न चवघां मी. ॥ २८ ॥
स्वस्थ रहा, पांच तुझे सुत, सार्जुन कीं सकर्ण उरतील. ॥ ३० ॥
(पंतकृत उद्योगपर्व, अध्याय ११)

पुढें कौरवपांडवांचें युद्ध व्हावयाचें असें ठरलें व उभय पक्षांचीं दळें सिद्ध झालीं. कौरवसेनेचें आधिपत्य भीष्माचार्यांस देण्यांत आलें व त्यांनीं दहा दिवस घनघोर युद्ध केलें. ते रणांगणांत पडल्यावर द्रोणाचार्य सेनाधिपति झाले. त्यांनींही मोठ्या निकरानें पांच दिवस युद्ध करून आपल्या आंगची धडाडी सर्वांस दाखविली. ह्या पांच दिवसांत पांडवांनीं कौरवांस इतकें जर्जर केलें कीं, कर्णानें आपल्याजवळील अमोघ इंद्रदत्त शक्ति—जी त्यानें आतांपर्यंत अर्जुनावर सोडण्यासाठीं राखून ठेविली होती ती—घटोत्कचावर सोडून त्यास ठार केलें.

भारती युद्धाच्या सोळाव्या दिवशीं कौरवांचा सेनापति कर्ण झाला, व दोन दिवस उत्तम प्रकारें युद्ध करून त्यांत त्यानें आपल्या आंगचें अद्भुत आणि देवादिकांसही विस्मय-कारक असें समरकौशल्य प्रकट केलें. ह्या भीषण युद्धामुळें पृथ्वी थरथर कांपली व तीवरील प्राणिमात्रास भयंकर पीडा झाली, ह्यांत कांहीं विशेष नाहीं. पण समरभूमीपासून कितीतरी दूर असलेल्या दिग्गजांची अवस्था कर्णानें—

चापगुणझणत्कारें दिग्वारणमस्तकें हि झणझणवी. ॥ (अध्याय ४८।५१)

अशी केली. म्हणूनच पंतांनीं म्हटलें आहे—

तेव्हां मज कळलें, कीं या कर्णाच्या बळा नसे सीमा. ।
(कर्णपर्व, अध्याय २३।७)

ह्या दोन दिवसांतील कथाभाग पंतांनीं प्रस्तुत पर्वांत वर्णिला आहे, व तोच कर्णाच्या चरित्राचा उत्तरार्ध—खरें पाहिलें असतां चरमभाग—होय. त्यांतील प्रत्येक घटना हृदयस्पर्शी आहे, व त्या सर्वांच्या योगानें कर्णाच्या आंगचा मोठेपणा, सत्याचरण, स्वाभिमान, सरळ-पणा इत्यादि सद्गुण आपल्या सुगंधाचा आमोद वाचकसमुदायांत दरवळून सोडतात.

ह्या पर्वांत शस्त्रांचा खणखणाट, सैन्याच्या हालचालींचा दणदणाट, बाणांचा सणसणाट, उल्हाटयंत्रांचा गडगडाट, वीरांचीं मर्मभेदक भाषणें इत्यादि वीररसप्रकर्षोत्पादक अद्भुत—रम्य प्रसंग पंतांनीं वर्णिले आहेत, ते रसिक वाचकांनीं स्वस्थ चित्तानें वाचावे, अशी त्यांस विनंति आहे.

# २. कर्णपर्व.

किं कवेस्तस्य काव्येन किं काण्डेन धनुष्मतः।
परस्य हृदये लग्नं न घूर्णयति यच्छिरः? ॥

प्रस्तुत पर्व हें वीररसमय किंवा वीररसप्रधान आहे. पंतांना वीररसाची भट्टी उत्तम साधते. त्यांनीं भीष्म-द्रोण-कर्ण ह्या तीन पर्वांत वीररसाचा जणूं काय एक महानदच उत्पन्न केला आहे. त्यांतही ह्या पर्वांतील वीररसाचा परिपाक इतका उत्तम साधला आहे, कीं पंतांनीं ह्या पर्वांत मूर्तिमंत वीररसच वाचकांपुढें उभा केला आहे, असें वाटतें. पंतांनीं वीररसाच्या जोडीला भयानक व रौद्र हे रसही उत्पन्न केले असून ह्या तीन रसांचें खमंग मिश्रणही ह्या पर्वांत प्रसंगविशेषीं वाचकांस चाखावयास मिळतें.

हें पर्व पहिल्यापासूनच लोकप्रिय आहे. हंसकाककथानक (अध्याय २८) व दुःशासन-वध (अध्याय ४५) हे प्रसंग तर आबालवृद्धांच्या विशेष परिचयाचे आहेत. 'हर्षभरें नम भरिलें' (अध्याय २८।४१) व 'पीतों हें रक्त तुझें' (अध्याय ४५।२३) हीं पद्यें तर पूर्वी घरोघर मुलांबाळांच्या तोंडून ऐकावयास सांपडत असत.

पंतांनीं मूळ महाभारतांतील फक्त पांडवचरित्रच वर्णन करावयाचें अशी प्रतिज्ञा केली होती (आदिपर्व, अध्याय ११८ पहा.) तीस अनुसरून वर्ण्य विषयास सोडून असलेलीं आख्यानें व उपाख्यानें पंतांनीं गाळून टाकिलीं आहेत. परंतु असा संक्षेप करितांना त्यांनीं कोठेंही रसहानि होऊं दिलेली नाहीं. मूळ कर्णपर्वाचे शहाण्णव अध्याय असून त्यांचा सारांश पंतांनीं पन्नास अध्यायांत ग्रथित केलेला आहे. पंतांनीं कोणता भाग गाळिला व कोणत्या ठिकाणीं मूळांतील वर्णनाचा विस्तार केला, हें ह्या पर्वावरील टीपांत ठिकठिकाणीं दर्शविलेलें आहे, त्यावरून आमच्या ह्या विधानाची खात्री वाचकांस पटेल. पण पंतांनीं एकदोन ठिकाणीं मुद्दामच विस्तार केलेला दिसतो. कर्ण व शल्य यांच्या भांडणांत पंतांनीं पांच अध्याय (२४–२९) खर्चीं घातले आहेत. हंसकाककथानक हा भाग तर हृदयंगम वठला आहे. तसेंच पन्नासाव्या अध्यायांत पंतांनीं बराच विस्तार करून आपल्या प्रतिभा-भांडारांतील कल्पनारत्नांचा सढळ हातानें उपयोग करून मूळावर ताण केली आहे.

एकाद्या व्यक्तीचें स्वभावचित्र रेखाटणें व त्याच्या स्वभावाचा परिपोष करणें, ह्या बाबतींत पंतांचें अप्रतिम प्रावीण्य दिसून येतें. ह्या पर्वाचा नायक कर्ण व त्याचा प्रतिस्पर्धी अर्जुन हे दोघेही असामान्य योद्धे होते. रामायणीय युद्ध जसें 'रामरावणयोर्युद्धं रामरावणयोरिव' अशा प्रकारचें झालें, तसेंच भारती युद्धही 'कर्णार्जुनयोर्युद्धं कर्णार्जुनयोरिव' अशा प्रकारचें झालें. परंतु भारती युद्धांतील मुख्य सूत्रचालक जो भगवान् श्रीकृष्ण तो पांडवांचा पक्षपाती होता. पांडवांचा सत्पक्ष असल्यामुळें त्यांनाच विजयश्रीनें माळ घालावी एतदर्थ

---

१. तें कवीचें काव्य काय कामाचें? व तो धनुर्धराचा बाण काय कामाचा? कां कीं, जीं हृदयाशीं येऊन भिडलीं असतां मुरकुंडी वळत नाहीं!

त्यानें 'प्रत्युपकृतिरूपिणी सेवेची अपेक्षा न करितां' ( अध्याय ५०।६० ) अनेक युक्त्या लढविल्या व ऐन संकटाच्या वेळीं पांडवांचें त्यांच्या शत्रूंपासून संरक्षण केलें म्हणूनच अर्जुनाचें 'विजय' हें नांव सार्थ झालें.

कर्ण हा मोठा योद्धा होता. तसाच त्याचा स्वपराक्रमाबद्दल आत्मविश्वास होता—

सूतो[1] वा सूतपुत्रो वा यो वा को वा भवाम्यहम् ।
दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं तु पौरुषम्. ॥ ( अंक ३-३२ )

ही भट्ट नारायणकृत 'वेणीसंहार' नाटकांतील कर्णाची दर्पोक्ति अन्यथा होती, असें कोण म्हणूं शकेल? त्यानें आपल्या आंगच्या गुणांचें वर्णन करून आपण अर्जुनापेक्षां कोणत्या गुणांत वरचढ आहों, व कोणत्या गुणांत कमी आहों, हें दुर्योधनास सांगितलें आहे ( अध्याय २० पहा ), त्यावरून त्याच्या मनाचा सरळपणा दिसून येतो. कर्ण मोठा दाता होता. त्याच्या दातृत्वाविषयीं दुर्योधनानें—

हा ! दानशूर ! नाहीं शिवलें त्वन्मुखपयोभव 'न'कारा ।
द्विजसंकीर्ण न दिसतां वाटत होतें तुला भवन कारा. ॥
( अध्याय ४९।६३ )

असे उद्गार काढिले आहेत. स्वतः कर्ण 'माझ्या सर्वप्राणिप्रियदानव्रत असेचि ह्रातास' ( अध्याय २७।५८ ) असें आपल्याविषयीं सांगतो. त्याचा प्रतिस्पर्धी धर्मराज यानें त्यास 'अर्थिजनाचा सुरतरु' ( अध्याय ४०।५ ) असें प्रमाणपत्र देऊन त्याच्या ह्या गुणाचा गौरव केला आहे, हें विशेष आहे. अजातशत्रु धर्मराजासारखे महानुभावच 'शत्रोरपि गुणा वाच्याः' व 'मरणान्तानि वैराणि' ह्या त्रिकालाबाधित उच्च तत्त्वांचें परिपालन करीत असतात.

कर्णाच्या अतुल पराक्रमाचें वर्णन करणें शक्य नाहीं. त्याच्या पराक्रमाविषयीं दुर्योधनादि कौरवांची खात्री होती. असा हा अद्भुत रणपांडित्यप्रकर्षानें संपन्न व समरतांडव करण्यास सज्ज झालेला वीर युद्धांत पडला, हें धृतराष्ट्रास खरें देखील वाटेना ! तो संजयास म्हणाला—

जो सिंहद्विपविक्रम, वीर, वृषस्कंध, वज्रसंहनन ।
वृषगति, वृषाक्ष, वृषहृठ वृष, त्याचें मज मृषा गमे हनन. ॥ ( अध्याय ६।४ )

कर्णाची स्वयंसिद्ध तेजस्विता व अद्वितीय पराक्रम पाहून—

म्हणती राजे, 'साजे तेजस्वी पुत्र कर्ण हा रविला' । ( अध्याय ७।३२ )

हें योग्यच होय. त्याच्या पराक्रमाची वाचकांस थोडक्यांत कल्पना करून द्यावयाची असल्यास त्या कामीं पुढील गीति उपयोगीं पडेलः—

गुरु कुरुपितामह नृपहि बहु होते वीरवर, परंतु तिहीं, ।
केलें न, वृष जसें करि कर्म, स्तुत तें सुरासुरस्तुतिहीं. ॥ ( अध्याय ३४।४० )

---

१ मी सूत असेन वा सूतपुत्र अथवा कोणीही असेन. सत्कुलांत जन्मास येणें हें दैवाधीन असतें, पण पराक्रम हा माझ्याच स्वाधीन आहे.

कर्ण हा मित्रत्वाच्या उच्च कोटीचा एक आदर्श होऊन गेला. दुर्योधनाविषयीं त्याचें प्रेम अढळ होतें. श्रीकृष्णानें त्याला कौरवपक्षांतून पांडवांकडे आणण्याची मनःपूर्वक खटपट केली, पण ह्या मानधन पुरुषानें लोभमोहादि विकारांस वश होऊन दुर्योधनाचा पक्ष सोडला नाहीं, यावरून त्याच्या कृतज्ञतेची साक्ष पटते. 'ज्याला सहाय भगवान त्याच्या नाशीं प्रयास कां लटिके' ( कर्णपर्व–अध्याय २३।४ ) हें तत्त्व कर्णास माहीत होतें व तो कर्ण कृष्णाची योग्यता जाणून होता. पांडवांस त्याचा पाठिंबा असल्यामुळें कौरवनाश होणार हें त्यास माहीत नव्हतें, असें नाहीं, तथापि त्यानें दुर्योधनाचा विश्वासघात केला नाहीं व अधमपणा पदरीं घेतला नाहीं. 'सर्वथा सुकरं मित्रं दुष्करं प्रतिपालनं'[1] ह्या नियमास कर्ण हा अपवाद होय.

कर्ण दाता होता तसाच तो वक्ता देखील होता, असें दिसतें. कृष्ण, भीष्म, द्रोण व विदुर ह्या तत्त्वज्ञान्यांच्या उपदेशाचा परिणाम दुर्योधनावर मुळींच होत नसे. एकट्या कर्णाच्या भाषणाचीच भुरळ त्याच्या मनावर पडत असे, ह्यावरून ही गोष्ट स्पष्ट होते. ह्याच्या अंगीं अनेक सद्गुण होते, परंतु 'ढेकणाच्या संगें हिरा जो भंगला' अशी दुर्योधनाच्या मैत्रीमुळें ह्याची स्थिति झाली होती. ह्याच्या अंगीं व्यवहारज्ञानाचा अभाव दिसून येतो. नाहीं तर त्यानें भीष्म-द्रोण-व्यासादिकांच्या सदुपदेशाचा अव्हेर केला नसता ( अध्याय ५०।४९ ), व शल्यासारख्या हितशत्रूची आपल्या सारथ्याच्या कामीं योजना करून घेतली नसती.

कर्णाचा प्रतिस्पर्धी अर्जुन हाही असामान्य योद्धा होता, पण त्याचा पाठिराखा भगवान् श्रीकृष्ण हाच त्याचा सारथी असल्यामुळें त्यास शत्रुपराजयसौकर्य प्राप्त झालें होतें. कर्णानें आपली व अर्जुनाची तुलना केली आहे ( अध्याय २० ), ती वाचकांनीं अवश्य पाहावी.

अर्जुनसम वीर नसे मागें, आतां, पुढें न व्हायाचा ।
हा वीररसौघ, नगहि न उरेल, उरेल जो लवायाचा. ॥
( उद्योगपर्व, अध्याय १३।८३ )

असें भीष्माचार्यांनीं म्हटलें आहे, तें अक्षरशः खरें आहे. शिवाय अर्जुनानें वेळोवेळीं जें समरपाटव दाखविलें, व कर्णार्जुनांचें जें रोमांचकारी युद्ध झालें ( अध्याय ४६ व ४७ पहा ), त्यांचें पंतांनीं केलेलें वर्णन लक्षपूर्वक वाचणाऱ्यास—

भ्रमवी अरिला लाघव दावुनि बहु युक्ति जाणता पार्थ. ।
( अध्याय ४८।४९ )

ह्या विधानावरून त्याचें शरसंधान करण्याचें कौशल्य मोठें अप्रतिम होतें, अशी खात्री पटते. ह्यासंबंधानें पुढील श्लोक लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे:—

लक्ष्मणो लघुसंधानी दूरपाती च राघवः ।
कर्णो दृढप्रहारी च पार्थस्यैते त्रयो गुणाः. ॥

---

१. मित्रत्व संपादणें सुलभ आहे, परंतु त्याचें प्रतिपालन करणें–मैत्री राखणें–अत्यंत कठीण आहे.

सारांश, कर्णार्जुनांसारख्या अद्वितीय रणपंडितांचें युद्ध व त्याचें वर्णन करणारे 'वीर-कवींचे नायक' मोरोपंत असा योग जुळून आल्यामुळें हें पर्व वाचावयास घेतलें असतां तें आपण कधीं संपवूं, असें वाटावयास लागतें.

धर्म हा मूर्तिमंत धर्मावतारच होता. त्याचें 'हृदय सुमृदु होतें' (अध्याय १८।१३) व तो 'हा व्यूह प्रेक्षितांचि भय वाटे' (अध्याय ३०।२) असें अर्जुनास सांगतो. ह्यावरून तो रणभीरू असावा, असें कोणास वाटण्याचा संभव आहे. परंतु तोही समरकर्मांत कांहीं कमी नव्हताः—

धर्में न एक कर्णचि सर्वेहि त्याचा सहाय कांपविला. । (अध्याय ३८।३८) ह्या वर्णनावरून तो जरी स्वभावतःच सौम्यप्रकृति होता, तरी तो 'क्षत्रियाचा बच्चा' होता, ही गोष्ट सिद्ध होते. त्यानें कौरवपांडवांत युद्धाची ज्वाळा भडकून तींत आपला कुलक्षय व इतर क्षत्रियादिकांचा सर्वस्वनाश होऊं नये, म्हणून समेटाविषयीं आत्यंतिक प्रयत्न केले व ते यशस्वी होण्याचा संभव दिसत नव्हता, तरी त्यानें पुन्हां श्रीकृष्णाला शिष्टाईसाठीं कौरवांकडे पाठविलेंच होतें. सारांश, युद्धाचा प्रसंग टळावा व रक्तपात होऊं नये, म्हणून त्यानें आपली अगदीं शिकस्त करून पाहिली. तसेंच धर्म व नीति यांच्या नियमांचा भंग होऊं नये, अशाविषयीं तो फार जपत असे, व त्यामुळेंच त्याच्या अंगीं तडफ फारच कमी दिसून येते.

पंतांनीं ह्या पर्वांत निरनिराळ्या व्यक्तींचीं स्वभावचित्रें फार मार्मिकपणें रंगविलीं आहेत. स्वभावचित्रें रेखाटणें व व्यक्तींच्या स्वभावाचा परिपोष करणें, ह्या बाबतींत पंतांचें प्रावीण्य दिसून येतें. कृष्णाचा मुत्सद्दीपणा, भीमाचा आडदांड शिपाईबाणा, दुर्योधनाचा करारीपणा, दुःशासनाचा दुष्टपणा, शल्याचा पराक्रम व त्याचें पक्षपातित्व, अश्वत्थाम्याचा सरळपणा इत्यादि गुणांचा त्या त्या व्यक्तींच्या अंगीं योग्य परिपोष होईल, अशी पंतांनीं खबरदारी घेतली आहे. ह्या सर्व व्यक्तींचा पूर्णपणें परिचय करून देणें येथें शक्य नाहीं. याबद्दल आम्हांस दिलगिरी वाटते.

पंतांनीं ह्या पर्वांत वीररसाबरोबर रौद्र व भयानक ह्या रसांचाही यथायोग्य परिपोष केला आहे. तसेंच क्वचित् बीभत्स व करुण हे रसही प्रसंगोपात्त ह्यांत आढळतात. वीररस तर सर्वत्र ओतप्रोत भरलेला असून तो पूर येऊन दुथडी वाहात असलेल्या नदीप्रमाणें घोघो वाहात आहे. वीररसोत्कर्ष पाहावयाचा असल्यास भीम व अश्वत्थामा (अध्याय १०), अर्जुन व संशप्तकवीर (अध्याय १२ व ३३), भीम व कर्ण (अध्याय ३२), अर्जुन व अश्वत्थामा (अध्याय ३९), भीम व दुःशासन (अध्याय ४५), अर्जुन व

---

१. पंतांच्या तोलाचे पंडित, रसिक व रामभक्त सुप्रसिद्ध कवि विठोबा अण्णा दप्तरदार म्हणतातः—आर्याछंदें जोडुनि रामायण-भारतादि आयकवी । नायक वीर-कवींचा ऐसा होईल अन्य काय कवी ? ॥

कर्ण ( अध्याय ४६ व ४७ ) यांनीं केलेल्या युद्धांचीं वर्णनें पाहावीं. त्यांच्या वाचनानें सामान्य मनुष्याच्याही अंगांत वीरश्री संचारल्याशिवाय राहात नाहीं.

रौद्र व भयानक या रसांचा उत्कृष्ट नमुना भीम व दुःशासन यांच्या भीषण युद्धांत आढळतो ( अध्याय ४५ गीति १-३० ). रौद्र, भयानक व वीर ह्या रसांचा त्रिवेणी-संगमही तेथेंच आढळतो. धृतराष्ट्रानें कर्ण व दुःशासन यांचे पराक्रम व गुण आठवून जो विलाप केला आहे ( अध्याय ६ ), तो वाचणाऱ्याच्या डोळयांत दुःखाश्रु आणल्याशिवाय राहात नाहीं. येथील करुणरस पंतांच्या सहृदयत्वाची साक्ष पटवितो. क्वचित् बीभत्सरसोत्पादक वर्णनही आढळतें ( अध्याय १२ गीति २०-२९ ), पण तो वीररसाच्या पाठोपाठ यावयाचाच. पंतांनीं वीररसांत शृंगाराचेंही मिश्रण केलें आहे ( अध्याय ११।५,३५।४८-५६ ). ह्या मिश्रणाच्या औचित्यासंबंधीं आधुनिक विद्वानांनीं आक्षेप घेऊन पंतांवर कडक टीका केली आहे, परंतु अशा प्रकारचें मिश्रण संस्कृतसाहित्यशास्त्रज्ञांस असंमत नाहीं, ही गोष्ट ते विसरतात. एकंदरींत पंतांनीं निरनिराळ्या प्रसंगांस साजतील अशा रसांच्या तरंगिणी मोठ्या कौशल्यानें निर्माण करून त्यांतील रसांचे चषक वाचकांस अर्पण केले आहेत.

प्रस्तुत पर्व पंतांनीं आपल्या मधुर व ओजस्वी वाणीनें फारच रमणीय बनविलें आहे. ह्यांत अलंकार, सुभाषितें, प्रतिभादर्शक स्थळें वगैरे विपुल असून त्यांचें दिग्दर्शन टीपांत जेथल्या तेथें केलेलें आहे. ह्या पर्वांत पंतांच्या प्रतिभासंपन्न व प्रभावशाली वाणीस भरती आली आहे, असें वाटतें. पंतांनीं आपल्या कविताकन्यकेस सुशोभित करण्यासाठीं घडविलेले उपमा, उत्प्रेक्षा, व रूपकादि अलंकार मोठे चित्ताकर्षक व अमूल्य आहेत. त्यांतही उपमेवर दुसऱ्या उपमेचें केलेलें जडावाचें व मोठ्या कळाकुसरीचें काम पाहून 'उपमा रामपुत्रस्य' असे उद्गार स्वयंस्फूर्तीनें वाचकांच्या तोंडून बाहेर पडतात.

पंतांच्या इतर ग्रंथांप्रमाणें ह्या पर्वांतही विनोद आढळतो. वीररसाचा आस्वाद घेत असतां,

ते दोघेही झाले श्राद्धपतीचे तुझ्या गुणें अतिथी. । ( अध्याय ३।३३ )
धर्मसहाय स्वर्गीं झाले देवांस जांवई, व्याही. । ( अध्याय ४।१६ )

अशा प्रकारचे उल्लेख वीररसाचा खमंगपणा वाढवितात. पंतांनीं कोठें कोठें शब्दांवर कोट्या केल्या आहेत ( अध्याय ६।१८, व ५०।७० ) व पुष्कळ ठिकाणीं श्लेषयुक्त रचना केली आहे ( परिशिष्ट ४ पहा ); अशा रीतीनें पंतांनीं आपला काव्यरस शक्य तितका ज्यास्त स्वादिष्ट बनविला आहे. पंतांनीं सुभाषितरूपी अमृतबिंदु इतस्ततः पेरून ठेविले आहेत, यामुळें त्यांच्या काव्याला विशेषच चटकदारपणा आला आहे.

पंतांच्या काव्यसागरांत बारीकसारीक दोष आढळतात, तसेच ते कर्णपर्वांतही आढळतात. त्यांचा उल्लेख आम्हीं त्या त्या स्थळीं टीपांत व परिशिष्टांत केला आहे. पण ते दोष पंतांच्या काव्यांतील गुणांच्या पर्वतप्राय राशीमध्यें कोठच्या कोठेंच गडप होऊन जातात.

ह्या पर्वाचें सूक्ष्म दृष्टीनें आलोडन केलें असतां वाचकांचें मन थोडेंसें विषण्ण झाल्या-

शिवाय राहात नाहीं. कारण कर्ण मोठा शस्त्रास्त्रवेत्ता होता, मोठा प्रभावशाली होता, मोठा बलाढ्य होता व मोठा मानधन होता, हें खरें. पण तो शापदग्ध होता. अर्जुनही कांहीं कमी नव्हता. पांडवांचा सत्पक्ष असल्यामुळें भगवान् श्रीकृष्ण त्यांच्या कल्याणासाठीं सदा झटत होते. अशी वस्तुस्थिति असूनही अर्जुन कर्णाचा सरळपणें पराभव करूं शकला नाहीं. अर्जुनाला त्याचा नाइलाजास्तव अधर्मानेंच वध करावा लागला. राजनीति व निर्भेळ सत्याचरण यांची नेहमीं सांगड घालून वागण्याचा प्रयत्न केल्यास जगांतील सर्व व्यवहार सुरळितपणें चालणें अशक्य होईल, किंवा 'पापानां न वधे पापं' (रामायण, सुंदरकांड, सर्ग ५२।११) अशी नीतीच आहे, असें सांगून ह्या प्रकाराची संपादणी करितां येईल. पण एवढें खरें कीं, कपटाचरणास प्रथम आरंभ कौरवांनीं केला, तेव्हां पांडवांनीं तरी त्यांच्याशीं सात्त्विकपणानें कां वागावें? हा प्रश्न आहेच. सारांश, व्यवहारांत 'शठे शाठ्यं समाचरेत्' ह्या न्यायानेंच वागणें इष्ट होय, आणि म्हणूनच—

व्रजन्ति ते मूढधियः पराभवम् ।
भवन्ति मायाविषु ये न मायिनः. ॥[1]

ही महाकवि भारवीची उक्ति वडिलार्जित राज्यवैभव टिकवूं इच्छिणाऱ्या व नवीन संपादन करूं पाहाणाऱ्या राजकारणी व्यक्तींनीं सदैव लक्ष्यांत वागवून तीप्रमाणेंच त्यांनीं व्यवहारांत वागण्याचें धोरण ठेविलें पाहिजे. पांडव तरी कौरवांशीं ह्याच धोरणानें वागले, म्हणून त्याबद्दल त्यांस विशेष दोष देतां येणार नाहीं, असेंच कोणीही म्हणेल.

## ३. हें कर्णपर्व कीं हा नरनारायणविजयग्रंथ ?

या साधुसंगमुदिरें मुदित श्रीरामसुतमयूर कृती ।
नरनारायण विजयग्रंथ केरी[2] व्हावया सुखी सुकृती. ॥
(कर्णपर्व, अध्याय ५०।७५)

---

१. कपटी मनुष्यांशीं जे कपटानें वागत नाहींत ते मूर्ख पराभव पावतात.

२. ह्या क्रियापदाचा कर्ता कोण? नरनारायण विजयग्रंथ करी–असा पाठ घेतला तर सर्व कल्पनेचे खेळ बंद होतील. पंतांनीं स्वलिखित पोथींत शब्द तोडलेले नाहींत. ते आपण योग्य अर्थास पोषक होतील अशा रीतीनें तोडले पाहिजेत. या (बाबूजी नाईकरूपी) साधुसंगमुदिरें मुदित [असा] श्रीरामसुतमयूर कृती, सुखी [व] सुकृती व्हावया नर (अर्जुन) [व] नारायण (श्रीकृष्ण) विजयग्रंथ (महाभारत नामक ग्रंथ) करी–असा अन्वय करावा. पंत मोठ्या भक्तिभावानें किंवा विनयानें सांगतात, कीं मी लिहीत असलेला 'विजयग्रंथ' मी रचिला नसून प्रत्यक्ष नरनारायणांच्या जोडीनेंच माझ्या ठिकाणीं काव्यस्फूर्ति निर्माण करून लिहविला आहे. येथें 'करी' हें एकवचनी क्रियापद आहे, ही एक मोठीच अडचण आहे. पण नराचें नारायणाशीं व नारायणाचें नराशीं असलेलें तादात्म्य पाहून पंतांनीं त्यांच्या ठिकाणीं अद्वैत कल्पून मुद्दामच एकवचनी प्रयोग केला असावा, असें समजावयास हरकत नाहीं.

ह्या पर्वासंबंधानें अशी एक आख्यायिका आहे, कीं पंतांनीं सर्व महाभारतावर काव्य-रचना करण्यापूर्वीच 'नरनारायणविजयग्रंथ' म्हणून हें पर्व रचिलें होतें, व त्यानंतर पुढें कधींतरी महाभारतांत व्यासांनीं गायिलेलें पांडवांचें चरित्र आपण मराठी भाषेंत आपल्या स्वतःच्या उद्धारार्थ रचावें अशी त्यांस इच्छा झाली:—

हरि ज्यांचा कैवारी त्या पांडुसुतांसि वंदितों भावें।
वाटे चरित्र त्यांचें कांहीं आपण तरावया गावें. ॥

(आदिपर्व, अध्याय १ गीति ८)

तीस अनुसरून त्यांनीं आपल्या भारताच्या रचनेस सुरुवात केली. पंतांना चित्रकाव्याची आवड फार, ती अंशतः पूर्ण करण्याकरितां त्यांनीं 'श्रीपांडवसहायो भगवानरविंदाक्षो जयति' असा एक अष्टादशाक्षरी मंत्र रचून त्यांतील प्रत्येक अक्षर अनुक्रमानें प्रत्येक पर्वाच्या आरंभीं योजावयाचें असें ठरविलें. ह्या ठरींव क्रमास अनुसरून आदिपर्वापासून द्रोणपर्वापर्यंतचीं सात पर्वें तयार झालीं. पुढें पंतांस असें आढळून आलें, कीं आठवें पर्व जें कर्णपर्व, त्याचें आद्याक्षर 'भ' हें असावयास पाहिजे व तें पूर्वीच रचिलेल्या[१] नरनारायण-विजयग्रंथाचें प्रथमाक्षर म्हणून आधींच येऊन गेलेलें आहे, हें पाहून पंतांस मोठी धन्यता वाटली.

ही आख्यायिका खरी आहे अशी ह्या पर्वाचे भूतपर्व संपादक कै० नारायण चिंतामण केळकर बी. ए. व कै० के. व्ही. लक्ष्मणराव, एम्. ए. यांची समजूत होती, असें त्यांनीं ह्या पर्वास जी एक अगदीं छोटीशी प्रस्तावना जोडिली होती, तीवरून दिसून येतें. समग्र भारत रचण्यापूर्वीच पंतांनीं कर्णपर्व (अर्थात् त्यांच्या समजुतीप्रमाणें नरनारायण-विजयग्रंथ) रचिलें होतें. ह्या समजुतीस आधारभूत अशीं आणखी चार प्रमाणें त्यांनीं आपल्या प्रस्तावनेंत दिलीं होतीं तीं:—

(१) पंतांनीं या पर्वाच्या शेवटीं आपल्या यजमानाच्या स्तुतिपर तीन गीति रचिल्या आहेत. असा प्रकार शेवटच्या पर्वाशिवाय इतरत्र कोठेंच आढळत नाहीं. तेव्हां बारामतीस येऊन बाबूजी नाइक जोशी यांच्या आश्रयास राहिल्यावर पंतांनीं हेंच काव्य प्रथम केलें असावें, असें दिसतें. जर भारतास आदिपर्वापासून आरंभ केला असता, तर पंतांनीं पहिल्या पर्वांत आपल्या यजमानाचा उल्लेख केला असता, किंवा त्या व मध्यंतरीं कोणत्याही पर्वांत तसा उल्लेख न करितां, शेवटच्यांत मात्र केला असता.

(२) हें पर्व प्रथम स्वतंत्र ग्रंथ म्हणून केलें, असें शेवटच्या गीतीवरून स्पष्ट होतें. पंतांनीं या ग्रंथाला 'नरनारायणविजयग्रंथ' हें नांव दिलें आहे.

(३) या पर्वाला 'कर्णपर्व' असें पंतांनीं कोठेंच म्हटलें नाहीं. इतर प्रत्येक पर्वाच्या अंतीं पंतांनीं 'अमुक पर्व समाप्त झालें' म्हणून लिहिलेलें आढळतें, तसा प्रकार या पर्वांत नाहीं.

---

१. 'असें सांगतात, कीं पंतांनीं अगोदर कर्णपर्व रचिलें व मागाहून बाकीचीं पर्वें रचिलीं. पण मूळ प्रत पाहातां व कर्णपर्वास नमनादि प्रारंभ नाहीं, ही गोष्ट लक्षांत आणितां हें मला तरी खरें वाटत नाहीं.' (रा० पांगारकर).

(४) जर हें पर्व स्वतंत्र ग्रंथ म्हणावें, तर आरंभीं मंगलाचरण नाहीं, ही सकृद्दर्शनीं मोठीच अडचण भासण्यासारखी आहे. परंतु विनायकमाहात्म्य, रुक्मिणीगीतादि गीतें, भृगुचरित्र, रामरीति, सन्मनोरथराजि, आर्याकेकावली, इत्यादि स्वतंत्र प्रकरणांच्या आरंभीं ईशस्तवन किंवा मंगलाचरण आढळत नाहीं.

आतां ह्या प्रमाणांच्या सत्यासत्यतेबद्दल थोडक्यांत चर्चा करण्याचें योजिलें आहे:—

१. बाबुजी नाईक जोशी बारामतीकर ह्यांचा उल्लेख ह्या पर्वाच्या शेवटीं आहे, एवढ्यावरून तें एक स्वतंत्र प्रकरण आहे, असें म्हणतां येणार नाहीं. कारण पंतांनीं आपल्या भारताच्या निरनिराळ्या पर्वांच्या शेवटीं वर्ण्य विषयाशीं अप्रकृत अशा कांहीं गोष्टींचा उल्लेख केलेला आहे. आदिपर्वाच्या शेवटीं ( अध्याय ३८।१०४ ) 'देवानें मला बंदिनिकरीं बोलाविलें आणि माझें काव्य व्यासांना देखील पसंत पडलें' असें पंतांनीं म्हटलें आहे. भीष्मपर्वाच्या उपसंहारांत ( अध्याय ११।७९–८३ ) 'ग्रंथ प्राकृत दिसतो पण तो प्राकृत नाहीं. आर्यावृत्तानें आपल्या ग्रंथास शोभा आली आहे व नारदादि प्रतिभारक्षकांचा मला पाठिंबा आहे' असे उद्गार काढिले आहेत. तसेंच त्यांनीं अनुशासनपर्वाच्या शेवटीं ( अध्याय ८।१०० ) 'माझें काव्य पाहून माझ्या स्वर्गीय मातापितरांना आनंद होईल' असें लिहिलें आहे. हे जसे अप्रस्तुत उद्गार त्या त्या पर्वांच्या शेवटीं आहेत, तशाच प्रकारचा ह्या पर्वाच्या शेवटीं आलेला बाबूजी नाइकांच्या नांवाचा उल्लेख असावा. तेथें नाइकांच्या नांवाचा उल्लेख पंतांनीं कां केला असावा किंवा इतर पर्वांच्या शेवटीं असे अप्रस्तुत उल्लेख कां केले असावे, हा प्रश्न अलाहिदा आहे. परंतु केवळ त्या त्या उद्गारांवरून जशीं तीं तीं पर्वें स्वतंत्र प्रकरणें होऊं शकत नाहींत, तद्वतच हें पर्वही स्वतंत्र प्रकरण नव्हे, हें उघड आहे. उपरिनिर्दिष्ट उद्गार त्या त्या पर्वाच्या शेवटीं काढण्यास कोणत्या गोष्टी कारणीभूत झाल्या, हें समजणें आतां शक्य नाहीं. परंतु सदहू उद्गारांमुळें तीं तीं पर्वें स्वतंत्र प्रकरणें म्हणून पंतांनीं रचिलीं होतीं, असें म्हणण्याचें धाडस कोणी सुज्ञ व समंजस वाचक करील असें वाटत नाहीं.

२. ह्या पर्वाच्या शेवटीं 'नरनारायणविजयग्रंथ' असा जरी उल्लेख आहे, तरी त्यावरून हें एक स्वतंत्र प्रकरण आहे, असें सिद्ध होत नाहीं. कारण ह्याच पर्वांत कांहीं अलौकिक पराक्रम नरनारायणांनीं केला आहे असें नाहीं. महाभारताच्या निरनिराळ्या पर्वांत त्यांच्या प्रभावाचें व पराक्रमाचें वर्णन आहे, तसेंच ह्या पर्वांतही आहे. कर्ण अडचणींत सांपडला असतां त्याला अर्जुनानें श्रीकृष्णाच्या सूचनेवरून मारिलें, ह्यांत नरनारायणांच्या विजयाचा डंका वाजविण्यासारखें काय आहे ? अजून भारतीय युद्ध चालूच होतें, पांडवांचा मुख्य प्रतिस्पर्धी जो दुर्योधन त्याचा नाश अद्याप व्हावयाचाच होता, अशी वस्तुस्थिति असतां नरनारायणांचा जय झाला असें पंतांस वाटणें शक्य तरी आहे काय ? बरें, त्यांचा विजय झाला असें आपण गृहीत धरून चाललें, तरी 'नरनारायणविजयग्रंथ' असें लांबलचक नांव

सदहू ग्रंथास देण्याचें कारण काय ? पंत कांहीं 'निरोष्ठरामायणा'[1]सारखा एकादा क्लिष्ट ग्रंथ लिहीत नव्हते, कीं त्यांनीं 'कृष्णार्जुनविजय' किंवा अशाच प्रकारचें एकादें सहज सुचणारें व सुटसुटीत नांव सदहू ग्रंथास देण्याची टाळाटाळ करावी !

पंतांनीं आपल्या महाभारताच्या कांहीं पर्वांच्या शेवटीं 'जयग्रंथ' 'जय' किंवा 'विजय-ग्रंथ' असे जे उल्लेख केलेले आहेत, ते 'महाभारत नामक इतिहासग्रंथ' ह्या अर्थी योजिले आहेत व म्हणूनच 'नरनारायणविजयग्रंथ' म्हणजे नुसतें कर्णपर्व असें म्हणण्याचा पंतांचा उद्देश नसून 'समग्र महाभारत' ह्या अर्थी ते शब्द पंतांनीं योजिले असावे, असें वाटतें. भीष्मपर्वाच्या शेवटची गीति पहाः—

कीं या '**विजय**'ग्रंथीं हरिहरजनसत्कथा, दुजी थोडी; ।
गोडी अन्य कथांची नित्य इला त्यजुनि गर्व कर जोडी. ॥ ( अध्याय ११।८२ )

ह्या गीतींतील 'विजयग्रंथ' म्हणजे 'महाभारत' असें मानणें भागच आहे, कारण तेथें दुसरा कांहींच अर्थ संभवत नाहीं.

ह्याखेरीज दुसरी लक्ष्यांत घेण्यासारखी गोष्ट म्हणजे कर्णपर्वाची मांडणी. मूळ महाभारतांत भीष्म-द्रोण-कर्णपर्वाच्या आरंभींच्या अध्यायांत त्या त्या पर्वांच्या शेवटीं सविस्तर वर्णिलेलें भीष्म-द्रोण-कर्णाच्या वधाचें जें मुख्य कथानक, तें त्या त्या पर्वाच्या आरंभींच सांगण्यांत आलेलें आहे. प्रस्तुत पर्वांत कर्णाच्या वधाची वार्ता वैशंपायन जनमेजयास पहिल्याच अध्यायांत सांगतो. पुढें जनमेजय वैशंपायनाला विचारितो कीं, ही कर्णवधाची वार्ता धृतराष्ट्रानें कशी ऐकिली ? व ती ऐकून त्याची अवस्था कशी झाली ? ह्या प्रश्नाचें उत्तर वैशंपायन जनमेजयास देतो कीं, कर्णवध झाल्यानंतर संजय रात्रीं धृतराष्ट्राकडे गेला, व त्यानें त्याला तें दुःखदायक वर्तमान सांगितलें. तें ऐकून त्यास फार दुःख झालें व त्यानें उभय पक्षांतील कोणकोणते वीर मेले व जीवंत कोण कोण आहेत, ह्याची चौकशी केली. ती सर्व हकीकत संजयानें सांगितल्यावर धृतराष्ट्रानें शोकाकुल होऊन द्रोणाचार्यांच्या वधानंतर दुर्योधनानें काय केलें, पराक्रमी कर्णाचा वध कसा झाला इत्यादि सविस्तर वर्तमान विचारिलें. हा सर्व मूळांतील नऊ अध्यायांतील कथाभाग पंतांनीं आपल्या कर्णपर्वाच्या पहिल्या सहा अध्यायांत आणिला आहे. वस्तुतः खऱ्या आणि मुख्य वर्ण्य विषयाला सुरुवात ह्यानंतर झालेली आहे. तेव्हां पंतांच्या मनांत कर्णवधवर्णनपर एकादें स्वतंत्र प्रकरण रचावयाचें असतें, तर त्यांनीं येथूनच सुरुवात केली असती, हें उघड आहे. इतकेंच नाहीं, तर आपल्या महाभारतांतील एक पर्व म्हणून तें रचितांना जरी त्यांनीं हा

---

१. पंतांनीं एकशें आठ रामायणें रचावयाचीं असा संकल्प केला होता. त्यास अनुसरून ते रामायणें तयार करीत असतां, ओंठाला ओंठ लावल्याशिवाय वाचतां येईल असें, म्हणजे पवर्ग गाळून एक रामायण रचावयाचें असें त्यांनीं ठरविलें. हें रामायण रचीत असतां पंतांचे स्नेही रामजोशी यांनीं पंत काय करीत आहेत हें पाहण्यासाठीं एक मनुष्य पाठविला. त्याच्याबरोबर पंतांनीं निरोप पाठविला कीं, 'रघुनाथचरित लिहीत आहें'. तेव्हां जोशीबोवांनीं तर्क केला. कीं पंत 'निरोष्ठरामायण' लिहीत असावे व तो त्यांचा तर्क खरा ठरला.

अनावश्यक भाग गाळून टाकिला असता, तरी कांहींच बिघडलें नसतें व पंतांचें रचना-चातुर्य खुलून दिसलें असतें. पण ज्या अर्थी पंतांनीं मूळांतील मांडणी कायम ठेविली आहे, त्या अर्थी हें कर्णपर्वच आहे—स्वतंत्र प्रकरण नव्हे—हेंच सिद्ध होतें.

तसेंच, पंतांच्या मनांतून हें एक स्वतंत्र प्रकरण म्हणून लिहावयाचें असतें; तर त्यांनीं कर्णाविषयीं आधीं एक चकारशब्दही न काढतां, एकदमच 'तो भव्यप्रताप कर्ण संगरीं तपला' ( अध्याय १।१ ) व 'दुसरे दिवशीं अर्जुनाशुगें खपला' ( अध्याय १।२ ) असें एकाद्या अडाणी माणसाप्रमाणें सांगून टाकिलें नसतें. सारांश—प्रस्तुत पर्वांतील शेवटच्या गीतींतील 'नरनारायणविजयग्रंथ' हा शब्दसमुच्चय पाहातांच पंतांनीं 'कृष्णविजय' व 'प्रऱ्हादविजय' हीं जशीं स्वतंत्र प्रकरणें रचिलीं आहेत, तसाच हा एक तिसरा 'विजय' रचिला असावा, अशी एकाद्या पंतभक्तानें आपली समजूत करून घेतली व तीच चुकीची समजूत लोकांत रूढ झाली. पण वस्तुतः 'विजय'ग्रंथ म्हणजे 'महाभारतग्रंथ'च होय.

३. ह्या पर्वाला पंतांनीं **'कर्णपर्व'** असें कोठेंच म्हटलें नाहीं, हा मुद्दा तर अगदींच गौण आहे. हें विधान करण्याच्या वेळीं भूतपूर्व संपादक केवळ पूर्वी 'सर्वसंग्रहां'त शिळा-छापावर छापलेल्या प्रतीवर व त्यांना मिळालेल्या हस्तलिखित प्रतींवर अवलंबून राहिले असावे, हें स्पष्टच आहे. पूर्वी छापलेल्या प्रतींतून प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं असलेले 'इति कर्णपर्वणि द्वितीयोध्यायः' 'इति श्रीभारते कर्णपर्वणि श्रीरामनंदनमयूरेश्वरविरचिते तृतीयोध्यायः' असे शेरे अनावश्यक व पुनरुक्तिमूलक म्हणून गाळून टाकण्यांत आले असावे. तसेंच त्या संपादकांस मिळालेल्या पोथ्यांच्या ( ह्या किती होत्या, त्यांचे लेखक कोण, त्या केव्हां लिहिल्या गेल्या होत्या, इत्यादि माहिती त्यांनीं दिलेली नव्हती. ) लेखकांनींही केलें असावें, असें अनुमान करावयास हरकत नाहीं. कारण पंतांची स्वलिखित महाभारताची पोथी पंतांचे वंशज रा० रामकृष्ण दत्तात्रय पराडकर यांच्या संग्रहीं आहे. तींत प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं वर दर्शविल्याप्रमाणें उल्लेख आहेत, पण ते त्यांनीं देखील अनवश्यक म्हणून स्वतः प्रसिद्ध केलेल्या प्रतींत गाळिले आहेत. फक्त शेवटच्या अध्यायाच्या अखेरीस असलेला उल्लेख मात्र त्यांनीं कायम ठेविला आहे. त्यावरून पंतांनीं ह्या प्रकरणाला **'कर्णपर्व'** असें कोठेंच म्हटलें नाहीं, असा जो मुद्दा, तो केवळ कल्पनेच्या बळावर उभारलेला होता, म्हणून तो निराधार होय, हें स्पष्टच आहे.

४. पहिल्या तीन मुद्यांचा विचार केल्यानंतर आतां ह्या मुद्याला कांहींच महत्व राहिलेलें नाहीं. 'कर्णपर्वा'च्या आरंभीं मंगलाचरण नाहीं, हीच एक गोष्ट तें पर्व स्वतंत्र प्रकरण नव्हे, हें सिद्ध करीत आहे. ग्रंथारंभीं मंगलाचरण व शेवटीं कविनामोल्लेख अगदीं असलाच पाहिजे, असें नाहीं. सदर्हू गोष्टींची योजना त्या त्या ठिकाणीं करणें किंवा न करणें, हें ग्रंथकर्त्याच्या इच्छेवर व तत्कालीन परिस्थितीवर अवलंबून आहे. क्वचित् एकाद्या ग्रंथाच्या मध्येंच कविनामोल्लेख आढळतो, पण तेवढ्याच कारणामुळें तो ग्रंथ तेथेंच संपला असें म्हणणें धाडसाचें व अविचाराचें ठरेल. पंतांनीं स्वकृत आदिपर्वाच्या बाराव्या अध्यायाच्या शेवटीं—

अमृत प्रतीपचरित प्राशावें; श्रवण भरुनि, आर्यांनीं ।
गायील रामकरुणाघनभक्तमयूर तेंचि आर्यांनीं· ॥ ( गीति ९८ )

असा स्वनामोल्लेख केलेला आहे. आतां ह्या उल्लेखावरून 'शकुंतलाख्यान' हें पंतांनीं स्वतंत्र प्रकरण म्हणून रचिलें होतें असें ठरवावयाचें, कीं त्यांच्या मनांतून फक्त आदिपर्वाचे बाराच अध्याय रचावयाचे होते, असें म्हणावयाचें ? मंगलाचरणाच्या बाबतींत असाच कांहींसा प्रकार ज्ञानेश्वरींत झालेला आहे. कारण पहिल्या अध्यायानंतर अध्याय १०, १२, १४, १७ व १८ यांच्या आरंभीं मंगलाचरण आहे. सारांश, ह्या मंगलाचरणाविषयींचा मुद्दा विशेष महत्वाचा नसून, तो कोणत्याच पक्षाच्या समर्थनार्थ उपयोगीं पडत नाहीं.

एकंदरींत सर्व बाजूंनीं व अगदीं बारकाईनें विचार करून पाहातां, पंतांनीं रचावयास आरंभिलेल्या महाभारताचेंच हें एक पर्व असून तें 'नरनारायणविजयग्रंथ' नामक एक स्वतंत्र प्रकरण आहे, असें समजणें भ्रममूलक आहे. केवळ भ्रामक समजुतीच्या पायावर उभारिलेल्या ह्या कल्पनेचा डोलारा अशा रीतीनें कोसळणें हें क्रमप्राप्तच होतें, व ह्या बाबतींत चालू असलेल्या भ्रमाचा अशा रीतीनें निरास झाल्यामुळें प्रस्तुत प्रकरण हें 'कर्णपर्व' म्हणूनच पंतांनीं लिहिलें होतें, ही गोष्ट सुज्ञ व समंजस वाचकांस निःशंकपणें मान्य होईल, अशी आशा आहे.

## ४. बाबूजी नाइक जोशी बारामतीकर.

श्रीमत्सदाशिवात्मज बाबूजी नायक प्रभु ज्ञानी ।
'धन्य' म्हणावें ज्याला शुद्धगुणश्रवणतृप्तसुज्ञानीं.॥ ( अध्याय ५०।७३ )

पंतांच्या काळीं मराठीपेक्षां संस्कृत ग्रंथरचनेला मान अधिक दिला जात असे, व संस्कृत ग्रंथांच्या अध्ययनापासून पुण्याचा लाभ विशेष होतो, अशी त्या वेळच्या सरदारांची व सुखवस्तू लोकांची समजूत होती. यामुळें त्यांचें तत्कालीन मराठी ग्रंथकारांकडे व त्यांनीं निर्माण केलेल्या वाङ्मयाकडे फारसें लक्ष नसे. परंतु ह्या गोष्टीस बाबूजी नाइक बारामतीकर हे अपवाद होते. त्यांनीं पंतांस आश्रय दिला व त्यामुळें त्यांस सर्व प्रकारचें स्वास्थ्य लाभलें आणि म्हणूनच त्यांच्या हातून एवढी मोठी काव्य-रचना होऊं शकली. सारांश, पंतांचे आश्रयदाते बाबूजी नाइक यांच्या ठिकाणीं गुणज्ञता व रसिकता हे गुण वसत असल्यामुळें त्यांनीं पंतांच्या आंगच्या विद्वत्ता व कवित्वादि गुणांचें चांगलें चीज केलें. पंत आणि बाबूजी यांचा ऋणानुबंध इ. स. १७५३ सालीं जुळून आला व बाबूजी जरी इ. स. १७८० मध्यें परलोकवासी झाले, तरी त्यांच्या पश्चात् त्यांचे पुत्र पांडुरंगराय यांस पंतांविषयीं आदर व अगत्य विशेष वाटत असल्यामुळें बाबूजींच्या कृष्णराय, नीलकंठराय व पांडुरंगराय ह्या तीन पुत्रांपैकीं पांडुरंगराय यांच्याच आश्रयाला ते अखेरपर्यंत राहिले. देवी अहिल्याबाई व बाजीराव पेशवे ( दुसरे ) हे पंतांस आपल्या आश्रयास

बोलवीत असतांही ते त्यांच्याकडे गेले नाहींत. प्रस्तुत ह्या सर्व गोष्टींशीं आपणास कांहीं कर्तव्य नाहीं, म्हणून त्या सोडून देऊन आपण आपल्या मुद्याकडे वळूं.

पंतांनीं बाबूजी नाइकांचा उल्लेख 'कर्णपर्वा'च्या शेवटीं केला आहे. परंतु तो त्यांनीं मध्येंच ह्या पर्वांत म्हणजे स्वतः रचीत असलेलें महाभारत पूर्ण होण्यापूर्वी मधल्याच एका पर्वांत—कां केला असावा, ह्याविषयीं आपणास विचार करावयाचा आहे. वस्तुतः पंतांनीं आपल्या भारताच्या शेवटीं आपल्या आश्रयदात्याचा उल्लेख करावा व आपली कृतज्ञताबुद्धि दर्शवावी, हें योग्य होय, व तसा उल्लेख पंतांनीं स्वर्गारोहणपर्वाच्या शेवटीं केलाही आहे. पण पंतांनीं असा उल्लेख प्रस्तुत पर्वाच्या शेवटीं कां केला ? हा प्रश्न बाकी राहतोच.

आमच्या मतें पंतांनीं प्रस्तुत पर्वाच्या शेवटीं केलेला बाबूजींच्या नांवाचा उल्लेख केवळ सहज केला नसून, सहेतुक केलेला असावा. 'कर्णपर्वा'चा नायक वीरश्रेष्ठ कर्ण व आपले आश्रयदाते बाबूजी हे दोघे मोठे रसिक, कनवाळू, शूर व महत्वाकांक्षी होते, व आणखी पुष्कळ गुणांत त्या दोघांचें एकमेकांशीं साम्य होतें. म्हणून पंतांनीं ह्या पर्वाच्या शेवटीं त्यांच्या नांवाचा उल्लेख केला असावा. पुढील गीतीवरून आमचें हें विधान कितपत खरें असणें शक्य आहे, तें वाचकांनींच ठरवावें:—

दाता, वक्ता, योद्धा, तेजस्वी, मानधन असामान्य ।
अतुळें पितृप्रसादें मंडित देवव्रता–असा मान्य. ॥ ( अध्याय ५०।७४ )

दुसरी एक कल्पना बसते ती अशी:–बाबूजींचा जन्म कोणत्या सालीं झाला, हें समजण्यास कांहीं साधन सध्या उपलब्ध नाहीं. पण 'इ. स. १७३३ मध्यें महंमदखान बंगषावर बाजीरावानें स्वारी केली तेव्हां त्याच्यासाठीं बाबूजी नाइकानें पायीं पैजारा चढवून······ कर्ज मेळविलें' ( पांगारकरकृत मोरोपंतांचें चरित्र ). ह्या उल्लेखावरून त्या वेळीं बाबूजी चांगले कर्तेसवर्ते झालेले असून ते तेव्हां निदान २०।२५ वर्षांच्या वयाचे असावे. ते इ. स. १७८० मध्यें वारले तेव्हां, म्हणजे मरणसमयीं, त्यांचें वय ७०।७५ वर्षांचें असावें.

पंतांनीं आपल्या महाभारतग्रंथाची रचना इ. स. १७७२–१७८२ यांच्या दरम्यान केली, हें ऐतिहासिक पुराव्यानें सिद्ध झालेलें आहे. यावरून असें अनुमान निघतें, कीं इ. स. १७८० मध्यें 'कर्णपर्वा'पर्यंत महाभारत तयार झालें होतें व पुढील पर्वें पुढच्या दोन वर्षांत रचिलीं गेलीं. बाबूजी नाइक 'कृतांतकटकामलध्वजजरे' मुळें जर्जर होऊन इ. स. १७८० मध्यें अंथरुणास खिळलेले असावे व आतां हें आपल्या यजमानांचें दुखणें शेवटचें असून ह्यांतून ते उठणें शक्य नाहीं, हें पंतांनीं ताडलें असावें. अशा वेळीं पंतांसारख्या प्रेमळ व स्वामिभक्त सद्गृहस्थास आपल्या यजमानाविषयीं वाटत असलेली कृतज्ञता व्यक्त करावी, असें वाटणें साहजिक आहे. तेव्हां याच सुमारास संपत आलेल्या 'कर्णपर्वा'च्या शेवटीं पंतांनीं बाबूजींचा मोठ्या कृतज्ञतेनें उल्लेख करून, तें त्यांस अर्पण केलें असावें. हा अर्पणसमारंभ घडल्यानंतर लौकरच बाबूजी परलोकवासी झाले असावे.

पंतांनीं आपलें महाभारत पूर्ण केल्यावर, स्वर्गारोहणपर्वाच्या शेवटीं, पुन्हां बाबूजींचा उल्लेख केला आहे:—

जो धीर-वीर-हीर श्रीसिद्धेश्वरमहादयापात्र, ।
श्रीमान् बाबूराय प्रभु, ज्याचें शोभलें यशें गात्र. ॥ ( अध्याय २।३५ )

पण त्यांत 'शोभलें' ह्या भूतकालवांचक क्रियापदाची योजना केलेली आहे. यावरून पंतांचें महाभारत पूर्ण होण्यापूर्वीं बाबूजी इहलोक सोडून गेले होते, हें सिद्ध होतें. सारांश, पंतांनीं प्रस्तुत पर्वाच्या शेवटीं म्हणजे संपूर्ण महाभारताच्या मध्येंच बाबूजींच्या नांवाचा उल्लेख कां केला, ह्या गोष्टीचा उलगडा वरील विवेचनावरून होतो.

## ५. पंतांच्या लेखनांतील विशेष.

पंतांच्या काव्यांचें संशोधन व प्रसिद्धीकरण गेल्या पन्नास वर्षांपासून चालू आहे. प्रथम ह्या महत्वाच्या कामास कै० परशरामपंततात्या गोडबोले यांनीं 'सर्वसंग्रह' मासिकाच्या द्वारें आरंभ केला. त्यानंतर हें काम कै० जनार्दन बाळाजी मोडक, बी. ए. व कै० वामन दाजी ओक यांनीं 'काव्येतिहाससंग्रह' व 'काव्यसंग्रह' ह्या मासिकांच्या द्वारें केलें. अशा प्रकारें नियतकालिकांत मुद्रित झालेल्या प्रतींत उपरिनिर्दिष्ट संपादकांनीं वाचकांच्या सोयीसाठीं किंवा इतर कोणत्या तरी कारणांनीं त्या काव्यांतील मूळ लेखनपद्धति कायम न ठेवितां तींत आधुनिक लेखनपद्धतीस अनुसरून फेरफार केले आहेत. परंतु कवीचे काव्यग्रंथ कवीनें स्वहस्तानें जसे लिहिले, तसे मुद्रित करण्यांत जें महत्व आहे तें कवीची कृति वाचण्याच्या बाबतींत सोईची व्हावी व तेणेंकरून तिचा प्रसार होऊन ती विशेष लोकप्रिय व्हावी, ह्या उद्देशानें केलेल्या फेरफारांनीं भरलेल्या प्रतींत नाहीं, हें उघडच आहे.

पूर्वीच्या छापील प्रतींतील पाठ बहुधा शुद्ध आहेत, 'पण पंतांच्या लेखनपद्धतीचे विशेष पाहावयाचे असतील, तर मात्र मूळ प्रत पाहिली पाहिजे' असें पंतभक्त रा. रा. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर यांनीं आपलें मत नमूद करून ठेविलें आहे ( मोरोपंतांचें चरित्र, पृष्ठ ३१० ). ही लेखनपद्धतीसंबंधीं राहिलेली उणीव पंतवंशज रा० रामकृष्ण दत्तात्रय पराडकर यांनीं पंतांची कविता त्यांच्या स्वलिखित पोथ्यांबर्हुकूम छापून दूर केली आहे. अशा रीतीनें पंतांचीं काव्यें मुद्रित झालेलीं असल्यामुळें पंतांच्या लेखनांतील विशेष कळण्याचें तें एक

---

१. पंतभक्त प्रो० श्रीधर विष्णु परांजपे बी. ए. लिहितात:—'नित्यकृत्य आटोपल्यावर पंतांनीं सर्व [ धूळ ]पाटीभर ग्रंथ लिहून मग झोंप घ्यावी. मग दुसरे दिवशीं प्रातःकाळीं पाटीवरील ग्रंथाची प्रत लक्ष्मणभट वांईकर यानें करून ठेवावी, असा त्यांचा नित्यक्रम होता.' ( मोरोपंतकृत केकावलि, भाग २ रा, पृष्ठ ५७ ). राजाराम प्रासादीकृत 'भक्तमंजरीमाला' नामक ग्रंथांत 'निरंतर पाटी लेखणी हातीं । आर्याकाव्य नित्य करीती' ॥ (अध्याय ८३।५५) असें लिहिलें आहे. प्रस्तुत उल्लेखांवरून पंत आपलें काव्य प्रथम स्वतः धूळपाटीवर लिहून ठेवीत व नंतर त्यांचा लेखक तें कागदावर लिहून घेई, असें दिसतें.

विश्वसनीय साधन झालें आहे. तसेंच त्या काव्यांच्या अंतःशुद्धीविषयीं संशय उत्पन्न होण्यास आतां कोणत्याही प्रकारची फारशी जागा राहिलेली नाहीं.

प्रस्तुत पर्वाच्या बाबतींत आम्ही पंतांची लेखनपद्धति कायम ठेविली आहे. प्रचलित पद्धति व पंतपद्धति यांत जी तफावत आम्हांस आढळली तिचें दिग्दर्शन वाचकांच्या सोयीसाठीं पुढें करीत आहों.

१. **अनुस्वार**-ह्यांच्या बाबतींत पंतांचें निश्चित धोरण काय होतें, हें समजणें बरेंच कठीण आहे. पंतांनीं कांहीं ठिकाणीं अनुस्वारांस फांटा दिला आहे, तर कांहीं ठिकाणीं ते आगांतुकी करून घुसले आहेत.

(अ). धाव ( १४।१९; १९।१; ३४।१४; ४०।२७ )
हासणें ( २८।४३ )
हाकणें ( ३८।७७ )
हाक ( ३३।४९ )
रोवणें ( ४८।३७ )
वेघणें ( ४९।१९ व ३९ )
आवरणें ( ११।६० )
वेचणें ( २८।४३; २६।२३ )
तेधवा ( ३२।३५ )
लागि ( २१।२५ )
जनी ( ६।६७ )
करू नको ( ३९।५४ )
म्या ( २०।२५ )

ह्या शब्दांतील अनुस्वार पंतांनीं गाळिले आहेत व व्युत्पत्तिदृष्ट्या कांहीं ठिकाणीं तसें त्यांनीं केलें, तें योग्यच झालें. परंतु

वावरुनीं ( ३८।४१ )
पसरुनीं ( ४४।७ )
जाणोनीं, आणोनीं ( ४६।२ )
म्हणउनीं ( २१।१८ )
गांडीवप्राप्तिपासुनीं ( ४१।११ )
जेंवीं ( २३।२२ )
म्हणेंन ( २१।४० )

ह्या शब्दांवर त्यांनीं अनुस्वारांचें ओझें लादलें आहे. ह्यांपैकीं 'तोडुनीं' 'पसरुनीं' अशा प्रकारच्या शब्दांतील अंत्याक्षरांवर अनुस्वार देण्याची कांहींच जरूरी नाहीं. ङ, ञ, ण, न व म हे पांचहि वर्ण स्वभावतःच अनुनासिक आहेत. यासाठीं त्यांवर अनुस्वार असला

किंवा नसला तरी सारखेंच. शेवटच्या दोन शब्दांवरील अनुस्वार हस्तदोषमूलक असण्याचाही संभव आहे. विशेषतः यमकसाधनार्थ किंवा इतर कोणत्याही कारणांमुळें अनुस्वाराची जरूर नसतां पंत 'पाणी' हा शब्द 'पाणीं' ( ३५।२५ ) असा लिहितात. 'पाहीं'च्या ऐवजीं 'पांहीं' ( २९।३३ ) असें पंतांनीं लिहिलें आहे, पण तेथें त्यांनीं यमकांतील अनुस्वार-व्यत्ययदोष तरी टाळला आहे.

सारांश, अनुस्वारांच्या बाबतींत पंतांचें निश्चित असें कांहीं धोरण दिसत नाहीं. पंत एक ठिकाणीं 'हासणें' ( २८।४३ ) असें लिहितात, तर दुसऱ्या ठिकाणीं 'हांसणें' ( २८।४२, ३१।३५ ) असें लिहितात. तीच अवस्था 'धांवणें' ( ३७।२ ) व 'पुन्हा' इत्यादि शब्दांची.

ब. तृतीयेचे प्रत्यय 'नीं' व 'हीं' हे नामांस लाविले असतां सदहू प्रत्ययांच्या पूर्वीच्या अक्षरांवर अनुस्वार दिला जातो. परंतु पंतांनीं 'नीं'च्या पूर्वीच्या अनुस्वाराची हकालपट्टी केली आहे. 'हीं'च्या पूर्वाक्षरावर पंतांनीं अनुस्वार बऱ्याच ठिकाणीं दिला आहे. पण तो दिला नाहीं, अशीं स्थळेंही पुष्कळ आहेत.

क. 'मी' ह्या प्रथम पुरुषी एकवचनी सर्वनामावर, वाक्याचा प्रयोग कोणताही असला तरी पंतांनीं अनुस्वार दिला आहे. तोच प्रकार 'तुम्ही' ह्या द्वितीयपुरुषी एकवचनी सर्वनामाविषयीं. पण कोठें कोठें तर 'मी' वर अनुस्वार देण्याच्या बाबतींत पंतांच्या चिकाटीचें नवल वाटतें. ( २२।६; ३८।५०; ४०।३ )

२. उच्चारानुसारी लेखन—पंतांनीं ही पद्धति स्वीकारिलेली आढळते:—

दासांच्ये भार्ये ( ६।६१ )
च्यार ( ४५।४६ )
सोडिल्ये ( ४४।२२ )
करिल्ये ( ५०।२४ )
तां ( ४१।८ )

३. संस्कृत शब्द—ऱ्हस्व 'इ' कारान्त व ऱ्हस्व 'उ' कारान्त—मराठींत कसे लिहावे, ह्यासंबंधीं ऊहापोह आज कित्येक वर्षे चालू आहे. कोणी म्हणतात त्यांचें मूळ संस्कृतरूप कायम ठेवावें, कोणी म्हणतात असे शब्द दीर्घस्वरान्त लिहावे,—निदान ते अनेकवचनी असतील तेव्हां तरी असे लिहावे. ह्यासंबंधी पुढील पद्यांश आपणास मार्गदर्शक होईल:—

झाले वाद्यध्वनी, स्तुती झाल्या ( ४१।५८ )

पुढील शब्द ऱ्हस्वान्त असून दीर्घान्त लिहिले आहेत:—

हरी ( ८।२९ )
गिरी ( ८।३२ )
गुरू ( २९।२ )

४. निरुपयोगी 'इ' कार किंवा 'उ' कार—पंत एकाद्या शब्दामध्यें हे स्वर निष्कारण घालितात. कदाचित् पंतांच्या वेळीं त्यांचा उच्चार तसाच केला जात असावाः—

घातिलें ( २३।६ )
आणिखी ( ४१।८६ )
आसविल ( ३३।४९ )
बाहेरि ( ३६।७ )
घाबिरे ( ३८।६४ )
इतुका ( ४३।३० )

५. पंत कांहीं कांहीं अक्षरांच्या उपयोगांत बारकाई करीत नाहींतः—

( अ ) 'श' बद्दल 'स'; जसें-सेले ( शेले )
( ब ) 'वु' बद्दल 'उ'; जसें-करउनि ( करवुनि )
( क ) 'ल' बद्दल 'ळ'; जसें-लीळा, कळह
( ड ) 'इ' बद्दल 'यि'; जसें:-नेयील ( ४२।६७ ), देयील ( ४३।६२ ), आयि ( ४३।८८ )
( इ ) 'च्या' बद्दल 'चा'; जसें-पांडवांचा ( ४६।४६ ), सुयोधनाचा ( ५०।५८ )
( ई ) 'ज्ञ' बद्दल 'ज'; जसें-वांज ( २७।१४ )
( उ ) 'ज' बद्दल 'ज्य'; जसें:-हरिज्या ( ४८।१६ ), भुज्यांस ( ३३।३७ )

६. विशेषण व विशेष्य—ह्यांची मांडणी संस्कृत व्याकरणास धरून पंतांनीं केली आहेः—

तूं आद्यगुरु समस्तां धर्मज्ञांचा ( ४२।८ )
राधेय त्यां यमांतें ( ३८।५४ )
त्यां शंखांच्या नादें ( ३३।३९ )
अन्यां खगमांचें ( २८।२९ )
त्यां नारसिंहांची ( २७।५२ )

परंतु क्वचित् ह्याच्या उलटही प्रकार आढळतोः—

त्या राजर्षिवरांच्या ( २८।३ )
त्या सगर्वांत ( १७।८ )

७. संधिनियम—पंतांनीं नियमास अनुसरून संधि केले आहेत. पण क्वचित् भलतेच शब्द जोडले आहेतः—

अकस्माद्रविबिंब ( ६।३ )
साक्षादलातचक्र ( १०।१६ )
*कदाचिज्जरि ( २३।३ )*
तस्माद्धर्मार्थ ( ४१।९५ )
दुर्घटचक्रोद्धृतिक्रियानळसा ( ४९।५१ )

[ सूचना—अर्थ समजण्याच्या बाबतींत वाचकांचा घोंटाळा होऊं नये, म्हणून वरील सर्व संयुक्त शब्द आम्ही व्याकरणशुद्ध छापिले आहेत. ]

८. अनेकवचन दर्शविण्याच्या कामीं अनुस्वारांची विवक्षा असतां पंतांनीं ते कोठें कोठें गाळिले आहेतः—

सज्जन कलंकितपना त्यजुनि ( ४३।९१ )

९. नामास विभक्तिप्रत्यय लागला असतां त्याचें सामान्यरूप होतें, पण पंतांनीं तो नियम नेहमीं पाळलेला आढळत नाहीं.—

क्षितिपतिच्या ( ६।१ )
सात्यकिनें ( ४४।५८ )
शरततिस ( ३८।६ )
गांडीवप्राप्तिपासुनीं ( ४१।११ )

१०. कांहीं शब्दांच्या बाबतींत पंतांच्या लेखनांत एकसूत्रीपणा मुळींच आढळत नाहींः—

( अ ) कोणी, कोणीं, कोण्ही, कोण्हीं
( ब ) येवढा, एवढा, येव्हडा, येवडा
( क ) जरि, जरी, जऱ्हि, जऱ्ही
( ड ) सज्य, सज्ज, सज्जय ( धनुष्य )

वर दर्शविल्याप्रमाणें पंतांच्या लेखनांत जे विशेष आम्हास आढळले, ते वर नमूद केले आहेत. अनुस्वारांच्या बाबतींत पंतांचें धोरण बरोबर न कळणें साहाजिक आहे. जरी पंतांनीं स्वतः आपले ग्रंथ लिहून ठेविले आहेत, तरी क्वचित् त्यांच्या स्वतःच्या नजरचुकीनें एकाद्या ठिकाणीं अनुस्वार दिला न जाणें-किंवा नको असेल तेथें तो दिला जाणें-संभवनीय आहे. शिवाय, शंभर सवाशें वर्षांनंतर पोथींतील अनुस्वारदर्शक बिंदूंची शाई उडून जाणें असंभवनीय नाहीं. ह्या गोष्टीही पंतांच्या लेखनशैथिल्यास दोष देण्यापूर्वी आपण विचारांत घ्यावयास पाहिजेत.

वर जो पंतांच्या लेखनांतील कांहीं बाबींचा तपसील दिला आहे, त्यावरून त्यांच्या लेखनांतील शब्दांच्या रूपांसंबंधीं कांहीं निश्चित अनुमान काढणें धाष्टर्याचें होईल. उपलब्ध असलेल्या पंतांच्या काव्यांत हस्तलिखित पोथ्यांवरून कोणतेंही अनुमान काढतां येणें शक्य नाहीं. कारण कवीला वृत्तसुखार्थ शब्दांच्या रूपांत क्वचित् फेरबदल करण्याची आवश्यकता असते. जर पंतांचा स्वदस्तुरचा बाळबोधलिपींत लिहिलेला एकादा गद्य लेख किंवा पत्रव्यवहार उपलब्ध झाला असता, तर त्यावरून त्यांच्या लेखनांतील व्याकरणदृष्ट्या शुद्धाशुद्ध असें वैशिष्ट्य निश्चितपणें अनुमानितां आलें असतें. तशा प्रकारचें गद्यलेखन उपलब्ध नसल्यानें व आपल्या कवितांच्या सर्व पोथ्या त्यांनींच लिहिल्याबद्दलचा खात्रीलायक पुरावा अद्याप पुढें आलेला नसल्यामुळें आम्ही पंतांच्या लेखनांतील शब्दांचीं विविध रूपें वाचकांपुढें ठेविलीं आहेत. पंतांच्या काळीं व्याकरणदृष्ट्या शुद्ध समजलीं जात

असलेलीं, परंतु सध्यां रूढ नसलेलीं अशीं रूपें-होउनीं, इतुका, आयि इत्यादि-वाचून सांप्रत प्रचलित असलेल्या व्याकरणाच्या किंवा लेखनपद्धतीच्या नियमांनुसार तीं चुकीचीं आहेत, असें म्हणणेंही योग्य होणार नाहीं. शिवाय पंतांच्या काव्यांत अशीं स्थळेंही फारच थोडीं आहेत, याचाही जिज्ञासूंनीं विचार करावयास पाहिजे.

प्रस्तुत पर्वाशीं संबद्ध असलेल्या कांहीं मुद्यांचें वर विवरण केलें आहे. तें जिज्ञासु वाचकांस आणि मराठी भाषेचें अध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्यांस उपयुक्त होईल अशी आशा आहे.

शेवटीं पंतभक्त **रामचंद्र बडवे** यांच्या निम्नलिखित वचनावर हवाला देऊन वाचकांची तूर्त रजा घेतोंः—

आर्याग्रंथ रचुनि बहु विठ्ठलचित्तासि तोषवी फार ।
त्या **मोरेश्वरपंता** माझा **साष्टांग** हा **नमस्कार.** ॥

उमरावती
वर्षप्रतिपदा, शके १८५४
तारीख ७-४-३२

**दा. के. ओक.**

## 'कर्णपर्वा'च्या भूतपूर्व संपादकांचें स्मरण.

### कै० नारायण चिंतामण केळकर, बी. ए.

'काव्यसंग्रहा'चे संपादक कै० नारायण चिंतामण ऊर्फ नानासाहेब केळकर, बी. ए. यांचा जन्म सन १८६६ साली देवगड तालुक्यांत वानिवडें येथें झाला. ह्या गांवीं त्यांचे पूर्वज सुमारें ३००।४०० वर्षांपासून राहात होते. तेथून त्यांचे वडील मिरजेस येऊन तेथील दरबारांत नोकर म्हणून राहिले, व क्रमानें बढती मिळवीत ते मामलतदार व खासगी कारभारी ह्या हुद्यांपर्यंत चढले. कै० नानासाहेबांचें प्राथमिक शिक्षण मिरज संस्थानांतील मोडनिंब येथें पूर्ण झाल्यावर, त्यांना इंग्रजी शिक्षणासाठीं सोलापुर येथें ठेवण्याचा त्यांच्या वडिलांचा विचार होता. परंतु इतक्यांत त्यांच्या वडिलांची बदली मिरज येथें झाली व तेथील हायस्कुलांत त्यांचें म्याट्रिकपर्यंत शिक्षण झालें. पुढें कोल्हापुर येथील राजाराम कॉलेज आणि पुणें येथील फर्ग्युसन कॉलेज व डेक्कन कॉलेज ह्यांत त्यांनीं अंशतः स्कॉलरशिप्स वगैरे मिळवून आपलें उच्च शिक्षण पूर्ण केलें. मध्यंतरीं फर्स्ट बी. ए. ची परीक्षा झाल्यावर त्यांना घरच्या सांपत्तिक परिस्थितीच्या प्रतिकूलतेमुळें कॉलेज सोडून नोकरी धरावी लागणार होती, परंतु श्री० बाळासाहेब मिरजकर यांनीं एक वर्षाचा खर्च पुरविल्यामुळें त्यांना बी. ए. होतां आलें. नंतर त्यांनीं मुंबईस शिकवण्या पतकरून एल्. एल्. बी. ची टर्म भरली. परंतु आपले पाठचे भाऊ रा० माधवराव व नरसोपंत ह्यांच्या विद्यासंपादनांत व्यत्यय येऊं नये म्हणून त्यांनीं रामदुर्ग येथें सुमारें तीन वर्षे हायस्कूलच्या हेडमास्तरची नोकरी केली. अशा रीतीनें त्यांनीं आपले धाकटे बंधु म्हणजे महाराष्ट्र-साहित्य-सम्राट् रा० नरसिंह चिंतामण केळकर यांचें कॉलेजांतील शेवटच्या वर्षाचें व एल्. एल्. बी. चें शिक्षण केलें.

कै० नानासाहेब यांस सन १८९१ मध्यें सातारा येथील सरकारी हायस्कुलांत शिक्षकाची जागा कायमची मिळाली. पुढील तेरा वर्षांत त्यांनीं सातारा, पुणें, धुळें वगैरे ठिकाणीं शिक्षकाचें काम केलें. दरम्यान पुणें येथें असतां ते भोर संस्थानचे हल्लींचे अधिपति व तेव्हांचे युवराज श्रीमंत बाळासाहेब पंत-सचिव यांचे शिक्षक म्हणून दोन वर्षें काम करीत होते. तसेंच धुळें येथें असतांना त्यांना कांहीं महिने हेडमास्तरचें काम करण्याचाही योग आला होता. तेथेंच त्यांना सन १९०४ मध्यें वयाच्या ३७।३८ व्या वर्षी नवज्वरानें मृत्यु आला. त्यांच्या अकाली मृत्यूनें त्यांच्या कुटुंबियांचें व महाराष्ट्रभाषेच्या वाङ्मयाचेंही अपरिमित नुकसान झालें आहे. कै० नानासाहेब यांचा स्वभाव अत्यंत गोड व मनमिळाऊ असल्यामुळें ते आपले स्नेही, विद्यार्थी व नोकरचाकर या सर्वांना प्रिय असत. त्यांना काम करण्याची हौस असल्यामुळें नेहमीं त्यांच्या गळ्यांत एकाद्या संस्थेची चिटणिसी असेच, व

त्या संस्थेचें काम निरलसपणें करण्यांत ते नेहमीं दक्ष असत. शाळेंतील गरीब व होतकरू विद्यार्थ्यांवर त्यांचें विशेष लक्ष असे व ते त्यांना त्यांच्या शिक्षणाच्या खर्चाला सढळ हातानें मदत करून शिवाय आस्थेवाईकपणानें त्यांच्या प्रगतीकडेही लक्ष ठेवीत असत. त्यांचा स्वभाव उदार असल्यामुळें लोकांकरितां स्वतःला झीज लावून घेण्यांत त्यांना आनंद वाटत असे.

कै० नानासाहेब आपलें शाळेंतील काम संभाळून इतर वाचनही थोडेंबहुत करीत असत, व त्यांतल्या त्यांत त्यांना काव्य व इतिहास ह्या विषयांची गोडी विशेष असे. कै० पुरातत्त्वभूषण राजवाडे यांनीं इतिहासाच्या साधनांचीं जीं खंडें प्रसिद्ध केलीं आहेत, त्यांपैकीं पहिला खंड छापावयास त्यांनीं मुंबईचे इतिहासप्रेमी लक्षाधीश मावजी शेट यांजकडून मदत मिळवून दिली होती.

कै० नानासाहेब हे पुण्याच्या हायस्कुलांत असतां त्यांनीं मुंबई येथील सुप्रसिद्ध 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक कै० जावजी दादाजी चौधरी, जे. पी., यांनीं सुरू केलेल्या 'काव्यसंग्रह' मासिकाच्या कामीं लक्ष घालण्यास सुरुवात केली, व इ. स. १९०२ मध्यें त्या मासिकाचें संपादकत्व स्वीकारिलें. हें मोठ्या दगदगीचें व जबाबदारीचें काम त्यांनीं आपल्या मृत्यूच्या तारखेपर्यंत केलें. 'काव्यसंग्रहा'चे संपादक ह्या नात्यानें त्यांनीं एक मोठी कामगिरी केली आहे. मोरोपंतांनीं आपलीं काव्यें संस्कृत ग्रंथांच्या आधारें रचिलीं, पण तीं भाषांतरें नसून, मूळांतील उत्कृष्ट मालमसाला घेऊन आपल्या प्रतिभेच्या बळावर त्यांत भर घालून तीं रचिलेलीं आहेत, आणि म्हणून त्यांत स्वतंत्र कवित्व कितीतरी आहे, हें त्यांनीं सोदाहरण सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे ( मोरोपंतकृत शल्यपर्वाची प्रस्तावना पहा ). हीच ती महत्त्वाची कामगिरी होय.

कै० नानासाहेब यांच्या मृत्यूनंतर त्यांची पत्नी अवघ्या एका वर्षाच्या आंतच स्वर्गवासी झाली. त्यामुळें त्यांचे दोघे मुलगे मातृपितृसुखास मुकले. परंतु त्यांपैकीं थोरले म्हणजे केशवराव हे आपले चुलते रा० नरसिंह चिंतामण ऊर्फ तात्यासाहेब केळकर यांजकडे राहिले व त्यांनींच त्यांचें पालनपोषण करून त्यांस शिक्षण दिलें. हे सध्या पुण्यास एका विमाकंपनींत नोकर आहेत. धाकटे चिरंजीव शिवरामपंत हे आपले दुसरे चुलते रा. माधव नरसिंह ऊर्फ आप्पासाहेब केळकर यांच्याकडेच लहानपणापासून असून त्यांच्या सुशील व सुविद्य पत्नी श्री० सौ० गिरिजाबाई केळकर यांनीं प्रत्यक्ष जन्मदात्या मातेप्रमाणें त्यांच्यावर प्रेम करून त्यांचें लालनपालन केलें. श्री. आप्पासाहेबांनीं त्यांना एम्. ए. पर्यंत शिक्षण दिलें आहे व सध्यां ते मुंबई येथें एका व्यापारी पेढीवर काम करीत असतात.

कै० नानासाहेब यांनीं 'काव्यसंग्रहा'च्या संपादनाचा भार आपल्या आंगावर घेऊन, कै० वामन दाजी ओक यांच्या मृत्यूमुळें व त्यांच्या पाठीमागून झालेल्या संपादकांस तें काम न झेंपल्यामुळें पोरक्या झालेल्या 'काव्यसंग्रहा'स थोड्याच दिवसांत त्यांनीं

बाळसेदार बनविलें असतें, असें वाटावयास लागलें होतें. मोरोपंतकवींच्या काव्याविषयीं जे चर्चात्मक लेख त्यांनीं लिहिले आहेत, त्यांवरून त्यांची कुशाग्रबुद्धि व त्यांच्या आंगच्या विद्वत्तेची चमक नुकतीच कोठें वाचकांच्या निदर्शनास येऊं लागली होती, इतक्यांत निर्घृण काळानें त्यांना मृत्युलोकांतून हिरावून नेलें!

---

# कै० के. व्ही. लक्ष्मणराव, एम्. ए.

कै० के. व्ही. लक्ष्मणराव यांचे वडील निजामशाहींत कृष्णाजिल्ह्यांत नंदिग्राम तालुक्यांतील वेनकंची-तोलु नांवाच्या खेड्यांत राहात असत. तेथें त्यांचा जन्म इ. स. १८७७ मध्यें झाला, व तेथेंच त्यांचें बाळपण गेलें. त्यांचे वडील कोमरराजु व्यंकटपय्या पंतलगारु हे त्यांच्या बाळपणींच निवर्तल्यामुळें ह्या कुटुंबास एकदोनदां स्थलांतर करावें लागले, व कै० लक्ष्मणराव यांस भंडारा (मध्यप्रांत) येथें आपल्या बहिणीकडे विद्यार्जनासाठीं यावें लागलें. पुढें हायस्कुलांत शिकण्यासाठीं ते नागपुरास आले व तेथें ते इ. स. १८९२ मध्यें प्रवेशपरीक्षेंत उत्तीर्ण झाले. उच्च शिक्षणासाठीं इ. स. १८९४ मध्यें ते मॉरीसकॉलेजांत प्रविष्ट होऊन इ. स. १९०० मध्यें बी. ए. व इ. स. १९०२ मध्यें एम्. ए. झाले. कॉलेजमध्यें शिकत असतां अनेक अडचणी आल्या, तरी त्यांनीं मोठ्या चिकाटीनें आपला विद्याभ्यास पूर्ण केला.

नागपुरास शिकत असतां तेथील विद्वद्रत्न कै० हरि माधव पंडित यांच्याशीं त्यांची ओळख झाली. कै० पंडित यांच्या कुशाग्र दृष्टीस ज्या होतकरू तरुण व्यक्ति पडल्या, त्यांना त्यांनीं जवळ करून वाङ्मयसेवेची शिस्त लावून अनेक विषयांवर लेख लिहिण्यास प्रोत्साहन दिलें व लेखनकलेंत प्रवीण केलें. अशा तैलबुद्धि व तरतरीत शिष्यवर्गापैकीं कै० लक्ष्मणराव हे एक होते. हे जन्मानें तेलगू ब्राह्मण, शिक्षणाच्या संस्कारानें महाराष्ट्रीय व योगक्षेमाच्या दृष्टीनें आंध्रदेशांत स्थायिक झालेले, अशी त्रिस्थळी अवस्था असतांना देखील त्यांनीं जें सारस्वतोपासनेचें व्रत आजीव पाळलें, त्याची महती व बहुविधता लक्ष्यांत घेतां, कै० लक्ष्मणराव यांस कै० पंडितांचे 'पट्टशिष्य' च म्हणावें लागतें.

कै० लक्ष्मणरावांची जन्मभाषा तेलगू व ते प्रवेशपरीक्षेपर्यंत हिंदीभाषा घेऊन शिकलेले, असें असतां ते कै० पंडितांनीं सुरू केलेल्या 'देशसेवक' नांवाच्या मराठी साप्ताहिकांत लेख लिहूं लागले. ते मराठींत वादविवादही अस्खलितपणें करीत असत. त्यांनीं 'माझी भार्या' नांवाची एक सुंदर करुणरसपर कविता लिहिली होती, व ती 'करमणूक' पत्रांत प्रसिद्ध झाली होती. कॉलेजांत शिकत असतां कांहीं वेळ ते 'सत्यप्रिय' नामक साप्ताहिकाचे संपादकही होते.

कै० लक्ष्मणराव मोठे बुद्धिवान् असून त्यांची जिज्ञासा इतकी जबर व धारणाशक्ति इतकी तीव्र होती कीं, ते हळूहळू महत्वाच्या विषयांवर मासिकांतही लिहूं लागले. कै० वामन दाजी ओक यांनीं प्रसिद्ध केलेल्या 'पंचवटीस्थलनिर्णया'संबंधींच्या वादास त्यांच्या मृत्यूनंतर रंग चढला. 'केरळकोकिळ'कारांनीं कै० श्री० गणपतराव हरिहर ऊर्फ बापूसाहेब पटवर्धन कुरुंदवाडकर यांची बाजू उचलून धरिली, व कै० लक्ष्मणराव यांनीं 'केरळकोकिळा'चे सर्व मुद्दे खोडून काढिले. ह्या संबंधाचे त्यांचे लेख पुण्यास त्या वेळीं प्रसिद्ध होत असलेल्या 'सुविचारसमागम' नामक मासिकांत छापले आहेत. त्यांनीं कोल्हापूर येथील 'ग्रंथमाला' नामक नियतकालिकांत 'शाहू' शब्दाच्या व्युत्पत्तीवर एक लहानसा निबंधही लिहिला होता. मराठी वाङ्मयांतील त्यांच्या व्यासंगानंतर त्यांचें लक्ष्य आंध्रसारस्वताकडे वेधलें, व त्या वाङ्मयावर त्यांनीं 'विविधज्ञानविस्तारां'त एक समालोचक व विवेचक निबंध लिहिला. अशा प्रकारें महाराष्ट्रवाङ्मयांत एक एक पाऊल पुढें टाकीत असतां कै० पंडित यांच्या सहवासानें त्यांना मराठी काव्यांचें अध्ययन करण्याची गोडी लागली. ह्या त्यांच्या व्यासंगाचें दृश्य फळ म्हणजे त्यांनीं 'काव्यसंग्रहा'करितां मोरोपंतकृत 'कर्णपर्वा'चें केलेलें संपादन हें होय.

कै० लक्ष्मणरावांच्या घराण्याचा ऋणानुबंध मुतगाला येथील जमीनदारांशीं होता, व त्यांचे पितामह त्या संस्थानांत दिवाण होते. पुढें कै० लक्ष्मणराव हे त्या वेळच्या अधिपतींच्या आमंत्रणावरून तिकडे गेले. ते प्रथम प्रायव्हेट सेक्रेटरी व नंतर दिवाण होऊन ते त्या संस्थानांतील कायमचे रहिवासी झाले. पांच सहा वर्षें संस्थानच्या कामानिमित्त मद्रास येथें असतांना त्यांनीं रा. ब. वीरेशलिंग पंतलू यांच्या प्रोत्साहनानें 'विज्ञानचंद्रिकामंडळी' स्थापून तिच्या द्वारें आंध्रभाषेंत बरेच उपयुक्त ग्रंथ प्रसिद्ध केले. पुढें इ. स. १९१२ मध्यें तेलगू भाषेंत 'विज्ञानसर्वस्वमु' नामक विश्वकोश तयार करण्याच्या कार्यास त्यांनीं आपणास आमरण वाहून घेतलें. ह्या कार्यांत ते इतके समरस झाले कीं, त्यांना दुसरे बहुमानाचे व संपन्नतेचे हुद्दे आले असतां त्यांचा त्यांनीं स्वीकार केला नाहीं. आपली जन्मभाषा जी आंध्र, तिची ऊर्जित दशा कशी होईल व तींत सर्व प्रकारचें अर्वाचीन वाङ्मय निर्माण होऊन त्यांतील ज्ञानाचा प्रसार जनतेंत कसा होईल, ह्या एकाच विचारांत ते सदैव गुंग झालेले असत. आंध्रदेशच्या प्राचीन इतिहासाचें संशोधन करितांना त्यांना शिलालेख तपासण्याचा नाद लागला व त्यांचें लक्ष्य पुराणसंशोधनाकडे वळलें. पण त्याच्या बरोबरच ते पुन्हां मराठी लेखनाकडे लक्ष्य देऊं लागले. त्यांनीं दंडीची 'अवंतिसुंदरीकथा' व 'राधामाधवविलासचंपू' ह्या ग्रंथांचें परीक्षण हे दोन संशोधनात्मक निबंध 'विविधज्ञानविस्तारां'त लिहिले. त्यांतील 'चंपू'च्या मार्मिक, विद्वत्ताप्रचुर आणि सप्रमाण परीक्षणामुळें त्यांनीं विद्वान् मराठी वाचकांचें लक्ष्य आपणाकडे वेधून घेतलें.

हे एक मोठे कर्ते समाजसुधारक होते. ज्या गोष्टी महाराष्ट्रांत करणें सोपें, तेंच मागासलेल्या आंध्रदेशांत घडवून आणणें कठीण. विशेषतः स्त्रीशिक्षण, प्रौढस्त्रीविवाह व विधवा-

विवाह ह्या सामाजिक सुधारणा प्रचारांत आणणें फार अवघड असतांही त्यांनीं ह्या तिन्ही गोष्टी स्वतःच्या घरीं घडवून आणल्या होत्या.

कै० लक्ष्मणराव यांनीं वाङ्मयकार्यांत दुसऱ्या कोणाच्या मदतीची अपेक्षा न करितां स्वतःच्या बुद्धिवैभवाच्या व हिंमतीच्या बळावर सुरू केलेलें ज्ञानसत्र आमरण चालू ठेविलें होतें. यांनीं आंध्रवाङ्मयाची भरींव सेवा केली आहे. मराठी वाङ्मयक्षेत्रांतील त्यांची कामगिरी अल्प असली तरी ती बहुमोल आहे. प्राचीन शिलालेखांसंबंधानें त्यांनीं इंग्रजींतही बरेच लेख लिहिले आहेत. त्यांचा मराठ्यांच्या इतिहासावरील व्यासंग प्रशंसनीय होता. त्यांच्या मनांतून पुढेंही मराठी वाङ्मयाची पुष्कळशी सेवा करावयाची होती, परंतु 'मनसा चिंतितं कार्यं दैवमन्यत्तु चिन्तयेत्' हेंच खरें ठरलें !

कै० लक्ष्मणराव मद्रास येथें तारीख १३ जुलै १९२३ रोजीं पहांटेस हृदयाची क्रिया एकाएकीं बंद पडून दिवंगत झाले, व त्यांनीं आरंभिलेली वाङ्मयविषयक कामगिरी अर्धवट राहिली ! तथापि त्यांच्या बहुविध व अमूल्य कामगिरीबद्दल कोणासही–विशेषतः गुणग्राही महाराष्ट्रीयांस–आदर वाटल्याशिवाय खास राहाणार नाहीं.

# पंतप्रशस्ति.

कालिदासाची कविता प्रसन्न समजतात व भारवीची कविता भारदस्त म्हणतात. प्रसन्न कवितेचा रस द्राक्षांच्या रसासारखा असून, भारदस्त कवितेचा रस नारळाच्या रसासारखा असतो. जो पाक कालिदासांत आहे, तो भारवींत नाहीं; जो पाक भारवींत आहे, तो कालिदासांत नाहीं. पण हे दोन्ही पाक पंतांच्या काव्यांचा खमंगपणा वाढवीत आहेत. मोरोपंती महाभारतांतील कांहीं आख्यानें नीट समजलीं म्हणजे सगळा कालिदास व सगळा भारवि वाचण्याचें श्रेय मिळून आणखीही अधिक लाभ होतो. तो लाभ भक्तिरसाचा व देवाविषयीं आस्तिक्यबुद्धीचा होय.

* * * *

पदलालित्य दंडीचें लोकोत्तर समजलें जातें व उपमालंकार कालिदासाचा सुरेख समजतात. पंतांच्या काव्यांतील पदलालित्य दंडीसारखेंच लोकोत्तर असून, पंतांनीं स्थळोस्थळीं बांधलेले उपमालंकार अतिसुरेख आहेत. सारांश, कालिदासाची, भारवीची व दंडीची—मिळून त्रिवेणी एकट्या मोरोपंतामध्यें एकत्र संगम झालेली उघड आढळते.

* * * *

मोरोपंतासारखा देशी कवि पूर्वीं झाला नाहीं, हल्लीं नाहीं व पुढेंही होण्याचा फारसा संभव नाहीं; हा एक महत्वाचा मुद्दा मोरोपंती भारत जेमतेम तरी जो एकदां डोळ्यांखालून घालवील, त्यास सहज कळून येणार आहे.

कै० प्रो० राजाराम रामकृष्ण भागवत.

# अनुक्रमणिका.

## टिपणें.

(१) वर दर्शविलेल्या ग्रंथसंख्येंत पाठभेद म्हणून पृष्ठ २५८ टीपा ३ व ७ यांत दिलेल्या दोन गीति मिळविल्या म्हणजे ग्रंथसंख्या २५६६ होते.

(२) ह्या ग्रंथसंख्येपैकीं २५६५ पद्यें गीतिवृत्तांत व फक्त एक (अध्याय ६।३२) आर्यागीतिवृत्तांत आहे. 'एकवृत्तमयैः पद्यैरवसानेऽन्यवृत्तकैः' ह्या नियमानुसार एकाद्या काव्याचें किंवा सर्गाचें शेवटचें एक तरी पद्य अन्य वृत्तांत असणें अवश्य असतें. परंतु पंतांनीं प्रस्तुत पर्वाच्या मध्यें एवढी एकच आर्यागीति रचून कां समाविष्ट केली, हें समजणें शक्य नाहीं.

# परिशिष्टें.





# मोरोपंतकृत महाभारत.

## ८. कर्णपर्व.

(गीतिवृत्त.)

### अध्याय पहिला.

[1]भव्यप्रताप कर्ण, [2]स्वपित्याहुनि फार [3]संगरीं [4]तपला; ।
[5]कीं [6]ज्याच्या [7]शररश्मिव्रातपटीं [8]तो [9]सहस्रकर [10]लपलों. [11]॥ १

---

१. **मो**रोपंतकृत **म**हाभारताच्या प्रत्येक पर्वाच्या पहिल्या गीतीचें आद्यक्षर घेतलें असतां **'श्रीपांडवसहायो भगवानरविंदाक्षो जयति'** हें अष्टादशाक्षरी वाक्य निष्पन्न होतें, हें सुप्रसिद्ध आहे. **कर्णपर्व हें म**हाभारतांतील आठवें पर्व आहे; व वरील वाक्यांतील आठवें अक्षर **'भ'** आहे. म्हणून **पं**तांनीं आपल्या **कर्णपर्वा**ला **'भ'** या अक्षरानें सुरुवात केली आहे. अशा रीतीनें शब्दचमत्कार साधण्याकरितां **पं**तांना जरी नियमित अक्षरांचा उपयोग करावा लागत असे, तरी त्यांनीं सामान्य कवीप्रमाणें, कोठेंही अर्थहानी होऊं दिली नाहीं. कोणीही कवि शब्दालंकारामागें लागला, कीं तो अर्थचमत्कृतीला मुकलाच; असा सामान्य नियम आहे. पण **पं**तांची गोष्ट तशी नाहीं. जणों काय, त्यांच्या काव्यांत अर्थचमत्कृति व शब्दचमत्कृति एकमेकांस सोडून राहूंच शकत नाहींत. हें आमचें म्हणणें या पहिल्या गीतीच्या पहिल्या शब्दावरूनच स्पष्ट होईल. 'भव्यप्रताप' हें साभिप्राय विशेषण आहे. 'स्वपित्याहुनि फार संगरीं' तपण्याचें व 'शररश्मिव्रातपटीं तो सहस्रकर' लपविण्याइतक्या सामर्थ्याचें कारण 'भव्यप्रताप' या शब्दांत कवीनें ध्वनित केलें आहे. म्हणून हा **परिकर** ( किंवा परीकर ) अलंकार होय. याचें लक्षणः—'परीकरः परिकरः साभिप्राये विशेषणे' [ मंदारमरंदचंपू ] म्हणजे, जेव्हां विशेषण साभिप्राय असतें तेव्हां **परिकर** अलंकार होतो. 'भव्यप्रताप' हें विशेषण कर्ण व 'स्वपित्याहुनि' या पदानें निर्दिष्ट जो सूर्य, या दोघांसही लावितां येतें. भव्य ( स्तोत्रार्ह ) प्रताप ( शौर्य ) ज्याचा—असा कर्णपर अर्थ; भव्य ( उज्ज्वल ) प्रताप ( अत्यंत ताप, प्रखर ऊन ) ज्याचा—हा सूर्यपर अर्थ. अशा रीतीनें हा शब्द द्व्यर्थी ठरल्यामुळें हा **श्लेषा**लंकार झाला. २. आपला बाप जो सूर्य त्यापेक्षां. **कर्ण कुं**तीच्या ठायीं सूर्यापासून झालेला मुलगा होय, **हें प्रसिद्ध** आहे. येथें सूर्यपर्याय इतर एकाद्या शब्दाचा उपयोग न करितां 'स्वपित्याहुनि' हेंच पद योजून 'बापसे बेटा सवाई' झाला, असें ध्वनित केलें आहे. म्हणून 'स्वपित्याहुनि' हाही शब्द साभिप्राय आहे. ३. युद्धांत. ४. शौर्यानें शत्रूस असह्य झाला. ५. 'कीं' या शब्दाचे मराठींत जणों, विकल्प, प्रश्न, आधार, कारण, असे अनेक अर्थ आहेत. त्यांपैकीं येथें पहिला किंवा शेवटचा अर्थ संभवतो. पहिला अर्थ घेतल्यास **उत्प्रेक्षा**लंकार होतो; व शेवटचा घेतल्यास **अतिशयोक्ति** होते.

स्वसख्याचें[१] साधाया चिंतित[२], जरि पार्थमर्दना[३] जपला; ।

६. ज्या कर्णाच्या. ७. शर+रश्मि+व्रात+पटीं=बाण+किरण+समुदाय+आच्छादनांत=बाणरूपी किरणसमुदायांच्या आच्छादनांत. येथें बाणांस व त्यांच्या समुदायास 'पट' असें म्हटलें आहे. हा रूपकालंकार झाला. हें समासांतर्गत रूपक होय. बाणांस किरणच मानण्याचें कारण असें, कीं सूर्यकिरण जसे प्रखर असतात तसेच कर्णाचे बाण प्रखर होते, असें दाखवून कर्ण व सूर्य हे एका वर्गांत आणावयाचे. 'शररश्मि' व 'सहस्रकर' या शब्दांनीं कर्णसूर्यास समान वर्गांत आणून 'व्रातपटीं...लपला' या शब्दांनीं सूर्यापेक्षां कर्णाचें आधिक्य वर्णिलें आहे. हा व्यतिरेकालंकार होय. कारण जेथें उपमान ( प्रस्तुत स्थलीं सहस्रकर ) आणि उपमेय ( प्रस्तुत स्थलीं कर्ण ) यांमध्यें साधर्म्य दाखवून त्यांमध्यें एकाचें दुसऱ्याहून आधिक्य किंवा न्यूनत्व दाखविलेलें असतें, तेथें व्यतिरेक नामक अलंकार होतो. ८. विश्वप्रसिद्ध असा. ९. सहस्रकर=सूर्य. (रूढ्यर्थ.) 'सहस्रकर' हें विशेष्य साभिप्राय आहे. सहस्रकर=हजार हात आहेत ज्याला असा. ( यौगिकार्थ. ) असला पुरुष अर्थात् फारच मोठा असला पाहिजे; व त्यास झांकणारा त्यापेक्षां श्रेष्ठ असला पाहिजे हा ध्वनि. हा परिकरांकुरालंकार आहे. 'साभिप्राये विशेष्ये तु भवेत् परिकरांकुरः' [कुवलयानंद] म्हणजे, 'जेथें विशेष्य साभिप्राय असतें, तेथें परिकरांकुर नामक अलंकार होतो.' विशेष्य साभिप्राय असेल तेव्हां परिकरांकुर व विशेषण साभिप्राय असेल तेव्हां परिकर—असा या दोहोंतील भेद आहे. आतांपर्यंत ह्या पहिल्या गीतीवर ज्या टीपा दिल्या, त्यांवरून पंतांनीं या एका गीतींत अनेक उत्तम अलंकार साधिले आहेत, बहुतेक सर्व विशेष्यविशेषणें साभिप्राय घातलीं आहेत, शब्द-चमत्कारही केले आहेत व इतकेंही करून मूळचा अर्थ बिघडूं न देतां अधिकच गोड केला आहे, हें स्पष्ट होईल. पंतांची विद्वत्ता, सहृदयता, रसिकता, व शब्दसृष्टीचें ईश्वरत्व हे गुण ह्या पर्वांत पदोपदीं दृष्टीस पडणार आहेत. निबंधमालाकार कै० विष्णु कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं ध्वनित केल्याप्रमाणें मोरोपंत केवळ पौराणिक नसून संस्कृतप्राकृतभाषेंत अत्यंत प्रवीण असे शास्त्री होते, व त्यांना संस्कृत अलंकारशास्त्राची व इतर शास्त्रांची चांगलीच माहिती होती, हें या पर्वावरून स्पष्ट सिद्ध होत आहे. तें पुढें आम्हीं त्या त्या स्थलीं दाखवूंच, पण वाचकांनीं देखील विशेष दक्षतेनें व रसिकतेनें प्रस्तुत पर्व वाचावें, अशी विनंति आहे. १०. लपला म्हणजे लपून बसला किंवा झांकला गेला. ११. या गीतीची एकंदर रचना अशी आहे, कीं योग्य रीतीनें जोर देऊन वाचल्याशिवाय ती वाचतांच येत नाहीं. कारण ह्या गीतींत पुढच्या संयुक्ता-क्षरामुळें गुरू झालेलीं सात अक्षरें आहेत. ह्या अक्षरांवर आघात न देतां वाचल्यास वृत्तभंग होऊन गीति कानास गोड लागतच नाहीं. वीररसवर्णनाच्या वेळीं पदरचना अशीच पाहिजे. संस्कृत महाभारतांतील कर्णपर्वाच्या प्रारंभींचा पहिला अध्याय 'जनमेजयवाक्य नाम' आहे. तो पंतांनीं अजीबात गाळून प्रस्तुत पर्वास 'संजयधृतराष्ट्रसंवाद' नामक द्वितीयाध्यायापासून प्रारंभ केला आहे.

१. आपला मित्र जो दुर्योधन त्याचें. २. इच्छित. पांडवहनन करण्याविषयींची दुर्यो-धनाची इच्छा. ३. अर्जुनाला शरताडनांनीं त्राहि त्राहि करण्याविषयीं.

दुसरे[1] दिवशीं हरिच्या[2] दृष्टिपुढें अर्जुनाशुगें[3] खपला[4]. ॥ २
धृतराष्ट्रासि कथाया, संजय, तें वृत्त[5], सद्रथावरुनी[6], ।
जाय कुरुक्षेत्राहुनि रात्रौ त्या गजपुरा[7] त्वरा करुनी. ॥ ३
संजय-सूत नृपाच्या जाय प्रक्षीणबांधवीं[8] सदनीं, ।
जाणों प्रियजनशोकाजगराच्या[9] उघडल्या[10] महावदनीं[11]. ॥ ४
वंदुनि[12] पुत्रसुहृज्जनशोकनटाच्या[13] मनोज्ञ[14] अजिरा[15] यां[16] ।

---

१. कर्णास सैन्याधिपत्य मिळाल्याच्या दुसऱ्या दिवशीं. सेनानायक या नात्यानें कर्णानें दोनच दिवस युद्ध केलें, हें लक्षांत असावें. २. कृष्णाच्या. विशेषतः कृष्णाच्या युक्तीमुळेंच कर्ण पडला, हें कवीला दाखवावयाचें होतें, म्हणूनच कवीनें येथें 'हरिच्या दृष्टिपुढें' हे शब्द घातले आहेत. ३. अर्जुन+आशुगें=पार्थाच्या बाणेंकरून. ४. नाहींसा झाला; मृत झाला. 'जपला' व 'खपला' यांचा कर्ता पहिल्या गीतींतील 'कर्ण' होय. ५. घडलेली गोष्ट. ६. उत्तम म्हणजे शीघ्र जाणाऱ्या रथावर बसून. 'सद्रथावरुनी'='सुंदर रथावरून' असा अर्थ करूं नये. ७. हस्तिनापुरास. ८. अत्यंत क्षीण झाले आहेत [ युद्धांत मृत झाल्यामुळें ] नातलग ज्यांतील अशा. 'प्रक्षीणबांधवं' असेंच मुळांत आहे. मुळांतला सुरेखसा शब्द जशाचा तसाच ठेवण्यांत पंतांनीं उत्तम रसिकता दर्शविली आहे. ९. इष्टजनशोकरूप अजगराच्या. १०. उघडलेल्या. ११. मोठ्या [ भयंकर ] तोंडांत जाय—असा भाव. ही ओळ पंतांचीच आहे. मुळांत हीस आधार नाहीं. येथें पंतांनीं उत्प्रेक्षालंकार साधला आहे. प्रियजनांच्या शोकास अजगर, व त्या राजवाड्यास त्या अजगराचें तोंड, असें म्हणून धृतराष्ट्राचा वाडा त्या वेळीं किती भयंकर दिसत होता, हें दाखविलें आहे; व त्या शोकमग्न राजभवनांत शिरण्यास संजयास किती वाईट वाटत होतें, व तो किती भीत होता हें सुचविलें आहे. उत्प्रेक्षेंत रूपकही गर्भित आहे. असल्या अनेक 'रमणीयप्रतिपादक शब्दांचें' जनकत्व पंतांकडेच आहे, व्यासांकडे नाहीं, हें पंतांस केवळ भाषांतरकार समजणाऱ्यांनीं लक्षांत ठेवावें. १२. पुत्रसुहृज्जनशोकनटाच्या या मनोज्ञ अजिरा वंदुनि—असा अन्वय. येथें संजयानें जो नमस्कार केला, तो भक्तीनें केला होता असें नाहीं, तर भयानें व तिटकाऱ्यानें होय. १३. पुत्र+सुहृत्+जन+शोक+नटाच्या=पुत्र+मित्र+मंडळी+दुःख+नाचणाऱ्याच्या=पुत्र व हितचिंतक मित्रमंडळी यांच्या मरणामुळें झालेला जो शोक तोच नट त्याच्या. १४. सुंदर. १५. आंगण्यास. 'देहल्यंगणं चत्वराजिरे' इत्यमरः. येथें शोकाला नट म्हटलें आहे. त्या नटास नाचण्यास अंगण पाहिजे, म्हणून सदनास अजिर ( अंगण ) म्हटलें आहे. हें परंपरितरूपकाचें उदाहरण आहे. शोकनट अंगणांत मोठ्या आनंदानें थयथयां नाचत होता—असा अर्थ. घरांतली सर्व मंडळी शोकानें अत्यंत मग्न होती, असें कवीला सांगावयाचें होतें; तें स्पष्ट न सांगतां पर्यायानें सांगितलें आहे, म्हणून हा पर्यायोक्त अलंकार होय. या ओळींतील ही सुरेख कल्पना देखील पंतांचीच आहे. १६. येथें 'त्या' असा शब्द विशेष शोभेल.

धृतराष्ट्रासि म्हणे, 'मीं संजय. व्हा सावधान अजि ! राया ! ॥ ५
पुसतों तुज मी राया ! धैर्यविवेकें सुखी च अससी कीं ? ।
निज[1]दोषें [2]व्यसनातें पावुनि [3]मोहीं निमग्न नससी कीं ? ॥ ६
[4]भीष्म द्रोण विदुर हरि [5]परमाप्त; [6]तिहीं कथूनि [7]भावि, हितें ।
उपदेशिलीं तुला बहु वचनें, बा ! भूमिवल्लभा ! [8]विहितें. ॥ ७
तैसीं च [9]रामनारदकण्वांचीं सुवचनें हि [10]जनकाचीं ।
[11]अमृताधिक मधुरहितें मानी एका तुझें चि मन [12]काचीं. ॥ ८
[13]न स्वीकारुनि [14]मोहें, तूं [15]कवि, [16]हितें [17]विहितें [18]गुरुसुहृत्कथित, ।
तें आठवूनि, आतां झाला नाहींस कीं [19]अतिव्यथित ? ॥ ९
[20]रिपुनीं भीष्मद्रोणप्रमुख गुरुसुहृन्मणी रणीं वधिले, ।
यास्तव शोचिसि कीं [21]हतफळ झाले [22]अर्थ जे [23]मनामधिले ?' ॥ १०

---

१. आपल्या दोषानें. लढाई टाळण्याचें आपल्या हातीं असतां ती खुशाल होऊं दिली, हाच धृतराष्ट्राचा दोष. २. संकटातें. ३. दुःखांत किंवा मूर्च्छेंत. ४. कृष्णानें व भीष्मद्रोणादिकांनीं केलेला उपदेश उद्योगपर्व–अ० ९ मध्यें आहे. ५. येथें 'आप्त' शब्द पंतांनीं मोठ्या खुबीनें योजिलेला आहे. 'आप्तस्तु यथार्थवक्ता' असें नैय्यायिकांनीं आप्ताचें लक्षण सांगितलें आहे. हें या ठिकाणीं किती सुरेख रीतीनें लागू होतें ! भीष्मादिकांनीं न भीतां स्पष्टपणें दुर्योधनाला खऱ्या गोष्टीचा ( यथार्थाचा ) उपदेश केला, तेव्हां त्यांस न्यायशास्त्रास अनुसरून 'आप्त' म्हणणें न्याय्य होणार नाहीं काय ? ६. त्यांनीं. ७. पुढें होणारें. ८. योग्यें. ९. परशुराम. परशुरामाचा, नारदाचा व कृष्णाचा उपदेश उद्योगपर्व–अ० ८ त वर्णिलेला आहे. १०. बापाचीं. धृतराष्ट्रपिता जो व्यास त्याचीं. व्यासानें अनेक वेळां उपदेश केला आहे. ११. 'अमृताधिक मधुरहि तीं' असा अन्यपाठ आहे. १२. कचीं. १३. 'स्वीकारिसी न मोहें' असाही पाठ आहे. १४. पुत्रप्रेमानें. १६. शहाणा. असा तूं कवि ( शहाणा ) [ खरा; पण ] गुरुसुहृत्कथित हित [ व ] विहित मोहें ( पुत्रप्रेमेंकरून ) न स्वीकारुनि ( त्यांचा अंगीकार न करतां ) आतां ( स्वकुळनाशरूपी संकटांत पडल्यावर ) तें [ गुरुसुहृत्कथित ] आठवूनि अतिव्यथित झाला नाहींस कीं ? ( झाला नाहींस ना ? )–असा अन्वय. १६. हितप्रद. १७. योग्य. १८. भीष्मद्रोणादिक गुरूनीं ( वडील मंडळींनीं ) व कृष्णविदुरादि हितचिंतकांनीं सांगितलेलें. १९. अत्यंत दुःखित. २०. पांडवांनीं. २१. निष्फळ, इष्टपरिणामविहीन. २२. हेतु. पांडुपुत्रनाशाची व स्वपुत्रविजयाची इच्छा. २३. मनांतले. रिपुनीं रणीं भीष्मद्रोणप्रमुख गुरुसुहृन्मणी वधिले, यास्तव [ आपल्या ] मनामधिले जे अर्थ [ ते ] हतफळ झाले [ त्यांबद्दल ] शोचिसि कीं ?–असा अन्वय.

‘करि एकवीस वेळां [1]क्षत्रियरहिता [2]मुनीश जो धरणी, ।
[3]तत्प्रियशिष्य शराहीं [4]खिळिला [5]गांगेय [6]मुख्ययोध [7]रणीं.’ ॥ ११
[8]धृतराष्ट्र म्हणे, ‘पुससी जाणोनि हि, काय संजया ! [9]ताप; ।
[10]शोक कसा न करूं ? [11]कीं माझा वधिला शिखंडिनें ! [12]बाप; ॥ १२
[13]जो [14]रथ दहा सहस्र प्रतिदिन ही [15]छलविवर्जितीं [16]युद्धीं ।

---

१. क्षत्रिय नाहींत ज्यांत अशी. ‘धरणी’चें हें विशेषण आहे. परशुरामानें एकवीस वेळां निःक्षत्रिय पृथ्वी केली होती–ही कथा प्रसिद्धच आहे. २. मुनिश्रेष्ठ जो परशुराम. प्रस्तुत वाक्यांत ‘परशुराम’ असें स्पष्ट न म्हणतां ‘जो मुनीश एकवीस वेळां धरणी क्षत्रियरहिता करी’ असें म्हणून पर्यायानें परशुराम सूचित केला आहे, म्हणून हें **पर्यायोक्त** नामक अलंकाराचें उदाहरण आहे. याचें लक्षणः—‘प्रकारांतरमाश्रित्य तद्विवक्षितवस्तुनः । सुचारुकथनं यत्र पर्यायोक्तं तदिष्यते ॥’ [ मंदारमरंदचंपू ]. म्हणजे, विवक्षित वस्तूचा उल्लेख स्पष्टपणें न करितां, दुसऱ्या, रीतीनें वळसा घेऊन केलेला असतो व तो आनंदजनक असतो, तेव्हां त्यास **पर्यायोक्त** म्हणतात. ३. त्या परशुरामाचा प्रियशिष्य जो भीष्म तो. ४. भूमीवर खिळून टाकिला, उठण्यास असमर्थ असा केला. पुढें अध्याय १६।४ व ३४।२ पहा. ५. गंगापुत्र ( भीष्म ). ६. वीरश्रेष्ठ. ७. ही गीति कोणाची उक्ति आहे हें निश्चित करणें अवश्य आहे. हें म्हणणें संजयाचें आहे, कीं कवीचें आहे, कीं धृतराष्ट्राचें आहे, अशी शंका येते. संजयाची ही उक्ति नाहीं. मागच्याच गीतींत त्यानें भीष्मद्रोणांच्या मरणाचा उल्लेख केला आहे. तेव्हां फक्त भीष्माच्या मरणाचा उल्लेख तो निराळ्या गीतींत करील असें संभवत नाहीं. म्हणून मागच्या गीतींतच संजयाचें म्हणणें संपलें असें म्हणावें लागतें. भीष्माविषयींची ही उक्ति कवीचीही होऊं शकत नाहीं. कारण संजयधृतराष्ट्रसंभाषणप्रसंगीं मध्येंच शिरून फक्त भीष्ममरणवृत्त सांगण्याचें कवीस काय प्रयोजन? तेव्हां ही उक्ति धृतराष्ट्राचीच होय असें अर्थापत्तीनें म्हणावें लागतें. पण पुढच्यांच गीतींत ‘धृतराष्ट्र म्हणे’ या शब्दानंतर धृतराष्ट्राचें म्हणणें सुरू होत असल्यामुळें आमचें म्हणणें कित्येकांस कदाचित् पसंत पडणार नाहीं. पण हा मोठासा दोष आहे असें नाहीं. अकराव्या व बाराव्या गीतींस युग्मक समजून अन्वय लाविल्यास हा दोष नाहींसा होतो. खरोखर म्हटलें असतां, अकरावी गीति बाराव्या गीतीनंतर असावयास पाहिजे होती. ८. धृतराष्ट्र म्हणे—[ हे ] संजया ! ताप ( मला होत असलेला संताप, दुःख ) जाणोनि हि ( माहित असूनही ) काय पुससी ( अशा रीतीनें मला टोंचून टोंचून कां बरें विचारतोस ? )—असा सान्वयार्थ. ९. संताप. १०. ‘झालास कीं अतिव्यथित’ ( गी० ९ ), ‘शोचिसि कीं’ ( गी० १० ) ह्या संजयाच्या प्रश्नांस ‘शोक कसा न करूं’ हें उत्तर आहे. ११. कारण. १२. भीष्म. १३. ही व पुढील गीति मिळून युग्मक आहे. जेथें दोन पद्यांचा अन्वय अलग करितां येत नसून, दोहोंचाही एकत्र करावा लागतो, तेव्हां त्या दोन्ही पद्यांस युग्मक म्हणतात. जो मत्पिता प्रतिदिन ही छलविवर्जितीं युद्धीं दहा सहस्र रथ शुद्धीं शरीं मारुनि, महेंद्रलोकाप्रति

प्रेषी, [1]महेंद्रलोकाप्रति, मारुनि, [2]मत्पिता शरीं [3]शुद्धीं; ॥ १३
[4]स्पष्ट च्छल करुनि शरीं [5]स्वपितामहभीष्ममूर्ति कशि खंडी ? ।
[6]अदय [7]अधर्मज्ञ विजय [8]गंगासुतमृत्युहेतु, न शिखंडी. ॥ १४
हें मज सतत स्मरतें, [9]म्हणउनि होतों क्षणक्षणीं कष्टी. ।
मज अंधाची हरिली, करुनि [10]च्छल, अर्जुनें बळें [11]यष्टी. ॥ १५
ज्या द्रोणाचार्यानें करुनि दया, पढविला धनुर्वेद, ।
धृष्टद्युम्नकरें त्या निजगुरुचा [12]करविला शिरच्छेद. ॥ १६
गुरुच्या वधार्थ बोले धर्मात्मा धर्म ही असत्य, [13]जुनी ।
[14]अवितथ-रुचि [15]प्रतिज्ञा उजउनि, गुरुभक्तिचा रस त्यजुनी. ॥ १७

---

प्रेषी, [ ती ] स्वपितामहभीष्ममूर्ति [ विजय ] स्पष्ट च्छल करुनि शरीं कशि खंडी ?–असा अन्वय. १४. रथी, रथावर बसून युद्ध करणारा. १५. धर्मयुद्धीं.

१. इंद्रलोकास, स्वर्गास. रणांत पडलेले वीर स्वर्गांत जातात, या प्रसिद्ध समजुतीस अनुसरून हें वर्णन आहे. २. माझा बाप; भीष्म. भीष्म हा खरोखर धृतराष्ट्राचा चुलता. धृतराष्ट्रपिता विचित्रवीर्य व भीष्म हे सावत्र भाऊ होत. ३. शुद्धीं शरीं म्हणजे ज्या शरप्रयोगांत कोणत्याही प्रकारची लबाडी नाहीं अशा. अर्जुनाप्रमाणें शिखंडीच्या किंवा कोणाच्या मागें लपून केलेल्या शरप्रहारांनीं नव्हे–असा भाव. ४. 'स्पष्ट' म्हणण्याचें कारण शिखंडीच्या मागें लपून अर्जुन भीष्मावर बाण सोडीत होता, हें भीष्महो जाणत होता, व बाकीच्या सर्व सैन्यासही तें माहीत होतें. ५. स्वपितामहभीष्ममूर्ति=आपला ( चुलत ) आजा जो भीष्म त्याची मूर्ति ( शरीर. ) [ मूर्ति=देह, शरीर. 'कायो देहः क्लीबपुंसोः स्त्रियां मूर्तिस्तनुस्तनूः' इत्यमरः. 'मूर्ति' शब्दाचा 'विष्णुशिवादिदेवांच्या प्रतिमा' असाही एक अर्थ आहे. या दोन अर्थांस घेऊन कवीनें प्रस्तुत स्थलीं श्लेष साधिला आहे. ] भीष्माला रूपकानें 'मूर्ति' म्हणजे देवप्रतिमा म्हटल्यानें त्याला खंडणारा म्हणजे फोडणारा अर्जुन झाला. मूर्ति फोडणारे अदय व अधर्मज्ञ यवनच होत हें उघड आहे. तेव्हां या श्लेषानें अर्जुन हा यवनासारखा होय, असें कवीनें मोठ्या खुबीनें सुचविलें आहे. ६. *गंगासुतमृत्युहेतु अदय अधर्मज्ञ विजय [ च होय; ] गंगासुतमृत्युहेतु शिखंडी न–असा अन्वय.* ७. अधर्मज्ञ म्हणण्याचें कारण अर्जुनानें भीष्मास अन्यायानें म्हणजे भीष्मानें बाण खालीं ठेविल्यानंतर मारिलें. ८. गंगा+सुत+मृत्यु+हेतु=सुरनदी+मुलगा+मरण+निमित्तकारण=गंगेचा मुलगा जो भीष्म त्याच्या मरणाचें निमित्तकारण. ९. म्हणून. १०. कपट, युद्धमर्यादास्खलन. ११. काठी. येथें 'लोकोक्ति' अलंकार आहे. १२. *'करविला' याचा कर्ता 'धर्मानें' हा अध्याहृत शब्द होय असें समजावें.* प्रायोपविष्टद्रोणाचा धृष्टद्युम्नानें शिरश्छेद केला होता, या द्रोणपर्वांतील कथानकास उद्देशून ही गीति आहे. १३. पूर्वींची, पुरातन. १४. असत्याची आवड ज्याला आहे असा. 'अविनयरुचि'

तें[१] आठवितां, होतें मन माजें शोकसागरीं मग्न. ।
आधि[२]नगतटीं, जाला धैर्यप्लव[३], आदळोनियां भग्न[४]. ॥ १८
ज्यांसम चतुर्विधास्त्रज्ञाता[५], नाहीं च, पुरुष लोकांत, ।

(=अविनयशील) असें पाठांतर. हें धर्मराजाचें विशेषण आहे. धर्मराजास हें विशेषण लावण्याचें कारण त्यानें गुरूला खोटी गोष्ट सांगितली. १५. ही प्रतिज्ञा कोणाची? धर्माची कीं द्रोणाची? असत्य बोलणार नाहीं, अशी धर्माची प्रतिज्ञा होती. द्रोण धर्माविषयीं म्हणतो, 'ठावी मज प्रतिज्ञा वत्साची सत्यशी लहानपणीं । बाळांत खेळतां तिळभरि चळला सत्यशील हा न पणीं ॥' [ मोरोपंतकृत द्रोणपर्व, अ० २१ गी० १७. ] द्रोणाचीही 'होइल जरि साधुमुखें सुमहदप्रिय श्रवण । योगबलें देहातें त्यजिन' ( मोरोपंतकृत भीष्मपर्व, अ० १ गी० ८६ ) अशी प्रतिज्ञा होती. पण ही द्रोणाची प्रतिज्ञा 'जुनी' होती असें म्हणतां येत नाहीं. कारण ती भारती युद्धाच्या प्रारंभींची होय. निदान त्या वेळीं ती धर्मास कळली होती. म्हणून 'जुनी' हें विशेषण 'प्रतिज्ञा' धर्माची असें म्हणण्यास बळकटी आणतें. पण दुसराही अर्थ करण्यास विशेष हरकत आहे असें नाहीं. आतां 'उजउनि' शब्द ह्या दोन्ही अर्थांस अनुकूल आहे कीं नाहीं हें पाहूं. 'उजउनि'=उजवुनि. या धातूचे 'शेवट करणें व शिताफीनें शेवटास नेणें' असे अर्थ आहेत. धर्माची प्रतिज्ञा मानिल्यास 'अवितथरुचि ( धर्म ) [ आपली ] प्रतिज्ञा उजउनि ( आपल्या प्रतिज्ञेचा शेवट करून, प्रतिज्ञाभंग करून )'-असा अर्थ. गुरूची प्रतिज्ञा मानल्यास 'प्रतिज्ञा उजउनि=गुरूची प्रतिज्ञा मोठ्या शिताफीनें शेवटास नेऊन, म्हणजे गुरूची अप्रियश्रवणानें मरण्याची जी प्रतिज्ञा तिच्याप्रमाणें त्यास मरावयास लावून.

१. धर्मराजानें खोटें सांगून गुरुवध करविला ही गोष्ट. २. मानसव्यथारूप पर्वताच्या कड्यावर. ३. धैर्यप्लव ( धैर्यरूप लहान नौका ) आधिनगतटीं ( मानसव्यथारूप पर्वताच्या कड्यावर ) आदळोनियां भग्न झाला ( फुटला )-असा सार्थान्वय. हें **परंपरित रूपकाचें** उदाहरण आहे. दोन रूपकें परस्पर सापेक्ष असून, कवीची रूप्य व रूपक यांच्या साधर्म्याकडे दृष्टि पोहोंचलेली नसली, ह्मणजे **'परंपरित रूपक'** झालें. येथें, जसें 'आधि' व 'नगतट' यांच्यामध्यें सांगण्यासारखें साधर्म्य नाहीं, तसेंच 'धैर्य' व 'प्लव' यांच्यामध्येंही नाहीं. हीं दोन्ही रूपकें केवळ परस्परांवर अवलंबून आहेत. 'यत्र चारोप एवारोपान्तरस्य निमित्तं तत्परंपरितम्' [ रसगंगाधर-पृ० २३४. ] जेथें एक **आरोप**च दुसऱ्या आरोपाचें कारण असतें, तेथें **परंपरितरूपकालंकार** होतो. प्रस्तुत उदाहरणांत 'धैर्या'वर 'प्लवा'चा आरोप व 'आधि' वर 'नगतटा'चा आरोप करून दुसऱ्याला पहिल्याचा भग्नहेतु केला आहे. ह्मणून हें **'परंपरित-रूपक'** झालें. ४. येथें धैर्यावर प्लवाचा आरोप केला आहे. प्लव=लहान होडी. अशा लहानशा होडीनें शोकसागर तरणें असंभवनीय आहे, व ती होडी देखील 'आधिनगतटीं फुटली' अशा रीतीनें एकापेक्षां एक अधिक संकटें प्राप्त झालीं, असें सांगण्याचा भाव. ५. चतुर्विधास्त्रें जाणणारा. दिव्यास्त्र ( ब्रह्मास्त्रादि ), गांधर्वास्त्र ( संमोहनादि ), मानुषास्त्र ( कंकपत्रादि ) व आसुरास्त्र ( नागगारुडादि ) हीं चतुर्विधास्त्रें होत.

त्यां भीष्मद्रोणांच्या जालों केवळ निमग्न शोकांत. ॥ १९
मथिलें [1]संशप्तकबल, जें दुःसह [2]दुर्निरीक्ष्य, [3]जिष्णूनें, ।
[4]स्वभुजप्रेरितचक्रें, [5]दितिदनुसुतसैन्य [6]जेंवि, विष्णूनें. ॥ २०
[7]द्रौणिप्रयुक्त, केवळ दुःसह, नारायणास्त्र, लोकां [8]जें, ।
तें हि [9]प्रतिहत केलें; करितो [10]हीं सिद्ध कृष्ण तो काजें. ॥ २१
नारायणास्त्र [11]वारुनि, [12]विजयें तो [13]द्रौणिवीर विप्र बळें ।
केला [14]प्रतिहततेजा, जेंवि नभीं राहुनें रवि प्रबळें. ॥ २२
[15]धैर्य नसेल चि उरलें, द्रोणशिर च्छेदितां, मनीं कांहीं, ।

---

१. संशप्तक ह्मणजे "ज्यानें युद्धांत मी अमुक योद्ध्यास मारीन; न मारीन तर, ज्या गतीस पंचमहापातकी जातात ती गति मला होईल, अशी शपथ घेतली तो". २. पहावयास अशक्य. ३. अर्जुनानें. ४. आपल्या हातानें शत्रूवर सोडिलेल्या सुदर्शन चक्रानें. ५. दैत्य-दानवसैन्य. दितीचे सुत ते दैत्य व दनूचे सुत ते दानव. दिति व दनु ह्या प्राचेतस दक्षाच्या मुली व कश्यपऋषीच्या स्त्रिया होत. ६. हा उपमालंकार होय. ७. अश्वत्थाम्यानें प्रेरिलेलें. ८. येथें पंतलिखित प्रतींत 'लोका जें' असा पाठ आहे. ९. भंगित, निरुपयोगी. 'प्रतिहत केलें' यास कर्ता 'कृष्णानें' असें समजावें. १०. हीं काजें ( असलीं महत्कार्यें ) कृष्ण ( नारायणास्त्रप्रतिहत करण्याची युक्ति पांडवांस शिकविणारा कृष्ण ) सिद्ध करितो. ११. द्रोणाचार्यास धृष्टद्युम्नानें मारिलें. तें अश्वत्थाम्यास सहन न होऊन त्यानें क्रोधेंकरून पांडव आणि त्यांची सेना, यांच्यावर नारायणास्त्र सोडिलें, त्या योगानें ते सर्व मरावेच, परंतु निःशस्त्र होऊन स्वस्थ बसल्यास, नारायणास्त्राचें बळ त्यावर चालत नाहीं, हें मर्म कृष्णास विदित होतें म्हणून, सर्व सेनेसहित पांडवांनीं, आपआपलीं शस्त्रास्त्रें भूमीवर ठेविल्यामुळें त्याचें अस्त्र व्यर्थ गेलें—ही कथा येथें प्रस्तुत अनुसंधेय आहे. ( पंतकृत द्रोणपर्व—अध्याय २३ ). १२. विजयें म्हणजे जयानें. जय प्राप्त झाल्यामुळें ( हेत्वर्थी तृतीया ); किंवा विजयें म्हणजे अर्जुनानें—( कर्तरी तृतीया ) असे दोन अर्थ संभवतात. परंतु नारायणास्त्र वारणारा केवळ अर्जुनच नसल्यामुळें दुसरा अर्थ विशेष ग्राह्य होणार नाहीं. १३. द्रोणाचार्यांचा पुत्र अश्वत्थामा नामक वीर. १४. प्रतिहत ( पराजित ) झालें आहे तेज ज्याचें असा. हें विशेषण 'विप्र' व 'रवि' या दोनही शब्दांस सामान्य आहे. अन्वय—नारायणास्त्र वारुनि [ पांडवांनीं ] तो द्रौणिवीर विप्र बळें ( अधिक बलानें ) [ व ] विजयें ( जयानें; जय मिळाल्यानें ) प्रतिहततेजा केला; [ कसा तर ] जेंवि नभीं ( आकाशांत ) राहुनें ( छायाग्रहविशेषानें ) प्रबळें ( अत्यंत सामर्थ्यानें ) रवि [ प्रतिहततेजा केला ]. १५. [ पांडवांनीं ] द्रोणशिर च्छेदितां [ व ] अनी कांहीं ( सैन्यांनीं ) पांडवभयें ( पांडवांच्या भीतीनें ) रणीं पलायन वरिलें असतां [ माझ्या पुत्रांच्या ] मनीं कांहीं धैर्य उरलें नसेल चि—असा अन्वय.

पांडवभयें, पलायन वरिलें असतां, रणीं अनीकाहीं[1]. ॥ २३
नौका फुटतां बुडती[2] जेंवि समुद्रीं, तदाश्रित[3] क्षिप्रें[4], ।
वाटे[5] शोकीं माजे[6] सर्व बुडाले चि, मारितां विप्रें. ॥ २४
दुर्योधन, कृतवर्मा[8], कर्ण, कृप, द्रौणि[7], शल्य, जे असती ।
माझे सुत ही[9], ज्यांची[10] मति, सोडी ना दुराग्रहा, अ-सती[11], ॥ २५
त्यांचा तेव्हां कैसा झाला मुखवर्ण ? संजया ! सांगें. ।
प्रज्ञाचक्षु[12] दिलें तुज मुनिनें[13]; असती हि तूं रणीं आंगें[14]. ॥ २६

---

१. सैन्यांहीं. २. 'बुडतां' असाही पाठ आहे. ३. तिचा आश्रय करून राहिलेले, नावेंत बसलेले लोक. ४. त्वरित. ५. 'वाटे' या शब्दानें येथें उत्प्रेक्षालंकार झाला असें वाटण्याचा संभव आहे. पण असें समजूं नये. कारण उत्प्रेक्षेंत आरोप अनिश्चितपणें केलेला पाहिजे. प्रस्तुत स्थलीं 'वाटे' शब्दानें संशय दाखविला आहे असें नाहीं, पण उलट खात्रीच दाखविलेली आहे असें म्हणतां येईल. या गीतींत फक्त **उपमा**लंकार आहे. प्रस्तुत गीतींत 'नौका' व 'विप्र,' 'तदाश्रित' व 'माझे सर्व,' 'समुद्र' व 'शोक' यांत उपमानोपमेय भाव व 'बुडणें' (एकत्र जलांतर्गत होणें व अन्यत्र सर्वत्र नाश पावणें या क्रियापदानें सामान्य धर्म) दाखविला आहे. हें **पूर्णोपमे**चें उदाहरण आहे. कारण पूर्णोपमेस आवश्यक अशा चार गोष्टी, उपमेय, उपमान, उपमावाचक शब्द आणि साधारण धर्म, त्या प्रस्तुत गीतींत उपस्थित आहेत. ६. माजे=माझे, दुर्योधनादि पुत्र. 'माझे सर्व बुडाले' असें पाठांतर. ७. द्रोण. ८. हा यादवकुळांतील एक वीर. भारती युद्धांत एक अक्षौहिणी सैन्यासह यास बळरामानें दुर्योधनाकडे साहाय्यास दिलें होतें. भारती युद्ध समाप्त झाल्यावर दुर्योधनाकडील जे तीन वीर वांचले होते, त्यांत हा एक होता. ९. दुर्योधनेतर दुःशासनादि पुत्र. १०. ह्या व पुढील गीतीचा अन्वय मिळून असल्यामुळें हें युग्मक होय. सार्थान्वयः—संजया ! ज्यांची असती मति दुराग्रहा सोडी ना [ असे ] जे दुर्योधन, कृतवर्मा, कर्ण, द्रौणि, शल्य [ व इतर ] माझे सुत ही असती, त्यांचा तेव्हां (द्रोणवधसमयीं) मुखवर्ण (तोंडावरील तेज–मुखावर दिसणारे मनांतील विकार) कैसा झाला ? (त्यांच्या तोंडावर दुःखचिन्हें दिसत होतीं किंवा नाहीं, दिसत असल्यास ते फार दुःखी–कष्टी दिसत होते कीं काय ? हें) सांगें (सांग.) [ मुखवर्ण कैसा झाला हें तुलाच विचारण्याचें कारण ] तुज मुनिनें (व्यासानें) प्रज्ञाचक्षु (दिव्यदृष्टि) दिलें, [ व ] तूं रणीं आंगें (स्वशरीरानें; स्वयें; प्रत्यक्ष) असती हि.—असा अन्वय. ११. असत्य; अयोग्य; दुष्ट. हें मतीचें विशेषण आहे. येथें 'असती' असा शब्द घालून दुर्योधनादिकांची मती, 'असती' म्हणजे असभ्य स्त्री, व्यभिचारिणीप्रमाणेंच अत्यंत निंद्य होय, असें ध्वनित केलें आहे. येथील यमक हें पंतांच्या आवडत्या अनेक यमकांपैकीं एक आहे. १२. दिव्यज्ञाननेत्र. चक्षु हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आहे. १३. व्यासानें. व्यासानें संजयास सर्वद्रष्टृत्व दिल्याचा उल्लेख भीष्मपर्वाच्या पहिल्या अध्यायांत आहे. १४. जातीनें, स्वतः.

सूत म्हणे, 'गा राया ! तव [1]अपराधद्रुमासि जें आलें ।
[2]कौरववृत्तफल, तुला द्याया, आलों; सुपक्क कीं जालें. ॥ २७
सावध हो, धीर धरीं; [3]होणार प्राप्त जें, जया काळीं, ।
सुखदुःख घडे; [4]विधिनें लिहिलें पहिलें च कीं असे भाळीं. ॥ २८
[5]सुखदुःखप्राप्तीनें, कवि हर्षविषादलेश न धरीती; ।
[6]वर्षावर्षीं, जेंवि न वृद्धिक्षय [7]सिंधु; हे चि बुधरीती.' ॥ २९
भूप म्हणे, '[8]चित्तकरीं धरिली [9]बुधरीतियष्टि मी अंधें, ।
म्हणुन चि [10]वागें, परि मन मोहे, बा ! [11]पुत्रमोहविषगंधें.' ॥ ३०

---

१. अपराधरूपी वृक्षास. २. कौरवांचा वृत्तांत हेंच फल. हें **परंपरित रूपकाचें** फारच सुरेख उदाहरण आहे. धृतराष्ट्रानें आपल्या पुत्रांस शिक्षा न केल्याचा जो अपराध त्यावर वृक्षाचा आरोप केला, त्या अपराधामुळें कौरवांचें ( दुर्योधनादिकांचें ) जें दुराचरण त्यावर त्या झाडाच्या फलाचा आरोप केला व त्या दुराचरणामुळें लढाई सुरू होऊन कर्णवधापर्यंत दुर्योधनास जी दशा प्राप्त झाली तिच्यावर फलाच्या सुपक्कदशेचा आरोप केला आहे. हे सर्व आरोप परस्परावलंबी आहेत, म्हणून हा **परंपरितरूपका**लंकार होय. धृतराष्ट्राच्या मूर्खपणाबद्दल हा किती खुबीदार टोला आहे व एका दोषामुळें कसे परंपरित अनर्थ होतात हें किती खुबीदार रीतीनें सांगितलें आहे, हें वाचकांनीं पहावें. हें रूपक पंतांचेंच आहे. **व्यासांचें** नव्हे, ३. जें सुख [ व जें ] दुःख जया ( ज्या ) काळीं प्राप्त होणार ( प्राप्त व्हावयाचें ठरलें आहे, ) [ त्याच काळीं तें सुख व दुःख ] घडे; कीं ( कारण ) विधिनें ( ब्रह्मदेवानें किंवा दैवानें ) [ असें असें घडणार म्हणून ] पहिलें च ( अगोदरच; मनुष्याच्या जन्माच्या पूर्वींच ) *भाळीं ( कपाळीं )* लिहिलें असे. 'होणार' शब्दापासून ही सर्व गीति व पुढची गीति ह्या उत्तम सुभाषितरूप होत. ४. विधि=ब्रह्मदेव, दैव. ५. सुखप्राप्तीनें हर्षलेश न धरीती व दुःखप्राप्तीनें विषादलेश न धरीती. 'सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ' अशी वृत्ति धारण करितात. ६. वर्ष+अवर्ष=वृष्टि झाली अथवा न झाली असतां. ७. सिंधु ( समुद्र ) जेंवि ज्याप्रमाणें ) वर्षावर्षीं ( पाऊस पडो किंवा पाऊस न पडो ) वृद्धिक्षय [ न पावे ] ( अधिक होत नाहीं किंवा कमी होत नाहीं ). ८. चित्तरूप हस्तांत. ९. बुध+रीति+यष्टि=शहाणे+रीत+काठी. धैर्यावलंबन करून सुखदुःखांत हर्षविषाद न धरण्याची जी शहाण्यांची रीत तीच काठी. प्रस्तुत गीतींत 'चित्तकरीं' व 'बुधरीतियष्टि' अशीं परस्परावलंबी रूपकें असल्यामुळें हें **परंपरितरूपक** आहे. अशा रीतीनें या पहिल्या अध्यायांत **परंपरितरूपका**चीं सुरेख अशीं चार उदाहरणें आहेत. पैकीं तीन सर्वस्वीं पंतांचीं आहेत. एवं मूळापेक्षांही अधिक सुंदर अलंकारांनीं आपल्या काव्यास भूषविणाऱ्या कवीस केवळ भाषांतरकार किंवा यमक्या म्हणणारा साहित्यज्ञानशून्यच असला पाहिजे. १०. भ्रम पावे. ११. पुत्रप्रेमरूप विषाच्या वासानें ( दर्पानें ).

## अध्याय दुसरा.

संजय म्हणे, 'नृपाळा ! परिसावें युद्धवृत्त. जैं[1] द्रोण ।
धृष्टद्युम्नें वधिला, तेव्हां भ्याला न वीर तो कोणें[2] ? ॥ १
पळती बळें समस्तें, हरि[3]पासुनि मृगकुळें[4] जसीं भीती; ।
त्यांतें मागें फिरवी दुर्योधनभूप, सांगुनी नीती. ॥ २
'ऐका हो ! वीर तुम्हीं, मी तुमच्या भुजबलाश्रयें[5] शुद्ध[6] ।
यश जोडाया, कुंतीपुत्रांसीं[7] मांडिलें महायुद्ध. ॥ ३
दिसतां विषण्ण[8] सर्व द्रोणवधीं. मरति[9] वीर युद्धांत; ।
फल[10] जय कीं वध होणें, हा निश्चय निश्चल प्रबुद्धांत[11]. ॥ ४
द्रोणवधें रिपु[12] मानिति जय, मानूं द्या; न[13] चित्र हें; तो[14] ही ।
क्षणमात्र चि; कीं[15] पावति न जयातें सर्वथा गुरुद्रोही. ॥ ५

---

१. जेव्हां. २. भ्याला नाहीं असा कोणता वीर होता ? म्हणजे भ्याला नाहीं असा एकही वीर नव्हता, सर्व भ्याले–असा भाव. हा **प्रश्नालंकार** आहे. बोलणारा जेव्हां एकाद्या गोष्टीबद्दल बाह्यात्कारीं प्रश्न करितो, परंतु ती गोष्ट कशी आहे ह्याविषयीं त्याला शंका नसून उलट पक्की खातरी असते, तेव्हां प्रश्नालंकार होतो. ३. सिंहापासून. ४. हरिणांचा कळप. ५. बाहुबलाच्या आश्रयानें; तुमच्या बाहुबलाच्या जोरावर. ६. निर्मळ ( यश ). ७. पांडवांशीं. येथें 'कुंतीपुत्र' हा शब्द साभिप्राय आहे. 'पांडुपुत्र' असें न म्हणतां 'एका अनाथ विधवेचे मुलगे' असें म्हणून, त्यांच्याविषयीं दुर्योधनानें तुच्छता व तिरस्कार दर्शविला आहे. ८. उदास, उत्साहरहित. ९. वीर *युद्धांत मरतात यांत काय आश्चर्य ? एक वीर युद्धांत मेला* म्हणून तुम्ही असे कां भितां ? १०. [ युद्धांत ] फल, जय होणें कीं ( किंवा ) वध ( होणें ) प्रबुद्धांत ( शहाण्या वीरांत ) हा निश्चय ( मरेन किंवा मारीन असा निश्चय ) निश्चल ( अढळ ) [ असतो ]. असा शहाण्यांचा नियम असतां गुरुवधानंतर तुम्ही भिऊन कां पळतां ? प्रबुद्धांच्या या नियमास कां सोडितां ? असा दुर्योधनाच्या म्हणण्याचा भाव. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ११. ज्ञात्यांत. हेंच ध्येय शिवाजीराजे यांनीं आत्मसात केलें होतें, व म्हणूनच ते स्वराज्य स्थापूं शकले. महाराजांवर अफझुलखान चालून आला त्या वेळीं, 'सर्वांनीं निवारिलें कीं झुंज देऊं नये. सला करावा.' त्यावर महाराजांनीं रोखठोक उत्तर दिलें, कीं 'सला केलियानें प्राणनाश होईल. युद्ध केलियानें जय जाहालियास उत्तम. प्राण गेलियास कीर्ति आहे ?' ह्या महाराजांच्या खंबीर मनोवृत्तीचें येथें स्मरण होतें. १२. शत्रु ( पांडव ). १३. यांत कांहीं आश्चर्य नाहीं, क्षणभंगुर जयानें फुगून जाणें स्वाभाविक आहे. १४. तो जय देखील. १५. कारण. कीं ( कारण ) गुरुद्रोही ( गुरूचा द्रोह करणारे ) सर्वथा ( कोणत्याही रीतीनें )

युद्ध करील महात्मा कर्ण, पहा हो ! तुम्हीं [१]कुतूहल तें. ।
विसरेल दुःख तुमचें मन, जें द्रोण सरोनि हळहळतें. ॥ ६
[२]रामप्रसादलब्धें दिव्यास्त्रें योजितां चि, [३]अंगेना ।
पाहों न शकेल चि; [४]परबळ—करिकुळ [५]हरिसमक्ष [६]भंगेना ? ॥ ७
युद्धीं सदा हि ज्या [७]नरसिंहाचा, [८]पार्थमृग धरि, त्रास, ।
परिसा त्याच्या, [९]रिपुमदमहिषमहाशक्तिच्या चरित्रास. ॥ ८

---

जयातें न पावति. गुरुवध अन्यायानें करणाऱ्यांस जय कधींच मिळूं शकत नाहीं. हा **अर्थांतरन्यास** अलंकार होय.

१. कौतुक. २. **रा**माच्या ( **प**रशुरामाच्या ) प्रसादानें मिळालेलीं. **क**र्ण हा **प**रशुरामाचा शिष्य होय, या गोष्टीस अनुलक्षून हें वर्णन आहे. ३. अंग+इन=अंगदेशाचा राजा कर्ण जो त्यास. ४. पर+बल+करि+कुल=शत्रु+सैन्य+हत्ती+कळप=शत्रुसैन्यरूपी हत्तींचा कळप. ५. सिंहापुढें. ( पक्षीं ) कृष्णासमक्ष. ( अध्याय १ गीति २ मध्यें 'हरिच्या दृष्टिपुढें' असें म्हटलें आहे ). ६. भंगतें ना ? पराभव पावतें ना ? येथें 'ना' हा प्रश्नदर्शक प्रत्यय आहे. भंगतें चि-**पंत.** हरिसमक्ष (सिंहापुढें) परबलकरिकुल ( शत्रुसैन्यरूपी करींचा समुदाय ) भंगेना ? ( पराभव पावत नाहीं काय ? ). पराभूत होईलच-असा भाव. या लहानशा वाक्यांत **परंपरितरूपक, प्रश्न** व **प्रतिवस्तूपमा** असे तीन अलंकार साधिले आहेत. परबळावर करिकुलाचा आरोप व तस्मात् त्यास पराजित करणाऱ्यावर हरीचा आरोप. हे दोन आरोप सापेक्ष आहेत म्हणून **परंपरितरूपक.** माहिती असूनही प्रश्न विचारला आहे म्हणून **प्रश्नालंकार.** 'करिकुल हरिसमक्ष भंगेना(' हें वाक्य 'उपमान' आहे व गीतीचा बाकीचा भाग 'उपमेय' आहे. या दोन स्वतंत्र वाक्यांमध्यें 'भंगेना ?' आणि 'पाहों न शकेलचि' या शब्दांतरानें एकाच ( समान ) धर्माचें अभिधान झालें आहे. म्हणजे वस्तुप्रतिवस्तुभाव प्रकट झाला आहे. म्हणून ही **प्रतिवस्तूपमा.** ह्या अलंकाराचें लक्षणः—'उपमानोपमेयार्थौ पृथग्वाक्यद्वये यदि । सामान्येन विनिर्दिष्टौ प्रतिवस्तूपमा मता. ॥' [ मंदारमरंदचंपू ]. जेथें उपमानवाक्यांत आणि उपमेयवाक्यांत एकाच सामान्य धर्माचें कथन शब्दभेदानें ( कचित् त्याच शब्दानें ) केलें असतें, तेथें **प्रतिवस्तूपमा** होते. येथें 'पाहों न शकेलचि परबळ; करिकुळ हरिसमक्ष भंगेना' असा पाठ स्वीकारिला, तरी अर्थहानी होत नाहीं. ७. नर ( मनुष्य ) रूपी सिंहाचा; ( पक्षीं ) **वि**ष्णूच्या अवतारांतील **ना**रसिंहावतारासारख्याचा. त्रास=भय, भीति. ८. **अ**र्जुनरूपी मृग. हेंही **परंपरितरूपका**चेंच उदाहरण आहे. ९. रिपु+मद+महिष+महाशक्तिच्या=शत्रु+गर्व+असुरविशेष+मोठी देवी=शत्रूच्या मदरूप **म**हिषाविषयीं केवळ **म**हाशक्ति ( **भ**वानी ) तिच्या. महिषासुरास मारणाऱ्या **म**हिषासुरमर्दिनीची कथा येथें अनुसंधेय आहे. प्रस्तुत एका सामासिकपदांत कवीनें दोन सापेक्ष सुरेख **रूपकें** आणून **परंपरितरूपक** साधिलें आहे. **क**र्णावर केलेला आदिशक्तीचा आरोप फार प्रौढ असून प्रस्तुत स्थलींच्या वीररसास उद्दीपक आहे. या गीतीचें उत्तरार्ध सर्वस्वी **पं**तांचेंच आहे.

[1]मानुषयुद्धें चि, [2]गजायुतबल [3]खलभीम [4]त्यां अवस्थेला ।
[5]जेणें, सेनापति गुरु [6]असतां, समरांगणीं [7]क्षणीं [8]नेला. ॥ ९
[9]दिव्यास्त्रज्ञ घटोत्कच, अतिशूर, [10]क्रूरभाव, [11]मायावी ।
[12]जेणें वधिला, [13]वासवशक्तीनें, [14]जीस न [15]क्षमा यावी; ॥ १०
त्या या कर्णाचें भुजबल, [16]खलबल[17]जलधिमाजि देखाल; ।
मग, [18]संक्षुब्धौर्वानलदर्शन झालें, [19]असें चि लेखाल. ॥ ११

---

१. 'मानुषेणैव युद्धेन' असें मूळांत आहे. 'मानषयुद्धें'चि असें म्हणण्याचें कारण कर्णानें भीमास जें जिंकिलें, तें दुसऱ्या एखाद्या अस्वाभाविक सामर्थ्यानें नव्हे, तर स्वाभाविक ऐहिक शारीरिक शक्तीनेंच जिंकिलें, असें दाखविणें होय. कर्ण भीमासारखाच बलवान होता, हें येथें दाखवून तो दिव्यास्त्रज्ञही आहे, असें पुढें दाखविलें आहे. देवादिकांचें साहाय्य नसतांही कर्ण भीमादिकांस जिंकण्यास समर्थ आहे, हा सांगण्याचा उद्देश. २. दहा हजार हत्तींची शक्ति आहे ज्याला. ३. दुर्जन जो भीम. ४. सर्वांस माहित असलेल्या, सर्वांनीं पाहिलेल्या (पराजित) दुरवस्थेला–असा भाव. 'तामवस्थां' असेंच मुळांत आहे. ५. ज्या कर्णानें. ६. भीमाची दुर्दशा कर्णानें सैंधववधाच्या दिवशीं म्हणजे द्रोणच सैन्याधिप असतांना केली होती. ७. क्षणांत, विशेष श्रमाशिवाय. ८. अवस्थेला नेला म्हणजे तशी अवस्था प्राप्त करून दिली. ९. दिव्यास्त्रज्ञ म्हणजे उत्तम (अलौकिक) असें अस्त्र जाणता–हा अर्थ तर आहेच, पण 'दिव्यास्त्रज्ञ' म्हणजे आकाशसंबंधी अस्त्रें जाणणारा. घटोत्कच (भीमपुत्र) हा राक्षस असल्यामुळें नेहमीं आकाशांत उडून तेथूनच युद्ध करीत असे. १०. क्रूर (दयारहित) भाव (उद्देश) ज्याचा असा, क्रूर स्वभावाचा. ११. कपटी. १२. ज्या कर्णानें. १३. इंद्रानें दिलेल्या शक्तिनामक अस्त्रानें. कवचकुंडलें मागण्यास आलेल्या इंद्रापासून कर्णानें अमोघ शक्ति मागून घेतली, ही कथा [मोरोपंतकृत महाभारत वनपर्व अ० १४ पहा] येथें अनुसंधेय आहे. १४. जीस (ज्या वासवशक्तीस) क्षमा [दया] न यावी (येत नव्हती) अशी. ज्याच्यावर त्या शक्तीचा प्रयोग केला, त्याच्यावर मुळींच दया न करितां व न चुकतां त्याला मारण्याचाच जिचा स्वभाव अशी. १५. दया. १६. खल+बल+जलधिमाजि=दुष्ट+सैन्य+समुद्रांत=दुष्ट जे पांडव त्यांच्या सैन्यरूपी समुद्रांत. येथें खलबलास जलधि म्हणण्याचें कारण पुढें कर्णभुजबलाला 'संक्षुब्धौर्वानल' म्हणावयाचें आहे. १७. या गीत्यर्धांत 'बल–खल–बल–जल' अशी लकाराची आवृत्ति झाल्यामुळें हा **वृत्त्यनुप्रास** नामक शब्दालंकार होय. १८. फार क्षोभलेल्या समुद्राच्या वडवानलाचें दर्शन. १९. या गीतीच्या या उत्तरार्धांत '**निदर्शना**' अलंकार समजावा. 'कर्णाचें भुजबल देखील' 'संक्षुब्धौर्वानल **असें** चि लेखाल' या दोन उपमानोपमेयक वाक्यांत 'असेंचि' पदानें ऐक्य (अभेद) वर्णिल्यामुळें हा **निदर्शना**लंकार. तल्लक्षणः—'वाक्यार्थयोः सदृशयोरैक्यारोपो निदर्शना' [कुवलयानंद]. म्हणजे सदृश वाक्यार्थांत जेव्हां अभेद वर्णिला असतो, तेव्हां **निदर्शना**लंकार होतो. लेखाल=समजाल, मानाल.

करितां विक्रम[1], कर्णद्रौणी दिसतील विष्णुवासवसे.[2] ।
यांच्या ठायीं, चापश्रुति[3] करुनि प्रकट वैभवास वसे. ॥ १२
भीष्मद्रोणवधजयें झाला मद[4] पांडवांसि, तो योंचा[5] ।
विक्रम करिल क्षीण, ग्रीष्म[6] जसा लघुतडागतोयांचा.[7][8] ॥ १३
त्या[9] कुंतीपुत्रांच्या, अति दक्ष तुम्हीं असां सखे, दमना. ।
तुमच्या विजयिभुजबळें[10] न गुरुव्यसनीं[11] हि मीं स-खेदं[12]-मना.' ॥ १४
ऐसें निजवीरांचें करुनि समाधान, सादरें चित्तें, ।
दुर्योधनें स्वसेनापति केला कर्ण, वांटिलीं वित्तें.[13] ॥ १५
मग सेनापति[14] सृंजय[15]पांचाळ[16]विदेह[17]केकयांत[18] रणीं ।

---

१. पराक्रम. २. विष्णु व इंद्र यांसारखे. ३. धनुर्वेद. चापश्रुति (धनुर्वेद) यांच्या (कर्णद्रौणींच्या) ठायीं वैभवास प्रकट करुनि वसे—म्हणजे त्यांनीं आपली धनुर्विद्या अनेक वेळां अत्यंत उत्कर्षयुक्त प्रकट करून दाखविली. येथें 'त्यांच्या ठायीं' असा पाठ असणें इष्ट होतें. ४. गर्व. ५. कर्ण व अश्वत्थामा यांचा. ६. उष्णकाळ, उन्हाळा. ७. लहान तलावांतील पाण्याचा. ८. पाण्यांचा. येथील अनेकवचनी प्रयोग व्याकरण–कारांस उपयुक्त होईल. ९. त्या (मदयुक्त) कुंतीपुत्रांच्या (पांडवांच्या) दमना तुम्हीं [माझे] सखे (मित्र) अति दक्ष असां (फार दक्ष आहांत). १०. जय पावणाऱ्या हातांच्या बलानें. ११. गुरुव्यसनीं हि=महत् संकटांत असतांही, किंवा गुरुमरणामुळें (द्रोणाचार्य मेल्यामुळें) प्राप्त झालेल्या संकटांत असून देखील. १२. ज्याचें मन दुःखित आहे असा. १३. द्रव्यें. कर्णाला सर्वसैन्याधिपत्य देण्याच्या वेळीं जो समारंभ झाला, त्यांतील उत्सवानिमित्त दुर्योधनानें दानधर्म केला—असा 'वांटिलीं वित्तें' याचा अर्थ आहे. १४. कर्ण. मग (सेनाधिपत्य मिळाल्यावर) सेनापति (कर्ण) रणीं सृंजयपांचाळविदेहकेकयांत (या प्रख्यात वीरांच्या सैन्यांत) मृगांत हरिसा (हरिणांच्या कळपांत शिरलेल्या सिंहाप्रमाणें), कीं दिवसांधासि तरणी भेटला (जणों काय घुबडांस सूर्य येऊन भेटला अशाप्रमाणें) शिरला—असा अन्वय. १५. या समासांतील एक 'सृंजय' शिवाय सर्व शब्द त्या त्या देशांचे, तेथील राजांचे व तेथील लोकांचे वाचक होत. येथें 'सृंजय' शब्दासह त्या सर्व शब्दांचा अर्थ ते ते राजे व त्यांचे सैनिक असा घ्यावयाचा. सृंजय देश ऐकून माहीत नाहीं. सृंजयनामक राजा मात्र पांडवांकडे भारती युद्धांत होता. १६. पांचालकुलोत्पन्न द्रुपद, धृष्टद्युम्न इत्यादि राजे. या कुलास व देशास पांचाल असें नांव पडण्याचें कारणः— "पूरुवशीय भद्राश्व राजास मुद्गल, यवीनर, बृहदिष्णु, कांपिल्य आणि सृंजय असे पांच पुत्र त्याच्याचप्रमाणें पराक्रमी होते. त्यामुळें हा संतोषानें असें म्हणे कीं, माझें राज्य संरक्षण करण्यास हे, पंच (पांच) पुत्र अलं (पुरेत) म्हणून त्या पांचांस, त्यांच्या देशास, व वंशास, 'पांचाल' असें नांव पडलें होतें." (भा० व० अ० २१.) १७. या वंशास 'विदेह' असें नांव

शिरला, मृगांत हरिसा, कीं दिवेसांधासि भेटला तरणी. ॥ १६

अद्भुतकर्णशरासनघनजनितामितविशुद्धशरधारा ।
तापविती, कांपविती, निर्मिति तटिनी जपासुमाकारा. ॥ १७

पांडवपांचाळबळें पीडुनि, बहुलक्ष वीर तो मारी. ।
परि विजयबाहु राहु चि विजयी, कीं पूर्ण कर्णसोमारी. ॥ १८

---

पटण्याचे कारणः–"सूर्यवंशीय निमिराजा वसिष्ठशापानें मरण पावल्यावर, त्यानें पुनः देह स्वीकारला नाहीं, म्हणून त्याच्या मिथिपुत्रापासून सर्व वंशास हें नांव पडलें." १८. केकय देशाधिप व त्याचें सैन्य. केकय देश "आग्नेय कोसलाच्या उत्तरेस असावा. पांडवांच्या वेळेस तेथील राजा धृष्टकेतु होता."

१. हा दृष्टांत पंतांचाच आहे; व्यासांचा नाहीं. २. घुबडांस. घुबडांस दिवसा दिसत नाहीं, हें सर्वप्रसिद्ध आहे. ३. सूर्य. ४. अद्भुत+कर्ण+शरासन+घन+जनित+अमित+विशुद्ध+शर+धारा=आश्चर्यजनक+कर्ण+धनुष्य+मेघ+उत्पन्न झालेल्या+अगणित+स्वच्छ (दोषविमुक्त)+बाण+धारा. कर्णधनुष्यरूप मेघापासून उत्पन्न झालेल्या अगणित, अतिस्वच्छ (किंवा न्याययुद्धांत प्रयुक्त असल्यामुळें सर्वदोषरहित) बाणरूप अत्यद्भुत धारा (पाऊस)–असा अर्थ. हें गीत्यर्ध एकच सामासिक शब्द आहे. असले लांब लांब समास पंतांच्या काव्यांत विपुल आहेत. प्रस्तुत समास जरी फार लांब आहे, तरी अर्थ समजण्यास विशेष कठीण आहे असें नाहीं. प्रस्तुत स्थलीं वीररस वर्णित असल्यामुळें दीर्घ समास, लहान लहान शब्दांपेक्षां, त्यास विशेष पोषक होत. म्हणून दीर्घ समास योजण्यांत पंतांनीं चातुर्य दाखविलें आहे, असेंच म्हटलें पाहिजे. प्रस्तुत समासांत **परंपरित–रूपकालंकार** झाला आहे. कारण यांत सापेक्ष अशीं दोन रूपकें आहेत. ५. 'तापविती' 'कांपविती' 'निर्मिति' या सर्व क्रियांस पूर्वार्धातील लांब सामासिक शब्दच कर्ता असल्यामुळें हा **'कारकदीपक'** अलंकार होय. कर्ता एक असून त्याचा संबंध अनेक क्रियांशीं असतो, तेव्हां **'कारकदीपक'** अलंकार होतो. येथील क्रियापदांचा अनुक्रम 'निर्मिति,' 'तापविति' व 'कांपविति' असा असावयास पाहिजे होता. ६. नदी. 'जपासुमाकारा' यांतील 'आकार' शब्दाचा अर्थ 'वर्ण' असा समजावा. ही शब्दयोजना सदोषच होय. ७. जासवंदीच्या फुलासारखी (लाल रक्ताची नदी). ही जी गीति आहे, तिला मुळांत फारच थोडा आधार आहे. 'त्याच्या शतशः इषुधारा भ्रमरपंक्तीप्रमाणें शोभल्या' या मूळच्या वाक्यावर पंतांनीं ही गीति रचिली आहे. मुळांतली एक कल्पना घेऊन ती इतक्या प्रौढ रीतीनें मुळापेक्षांही उन्नत करून दाखविणाऱ्या कवीस केवळ भाषांतरकार म्हणतां येत नाहीं; महान् कवीच म्हटले पाहिजे. ८. कर्ण. ९. परि विजयबाहु विजयी राहु चि [होय], कीं (कारण) तो पूर्ण कर्णसोमारी (कर्णरूपी पूर्णचंद्राला ग्रासणारा) [झाला]. पूर्ण=पौर्णिमेचा. हें गीत्यर्ध रा० पराडकर यांच्या प्रतींत पुढीलप्रमाणें लिहिलें आहेः–परि विजयबाहुराहुचि विजयी, कीं पूर्ण कर्णसोमारी. हा पाठ स्वीकारिल्यास परि (परंतु) पूर्ण (पूर्णपणें) कर्णसोमारी (कर्णरूप चंद्राचा शत्रु) [जो] विजयबाहुराहु चि (अर्जुनहस्तरूप राहूच) विजयी [झाला] कीं (निश्चितार्थ)–असा अन्वयार्थ. येथें **परंपरितरूपक** झालें आहे. हा अलंकार पंतांचाच आहे. १०. कर्णचंद्राचा अरी.

अतुल[1] पराक्रम केला[2]; परि वधिला अर्जुनें रणीं कर्ण. ।
मी आलों, या वृत्तें संतप्त करावया, तुझे कर्ण[3]. ॥ १९

---

## अध्याय तिसरा[4].

कर्णक्षयवार्ताविषधारा[5] कर्णीं जया क्षणीं पडली[6], ।
त्या च क्षणीं क्षितितळीं क्षितिपतनु[7] हि, काळजी मनीं जडली. ॥ १
राजा मूर्च्छित पडतां गांधारीसह तिच्या सुना रडती, ।
उररीकृतशोकभरा[8], कुररीशा[9], एकदा[10] चि आरडती. ॥ २
त्या भारतस्त्रियांतें[11] समजावी संजय प्रयासानें. ।
त्यांच्या त्या व्यसनाहुनि, भासे मृतिदुःख[12] ही तया सानें[13]. ॥ ३
शिंपुनि शीतल[14] सलिलें[14], सुखशीतव्यजनवायुनें[15], विदुरें ।
राजा सावध केला, जो हत[16] शोकाभिधें[17] महाभिदुरें[18]. ॥ ४
जेव्हां सावध होउनि, नृप परिसे निजवधू-विलाप-रवा[19] ।
चित्तीं म्हणे, 'अहा ! म्यां मूढें संसार मानिला बरवा[20].' ॥ ५

---

१. अप्रतिम. २. 'केला' यास कर्ता 'कर्णानें' अध्याहृत. ३. कान. ही १९ वी गीति पंतांचीच आहे. येथें मुळांतील तिसरा अध्याय संपला. ४. यांत मूळांतील चौथा व पांचवा असे दोन अध्याय पंतांनीं आणिले आहेत. ५. कर्ण+क्षय+वार्ता+विष+धारा=कर्ण+नाश+खबर+विष+धारा=कर्ण मेल्याची जी बातमी तीच विषधारा. वार्तेला विष म्हणण्याचें कारण विष कानांत गेल्यामुळें मनुष्य जसा मरतो, किंवा मूर्च्छित होऊन पडतो, तसाच धृतराष्ट्र या दुष्टवार्ताश्रवणानें मूर्च्छित झाला. ६. 'पडली' याचा संबंध 'विषधारा' व 'क्षितिपतनुहि' या दोन्ही शब्दांशीं आहे. ७. राजाधृतराष्ट्राचें शरीर. या ओळींत 'क्ष'चा असकृत् उच्चार झाल्यामुळें हा **छेकानुप्रास** होय. ८. अंगीकृत आहे शोकाचा भार ज्यांनीं. ९. कुररीनामक पक्षिणीप्रमाणें. ही उपमा पंतांचीच आहे. १०. एकदम, एकसमयावच्छेदेंकरून. ११. भरताच्या कुलांतील स्त्रियांस; कौरवांच्या बायकांस. १२. मरणाचेंही दुःख. संजयास त्या स्त्रियांवर आलेल्या संकटामुळें फार वाईट वाटलें. इतकें कीं, त्याच्या मरणसमयीं देखील त्यास इतकें वाईट वाटलें नसतें. गीतीचें हें उत्तरार्ध पंतांचेंच आहे. १३. लहान, थोडें. १४. थंड पाण्यानें. शीतल सलिलें शिंपुन—असा अन्वय केला तरी अर्थहानि होत नाहीं. 'सलिलें' हा अनेकवचनी प्रयोग समजावा (मागें गीति १३ वरील टीपा पहा). सलिल=जल, उदक. १५. सुखकारक व थंड अशा पंख्याच्या वाऱ्यानें. १६. मेलेला; येथें मूर्च्छित. १७. शोक+अभिध=शोक नांवाच्या. १८. मोठ्या वज्रानें. १९. आपल्या स्त्रियेच्या व सुनांच्या आक्रंदनाचा शब्द. 'वधू' शब्दाचे 'भार्या' 'सून' 'स्त्री (सामान्य)' असे अनेक अर्थ आहेत. २०. चांगला; सुखदायक.

निंदी निजपुत्रांतें, तो भूप महामना[1], गत-नयांतें[2]; ।
वाखाणी कुंतीच्या नयसाधितभूरिभाग[3] तनयांतें. ॥ ६
निंदी शकुनिमतीतें[4], आत्ममतीतें हि, तो कवि[5], श्वास ।
सोडी दीर्घोष्ण, म्हणे, 'म्यां चि दिला उग्रशोक[6] विश्वास.' ॥ ७
मग धीर धरूनि म्हणे, 'रे वत्सा ! संजया ! पुन्हां[7] सांगें. ।
मी निजकर्मफलातें[8] सेवाया[9] सिद्ध जाहलों आंगें[10]. ॥ ८
कर्ण यमपुरा गेला, पार्थासीं करुनि संगरायास[11]. ।
गमलें काय हित गमन, मित्राचा धरुनि संग, रायास[12] ? ॥ ९

---

१. मोठ्या मनाचा. २. गेला आहे नय (न्यायमार्ग) ज्यांचा अशा (पुत्रांतें), अनीतिमान् अशा मुलांस. 'नय' शब्दाचे 'न्याय' 'नीति' 'वर्तन' 'शहाणपण' इत्यादि अर्थ आहेत. ३. न्यायानें साधिला आहे पुष्कळसा कार्यभाग ज्यांनीं अशा कुंतीच्या तनयांतें वाखाणी–असा अर्थ. 'पांडवांस' असें मूळांत आहे. त्याबद्दल 'कुंतीच्या नयसाधितभूरिभाग तनयांतें' हे पंतांचे शब्द. हे केवळ भाषांतररूप आहेत काय ? निजपुत्रांस निंदण्याचें कारण ते 'गतनय.' कुंतीपुत्रांस वाखाणण्याचें कारण ते 'नयसाधितभूरि-भाग' होत. हें त्या त्या शब्दांनीं सुचवून पंतांनीं मोठ्या खुबीनें कौरवपांडवांतील भेद सूचित केला आहे. ४. द्यूत खेळण्याविषयीं दुर्योधनास पढवून पांडवांचा वनवास, अज्ञातवास इत्यादिकांस व प्रस्तुतच्या युद्धास शकुनिमतीच कारणीभूत होती, म्हणून तिला निंदण्याचें प्रयोजन. ५. प्राज्ञ, शहाणा. ६. भयंकर दुःख. सर्व पृथ्वी (विश्व) मधील क्षत्रिय कुरुक्षेत्रीं मरण पावत असल्यामुळें 'विश्वास उग्रशोक दिला' हें धृतराष्ट्राचें म्हणणें अक्षरशः खरें आहे. ७. एकवार सांगितलेलीच गोष्ट पुनः सविस्तर सांग–असा भाव. ८. स्वतःच्या दुष्कर्मापासून उत्पन्न झालेल्या दुष्परिणामास. कर्मफळाचें सेवन म्हणजे आपण घडवून आणिलेल्या युद्धांत गतप्राण झालेल्या वीरांच्या मृत्यूचें श्रवण. ९. अनुभवण्यास. मागच्या शब्दांत 'फल' आल्यामुळें 'सेवाया (भक्षाया)' या क्रियेचा उपयोग केला आहे. १०. अंगानें, स्वतः. इतरांस दोष दिल्यापासून फायदा नाहीं; मी आपणच आपल्या कर्मांचीं फलें अनुभविण्यास सिद्ध आहें–असा भाव. ११. संगर+आयास=युद्धश्रम. १२. रायास (दुर्योधनास) मित्राचा संग धरुनि (मित्र जो कर्ण त्याच्या सांगत्यानें-मेलेला जो कर्ण त्याच्या बरोबर–त्यास न सोडितां) गमन (जाणें–स्वर्गास जाणें) हित गमलें काय (आवडलें काय ?)–असा सान्वयार्थ. मेलेल्या कर्णाबरोबर किंवा त्यानंतर दुर्योधन रणांत पडला कीं काय–असें धृतराष्ट्राचें विचारणें आहे. कर्ण मेल्यानंतर खातरीनें दुर्योधनही मेला असावा, असें धृतराष्ट्रास वाटल्यामुळें त्यानें हा प्रश्न केला. या गीतींत **सप्ताक्षरी यमक** आहे. पण अर्थाची हानी मुळींच झाली नाहीं. उलट अर्थचमत्कार वाढला, असेंच म्हणावें लागतें. हें पंतांस केवळ यमक्या म्हणणाऱ्यांनीं लक्षांत ठेवावें.

नित्य [1]जयाचा [2]लोभी दुर्योधन, कर्ण जेधवां मेला, ।
होउनि जयीं निराश, स्पष्ट गमे, [3]सुत यमालया गेला. ॥ १०
वद संजया ! मनीं तूं [4]संकोच नको धरूं; सविस्तर ती ।
युद्धकथा सांग पुन्हां. [5]कवि [6]शोकाब्धी [7]धृतिप्लवें तरती.' ॥ ११
संजय म्हणे, 'नरेशा ! तव सेनांचा धनी [8]प्रवीर-मणी, ।
पुत्रांसह, बंधूंसह, मेला [9]त्वत्सुतवयस्य कर्ण रणीं. ॥ १२
[10]त्वत्सुत [11]दारुणकर्मा, [12]अति तीक्ष्णप्रकृति, कीं जसा [13]वस्त्रा, ।
झोंबे सभेंत जो [14]गुरुपत्नीच्या [15]शोणितप्लुता वस्त्रा, ॥ १३
तो दुःशासन वधिला; [16]त्यांच्या, सेना उदंड मी, मरणीं. ।
व्याघ्र जसें [17]मृगशोणित, प्याला तत्कंठरक्त भीम रणीं.' ॥ १४

---

१. ज्या कर्णाचा. २. 'जयाचा लोभी' म्हणजे जो आपणास जय मिळवून देईल म्हणून दुर्योधनाची पूर्ण खातरी, व म्हणून ज्यावर दुर्योधनाचा अत्यंत विश्वास व प्रेम, असा तो कर्ण. ३. माझा मुलगा दुर्योधन. ४. संकोच नको धरूं, म्हणजे दुर्योधनाची मरणवार्ता सांगितल्यास मी मरेन, अशी शंका मनांत बाळगून खरी हकीकत सांगण्यास मागें घेऊं नकोस. ५. या गीतीचा हा चतुर्थ चरण सुभाषितरूप आहे. येथें **अर्थांतरन्यास** व **परंपरितरूपक** असे दोन अलंकार गर्भित आहेत. शहाणे लोक धैर्यानें शोक गिळितात–मी देखील दुःख गिळीन–असा भाव. ६. शोकसागर. ७. धैर्यरूप नौकेनें. ८. वीरश्रेष्ठ. ९. तुझ्या पुत्राचा मित्र. १०. दुःशासन. ११. भयंकर आहे कर्म ज्याचें. १२. अत्यंत तापट (किंवा क्रूर) स्वभाव आहे ज्याचा असा. हें विशेषण 'त्वत्सुत' शब्दानें निर्दिष्ट केलेल्या दुःशासनाचें आहे. हें 'वस्त्रा' या शब्दाचेंही विशेषण करितां येईल. तेव्हां त्याचा अर्थ–अतिशय तीक्ष्ण (तेज–कापण्यास योग्य) प्रकृति (धार) ज्याची असा. हा **श्लेषालंकार.** १३. वस्तरा, क्षुर. दुःशासनास येथें वस्तऱ्याची उपमा दिली आहे, म्हणून ही हीनोपमा झाली असें कदाचित् कोणी म्हणेल. पण ही उपमा दुष्टास, हीनास दिलेली आहे म्हणून हीनोपमा नव्हे. ज्याप्रमाणें वस्तरा तीक्ष्ण असून हलका समजला जातो व लढाई इत्यादि शौर्याच्या ठिकाणीं उपयोगीं पडत नाहीं, तसाच दुःशासन तापट प्रकृतीचा असून द्रौपदीवस्त्रहरणादि दुष्कार्यांनींच प्रसिद्ध होता, व युद्धप्रसंगीं मात्र विशेष शौर्य दाखवूं शकला नाहीं, असें सुचविण्याकरितांच पंतांनीं 'वस्त्रा' शब्दाचा उपयोग केला आहे. म्हणून तो केवळ यमकाकरितां केला आहे असें म्हणतां येत नाहीं. १४. वडील बंधु जो धर्म त्याच्या पत्नीच्या, द्रौपदीच्या. १५. रक्तानें भरलेल्या वस्त्रास. *दुःशासनानें रजस्वला असलेल्या द्रौपदीस सभेंत ओढून नेली*, व तिचें लुगडें फेडण्याचा यत्न केला–या कथेस अनुलक्षून हें वाक्य आहे. (पंतकृत सभापर्व–अध्याय ५ पहा). १६. त्याच्या मरणीं (मरणसमयीं) सेना (सैन्य) उदंड मी–असा अन्वय. १७. मृगाचें रक्त.

वैकर्तन[१]दुःशासनमृतिवार्ता परिसतां चि तो कानें, ।
केवळ विव्हळ झाला राजा धृतराष्ट्र आप्तशोकानें[२]. ॥ १५
भूप म्हणे, “सूता! मी पुसतों वार्ता तुला असी[३]:–‘मरण ।
किति पावले मदीय[४], स्वरिपूंसीं करुनियां असीम-रण[५] ?” ॥ १६
संजय म्हणे, ‘नृपाळा! पडला तव तात भीष्म, धीरांचें ।
अर्बुद[६], दश दिवसांत स्वबळें मारूनि, धर्मवीरांचें[७]. ॥ १७
मेला द्रोणाचार्य हि भगवान्[८] कोदंडवेदपारीण[९]; ।
समयीं[१०] प्राणसमर्पण करुनि, तुझें फेडिलें नृपा! रीण[११]. ॥ १८
जें, भीष्मद्रोणांहीं वधितां, उरलें पृथा[१२]तनुजसैन्य, ।
करुनि तदर्धक्षय[१३], निजमरणें दे कर्ण तव[१४] सुतां[१४] दैन्य. ॥ १९
दुर्मुख विकर्ण दुःसह विविंशती चित्रसेन तव[१५] तनय, ।
दुर्जय दुर्मर्षण दुर्विषह हि भीमें चि मारिले अनय[१६]. ॥ २०
अनुजा अनुविंदा[१७]सह, गेला स्वर्गासि, वीरवर[१८] विंद. ।
तोडी जयद्रथाचें शिर पार्थ, जसें करींद्र[१९] अरविंद[२०]. ॥ २१

---

१. विकर्तनाचा (सूर्याचा) मुलगा (कर्ण). २. आप्तांच्या मरणापासून झालेल्या शोकानें. ३. अशी=अशा प्रकारची. असी वार्ता पुसतों–हा अन्वय. ४. माझे. ५. अपरिमित युद्ध. ६. असंख्य, पुष्कळ. ७. धर्मवीर=धर्मयुद्ध करणारा; युद्धांत न्यायानें वागणारा; प्राण गेल्यासही न्याय न सोडणारा. साहित्यशास्त्रांत ‘धर्मवीर’ हा एक वीररसाचा प्रकार मानिलेला आहे. ‘धर्मवीर’=धर्मराजाचे वीर; युधिष्ठिराच्या बाजूनें भांडणारे–असाही अर्थ करितां येईल. ‘धर्मवीरांचें अर्बुद (अर्बुद धर्मवीर) स्वबळें दश दिवसांत मारूनि’–हा अन्वय. ८. ‘भगवान्’ शब्द गुरु इत्यादिकांस पूज्यबुद्धि व्यक्त करण्याकरितां लावितात. जसें:–‘अथ भगवान् कुशली काश्यपः’ (शाकुंतल.) ९. धनुर्वेदपारंगत (धनुर्वेदाच्या पैलतीराग गेलेला). १०. योग्य समयीं, तुम्हांस काम पडलें त्या वेळीं. इतके दिवस अन्नवस्त्र देऊन पोसल्याबद्दल तुम्हांस गरज पडली, त्या वेळीं तुमच्याकरितां तो लढून मेला व त्यानें तुमचें ऋण फेडिलें–असा भाव. ११. ‘ऋण’ या संस्कृत शब्दाचें हें प्राकृत रूप ‘रि च ऋवर्णस्य’ [प्राकृतलक्षण] या सूत्रानें झालें आहे. असलीं रूपें मराठी वाङ्मयांत स्वीकारावीं किंवा नाहीं याचा विचार करणें अवश्य आहे. १२. पृथेच्या (कुंतीच्या) तनुजांचें (मुलांचें) सैन्य. १३. त्यांतून अर्ध्या सैन्याचा नाश. १४. तुझ्या मुलाला; दुर्योधनाला. १५. तुझे (धृतराष्ट्राचे) मुलगे. शंभरांतून या नांवांचे कांहीं मुलगे. १६. विनयशील नव्हेत असे; दांडगे. १७. विंदानुविंद हे दोघे भाऊ, अवंती देशाधिपतीचे मुलगे होते. यांची आई वसुदेवभगिनी राजाधिदेवी. केकयदेशाधिपाचेही याच नांवांचे दोन मुलगे युद्धांत कौरवांकडेच होते. पण ते येथें घेतां येत नाहींत. अवंतीचेच घेतले पाहिजेत. कारण मूळांत ‘आवन्त्यौ’ असें स्पष्ट म्हटलें आहे. १८. वीरश्रेष्ठ. १९. हस्तिश्रेष्ठ. २०. कमल.

दुर्योधनसुत लक्ष्मण सौभद्रें अमितविक्रमें वधिला.[1] ।
दौःशासनिला[2] भेटे कृष्णात्मज,[3] घटज[4] जेंवि नीरधिला.[5] ॥ २२
ज्याला[6] बाहुसहस्रप्रद[7] झाला, भक्तकल्पनग[8] दत्त,[9] ।
तन्नामकें[10] तदधिकें वधिला निर्जतातसख[11] हि भगदत्त.[12] ॥ २३

---

१. ज्याच्या विक्रमास पार नाहीं अशानें. २. दुःशासनाचा मुलगा. याचें नांव आढळत नाहीं. हाच अभिमन्यूच्या मरणास निमित्तकारण झाला होता. ३. द्रौपदेय, द्रौपदीचे मुलगे. ४. अगस्त्य. ५. अगस्त्यानें पिऊन सर्व समुद्र नाहींसा केला; त्याचप्रमाणें कृष्णात्मजांनीं दौःशासनीस नाहींसें केलें–असा भाव. ६. ज्याला (ज्या सहस्रार्जुनाला) भक्तकल्पनग (भक्तांचा कल्पतरु असा) दत्त (दत्तात्रय) बाहुसहस्रप्रद (हजार हात देणारा) झाला–तन्नामकें (त्याचें नांव–'अर्जुन' असें नांव–आहे ज्यास अशानें–अर्जुनानें–असा भाव), [पण] तदधिकें (त्याच्याही पेक्षां अधिक–शौर्यादि गुणांनीं श्रेष्ठ अशा अर्जुनानें) निजतातसख हि (आपला बाप जो इंद्र त्याचा मित्र असतांही–आपल्या बापाचा मित्र जरी होता, तरी–असा 'ही'चा अर्थ.) भगदत्त (नृपविशेष) वधिला–असे अन्वय व अर्थ होत. 'अर्जुनें' असें सांगण्याच्या ऐवजीं इतका वळसा देऊन म्हटल्यामुळें हें **'पर्यायोक्त'** अलंकाराचें सुरेख उदाहरण आहे. यमकाकरितां हा द्राविडी प्राणायाम आहे, असा कित्येकांचा आक्षेप येण्याचा संभव आहे, पण असें म्हणतां येणार नाहीं. कारण केवळ यमक न साधितां पंतांनीं **व्यतिरेका**लंकारही साधिला आहे. नांवानें ( पांडव ) अर्जुन, ( कार्तवीर्य ) अर्जुनाच्या बरोबरीचा जरी आहे, तरी शौर्यादिगुणांत 'तदधिक' आहे–हा सांगण्याचा भाव. दत्तवरप्रसादानें ज्या कार्तवीर्यार्जुनास सहस्र कर प्राप्त झाले व इतर अनेक रीतींनीं शौर्याविषयीं जो अत्यंत प्रख्यात, त्याच्याशीं बरोबरी दाखवून त्यापेक्षांही अधिक वर्णन करणें साहित्यप्रावीण्याचें द्योतक आहे; व्यर्थ श्रमाचें नाहीं. ७. सहस्र बाहु देणारा. कार्तवीर्यार्जुन हा यदुकुलोत्पन्न कृतवीर्याचा मुलगा; माहिष्मती नगरीचा राजा. हा दत्तप्रसादेकरून इच्छागामी होता; म्हणून, कोणी पुरुष याच्या राज्यांत पाप करण्यास उद्युक्त झाला कीं हा दत्त म्हणून, त्याच्यापुढें उभा राहत असे. अशा रीतीनें मोठ्या न्यायानें यानें पंचायशीं सहस्र वर्षेपर्यंत राज्य केलें. यानें रावणासही बंधन केलें होतें. त्यास हजार पुत्र होते. हा एकदां मृगयेनिमित्त अरण्यांत जाऊन जमदग्निऋषीच्या आश्रमांत राहिला. ऋषीनें कामधेनूच्या माहात्म्यानें त्याचा उत्तम सत्कार केला. तें त्यास समजतांच त्यानें बलात्कारानें कामधेनु नेली. म्हणून जमदग्नीचा पुत्र परशुराम यानें त्यास मारिलें. ८. भक्तांचा कल्पतरु. ९. ब्रह्माविष्णुमहेश्वरांच्या अंशांनीं जन्मलेला अत्रिऋषीचा मुलगा. हा परम ब्रह्मनिष्ठ असून अलर्क, प्रल्हाद, यदु, कार्तवीर्य इ० याचे ब्रह्मविद्येच्यासंबंधानें शिष्य होते. १०. तें 'अर्जुन' नांव ज्याला त्यानें. ११. आपला बाप जो इंद्र, त्याचा मित्र; भगदत्त हा इंद्राचा मित्र होता. १२. प्राग्ज्योतिष देशाचा राजा, नरकासुराचा पुत्र. याला किरात, चीन इ० देशांतील राजांचा मोठा आश्रय असे. गजयुद्धांत हा मोठा प्रवीण होता. याच्याजवळ गजही फार होते. हा भारती युद्धांत दुर्योधनाकडे होता व अर्जुनाच्या हातून मृत झाला. ( पंतकृत द्रोणपर्व–अध्याय २ पहा ).

कौरवदायाद[1] महायोद्धा भूरिश्रवा[2], प्रकाम[3] रण ।
करुनि त्वदर्थ राया ! सात्यकिपासूनि[4] पावला मरण. ।। २४
श्वेतहयें[5] अंबष्ट[6] श्रुतायुनामा रणांगणीं मथिला. ।
भीमें वधिला त्वत्सुत दुःशासन, तो प्रकार म्यां कथिला. ।। २५
गज बहुसहस्र ज्याच्या कटकीं[7] तो नृप सुदक्षिण[8] प्रथित[9] ।
वधिला धनंजयानें; केला दुर्योधन क्षण व्यथित[10]. ।। २६
जो अधिप[11] कोसलांचा[12] भासत नव्हता रणीं शमावा-सा[13], ।

---

१. कौरवांचा ( दुर्योधनादिकांचा व पांडवांचा ) सपिंड. [दायाद=दायमत्ति यद्वा आदत्ते. दायभाग घेणारा तो दायाद. 'दायादस्तु भवेत्पुंसि सपिंडे तनयेऽपि च' इति मेदिनी.] २. भूरिश्रवा कौरवांचा दायाद म्हणण्याचें कारण हे सर्व 'प्रतीप' नामक मूळपुरुषाचे वंशज होत. खालील वंशवृक्षावरून यांचें दायादत्व स्पष्ट होईल.




३. पुष्कळ. ४. पंतकृत द्रोणपर्व–अध्याय १३ पद्य. ५. अर्जुनानें. ६. अंबष्ट देशाचा राजा. अंबष्ट देश "इंद्रप्रस्थास अनुलक्षून, पश्चिमेकडे शिबिदेशाच्या पश्चिमेस पांडवांच्या वेळेस असल्याविषयीं भारतांत लिहिलें आहे. (भारत सभा० अ० ३२.) ब्राह्मणापासून वैश्यजातीय स्त्रीच्या ठायीं झालेली जी संतति, तिला अंबष्ट असें म्हटलें आहे. त्यांचा हा देश असावा, आणि त्यावरून यास असें नांव पडलें असावें." (भा० कोश.) ७. सैन्यांत. 'कटक' शब्दाचे अनेक अर्थ आहेत. कटक=वर्तुळ, राजधानी, चटई, पर्वतभाग, सैन्य इत्यादि. ८. कांबोज देशाचा राजा. ९. विख्यात. १०. क्षणभर दुःखित. ११. राजा. १२. कोशल देशाचा. १३. मरावासा, मरण्यासारखा.

सौभद्रें[1] हरिशावें[2] करिवरसा[3], प्रेषिला यमावासा[4]. ॥ २७
करुनि[5] शरनखीं दृढरथ, चर्मासह खड्ग ही शकल[6], भाचा[7] ।
यदुसिंहाचा[8], वध करि लीलेनें शल्यपुत्रकलभाचा[9]. ॥ २८
अभिमन्युवधक्रोधें अर्जुन, कर्णासमक्ष वृषसेना[10] ।
मारी, तेव्हां भी तव पृतना[11] जैसी हरीस[12] वृष[13]-सेना. ॥ २९
सहदेवें ही वधिला स्वभ्राता[14], जो कुमार मामाचा[15], ।
[16]कीं तो सहाय, राजा! या[17] कामक्रोधलोभधामाचा[18]. ॥ ३०

---

१. अभिमन्यूनें. २. सिंहाच्या छाव्यानें. ३. गजश्रेष्ठाप्रमाणें. 'हरि**शाव**' व 'करि**वर**' हे शब्द साभिप्राय आहेत. सिंहाचा **बच्चा** झाला तरी मोठ्या हत्तीस मारण्यास तो समर्थ होतो व त्याप्रमाणेंच **अभिमन्यूनें कोसलाधिप** मारिला–असा अर्थ. ही सुरेख **उपमा पंतांचीच** आहे. ४. **यमाच्या** गृहास. ५. **यदुसिंहाचा** भाचा (कृष्णाचा भाचा **अभिमन्यु**) शरनखीं (शररूपी नखांनीं) [शल्यपुत्रास] दृढरथ (दृढ म्हणजे अचल आहे रथ ज्याचा असा–रथ घेऊन ज्याला पळून जातां येत नाहीं असा. ज्याप्रमाणें सिंहानें नखांनीं पकडलेल्या हत्तीस पळून जातां येत नाहीं, त्याचप्रमाणें ज्याला पळून जातां येत नाहीं असा) करुनि [व] चर्मासह (ढाल व) खड्ग ही (तलवार देखील) शकल (तुकडे तुकडे) [करूनि] शल्यपुत्रकलभाचा (शल्यपुत्ररूपी हत्तीचा) लीलेनें (मोठ्या कौतुकानें; खेळत खेळत, विशेष परिश्रमाशिवाय) वध करी–हा सान्वयार्थ. 'दृढरथचर्मासह खड्ग ही' असा पाठ रा० पराडकर यांच्या प्रतींत आहे, तो घेतल्यास, फार मजबूत अशा रथाचे, चर्मांचे (ढालेचे) व खड्गाचे तुकडे तुकडे करून–असा अर्थ करावा. ६. तुकडे. येथें 'शकलें' असा अनेक वचनी प्रयोग असावयास पाहिजे होता. संस्कृतांत 'शकल' शब्द पुल्लिंगी व नपुंसकालिंगी आहे, तेव्हां तो पुल्लिंगी अनेक बचनी आहे, असें येथें समजून प्रयोगाची संगति लावावी व रथ, ढाल व तलवार यांचे तुकडे केले–असा अर्थ करावा. ७. कृष्णाचा भाचा (अभिमन्यु). ८. यदुसिंह=यादवश्रेष्ठ (तत्पुरुष) कृष्ण; यदु (यादव) रूपी सिंह (रूपक) कृष्ण. यांतील दुसरा अर्थ येथें विशेष ग्राह्य आहे. कारण पुढें 'शल्यपुत्रा'स **'कलभ'** म्हटल्यामुळें 'यदु**सिंह**' यांतील 'सिंह' शब्दाचा अर्थ 'मृगेंद्र' असा केल्यास सिंहाचा भाचा सिंहच असला पाहिजे म्हणून, **परंपरित रूपक** होऊन अर्थ विशेष खुलेल. असें न करितां 'सिंहशार्दूलनागाद्याः पुंसि श्रेष्ठार्थवाचकाः' या वचनास अनुसरून 'सिंह' शब्दाचा अर्थ केवळ 'श्रेष्ठ' असा केल्यास 'शल्यपुत्र–कलभ' शब्दाची कांहींच खुबी राहणार नाहीं. ९. शल्यसुतरूपी हत्तीच्या छाव्याचा. मूळांत 'मद्रराजानुजः' म्हणजे शल्याचा धाकटा भाऊ असें आहे; शल्याचा मुलगा असें नाहीं. या गीतींतील अलंकार सर्वस्वी पंतांचाच आहे. १०. वृषसेन नामक वीरास (कर्णपुत्रास.) ११. सैन्य. १२. सिंहास. ही उपमा पंतांचीच आहे. १३. बैलांची सेना. १४. आपला माऊसभाऊ व शल्याचा जो मुलगा रुक्मरथ तो. १५. शल्याचा. १६. या गीत्यर्धांत पंत, सहदेवानें आपल्या माऊसभावासही कां मारिलें याचें कारण सांगतात, कीं तो (आपला

मेला भूप भगीरथ, नृपति बृहत्क्षत्र, कैकय हि मेला. ।
भगदत्ताचा पुत्र हि नकुलानें अंतकातिथी केला. ॥ ३१
वंधिला तुझा पितामह बाल्हीक वृकोदरें अतिक्रुद्धें; ।
पुत्र जरासंधाचा सौभद्रें तो, सुदुःसहें युद्धें. ॥ ३२
आते कलिंग–वृषक व्याघ्र चि जे शत्रुमृगकुलें मथिती, ।
ते दोघे ही झाले श्राद्धपतीचे, तुझ्या गुणें, अतिथी. ॥ ३३
दिसतो, श्रीभीमाच्या अद्भुतभुजशक्तिनें निज-विलासा ।
दावुनि वृषवर्मा तव सचिव, रणीं सुशयनीं निजविलासा. ॥ ३४
नागायुत बल पौरव, कालिंग, वशाति, शिबि, अभीषाह, ।
यां शूरसेनसहितां प्रेषी स्वर्गासि वीर सितवाह. ॥ ३५

---

माऊसभाऊ रुक्मरथ ) या कामक्रोधलोभधामाचा (कामक्रोधादि षड्रिपूंचें माहेरघरच कीं काय, अशा त्या दुर्योधनाचा ) सहाय ( मित्र व मदत देणारा ) [होता म्हणून]. दुष्टांस साहाय्य करणारा जरी आपला बंधु असला, तरी दया, माया, क्षमा न ठेवितां त्याचा त्याग करावा– वध करावा–हा धडा सहदेवानें सर्वांस शिकविला, असें ध्वनित करण्याचा पंतांचा उद्देश आहे. १७. दुर्योधनाचा. १८. काम, क्रोध, लोभ यांचें घर; म्हणजे हे सर्व दुर्गुण ज्याच्यांत पूर्णपणें वास करीत आहेत असा.

१. या गीतींतील राजे पुराणेतिहासग्रंथांत विशेष प्रख्यात नाहींत. म्हणून त्यांच्याविषयीं विशेष माहिती मिळत नाहीं. २. 'श्येनवच्चरता' ही मूळांतली उपमा पंतांनीं गाळली आहे. ३. यमाचा अतिथी ( पाहुणा ). ४. 'वधिला' या क्रियेचा 'वृकोदरें बाल्हीक' व 'सौभद्रें जरासंधाचा पुत्र' या दोहोंशीं संबंध आहे. ५. बाल्हीक धृतराष्ट्राचा चुलत आजा होता. [या अध्यायाच्या २४ व्या गीतीवरील टीपेंत दिलेला वंशवृक्ष पहा.] ६. सोसण्यास फार कठीण अशा. ७. यमाचे. ८. दुर्गुणानें; तुझ्या दुर्गुणानें; मुलांस योग्य बोध करून त्यांस ताब्यांत न ठेविल्यामुळें. मध्यें मध्यें धृतराष्ट्रास अशा रीतीनें टोले मारीत असल्यामुळें संजय हा निःस्पृह व निर्भीड होता, हें उघड होत आहे. तो पांडवांचा पक्षपाती होता, असेंही वाटण्याचा संभव आहे. ९. श्रीभीमाच्या अद्भुतभुजशक्तिनें (विस्मयजनक प्रचंड भुजबलानें) निजविलासा दावुनि ( आपला चमत्कार दाखवून–स्वशौर्यानें सर्वांस आश्चर्यचकित करून ) तव सचिव ( तुझा मंत्री ) वृषवर्मा, रणीं सुशयनीं ( चांगल्या मऊ बिछान्यावर ) निजविलासा ( निजविलाच कीं काय असा ) दिसतो–असा अन्वय. १०. आपले चमत्कारीक खेळ; आपली शौर्यं दाखविण्याची जितकी उमेद होती तितकी. 'विलास' शब्दानें 'भयराहित्य,' आनंद व उत्साह यांचें मनांत वसणारें अस्तित्व, हे गुण सूचित होत आहेत. ११. मंत्री, प्रधान. १२. चांगल्या बिछान्यावर. १३. दशसहस्र हत्तींचें बळ आहे ज्यास. १४. सितवाह=अर्जुन.

जे गोकुळांत झाले बलशाली, न फिरती रणीं मागें, ।
वधिले संशप्तकसह गोपाळ हि, [1]सितहयें [2]महाभागें. ॥ ३६
जे [3]रात्रिंदिव तूझें हित साधाया, धरूनि धनु जपती, ।
[4]वृषकाचळ नामक ते, विजयें वधिले रणांत, [5]मनुजपती. ॥ ३७
जो काय [6]उग्रकर्मा नामें कर्में हि, [7]शाल्वराज बळी, ।
तत्प्राणांतें, [8]क्षुधित [9]श्रीभीमभुजाहिभूपती, [10]कवळी, ॥ ३८
मेला बृहंतराजा, धृतराष्ट्रा ! [11]ओघवंत ही मेला. ।
[12]भीमगदादेवीनें [13]महिषसख क्षेमधूर्ति ही [14]केला. ॥ ३९
सात्यकिनें [15]त्वद्धित जलसंध [16]व्यापादिला, दिला [17]काळा; ।
वधिला घटोत्कचें हि [18]क्रव्याद [18]अलंबुष, [19]क्ष्मापाळा ! ॥ ४०
क्षुद्रक ललित्थ मालव मद्रक कैकेय तुंडिकेर रणीं, ।
[20]योधेय [21]दाक्षिणात्यप्राच्योदीच्यप्रतीच्य—वीर—मणी. ॥ ४१

---

१. सितवाह=अर्जुन. २.'महाभाग' पदाचे फार नशीबवान, अत्यंत विख्यात व पूर्ण सद्गुणी, असे तीन अर्थ होतात. ३. 'जे रात्रंदिवस तुझें हित साधाया' असा पाठ आहे. ४. वृषक व अचळ नांवांचे. हे दोघेही दुर्योधनाचा मातुल जो शकुनि त्याचे भाऊ. हे धृतराष्ट्राचे शालक होत. ५. राजे. ६. भयंकर आहे कर्म ज्याचें असा. ७. अंबेनें ज्यास मनानें वरिलें होतें, तो भीष्मशत्रु शाल्व हा नव्हे. हा दुसराच आहे. तो शाल्व पुढें मेला आहे. ८. भुकेला. 'क्षुधित' हें कवळण्याचें कारण दाखवीत आहे. ९. श्री+भीम+भुज+अहि+भूपति=भीमभुजसर्परूप राजा. एखाद्याचा प्राणवायु पिऊन टाकणें यांत सर्पदृष्ट्या कांहीं मोठा पराक्रम नाहीं, करितां वासुकीचे मागें 'श्री' हें उपपद नको. भीमाचे मागेंही त्याची जरूरी दिसत नाहीं, तेव्हां 'श्री' हें पद येथें अस्थानीं आहे, असें म्हणतां येईल. १०. सर्प, विशेषत: अजगर, प्राण्यांस कवटाळून मारतो, हें प्रसिद्ध आहे. रूपकास अनुकूल म्हणून पंतांनीं 'कवळी' शब्द वापरला आहे. हें उत्तम रूपक पंतांचेंच आहे. कवळ=ग्रास. कवळी=ग्रासी, भक्षण करी; असा अर्थ घेतला तरी चालेल. ११. मूळ महाभारतांत 'अघोवान्' असें नांव आढळतें. १२. भीमाच्या गदारूपी देवीनें (आदिशक्तीनें, महिषासुरमर्दिनीनें.) १३. महिषासुराचा मित्र; महिषासुरासारखा म्हणजे मृत असा. १४. महिषासुरमर्दिनीनें महिषासुराची जी गति केली, तीच गति भीमगदेनें क्षेमधूर्तीची केली—असा भाव. क्षेमधूर्ती भीमाच्या हातून मेला ही गोष्ट इतका वळसा घेऊन सांगितल्यामुळें ही पर्यायोक्ति. या गीत्यर्धांत परस्परावलंबी दोन रूपकें असल्यामुळें, हें परंपरितरूपक. हे अलंकार पंतांचेच होत. १५. त्वत्+हित=तुझा मित्र, हितेच्छु. १६. मारिला. १७. यमाला. १८. राक्षस. 'अलंबुस' असेंही नांव आढळतें. मूळ भारतांत 'अलायुध' असें नांव आढळतें. १९. हे पृथ्वीपते. २०. योद्धे. २१. दक्षिण, पूर्व, उत्तर, पश्चिम दिशांकडील वीरश्रेष्ठ.

द्रविड सवित्रीपुत्रक मावेल्लक ही उशीनर हि वीर. ।
श्रीमद्विजयें वधिले राजा! तूझे सहाय रणधीर. ॥ ४२
बहु [1]पत्त्यश्वरथगजक्षय [2]कर्णार्जुनसमागमीं झाला. ।
तव दोषें, काळानें बहुनृपवंशांत [3]घातला घाला. ॥ ४३
इंद्रें वृत्र, रघुवरें रावण, कृष्णें हि जेंवि [4]नरक रणीं, ।
कीं [5]अर्जुन [6]भृगुरामें [7]ज्याची गाताति देव-नर करणी, ॥ ४४
कीं [8]स्कंदें [9]महिषासुर, कीं रुद्रें जेंवि अंधकासुर गा! ।
तैसा विजयें वधिला कर्ण; गरुड कीं वधी जसा [10]उरगा. ॥ ४५
जरि राज्य[11]लुब्ध पुत्र[12]स्नेहासवसेवनें न भुलतास, ।
तरि, [13]इष्टव्यसनघनाघातशतें तूं नृपा! न उलतास.' ॥ ४६

---

## अध्याय [14]चवथा.

धृतराष्ट्र म्हणे, 'सूता! सांग मला, पांडुपुत्रपक्षांत ।
किति मेले? बा! [15]आज्ञा! तुझिया आहे चि सर्व लक्षांत.' ॥ १
[16]'जे वीर [17]कुंतिसंज्ञक, [18]नारायणनाम ही, महायोध, ।
त्यांतें वधी [19]स्वधर्मे [20]तात [21]तुझा निर्जितस्मरक्रोध. ॥ २

---

१. पत्ति, अश्व, रथ, गज, यांचा नाश. २. कर्ण व अर्जुन यांची लढाई झाली त्या वेळीं. ३. 'घाला घातला' ही लोकभाषणाची अनुकृति असल्यामुळें हा लोकोक्ति अलंकार आहे. ४. नरकासुर. ५. कार्तवीर्यार्जुन (सहस्रार्जुन.) ६. परशुरामानें. ७. ज्याची म्हणजे ज्या भृगुरामाची असा अर्थ साहचर्यानें होतो. पण याचा, ज्या इंद्राची, ज्या रघुवराची, ज्या कृष्णाची व ज्या भृगुरामाची असा सर्वांस लागू होणारा अर्थ करितां येईल. इंद्रादिकांच्या कथा प्रसिद्धच आहेत. ८. कुमारस्वामीनें. ९. हा देवीनें मारिलेला महिषासुर नव्हे. हा अनुऱ्हाद दैत्याच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. स्कंदाचा अवतार ज्या तारकासुराकरितां होता, त्याचा हा एक मुख्य सेनापति होता. यास कार्तिकेयानें (स्कंदानें) मारिलें. १०. सर्पास. ११. 'जरि काय, लुब्ध' असें पाठांतर. १२. पुत्रस्नेह+आसव+सेवन=पुत्रस्नेहरूप मद्यसेवनानें. १३. इष्ट+व्यसन+घन+आघात+शतें=सुहृज्जनसंकटरूपी घणाच्या आघातशतानें. या गीतींतील कल्पना पंतांच्याच आहेत. १४. मुळांतील ६ वा अध्याय या ४ थ्या अध्यायांत पंतांनीं आणिला आहे. मुळांत ३८ अनुष्टुप् श्लोक आहेत; ते पंतांनीं २५ गीतींत आणिले आहेत. १५. झाल्या. १६. येथून संजयाच्या बोलण्यास प्रारंभ झाला. १७. 'कुंति' नामक भारतवर्षीय देशाचा राजा व त्याचे सैनिक. १८. नारायणनामक गणसमुदाय. यांतून कांहीं गण कृष्णानें दुर्योधनास देऊन कांहीं पांडवांकडे ठेविले होते, ते. १९. क्षत्रियधर्मानें. २०. भीष्म. २१. जिंकिला आहे काम आणि क्रोध ज्यानें असा, मनोजय करणारा, मोठा करारी.

जो अर्जुनसम योद्धा लोकीं विख्यात सत्यजिन्नामा[1], ।
त्यातें द्रोणाचार्य प्रेषी श्राद्धेश्वराचिया[2] धामा[3]. ॥ ३
पांचाळवधीं[4] दावी विक्रम हरिच्या गजेंद्रमथनाचे; ।
वधुनि विराटद्रुपद, स्मरपुरहरसा[5] चि रुक्मरथ[6] नाचे. ॥ ४
बाळ चि वयें, परि रणीं स्वपित्यासम[7], कृष्णसम, बळासम[8] ही; ।
ज्याच्या भुजप्रसादें[9] पुष्कळ सेवी असृग्जळास[10] मही; ॥ ५
तो कृतवर्मद्रोणद्रौणिकृपाचार्यशल्यकर्णांनीं ।
वधिला अभिमन्यु नृपा! पी हें वार्ताविष स्वकर्णांनीं. ॥ ६
अंबष्टपुत्र वधिला तव पौत्रें लक्ष्मणें[11]. बृहंत रणीं ।
दुःशासनें निवटिला, पडला लोकक्षयीं[12] जसा तरणी[13]. ॥ ७
द्रोणें वधिले राजे, जे नामें दंडधार मणिमंत; ।
जो भोजराज अंशुमदाख्य गुरुकरें[14] चि पावला अंत. ॥ ८
वधिला[15] समुद्रसेनें[16] सहसुतसामुद्र[17] चित्रसेन रणीं; ।
नील विकर्णें[18] मथिला, द्रौणीनें व्याघ्रदत्त वीरमणी. ॥ ९

---

१. सत्यजित नांवाचा. हा द्रुपदराजाचा मुलगा. 'सत्यजितनामा' असें पाठांतर. २. यमाचे. ३. गृहास. ४. [ रुक्मरथ ] पांचाळवधीं ( पांचाळदेशाच्या राजास मारितांना ) हरिच्या ( सिंहाच्या ) गजेंद्रमथनाचे ( गजेंद्रास मारितांना सिंह जसे विक्रम दाखवितो तसे ) विक्रम दावी—असा अन्वय. ५. स्मराचा ( मदनाचा ) व पुरांचा ( त्रिपुरांचा ) नाश करणारा जो हर त्यासारखा. शिव मदनांतक व त्रिपुरांतक होय, हें प्रसिद्धच आहे. ६. द्रोण. ७. आपला बाप जो अर्जुन त्याच्यासारखा. ८. बळिरामासारखा. ९. हस्ताच्या कृपेनें. १०. असृक्+जल=रक्तरूप उदकास. ११. दुर्योधनाच्या मुलानें. १२. कल्पांतीं. १३. सूर्य. प्रळयसमयीं जसा पृथ्वीवर सूर्य येऊन पडावा, तसा तो बृहंत जमिनीवर पडला. ही अभूतोपमा आहे असें वाटण्याचा संभव आहे, पण तसें समजूं नये. कारण प्रळयसमयीं सूर्य पृथ्वीवर पडणें, प्रळयाग्नि उत्पन्न होणें, इ० अनर्थ खरोखर घडतात, अशी समजूत आहे. १४. द्रोणाचार्यांच्या हातानेंच. १५. 'वधिला समुद्रसेनेसह सुतसामुद्र' असा पाठ आहे. त्याचा स्वीकार केल्यास रणीं चित्रसेन समुद्रसेनेसह [ व ] सुतसामुद्र [सह] वधिला—असा अन्वय. हा (सामुद्र) समुद्राजवळच्या प्रांताचा राजा असल्यामुळें याच्या सैन्यास 'समुद्रसेना' असें म्हटलें असावें. १६. समुद्रसेन नामक राजानें. १७. चित्रसेनाचा मुलगा सामुद्र, त्यासह. १८. दुर्योधनाचा धाकटा भाऊ. हाच काय तो सर्व भावांत न्यायप्रिय होता. द्रौपदीवस्त्रहरणप्रसंगीं सभेंत स्पष्टपणें त्या कृत्याचा धिक्कार करणारा तो हाच. ( पंतकृत सभापर्व—अध्याय ५ गीति ४४—५५ ).

जो भूप चित्रयोधी[१] चित्रायुध मुख्य वीर लक्षांत[२], ।
तुझिया सुतें विकर्णें वधिला, त्या पांडुपुत्रपक्षांत. ॥ १०
कैकेयनृपभ्राते दोघे त्यांतील एक तव पक्ष; ।
तेणें त्वदर्थ वधिला धर्मसहाय[३] स्वबंधु रणदक्ष. ॥ ११
भूप गदायोधी[४] जो जनमेजय पार्वतीय[५], तो शूर, ।
तव सुत दुर्मुखबाणव्रातें[६] केला रणांगणीं चूर. ॥ १२
जे रोचमाननाम भ्राते कुंतीसुताकडे[७] होते, ।
श्रीमद्द्रोणाचार्यें त्वत्पुत्रजयार्थ[८], मारिले हो ! ते. ॥ १३
मातुल धनंजयाचे जे पुरुजित्[९] कुंतिभोज[१०] या नामें, ।
ते हि द्रोणें वधिले राया ! तुझिया तनूजजयकामें[११]. ॥ १४
वसुदानाच्या पुत्रें, जो अभिभू[१२] काशिराज, तो वधिला; ।
कांटा चि काढिला तो जाणों[१३] तव[१४] सूनुच्या मनामधिला. ॥ १५
राजेंद्रा ! अमितौजा वीर युधामन्यु उत्तमौजा ही ।
धर्मसहाय[१५], स्वर्गीं झाले देवांस[१६] जांवई, व्याही. ॥ १६

---

१. चित्र म्हणजे आश्चर्यजनक युद्ध करणारा, अद्भुतपराक्रमशाली. २. 'लक्षांत मुख्य वीर' म्हणजे लक्षसैन्याचा नायक असाही अर्थ होईल; किंवा लक्ष वीरांत ज्याच्यासारखा वीर एकटा हाच असाही अर्थ करितां येईल. ३. पांडवपक्षीय. ४. गदायुद्धांत प्रवीण. ५. पर्वतप्रदेशांत हा राज्य करीत असल्यामुळें यास 'पार्वतीय' असें नांव पडलें असावें. ६. तुझा पुत्र जो दुर्मुख त्याच्या बाणसमुदायानें. ७. पांडवांकडे. ८. तुझ्या (धृतराष्ट्राच्या) मुलाच्या जयाकरितां. ९. पुरुजित् हा कुंतिभोज राजाचा मुलगा; कुंतीचा धाकटा बंधु; पांडवांचा मातुल (मामा); याच्या रथाचे अश्व इंद्रधनुष्याच्या रंगासारखे असत. १०. हा कुंतिदेशाचा राजा. हा प्रथम अनपत्य असल्यामुळें यादवकुलोत्पन्न कुंती यानें दत्तक घेतली होती. म्हणून हा पांडवांचा आजा (मातामह) होय. मूळांत व गीतींत म्हटल्याप्रमाणें हा धनंजयाचा मातुल नव्हे. ११. (तुझ्या) पुत्राचा जय इच्छिणाऱ्यानें (द्रोणाचार्यांनें). 'तुझिया' याचा संबंध 'तनूजजयकामें' या सर्व समासाशीं नाहीं. फक्त 'तनूजा'शीं आहे. म्हणून 'त्वत्तनूजजय-कामें' म्हटलें असतें तर बरें झालें असतें. १२. शत्रु, वैरी. 'अभिमुख' असें पाठांतर. अभिमुख=जवळचा, सन्मुख. १३. हें उत्प्रेक्षालंकाराचें सुंदर उदाहरण आहे. ही उत्प्रेक्षा पंतांचीच आहे. १४. तव सूनुच्या=तुझ्या पुत्राच्या; दुर्योधनाच्या. १५. धर्मराजास साहाय्य करणारे. १६. देवांस जांवई झाले म्हणण्याचें कारण, रणहतांस देवांगना वरितात. तस्मात् युद्धांत मेलेले वीर देवांचे जांवई; म्हणून त्यांचे जनक व्याही झाले. 'जांवई' व 'व्याही' शब्दांनीं त्यांचा स्वर्गांत अतिशय जयजयकार झाला, असें पंतांनीं सुचविलें आहे.

पांचाल्य [1]चित्रवर्मा दुसरा हि क्षत्रधर्मनामा ते, ।
[2]द्रोणाशुगशुद्धतनू स्वर्गा गेले [3]रणक्रतुज्ञाते. ॥ १७
नंदन शिखंडिचा जो रणदक्ष क्षत्रदेव [4]दृढबाहू, ।
त्याला [5]लक्ष्मणबाणव्रात गिळी, इंदुला [6]जैसा राहू. ॥ १८
रणदक्ष पितापुत्र प्रख्यात सुचित्र चित्रवर्मा जे, ।
त्यांतें वधितां, द्रोण, [7]द्विरदवधीं [8]केसरी [9]तैसा, साजे. ॥ १९
पडला [10]पांडवहितकर वार्धक्षेमी [11]क्ष्मातळीं प्रेत. ।
सेनाबिंदुसुतवधें पुरवी बाल्हीक तव [12]अभिप्रेत. ॥ २०
चेदीश [13]धृष्टकेतु हि, [14]सत्यधृति हि, वीर संगरीं मेला. ।
[15]धर्मात्मजार्थ [16]सेनाबिंदुकुरुश्रेष्ठ यमपुरा गेला. ॥ २१
शिशुपाळसुत [17]सुकेतु, व्याघ्रें [18]मृगसा, विदारिला द्रोणें, ।
[19]मदिराश्व, [20]सूर्यदत्त हि; तेव्हां केलें न '[21]हा !' असें कोणें ? ॥ २२
जो [22]श्रेणिमंत, त्याची [23]कुंतीच्यां [23]नंदनीं महाभक्ती, ।
झाला [24]सत्कृत [25]अमरीं, [26]समरीं करुनि क्रिया यथाशक्ती. ॥ २३
जो कीं [27]यथार्थनामा राजा ! पांडवसहाय वसुदान, ।

---

१. येथें 'मित्रवर्मा' असा पाठ असणें संभवनीय आहे, कारण 'चित्रवर्मा' हें नांव पुढें गीति १९ मध्यें आलेलें आहे. २. द्रोणबाणेंकरून शुद्ध झाली आहे तनु ज्यांची असे. ३. युद्धयज्ञ जाणणारे. ४. सुदृढ ( युद्धांत टिकण्यास योग्य ) आहेत बाहू ज्याचे असा. किंवा दृढ ( निश्चल; इकडे तिकडे न हालणारे ) बाहु ज्याचे, जो न चुकतां नेम मारीत असे, तो. ५. लक्ष्मणाचा बाणसमूह. ६. यांतील उपमा पंतांचीच. ७. हत्तीला मारितांना. ८. सिंहासारखा. ९. यांतील कल्पना व उपमा पंतांच्याच. १०. पांडवांचें हित करणारा. ११. पृथ्वीतळीं. १२. इच्छित. १३. चैद्य जो शिशुपाल त्याचा मुलगा. १४. पांचालकुलोत्पन्न द्रुपदराजाचा मुलगा. १५. युधिष्ठिराकरितां. १६. हा कुरूच्या संततींतला म्हणजे कौरव असावा, असें यावरून वाटतें. १७. हा धृष्टकेतूहून धाकटा होता. १८. ही पंतांची उपमा. १९. हा विराटराजाचा भाऊ. यास कोठें कोठें मदिराक्षही म्हटलें आहे. २०. विराटाचा भाऊ. २१. हाय हाय. हा प्रश्नालंकार. 'कोणें 'हा !' असें न केलें ?' म्हणजे प्रत्येकानें 'हा !' असें केलें—असा अर्थ. २२. श्रेणिमंत हा गोशृंग नामक पर्वतशिखरवासी राजा. २३. कुंतीनंदनांच्या ठायीं; पांडवांविषयीं. २४. सत्कार पावलेला. २५. देवांत. २६. 'अमरीं' व 'समरीं' यांत 'मरीं' या अक्षरांची आवृत्ति झाल्यामुळें हा छेकानुप्रास होय. २७. यथार्थ म्हणजे अन्वर्थक आहे नाम ज्याचें. म्हणजे 'वसुदान' ( वसु=धन ) हें नांव त्यास उगीच नसून तो खरोखर विपुल धन दान करीत असे, तो—मोठा दाता होता. असा भाव.

आचार्यें काळकरीं दिधलें समराध्वरीं तदसुदान. ॥ २४
कथिले कांहीं कांहीं, मेले बहु वीर उभयपक्षांत. ।
भीष्म द्रोण वृकोदर अर्जुन हे दहन शत्रुकक्षांत.' ॥ २५

---

## अध्याय पांचवा.

ऐसा बहु बन्धुक्षय परिसुनि, तो भूमिवल्लभ व्यथितें ।
चित्तें म्हणे, 'अहा! म्यां हारविलें हातिंचें हि भव्य थितें. ॥ १

---

१. द्रोणाचार्यानें. २. यमाच्या हातीं. समरच अध्वर (यज्ञ); आचार्य (द्रोण) हा यजमान, काळ (यम) हा अध्वर्यु, व तदसु (त्या राजाचे प्राण) हीच त्या अध्वर्यूस दक्षिणा—असा अर्थ या वाक्यांत गर्भित आहे. 'तदसुदान' यांत एक खुबी आहे. तो 'वसुदान' राजाच मोठा दाता होता, हें पूर्वार्धांत सांगितलेंच आहे. तेव्हां अशा दात्यासच दान करून देणें म्हणजे फारच मोठी दक्षिणा देणें होय, असें सुचविलें आहे. ही सर्व करामत पंतांचीच. 'वसुदान राजास द्रोणानें मारिलें' येवढ्याच अर्थाच्या वाक्यावर व्यासांचा हक्क आहे. ३. समर+अध्वरीं=युद्धयज्ञांत. ४. तत्+असु+दान=त्याच्या प्राणांचें दान. ५. 'कथिले कांहीं. मेले बहु वीर परंतु उभयपक्षांत' असाही पाठ आहे. ६. थोडे थोडे. मेलेल्या मंडळीपैकीं फारच थोड्यांचीं नांवें. ७. भीम. ८. या चौघांचीं नांवें निराळीं सांगण्याचें कारण असें कीं, मुख्यत्वेंकरून या चौघांनींच शत्रुसैन्याचा पुष्कळ नाश केला असें संजयास सांगावयाचें आहे. ९. अग्नि. १०. शत्रुरूप शुष्क तृणांत. ११. मूळ भारतांत प्रस्तुत व याच्या मागच्या (४ थ्या व ३ ऱ्या) अध्यायांत फक्त मेलेल्यांचीं नांवें सांगितलीं आहेत. या दोन्ही अध्यायांत 'अमुक अमक्याच्या हातून मेला' या साध्या वाक्याशिवाय जितका खुबीदार अर्थ असेल, जितके अलंकार असतील व जितकीं साभिप्राय विशेषणें असतील तीं सर्व पंतांचींच आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. एक दोन उपमा व एक दोन विशेषणें व्यासांचीं कदाचित् असतील. यावरून पंतांचें महाभारत भाषांतर नसून स्वतंत्र काव्य होय, असेंच कोणासही म्हणावें लागेल. १२. यांत मुळांतील सातवा अध्याय आणिला आहे. या अध्यायांत मुळांत अनुष्टुप् व इतर वृत्तांचे श्लोक मिळून सत्तावीस आहेत. त्या सर्वांचा सारांश पंतांनीं चौदा गीतींत आणिला आहे. १३. ज्ञातिक्षय, नातलगांचा नाश. १४. राजा; धृतराष्ट्र. १५. भव्य=कल्याण, शुभ, हित. १६. थिटें, तोकडें, अल्पस्वल्प. 'थितें' म्हणजे थोडें या अर्थी पंतांनीं हा शब्द पुष्कळ ठिकाणीं योजिलेला आहे. [ पहा—विराटपर्व अ० ३ गी० ३४; उद्योग० अ० १४ गी० ५ ) अन्वयार्थः—ऐसा बहु बन्धुक्षय परिसुनि तो भूमिवल्लभ व्यथितें चित्तें म्हणे, "अहा! (अरेरे!) म्यां [ पळत्याच्या पाठीं लागून, मोठ्या आशेच्या भरीं भरून ] हातिंचें हि थितें भव्य (प्रत्यक्ष हातांत—स्वाधीन—असणारें ही अल्पस्वल्प सुख) हारविलें. पळत्याच्या पाठीं लागून हातचें गमाविलें—हा भाव. थितें=दैवहतानें. दुर्दैवी पुरुषानें, नीचानें—

सर्वांसि सुगम झालें मत्सेनारण्य[1]; कीं[2] तयामधिले, ।
जे जागरूक[3] भीष्मद्रोणनरव्याघ्र[4], ते चि कीं वधिले. ॥ २
क्षात्रब्राह्मबलाश्रय[5] गुरु, तो ही जाहला चि शांत, नवा[6] ।
घडला पराभव कसा, जो मृत्युजयी[7] तया हि शांतनवा[8]? ॥ ३
कर्ण, द्रोण, पितामह, पडले जेव्हां महाप्रभव[9] शिष्ट, ।
सूता! संशय न धरीं, मद्वीर[10] कबंधतुल्य[11] अवशिष्ट[12]. ॥ ४

असा अर्थ कोणी कोणी करितात, पण तो प्रशस्त वाटत नाहीं. 'थिते' हें 'भव्य' ह्या नामाचें विशेषण. तृतीयान्त पद नव्हे. 'थित' हें 'स्थित' शब्दाचें अपभ्रष्ट रूप आहे असें समजून थित=स्थित=असलेलें. असा अर्थ करावा, असें कोणीं कोणीं म्हणतात, परंतु 'ह्यातिचें' ह्या शब्दाची योजना पूर्वींच झालेली असल्यामुळें असा ओढाताणीचा अर्थ करण्याचें कारण नाहीं.

१. माझी सेना हें अरण्य. २. कारण. ३. जागृत, जागे असलेले, कार्यदक्ष. ४. भीष्म द्रोण नामक नररूपी व्याघ्र (वाघ). जंगलांतील सर्व वाघांस पारध्यांनीं मारून टाकिल्यानंतर त्या जंगलांत शिरण्यास कोणीही भीत नाहीं. त्याचप्रमाणें भीष्म व द्रोण जोंपर्यंत माझ्या सैन्यांत होते, तोंपर्यंत माझ्या सैन्यांत निर्भयपणें शिरण्यास कोणीही धजला नाहीं, पण आतां ते दोघे पडल्यामुळें पाहिजे तो माझ्या सैन्यांत शिरून त्याचा पराभव करूं शकेल, असें सांगण्याचा धृतराष्ट्राचा उद्देश. सेनेवर अरण्याचा आरोप व त्यास अनुकूल असा व्याघ्राचा आरोप भीष्मद्रोणांवर करून पंतांनीं येथें सुरेख **परंपरितरूपक** साधिलें आहे. येथील 'नर' शब्दाची योजना निरर्थक दिसते. भीष्मद्रोणांना एकदम 'व्याघ्र' असें म्हटलें असतें, तर तें ज्यास्त रसपोषक झालें असतें. ५. क्षात्रबलाचा व ब्राह्मबलाचा आश्रय—आश्रयस्थान—असा द्रोणाचार्य. ब्राह्मण असून धनुर्विद्याविशारद असल्यामुळें द्रोणास 'क्षात्रब्राह्मबलाश्रय' असें म्हटलें आहे. ६. कधींही घडला नाहीं असा. जो मृत्युजयी तया हि शांतनवा नवा पराभव घडला कसा?—हा अन्वय. या पूर्वीं भीष्मास कधींही पराभव घडला नव्हता. म्हणून हा पराभव 'नवा' म्हणजे अननुभूत असा होय. 'नवा पराभव' म्हणजे पूर्वीं एकदां पराभव घडला व हा आतां नव्यानें पुन्हां पराभव घडला, असाही अर्थ होऊं शकेल, पण तो येथें कथासंदर्भानें ग्राह्य नाहीं. ७. मृत्यूला—यमाला—देखील जिंकणारा. एवढ्या धैर्यशाली वीरास पराभव कसा घडला? असें ध्वनित केलें आहे म्हणून हें साभिप्राय विशेषण आहे. मृत्युजयीचा अर्थ दुसराही होऊं शकेल. मृत्यु आहे ज्याच्या ताब्यांत असा; वाटेल तितके दिवस जिवंत राहून आपल्या इच्छेप्रमाणें वाटेल तेव्हां देह ठेवण्याचें सामर्थ्य आहे ज्यास असा. मर्जीस येईल तेव्हां मरण्याची शक्ति भीष्मास त्याच्या बापाकडून मिळाली होती. "स्वच्छंदमृत्यु हो अशि आशी तातें हि" [मोरो०—महाभा० आदि० अ० १४, गी० १०० पद्य.] शंतनूच्या वराची आठवण देण्याकरितांच कीं काय 'भीष्म' असें न म्हणतां 'शांतनव' असें म्हटलें आहे. ८. भीष्माला. ९. महापराक्रमी. १०. ह्याचा कर्ता 'मीं'. ११. शिररहित शरीरासारखे. १२. बाकी राहिलेले.

उरले कोण? किती? तें[1], सावध आहें अशांत[2], ऐकों दे; ।
जैं[3] मज मूर्च्छा येत्ये, ब्रह्मांड, भ्रमतमें[4] चि तैं, कोंदे[5].' ॥ ५
'[6]आहे अश्वत्थामा, कृतवर्मा, शल्य, कृप दुराधर्ष[7], ।
अद्यापि तो हि आहे, दे जो अक्षज्ञ[8] बहु तुम्हां हर्ष. ॥ ६
शल, चित्रसेन, दुःशल, सत्यव्रत, सत्यसेननाम बली, ।
पुरुमित्र, सुषेण, असे असति तुझे पुत्र, ज्यांसि इष्ट कली[9]. ॥ ७
पुत्र जरासंधाचे श्रुतवर्मजयादि शेष आहेत, ।
कैतव्यांचा अधिपति जपतो पुरवावया तुझा हेत. ॥ ८
चित्रांगद[10] श्रुतायुध सुधृतायुध चित्रसेन नररत्नें, ।
म्हणति, 'सपत्नप्राण[11] ग्रासूं, साधूं तुझा[12] चि जय यत्नें.' ॥ ९
कर्णाचे पुत्र तिघे, उरले बा! जेंवि भग्नपुच्छाही[13], ।
करितिल रण, तेजस्वी; पितृपरिभव[14] साहवे न तुच्छा[15] ही. ॥ १०
गजसेनेच्या मध्यें दुर्योधन शोभतो पुरंदरसा[16], ।
अत्यभिमानी रिपुबळजलधिमथननरशरीरमंदरसा[17].' ॥ ११

---

१. तें=सविस्तर वर्तमान. 'उरले कोण, किती ते' असें पाठांतर. २. अशांत=इतक्यांत, तोंच. आपणास मूर्च्छा येणार हें धृतराष्ट्र जाणूनच होता (पुढें गीति १४ पहा). ३. जैं=जेव्हां; तैं=तेव्हां. ४. भ्रमांधकारानेंच. ५. व्याप्त होई. ६. येथून संजयाच्या उत्तरास प्रारंभ होतो. मुळांत जिवंत राहिलेल्या वीरांच्या वर्णनाचे उपजात्यादि वृत्तांचे वीस श्लोक आहेत. पण पंतांनीं तें वर्णन नऊ गीतींत आटपून घेतलें आहे, तें केवळ विस्तारभीतीनेंच होय. ७. सामना करण्यास फार कठीण. ८. द्यूत जाणणारा, शकुनि. ९. कलह. १०. 'चित्रांगद श्रुतायू सधृतायुध' असें पाठांतर. ११. शत्रूंचे प्राण. सपत्न=शत्रु. १२. दुर्योधनाचाच. १३. भग्न+पुच्छ+अहि=तुटलेलें+शेंपूट+साप=छिन्नपुच्छ सर्प. कर्णाच्या पुत्रांस हें विशेषण फार योग्य आहे. एकदां मार खाऊन गेलेला साप हटकून मारणाऱ्यास कधीं ना कधीं चावतो अशी समजूत आहे. भग्न=ठेंचलेलें, चेंचलेलें—असा अर्थ केला तरी चालेल. १४. बापाचा पराभव. बापाचा अपमान ज्यानें केला असेल, त्याचा सूड उगविण्याविषयीं हलकट मनुष्य देखील यत्न करीत असतो; मग कर्णाचे जे पुत्र, त्यांस बापाच्या पराभवाविषयीं वाईट वाटत असेल, व ते बापाच्या मरणाबद्दल पांडवांवर सूड उगवून घेतील यांत काय आश्चर्य?—असा भाव. १५. नीच मनुष्याला; ज्यास स्वाभिमान नाहीं, अशाला. १६. इंद्रासारखा. १७. रिपु+बळ+जलधि+मथन+नर+शरीर+मंदर=शत्रु+सैन्य+समुद्र+

भूप म्हणे, 'रे सूता! जयवार्ता दूर. काय तूं वदसी?।
उरले खरे परेत चि बहुत परजिती कबंध ही सदसी ॥ १२
गुरु, कर्ण, भीष्म मेले; उरले ते मृत चि; काय परिसों गा!।
वीर खरे ते गेले; शुद्धयशश्री कधीं न वरि सोंगा. ॥ १३

---

घुसळण+मानव+देह+मंदरनामक पर्वत=शत्रूंचा सैन्यरूपी समुद्र घुसळण्याकरितां [ उत्पन्न झालेला ] मानवदेहरूपी मंदराचल. ज्याप्रमाणें मंदराचल समुद्र मंथन करण्यास समर्थ, तसाच दुर्योधन शत्रुसैन्य मथून संक्षुब्ध करण्यास शक्त आहे—असा भाव. प्रस्तुत स्थलीं समुद्रमंथनकथा अनुसंधेय आहे. समुद्रमंथनाच्या वेळीं देवासुरांनीं मंदर पर्वतास मंथनदंड (रवी) केला होता, म्हणून दुर्योधनाचें त्याशीं साम्य.

१. धृतराष्ट्र. सार्थान्वयः–[ वरील वर्णनांत संजयानें कर्णपुत्र खातरीनें सूड उगवितील, शत्रूंची दाणादाण उडविण्यास दुर्योधन समर्थ आहे, इत्यादि आशा दाखविल्या त्या खोट्या आहेत असें जाणून ] भूप (धृतराष्ट्र) [ संजयास ] म्हणे, 'रे सूता! जयवार्ता दूर (जयाची गोष्ट आतां फार दूर गेली; जयाची आशा सोड) काय तूं वदसी? (जय मिळेल–दुर्योधनादिक शत्रुसैन्य मंथन करण्यास समर्थ आहेत, अशा व्यर्थ आशेच्या गोष्टी कां बोलतोस?) उरले [ ते ] (दुर्योधनाच्या सैन्यांत अद्यापि जे वीर जिवंत आहेत असें तूं म्हणतोस ते सर्व वीर) खरे परेत चि (खरोखर मृतच होत, जिवंत राहूनही मेल्यासारखेच होत.) [ यांच्या हातून जर कांहीं शौर्य होईल तर ] कबंध ही (शिरोविहीन देह–धड देखील) सदसी (उत्तम खड्ग) बहुत परजिती. (अनेक रीतींनीं फिरविती–तरवार फिरविण्याचे चमत्कार करून दाखविती–पराक्रम करती). धृतराष्ट्राच्या म्हणण्याचा उद्देश असा, कीं आतां उरलेल्या सैन्यांत कांहीं अवसान नाहीं; तें लढून जय मिळवील असें म्हटल्यास धडेंही युद्ध करून जय मिळवितील असें कां म्हणूं नये? येथें **मिथ्याध्यवसति** अलंकार झाला आहे. तल्लक्षणः–'किंचिन्मिथ्यात्वसिद्ध्यर्थं मिथ्यार्थांतरकल्पनम्। **मिथ्याध्यवसतिः**' [ कुवलयानंद ] म्हणजे, जेथें कांहीं मिथ्यार्थाच्या सिद्धीसाठीं (प्रख्यात) मिथ्याभूत अर्थाची कल्पना केलेली असते, तेथें **मिथ्याध्यवसति** नामक अलंकार होतो. २. प्रेतन्वि, मृतन्वि. ३. परजतात, फिरवितात. ४. धड; शिरोविहीन शरीर. ५. तीक्ष्ण खड्ग. ६. गा (अगा संजया)! काय परिसों? (काय ऐकूं! सर्व गोष्ट ऐकिल्यासारखीच आहे.) येथें धृतराष्ट्राचा शोक वाढत चालला. हें या निराशाद्योतक वाक्यांनीं कवीनें सुचविलें आहे. ७. खरे वीर जे होते ते गेले. 'खरे' शब्द गेलेल्या वीरांस लाविल्यामुळें असलेले वीर 'खरे' नव्हेत, 'ढोंगी' होत असें सुचविलें आहे. ८. पवित्र अशी यशोलक्ष्मी. ही कन्या शूरास वरिते; ढोंगी शूरास वरीत नाहीं. धृतराष्ट्र म्हणतो, कीं मनुष्य खरोखर शूर असल्याशिवाय त्याला नुसत्या ढोंगानें जयप्राप्ति होत नाहीं. नाटकांत नुसतें शूराचें सोंग घेतल्यानें मनुष्य शूर होत नाहीं. ९. चतुर्थ पाद उत्तम सुभाषितरूप आहे.

स्वजयप्रासादाचे पडले मोडोनि भीष्म-गुरु खांब. ।
शोकभरें मज मूर्च्छा आली क्षणमात्र संजया ! थांब.' ॥　　१४

## अध्याय सहावा.

इष्टविरहशोकोत्थित दुःसह मूर्च्छेत लोटली घटिका. ।
कर्णवध क्षितिपतिच्या चित्तास गमे क्षणक्षणीं लटिका. ॥　　१

१. आपल्या जयरूप राजमंदिराचे. **भीष्म-गुरु** [हे] स्वजयप्रासादाचे खांब मोडोनि पडले—असा अन्वय. २. 'जया' स 'प्रासाद,' व 'भीष्मगुरूस' 'खांब' असें म्हटल्यामुळें हें **परंपरितरूपक** होय. हा अलंकार **पं**तांचाच. ३. हें गीत्यर्ध फारच हृदयद्रावक आहे. बाराव्या गीतीपासून चौदाव्या गीतीपर्यंत **धृ**तराष्ट्राचें जें भाषण आहे, तें **करुण**रसाचें उत्तमोत्तम व पूर्णोदाहरण आहे. कारण करुणरसास पोषक असे आलंबनोद्दीपनादिक सर्व प्रस्तुत स्थलीं विद्यमान आहेत. **करुण**रसास पोषक अशा आलंबनादिकांविषयीं असें लिहिलें आहे:—'**करुण**स्य बंधुनाशादय **आलंबनानि** । तत्संबंधिगृहतुरगाभरणदर्शनादयस्तत्कथाश्रवणादयश्च**ोद्दीपकाः** गात्रक्षेपाश्रुपातादयो**ऽनुभावा** ग्लानिक्षयमोहविषादचिन्तौत्सुक्यदीनताजडतादयो **व्यभिचारिणः** ।' [ रसगंगाधरः ] अर्थः—करुणारसाचे बंधुनाशादि हे **आलंबन** (ज्यावर जणों रस अवलबून असतो ते) विभाव; मृतबांधवांच्या घराचें, घोड्यांचें, दागिन्यांचें दर्शन वगैरे व त्यांच्या विषयींच्या गोष्टींचें श्रवण इ० हें **उद्दीपन** (भडकविणारे—अधिक करणारे ) विभाव; जमिनीवर लोळणें, अश्रुपात इ० **अनुभाव**; व ग्लानि ( दौर्बल्यजनक दुःखविशेष) मोह (भयवियोगादिकांमुळें वस्तुस्थिति ओळखण्यास असमर्थ अशी चित्तवृत्ति ), विषाद, औत्सुक्य, दीनता ( आत्मतिरस्कारबुद्धि ), जडता (कोणतेंही काम करण्यास असमर्थ अशी चित्तवृत्ति ) वगैरे **व्यभिचारी** (फार आवश्यक नाहींत, तरी रसाची वृद्धि करणारे व सर्व रसांत साधारण असे ) भाव होत. प्रस्तुत स्थलीं **भी**ष्मादिकांचें मरण व **दु**र्योधनाच्या मरणाची खात्री हे **आलंबनविभाव. सं**जयानें सांगितलेल्या त्यांच्याविषयींच्या कथा ऐकणें व पूर्वींच्या त्यांच्या कथा आठवणें हे **उद्दीपन विभाव**; **धृ**तराष्ट्राचे विलाप, नष्टसंज्ञत्व व निराशेचीं भाषणें हे **अनुभाव**; व त्याचे चिंतौत्सुक्यादि **व्यभिचारीभाव** होत. म्हणून हें भाषण **करुणरसाचें** उत्तम उदाहरण आहे. अशा रीतीनें अलंकारशास्त्राच्या कसोटीस उत्तम रीतीनें उतरण्यासारखें रसपोषण ज्या कवीनें केलें, तो केवळ पौराणिक नसून, त्याचा साहित्यशास्त्रांत चांगलाच प्रवेश होता, असें मानणें साहसाचें होणार नाहीं; आणि असला कवि केवळ भाषांतरकार न ठरतां स्वतंत्र प्रतिभेचा ठरेल यांत संशय नाहीं. ४. मुळांतील आठव्या व नवव्या अध्यायांतील १२१ अनुष्टुप् श्लोकांतील वर्णन **पं**तांनीं या सहाव्या अध्यायांत ७७ गीतींत आणिलें आहे. प्रस्तुत अध्यायांत करुणरसच प्रधान आहे. ५. स्वकीयांच्या वियोगशोकापासून उत्पन्न झालेल्या. ६. राजाच्या; **धृ**तराष्ट्राच्या. 'क्षितिपाच्या' असें पाठांतर. ७. असत्य. 'लटका' असें या शब्दाचें प्रचारांतील रूप आहे.

शोषण[1] जलराशीचें[2], संसर्पण[3] जेंवि रत्नसानूचें[4], ।
अद्भुत वृषमरण[5] गमे, कीं गगनाहूनि पतन[6] भानूचें ! ॥ २
नृपति बहु विलाप करी सूतासि म्हणे, 'अहा! कसें घडलें ? ।
बा संजया ! अकस्मात् रविबिंब गळोनि भूतळीं पडलें[7] ! ॥ ३
जो सिंहद्विपविक्रम[8], वीर, वृषस्कंध[9], वज्रसंहनन[10], ।
वृषगति[11], वृषाक्ष[12], वृषहठ[13], वृष[14], त्याचें मज मृषा[15] गमे हनन[16]. ॥ ४
ज्याच्या भुजाश्रयें करि दुर्योधन पांडवांसवें वैर, ।
क्षत्रकुळीं राम[17] जसा, शत्रुजनीं नित्य वर्तला[18] स्वैर[19]; ॥ ५
कृष्णधनंजययादववीरांतें जो कथंचन[20] न मानी, ।
'गांडीवशार्ङ्गधन्वे[21] मर्दीन' म्हणे[22] 'सबंधुजन[23]' मानी[24]; ॥ ६

---

१. सुकणें. २. समुद्राचें. ३. चलन. ४. मेरूचें. ५. कर्णाचें मरण. ६. या गीतींत ज्या तीन उपमा आहेत, त्या **अभूतोपमा** होत. जी गोष्ट मागें झाली नाहीं, अशा प्रकारच्या असंभव गोष्टीची उपमा असल्यास **अभूतोपमा** होते. **मिथ्याध्यवसति** व **अभूतोपमा** या दोन्ही अलंकारांत मिथ्याभूत उपमानाची कल्पना करावी लागते, पण या दोहोंत फरक असा आहे कीं, **मिथ्याध्यवसतींत** उपमेयाचें मिथ्यात्व सिद्ध करावयाचें असतें, व **अभूतोपमेंत** उपमेयाचें सत्यत्व माहीत असून तसें होणें हा अत्यंत असामान्य प्रकार होय असें वक्त्यास सांगावयाचें असतें. ७. हेंही **अभूतोपमेचें** उदाहरण आहे. ८. सिंहाच्या आणि हत्तीच्या सारखा पराक्रम ज्याचा. ९. वृषाच्या (बैलाच्या–पोळाच्या) स्कंधाप्रमाणें (खांद्याप्रमाणें) आहेत स्कंध ज्याचे. विशाल, अतिस्थूल व बळकट स्कंध आहेत ज्याचे असा. शरीरानें अत्यंत बळकट असलेल्या पुरुषास 'वृषस्कंध' असें विशेषण संस्कृत कवींनीं पुष्कळ ठिकाणीं दिलें आहे. १०. वज्रदेही; संहनन=देह, शरीर. 'गात्रं वपुः संहननं शरीरं' इत्यमरः. कर्ण सहज कवचकुंडलांनीं जन्मला होता म्हणून त्यास वज्रदेही म्हटलें आहे. ११. वृषाप्रमाणें चालणारा. पोळ मंदगतीनें, आढ्यतेनें व आसपासच्या लोकांस भय वाटेल अशा रीतीनें चालतो. तशीच कर्णाची गति आत्मसामर्थ्यसूचक व परभीतिप्रद होती–असा भाव. १२. वृषाच्या डोळ्यांप्रमाणें आरक्त (लाल) डोळे ज्याचे असा. १३. वृषाच्या हठाप्रमाणें आहे हठ (सामना करण्याची पद्धति) ज्याचा. पोळ एकदां कोणाशीं टक्कर देण्यांत भिडला, म्हणजे पराकाष्ठा केल्याशिवाय सोडीत नाहीं, हें प्रसिद्धच आहे. १४. वृष=कर्ण. कर्णाचें वृष हें नांव सार्थ आहे असें दाखविण्याकरितां 'वृषस्कंध' 'वृषगति' 'वृषाक्ष' व 'वृषहठ' हीं विशेषणें योजिलेलीं आहेत. १५. खोटें. १६. संहार. १७. परशुराम. १८. 'वर्तला' यास कर्ता 'ज्याच्या' यांतील गर्भित 'जो' समजावा. १९. स्वच्छंद. २०. कदापि. २१. गांडीवधन्वी (अर्जुन), शार्ङ्गधन्वी (कृष्ण) यांस. २२. जो [कर्ण] कृष्णधनंजय-यादववीरांतें कथंचन (कदापि)

चिंतेंत[1] जो म्हणे, 'मी मारुनि कृष्णार्जुनांसि, या मेहिला[2] ।
साधुनि देईन सख्या[3] ! राया ! दुर्योधना ! वदे वहिला[4]. ॥ ७

बा ! जेणें दिग्विजयीं पुंड्र[5], तरल, काशि, कोशल हि वंग, ।
कैकेय, मद्र[6], तंगण, कांबोज, कलिंग, मत्स्य, शक, अंग, ॥ ८
गांधार, सुम्ह, चीरक आवंत्य, निषाद, अश्मक, विदेह, ।
पांचाळ, कुलिंद, ऋषिक केले[7] जिंकूनि करद[8], सस्नेह; ॥ ९
तो[9] दुर्योधनसेनापति कर्ण कसा धनंजयें वधिला ! ।
अंध छिन्नभुज[10] हि मीं न तरेन शुगब्धिला[11] गतावधिला[12]. ॥ १०
वृष[13] शक्र सुरांत प्रभु, कीं वृष दुसरा नरांत कर्ण, असा ।
तिसरा न ऐकिला म्यां; तो पार्थें मारिला प्रवीर कसा[15] ! ॥ ११

---

न मानी (गणीत नसे, तिरस्कारभावानें पाहात असे) [व जो] मानी [कर्ण] सबंधुजन गांडीव-शार्ङ्गधन्वे मर्दीन [असें] म्हणे,–असा अन्वय. २३. बांधवांसह. २४. मानी स्वभावाचा.

१. चिंतायुक्त असतांही. 'चित्तांत' असें पाठांतर. २. पृथ्वीस. ३. 'साधुनि देईन सख्या......जशी महिला' असें पाठांतर. महिला=स्त्री. ४. त्वरित. ५. पुंड्र इत्यादि देशांवर पांडव अरण्यवासांत असतां कर्ण दिग्विजयास गेला होता. ६. 'कैकय, मद्रक, तंगण' असें पाठांतर. ७. बा (अबा! अगा!) जेणें (ज्या कर्णानें) दिग्विजयीं पुंड्र इ० [देशांचे राजे] जिंकून सस्नेह (स्नेहयुक्त–मित्र) [व] करद (कर देणारे–सामंत) केले–असा अन्वय. ८. कर देणारे. ९. 'तो' चा संबंध ५ व्या गीतींतील 'ज्याच्या', ६ व्यांतील 'जो' ७ व्यांतील 'जो', व ८ व्यांतील 'जेणें' या शब्दांशीं आहे. १०. तुटले आहेत हात ज्याचे असा. कर्णवधानें मी जणों काय हस्तविहीन झालों, असा भाव. ११. शुक्+अब्धि=शोकसागराला. १२. गेली आहे अवधि (सीमा) ज्याची, अमर्यादित, अति-विस्तृत. हें 'शुगब्धिला' याचें विशेषण होय. १३. प्रभु (सर्व देवांचा राजा) शक्र (इंद्र) [हा] सुरांत (देवांत) वृष [होय] (वृषनांवानें प्रख्यात आहे किंवा श्रेष्ठ आहे)कीं (किंवा) कर्ण नरांत (मानवांत) दुसरा (एक सुरांत असल्यामुळें हा दुसरा) वृष (वृष नांवानें किंवा श्रेष्ठ) [होय]. [या दोहोंशिवाय] असा तिसरा [वृष] म्यां न ऐकिला. तो (इंद्राशिवाय ज्याची बरोबरी करण्यास कोणी नाहीं असा) प्रवीर (प्रबल वीर असा कर्ण) पार्थें कसा मारिला ?–हा अन्वय. इंद्रास 'वृषन्' असें नांव आहे. 'सुत्रामा गोत्रभित् वज्री वासवो वृत्रहा वृषा' इत्यमरः. कर्णाचें वृष हें नांव प्रसिद्धच आहे. या नामसादृश्यावरून येथें इंद्र व कर्ण यांचें साम्य सुचविलें आहे. १४. इंद्र व कर्ण यांच्या बरोबरीचा. १५. येथें '[redacted]र्थक नाहीं; विस्मयद्योतक आहे.

[1]उच्चैःश्रवा हयांत, [2]त्र्यंबकसख ‘[3]राज’-शब्द धरित्यांत, ।
[4]प्रवर सुरांत [5]पुरंदर, [6]वैकर्तन हि [7]प्रहार करित्यांत. ॥ १२
[8]ज्याची, [9]कुरुयदुभिन्नक्षितिपनिरोधीं नृपा जरासंधा ।
दे, [10]भगवती, अभयवरदान, [11]श्रितवज्रपंजरा [12]संधा; ॥ १३

---

१. इंद्राचा घोडा. २. कुबेर. कुबेर शिवाचा मित्र म्हणून त्यास ‘त्र्यंबकसख’ हें नांव आहे. ३. ‘राज’शब्द धारण करणाऱ्यांत. कुबेरास ‘राजराज’ असें नांव आहे. ‘मनुष्यधर्मा धनदो **राजराजो** धनाधिपः’ इत्यमरः. ४. अतिश्रेष्ठ. या ‘प्रवर’शब्दाचा संबंध गीतींतील चारही चरणांशीं आहे. हयांत उच्चैःश्रवा प्रवर; राज-शब्द धरित्यांत त्र्यंबकसख (शिवमित्र कुबेर) प्रवर; सुरांत (देवांत) पुरंदर (इंद्र) प्रवर; [व] प्रहार करित्यांत (शरसंधान करणाऱ्यांत—वीर पुरुषांत) वैकर्तन हि (कर्णच) प्रवर होय—असा अन्वय. प्रस्तुत स्थलीं **दीपकालंकार** झाला आहे. तल्लक्षणः—‘प्रकृतानामप्रकृतानां चैकसाधारणधर्मान्वयो **दीपकम्**’ [ रसगंगाधरः ]. म्हणजे, प्रकृत (मुख्य—उपमेय) व अप्रकृत (उपमान) अर्थ साधारणधर्मानें एका वर्णनांत आणिले जातात, तेव्हां **दीपका**लंकार होतो. प्रकृत स्थलीं ‘वैकर्तन हि प्रहार करित्यांत’ हा प्रकृतार्थ आहे. हा ‘उच्चैःश्रवा हयांत’ इत्यादि तीन अप्रकृतार्थांशीं (प्रस्तुत स्थलीं अनावश्यक अशा गोष्टींशीं) ‘प्रवर असणें’ या साधारण धर्मानें जोडण्यांत आला म्हणून **दीपक**. प्रकृताप्रकृतावर दीपाप्रमाणें प्रकाश पाडतें म्हणून दीपक ही संज्ञा. ५. इंद्र. ६. कर्ण. ७. प्रहार करणाऱ्या वीरांत; शरसंधानप्रवीणांत. ८. ज्याची (ज्या कर्णाची) श्रितवज्रपंजरा (आश्रितांना वज्रपंजर—वज्राचा पिंजराच कीं काय अशी) भगवती (साक्षात देवीच कीं काय अशी) संधा (प्रतिज्ञा) कुरुयदुभिन्नक्षितिपनिरोधीं (कौरव व यादव शिवाय करून सर्व राजांस जिंकण्याच्या कामीं) जरासंधा नृपा (जरासंध नांवाच्या राजास) अभयवरदान दे (म्हणजे असा शूरही ज्याचा आश्रय करीत असे) तो कांतिजितस्वर्णवर्ण (सोन्यापेक्षांही अधिक तेजस्वी) कर्ण पांडुसुतें (अर्जुनानें) रणीं वधिला—असा सार्थान्वय. निरोध= प्रतिबंध. ९. ‘कुरुयदुभिन्नक्षितिपतिरोधी’ असें पाठांतर. कुरु(वंशीय) व यदु(वंशीय) राजांशिवाय दुसऱ्या सर्व राजांस रोधणाऱ्या (पुढें न जाऊं देतां अडविणाऱ्या; जिंकिणाऱ्या) अशा. हें जरासंधाचें विशेषण. जरासंध महायोद्धा असून त्यानें यादव व कौरव यांशिवाय सर्वांस जिंकिलें होतें. याचा जांवई जो कंस त्यास कृष्णानें मारिल्यामुळें, यानें त्याशीं सतरा वेळ जाऊन युद्ध केलें; परंतु तितक्या वेळांही याचा पराभव झाला. कर्णानें यास वश करून कौरवांच्या पक्षांत घेतलें होतें. म्हणूनच वरील विशेषणांत ‘कुरुयदुभिन्न’ असें म्हटलें आहे. [जरासंधकथा—मोरोपंतकृत सभापर्व अ० १ मध्यें दिली आहे.] १०. भगवतीरूप संधा. ११. आश्रितांचा वज्ररूप पिंजराच अशी, आश्रयस्थान. ‘श्रीवज्रपंजरा’ असा पाठ आहे. तो पाठ घेतल्यास (१) शुभप्रद वज्राचा पिंजराच कीं काय अशी (२) [श्री=अद्भुतबळ] कर्णाचें अद्भुतबळच अगाध शक्तिरूपी वज्रपंजर. कर्ण अत्यंत बलवान् असल्यामुळें त्यानें दिलेला अभयवर वज्राच्या पिंजऱ्याप्रमाणेंच होय—असा भाव. १२. प्रतिज्ञा.

तो वधिला [1]पांडुसुतें [2]कांतिजितस्वर्णवर्ण [3]कर्ण रणीं; ।
शोकार्णवीं बुडालों; झालों [4]हतपुत्रमित्र वृद्धपणीं. ॥ १४
वज्राहुनि कठिण हृदय, [5]शोकघनाहत तऱ्ही तगे, न चिरे. ।
बा ! [6]दग्धपक्षबल मी [7]संपातिद्विज तसा [8]जगेन चि रे ! ॥ १५
[9]पावककुंडांत शिरूं; कीं [10]सेवूं संजया ! महाविष मीं ? ।
किंवा चढों पडाया मरणार्थ [11]महाद्रिच्या शिरीं [12]विषमीं ?' ॥ १६
संजय म्हणे, '[13]महर्षिप्रतिमा ! विव्हल न हो विषादानें; ।
[14]मरण अकाळीं न घडे [15]भृगुपातें, [16]पावकें, [17]विषादानें. ॥ १७
तुज [18]शुचिवंशयशश्रीश्रुततपइत्यादिसद्गुणीं युक्ता ।
[19]संत ययाति म्हणति, '[20]यां' त्यजितिल पाहोनि मतिगृहोन्मुक्ता.' ॥ १८

---

१. अर्जुनानें. २. कांतीनें जिंकिला आहे सुवर्णाचा वर्ण ज्यानें असा. ३. 'स्वर्ण-वर्ण-कर्ण' हें '**अश्वधाटीयमका**' चें उदाहरण. 'यमकाच्या पाठीं व पुढें निराळें व्यंजन असल्यामुळें, प्रत्येक व्यंजनावर जशी काय उडी मारीत यमक चाललें आहे असा भास झाला, म्हणजे '**अश्वधाटीयमक**' झालें. '**अश्वधाटीयमक**' जसें चरणाच्या आरंभापासून तसें एकदम मधून किंवा आद्यंतींही गुंफिलेलें आढळतें.' [अलंकारमीमांसा-पृ० ५५.] ४. मारले गेले आहेत पुत्र व मित्र ज्याचे, असा. ५. शोकरूपी घनानें (घणानें)मारिलें असतांही. वज्राहून हृदय कठीण, म्हणूनच तें शोकरूपी घणापुढें टिकतें, शोकरूपी घणानें तें फुटत नाहीं-असा भाव. येथें '**व्यतिरेका**'लंकार आहे. ६. याचे दोन अर्थ होतील. **धृतराष्ट्र**पक्षीं-दग्ध (जळाले आहेत) पक्ष (स्वपक्षांतले लोक) [व] बल (सैन्य)ज्याचें असा. **संपाति**पक्षीं-दग्ध (सूर्याच्या प्रखर तेजानें जळाले आहेत) पक्ष (पंख) [व] बल (शक्ति) ज्याचें असा. ७. **संपाति**नामक पक्ष्यासारखा. हा **जटायू**चा भाऊ. एकदां हा सूर्यमंडळ गांठण्यास आकाशांत उडून सर्वपक्षदग्ध असा **महेंद्र**पर्वतावर पडला. अशा रीतीनें 'दग्धपक्षबल' होऊन **संपाति** त्या पर्वतावर बहुत काळ राहिला. ८. ज्या अर्थीं **कर्ण**मरणदुःखानें मी मृत झालों नाहीं, त्या अर्थीं **संपाती**प्रमाणें मी अनेक दिवस दुःखांत घालवीन, असें वाटतें. ९. अग्निकुंडांत. १०. विष सेवणें=विष पिणें. ११. मोठ्या पर्वताच्या. १२. अत्यंत कठीण अशा, चढण्यास अत्यंत दुस्तर अशा. हें 'शिरीं' (शिखरीं) याचें विशेषण. १३. महर्षींची बरोबरी करणाऱ्या **धृतराष्ट्रा** ! १४. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १५. कड्यावरून उडी टाकिल्यानें. १६. अग्नीनें. १७. विष+आदानें=विषभक्षणानें. १८. शुचि (पवित्रपणा), वंश (सद्वंश-प्रख्यात वंश-पौरवान्वय), यश (कीर्ति), श्री (लक्ष्मी), श्रुत (वेदविद्या व इतर शास्त्रें), तप (स्वधर्माचरण) इत्यादि सद्गुणांनीं युक्त-असा अर्थ. १९. संत (सज्जन) शुचिवंशयशश्रीश्रुततपइत्यादिसद्गुणीं युक्ता तुज **ययाति** म्हणति (हा वरील सद्गुणांनीं **ययाती**च होय असें म्हणतात,) [पण तेच संत आतां] मतिगृहोन्मुक्ता (बुद्धिरूप

धृतराष्ट्र म्हणे, 'साधो ! दैव चि परमप्रभु प्रसिद्धगुणें, ।
कीं सत्यकाम तैसें पौरुष नोहे चि; हें उदंड उणें. ॥ १९
दुर्बळ पौरुष साचें, कीं वांच्छित सर्व ही न साधे या, ।
छेदी पार्थ कुठारें दैवबळें शालशाखिराधेया. ॥ २०
मारुनि युधिष्ठिराच्या वीर्यवती सुरचमूनिभा सेना, ।
मेला कर्ण म्हणसि, हें सत्य विचारें-करूनि भासेना. ॥ २१
मेला कर्ण तन्हि कसा तच्छोकें संजया ! न मेलों मीं ? ।
देवीं मदायुसंख्या केली माझ्या चि मज गमे लोमीं ॥ २२

---

घराचा त्याग केला आहे ज्यानें अशा ) [तुला] पाहोनि संत 'ययाति' शब्दांतील 'या' त्यजितील, म्हणजे तुला 'यति' म्हणतील. 'या त्यजितिल पाहोनि धृति गृहोन्मुक्ता' असा पाठभेद आहे, तो स्वीकारिल्यास या (सुना वगैरे) तुला गृहोन्मुक्ता पाहोनि धृति (धैर्य) त्यजितिल—असा अर्थ करावा. गृहोन्मुक्त=घराविषयीं विमनस्क, खट्टू, दुश्चित्त. २०. 'ययाति' नामांतील मध्यम वर्ण—पंत. धृतराष्ट्राला 'ययाति' असें न म्हणतां 'यति' असें म्हणतील—ह्या संजयाच्या भाषणांतील स्वारस्य नीटसें लक्ष्यांत येत नाहीं. यति म्हणजे संन्यासी ( मायामोहविमुक्त ) असें कोणीं कोणाला म्हटलें, तर त्यांत कमीपणा वाटण्याचें कारण काय? 'यति' हा शब्द पूर्वी कधीं तुच्छतादर्शक समजला जात असे, असें वाटत नाहीं.

१. अतिसमर्थ. २. आपल्या प्रसिद्ध अशा गुणानें. पौरुषास हाणून पाडणें, हाच दैवाचा प्रसिद्ध गुण. ३. ज्याची इच्छा तडीस जाते असें. ४. हें (पौरुष—पुरुषप्रयत्न) [त्या दैवापेक्षां] उदंड (फार) उणें (कमी—बलहीन) [आहे]—असा अन्वय. ५. पौरुष दुर्बल साचें (खरोखरच सामर्थ्यहीन आहे) कीं (कारण) या (या पौरुषास) वांच्छित सर्व ही (पाहिजे असलेल्या सर्व गोष्टी) साधे न (साधत नाहींत). [हें कशावरून तर—अत्यंत पौरुष करूनही कर्ण विजयी न होय व] पार्थ (अर्जुन) दैवबळें (दैवाच्या साहाय्यानें) शालशाखिराधेया (शालवृक्षवत् असणाऱ्या कर्णास) कुठारें (जणों काय कुऱ्हाडीनें) छेदी—असा अन्वय. हें **अर्थांतरन्यासाचें** उदाहरण आहे. येथें गीतींतील पूर्वार्धाचें समर्थन उत्तरार्धानें केलें आहे. ६. कुऱ्हाडीनें. ७. शाल+शाखि+राधेया=वृक्षविशेष+वृक्ष+कर्ण. शालवृक्षासारख्या कर्णास. शालवृक्षाप्रमाणें उन्नत व दृढ अशा कर्णास. शाल=सायल्याचें झाड. ८. देवसेनातुल्य. देवसेना (सुरचमू) म्हणजे अमरांची सेना असा सामान्य अर्थ. पण 'देवसेना' असें विशेष नांव, तारकासुराच्या वधाकरितां कुमारस्वामीच्या सैन्याधिपत्याखालीं सर्व देवांचें जें जंगी सैन्य एकत्र झालें होतें त्यास आहे. ९. हें (कर्ण मेला असें म्हणणें) विचारें करूनि (विचार करितां) सत्य भासेना—असा अन्वय. १०. त्याच्या (कर्णाच्या) शोकानें. ११. देवीं (देवानें) मदायुसंख्या (माझ्या जीवितकालाची मर्यादा) माझ्या चि लोमीं (माझ्या आंगावर जितकीं लोमें (कैंस) आहेत तितकीं वर्षें) केली [असें] मज गमे—असा अन्वय. १२. माझ्या आयुष्याची संख्या. १३. केशीं, रोमांनीं. लोम=आंगावरील बारीक कैंस, लंव.

होते म्हणत मला 'हा प्रिय[1]सख [2]कुरुराज [3]नाकपाळाचा,' ।
[4]तदधिक गमें शतगुणें संततिनें मी जना [5]कपाळाचा. ॥ २३

आतां ते चि '[6]करंटा' म्हणतील मला, असी दशा आली; ।
या दुर्दशेसि [7]लोकत्रितयीं नाहीं च संजया ! [8]आली. ॥ २४

हे गांधारी जरि शतपुत्र, [9]मुनीच्या अनुग्रहें, व्याली, ।
झाली वंध्या चि पहा. बहु [10]नियं[11]ति क्रौर्य धरि, न हे [12]व्याली. ॥ २५

कर्णामागें जरि मी वांचेन, क्लेश कोणते [13]अन्य ? ।
जन निंदितील ते चि, स्वमुखें जे बोलिले मला 'धन्य'. ॥ २६

[14]कर्णरहित मुख तैसें लोकीं [15]श्रीहीनजीवन स्पष्ट, ।
[16]नष्टस्वकीर्तिसत्कृति जन पावे ते न [17]नारकी कष्ट. ॥ २७

---

१. आवडता दोस्त. २. धृतराष्ट्र. ३. इंद्राचा. ४. मी संततिनें (शंभर पुत्र असल्यामुळें) शतगुणें (शंभरपट) तदधिक (इंद्रापेक्षां अधिक) कपाळाचा (नशीबाचा–नशीबवान असा)जना गमें (समजला जात असें). इंद्रास जयंत इ० एक दोन पुत्र, व मला शंभर पुत्र. तेव्हां लोक मला इंद्रापेक्षांही भाग्यशाली समजत होते–असा भाव. ५. नशीबाचा. ६. दुर्दैवी. ७. त्रिलोकांत. ८. सखी. अर्थात्–बरोबरी, सादृश्य. ९. व्यासांच्या प्रसादानें गांधारीस मुलें झालीं होतीं. [मोरोपंतकृत आदिपर्व–अ० १७ पहा.] १०. दैव. ११. नियति बहु क्रौर्य धरि, हे व्याली (ही सर्पिणीची जात) [देखील इतकें क्रौर्य] न (न धरी)–असा सान्वयार्थ. किंवा, नियति बहु क्रौर्य धरि [पण त्यास इतका क्रूर होण्याचें कारण नव्हतें. कां कीं] हे (ही गांधारी) व्याली (सर्पीण) न (नाहीं). सर्पीण एक वेळ पुष्कळ अंडीं घालिते, व त्यांचा नाशही फार होऊन अगदीं थोडीं अंडीं राहतात, हें प्रसिद्धच आहे. धृतराष्ट्र म्हणतो, माझी बायको सर्पीण नसतां, दैवानें तिची संततीसंबंधानें सर्पिणीसारखी स्थिती केली हें न्याय्य नव्हे. १२. सर्पीण. १३. या दुःखाच्या मानानें सर्व दुःखें लहानच (अक्लेशच) होत–असा भाव. १४. कर्णरहित मुख (कर्ण युद्धांत मेल्यावरही निर्लज्जपणें लोकांस तोंड दाखविणें) तैसें (त्याचप्रमाणें) लोकीं (जगांत) नष्टस्वकीर्तिसत्कृति (नष्ट झाली आहे ज्याची कीर्ति व सत्कृति असा) [होऊन] स्पष्ट श्रीहीनजीवन (उघडपणें दारिद्र्यांत दिवस काढणें) [म्हणजे जे कष्ट होतात] ते कष्ट नारकी (नरकांत पडलेला) जन न पावे (तसे कष्ट मनुष्य नरकांत देखील पावत नाहीं)–असा अन्वय. किंवा 'न नारकीं कष्ट' असा पाठ आहे, तो स्वीकारिल्यास. कर्णरहित मुख तैसें (कर्णरहित मुखाप्रमाणें) लोकीं श्रीहीनजीवन स्पष्ट [कष्ट होय]. *नष्टस्वकीर्तिसत्कृति जन (नष्ट झाली आहे कीर्ति व सत्कृति ज्याची असा मनुष्य)* ते [तसले] कष्ट नारकीं (नरकांतही) न पावे–असाही अन्वय करितां येईल. पहिल्यांत 'नष्टस्वकीर्तिसत्कृति' हें 'धृतराष्ट्रा'चें व दुसऱ्या अन्वयांत 'जना'चें विशेषण आहे. १५. धनविहीन जिणें. १६. गेली आहे पूर्वार्जित कीर्ति व सत्कृति (सत्कार्यें) ज्याची असा. १७. नरक व नारक हे समानार्थक शब्द आहेत.

पंगूस[1] गमन, वांच्छित[2] अधना, तृषितास नीरकणपानें[3] ।
तृष्णाशमसम[4], दुर्घट पुत्राभिप्राय मज गमे ज्ञानें. ॥ २८
माझा सुत दुःशासन भीमें वधिला असें तुवां कथिलें, ।
तेणें भस्म चि झालें कर्णद्वय जेंवि पाजिल्या कथिलें[5]. ॥ २९
व्याघ्र पहातां होतो जेंवि बहु[6] त्रस्त[6] कांतराक्ष[7] ससा, ।
मी काय पुत्र[8]? येतां भीम करायासि घात राक्षस-सा. ॥ ३०
शोकद तोखंद[9] ही सद्व्रत, न च्युत[10]-वीरपुत्रवध, मातें; ।
कीं इहपरत्र नाहीं धर्मभ्रंशें सुकीर्ति अधमातें[11][12]. ॥ ३१

---

१. अन्वय-ज्ञानें (ज्ञानदृष्ट्या विचार केल्यास-दीर्घ दृष्टीनें पाहिल्यास) मज (मला) गमे (वाटे) [कीं] अधना वांच्छित (इष्ट), पंगूस गमन (चालणें) [जसें दुर्घट] [व] तृषितास नीरकण-पानें (जलबिंदूंच्या पिण्यानें) तृष्णाशमसम (तहान भागणें जसें दुर्घट) [तसेंच] पुत्राभिप्राय माझ्या पुत्राचा उद्देश-योग्य शूर जवळ नसतां आतां पांडवांस मारून राज्य करूं, अशी (दुरिच्छा) दुर्घट [होय]. २. 'अधना पंगूस वांच्छित गमन' असा अन्वय कोणी कोणी करितात. पंगूस 'अधन' विशेषण जोडण्याचें कारण, जर सधन पंगू असला तर त्याला वाहनादिकांनीं इष्ट गमन साध्य आहे. ३. नीर+कण+पानें=पाणी+बिंदु+प्याल्यानें; एकादा थेंब प्याल्यानें. नीरकण=जलबिंदु; तुषार. ४. तृष्णेच्या शमनाप्रमाणें; तहान ज्याप्रमाणें भागेल त्याप्रमाणें. प्रस्तुत स्थलीं भागणार नाहीं-असा भाव. 'तृष्णाशनसम' असाही पाठ आहे. तृष्णा+अशन+सम=तहान+अन्न(भूक)+बरोबर. तहान व भूक ज्याप्रमाणें भागतील त्याप्रमाणें-म्हणजे भागणार नाहींत, असा भाव. ५. कथिलानें. पूर्वी एकाद्या गुन्हेगारास शिशाचा रस पाजण्याची शिक्षा देत असत. नजरचुकीनें पंतांनीं 'शिशा' बद्दल 'कथिला'चा उल्लेख केला असावा, असें वाटतें. ६. फार भयाकुल. ७. भयचंचलनेत्र. ८. माझा मुलगा दुःशासन. ९. तोषद, हर्षद. १०. भ्रष्ट. ११. मातें सद्व्रत शोकद [व] तोखद ही [होय], च्युतवीरपुत्रवध [तसा] न-असा अन्वय. युद्धांतून पळून न जातां मरणें हें सद्व्रत मला पुत्रमरणामुळें दु.ख देणारें व वीरास उचित अशा वर्तनामुळें संतोष देणारें आहे. पण युद्धांतून पळून जातांना झालेला पुत्राचा वध मला (धृतराष्ट्राला) दुःख किंवा संतोष देणार नाहीं-असा मथितार्थ. 'शोकद तोखद ही सद्वृत्ताच्युतवीरपुत्रवध मातें' असा रा० तेंडुलकरांनीं छापिलेल्या प्रतींत पाठ आहे. सत्+वृत्त+अच्युत+वीर+पुत्र+वध=सज्जन+चरित+न सुटलेला+शूर+मुलगा+मरण. सज्जनाचें जें (केलेली प्रतिज्ञा तडीस नेण्याचें) वृत्त त्यास अनुसरून (भीमाच्या सत्यप्रतिज्ञेस अनुसरून) झालेला माझ्या वीरपुत्राचा वध. [संदर्भावरून सद्व्रताच्युतत्व भीमाचें होय, असा आम्हीं अर्थ केला आहे. या अर्थानुरोधानें 'तोखद' कांहीं अंशीं औपरोधिक आहे. कित्येकांच्या मतें, भीमाच्या सद्व्रताच्युतत्वामुळें धृतराष्ट्राला संतोष होण्याचें कारण नाहीं; म्हणून व्रताच्युतत्व दुःशासनाचेंच होय. त्यांनीं न सोडिलेलें व्रत म्हणजे युद्धांतून पळून न जातां मरणें हेंच होय.] १२. हें गीत्यर्ध उत्तम सुभाषित आहे.

सत्यप्रतिज्ञ[1] भीम स्तुति पावे बंधुकंठलोहितपानें[2], ।
मारी[3] वशिष्ठसुतशत जो मुनि[4] विश्वांत[5] कीर्ति[6] तो हि तपानें. ॥ ३२
झाला[7] वितृष्ण[8] मत्सुतरक्ताच्या[9], यातुधानसा[10], पानें; ।
हें नवल काय? बापा[11]! त्यजिजे तृषितें दुधा न सापानें. ॥ ३३
दैव[12] चि मुख्य, जयपराजयवर द्याया जनास, दैवत[13] रे ! ।
तदनुग्रहें चि सर्वव्यसनमकरसादना[14] सदैव[15] तरे[16]. ॥ ३४
'न करीं युद्ध, नव्हे हित' भीष्म म्हणे, तें चि जाहलें तथ्य[17]; ।
तें[18] दुर्योधन नेघे, आतुर[19] जैसें सुवैद्यमत[20] पथ्य. ॥ ३५
शरतल्पशयानें[21], जळ जेव्हां मागीतलें, नृपें तृषितें, ।
भूतळ[22] भेदुनि दे जळधारा पानार्थ पार्थ त्या ऋषितें. ॥ ३६

---

१. हे आर्यागीति-पंत. हींत गीतीपेक्षां शेवटीं एक गुर्वक्षर अधिक असतें इतकेंच. सत्यप्रतिज्ञ=सत्य झाली [आहे] प्रतिज्ञा (दुःशासनरक्त पिण्याची) ज्याची असा (भीम). २. दुःशासनाच्या कंठांतील रक्ताच्या प्राशनानें. लोहित=रुधिर, रक्त. ३. 'मारी वसिष्ठसुत जो मुनि विश्वामित्र कीर्ति तो हि तपानें' असाही पाठ आहे. विश्वाचा मित्र तो विश्वामित्र; किंवा विश्व आहे मित्र ज्याचें तो विश्वामित्र. 'मित्रे चर्षौ' या पाणिनीय सूत्रानें विश्व+मित्र=विश्वामित्र. ४. धृतराष्ट्र म्हणतो, कीं वसिष्ठाचे शंभर पुत्र मारणाऱ्या विश्वामित्रानें जितकी कीर्ति मिळविली, तितकीच भीमानें माझे शंभर पुत्र मारून, आपली प्रतिज्ञा पूर्ण करून मिळविली. हीं वाक्यें औपरोधिक आहेत. ५. विश्वामित्र. ६. 'तत्कीर्ति' असा पाठ आहे. पण असा पाठ घेतल्यास छंदोभंग होत असल्यामुळें हा ग्राह्य नाहीं. ७. 'झाला' याचा कर्ता 'भीम'. ८. तृष्णारहित; तहान भागलेला. ९. माझ्या मुलाच्या (दुःशासनाच्या) रक्ताच्या (पानें). १०. राक्षसाप्रमाणें. ११. बापा! (बाबा संजया!) [भीम] मत्सुतरक्ताच्या पानें यातुधानसा वितृष्ण झाला, हें नवल काय? (त्यांत काय नवल आहे?)–कांहींच नवल नाहीं असा भाव. [कारण] तृषितें सापानें दुधा न त्यजिजे (त्यजीत नाहीं.) १२. अदृष्ट, नशीब. १३. देवता, ईश्वर. 'जनास जयपराजयवर द्याया दैव चि मुख्य दैवत' असा अन्वय. 'जयपराजयवर' असा पाठ घेतला तरी चालेल. जयपरा (जयशीलास, जय मिळण्यास जो योग्य त्यास) जयवर (जय प्राप्त होवो, असा वर)-असा अर्थ. १४. सर्वव्यसन (संकट) रूपी मकरांच्या सादनास (गृहास–समुद्रास). १५. निरंतर. १६. तरतो; चुकवितो. १७. सत्य. १८. भीष्माचें म्हणणें; युद्ध न करण्याविषयींचा उपदेश. १९. मनास वाटेल तो पदार्थ खाण्यास आतुर (उत्सुक) झालेला रोगी. २०. चांगल्या वैद्यानें सांगितलेलें. २१. बाणांच्या बिछान्यावर निजलेल्या भीष्मानें. २२. मोरोपंतकृत भीष्मपर्व–अ० १२ पद्य.

तेव्हां म्हणे महात्मा गांगेय, 'अगा सुयोधना ! बापा ! ।
हो शांत, पांडवांसीं सख्य करीं; [1]पावसी वृथा तापा. ॥ ३७
केली पहा क्षणांत क्षितितळ भेदूनि [2]अंबुधारा, हें ।
[3]विजयप्रतापकौशल जाणोनि उगा चि तूं बुधा ! राहें. ॥ ३८
हें युद्ध [4]मदंत असो, सेवा [5]सख्यें चि सर्व बंधु [6]रसा; ।
शांति घडेल प्रशमें, [7]मज तों वाटे न गर्व [8]बंधुर-सा.' ॥ ३९
[9]तें प्रिय हित सत्य न घे मत्सुत, [10]आतुर जसा न [11]अगदा पी; ।
रोग्यासि [12]बद्धमूल प्रबल महारोग कां न मग [13]दापी ? ॥ ४०
[14]शोचित असेल आतां आठवुनि [15]स्वहितबोध तो मानी, ।
तापें तापोनि न जो जायाचा कोटिसूर्यसोमानीं. ॥ ४१

---

१. सख्य न केल्यास ताप पावसी—असा अर्थ. २. जलधारा. ३. अर्जुनाचा प्रताप व अस्त्रकौशल्य. ४. माझ्या अंतापर्यंत; माझ्या मरणानंतर थांबणारें. ५. स्नेहभावानें. ६. पृथ्वी. ७. मज तों=मला तर. ८. उंचसा, चांगलासा, श्रेयस्कर. ९. 'तैं' असें पाठांतर. तैं=तेव्हां. १०. रोगातुर. ११. औषधाला. १२. फार खोल गेलेलीं आहेत मुळें ज्याचीं, जुना झालेला (रोग). १३. दाबी; दाबून टाकी; नाश करी. १४. जो कोटिसूर्यसोमांनीं (कोट्यवधि सूर्यचंद्रांच्या योगानें) तापोनि न जायाचा, तो मानी (दुरभिमानी दुर्योधन) तापें (झालेल्या तापामुळें) स्वहितबोध (भीष्मद्रोणादिकांनीं केलेला आपल्या हिताचा उपदेश) आठवुनि शोचित असेल (दुःख करीत असेल)—असा अन्वयार्थ. ह्या गीत्यर्धांतील 'कोटिसूर्यसोमांनीं' च्या ठिकाणीं 'पूर्णकोटिसोमांनीं' असा पाठ आहे. त्या पाठानुसार या गीतीचा सान्वयार्थः—जो [देहानें अतिसुकुमार असल्यामुळें] पूर्णकोटिसोमांनीं (असंख्य पूर्णचंद्रांच्या शीतल चंद्रिकेनें देखील) तापोनि जायाचा, [पण मनानें कठीण असल्यामुळें] तापें (कृतकर्माच्या पश्चात्तापानें) न (तापोनि जावयाचा नाहीं) तो मानी (दुरभिमानयुक्त दुर्योधन) आतां [तरी] (सर्व आप्तांचा नाश होऊन जयाची आशा नाहींशी झाली तेव्हां तरी) स्वहितबोध (भीष्मादिकांनीं केलेला उपदेश आपण मूर्खपणानें ऐकिला नाहीं असें) आठवुनि शोचित असेल (पश्चात्ताप पावत असेल). [किंवा 'सोमांनीं' पुढें प्रश्नचिह्न (?) देऊन—आतां तरी शोचित असेल काय? अर्थात् नाहीं—असा अर्थ करावा]. पूर्णकोटिसोमांनीं=पूर्ण (पौर्णिमेचे) [अशा] कोटि (असंख्य) सोमांनीं. पौर्णिमेचा एकच चंद्र फार शीतल. असले कोटि चंद्र एकत्र झाले, म्हणजे अत्यंत शीतल होणार. [शके १७८३ च्या आवृत्तींत 'पूर्णकोटिसोमांनीं' बद्दल 'सूर्यकोटिसोमांनीं' हा पाठ आहे. तेव्हां दोन्ही गीत्यर्धांपुढें प्रश्नचिन्ह देऊन असा अर्थ करावा—'जो सूर्य [कोणाकडून ही] तापोनि न जायाचा, तो कोटिसोमांनीं तापे (—'तापे'वर अनुस्वार नको) काय?' अर्थात् तापणार नाहीं. [भीष्मादिकांचे उपदेश हेच कोटिसोम]. १५. आपल्या हिताकरितां भीष्मानें केलेला उपदेश.

मेले पुत्र, अमात्य, द्यूतें; हें दुःख पावलों मोटें. ।
[1]कोठें कवणा आलें यश करितां कर्म आग्रहें खोटें ? ॥ ४२
[2]दावुनि लोभ [3]खगातें धरिति जसे बाळ, पक्ष कातरती, ।
ताडिति [4]नुडवे जरि, बहु विपदा, योग्या सरावया तरि, [5]ती; ॥ ४३
फुटतील पक्ष केव्हां तरि, दैवबळें तुटेल ही बंध; ।
त्या छिन्नपक्षविहगापरिस बहु व्यसन पावलों अंध. ॥ ४४
[6]स्वगुरुपितामह वधिले युद्ध न करितां बळें अधर्मानें; ।
[7]दृढ राज्यलोभ धरिला, सत्यव्रत आपुलें न, धर्मानें. ॥ ४५
[8]कपटें विजयें धर्में वधिले; [9]पांचाळ काय ? पामर ते; ।
न्यायें भीष्म द्रोण न [10]वज्रधरकरें हि सर्वथा मरते. ॥ ४६

---

१. आग्रहें (कोणाचाही उपदेश न ऐकतां, मूर्खपणानें) खोटें कर्म (कुकर्म) करितां कोठें कोणा यश आलें ? (कोणासही, कोठेंही यश आलें नाहीं). हा **प्रश्नालंकार.** हें उत्तम सुभाषितरूप वाक्य आहे. २. जसे बाळ (लहान मुलें) लोभ (आशा, आमिष) दावुनि खगातें धरिति, [त्या खगाचे] पक्ष कातरती (कातरून टाकतात), जरि नुडवे (त्यास उडतां येत नाहीं तरी) ताडिति (मारितात), [अशा प्रकारची दशा] बहु विपदा (फारच मोठें संकट होय, यांत संशय नाहीं.) तरि ती (असली भयंकर विपदा आहे तरी ती) सरावया योग्या (सरूं शकेल; केव्हां ना केव्हां तरी सरूं शकेल); केव्हां तरि पक्ष फुटतील (त्या पक्ष्यास केव्हां ना केव्हां तरी पंख फुटतील) [व] दैवबळें बंध (कैद) तुटेल ही (पिंजऱ्यांतून पक्षी सुटून जाईलही); [मी] अंध, त्या छिन्नपक्ष-विहगापरिस (पंख तुटलेल्या त्या पक्ष्यापेक्षां) बहु व्यसन पावलों, [पण त्या पक्ष्याप्रमाणें कधीं तरी व्यसनांतून सुटेन, अशी आशा मात्र मला नाहीं]–असे या ४३ व्या व ४४ व्या गीतींचे अन्वय व अर्थ आहेत. ३. पक्ष्यास. ४. न+उडवे=नुडवे, उडवेना. ५. ती विपदा. ६. **द्रो**ण व **भी**ष्म. ७. **ध**र्मानें (**यु**धिष्ठिरानें) राज्यलोभ दृढ धरिला (पक्का धरून ठेविला); [पण] आपुलें सत्यव्रत (सत्य बोलण्याची प्रतिज्ञा) न (दृढ धरिलें नाहीं)–असा अन्वय. ८. या गीतीचे अर्थ व अन्वय असेः– **वि**जयें [व] **ध**र्में (**अ**र्जुनानें व **ध**र्मराजानें) कपटें (कपट करून, छलानें) [अनुक्रमें **भी**ष्म व **द्रो**ण] वधिले. ते पामर (मूर्ख शक्तिहीन व ज्ञानरहित) **पां**चाळ (**शि**खंडी व **धृ**ष्टद्युम्न) काय (काय होत ?) **भी**ष्म**द्रो**णवध करण्यास ते अत्यंत क्षुल्लक होत–असा भाव. न्यायें (न्यायानें युद्ध केलें असतें, तर) **व**ज्रधरकरें हि **भी**ष्म **द्रो**ण सर्वथा (कोणत्याही प्रकारानें) न मरते. साधारण सर्व लोकांची अशी समजूत आहे, कीं **भी**ष्मास **शि**खंडीनें व **द्रो**णास **धृ**ष्टद्युम्नानें युद्धांत मारिलें. **धृ**तराष्ट्र म्हणतो, कीं ही समजूत खोटी आहे. **शि**खंडीच्या मागें राहून बाण मारणारा **अ**र्जुनच **भी**ष्माचा खरा अंतक होय, (**पं**तकृत भीष्मपर्व, अध्याय ११); व खोटें बोलून गुरूस प्रायोपवेश करावयास लावणारा **ध**र्मराजच **द्रो**णाचार्याचा खरा घातक होय. (पंतकृत **द्रो**णपर्व, अध्याय २१) ते **पां**चाळ (**पां**चाळराजपुत्र **शि**खंडी व **धृ**ष्टद्युम्न) यांच्या मरणास निमित्तमात्र कारण होत. ९. **पां**चाळदेशाचा राजा जो **द्रु**पद, त्याचे पुत्र **शि**खंडी व **धृ**ष्टद्युम्न. १०. **इं**द्राच्या हातून.

[1]अनवरत करित असतां दिव्यास्त्रांचा प्रयोग, राधेया[2] ।
शिवला मृत्यु कसा रे ! ? वाटे माझें चि दैव बाधे या. ॥ ४७
[3]घे कवचकुंडलांतें प्रार्थुनि, दे दिव्यशक्ति, [4]हरि ज्याला; ।
त्यजिली [5]घटोत्कचीं [6]जी, यत्स्पर्शें न क्षणार्ध अरि [7]ज्याला; ॥ ४८
ज्याच्या, [8]सर्पमुख महाशर, [9]चंदन-चूर्ण-पूर्ण-सु निषंगीं, ।
नित्य वसे, [10]परदुःसह कोप जसा [11]जामदग्न्यमुनिसंगीं. ॥ ४९
[12]तात रथातिरथांच्या संख्येंत म्हणे जयासि 'रथ [13]अर्धा,' ।
जो ब्रह्मास्त्रज्ञ करी भीष्मद्रोणांसवें सदा स्पर्धा; ॥ ५०
द्रोणादि वि[14]मुख होतां, अभिमन्यूचें धनुष्य जो [15]तोडी, ।
जो भीमातें जिंकुनि उपहास करी, न मारितां [16]सोडी; ॥ ५१
घालुनि धनुष्य कंठीं सहदेवा अभयदान [17]दे, हांसे; ।
[18]त्यास गमे [19]त्या चापाहुनि [20]काळाचे बरे गळां फांसे. ॥ ५२

---

१. निरंतर; शत्रूंस संधी न देतां. २. 'या' म्हणजे 'राधेयास' किंवा 'दिव्यास्त्राच्या प्रयोगास.' ३. 'घे' व 'दे' यांस कर्ता 'हरि' (इंद्र). [कवचकुंडलहरणकथेकरितां पंतकृत वनपर्व—अ० १४ पहा]. ४. इंद्र. ५. घटोत्कचावर. [पंतकृत द्रोणपर्व अध्याय १९ पहा.] ६. जी दिव्यशक्ति. ७. जगला, जिवंत राहिला, वांचला. ८. सर्पमुख महाशर=सर्पाच्या मुखासारखे—तीक्ष्ण, भयंकर व प्राणघातक आहे ज्या महाशराचें मुख असा. 'सर्पमुख' म्हणजे सर्प आहे मुखीं ज्याच्या, असाही अर्थ करितां येईल. कारण आपणास अर्जुनावर सोडावें म्हणून तक्षक-पुत्र अश्वसेन कर्णाजवळ टपून बसला होता, हें प्रसिद्धच आहे. या सर्पबाणाचा कर्णानें पुढें उपयोग केला आहे. [पुढें अध्याय ४७ पहा]. ९. चंदनचूर्णेंकरून पूर्ण अशा उत्तम भात्यांत. भात्यांत चंदनचूर्ण ठेविण्याचें कारण त्यांत सर्प आहे, म्हणून. १०. शत्रूंस असह्य, वैरी ज्यास साहूं शकत नाहींत असा. 'परदुःसह' या शब्दाचा संबंध 'महाशर' व 'कोप' या दोन्ही शब्दांकडे लावितां येईल. ११. जमदग्नीचा पुत्र परशुराम त्याच्या संगीं. जामदग्न्या (परशुरामा) पेक्षां जमदग्नीच कोपाविषयीं विशेष प्रख्यात होता. १२. भीष्म. [मो० महा० उद्यो० अ० १२ पहा]. १३. रथ अर्धा=अर्धरथी. १४. पराजित होऊन फिरले तेव्हां. १५. मोरोपंतकृत द्रोणपर्व अ० ३ अभिमन्युवधप्रकरण पहा. १६. सैंधववधाच्या दिवशीं. [मो० महा० द्रोणपर्व अ० १२ पहा.] १७. मो० महा० द्रोणपर्व अ० १ पहा. १८. सहदेवास. १९. आपणांस पकडणाऱ्या कर्णाच्या चापाहून. २०. काळाचे फांसे=यमाचे पाश.

इतुक्या हि दि[1]सांत रणीं ज्याचें बहु भ[2]य धरूनियां पोटीं, ।
द्वै[3]रथ पार्थ करीना, यु[4]द्धें केलीं हि जन्हि महा मोटीं; ॥ ५३
तो[5] कैसा त्या पार्थें वधिला? त्याच्या प[6]राहितरथातें, ।
धनुतें, कीं शस्त्रांतें, भंग चि झाला; नव्हे इ[7]तरथा तें[8]. ॥ ५४
निश्चित धरा रथातें, प[9]ळपिंडातें गिळी जसी मकरी, ।
जा[10]ररता कु[11]लटासी, पतिबांधवघात हा अ[12]सीम करी. ॥ ५५
या[13]च्या चि बळें याचें अ[14]त्यंताकृष्ट मोडलें चाप, ।

---

१. दिवसांत. 'दिवस'शब्दाचें, हें सप्तमी एकवचनाचें रूप चिंत्य होय. २. भय पोटीं धरूनियां (पोटांत भय बाळगून). हें लोकोक्तीचें अनुकरण, म्हणून हा **लोकोक्ति** अलंकार होय. ३. रथयुद्ध. ४. मोठीं (मोठमोठीं) महायुद्धें (घनघोर युद्धें) जन्हि केलीं हि [तरी] **पार्थ**, ज्याचें बहु भय पोटीं धरूनियां रणीं इतुक्या हि दिसांत (दिवसांत) द्वैरथ (रथयुद्ध) करीना—असा अन्वय. **घटोत्कचवधानें कर्णाजवळची इंद्रदत्त महाशक्ति नाहींशी होईपर्यंत कृष्णानें अर्जुनास कर्णाशीं** सामना करूं दिला नाहीं, त्यास उद्देशून हें वाक्य आहे. ५. ४८ व्या गीतीपासून तों ५३ व्या गीतीपर्यंतच्या पद्यांत, 'जो' 'ज्याच्या' इत्यादि संबंधी सर्वनामांचा संबंध या 'तो' (कर्ण) शीं आहे. ६. पर+अहित+रथातें=(**कर्णाच्या**) शत्रूंचा शत्रु अशा रथास. मालकाच्या शत्रूंस प्रत्येक रीतीनें अहितच करणारा रथ. 'पराहित' हें विशेषण अलग काढून तें 'रथातें, 'धनुतें' व 'शस्त्रातें' यांपैकीं प्रत्येक शब्दास लावितां येतें. ७. अन्यथा. ८. तें=**कर्णाचें** मरण. **धृतराष्ट्र** म्हणतो कीं,–**कर्ण अर्जुनाच्या** हातून मेला हें कधींच संभवत नाहीं. पण तो खरोखरच तसा मेला असेल, तर **अर्जुनाच्या** शौर्यामुळें मेला नसेल; रथधनुः-शरादिकांचा आकस्मिक भंग इत्यादि आधिदैविक कारणांमुळें तो मेला असावा. ९. मांसपिंडातें. १०. या गीतीचे दोन अन्वय व अर्थ होऊं शकतातः—(१) जसी मकरी पळपिंडातें (मांसपिंडातें) गिळी [व जसी] जाररता (जारिणी स्त्री) [आपल्या] कुलटासी (जारत्वानें उत्पन्न झालेल्या अनौरस पुत्रास) हा (हा मुलगा) असीम (फार) पतिबांधवघात करी (पति व त्याचे बांधव यांचा संहार करील–जिवंत राहून मोठा झाल्यास सर्व कुलास कलंकभूत होईल किंवा कुलाचा द्वेष करून मारून टाकील) [या भीतीनें] [गिळी] (त्या जारपुत्रास मारून टाकिते) [त्याचप्रमाणें] धरा (पृथ्वी) [**कर्णाच्या** रथातें] निश्चित (निःसंशय) गिळी. (२) धरा (पृथ्वी) जाररता कुलटासी (व्यभिचारिणी स्त्रीप्रमाणें होऊन–आतां **दुर्योधन** राजा नको, **धर्म** पाहिजे अशी इच्छा धरून) [व] हा (**कर्ण**) पतिबांधवघात (आतां तिची ज्या पतीवर इच्छा आहे तो **धर्म** व त्याचे बांधव यांचा घात) असीम (फार) करी (करतो) [म्हणून] पळपिंडातें जसी मकरी गिळी, तसी [**कर्णाच्या**] रथातें निश्चित गिळी. ११. कुलटा=जारिणी, व्यभिचारिणी स्त्री. कुलट=औरस नव्हे असा पुत्र. १२. अमर्याद; फार. १३. **धृतराष्ट्र** म्हणतो,—**कर्णाच्याच** अप्रतिम बलानें चाप अत्यंत ओढलें गेलें असेल व म्हणून त्याच्याच बलानें तें तुटलें असावें, व त्यामुळें **कर्ण** मारला गेला असावा. १४. अत्यंताकृष्ट=अत्यंत ओढलेलें. 'अत्यंतोत्कृष्ट' असें पाठांतर.

शर ओढितां चि निद्राभंगें[1] कीं झोंबला करीं साप. ॥ ५६
'पार्थं[2] न हन्मि यावत्पादौ तावन्न धावयेऽहमिति,' ।
घोरं यस्य व्रतमिदमहह ! कथं सोऽप्यगाल्लयं समिति[3] ? ॥ ५७
'जोंवरि अर्जुन मारुनि तन्मांस शिंवादिकां[4] न भरवीन, ।
तोंवरि मी पायांचें नीट न धावन करीन करवीन.'[5] ॥ ५८
हें ज्याचें घोर व्रत, पार्थ[6] म्हणे ज्या 'महारिपु'; त्रास ।
ज्याचा, त्रयोदशाब्द[7] न लागों दे नीज धर्मपुत्रास; ॥ ५९
ज्याच्या बळें मंदात्मज[8] पांडुसुतांची मनःप्रिया राणी[9] ।
पति देखतां[10] सभेंत[11], स्वकरें केशीं धरूनियां, आणी; ॥ ६०
'दासांच्ये भार्ये! तुज पति नसती, म्हणसि पांच जरि, अ-सती[12] ! ।
हे[13] षंढतिळांसम[14], वर अन्य[15] वरीं, कुरुसभेंत बहु असती.' ॥ ६१

---

१. किंवा तूणीरांतून बाण काढितांना त्यांत निजून राहिलेला सर्प (तक्षकसुत अश्वसेन) जागा होऊन निद्राभंगाच्या कोपानें कर्णास झोंबला (चावला) असावा; त्यामुळें कर्ण युद्धास असमर्थ होऊन मृत झाला असावा. २. अहं यावत् पार्थं न हन्मि तावत् पादौ न धावये इति यस्य इदं घोरं व्रतं, अहह कथं सः अपि समिति लयम् अगात्–असा अन्वय. मी जोंपर्यंत पार्थास मारिलें नाहीं, तोंपर्यंत पाय धुणार नाहीं, असें ज्याचें हें घोर व्रत होतें, अरेरे! तोही युद्धांत कसा बरें नाश पावला?–असा अर्थ. ३. ही सर्व गीति संस्कृतांत आहे. अशा रीतीनें महाराष्ट्र-काव्यांत संस्कृत पद्येंची पद्यें योजणें कित्येकांस आवडत नाहीं, व तें एका अर्थी खरें आहे. कारण अशानें संस्कृत न जाणणाऱ्यांस हें काव्य वाचतां येत नाहीं. पण या संस्कृत प्रयोगामुळेंच काव्यास प्रौढता येते असें कित्येकांचें मत आहे. ४. कोल्हा इत्यादिकांस. ५. कर्णाची प्रतिज्ञाः– 'जोंवरि न अर्जुनातें मारीन रणांगणांत मी निकरें । तोंवरि न पादधावन करवीन, करीन आपुल्या चि करें. ॥ सेवीन न मांसातें, जैसा मोक्षेच्छु सुजन न सुरेतें. ।' [मोरो० वनपर्व–अ० ७ गी० ११७-११९ पहा.] ६. पार्थ ज्या (ज्या कर्णास) 'महारिपु' म्हणे, मोठा शत्रु इत्यादि शब्दांनीं उल्लेखी. ७. तेरा वर्षें. ज्याचा त्रास (भीति) धर्मपुत्रास (युधिष्ठिरास) त्रयोदशाब्द (तेरा वर्षें) नीज (निद्रा) लागों न दे–असा मागच्या चरणांतील त्रास शब्दाशीं अन्वय. सर्वांपेक्षां युधिष्ठिर कर्णास विशेष भीत होता, व कर्णवधापर्यंत त्यास चांगली झोंप लागली नाहीं. [पुढें अ० ५० गी० ६४-६५ पहा.] ८. दुःशासन. ९. द्रौपदी. १०. पति प्रत्यक्ष पाहात असतां. ११. पंतकृत सभापर्व-अध्याय ५ व ६ पहा. १२. हे असाध्वि. १३. हे=तुझे पांच नवरे. १४. उत्पादनशक्तिहीन तिळांसारखे. अर्थात्–नपुंसक, षंढ. १५. अन्य वरांस वर; या कुरुसभेंत योग्य वर पुष्कळ आहेत–असा भाव.

इत्यादि [1]रुक्ष वाणी [2]कृष्णेला जो सभेंत आयकवी; ।<br>
[3]तैसें कथाप्रसंगीं तरि वक्ता ही वदेल काय कवी ? ॥ ६२

[4]कुंतीसुतासि भीष्मद्रोण न वधितील [5]पक्षपातानें, ।<br>
तरि मीं सुयोधना ! तुज सुखवीन तुज्या [6]सपत्नघातानें. ॥ ६३

[7]अहिमुखशरवरकार्मुकदंडधर [8]स्वभुज, काळ जीवा हे ।<br>
[9]रिपुंच्या, असती; राजा ! कां तूझें चित्त काळजी वाहे ?' ॥ ६४

कृष्णेसि '[10]अपति' ऐसें म्हणतां ज्याचें न लेश भी मन तें, ।<br>
सोसिति [11]निर्बद्ध [12]हरिसे, करुनि मुखें, वीर [13]ते [14]सभीम, [15]नतें. ॥ ६५

ज्याच्या दृष्टींत, न ते सहसुत पांडव बळी, न [16]कंसारी; ।<br>
जो मृत्युला हि न गणी, जैसा योगी [17]मुनी [18]असंसारी. ॥ ६६

ज्याच्या मतें सुयोधन करि [19]दूता [20]शौरिचा अव्हेर [21]जनीं; ।<br>
द्यूतापासुनि सुखदा, धर्माला [22]यद्भयें, नव्हे [23]रजनी; ॥ ६७

---

१. कठोर, निःस्नेह. २. द्रौपदीला. ३. असलीं रुक्ष व अश्लील वाक्यें बोलला खरा; पण हरिदासास देखील, वस्त्रहरणकथाप्रसंगी हीं वाक्यें उच्चारण्यास लाज वाटेल. ४. हे कर्णाचे शब्द धृतराष्ट्र सांगून राहिला आहे. ५. पक्षपात करून; पांडवपक्षपाती होऊन. ६. शत्रूंचा नाश करून. ७. सर्पमुख बाण, व उत्तम धनुष्यदंड यांस धरणारे असे. ८. माझे हात. ९. अन्वय– रिपुंच्या जीवा (शत्रूंच्या जीवास–शत्रूंच्या प्राणाचा नाश करण्यास) अहिमुखशरवरकार्मुकदंडधर हे स्वभुज काळ असती (काळाप्रमाणें अंतक होत) [म्हणून] राजा ! (हे दुर्योधना !) तूझें चित्त कां काळजी वाहे ? (काळजी सोडून शत्रुनाशाविषयीं खातरी बाळगून रहा–असा भाव.) १०. पतिरहिता. ११. बांधलेले. १२. सिंहासारखे. १३. पांडव. १४. येथें 'सभीम'शब्द साभिप्राय आहे. बाकीच्या पांडवांनीं, कर्णानें द्रौपदीस उद्देशून म्हटलेले दुःशब्द, मुकाट्यानें ऐकून घेतले, यांत कांहींच आश्चर्य नाहीं; पण भीमानेंही ते शब्द सोसले, तेव्हां तोही भ्याल यांत संशय नाहीं, व अशा बलाढ्य भीमासही भिवविणारा कर्ण फारच शूर असला पाहिजे– असा धृतराष्ट्राच्या म्हणण्याचा भाव. १५. नतें मुखें=अधोमुखें. १६. कृष्ण. ज्याच्या दृष्टींत पुत्रांसह पांडव व कृष्णही मोठेसे शूर नव्हेत. १७. 'जैसा योगी मुनीड्य संसारी' असाही पाठ आहे. मुनि+ईड्य=मुनींनीं पूजिलेला. संसारी=संसारांत राहून योगी झालेला. संसार साधून परमार्थ साधणारा योगी. योग्यांस मृत्यूची भीति नसते, हें प्रसिद्धच आहे. १८. संसारांत लक्ष न घालणारा. १९. दूत होऊन आलेल्या (कृष्णाचा). [सामार्थ आलेल्या कृष्णाचा दुर्योधनानें जो अपमान केला, त्याचा येथें उल्लेख आहे.] २०. कृष्णाचा. २१. पंतलिखित प्रतींत 'जनी' असा शब्द आहे. २२. यद्भयें (ज्याच्या भयानें) धर्माला द्यूतापासुनि (द्यूत खेळलेल्या दिवसापासून) रजनी (रात्रि) सुखदा नव्हे–ज्याच्या भयानें द्यूत खेळलेल्या दिवसापासून धर्मराज रोज रात्रीं सुखानें झोंप घेत नाहीं तो कर्ण–असा अर्थ. २३. रात्रि.

जो [1]रामशिष्य नोहे भ्यायाचा [2]सामरा हि [3]सुत्राम्या; ।
त्या कर्णासि वधी जो, धन्य म्हणावें चि [4]पांडुपुत्रा म्यां. ॥ ६८

जाला [5]बंधुसुहृत्तमसत्कीर्तिश्रीसुयोधनाश, [6]रण ।
करितां साधुजनांसीं; नाहीं त्रिजगीं सुयोधना [7]शरण. ॥ ६९

तव कथित सत्य [8]हें मज वाटे; परि कर्णवध गमे न खरा; ।
[9]नखराहीं नृहरि चिरी जें उर [10]पविचा उरों न दे नखरा. ॥ ७०
[11]अभिमानी, दुर्बुद्धी, अजितेंद्रिय नायके [12]सुहृद्बोध; ।
[13]दाटूनि सज्जनासीं करि [14]वैर [15]स्वैर [16]भैरवक्रोध; ॥ ७१
[17]कळत कळत जो, [18]काळव्याळमुखीं प्रकट बाहुला [19]दपटी, ।
तो, कर्ण नाश होतां, दुर्योधन काय बोलिला कपटी? ॥ ७२
दुःशासनगलरक्त प्राशुनियां ओंठ चाटितां ओले, ।
भीमाकडे विलोकुनि दुर्योधन काय संजया! बोले? ॥ ७३
या नाशाचें मूळ द्यूत, तयाचें हि मूळ शकुनी, ती ।
कर्णाची गति होतां काय वदे तो असज्जन [20]कुं-नीती? ॥ ७४

---

१. परशुरामाचा शिष्य. २. स+अमर=देवयुक्त. ३. इंद्राला. ४. अर्जुनास. ५. बंधु+सुहृत्तम+सत्कीर्ति+श्री+सुयोध+नाश=बांधव (नातलग)+मित्रश्रेष्ठ+चांगली कीर्ति+लक्ष्मी, शोभा, वैभव+उत्तम लढवय्ये+नाश. ६. सज्जन अशा पांडवांशीं वैर केल्यामुळें पूर्वार्धातील सामासिक शब्दांत वर्णिलेल्या सर्वांचा नाश झाला. ७. रक्षणस्थान, रक्षण करणारा. ८. हें म्हणजे 'सर्व बांधव, कीर्ति, श्री इत्यादिकांचा नाश झाला. तस्मात् सज्जनांशीं वैर करणें चांगलें नव्हे' असें सांगणें. ९. अन्वय–नृहरि (नरसिंहावतारी विष्णु; पक्षीं–नरश्रेष्ठ), जें उर (जी छाती हिरण्यकशिपूची; पक्षीं-कर्णाची) पविचा (वज्राचा) नखरा (डौल, ऐट, गर्व) उरों न दे [तें उर] नखराहीं (नखांनीं) चिरी. धृतराष्ट्र म्हणतो कीं जर अर्जुनानें खरोखरच कर्णास मारिलें असेल, तर इंद्राच्या वज्रासही न जुमानणाऱ्या हिरण्यकशिपूस नृसिंहानें मारिलें, तसाच प्रकार झाला खरा. हिरण्यकशिपूनें इंद्रादिदेवांस जिंकिलें होतें, ही कथा येथें अनुसंधेय आहे. दामयमक. १०. वज्राचा. ११. दुरभिमानी. 'अभिमानी' 'दुर्बुद्धि,' इ० पुढच्या गीतींतील 'दुर्योधना'चीं विशेषणें होत. १२. *मित्रांचा सद्बोध; आपलें बरें इच्छिणाऱ्यांचा बोध*. १३. समजून उमजून, मुद्दाम, कारण नसतां. १४. 'वैर, स्वैर व भैर' हें अश्वधाटी यमकाचें उदाहरण आहे. १५. स्वच्छंद, हेका धरून दुसऱ्याचें न ऐकतां. १६. भयंकर क्रोध. १७. जाणून बुजून. १८. काळरूपी सर्पाच्या मुखांत. १९. जोरानें घाली. २०. दुष्टाचरणाचा. हें पंतांच्या आवडत्या यमकांपैकीं एक आहे. (सभापर्व–अध्याय ३-४३).

काय म्हणे कृतवर्मा? काय म्हणे द्रोणपुत्र[1] कर्णवधीं? ।
काय वदे शारद्वत[2] कृप, बोले काय मद्रराज[3] तधीं? ॥ ७५
वदले काय सहाय[4] क्षितिपति[5], न करूनि पार्थहृन्मथन[6]? ।
तो सर्पमुख शिलीमुख[7] निष्फल झाला कसा? करीं कथन.' ॥ ७६
ऐसे विलाप पुष्कळ करुनि पुसे भूप[8] कर्णवध-वार्ता, ।
ज्याच्यासमीप देवी गांधारी, तत्स्नुषा हि अधवार्ता[9]. ॥ ७७

## अध्याय सातवा[10].

संजय म्हणे, 'नृपाळा! द्रोणवधानंतर, त्वदात्मजनी[11], ।
कर्तव्यार्थ[12] विचारी सर्व स्वसहायभूवराप्तजनीं[13]. ॥ १
त्या सर्वांत, नृपातें[14] बोले, आचार्यपुत्र[15] मेधावी[16], ।
ज्याच्या[17] नीतिश्रवणीं[18] ज्ञात्यांची[19] चित्तवृत्ति वेधावी. ॥ २
'जे आमुचे महामति योद्धे होते प्रसिद्ध सुर[20]-कल्प, ।
त्यांहीं[21] संप्रति युद्धीं वरिलें, विक्रम करूनि, शर-तल्पें[22]. ॥ ३
युक्त[23] चि तें स्वाम्यर्थी वीरांला, कीं कृतार्थ जन्म रणीं; ।

---

१. अश्वत्थामा. २. शारद्वतपुत्र (कृपाचार्य.) ३. शल्य. ४. साहाय्यास आलेले. ५. पृथ्वीपति, राजे. ६. पार्थ+हृत्+मथन=अर्जुनाच्या हृदयाचें मथन. ७. बाण. ८. धृतराष्ट्र. ९. अधवा+आर्ता=विधवा झाल्यामुळें दुःखानें पीडित अशा. १०. या अध्यायांत पंतांनीं मूळांतील १० वा अध्याय व ११ व्या अध्यायांतील २१ श्लोक यांतील कथाभाग आणिला आहे. मूळांतील श्लोकसंख्या ७४ व या अध्यायांतील गीतिसंख्या ४६ आहे. ११. तुझा पुत्र. १२. आतां पुढें काय करावें म्हणून. १३. आपणांला सहाय जे राजे व आप्त त्यांत. १४. दुर्योधनास. १५. अश्वत्थामा. १६. बुद्धिमान्. अश्वत्थामा वेदवेदांगपारग होता, म्हणून त्यास हें विशेषण योग्य आहे. १७. ज्यानें सांगितलेल्या. १८. नीतिवचनें ऐकिल्यानें. १९. शहाण्यांची. २०. देवांसारखे; बहुतेक सुरांसारखेच पण किंचित् कमी. 'कल्प'प्रत्यय कोणत्याही शब्दास 'किंचिदून' (जरा कमी) या अर्थी लागतो. २१. त्यांनीं. २२. बाणशय्या. मेले—असा भाव. २३. स्वाम्यर्थी (राजाकरितां—राजाचें हित साधण्याकरितां ) तें (तसें करणें—वरील वीरांनीं जसें केलें तसें युद्ध करून धारातीर्थी पतन पावणें) वीरांला युक्त चि (वीर पुरुषांस योग्यच आहे); कीं (कारण) रणीं (रणांतच) जन्म कृतार्थ [होय]—युद्धांत मनुष्य कृतकृत्य होतो,—युद्धांत शौर्य करून मरणें हाच परम पुरुषार्थ होय.

[1]वरिति स्वयंवरवधू सद्गति सत्कीर्ति या चि [2]सन्मरणीं. ॥ ४
[3]नैराश्य उचित नोहे, स्पष्ट करावें धरूनि [4]आव रणः—।
‘यत्नें परबळ भेदूं, भेदति योगें चि जेंवि [5]आवरण.’ ॥ ५
[6]भीष्मद्रोणवियोगज्वरतप्ता निजमनांत तव सेना, ।
इच्छी आलिंगाया कर्णातें, अन्य कान्त [7]गवसेना. ॥ ६
हा रामशिष्य; अद्भुत गुण याचे, [8]करिल शत्रुबलहानी; ।
यानें [9]दिग्विजयीं बहु नृप केले [10]भग्नदर्प [11]कलहानीं.’ ॥ ७
प्रेम [12]प्रथम चि कर्णीं, वर्णी गुरुपुत्र वीर हि तशांत, ।
कीं निश्चयें सुयोधन मानी राधेय एक हित [13]शांत. ॥ ८

---

१. या चि सन्मरणीं (अशाच प्रकारच्या शुभप्रद मरणांत–युद्धांत मालकाकरितां येणाऱ्या उत्तमोत्तम मरणानें) सद्गति (उत्तम गति, स्वर्गभोग) [व] सत्कीर्ति (जगांत उत्तम गुणांबद्दल प्रख्याती) [या नांवाच्या] स्वयंवरवधू (न इच्छितांच आपण होऊन येऊन वरणाऱ्या वधू–स्त्रिया) वरिती. स्वाम्यर्थीं धारातीर्थीं पतन पावलेल्या पुरुषास ऐहिक सत्कीर्ति व पारलौकिक सद्गति प्राप्त होते–असा भाव. २. सत्+मरण=उत्तम मरणांत. ३. निराशेनें भरलेली चित्तवृत्ति व तज्जन्य कर्तव्यशून्यता. ४. पुढच्या गीत्यर्धांत सांगितलेली इच्छा, उत्साह व धैर्य. साधारणपणें ‘आव’ शब्दाचे मराठींत ‘डौल, डंभ, सोंग’, असे निंदाव्यंजक अर्थ होतात. पंतांनीं ‘आव’ शब्दाचा धैर्य, अवसान–अशा अर्थीं वारंवार उपयोग केला आहे. ५. मायारूप (अज्ञानरूप) आच्छादन. वेदांतशास्त्रांत ‘आवरणशक्ति’ हा एक पारिभाषिक शब्द आहे. ज्याप्रमाणें मेघ लहान असूनही पाहणाऱ्यांच्या दृष्टीपासून अतिविस्तीर्ण सूर्यमंडलास आच्छादितो, त्याचप्रमाणें अज्ञान परिच्छिन्न (मर्यादित) असूनही अपरिच्छिन्न आत्म्यास (परमात्म्याच्या शुद्ध स्वरूपास) पाहणाऱ्यांच्या दृष्टीपासून झांकतें. म्हणून त्यास **आवरण** म्हणतात. या आवरणास भेदण्यास (नाहींसें करण्यास) योग समर्थ आहे, म्हणून येथील ही उपमा योग्य आहे. **वेदांतां**तील पारिभाषिक शब्दांचा उपयोग करणाऱ्या **पं**तांचा त्या शास्त्रांत प्रवेश होता, असें म्हणणें साहसाचें होणार नाहीं. ६. **भी**ष्म व **द्रो**ण यांच्या वियोगामुळें (मरणामुळें) उत्पन्न झालेल्या ज्वरानें तप्त झालेली. ज्वर=देहताप. ‘सेने’चें विशेषण. ७. दिसेना, सांपडेना. ८. ‘करिल’ यास कर्ता ‘हा’. ९. **पं**तकृत वनपर्व–अध्याय ७ गीति १०१–१०९ व **व्या**सकृत महा० वन० अ० २५३. पहा. १०. मोडला आहे प्रताप किंवा गर्व ज्यांचा असे. गर्वहीन व प्रतापहीन. ११. कलह करून, युद्धांनीं–असा भाव. १२. आधींच. **क**र्णावर **दु**र्योधनाची आधींच प्रीति, तशांत गुरुपुत्र **अ**श्वत्थामा यानेंही त्याची स्तुति केली; म्हणून **दु**र्योधनास वाटूं लागलें कीं, हाच सर्वांत आपला हितकर्ता होय–असा भाव. १३. शंभरांत. शें+आंत=शांत. [येथें पररूपसंधि झाला आहे.] ‘शांत एक हित’ म्हणजे शंभर मनुष्यांत हाच काय तो माझें हित चिंतिणारा. शंभरांत म्हणजे अनेक लोकांत.

राधेयासि म्हणे नृप[1], 'कर्णा! मज ठाउकी तुझी शक्ती; ।
जाणें[2] माजाठायीं जें सौहृदै[3] जे हि शुद्ध गुरुभक्ती[4]. ॥ ९
भीष्म पितामह दशदिन मत्सेनानाथ जाहला पहिला; ।
तेणें पार्थासि[5] दिलें अभय, जसें दुग्ध पाजिलें अहिला[6]. ॥ १०
मग बलपति[7] गुरु केला, युद्ध करी दिवस पांच, वीरां, जे ।
माझे मुख्य रिपु[8], तयां न वधी च, न येरे[9] वांचवी राजे. ॥ ११
तव अनुमतें चि दोघां वृद्धांचा मान रक्षिला; परि ते, ।
पार्थासि अभय देउनि, माझा चि विनाश जाहले करिते. ॥ १२
स्वामिद्रोहाचें फळ दोघे ही पावले चि विस्पष्ट, ।
तो[10] एक तसा मेला, शरतल्पीं एक[11] भोगितो कष्ट. ॥ १३
तूं माझी परमगती[12], म्हणुनि विनवितों अगा! महाबाहो[13]! ।
तव[14] भुज या तरलश्रीवडवावदनीं[15] लगाम हा बा! हो. ॥ १४
पति[16] पहिला चि, परि पुन्हां सेनापति मत्प्रियार्थ तूं हो गा! ।

---

१. दुर्योधन. २. मी जाणतों. माजा–ठायीं=माझ्या ठिकाणीं. ३. मैत्री. ४. गुरुभक्ति म्हणजे स्वामिभक्ति असा अर्थ घेतला पाहिजे. गुरु म्हणजे आचार्य किंवा वडील मनुष्य असा अर्थ करितां येत नाहीं, कारण दुर्योधन कर्णाचा गुरुही नव्हता व त्यापेक्षां वडीलही नव्हता. ५. धर्मराजास. चांगल्या रीतीनें युद्ध न करून किंवा स्वमृत्यूपाय कळवून भीष्मानें धर्मास अभय दिलें–हा दुर्योधनाच्या बोलण्याचा भाव. (पंतकृत भीष्मपर्व–अध्याय ११ पहा.) ६. सर्पास. ७. सैन्याधिपति. अन्वय–मग (भीष्मवधानंतर) गुरु (द्रोणाचार्य) बलपति (सैन्याधिपति) केला; [तो] पांचदिवस युद्ध करी; [पण] माझे जे मुख्य रिपु (शत्रु पांडवादिक) तयां वीरां (त्या वीरांस) न वधी च, येर राजे (दुसरे जे माझ्या बाजूचे सैंधवासारखे चांगले चांगले योद्धे होते त्यांस) न वांचवी. ८. पांडव. ९. अन्य. (माझ्या रिपूंहून इतर=माझे मित्र.) १०. द्रोणाचार्य. ११. भीष्म. १२. अंतिम आश्रयस्थान. 'गतिः स्त्री मार्गदशयोः' इति मेदिनी. तुझ्यापेक्षां अधिक साहाय्य करणारा मला कोणीही नाहीं–असा भाव. १३. मोठे आहेत बाहू ज्याचे अशा! (हे कर्णा!) १४. अन्वय—बा! (अबा, अगा!) हा तव भुज (शत्रुमर्दनीं प्रख्यात असा तुझा हा बाहू–उजवा हात) या तरलश्रीवडवावदनीं (चंचल लक्ष्मीरूप घोडीच्या मुखांत) लगाम हो (लगाम होवो). ज्याप्रमाणें तोंडांत लगाम घालून घोडी आपल्या ताब्यांत ठेवितात, त्याप्रमाणें तूं आपल्या भुजपराक्रमानें चंचल लक्ष्मीस पांडवांकडे न जाऊं देतां आपणांकडेच ओढ. १५. चंचल लक्ष्मीरूप घोडीच्या मुखांत. हा रूपकालंकार. १६. तूं अगोदरच पति आहेस. मी नांवाचा राजा व तूंच सर्व राज्याचा व सैन्याचा मालक पूर्वीच आहेस. खरोखर तुला आतां नव्यानें सेनापति करण्याची गरज आहे असें नाहीं, तरी माझ्या

[1]जनकयशोर्थ [2]श्रीपति वरि पुनरपि जेंवि [3]जानकीयोगा. ॥ १५
हो माझा सेनापति [4]सुरसेनानाथ तो जसा [5]स्कंद, ।
[6]कंदर्प [7]हरें तैसा त्वां कीजे भस्म [8]सधनु [9]तो मंद. ॥ १६
[10]अरिकरिघटा, पहातां [11]तुज नरसिंहा, विमूढगति हो; [12]ऊं ।
जसि [13]मर्कटांसि रुचिदा, तसि तव बाणांसि [14]शत्रुचिति [15]होऊं. ॥ १७
[16]उदयापूर्वीं च [17]हरी [18]तेजोलेशें चि जेंवि [19]सूर [20]तमें, ।

---

संतोषाकरितां अभिषेक करून घे–असा भाव. यास पुढच्या चरणांत जें उपमान दिलें आहे, तें अगदीं योग्य आहे. कारण **जा**नकी (लक्ष्मी) आधींच **दा**शरथीची (**वि**ष्णूची) स्त्री होती. सीतास्वयंवर इ० समारंभ जनकादिकांस खूष करण्याकरितांच होत, हें उघड आहे.

१. **जनक** महाराजाची ख्याति वाढविण्याकरितांच. **वि**देह देशाच्या सर्व राजांस 'जनक' ही पदवी आहे. **सी**तेचा पालनकर्ता जो जनक, त्याचें नांव **सी**रध्वजजनक. 'जनकयशार्थे' असें पाठांतर. २. **ल**क्ष्मीपति, **वि**ष्णु. ३. जानकीच्या संबंधाला. ४. देवांच्या सैन्याचा अधिपति. सुरसेनाधिपति असल्यामुळेंच **स्कं**दास 'सेनानी' हें नांव पडलें. ५. **षडानन.** ६. **मदन.** ७. **शं**करानें ज्याप्रमाणें **कं**दर्प भस्म केला, त्याचप्रमाणें तूं त्या मंदास भस्म कर. येथें **म**दनदहनकथा अनुसंधेय आहे. ८. धनुष्यासहित. ९. तो मंद=तो मंद बुद्धीचा, अस्त्र-विद्येंत विशेष प्रज्ञा नाहीं ज्यास, असा **पा**र्थ (**अ**र्जुन किंवा **ध**र्मराज). '**मंदो**ऽतीक्ष्णे च मूर्खे च स्वैरे चाभाग्यरोगिणोः । अल्पे च त्रिपु पुंसि स्याद्धस्तिजात्यन्तरे शनौ ॥' इति मेदिनी. १०. शत्रुरूप गजसेना. ११. तुज नरसिंहा (नरश्रेष्ठ किंवा नरांत सिंहासारखा जो तूं त्यास) पहातां अरिकरिघटा (शत्रुरूप गजसेनेस) विमूढगति (भयानें बुद्धि विमूढ झाल्यामुळें कुंठित झालेली आहे गति जिची अशी) हो (प्राप्त होवो). १२. केशांतील जीवविशेष. १३. प्रस्तुत स्थलीं **नीचोपमा** झाली असें वाटण्याचा संभव आहे. कारण येथें मर्कटाशीं **क**र्णाचें, व ऊशीं शत्रुसैन्याचें सादृश्य गर्भित आहे. पण असें समजणें बरोबर होणार नाहीं. ही नीचोपमा आहे अशी शंका येऊं नये म्हणून, **पं**तांनीं शब्द फार तोलून वापरलेले आहेत. गीतींत 'मर्कटासि' व 'तव बाणासि', 'ऊ' व 'चिति' या शब्दांमध्यें उपमानोपमेय भाव वर्णिला आहे. म्हणजे मर्कट **क**र्णास म्हटलें नसून **क**र्णबाणास म्हटलें आहे व शत्रूस ऊ म्हटलें नसून शत्रुचितीस म्हटले आहे. **दु**र्योधनानें शत्रूस तुच्छ समजून ऊ म्हटलें असतें, तरी ती नीचोपमा होत नाहीं. तेव्हां दुसऱ्या उपमानाविषयीं वादच नाहीं. निर्जीव बाणांस मर्कट म्हटल्यामुळें व उवा पटापट मारून खाण्याविषयीं मर्कट प्रसिद्ध असल्यामुळें व त्याचप्रमाणें **क**र्णबाणांनीं शत्रुप्राण घ्यावे असें सुचविल्यामुळें ही उपमा निर्दोषच आहे, असा आमचा अभिप्राय आहे. १४. शत्रुसमुदाय. १५. होवो. 'हो' धातूचें आशीरर्थीं जुनें रूप. १६. उगवण्याच्या पूर्वींच. सूर्य उगवण्याच्या पूर्वींच उषःकालीं (अरुणोदयीं) जो प्रकाश पडतो, त्यास उद्देशून हें वाक्य आहे. १७. हरण करी, नाशी. १८. थोड्याशा तेजानें, अल्प प्रकाशानें. १९. सूर्य. २०. अंधकार. संस्कृतांतही अनेकस्थलीं 'तमस्'शब्द अनेकवचनीं योजितात.

अहितबळें[1] ऐकें[2] चि शरें तुवां हि शूर[3]-तमें, ॥ १८
हरिसीं[4] भिडतां सेना पावलि विजयास दानवी[5] नाहीं, ।
रिपुपृतना[6] स्वभुजांहीं त्वां हि विमथिल्या सदा नवीनाहीं. ॥ १९
कर्णा ! सख्या ! निवारुनि विघ्नकरें[7] सर्व हीं असत्कटकें, ।
विजयश्रीसीं मजसीं योग[8] करावा तुवां चि सद्धटकें[9].' ॥ २०
ऐसी निजविजयार्थें[10], कर्णाची प्रार्थना करी राजा, ।
गुरु[11] मेला असतां, शरतल्पीं असतां विभिन्नतनु[12] आजा[13]. ॥ २१
भीष्म द्रोण महाबळ, करि त्यांचा दुष्टदैव घात रणीं; ।
रिपुबलजलधींत[14] धरी कर्णोडुप[15], जरि बुडे महातरणी[16], ॥ २२

---

१. शत्रुसैन्यें. २. 'एकें चि शरें' व 'तेजोलेशें चि' यांत बिंबप्रतिबिंबभाव आहे. ३. अतिशूरानें. ४. इंद्राशीं. हरिसीं भिडतां (इंद्राबरोबर युद्ध करितांना) दानवी सेना (दानवसैन्य) विजयास पावलि नाहीं [व] त्वां हि सदा नवीनाहीं स्वभुजांहीं (नेहमीं ताजे राहणाऱ्या, कधींही न थकणाऱ्या, शत्रूंशीं भांडण्यास नेहमीं तयार असणाऱ्या हातांनीं) रिपुपृतना (शत्रुसैन्यें) विमथिल्या—असा सान्वयार्थ. पहिल्या चरणांतील 'विजयास पावली नाहीं' व दुसऱ्या वाक्यांतील 'विमथिल्या' हे शब्द समानार्थक आहेत म्हणून **प्रतिवस्तूपमा** होय. ५. दैत्यांची. ६. शत्रुसैन्य. पृतना=सैन्य (साधारण.); (विशेष) २४३ हत्ती, तितकेच रथ, ७२९ घोडे व १२१५ पदाति, ह्या सर्वांची मिळून होणारी तुकडी. ७. विघ्न करणारीं. ('असत्कटका'चें विशेषण); लग्नांत (विजयश्रीयोगांत) विघ्न आणणारीं. ८. संयोग, लग्न. ९. सत्+घटकें=उत्तम घटना करणाऱ्या त्वां. घटक म्हणजे घडवून आणणारा, जुळविणारा—हा साधारण अर्थ. बंगाल इत्यादि इलाख्यांत लग्नें जुळवून आणणाऱ्या पुरोहितास हें नांव आहे, म्हणून प्रस्तुत स्थलीं हा 'घटक' शब्द कर्णास किती योग्य रीतीनें लाविला आहे, हें वाचकांनीं पहावें. ही कल्पना पंतांचीच आहे. १०. आपल्या विजयाकरितां. ११. द्रोणाचार्य. १२. छिन्नविच्छिन्न झाली आहे तनु ज्याची असा, बाणांनीं विद्ध होऊन ज्याचें शरीर खिळखिळें झालें आहे असा. १३. कौरव पांडवांचा आजा भीष्म. या उत्तरार्धानें कवीनें आश्चर्य दाखविलें, कीं भीष्मद्रोणांसारखे मोठे वीर पडल्यावरही राजाची आशा गेली नाहीं. पुढच्या गीतींत हाच अर्थ आहे. १४. शत्रुसैन्यरूपी समुद्रांत; (सूर्यपक्षीं) शत्रुसैन्यरूपी पश्चिमोदधींत. १५. कर्ण+उडुप=कर्णरूप लहान नौका, कर्णरूप चंद्र. उडुप=लहान नौका व चंद्र. १६. मोठी नौका, किंवा मोठा सूर्य. तरणी=नौका व सूर्य. प्रस्तुत चरणांत **श्लेष** साधिलेला आहे. भीष्मद्रोण मेल्यानंतर कर्णाची आशा धरून युद्ध करणें, म्हणजे समुद्रांत मोठें जहाज बुडाल्यानंतर लहानशा होडीनें समुद्र तरून जाऊं, असें समजणें होय; किंवा सूर्याच्या प्रचंड तेजानें जें झालें नाहीं, तें चंद्राच्या मिळमिळीत प्रकाशानें होईल असें मानणें होय—असा भाव. हा सुरेख **श्लेष** पंतांचाच होय.

गुरुसेतु[1] भंगतां[2] बहुदुस्तर विपदंबुराशि[3] उतराया[4], ।
कर्णाच्या कासेला[5] लागे, भागे[6], त्वदीय सुत राया[7] ! ॥ २३
कर्ण[8] म्हणे, 'हें वदलों होतों पहिलें चि राजसुत्राम्या[9] ! ।
कीं सर्व वृद्ध परहित, एकें वधिजेल पांडुपुत्रा म्यां. ॥ २४
होईन सर्व सेनापति मीं, मारीन पांडवांस रणीं; ।
स्थिर हो राया ! रिपु यमनगरीची न धरतील कां सरणी[10] ? ॥ २५
म्यां जिंकिले चि कृष्णासह पांडव सर्व ही असें जाण; ।
अतितूर्ण[11] चूर्ण करितिल वज्रातें ही सुतीक्ष्ण मद्बाण.' ॥ २६
एवंविध[12] राधेय क्षितिपतिवृंदांत[13] जेधवां बोले, ।
*परमानंदें राया ! दुर्योधन भूप तेधवां डोले.* ॥ २७
मग विध्युक्त[14] ब्राह्मणभूपतिसमवेत[15] तव सुत, प्रेमें ।
कर्णी अभिषेक करी, वांटी गज, वाजि[16], गोधनें, हेमें[17]. ॥ २८
म्हणति द्विज, नृप, बंदी[18], 'हे सेनानायका ! महाबाहो ! ।

---

१. गुरुरूपी (द्रोणाचार्यरूपी) सेतु. (पूल-मोठा सेतु.) २. तुटून जातां. ३. विपत्+अंबु+राशि=विपत्तिसागर. ४. पार होण्यास, ओलांडून जाण्यास. ५. कासेला लागणें=आश्रयाचें अवलंबन करणें, इतरांच्या साहाय्यानें स्वकार्य साधूं पाहणें. ही लोकोक्ति. ६. खटपट करी, कष्टी होई. कर्णाच्या कासेला लागल्यामुळें दुर्योधन स्वेष्ट साधूं शकला नाहीं, सर्व खटाटोप निष्फळ झाला-असा भाव. ७. हे धृतराष्ट्रा ! ८. अन्वय—कर्ण म्हणे [हे] राजसुत्राम्या (हे राजेंद्रा दुर्योधना!) [मी] पहिलें चि (पूर्वींच-युद्धाला प्रारंभ होण्याच्या पूर्वींच) वदलों होतों, कीं सर्व वृद्ध (हे सर्व म्हातारे-भीष्मद्रोणादिक) परहित (शत्रूंचें हित चिंतणारे-पांडवपक्षपाती) [होत], म्यां एकें [च] (मीं एकट्यानेंच) पांडुपुत्रा (अर्जुनास) वधिजेल. भीष्म व द्रोण पांडवांचें बरें चिंतणारे असल्यामुळें ते त्यास मारणार नाहींतच; तेव्हां तें काम माझ्याच हातून झालें पाहिजे. हें मी युद्धापूर्वींच म्हणत होतों; तेंच आतां खरें झालें—असा भाव. 'पांडुपुत्रां म्यां' असें पाठांतर. ९. राज+सुत्रामा=राज+इंद्र (श्रेष्ठ), राजेंद्र, राजश्रेष्ठ. १०. मार्ग. ११. फार लौकर. १२. या प्रकारें. १३. राजसमूहांत. १४. विधि+उक्त=यथाशास्त्र. 'विध्युक्त' हें 'अभिषेक' याचें विशेषण. १५. ब्राह्मण व क्षत्रिय यांसह. मूळांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असें आहे. बाकीच्या दोन जाती अनवश्यक म्हणून पंतांनीं गाळिल्या असतील. १६. घोडे. १७. सुवर्ण, सोनें. विपुल सोनें वांटलें गेलें, हें दाखविण्याकरितां 'हेमें' असें अनेकवचनाचें रूप योजिलेलें आहे. १८. राजाजवळ असणारे स्तुतिपाठक. हे मूळचे युद्धांत धरून आणिलेले बंदीजन असावेत, व म्हणूनच यांस 'बंदी' हें नांव पडलें असावें.

तव भुज विजयी व्हावे, कुरुपतिचा सिद्ध काम हा बा ! हो.' ॥ २९
अभिषिक्त कर्ण शोभे बहु, जैसा दिव्यरूप सेनानी; ।
केला जयजयकार प्रेक्षुनि तें तेज भूपसेनानीं. ॥ ३०
'छविनें मलिना विधुला, द्युतिनें हि त्यजुनि नीरसा रविला.' ।
प्रेक्षक म्हणति, 'स्वरसें हा हृत्प्रिय कर्णवीर सारविला.' ॥ ३१
म्हणती राजे, 'साजे तेजस्वी पुत्र कर्ण हा रविला, ।
याच्या शरीरवर्णे परितप्तसुवर्णवर्ण हारविला.' ॥ ३२
सेनेला पति मिळतां वीरमणी कर्ण, दक्ष जो सु-हिता, ।
कृतकृत्य होय तव सुत, जेंवि पिता अर्पितां वरीं दुहिता. ॥ ३३

१. मनोरथ. २. वा (अगा !) कुरुपतिचा (दुर्योधनाचा) हा काम (ही इच्छा—शत्रुसंहनन करून सार्वभौम होण्याची कुरुराजाची इच्छा) सिद्ध हो (सिद्ध होवो—सफल होवो). ३. सैन्याधिपत्य प्राप्त झालेला—असा अर्थ. ४. दिव्य(स्वर्ग) संबंधी रूप, अमानुष व दैविक तेज. ५. स्कंद. ६. अन्वय—प्रेक्षक (पाहणारे—सैनिक व इतर राजे) म्हणति, [कीं] छविनें (शोभेनें, सौंदर्यानें) [कर्तरि] मलिना (मलीन अशा, कलंकित किंवा कलंकानें दूषित अशा) विधुला (चंद्रास) त्यजुनि (सोडून) [व] द्युतिनें (तेजानें, प्रकाशानें) [कर्तरि] हि (देखील) नीरसा (रसरहित, ज्यांत ओलावा मुळीच नाहीं. किंवा ज्यांत चित्ताल्हादसाधन कांहींच नाहीं अशा) रविला त्यजुनि, [त्या छविनें व द्युतिनें] स्वरसें (आपल्या रसानें. रस=कोणत्याही पदार्थातील मुख्य भाग) हा हृत्प्रिय (त्या छवीच्या व द्युतीच्या हृदयास प्रिय आनंद देणारा—हा) कर्णवीर सारविला (मंडित केला, विभूषित केला). म्हणजे कर्ण सौंदर्यांत व तेजांत, अनुक्रमें चंद्रसूर्यांपेक्षांही अधिक गमूं लागला—असा भाव. चंद्र 'मलिन' आहे व सूर्य 'नीरस' आहे असें सांगून ते दोन दोष कर्णांत नाहींत, असें ध्वनित केलें आहे, म्हणून यांत **अधिकालंकार** ध्वनित आहे, असें म्हटलें पाहिजे. 'द्युति' व 'छवि' या अचेतन पदार्थांवर एकास 'सोडणें' व दुसऱ्यास 'स्वरसानें सारवणें' या क्रियांचा आरोप केला आहे. म्हणून ही **चेतनधर्मारोपोक्ति** आहे, असेंही म्हणतां येईल. पण प्रस्तुत स्थलीं मुख्य अलंकार म्हटला म्हणजे **अतिशयोक्ति** होय. सूर्यचंद्रांस द्युतिछवींनीं सोडणें व कर्णाच्या द्युति व छवि वाढणें यांत कांहीं एक संबंध नसून केवळ नायकोत्कर्षाकरितां ही असंबंधी संबंधाची कल्पना केली आहे, म्हणून ही **'असंबंधातिशयोक्ति'** आहे. या कल्पना पंतांच्याच होत. ७. हृत्प्रिय=हृदयरंजक, छवि व द्युति यांच्या हृदयास प्रिय. ८. सारविणें=लिंपणें, लावणें, फांसणें. ९. शरीरकांतीनें. १०. तापलेल्या सोन्याचा रंग किंवा शोभा. ११. पराजित केला. १२. चांगल्या हिताला. मालकाचें उत्तमोत्तम हित करण्यास. १३. ही **उपमा** अत्यंत योग्य आहे, हें मुलींच्या जनकांस तरी कबूल करावें लागेल ! १४. मुलगी. 'दुहिता' शब्द 'दुह् (दोहणें)' या धातूपासून निघाला आहे, असें कित्येकांचें म्हणणें आहे. पूर्वी पितृगृहीं दुग्ध दोहण्याचें काम अविवाहित मुलीच करीत असत; म्हणून त्यांस 'दुहिता' असें नांव पडलें, असें त्यांचें म्हणणें आहे.

कर्णें देतां अभय, [1]स्वसहाय-नृप-प्रमोद ही कळतां, ।
खबळें सिद्धें करवी तव नंदन [2]पूर्वयामिनी टळतां. ॥ ३४
मग '[3]योग, योग' ऐसा सहसा उठला [4]बळीं महाशब्द; ।
[5]दुंदुभिसमूह गर्जेति, [6]वर्षारंभीं नृपा ! जसे [7]अब्द. ॥ ३५
गज, वाजि, रथ, पदाती यांची रात्रीं च सिद्धता होय, ।
तेव्हां उठे महाध्वनि, [8]अंबुधिचें क्षोभतां जसें [9]तोय. ॥ ३६
राधेय [10]सिद्धयोध्यांमध्यें भासे, जयासि शंकर [11]वी ।
तो स्कंद प्रभु आला, [12]कीं [13]सर्वक्षत्रगुरु [14]विशंक रवी. ॥ ३७
[15]जो [16]कांचनमणिखचित, [17]श्वेतपताका जयावर विराजे, ।
कर्णरथ तुळिति [18]खसरिच्चुंबितशिखमेरुसीं च [19]कविराजे. ॥ ३८
तो [20]नागकक्षकेतु [21]स्यंदनवर, शस्त्रपूर्ण, कर्णाचा, ।

---

१. (कर्णास सेनाधिपत्य दिल्यामुळें) आपल्या साहाय्यार्थ आलेल्या राजांना झालेला आनंद, २. पहिली रात्र. ३. 'मोठा लाभ' 'मोठा लाभ' सूचक शब्द. ४. सैन्यांत. ५. नौबतींचे समूह. ६. पावसाळ्याच्या प्रारंभीं. ७. मेघ. ८. समुद्राचें. ९. पाणी. १०. युद्धास सिद्ध असलेल्या योद्ध्यांमध्यें; किंवा सिद्ध योद्धे म्हणजे साध्य झाली आहे युद्धविद्या ज्यांस असे. ११. प्रसवे. १२. हा **उत्प्रेक्षा**लंकार. १३. सर्व क्षत्रियांचा गुरु. रवीस 'सर्वक्षत्रगुरु' म्हणण्याचें कारण सूर्यवंशाचा आणि क्षत्रियवंशाचा तो मूळपुरुष होय. हें विशेषण 'रवी'चें नसून कर्णाचेंच मानल्यास 'सर्वक्षत्रगुरु'=सर्वक्षत्रियश्रेष्ठ. १४. शंकारहित; ज्यास कोणाचीही शंका (भीति) नाहीं असा, जो पाहिजे त्याशीं निर्भयपणें सामना करतो तो. १५. कर्णरथ. १६. सुवर्ण व मण्यांनीं विभूषित. १७. पांढरा झेंडा. १८. ख+सरित्+चुंबित+शिख+मेरु=आकाश+नदी+लागलेलें+शिखर+मेरूपर्वत=आकाशगंगेला लागलें आहे शिखर ज्याचें. मेरूपर्वताशीं तुलण्याचें कारण, हा पर्वत सोन्याचा आहे व फार उंच आहे अशी समजूत आहे. साधारणतः हिंदुज्योतिषी मेरू म्हणजे उत्तरध्रुव घेतात. पौराणिक मेरु म्हणून एक सुवर्णपर्वत उत्तरेस आहे व त्याभोंवतीं सूर्य प्रदक्षिणा करतो असें समजतात. या पर्वतावर देव राहातात अशीही समजूत आहे. या पर्वताचे पर्याय शब्द असे आहेतः—'मेरुः सुमेरुर्हेमाद्री रत्नसानुः सुरालयः' इत्यमरः. या पदांतील 'खसरित्' या शब्दास 'वियद्गंगा' किंवा 'आकाशगंगा' असें पारिभाषिक नांव आहे. 'मंदाकिनी वियद्गंगा स्वर्णदी सुरदीर्घिका' इत्यमरः. आकाशांत प्रवाहाप्रमाणें जो ताऱ्यांचा समुदायविशेष आहे, त्यास आपले लोक 'आकाशगंगा' व पाश्चात्य 'Milky path' (दुग्धपथ) असें म्हणतात. १९. कविश्रेष्ठ. येथें 'कवि' शब्दाचा साधा अर्थच (काव्य रचणारा असा) घेतला पाहिजे. २०. हत्तीचा सांखळदंड आहे ध्वजावर ज्याच्या असा. २१. रथश्रेष्ठ. या शब्दाचे पूर्वापर शब्द याचींच विशेषणें होत.

[१]ज्यासि [२]बलाकाभ [३]तुरग वाहति, [४]जव दाविती [५]सुपर्णाचा. ॥ ३९
राधेयपताकेचा होता मार्गे चि तेधवां तोल, ।
तो [६]लक्षिला नृपा ! ज्यां [७]परिभवपिशुनप्रभंजनालोल. ॥ ४०
कर्ण [८]अभेद्य [९]सुमकरव्यूह रचोनि, [१०]स्वयें [११]मुखीं राहे, ।
कौन्तेयांसि क्षुधित [१२]क्षुब्धप्रळयोग्रकाळसा पाहे. ॥ ४१
सौबळ [१३]वामीं [१३]नयनीं, वीर उलूकाख्य लोचनीं [१४]दक्षीं ।
गुरुपुत्र व्यूहशिरीं, [१५]सांग-धनुर्वेद-वास [१६]ज्या दक्षीं. ॥ ४२
[१७]ग्रीवास्थानीं सारे [१८]तव सुत, [१९]मध्यें सुयोधन विराजे, ।
त्याच्यासमीप पुष्कळ वसति [२०]रिपुध्वांतराशिरवि राजे. ॥ ४३
[२१]वामपदीं [२२]नारायणबळगोपाळांसमेत कृतवर्मा, ।
[२३]दक्षीं [२४]सदाक्षिणात्य त्रिगर्त, कृप, [२५]धृतधनुष्य धृतवर्मा. ॥ ४४

---

१. ज्या स्यंदनवराला. २. बकपक्षाच्या कांतीसारखे. ३. तुरेण (त्वरया=त्वरेनें) गच्छतीति (चालतो तो) तुरगः=घोडा. या शब्दाचीं तुरग, तुरंग, तुरंगम अशीं तीन रूपें आहेत. अशाच प्रकारचीं आणखी उदाहरणें:—विहग, विहंग, विहंगम; प्लवग, प्लवंग, प्लवंगम. ४. वेग. ५. गरुडाचा. ६. लक्ष देऊन पाहिला. ७. परिभवपिशुन+प्रभंजन+आलोल=पराजयसूचक वायूनें कंपित. हें 'राधेयपताके'चें विशेषण. पिशुन=विसरलेली गोष्ट सुचविणारा. ८. फोडून जाण्यास अशक्य. ९. चांगल्या मकराच्या (मगराच्या) आकाराप्रमाणें सैन्याची मांडणी. या व्यूहांच्या उल्लेखावरून पूर्वी युद्धशास्त्र बऱ्याच उन्नत दशेस गेलें होतें असें दिसतें. १०. स्वतः आपण (कर्ण). ११. मकराच्या मुखीं, व्यूहाच्या अग्रभागीं. सेनाधिपतीनें सर्वांच्या पुढें राहाणें सांप्रतच्या युद्धशास्त्रास संमत नाहीं. १२. क्षुब्ध+प्रलय+उग्रकाल=क्षोभलेल्या प्रलयसमयींच्या उग्रकालासारखा. १३. डाव्या डोळ्याचे ठायीं. १४. उजव्या. १५. अंगांसह. शिक्षाकल्प इ० ज्याप्रमाणें वेदाचीं अंगें होत, त्याचप्रमाणें धनुर्वेदास (युद्धविद्येस) उपांगभूत ज्या विद्या आहेत त्या युद्धविद्या 'सांग' शब्दानें ध्वनित केल्या आहेत. १६. ज्या दक्षीं [ज्या दक्षाच्या ठायीं, निपुणाच्या ठायीं) सांग धनुर्वेद (उपांगांसह युद्धविद्या) वास [करी] [तो] गुरुपुत्र (अश्वत्थामा) व्यूहशिरीं [उभा राही]—असा अन्वय. मकराचें वर्णन तोंडाकडून शेपटाकडे चाललें आहे हें लक्षांत ठेविल्यास कोणकोणत्या स्थळीं कोण होता व कोणापासून किती अंतरावर होता हें सहज समजेल. १७. मानेच्या ठायीं. १८. तुझे मुलगे, दुःशासनादिक. १९. मध्यें म्हणजे, 'तवसुतां-मध्यें' किंवा व्यूहाच्या (मकराच्या) मध्यें—मध्यभागीं. दुर्योधनास मध्यें ठेवण्याचें कारण तो राजा असल्यामुळें त्याचें उत्तम रीतीनें संरक्षण व्हावें, हें होय. २०. रिपुरूपअंधकारराशिविषयीं केवळ सूर्य. २१. डाव्या पायाच्या ठायीं. २२. संशप्तकांसह. या नारायणांपैकीं प्रत्येक, मी कृष्णाच्या बरोबरीचा आहें, असा अभिमान बाळगीत असे. २३. उजव्या पायाच्या ठायीं. २४. दक्षिणेकडील सैन्यांतील. २५. धनुष्य धरिलें आहे ज्यानें असा.

मागील[1] वामचरणीं निजसैन्यसमेत शल्य जो मामा, ।
पश्चिमदक्षपदीं[2] गजबळपति वर्ते सुषेण संग्रामा.[3] ॥ ४५
नृप चित्र चित्रसेन, व्यूहाच्या, सबळ[4] वर्तती पुच्छीं[5] ।
बहु लुब्ध[6] स्वच्छ यशीं, भ्रमरप्रभु[7] जेंवि मालतीगुच्छीं.[8][9] ॥ ४६

---

## अध्याय आठवा.[10]

### ( प्रथमदिनयुद्ध. )

मकरव्यूह[11] विलोकुनि 'पहा' म्हणे धर्म सव्यसाचीसी,[12] ।
कर्णें केली[13] रचना दिसत्ये; ध्यायासि भव्य,[14] साचीसी.[15] ॥ १
सूत[16] वरुनि[17] लाजे[18] कुरुवरगुरुविरहाकुळा,[19] कृशा निपट,[20] ।

---

१. मकरास पुढें दोन व मागें दोन असे चार पाय असतात, हें लक्षांत असावें. २. मागील उजव्या पायाचे ठायीं. ३. संग्रामा वर्ते=युद्धास प्रवृत्त होई. ४. सैन्यासहवर्तमान. ५. शेपटाच्या ठायीं. सैन्याच्या मागच्या टोंकास. ६. **चित्र** व **चित्र**सेन हे सैन्याच्या अगदीं मागें होते, असें सांगितल्यानें कदाचित् वाचकांस त्यांच्या शौर्याविषयीं संशय उत्पन्न होईल तसें होऊं नये, म्हणून पंतांनीं हें गीत्यर्ध जोडिलें आहे. ७. भ्रमर हा राजाप्रमाणें स्वच्छंद विहार करितो, म्हणून त्यास 'प्रभु' असें म्हटलें असावें. ८. मोगऱ्याच्या तुऱ्याच्या ठायीं. ९. पुच्छ, स्वच्छ व गुच्छ–हें **अनुप्रासा**चें उत्तम उदाहरण आहे. 'स्वच्छ' ह्या विशेषणाचा संबंध यश व गुच्छ ह्या दोहोंशीं लावावा. स्वच्छ=निर्मळ, शुभ्र. १०. पंतांनीं या अध्यायांत मुळांतील ११ व्या अध्यायांतील शेवटले २१ श्लोक, १२ वा व १३ वा अध्याय यांतील कथाभाग आणिला आहे. ११. कर्णानें रचिलेला. (मागील अध्यायांतील गीति ४१ पहा). १२. अर्जुनास. ['सव्येन वामेन हस्तेन साचितुं शरान् संधातुं शीलं यस्य स सव्यसाची. म्हणजे सव्य (डाव्या हातानें) बाण जोडून मारण्याचें ज्याचें शील आहे तो सव्यसाची होय. महाभारतांत या नांवाची व्युत्पत्ति दिली आहे:—'उभौ मे दक्षिणौ पाणी गांडीवस्य विकर्षणे । तेन देवमनुष्येषु सव्यसाचीति मां विदुः ॥' म्हणजे, माझे दोन्ही हात गांडीव धनुष्याचें आकर्षण करण्यांत कुशल आहेत म्हणून मला मनुष्य आणि देव सव्यसाची असें समजतात.] येथें रा. पराडकर यांच्या प्रतींत 'सव्यसाचीसि' असा शब्द आहे. १३. या शब्दाचा 'केलेली' असाही अर्थ करितां येईल. १४. कल्याण. १५. खरीच अशी. १६. कर्ण. १७. अधिपतीसा निवडून. नवरा करून–असा ध्वनि. १८. लाजण्याचें कारण नवरा 'सूत' (क्षत्रियापासून शूद्रीच्या ठायीं झालेला) होता व पूर्वींचे पति क्षत्रिय व ब्राह्मण म्हणजे सांप्रतच्या पतीपेक्षां कुलशीलानें श्रेष्ठ होते. १९. कुरु+वर+गुरु+विरह+आकुला=कुरु+श्रेष्ठ (भीष्म)+गुरु (द्रोण)+विरह+व्यथिता. कुरुश्रेष्ठ भीष्म व कुरु (कौरव) गुरु द्रोण यांच्या मरणानें दुःखिता. ('अरिसेने'चें हें विशेषण.) मेलेले सैन्याधिप अनुक्रमें 'कुरुवर' व 'कुरुगुरु' होत व हा 'सूत' होय असें सांगून त्यांतील जमीनअसमानाचें अंतर दाखविलें आहे, व 'लाजण्या'चें कारण व्यक्त केलें आहे. २०. अत्यंत.

अरिसेना, काढीना धूलिपटलमिष मुखावरूनि पट. ॥ २
वत्सा धनंजया ! बहु झालीं तरि रोधितील काय तृणें ? ।
करिती निजपथदूषककंटकमुखभंग सुज्ञ पायतणें. ॥ ३

---

१. शत्रुसेना, कौरवसैन्य. २. धुरळ्याच्या आच्छादनाचें मिष (सोंग) आहे ज्यांत असा. हें 'पटा'चें विशेषण. हत्ती, घोडे इत्यादिकांच्या हालचालींमुळें उठलेल्या धूलींत कौरवसैन्य चांगलें दिसत नव्हतें. धर्म म्हणतो, 'ही धूलि नव्हे' तर धूलिमिषानें कौवरसेनेनें लज्जेमुळें बुरखाच घेतला आहे. हें **मिषापन्हुति** नामक अलंकाराचें उदाहरण आहे. 'मिष' शब्दाचा अथवा त्याच्या समानार्थक अन्य शब्दाचा प्रयोग झाला असतां हा अलंकार होतो. प्रस्तुत गीतींत 'अरिसेनेवर नवरीचा, भीष्मद्रोणकर्णांवर वराचा व धूलीवर पटलाचा–असे परंपरित आरोप ध्वनित केले आहेत. म्हणून हें **ध्वनितपरंपरितरूपक** होय. ३. वस्त्र. ४. बाळा अर्जुना! 'वत्स' शब्दाचा अर्थ वासरूं. वडील मंडळीस आपल्यापेक्षां धाकट्यांस अनुकंपेनें बोलवावयाचें असतें तेव्हां याचा उपयोग करितात. अन्वयार्थ—वत्सा धनंजया ! तृणें (तृणें–गवत) बहु झालीं तरि (पुष्कळ जरी झालीं–पुष्कळ जरी गवत वाढलेलें असलें तरी) [जाणाऱ्या येणाऱ्यांचा रस्ता] रोधितील काय ? (रोधूं शकतील काय, अर्थात् नाहीं–असा भाव.) सुज्ञ (त्या गवत वाढलेल्या रस्त्यानें जाणारे शहाणे लोक) [आपल्या] पायतणें (जोड्यानें, वहाणांनीं) निजपथदूषककंटकमुखभंग (आपल्या रस्त्यास खराब करणाऱ्या गवतीकांट्यांच्या मुखाचा भंग) करिती. गवत किती जरी वाढलें असलें, तरी तें लोकांचा रस्ता अडवूं शकत नाहीं; लोक जोड्यांनीं त्यास सहज तुडवून टाकतील. येथें **अप्रस्तुतप्रशंसा** (अन्योक्ति) अलंकार झाला आहे. तल्लक्षणः—'अप्रस्तुतेन व्यवहारेण सादृश्यादिवक्ष्यमाणप्रकारान्यतमप्रकारेण प्रस्तुतव्यवहारो यत्र प्रशस्यते साप्रस्तुतप्रशंसा. [रसगंगाधर–पृ० ४०२.] जेथें प्रस्तुत व्यवहार सादृश्यादि प्रकारांनीं वर्णिलेला नसून अप्रस्तुत व्यवहारानें वर्णिलेला असतो, तेथें अप्रस्तुतप्रशंसा अलंकार होतो. यासच **अन्योक्ति** म्हणतात. या अलंकारांत, ज्या गोष्टीचें वर्णन करावयाचें, तिचें न करितां, ज्या गोष्टीचें उदाहरण द्यावयाचें असतें तिचेंच वर्णन केलेलें असतें. प्रस्तुत स्थलीं धर्मराजास सांगावयाचें आहे कीं, 'कौरव किती जरी असले तरी ते आपणांस जिंकूं शकणार नाहींत; आपणच त्यांचा संहार करूं.' पण असें स्पष्ट न सांगतां धर्म म्हणतो कीं 'तृणें किती झालीं तरी मनुष्याचा रस्ता अडवूं शकणार नाहींत, जोड्याखालींच तुडविलीं जातील.' अशा तऱ्हेनें अप्रस्तुत गोष्टीनें प्रस्तुत गोष्टीचें सादृश्य व्यक्त न करितां वर्णन केलें आहे, म्हणून ही **अप्रस्तुतप्रशंसा** (अन्योक्ती). पूर्वार्धांत **प्रश्नालंकार**ही झाला आहे. ५. अग्नी; (पक्षी) अर्जुन. तृणें बहु झालीं तरि धनंजया रोधितील काय ?–गवत अग्नीला अडवून धरूं शकेल काय?–असा अर्थ केला तरी चालेल. ६. तृणें. ७. निज+पथ+दूषक+कंटक+मुख+भंग=आपला+रस्ता+दूषित (चालण्यास कष्टतर) करणारे+कांटे+अग्रभाग+नाश. ८. जोड्यानें, वाहाणांनीं. संस्कृतांत जोडा या अर्थाचा 'अनुपदीना' असा शब्द आहे. यांतील 'अनु'चा लोप होऊन 'पदीना' वरून 'पायतण' शब्द झाला असावा. 'शिरस्त्राण' शब्दासारखा 'पादत्राण' यावरूनही 'पायतण' शब्द झाला असावा, असेंही किसेकांचें म्हणणें आहे.

'गोमायुगृध्रपलभुक्परिवारा मृत्युलागिं आवतणें ।
दिधलें कुरुसैन्यानीं; दाविति दावानळासि आव तणें. ॥ ४
कौरवबळांत उरला अतिदुर्जय कर्ण; हा तुझा वांटा; ।
कुशळशरकरें काढीं मम हृदयांतील एव्हडा कांटा. ॥ ५
म्यां शल्य सोसिलें निजहृदयीं वर्षें समग्र बारा हें, ।
आतां न साहवे क्षण, यांवरि न धरूनि धीर बा ! राहें. ॥ ६
धर्माहित रावणसा कर्ण हि, जाणसि सुयुद्धकौशल्या ! ।
प्रभुसम तूं विजयी हो, कीर्तिमती माय जेंवि कौशल्या.' ॥ ७
मग पार्थ अर्धचंद्रव्यूह रची जो अभेद्य संग्रामीं, ।

---

१. कोल्हे, गृध्र, इत्यादि मांसभक्षक प्राणी आहेत परिवार ज्याचा, तो मृत्युदेव त्यास. २. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'मृत्युलागि' असा पाठ आहे. ३. आमंत्रण. ४. 'आवतणें दिधलें' इत्यादि शब्दांनीं पर्यायानें असें सुचविलें आहे, कीं हीं सर्व कौरवसैन्यें खातरीनें मरणार. 'दिधलीं' असें पाठांतर. ५. तणें (तृणें=गवत) दावानळासि (वणव्यास=जंगलांतील प्रचंड अग्नीस) आव (डौल) दाविति–असा अन्वय. जंगलाचीं जंगलें खाक करणाऱ्या वणव्याशीं प्रतिस्पर्धा करूं इच्छिणाऱ्या गवताची जी स्थिती होईल, तीच आमच्याशीं सामना करूं इच्छिणाऱ्या कौरवांची होईल–असा भाव. ६. हा तुझा वांटा म्हणजे यास मारण्याचें काम तुझ्याकडे सोंपविलें आहे. भीष्म, द्रोण, शल्य, दुर्योधन व दुःशासन यांस मारण्याचें काम अनुक्रमें शिखंडी, धृष्टद्युम्न, धर्म, भीम यांनीं वांटून घेतलें, तसेंच कर्णास मारण्याचें काम तुझ्याकडे आलेलें आहे. ७. कुशल अशा शररूपी करानें. कांटा काढणारा कुशल पाहिजे; कारण कांटा पाय न दुखवितां काढावयाचा असतो. प्रस्तुतस्थलीं अर्जुनशरांवर पदांचा व कर्णावर कांट्यांचा अरोप केला आहे. हे आरोप सापेक्ष आहेत म्हणून हें **परंपरितरूपक.** ८. बाणाग्र. ९. 'बारा' म्हणण्यापेक्षां 'तेरा' म्हणणें विशेष शोभेल; कारण अरण्यावासाचीं बारा व अज्ञातवासाचें एक मिळून तेरा वर्षें होतात. १०. याउपर, यानंतर. ११. न राहें=राहूं नकोस. १२. अधार्मिक; धर्म आहे अहित ज्यास, असा. १३. युद्धांत फार प्रवीण अशा अर्जुना ! १४. अन्वय—[हे] सुयुद्धकौशल्या ! रावणसा (रावणाप्रमाणेंच) कर्ण हि (कर्ण देखील) धर्माहित (अधार्मिक, धर्मध्वंसी) [आहे हें तूं] जाणसि; तूं [कर्णास मारून] प्रभुसम (रामाप्रमाणें) विजयी हो [आणि] माय (आपली आई कुंती) कौशल्या जेंवि (राममातेप्रमाणें) कीर्तिमती (वीरमाता म्हणून विख्यात) हो (होवो). १५. श्रीरामचंद्र. पंतांची रामाच्या ठायीं अत्यंत भक्ति म्हणून त्यांनीं 'राम'पर्याय शब्द न वापरितां 'प्रभु'शब्द योजिला आहे. त्या शब्दानें धर्मानें अर्जुनाचा विशेष गौरव केला आहे. १६. सप्तमी, अष्टमीच्या चंद्राप्रमाणें असणारा व्यूह. मकरव्यूहावर चालून जाण्यास अर्धचंद्रव्यूह सोयीचा आहे हें त्यांचे आकार डोळ्यांपुढें आणल्यास तेव्हांच ध्यानांत येईल. पांडवांचा सेनानायक धृष्टद्युम्न असतां व्यूह रचणें वगैरे कामें पार्थ करितो हें चिंत्य होय. १७. युद्धांत.

दक्षिणपार्श्वीं[1] धृष्टद्युम्न वसे, भीमसेन ही वामीं[2]. ॥ ८
व्यूहामध्यें राजा धर्म, विजय, नकुळ आणि सहदेव, ।
हे राजपृष्ठभागीं[3], जैसे विजयार्थ जिष्णुसह[4] देव. ॥ ९
ते पार्थचक्ररक्षक[5], वीर युधामन्यु उत्तमौजा जे, ।
व्यूहीं यथाविभागें युद्धोद्यत[6] सिद्ध ठाकले[7] राजे. ॥ १०
कर्णकृत व्यूहातें पाहोनि, तुझा तनूज[8] अभिमानी[9], ।
पांडव समग्र कर्णें वधिले चि असें मनांत नृप[10] मानी. ॥ ११
विजयकृतव्यूहातें[11] अवलोकुनि, धर्मराज राजमणी ।
मानी, भीमार्जुनभुजभुजगीं[12] गिळिले चि रिपु सकर्ण[13] रणीं. ॥ १२
आनक[14]-दुंदुभि[14]-दर्दुर[14]-डिंडिम[14]-भेरी[14]-सुशंख[14]-पणवांचे[14], ।
ध्वनि उठले यच्छ्रवणें[15] न क्षण ही त्या स्थळीं कृपण[16] वांचे. ॥ १३
गजबृंहित[17]सिंह[18]ध्वनिरथचक्र[19]ध्वानसहित वाजिरवा[20], ।

---

१. अर्धचंद्राच्या उजव्या कोरेच्या बाजूस. २. डाव्या कोरेच्या बाजूस. Right flank & left flank या अर्थी दक्षिण व वाम हे शब्द वापरले आहेत. ३. धर्मराजाच्या मागच्या बाजूस. ४. इंद्रासह. ५. अर्जुनाचे रथसंरक्षक. ६. युद्ध+उद्यत=लढण्यास उद्युक्त. ७. उभे राहिले. ८. तुझा मुलगा दुर्योधन. ९. स्वाभिमानी, दुरभिमानी; किंवा कर्णाविषयीं ज्यास मोठा अभिमान वाटत असे, असा. १०. दुर्योधन. ११. अर्जुननिर्मित अर्धचंद्रव्यूहास. १२. भीमार्जुनभुजरूप सर्पांनीं. १३. कर्णासह. ११ व्या गीतींत दुर्योधनास स्वविजयाविषयीं किती खातरी होती हें दाखविलें आहे, व १२ व्या गीतींत धर्मासही तितकीच खातरी होती हें दाखवून कवीनें पुढें तुमुल युद्ध होणार हें सुचविलें आहे. कारण दोहोंपैकीं एक जरी निरुत्साहित असता, तरी तुमुल युद्ध झालें नसतें. १४. हीं निरनिराळ्या प्रकारच्या वाद्यांचीं नांवें. दर्दुर=पांवा, मुरली; डिंडिम=दंवडी, टिमकी. १५. ज्या ध्वनींच्या श्रवणानें. १६. क्षुद्र मनुष्य, भित्रा. त्या सर्व वाद्यांचा घनघोर ध्वनि ऐकून भित्रा मनुष्य एक क्षणही जिवंत राहणार नाहीं. भीतीनें छाती फाटून मरून जाईल–असा भाव. १७. गजांची गर्जना. ‘बृंहित’ शब्दाचाच अर्थ ‘करिगर्जित’ असा होतो; म्हणून ‘गजबृंहित’ न म्हणतां फक्त ‘बृंहित’ म्हटलें असतें, तरी चाललें असतें. ‘बृंहितं करिगर्जितम्’ इत्यमरः. १८. योद्ध्यांचा सिंहनाद. १९. रथांच्या चाकांचा आवाज. २०. घोड्यांच्या खिंकाळण्यास. सान्वयार्थः—गजबृंहित-सिंहध्वनि-रथचक्रध्वानासहित वाजिरवा (हत्तींच्या, वीरांच्या, रथचक्रांच्या आवाजांसह घोड्यांच्या खिंकाळण्यास—म्हणजे चतुरंगसेनेच्या प्रचंड व भयंकर कलकलाटास) खाजिर (आकाशांगण, अत्यंत विस्तीर्ण व अनंत आकाशरंगभूमि) टांचें (टीचभर–फार लहान) वाटे (तो आवाज इतका प्रचंड होता

खाजिर[1] वाटे टांचें; कोण म्हणेल श्रुतींस[3] हा जिरवा? ॥ १४

जह्नि म्हणति[5] कवि क्षितिला[6] अचला, सर्वसहा,[7] क्षमा,[8] उर्वी,[9] ।
तह्नि कुरुपांडवयुद्धारंभसमय[10] यश[11] तिचें न तें उर्वी.[12] ॥ १५

करिति व्यूहवनाच्या[13] बाहेर निघोनि वीरसिंह रणा, ।
क्रोधें-करूनि करिती अन्योन्य[14] प्राणशक्तिसंहरणा.[15] ॥ १६

करिती रणांगणीं भट[16] शत्रुशिरःकंजकंदुकक्रीडा,[17] ।

---

कीं, आकाश त्यास भरून राहण्यास अत्यंत लहान वाटूं लागलें); [तेव्हां] हा (हा प्रचंडध्वनि) जिरवा (आंत घेऊन बंद करून घ्या) [असें] श्रुतींस (आपल्या कानांस) कोण म्हणेल? (कोण सांगणार आहे? अर्थात् कोणीही सांगणार नाहीं. म्हणजे, त्या शब्दानें सर्वांचे कर्ण बधिर झाले—असा भाव). प्रस्तुत स्थलीं त्या सैन्याच्या शब्दास आकाशांगण टीचभर वाटलें, असें सांगण्यांत आणखी एक खुबी आहे. नैयायिकांच्या मतें ('शब्दगुणमाकाशम्') आकाशाचा गुण शब्द आहे. तेव्हां जितका म्हणून शब्द उत्पन्न होईल, तितका सर्व आकाशांतूनच निघाला पाहिजे; व आपल्या सैन्याच्या शब्दास तर आकाशही टीचभर वाटूं लागलें! तेव्हां तो शब्दनिनाद फारच प्रचंड असला पाहिजे—असा ध्वनि.

१. ख+अजिर=आकाशांगण. २. लहान. ३. कानांस. ४. शहाणे. ५. पृथ्वीला. ६. न चालणारी, स्थिर, चलनवलन नसणारी. ७. सर्व साहणारी; पायांखालीं तुडवा, खणा, नांगरा, कांहीं करा, सर्व सहन करणारी म्हणून पृथ्वीला 'सर्वसहा' हें नांव आहे. ८. अत्यंत क्षमाशीला म्हणून पृथ्वीस 'क्षमा' हें नांव. 'क्षमा शांतिः क्षमा धरा' इति विश्वः. ९. विपुला, विस्तृता. १०. कौरव व पांडव यांच्या लढाईला जेव्हां आरंभ झाला, ती वेळ. ११. 'अचला' 'सर्वसहा' 'क्षमा' व 'उर्वी' इत्यादि गुणसूचक नांवांविषयीं पृथ्वीची जी ख्याति होती ती. १२. उरवी, राहूं देई. कवीचा सांगण्याचा उद्देश असा, कीं पृथ्वी अचला, सर्वसहा, क्षमा, व उर्वी म्हणून आजपर्यंत प्रख्यात होती; पण कौरवपांडवांच्या युद्धप्रसंगीं चतुरंग सेनेच्या प्रचंड नादानें ती दणाणून गेली, जणूं काय पृथ्वीच चालत आहे कीं काय, असा भास होऊं लागला, व अशा रीतीनें तिचें अचलत्व गेलें. रथाश्वगजपदाती जनांचें पादताडण स्वस्थपणें पूर्वीप्रमाणें न सोसतां पृथ्वी प्रतिध्वनि करूं लागली, म्हणून तिचें सर्वसहत्व गेलें. आपणांस पायांखालीं तुडविणाऱ्या जनांस नेहमींप्रमाणें क्षमा न करितां त्यांच्यावर धूळ फेंकिल्यामुळें तिचा क्षमागुण गेला. युद्धाच्या धुमश्चक्रीला जागा पुरेनाशी झाल्यामुळें पृथ्वीचें विस्तृतत्व नाहींसें झालें—अशा कृतीनें तो युद्धप्रसंग उर्वीचे गुण न उर्वी—या गीतींत इतका अर्थ भरलेला आहे. येथें 'उर्वी' व 'उर्वी=उरवी' अशा एकाच अर्थाच्या दिसणाऱ्या शब्दांची आवृत्ति झाली आहे म्हणून येथें **'पुनरुक्तीचा आभास'** या नांवाचा अलंकार झाला आहे. (अलंकारमीमांसा—पृष्ठ ५७). १३. 'व्यूहवन' व 'वीरसिंह' म्हटल्यामुळें हें **परंपरितरूपक.** १४. एकमेकांच्या. १५. कोणी शत्रुप्राणसंहरणा करिती, व कोणी शत्रुशक्तिसंहरणा करिती. १६. वीर. १७. शत्रूंच्या शिरकमळरूप चेंडूंचा खेळ.

[1]अरिगिरिवरि [2]शरवृष्टि हि, तें प्रेक्षुनि [3]शक्र ही धरि [4]व्रीडा. ॥ १७
तों **भी**मसेन चित्तीं [5]अतिदुःसहकोपपावकें [6]कढला, ।
[7]उदयगिरिशिरीं रविसा भासे [8]मत्तद्विपोत्तमीं [9]चढला. ॥ १८
[10]स्वव्यूहगव्हरांतुनि जेव्हां बाहेरि **भी**मसिंह निघे, ।
कुरुसेना-[11]हस्तिघटा त्यातें पाहोनि भीतिला मनिं घे. ॥ १९
भूप कुळूताधिपती, जो नामें क्षेमधूर्ति तो, [12]यांसीं, ।
आला युद्ध कराया [13]तैं, [14]सिकतासेतु जेंवि [15]तोयांसीं. ॥ २०
**भी**म गर्जी, तो हि गर्जी, दोघे ही [16]तोमरायुध क्रोधी; ।
पडतां गांठि गमति ते [17]कल्पांतक्षुब्ध काय [18]पयोधी ! ॥ २१

---

१. शत्रुरूपी पर्वतावर. प्रस्तुत गीत्यर्धांत अनुप्रासचमत्कार असून शब्दध्वनि हा अर्थाचा प्रतिध्वनि आहे. बाणांचा होणारा सरसर आवाज व पटापट एकामागून एक येणाऱ्या शरांची त्वरित गति 'र'कारप्राचुर्यानें दाखविली आहे. 'The sound must seem an echo to the sense' [*Essay on Criticism.*] म्हणजे, कवितेचा ध्वनि, कवितेच्या अर्थाचा प्रतिध्वनि असावा, हा **पोप** कवीचा सिद्धांत **पं**तांस संमत होता, व हें तत्त्व **पं**तांच्या मनांत सदा वागत होतें, असें म्हणण्यास त्यांच्या काव्यांत भरपूर उदाहरणें आहेत. अर्थानुषंगानें शब्द-रचना कोमल, कठोर, मृदु, मधुर व कर्कश अशी **पं**तांनीं यमक, दामयमक, अनुप्रास इत्यादि-कांच्या प्रयोगानें केली आहे. याचीं कांहीं उदाहरणें याच अध्यायांत आहेत. (१) गीति १३ व १४ यांत अर्थास अनुसरून शब्दरचना आहे. (२) १७ व्या गीतींत दुसऱ्या चरणांत जिव्हामूलीय (विसर्गपूर्वक ककार) योजून कंदुकक्रीडेचें अनुकरण केलें आहे. अशा रीतीनें, पाश्चात्यांच्या मतें ज्यास उत्तमोत्तम काव्य म्हणतां येईल, तेंही **पं**तांच्या महाभारतांत आहे, असें स्पष्ट होतें. २. बाणांचा वर्षाव, (पक्षीं) पर्जन्यवृष्टि. शर=बाण, जल. ३. इंद्राला लाज वाटण्याचें कारण, पर्वतांचे पंख तोडण्याच्या प्रसंगीं इंद्रानें देखील असा पराक्रम केला नव्हता, हें होय. 'शत्रुही धरि व्रीडा' असें पाठांतर. शत्रूला लाज वाटण्याचें कारण आपण प्रतिपक्षावर किंवा प्रतिपक्षाप्रमाणें शीघ्र शरवृष्टि करूं शकलों नाहीं, हें होय. ४. लज्जा. ५. साहण्यास अत्यंत दुःसह अशा कोपरूपी अग्नीनें. ६. तापला. ७. उदयाचलावर. प्रातःकाळीं सूर्य एका पर्वतावर उगवतो व त्या पर्वताचें नांव उदयाचल आहे, अशी समजूत आहे. ८. मत्त+द्विप+उत्तम=मदोन्मत्त झालेल्या उत्तम गजावर. ९. उदयाद्रीवर उगवलेला सूर्य जसा शोभतो, तसा मत्तद्विपावर चढलेला **भी**म शोभत होता–असा भाव. १०. आपल्या व्यूहरूपी गुहेंतून. **परंपरितरूपक.** ११. कौरवसैन्यरूपी गजसमूह. १२. **भी**माशीं. १३. तेव्हां. १४. वाळूचा बांध. १५. उदकाशीं. १६. गुरगुज (हा घुसळण्याच्या रवीसारखा असतो.) आहे जवळ ज्यांच्या असे. १७. कल्पांतीं खवळलेले. १८. सागर.

ते तोमरायुधानीं ताडिति अन्योन्य, [1]शोणितें गळती, ।
[2]टळती गज हि न, अन्य प्रेक्षक जे ते हि[3] तेधवां पळती. ॥ २२
[4]दावी प्रताप पुष्कळ, भीमकरींचें धनुष्य ही छेदी, ।
मग सप्त तोमरानीं भीमाच्या [5]भव्यमूर्तिला भेदी. ॥ २३
प्राण हराया राया ! भीम [6]व्याळोग्र तोमर हि सोडी, ।
त्यातें हि कुलूताधिप उग्रशर प्रेरुनि क्षणें तोडी. ॥ २४
भीमें पुनरन्यधनू स[7]ज्य करुनि उग्र सोडिले बाण, ।
त्यांहीं त्या [8]नागाचे व्याकुळ केले रणांगणीं प्राण. ॥ २५
[9]तो गज पळों चि लागे, [10]नाटोपे, [11]प्राकृता जसें चित्त; ।
किंवा जसें [12]अनावर [13]यत्नशतें, दैव कोपतां, वित्त. ॥ २६
तदपि प्रयास करुनि स्वगजातें क्षेमधूर्ति तो फिरवी, ।
वर्षोनि बाणधारा क्षण [14]वर्षाकाळघनतुळा मिरवी. ॥ २७
[15]भेदूनि सर्व [16]मर्में भीमाचा नाग पीडिला फार, ।

---

१. रक्तें. २. येथें 'ढळती' असा पाठ असावा, असें वाटतें. ३. 'तेच्चि' असा पाठभेद. 'तेच्चि' यांतील 'च्चि'नें ध्वनित केलेला अर्थ लक्षांत ठेवण्यासारखा आहे. दोघांचें युद्ध फारच भयंकर होतें; पण गज देखील इतके शौर्यानें पूर्ण होते, कीं ते भयंकर मार मुकाट्यानें सहन करीत होते, पण युद्धांतून पळून गेले नाहींत. परंतु आकाशांत राहून युद्ध पाहणारे देवादि जे प्रेक्षक होते, त्यांस मार लागण्याचा संभव नसतांही भयंकर युद्धानें भयभीत होऊन ते पळूं लागले, असें 'च्चि'नें ध्वनित केलें आहे. त्यानें युद्धाचें भयंकर स्वरूप व गजादि प्राण्यांचें शौर्य हीं व्यक्त होतात. ४. या गीतींतील 'दावी' 'छेदी' व 'भेदी' या क्रियांचा कर्ता (अध्याहृत) 'क्षेमधूर्ति'. ५. अवाढव्य शरीराला. ६. व्याळाप्रमाणें उग्र; सर्पाप्रमाणें भयंकर. ७. ज्यायुक्त. ज्या=धनुष्याची दोरी. ८. हत्तीचे. ९. क्षेमधूर्तीचा हत्ती. 'तों' असें पाठांतर. १०. न+आटोपे=नाटोपे, ताब्यांत न राहे. ११. पामरजनास, अज्ञानी जनास, ज्ञानहीनास ज्याप्रमाणें मन आवरतां येत नाहीं, त्याचप्रमाणें क्षेमधूर्तीला हत्ती आवरला नाहीं. १२. आवरण्यास अशक्य. १३. शंभर यत्नांनीं, अनेक यत्न करूनही—असा भाव. दैव प्रतिकूल झाल्यास घरांतली लक्ष्मी निघून जाते, या सर्वसाधारण दैववादास अनुसरून हें वाक्य आहे. पहिल्या उपमेंत क्षेमधूर्ति अन्यायाच्या बाजूस असल्यामुळें पामर होय, हें सुचविलें आहे; व दुसऱ्या उपमेनें क्षेमधूर्तीचें दैव फिरलें व त्याचा अंतकाळ समीप आला, हें सुचविलें आहे. १४. पावसाळ्याच्या मेघाची बरोबरी. १५. फोडून काढून. १६. मर्म=जीवनस्थान; ज्या ठिकाणीं प्रहार झाल्यानें तत्काळ मरण येतें असा शरीराचा नाजूक भाग.

क्षितिवरि पडे नृपाळा ! वृष्टिविलीनक्ष्माधराकार[1]. ॥ २८
निजगजपतनापूर्वीं राया ! तो भीम[2] पांडुचा सुत रे ! ।
टाकी उडी महीवरि, कोसळतां गिरि हरी[3] जसा उतरे. ॥ २९
भीम गदा हाणुनि त्या सद्विरद[4] क्षेमधूर्तिला विखरी[5], ।
शिखरी[6] ससिंह पावे शक्राशनिनें[6] चि काय हानि खरी. ! ॥ ३०
त्या क्षेमधूर्तिनाशें कर्ण क्षोभे, जसा महारुद्र[7], ।
त्याच्यापुढें[8] न ठाकति वीर, जसे हरिपुढें[9] मृग क्षुद्र[10]. ॥ ३१
वारण[11] विदारिले बहु बाणव्रातें[12], जसे[13] गिरी पविनें[14], ।
रविनें[15] किरणगणें घन, कीं न्यायें[16] बौद्ध[17] खंडिले कविनें. ॥ ३२

---

१. वृष्टि+विलीन+क्ष्माधर+आकार=पर्जन्यवृष्टीनें उमळून खचलेल्या पर्वताप्रमाणें. २. भीम नांवाचा; (पक्षी) भयंकर. ३. सिंह. ४. स+द्विरद=हत्तीसहित. ५. मारून चोहोंकडे फेंकून देई. 'विखरणें'=पसरणें. प्रस्तुत स्थलीं क्षेमधूर्तीचे व त्याच्या हत्तीचे भीमानें तुकडे तुकडे करून चोहोंकडे पसरून दिले–असा भाव. ६. शिखरी=पर्वत. शक्राशनिनें=इंद्राच्या वज्रानें. कवि म्हणतात कीं, क्षेमधूर्ति गजासह पडला, तेव्हां असें वाटलें, कीं जणों काय इंद्राच्या वज्रानें पर्वत वर असलेल्या सिंहासह कोसळला. प्रस्तुत स्थलीं इंद्राची व पर्वतांची कथा अनुसंधेय आहे. पूर्वी सर्व पर्वतांस पंख असत, व त्यामुळें ते उडून या स्थलावरून त्या स्थलीं व त्या स्थलावरून या स्थलीं अकस्मात् उतरून लोकांस फार त्रास देत असत. म्हणून इंद्रानें आपल्या वज्रानें पर्वतांचे पक्ष छेदून त्यांस अचल केलें. प्रस्तुत गीतीच्या उत्तरार्धांत उत्प्रेक्षा आहे. ७. ज्या रूपानें शंकर सर्वांचा संहार करितो तें. ८. 'त्याच्यापुढें न टिकती' असाही पाठ आहे. ९. सिंहापुढें. १०. तुच्छ, हलके. ११. हत्ती. १२. बाणांच्या समूहानें. १३. येथेंही वरील इंद्राची व पर्वतांची कथा अनुसंधेय आहे. १४. वज्रानें. १५. लढाईतील गर्दीचें अनुकरण करण्याकरितां कवीनें पुष्कळ ठिकाणीं दामयमकाचा उपयोग केला आहे. १६. न्यायशास्त्राच्या साहाय्यानें, गौतमऋषिप्रणीत अक्षपाददर्शनाच्या आधारें. गौतमकृत न्यायदर्शन प्रसिद्ध आहे. या शास्त्रांत प्रत्यक्ष, अनुमान, उपमान व शब्द अशीं चार प्रमाणें मानिलीं आहेत. यांत सर्व तर्कशास्त्र असून अनेक युक्तींनीं बौद्धादि नास्तिकांचें खंडन करून ईश्वराचें अस्तित्व स्थापिलें आहे. १७. बुद्धाचे अनुयायी. हे प्रत्यक्ष व अनुमान अशीं दोनच प्रमाणें मानितात. हे विज्ञानवादप्रवर्तक म्हणजे बुद्धि हाच आत्मा म्हणणारे (अनात्मवादी) होत. यांच्याशीं नैय्यायिकांचे खडाजंगी वाद होत असत. प्रस्तुत ठिकाणीं कवीनें नैय्यायिकांनीं बौद्धादिकांचें जें खंडन केलें आहे, त्याचा उल्लेख केला आहे. त्यावरून पंतांस न्यायशास्त्राची ओळख होती, निदान पंचदशी, सर्वदर्शनसंग्रह किंवा शारीरक भाष्य यांसारखे शास्त्रीय ग्रंथ मोरोपंतांनीं पाहिलेले होते, म्हणजे पंत न्यायशास्त्रांत किंवा

तेव्हां त्या कर्णावरि राया ! कोपोनि धांवला नकुळ, ।
जाणों, काळव्याळ[1] ग्रास कराया, क्षुधार्त[2] तो नकुळ[3]. ॥ ३३

---

## अध्याय नववा[4].

भीम द्रौणी[5] यांसीं होय क्षितिपाळका ! महासमर, ।
रोमांचिततनु झाले जे प्रेक्षक नाकनायकाद्यमर[6]. ॥ १
विंदानुविंद राजे, त्यांसीं करि युद्ध सात्यकी भारी; ।
आधीं अनुविंदातें, मग विंदातें, रणांगणीं मारी. ॥ २
चित्रासीं प्रतिविंध्य[7], श्रुतकर्मा चित्रसेनभूपासीं, ।
दुर्योधन धर्मासीं, युद्ध करी, जेंवि तेल[8] तूपासीं. ॥ ३
उठला नृपा ! धनंजय[9] संसप्तकगणतृणावरि[10] कोपें; ।
धृष्टद्युम्नासीं रण[11] अद्भुत केला कृपें[12] महायोधें. ॥ ४
राया ! कृतवर्म्यासीं युद्ध शिखंडी करी महाकोपें, ।
शल्यासीं श्रुतकीर्ति हि, नोहे[13] बा ! क्षात्रकर्म तें सोपें ! ॥ ५

---

वेदांतांत प्रवीण होते, असें म्हणण्यास कांहीं एक हरकत नाहीं. 'नलगे व्याकरणाची न्यायाची घटपटादि खटपट ती' या वाक्यावरून, पंतांस व्याकरण किंवा न्याय हीं शास्त्रें येत नव्हतीं व तो केवळ रूपावळी शिकलेला पौराणिक होता, असा विचित्र सिद्धांत काढणाऱ्या कै० विष्णु कृष्णशास्त्री चिपळूणकरांनीं ही गीति पाहिली नसावी, असें दिसतें. १८. विद्वानानें.

१. काळसर्प. ह्या गीत्यर्धांत उत्प्रेक्षा आहे. २. क्षुधेनें पीडिलेला. ३. मुंगूस. ४. यांत पंतांनीं मुळांतील १४ व्या अध्यायांतील कथाभाग आणिला आहे. ५. अश्वत्थामा. ६. नाक+नायक+आदि+अमर=स्वर्गाचा नायक इंद्र आदिकरून देव. ७. धर्मास द्रौपदीच्या ठायीं झालेला मुलगा. ८. पंतांनीं पुष्कळ ठिकाणीं दिलेला तेलातुपाचा दाखला ग्राम्य आहे; व 'एकादें पद्य सुंदर साधलें असून त्यांत मोठा प्रौढ अर्थ संगृहीत केलेला असतो. पण वरच्या प्रकारच्या एका शब्दानें किंवा दाखल्यानें दुधांत मिठाचा खडा टाकल्यासारखें होऊन जातें.' [निबंधमाला—अंक ६३, पृष्ठ १४.] असा कै० विष्णुशास्त्री चिपळूणकरांचा अभिप्राय आहे. हें शास्त्रीबोवांचें म्हणणें कांहीं अंशीं खरें आहे. पण प्रस्तुत स्थलीं वीरप्रतिवीरांचे परस्परविरुद्ध गुण दाखविण्याकरितां प्रस्तुत दाखला दिला आहे; म्हणून कांहीं अंशीं क्षम्य आहे. ९. अर्जुन; (पक्षीं) अग्नि. श्लेषालंकार. १०. संसप्तकरूपी गवतावर. रूपकालंकार. ११. युद्ध. 'रण' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आहे. १२. कृपाचार्यानें. १३. हें वाक्य सुभाषितरूप आहे.

ज्याचें बहु कठिन हृदय लाजवि[1] काठिन्यवैभवें[2] दगडा, ।
तो दुःशासन राया ! सहदेवा बंधुसीं[3] करी झगडा. ॥ ६
विंदानुविंद वधिले सात्यकिनें, तें विचित्र; दोघांसीं ।
एक चि युद्ध करी तैं, भासे शिरला दवाग्नि तो घासीं[4]. ॥ ७
सात्वत[5] कैकेयांचीं[6] चापें[7] खंडूनि बाण बहु सोडी, ।
अन्य धनुष्यें घेउनि ते[8] याचें चाप, हा[9] हि तीं[10] तोडी. ॥ ८
मग सात्यकि चापांतर सज्य करी, शीघ्र तत्क्षणीं धाडी ।
तीव्र क्षुरप्र[11], तोडुनि अनुविंदाच्या शिरासि तो पाडी. ॥ ९
निजबंधुवधक्षोभें[12] विंदनृपति सात्यकीसवें भांडे, ।
ज्याच्या[13] नेत्रांतुनि जळ, पळ पळ रक्तौघ[14] तनुहुनीं[15] सांडे. ॥ १०
विंदशरक्षतसात्वतवर्णद्युति[16] ये न कुसुमिता[17] पळसा, ।
पळ[18] सात्यकी न भंगे[19], आघातीं सुदृढहीरकोपळसा[20]. ॥ ११

---

१. कठिणपणाविषयीं गर्व वाहणारा दगड देखील दुःशासनाचें हृदय पाहून 'हें माझ्याहूनही कठीण आहे', असें म्हणून लाजत होता, म्हणजे दुःशासन अत्यंत निर्दय होता–असा भाव. २. कठिणपणाच्या वैभवानें. ३. चुलतभावाशीं. ४. गवतांत. ५. सात्यकी. ६. विंदानुविंदांचीं. ७. धनुष्यें. ८. विंदानुविंद. ९. प्रस्तुत स्थलीं 'ते' व 'हा' या सर्वनामांचा प्रयोग लक्षांत ठेवण्यासारखा आहे. १०. विंदानुविंदांचीं धनुष्यें. ११. बाणविशेष. (ह्याच्या अग्राची आकृति घोड्याच्या खुरासारखी केलेली असते). १२. आपल्या भावाच्या मरणामुळें क्षोभून. १३. ज्या विंदनृपतीच्या नेत्रांतुनि पळ पळ जळ (भावाच्या मरणामुळें झालेल्या दुःखानें नेत्रांतून सतत अश्रुधारा) सांडे व ज्याच्या तनुहुनीं (शरीरांतून) पळ पळ रक्तौघ (सात्यकीच्या बाणांमुळें रक्ताच्या धारा) सांडे–असा अन्वय. 'पळ पळ' व 'सांडे' यांचा 'जळ' व 'रक्तौघ' या दोहोंशीं संबंध आहे, म्हणून प्रस्तुत स्थळीं **क्रियादीपक** अलंकार झाला आहे. कारण एका क्रियेशीं भिन्न कर्त्यांचा अन्वय झाला आहे. १४. रक्त+ओघ=रक्तांचा ओघ. १५. देहांतून. 'तनुतुनीं' असा पाठभेद. 'या आर्येच्या दुसऱ्या अर्धांतील **'तुल्ययोगिता'** फारच सुरेख आहे.' (अलंकारमीमांसा, पृष्ठ ३३). १६. विंद+शर+क्षत+सात्वत+वर्ण+द्युति= विंदनामक राजा+बाण+विद्ध+सात्यकि+रंग+कांति. विंदाच्या बाणांनीं विद्ध होऊन शरीरांतून सर्व रक्त वाहत असलेल्या सात्यकीच्या शरीराच्या रंगाची कांति. असली कांति फुललेल्या पळसासही येत नाहीं. पळसाचीं फुलें लाल भडक असतात; पण रक्तानें भरलेला सात्यकी त्या फुलांपेक्षांही लाल दिसत होता–असा भाव. १७. प्रफुल्लित झालेल्या. १८. **दामयमकाचें** उदाहरण. येथें 'सात्यकी न भंगे आयंतीं' असा पाठ आहे. त्यास अनुसरून अन्वयार्थः— [अशा रीतीनें अत्यंत बाणविद्ध जरी होता तरी] सात्यकी आयंतीं (युद्धाच्या प्रारंभीं किंवा

अन्योन्याचीं चापें तोडिति, मोडिति रथांसि, तुरगांचे, ।
सूतांचे प्राण हरिति, सोडुनियां [1]बाण बंधु [2]उरगांचे. ॥ १२
ते [3]खड्गचर्मपाणी [4]नटले नटसे रणांगणीं [5]सुचिर, ।
[6]जंभहरीसे गमले, दिसति [7]क्षतजार्द्रदेह ही रुचिर. ॥ १३
सात्यकि त्या विंदाच्या, तोडी, [8]शतचंद्रका [9]सुचर्मातें, ।
जें चर्म सात्यकीचें, खंडी, तो विंद उग्रकर्मा, तें. ॥ १४
वीर [10]विरथ दोघे ही, दोघांच्या ही करीं प्रचंड [11]असी, ।
अन्योन्यनाश इच्छिति, पडली दोघां [12]हटांसि गांठि असी ! ॥ १५

---

अंतीं=अर्थात् युद्धाच्या प्रारंभापासून तों शेवटपर्यंत–असा भाव) सुदृढहीरकोपळसा (अत्यंत कठीण अशा हिऱ्याच्या खड्याप्रमाणें) पळ (पळभरही–क्षण देखील) न भंगे (पराजित झाला नाहीं=मागें हटला नाहीं). १९. भागणें=थकणें, दमणें. २०. सुदृढ+हीरक+उपळ=अत्यंत दृढ हिरारूप पाषाणासारखा.

१. सर्पांचे बंधूच असे बाण=सापांसारखे विषारी व तीक्ष्ण, प्राणघातक. या गीतींत **स्वभावोक्ति** आहे. २. सर्पांचे. ३. तलवार व ढाल आहे हातांत ज्यांच्या असे. ते दोघेही ढाल, तलवार घेऊन खालीं उतरले, याचें कारण दोघांचे घोडे, सारथी व रथ इ० नाश पावले होते. आतां सर्व उपाय हरले असें वाटल्याशिवाय कोणताही वीर ढाल, तरवार घेऊन रथाखालीं येत नसे, हें भारतीयुद्ध काळजीपूर्वक वाचणाऱ्यांच्या लक्षांत केव्हांच येईल. ४. नटसे नटले=नटाप्रमाणें नाचते झाले. जिवावर उदार होऊन युद्ध करणाऱ्या योद्ध्यांस, तमाशा करून दाखविणाऱ्या नटांची उपमा देऊन त्यांस कमीपणा आणिला आहे, असें कित्येकांस वाटण्याचा संभव आहे. पण तसें समजूं नये. कारण नटाप्रमाणें नटले म्हणजे तितक्या निर्भयपणें लढले. नटांस युद्धाची बतावणी करावयाची असते; खरोखर बाणप्रहार सहावयाचे नसतात; म्हणून ते मोठ्या धैर्याची बतावणी करितात. विंदसात्यकी देखील तसेच लढत होते. स्वरक्षणाविषयीं कांहींएक भीति न बाळगितां लढत होते–असा भाव. अशा रीतीनें हें उपमान प्रकृत वीररसास पोषकच आहे. ५. फार वेळपर्यंत. ६. जंभासुर व इंद्रासारखे. तारकासुरयुद्धांत इंद्रानें जंभनामक असुरास मारिलें होतें, त्या कथेस अनुलक्षून ही उपमा आहे. ७. क्षतज+आर्द्रदेह=रक्तानें भिजलेले देह ज्यांचे असे. ८. शंभर चंद्रक (चंद्राकार सुवर्णपुष्पें) आहेत ज्यावर असें. ढालेवर पितळेचीं, चांदीचीं व सोन्याचीं फुलें (फुल्या) काढविण्याची पद्धत आहे. चंद्रक=मोराच्या पिसावर नेत्राकार चिन्ह असतें तो. ९. उत्तम ढालेला. १०. रथविहीन. रथविहीन असून युद्ध करणें फार धोक्याचें समजतात. म्हणून त्याचा विशेषतः उल्लेख. ११. खड्ग. १२. 'हट' म्हणण्याचें कारण रथाश्वादिकांचा नाश झाल्यावरही मोठ्या हट्टानें ते लढत होते.

[1]धृतधर्मपक्ष सात्यकि पावे जय, तो न [2]वीरवर विंद, ।
[3]तन्मस्तक [4]अप-हस्तें छेदी [5]शैनेय, जेंवि [6]अरविंद. ॥ १६
पावे जय [7]विजयप्रिय सात्यकि, चित्तीं धरुनि गोविंदा, ।
जाय युधामन्युरथीं, मारुनि ऐसें रणांत तो विंदा. ॥ १७
बैसोनि नवरथावरि सात्यकि विंदानुविंदसैन्य मथी; ।
मेले, फार पळाले, [8]पत्ती, [9]सादी, गजाधिरोह, रथी. ॥ १८
श्रुतकर्मा करि मूर्च्छित तीक्ष्णशरेंकरुनि चित्रसेनातें, ।
पाहे [10]तटस्थभावें दोघांचें रण विचित्र सेना तें. ॥ १९
सावध होउनि नृप [11]तो श्रुतकर्मधनुष्य तोडुनी पाडी, ।
घेउनि अन्यधनूतें श्रुतकर्मा त्यासि बहु शरीं ताडी. ॥ २०
तो राजा [12]नाराचें श्रुतकर्म्यातें [13]स्तनांतरीं भेदी, ।
श्रुतकर्मा मग तद्धनु खंडुनि [14]भल्लें चि तच्छिर च्छेदी. ॥ २१
[15]अभिसारचित्रसेनक्षितिपतिचें सैन्य संगरीं भग्न, ।
[16]श्रुतकर्म्यानें केलें, निजशर [17]तद्रक्तसागरीं मग्न. ॥ २२

---

१. धरला आहे धर्माचा (न्यायाचा; पक्षीं **धर्म**राजाचा) पक्ष ज्यानें असा. २. वीरवर असून अधर्मपक्ष धरिल्यानें **विंद** विजयी होऊं शकला नाहीं–असा भाव. ३. **विंद**शिर, ४. डाव्या हातानें. 'असिहस्ते' असें पाठांतर आहे. असिहस्तें=खड्गरूप हातानें. येथें असीस हस्त म्हटलें आहे, कारण मस्तकास अरविंद म्हटलें आहे. ज्याप्रमाणें हातानें अरविंद तोडावें, त्याप्रमाणें खड्गानें मस्तक तोडिलें–असा भाव. ५. **सा**त्यकी. **याद**व-वंशांतल्या **शि**नीचा हा नातू म्हणून यास **शै**नेय म्हणतात. हा **स**त्यकाचा मुलगा म्हणून यास **सा**त्यकी हें नांव आहे. ६. कमळ. ७. **अ**र्जुनास अत्यंत आवडणारा. **सा**त्यकी हा **अ**र्जुनाचा मित्र, भक्त व शिष्य होता. **सैं**धववधाच्या दिवशीं यानें **अ**र्जुनास फारच साहाय्य केले होतें, म्हणून यास '**वि**जयप्रिय' म्हटलें. किंवा 'विजयप्रिय' शब्द श्लेषात्मक आहे असें समजून 'विजय आहे प्रिय ज्यास,' किंवा 'विजयास (जयदेवतेस जो प्रिय)' असा **सा**त्यकी–असाही अर्थ करितां येईल. ८. पादचर, पायदळ. ९. अश्वारोह, घोडे-स्वार. १०. चकित होऊन, भीतीनें युद्धांत न मिसळतां. ११. चित्रसेन. १२. लोखंडी बाणानें. १३. छातीवर. १४. भाल्यानें. १५. **अ**भिसार आणि **चि**त्रसेन या राजांचें. १६. 'श्रुतकर्म्यानें केलें' याचा संबंध देहलीदीपन्यायानें (उंबरठ्यावरील दिव्याप्रमाणें) पुढच्या व मागच्या अशा दोन्ही वाक्यांकडे आहे. हा **दीपका**लंकार. १७. तत्+रक्त+सागरीं=त्याच्या रक्ताच्या सागरांत.

प्रतिविंध्य चित्र यांचें युद्ध महाउग्र, तें करीं श्रवणः—।
त्या द्रौपदेयवीर्यें[1] ने[2] सुरनरांमाजि तोषला कवण ? ॥ २३
चित्रनृपें प्रतिविंध्यप्राण हरायासि सोडिली शक्ती[3], ।
यावरि आली व्यालीसम[4], कीं महिषीं[5] जसी महाशक्ती[6]. ॥ २४
प्रल्हादें[7] हरिनामोच्चारें[8] कृत्या[9] जसी; तसी शुद्धें ।
प्रतिविंध्यें तीव्रशरें भंगिलि[10], विस्मय दिला महायुद्धें[11]. ॥ २५
चित्रें गदा महोग्रा गरगर फिरवूनि सोडिली जे गा ! ।
प्रतिविंध्य तिच्या जाणे अनिवार्या[12] दुःसहा[13] महावेगा[14]. ॥ २६
स्वरथावरूनि जों तो प्रतिविंध्य क्षितितळीं उडी घाली, ।
तों ती गदा, सदा रिपुदर्पघ्नी[15], विजयशालिनी[16], आली[17]. ॥ २७
ध्वजसूततुरगसह रथ भस्म[18] करुनि ही न दुर्भरा[19] धाली[20], ।
प्रतिविंध्यदक्षभुज[21] ती भेदुनि[22] भूकुक्षि[23] भेदिती झाली[24]. ॥ २८

---

१. द्रौपदीच्या मुलाच्या शौर्यानें, प्रतिविंध्याच्या शौर्यानें. २. न तोषला कवण ?=सर्वच तोषले; न तोषलेला असा कोणीच नव्हता—असा भाव. प्रश्नालंकार. ३. शस्त्रविशेष. ४. सर्पिणीसारखी. ५. महिषासुरीं. ६. चंडिकादेवी. ७. हा शब्द 'प्रल्हाद' असाही लिहितात. दोन्ही रूपें प्रचारांत आहेत. प्रल्हाद हा हिरण्यकशिपूचा मुलगा. हा मोठा विष्णुभक्त होता. याचा बाप विष्णुद्वेष्टा होता; म्हणून बापानें याचा पुष्कळ छळ केला व यास मारण्यासाठीं पुष्कळ उपाय योजिले. त्यांतच प्रल्हादावर कृत्या पाठविण्याचा एक उपाय होता. पण प्रल्हाद विष्णुभक्तीच्या प्रभावानें त्या सर्व संकटांतून वांचला. शेवटीं विष्णूनें नरसिंहावतार घेऊन हिरण्यकशिपूस मारिलें. ८. हरिनामाच्या उच्चारमात्रेंकरून. ९. तामसदेवताविशेष. १०. यास कर्म मागच्या गीतींतील 'शक्ती' होय. ११. या गीतींत 'प्रल्हादें,' 'हरिनामोच्चारें,' 'शुद्धें,' 'प्रतिविंध्यें', 'तीव्र शरें' व 'महायुद्धें' हीं तृतीयेचीं रूपें 'एं' प्रत्ययानें झालीं आहेत. तृतीयेचें हें रूप कवितेंत फार आढळतें. १२. निवारण करण्यास अशक्य अशा. १३. दुःखानें साहण्यास योग्य. १४. मोठा वेग. वेग फार असल्यामुळें फार जोरानें येणारी व मागें परतविण्यास अशक्य—असा भाव. १५. शत्रूच्या गर्वाचा नाश करणारी. १६. विजयशालिनी म्हणण्याचें कारण, काम केल्याशिवाय न राहणारी. २७–२८ ह्या गीतींचा अन्वय एकत्र. १७. आली=येती झाली, येऊन थडकली. गदाप्रहार टाळण्याकरितां प्रतिविंध्यानें रथावरून उडी टाकिली, तोंच ती गदा येऊन थडकली—असा अर्थ. १८. गदेमुळें रथ भस्म कसा झाला ? रथ चूर्ण झाला, असें वर्णन असावयास पाहिजे होतें. १९. जड, जिचा भार मोठा आहे अशी. २०. संतोष पावली. २१. प्रतिविंध्याचा उजवा हात. २२. जोरानें प्रहार करून, आरपार भिधून. 'तोडून' असा अर्थ नव्हे. २३. भूगर्भ. २४. येथील लाटानुप्रास कर्णमधुर आहे.

तोमर[1] तो, मरण तेया[2] द्याया, प्रतिविंध्य तेधवां प्रेषी, ।
तेणें सकवचहृदय[3] च्छेदुनि तत्काळ पाडिला द्वेषी[4]. ॥ २९
प्रतिविंध्यावरि धांवे, सैन्य तुझें मारितां चि चित्रास, ।
तो द्रौपदेय[5] त्यातें[6] विक्रम दावूनि दे अतित्रास. ॥ ३०
प्रतिविंध्यहतभटांतें[7] भेटाया स्वर्वधूभुज[8] स्फुरले[9], ।
उरले[10], पुर लेखांचें[11] विवृतद्वार[12] हि न पाहुनी, झुरले. ॥ ३१

---

## अध्याय दहावा[13].

भीमासीं द्रोणसुत, स्वीकारुनियां अनीतिचा[14] पक्ष, ।
युद्ध करी, भीष्मासीं[15] जैसा अंबार्थ[16] राम[17] रणदक्ष. ॥ १

---

१. शस्त्रविशेष. **अनुप्रासाचें** सुरेख उदाहरण. २. **चित्रास.** ३. कवचयुक्त हृदय. 'सुकवचहृदय' असें पाठांतर. ४. वैरी (**चित्र**). ५. **प्रतिविंध्य.** ६. सैन्यास. ७. प्रतिविंध्यानें मारिलेल्या शूरांस. ८. देवांगनांचे भुज. ९. रणांत मेलेल्या शूरांस अप्सरा वरितात, या समजुतीस अनुलक्षून हें वाक्य आहे. या वाक्यानें **प्रतिविंध्याच्या** हातून पुष्कळ सैनिक मेले, हें पर्यायानें सुचविलें आहे. १०. उरलेले. सान्वयार्थः–[प्रतिविंध्यानें मारिलेल्या वीरांची संख्या इतकी अधिक झाली, कीं त्यांस भेटण्यास उत्सुक झालेल्या अप्सरांनीं एकेकास वरिल्यानंतर स्वर्गांत जागाच राहिली नाहीं, म्हणून स्वर्गाचीं दारें लावून घेतलीं. तेव्हां] उरले (स्वर्गाच्या बाहेर राहिलेले वीर) लेखांचें (देवांचें) पुर विवृतद्वार हि न पाहुनी (उघडलेले आहेत दरवाजे ज्याचे असें न पाहिल्यामुळें) [मनांत अप्सरावियोगानें] झुरले (वियोगदुःख अनुभविते झाले.) किंवा उरले (उरलेले वीर) लेखांचें (देवांचें) पुर विवृतद्वार (दरवाजा उघडलेलें) न पाहुनी झुरले. जे मेले, त्यांस स्वर्गाचा दरवाजा उघडा दिसला; व जे मेले नाहींत, त्यांस तो उघडा दिसला नाहीं, म्हणून ते झुरूं लागले. ११. देवांचें. १२. उघडलेलें. १३. या अध्यायांत कवीनें मुळांतील पंधराव्या अध्यायांतील ४३ अनुष्टुप् श्लोकांचा सारांश आणिला आहे. १४. नीतीस–न्यायास–विरुद्ध असा दुर्योधनाचा पक्ष. येथें 'अनीतिचा पक्ष' या शब्दानें, अश्वत्थामा फार शूर व धनुर्विद्येंत **भीमा**पेक्षां अधिक प्रवीण असूनही त्यास जय न येण्याचें कारण सुचविलें आहे. १५. **परशुराम** व **भीष्म** यांच्यांत झालेल्या युद्धाच्या वर्णनाकरितां **मोरो०** महा० उद्योग अ० १३ पहा. प्रस्तुत उपमा विशेष योग्य आहे. कारण **भीष्म-परशुरामांप्रमाणेंच भीमा**श्वत्थामाही एकमेकांच्या हातून मूर्च्छित झाले व कोणाच्याच हातून कोणाचा पराभव झाला नाहीं. ही गीति व या गीतींतील उपमा **पंतांचीच** आहे. १६. **काशि**राजाची कन्या, तिच्याकरितां. १७. **परशुराम.**

ते वीर वृत्रवासवसम[1] गमती, युद्ध थोर, घोर, नृपा !।
गुरुबंधु ते सुतेजें भांडति, चित्तांतुनि त्यजूनि कृपा. ॥ २
सर्वांगीं ही खरतर[2] शर शिरले, तेधवां दिवाकरसा[3] ।
भीम गमे, नरनाथा ! कांपे[4] चित्तीं धरूनि धाक रसा[5]. ॥ ३
भीम सहस्रशरांहीं आच्छादी गुरुसुतासि, परि तो ते ।
न[6] स्पर्शतां चि खंडी; जाणों आले चि त्यावरि न[7] हो ! ते. ॥ ४
गुरुसुतनाराच्याचा[8], भीमललाटांतरीं[9] शिरे, शेंडा[10]; ।
शोभे रणांत तो[11], वनिं खड्ग[12] जसा प्राकृतांत जो गेंडा. ॥ ५

---

१. वृत्रासुर आणि इंद्र यांसारखे. २. सूक्ष्माग्राचे, जोरानें बोंचणारे. या गीतींतील 'खरतर–शरशिर–दिवाकर–नरनाथा–धाक रसा' हा वृत्त्यनुप्रास लक्षांत ठेवण्यासारखा आहे. ३. सूर्यासारखा. दिवाकर म्हणण्याचें कारण सहस्रकिरणांप्रमाणें भीम सहस्रबाणांनीं व्याप्त होता. ४. पृथ्वी रौद्रक्रियेनें परिप्लुत अशा भीमास पाहून मनांत भिऊन कांपूं लागली. ही **संबंधातिशयोक्ति** होय. भीमाच्या रौद्ररूपाशीं व भूमि कांपण्याशीं कांहींएक संबंध नसतांही असंबंधीं संबंधाची कल्पना करणारी म्हणून ही **संबंधातिशयोक्ति** आहे. ५. पृथ्वी. ६. स्पर्शण्याच्या पूर्वींच, आपल्या जवळ येण्याच्या पूर्वींच; दुरूनच. ७. 'नहोते' असें पाठांतर. न+होते=नव्हते. ८. अश्वत्थाम्यानें सोडिलेल्या बाणाचा. ९. भीमाच्या कपाळीं. १०. टोंक. ११. भीम. अन्वय—तो (भीम) रणांत शोभे. [कसा ? तर] जसा वनिं खड्ग (मृगविशेष)–जो प्राकृतांत (प्राकृत भाषेंत किंवा प्राकृत जनांत) गेंडा (या संज्ञेनें प्रख्यात आहे तो) तसा शोभे. या गीतीवर कित्येकांचा असा आक्षेप आहे, कीं पंतांनीं यांत 'प्राकृतांत जो गेंडा' हे अनवश्यक शब्द केवळ यमकाच्या सोयीसाठीं योजिले आहेत. कारण खड्ग=गेंडा. म्हणून 'खड्ग जसा' या शब्दांनींच उपमापूर्ति झाली. त्या पुढचे शब्द म्हणजे केवळ यमकासाठीं केलेली द्विरुक्ति होय. आमच्या मतें हा द्विरुक्तिदोष मुळींच नाहीं. कवीनें वाचकांस उपमान स्पष्ट समजावें म्हणून 'गेंडा' हा प्राकृत शब्द वापरला व उपमेंतील साधारण धर्म स्पष्ट समजावा म्हणून 'खड्ग' हा शब्द वापरला आहे. गेंड्यास 'खड्गमृग' हें नांव पडण्याचें कारण त्याच्या नाकावर खड्गाकार शृंग असतें म्हणून. प्रस्तुत ठिकाणीं हाच–म्हणजे भालीं खड्ग असणें हाच–गेंड्यांत व भीमांत समान धर्म होय; व ही गोष्ट खड्ग शब्दानें लवकर लक्षांत येते. पण खड्ग शब्द 'गेंडा' ह्या अर्थी मराठींत प्रचारांत नसल्यामुळें क्लिष्टोपमा होईल हें जाणून कवीनें 'प्राकृतांत जो गेंडा' असें सांगून अर्थ स्पष्ट केला आहे. खड्गमृगाची उपमा मुळांतलीच असल्यामुळें पंतांनीं मुद्दाम 'गेंडा'शब्द यमकासाठीं आणिला असें म्हणतांच येत नाहीं; तेव्हां द्विरुक्ति म्हणावयाचीच असेल, तर–'खड्ग जसा' या शब्दांस म्हणतां येईल. पण हे शब्द गीतीमधले असल्यामुळें–यमकस्थानींचे–शेवटचे नसल्यामुळें–खरोखर द्विरुक्तीच असती, तर या

गुरुसुतशरपटलें[1] रवि लोपे, भ्रमति प्रवीर[2] सर्व तमीं[3]; ।
द्रौणीसि महामारुत[4] मानीं, धर्मानुजासि[5] पर्वत मीं. ॥ ६
द्रौणिशरौघें[6] कंप न भीमीं, मारुतबळें[7] जसा अगमीं[8]; ।
पाहें भीमशरौघें द्रौणि स्थिर, जलबळें[9] जसा अंग[10] मीं. ॥ ७
द्रोणात्मज भीमातें डावें[11] घाली, न भीम तें साहे. ।
यासि हि[12] डावें घाली; केंवि खिजविला[13] फणी[14] उगा राहे[15] ? ॥ ८
शरसंघर्षज[16] वन्हि ग्रासी क्ष्मा चि न, गिळी नभ; स्मरणीं ।
भी मन; कीं तो स्वबळ हि जाळी, बाण चि करी न भस्म रणीं. ॥ ९

---

शब्दांच्या ऐवजीं दुसरे कोणते तरी शब्द वापरतां आले नसते, असें नाहीं. तेव्हां ही द्विरुक्ति नसून आम्ही वर स्पष्ट करून दाखविल्याप्रमाणें पंतांनीं मुद्दाम केलेली वाक्यरचनाच होय. ‘खड्ग’शब्द फारच संस्कृत व ‘गेंडा’शब्द ग्राम्य जरी नाहीं तरी फारच प्राकृत; म्हणून कवीनें दोन्ही शब्दांचा उपयोग केला आहे. कारण त्यांपैकीं कोणत्याही एका शब्दानें अर्थबोध चांगला झाला नसता. १२. गेंड्यासारखा.

१. अश्वत्थाम्यानें सोडलेल्या बाणांच्या आच्छादनानें. २. मोठमोठे वीर. ३. अंधकारांत. सूर्य लोपल्यामुळें जिकडे तिकडे अंधार झाला होता. ४. मोठा वायु. ५. भीमास. ६. अश्वत्थामाप्रेरित बाणांच्या जोरानें. ७. वायूच्या जोरानें. ८. पर्वतांचे ठिकाणीं. ९. पाण्याच्या वेगानें, जोरानें. १०. वृक्ष. ११. डावें घाली=डाव्या बाजूनें जाई. एकाद्याच्या उजव्या बाजूनें जाणें (प्रदक्षिणा घालणें) हें पूज्यबुद्धि दर्शवितें, व डाव्या बाजूनें जाणें हें त्या व्यक्तीविषयीं तिरस्कार दर्शविण्याचें चिन्ह आहे. १२. अश्वत्थाम्यास भीम डावें घाली–असा भाव. १३. चिडविलेला; ज्यास मारण्याचा आपण यत्न केला आहे, असा. १४. नाग. ‘फणींद्र गा राहे’ असें पाठांतर. १५. खिजविला फणींद्र उगा केंवि राहे ?–असा अन्वय; एकदां आपण चिडविलेला नाग चावा घेतल्याशिवाय कसा राहील ? अर्थात् राहणार नाहीं–असा भाव. येथें फणींद्र म्हणजे शूर पुरुष. प्रस्तुत स्थलीं **अर्थांतरन्यास** व **अन्योक्ति** असे दोन अलंकार आहेत. सामान्यसिद्धांतानें विशेषसिद्धांताचें समर्थन केलें आहे म्हणून अर्थांतरन्यास; व वीरश्रेष्ठाविषयीं सांगावयाचें असून फणींद्राच्या मिषानें सांगितल्यामुळें अन्योक्ति. १६. बाणांच्या घर्षणानें उत्पन्न झालेला. अन्वयार्थ–शरसंघर्षज (दोघां योद्ध्यांनीं सोडिलेले बाण एकमेकांना लागून त्या घर्षणानें उत्पन्न झालेला) वन्हि (अग्नि) क्ष्मा चि ग्रासी [असें] न (पृथ्वीलाच ग्रासता झाला असें नाहीं–तो अग्नि पृथ्वीवरच पडत होता असें नाहीं) [तर] नभ (आकाशही) गिळी (पृथ्वी व आकाश सर्व अग्निमय होऊन गेलीं–असा भाव.) [या गोष्टीच्या] स्मरणीं (स्मरणानें) मन भी (मनांत मला फार भीति वाटत आहे. तो अग्नि इतका भयंकर होता, कीं त्याच्या स्मरणानें देखील माझ्या मनांत आतां भीति उत्पन्न होत आहे) कीं (कारण) तो

योजिति दिव्यास्त्रांतें, करिति प्रकट [1]स्वशक्तिनैपुण्य; ।
प्रेक्षक त्या [2]युद्धाहुनि बहु वर्णिति आपुलें चि तें [3]पुण्य. ॥ १०
गगनीं सुरसिद्ध [4]म्हणति, 'या युद्धाची [5]कळा हि सोळावी ।
[6]युद्धांतरें न पावति; या [7]अमृतरसीं च दृष्टि घोळावी. ॥ ११
अतुळ ज्ञानें, वीर्यें संपन्न भले, रणीं [8]अनिर्वेद, ।
हे [9]विप्रक्षत्रियवर; धन्य [10]इहीं [11]उंजविला धनुर्वेद. ॥ १२
अद्भुत [12]शिक्षा, [13]निस्तुल बल, कुल बहु धन्य, पाहिले [14]अन्य; ।
[15]अन्यत्र वीर [16]न असे, असती [17]ते सर्व [18]पंडितंमन्य.' ॥ १३
झाले [19]क्षतजर्जरतनु, न्हाले रक्तें, मनीं न परि [20]धाले; ।
भ्याले प्रेक्षक, तऱ्हि [21]हे [22]व्यालेश क्रूर न क्षया भ्याले. ॥ १४

---

(अग्नि) स्वबळ हि जाळी (हे आमच्या पक्षाचे वीर व हे परपक्षांतले वीर हा भेद न ठेवितां सर्व सैनिकांस जाळीत असे), रणीं (युद्धांत) बाण चि भस्म करी न (म्हणजे फक्त बाणांनींच लोक भस्म होत होते असें नाहीं, तर या अग्नीनें देखील मरत होते–असा भाव; किंवा हा मोठा अग्नि सर्वांस भस्म करीत होता, पण युद्धांतल्या बाणांस मात्र जाळीत नव्हता. या दोहोंतून पहिलाच अर्थ विशेष ग्राह्य आहे).

१. आपलें युद्धकौशल्य. २. 'युद्धांतुनि' असाही पाठ आहे. पण हा अपपाठ असावा. ३. असलें अप्रतिम युद्ध पाहण्यास आपणांस मिळालें, हें आपलें मोठेंच पुण्य होय, असें समजती. ४. अन्वयार्थ–सुरसिद्ध गगनीं (आकाशांत) म्हणति (म्हणूं लागले कीं) या युद्धाची सोळावी कळा हि (हें युद्ध अत्यंत पूर्ण–जसें असावें तसें वीररसानें परिपूर्ण–असें आहे) [व ही सोळावी कळा] युद्धांतरें (अन्ययुद्धें) न पावति (या युद्धाची बरोबरी शौर्यांत दुसऱ्या कोणत्याही युद्धास येणार नाहीं); [आपण सर्व] या अमृतरसीं च (या युद्धरूपी अमृतरसांत किंवा चंद्रांतच) दृष्टि घोळावी (निमग्न असूं द्यावी–हेंच युद्ध पाहत उभे राहूं–असा भाव). ५. कळा हि सोळावी=परिपूर्ण अवस्था. पौर्णिमेच्या चंद्रास सोळा कळा असतात. पौर्णिमेचा चंद्र परिपूर्ण म्हणून 'कळाहि सोळावी' ह्या शब्दांनीं परिपूर्णावस्था व्यक्त होते. ६. अन्य युद्धें. ७. अमृताच्या रसांत किंवा चंद्रांत. चंद्रास 'सुधांशु' असें नांव आहे. ८. खेदरहित. ९. विप्रवर=**अ**श्वत्थामा; क्षत्रियवर=**भी**म. १०. यांनीं. ११. संपादन केला; यशस्वी रीतीनें पूर्ण केला. १२. शिक्षण. १३. अतुल. ज्यांचें बल अतुल [व] ज्यांचें कुल धन्य असे. १४. **भीमा**श्वत्थाम्यांहून इतर. १५. दुसरे ठिकाणीं. १६. इतर अनेक शूर आहेत; पण ते **भी**म व **अ**श्वत्थामा यांसारखे नव्हेत. १७. इतर वीर. १८. आपल्यास पंडित समजणारे; पण ज्यांच्या अंगीं खरोखर काहींच पांडित्य नसलेले, व्यर्थ गर्व वाहणारे. १९. घायाळ होऊन त्यामुळें क्षीण झाली आहे शक्ति ज्यांची असे देह ज्यांचे (ते भीम व अश्वत्थामा). २०. तृप्त झाले. २१. **भीमद्रौ**णी. २२. सर्पाधिप.

एक ब्राह्मणसत्तम[1], एक क्षत्रावतंस[2] धीट पती[3], ।
ते, अन्योन्यवधातें, शस्त्रास्त्रगतिप्रवीणधी[4] टपती. ॥ १५
त्यांच्या कनकरथांचें[5] मंडळ[6] देखोनि दृष्टि बहु लोभे, ।
साक्षात् अलातचक्रासम[7] समरीं प्रेक्षणीय तें शोभे. ॥ १६
मग दोघे ही ओढुनि चापें आकर्ण[8] सोडिती बाण, ।
दोघांचीं ही हृदयें भेदुनि ते[9] करिति विव्हल प्राण. ॥ १७
दारुणशरप्रहारें एका काळीं च वीर ते खंचले[10], ।
सुंदोपसुंद[11]-यमलार्जुनसे[12], बळ नियतिच्या[13] पुढें न चले. ॥ १८
रथोपस्थीं[14] मूर्च्छित पडतां, गुरुपुत्र, पळविला सूतें[15], ।
भीम हि; धृतराष्ट्रनृपा ! सांगों आश्चर्य काय मीं तूतें ? ॥ १९

---

१. ब्राह्मणश्रेष्ठ. २. क्षत्रभूषण.अवतंस=शिरोभूषण. ३. सैन्याधिपती. [भीम सेनेच्या कांहीं भागाचा अधिपति होता.] ४. शस्त्रास्त्रांच्या योजनेविषयीं प्रवीण बुद्धि आहे ज्यांची असे. ५. सोन्याच्या रथांचें. ६. वर्तुल. वर्तुळाकार चक्र किंवा वर्तुळाकार रथही होऊं शकेल. ७. फिरविलेल्या कोलिताच्या वर्तुळासारखें. अलात=प्रज्वलित काष्ठ. ८. कानांपर्यंत; फार जोरानें-असा भाव. ९. बाण. १०. मूर्च्छित झाले. ११. सुंद व उपसुंद हे हिरण्यकशिपु-वंशांतील निकुंभाचे मुलगे होते. घोर तपश्चर्या करून ब्रह्मदेवाच्या वरानें यांनीं कामरूपत्व, कामगमनत्व, सकलमायावीत्व, अन्याकडून अवध्यत्व इत्यादि वर संपादन केले होते. अशा रीतीनें प्रबल होऊन यांनीं लोकांस त्रास देण्यास प्रारंभ केला. तेव्हां विष्णूनें ब्रह्मदेवाकडून एक अत्यंत सुंदर युवती उत्पन्न करविली व तिला यांजकडे पाठविलें. तेव्हां ते दोघेही हिच्यावर मोहित होऊन एकमेकांशीं भांडूं लागले; व शेवटीं एकमेकांच्या हातून मृत झाले. (पंतकृत आदिपर्व, अध्याय ३८ पहा). १२. एक गंधर्वयुग्म कांहीं कारणामुळें शप्त होऊन अर्जुन-नामक वृक्षद्वय झालें होतें. हे दोन वृक्ष जवळ जवळ होते. बाळपणीं कृष्णास यशोदेनें उखळास बांधिलें होतें, तेव्हां त्यानें उखळ ओढीत ओढीत नेऊन या यमलार्जुन नामक वृक्षांच्या मध्यें घालून त्या दोन्ही वृक्षांस एकदम खालीं पाडिलें. तेव्हां ते गंधर्व शापमुक्त झाले-अशी भागवतांतील कथा अनुसंधेय आहे. भीम व अश्वत्थामा एका काळींच मूर्च्छित झाल्यामुळें या दोन उपमा योजिलेल्या आहेत. १३. दैवाच्या. १४. रथोपस्थ=सारथ्याचें रथांत बसण्याचें स्थान. १५. 'सूतें पळविला' यास 'गुरुपुत्र' व 'भीम' अशीं दोन कर्मे आहेत. गुरुपुत्राच्या सारथ्यानें गुरुपुत्रास व भीमाच्या सारथ्यानें भीमास मूर्च्छासमयीं पळविलें-असा भाव.

## अध्याय [1]अकरावा.

संशप्तकगण विजयें वधिले, तें युद्ध काय वर्णवतें ? ।
संक्षोभवी महाबळ [2]पार्थपवन शत्रुसैन्य [3]अर्णव तें. ॥ १
[4]कुंडलमुकुटवरमणिद्युतिखचितें, [5]सितमनोहरें, [6]अमळें ।
पार्थें [7]अमितें खंडुनि वीरांचीं पाडिलीं शिरःकमळें. ॥ २
[8]अंगदमंडित [9]चंदनचर्चित [10]सायुध नृपाळभुज तोडी; ।
[11]भासति गरुडें भुजग त्यजिले, चाखोनि पाहुनी गोडी[12] ! ॥ ३
[13]शत्रुगजघटांमध्यें दावी जेव्हां [14]सिताश्व [15]केसरिता, ।
[16]सरिता [17]करि तात्काळ चि रक्ताच्या, [18]अरिबळार्णवास [19]रिता. ॥ ४
विजयश्रीसीं होउनि युक्त सुखें [20]श्रीवरा सख्यासंगें, ।
खेळे विजय शरकरें [21]वीरशिरःकंदुकें [22]रुधिर-रंगें. ॥ ५

---

१. पंतांनीं यांत मुळांतला ४८ श्लोकांचा १६ वा अध्याय आणिला आहे. २. अर्जुनरूपी वादळ (तुफान). ३. समुद्र. ४. कानांतील कुंडलांच्या, उत्तम किरीटाच्या व मण्यांच्या द्युतीनें (तेजानें; कांतीनें) सुशोभित अशा (अर्जुनानें). किरीटास 'मुकुटवर' म्हणण्याचें कारण, तो अर्जुनास इंद्रानें दिला होता. ५. जो सिताच्या योगानें मनोहर (सुंदर) दिसत होता त्यानें (अर्जुनानें). स्मित म्हणजे दांत न दिसतां व स्वर स्पष्ट न होतां गालांतल्या गालांत जें मधुर हंसणें तें. 'स्मित'शब्दानें अर्जुनाच्या मनांतील उत्साह दर्शविला आहे. ६. दोषरहित अशा अर्जुनानें. ७. अपरिमितें. ८. बाहुभूषणानें शोभित. ९. 'चंदनचर्चित' असल्यामुळें 'नृपाळभुज' यांचा रंग पांढरा होऊन ते भुजगाशीं साम्यता पावले. १०. हें 'नृपाळभुज' याचें विशेषण. सर्पाकार हस्ताची जीभ आयुध होय, हें सुचविण्याकरितां मुद्दाम हें विशेषण घातलें आहे. ११. हें उत्प्रेक्षालंकाराचें उदाहरण. १२. रक्ताची चव. १३. शत्रूंच्या गजांच्या समूहांत. गजांच्या समूहास 'घटा' असें म्हणतात. १४. शुभ्रवाह अर्जुन. १५. सिंहत्व. १६. नद्या. १७. अन्वयः-(तेव्हां) सिताश्व तात्काळ चि (लगेच; थोड्या वेळांत) रक्तांच्या सरिता (रक्तांच्या नद्या) करि. (शत्रूंच्या रक्तानें नद्या निर्मी) [व] [या नद्यांच्या योगानें] अरिबळार्णवास (शत्रुसैन्यरूपी समुद्रास) रिता करि. १८. शत्रुसैन्यरूपी समुद्रास. १९. रिकामा. २०. श्रीचा (लक्ष्मीचा) वर (नवरा) जो कृष्ण तोच सखा, त्याच्या संगानें-तो बरोबर असल्यामुळें. या शब्दानें विजयश्रीशीं युक्त होण्याचें कारण सुचविलें आहे. श्रीवर बरोबर असल्यामुळें विजयश्रीशीं युक्त होणें साहजिक होय, असें सुचविल्यामुळें हा शब्द साभिप्राय होय. २१. रक्ताचा आहे रंग ज्यांना अशा वीरशिरोरूपी चेंडूंनीं. (मागें अध्याय ८ गीति १७ मध्यें असेंच वर्णन आहे). २२. रक्ताच्या रंगानें युक्त अशा. 'क्षतजरंगें' असें पाठांतर. क्षतज=रक्त.

[1]संशप्तकतृणविपिनीं [2]प्रभुमारुतसख [3]नरज्वलन पेटे, ।
[4]तों [5]सुरसिद्धघनाशीघृतवृष्टि हि त्या धनंजया भेटे. ॥ ६
वर्णिति सुरमुनिवर नरनारायणयश [6]परोपरी, [7]घनसे ।
जयजयकारें गर्जति, गगनांत हि त्या ध्वनीस [8]रीघ नसे. ॥ ७
सुर [9]दिव्यपुष्पवृष्टि श्रीनरनारायणांवरी करिती, ।
कीं [10]त[11]त्प्रसादभाग्यें [12]सुवरांतें [13]कीर्तिसुरसुता [14]वरिती. ॥ ८
संशप्तकमथनीं करि पार्थ [15]महारथसहस्रसम कर्म, ।
[16]धर्मप्रसाद माथां, आंगीं [17]भगवत्प्रसाद [18]दृढवर्म. ॥ ९
युद्धक्रतूंत आला अतिथी गुरुपुत्र, त्या [19]सुयजमाना ।

---

१. संशप्तकरूपी गवताच्या कुरणांत. २. प्रभु(कृष्ण)रूपी वाऱ्याचा मित्र. मारुताचा मित्र अग्नि होय, हें प्रख्यातच आहे. ३. नर(अर्जुन)रूपी अग्नि. ४. त्या वेळीं. जेव्हां पेटला, त्या वेळीं. ५. सुर+सिद्ध+घन+आशीः+घृत+वृष्टि=देव+देवयोनिविशेष+मेघ+आशीर्वाद+तूप+पाऊस=सुरसिद्धरूपी मेघांतून पडणाऱ्या आशीर्वादरूपी तुपाचा पाऊस. तुपानें जसा अग्नि प्रज्वलित होतो, तसेंच देवादिकांच्या आशीर्वादानें अर्जुनास अधिक स्फुरण चढलें–असा भाव. प्रस्तुत गीति **परंपरितरूपकाचें** उत्तम उदाहरण आहे. ही सर्व करामत पंतांचीच आहे. ६. अनेक रीतींनीं. ७. मेघाप्रमाणें. पंतांनीं वरील गीतींतील **रूपक** अद्याप जाऊं दिलें नाहीं, हें लक्षांत ठेविण्यासारखें आहे. वर मेघांच्या वृष्टीचा उल्लेख आहे; येथें त्याच्या गर्जनेचा उल्लेख आहे. ८. स्थळ, रिकामी जागा. ९. स्वर्गांतील फुलांची वृष्टी. १०. कारण. ११. त्यांच्या (नरनारायणांच्या) कृपेच्या भाग्यानें, त्यांनीं कृपा केली म्हणून. त्याचा प्रसाद प्राप्त झाला या भाग्यानें (नशीबानें). १२. उत्तम पतींना. १३. कीर्तिरूप देवकन्या. १४. या गीतीचा भावार्थ असा कीं, देव नरनारायणांवर पुष्पवृष्टी करिते झाले; कां? तर त्या नरनारायणांच्या कृपेनें त्यांच्या (देवांच्या) कीर्तिरूपी कन्यकांस (कीर्तींस) व सुरसुता म्हणजे अप्सरांस चांगले नवरे मिळूं लागले. आपल्या मुलींस चांगला नवरा पाहून देणाऱ्याचे आभार मानणें साहजिक होय–असा भाव. स्पष्टार्थ असा कीं, पुष्कळ वीरांस अर्जुनानें रणांत कीर्तिशेष केल्यामुळें त्याच्या पराक्रमामुळें प्रसन्न होऊन देव कृष्णार्जुनांवर पुष्पवृष्टी करिते झाले. ही गीति व्यंग्यकाव्याचें उदाहरण आहे. १५. हजार महारथी जितकें काम करतील तितकें. [आपण, रथ, अश्व व सारथी यांचें संरक्षण करीत दहा हजार वीरांबरोबर लढणाऱ्या वीराला 'महारथी' म्हणतात]. १६. धर्मराजाचा किंवा धर्मदेवतेचा आशीर्वाद. १७. कृष्णाचा किंवा परमेश्वराचा आशीर्वादरूपी बळकट कवच. ['आंगीं असल्यामुळें' असा पूर्वार्धाशीं संबंध.] १८. ही गीति **काव्यलिंग** अलंकाराचें उदाहरण आहे. कारण याच्या पूर्वार्धांत व उत्तरार्धांत कार्यकारणभाव आहे. ह्या अलंकाराचा येथें **रूपका**शींही योग झाला आहे. १९. चांगला असा यजमान जो अर्जुन त्यास, 'सुयजमान' म्हणण्याचें कारण ज्या हेतूनें अतिथी (अश्वत्थामा) आला होता, तो त्याचा हेतु पूर्ण करण्यास अर्जुन समर्थ होता, हें होय.

[1]शरदर्भगर्भपाणी गर्जोनि म्हणे, '[2]द्विजास [3]मज माना.' ॥ १०
द्रौणि म्हणे, 'कौंतेया ! पूज्य अतिथि हा असें जरि [4]नयज्ञा ! ।
मानिसि, तरि दे [5]युद्धातिथ्य मला, [6]साङ्ग मी करिन यज्ञा.' ॥ ११
तेव्हां अर्जुन [7]हर्षे, प्रभुसि म्हणे, 'सांग गा सख्या ! युक्ती. ।
आइकिली कीं त्वां या माझ्या [8]आचार्यसूनुची उक्ती. ॥ १२
या निजगुरुपुत्राचें [9]आधीं आतिथ्य योग्य मज वाटे, ।
[10]कार्यशतव्यासंगीं न त्यागावें चि साधुच्या [11]वाटे.' ॥ १३
[12]प्रभुनें नेला त्या गुरुपुत्ररथाजवळि [13]सुरथ वेगानें, ।
तेव्हां गगनीं करिती [14]साङ्गन [15]गंधर्वसुरथवे [16]गानें. ॥ १४
कृष्ण म्हणे, 'द्रौणे ! तुज [17]पूजाया जिष्णु आणिला; [18]जावें ।
कां पात्रें [19]अकृतार्थें ? पार्थें कां करुनि [20]वाणि लाजावें ? ॥ १५
[21]स्थिर हो या युद्धमखीं; [22]सत्कर्त्यांचा [23]महागुरू पार्थ; ।

---

१. बाणरूपदर्भधारी. २. 'द्विज' शब्दानें मी आतिथ्यास फार योग्य आहें, असें सुचविलें. ३. मज माना=माझा सत्कार करा. मानणें म्हणजे पूज्य समजणें, आदरातिथ्य करणें. ४. न्याय व अन्याय (योग्यायोग्य किंवा धर्माधर्म) जाणणाऱ्या. ५. युद्धरूप भिक्षा. ६. स+अंग=यथासांग, संपूर्ण. ७. 'हर्षें' असें पाठांतर. ८. गुरूच्या मुलाची (अश्वत्थाम्याची). 'आचार्यसूनु' शब्दानें द्रौणीची योग्यता द्रोणाइतकी आहे व तस्मात् तो आदरातिथ्यास योग्य आहे, असें सुचविलें आहे. हा शब्द हेतुगर्भ आहे. ९. संशप्तकबलास मारण्याच्या पूर्वी. १०. शतावधि इतर कामें असलीं तरी. ११. मार्ग. 'साधुच्या वाटे (सज्जनांच्या मार्गाला) त्यागावेंचि न'–असा अन्वय. दुसरीं जरी अनेक कामें असलीं, तरी योग्य पुरुषाचें आतिथ्य करण्याची जी सज्जनांची पद्धति ती सोडूं नये–हा भाव. हें गीत्यर्ध उत्तम सुभाषितरूप आहे. १२. कृष्णानें. १३. (अर्जुनाचा) उत्तम रथ. १४. अंगनासहित, स्त्रीयुक्त. १५. गंधर्व व सुर (देव) यांचे थवे (समुदाय). हा समास संस्कृत व मराठी शब्दांचा मिळून झाला आहे म्हणून चिंत्य होय. १६. 'सुरथ वेगानें' व 'सुरथवे गानें' हें पंतांच्या ठरींव यमकांपैकीं एक आहे. १७. प्रस्तुत गीतींत व याच्या पुढच्या एक दोन गीतींत मिळून युद्धावर मखाचा (यज्ञाचा), अर्जुनावर यजमानाचा, अश्वत्थाम्यावर अतिथीचा, बाण सोडून प्रतिपक्ष्यास जर्जर करण्याच्या क्रियेवर पूजण्याचा किंवा आदरातिथ्याचा–असे साक्षेप (आरोप) केले आहेत, म्हणून हें **परंपरितरूपकाचें** सुरेख उदाहरण आहे. १८. पात्रें अकृतार्थें कां जावें ? (अर्थात् जाऊं नये. योग्य माणसांचा सन्मान झालाच पाहिजे–असा भाव). पार्थें वाणि करुनि कां लाजावें ? (लाजावें लागेल असें पार्थ करणार नाहीं–असा भाव). १९. इच्छा पूर्ण न होतां. २०. कमताई, उणेपणा. २१. स्थिर हो=पळून न जातां उभा रहा. २२. चांगल्या यजमानांचा; कर्ता (यज्ञकर्ता)=यजमान.

या सदुदारापासुनि[1] पात्रें[2] वरिती गुणानुरूपार्थ[3]. ॥ १६
त्वां हि स्वगुण समस्त प्रकटावे जरि गमेल सार्थकसें; ।
न पहातां पात्रगुण[4] प्रथमचि पूजन करील पार्थ कसें ?' ॥ १७
भगवद्वचन[5] श्रवणीं पडतां चापश्रुतिज्ञ[6] तो धीर, ।
अद्भुत रणपांडित्य[7] प्रकट करी, द्रोणसुत महावीर. ॥ १८
नाराच[8] साठि आधीं प्रभुतें, मग तीन जिष्णुतें ओपी[9], ।
ऐसा प्रताप दावी अश्वत्थामा रणीं महाकोपी[10]. ॥ १९
तें चाप पार्थ खंडी, तों[11] द्रौणी सज्य करि दुजें चाप, ।
ब्राह्मण[12] पुष्कळ खवळे पुच्छच्छेदार्तिनें[13] जसा साप. ॥ २०
प्रभुसी त्रिशतीं[14] वेधी, बाणसहस्रें[15] धनंजयासि, कवी[16]. ।
आचार्यपुत्र, जाणों शरसंधानप्रकार[17], तो, शिकवी[18]. ॥ २१

---

२३. सत्कर्त्यांचा महागुरु=सर्व सत्कार करणारांस पूज्य गुरूच असा. अतिथीस विन्मुख जाऊं न देणें हा जो यजमानाचा धर्म, तो सर्वांपेक्षां अधिक जाणणारा, तस्मात् सर्व राजांत श्रेष्ठ-असा भाव.

१. मोठ्या उदारापासून. २. अतिथी. ३. गुण+अनुरूप+अर्थ=गुणांस शोभेल असा पैसा, विद्येप्रमाणें संभावना. ४. सत्पात्र आहे किंवा कुपात्र आहे; किंवा सत्पात्रच असेल तर किती योग्यतेचें आहे हें. हें पाहण्याचें कारण असें, कीं सत्पात्रीच दान देण्याविषयीं, व कमी अधिक विद्वान् असेल त्या मानानें कमी अधिक संभावना करण्याविषयीं शास्त्रांची अनुज्ञा आहे, हें होय. ५. कृष्णाचे हे शब्द. ६. धनुर्वेद जाणणारा. ७. वर धनुर्विद्येस वेद म्हटल्यामुळें रणांत दाखविलेल्या अस्त्रकौशल्यास 'रणपांडित्य' म्हटलें आहे. ८. बाण. ९. अर्पण करी. १०. हें विशेषण सार्थक आहे, कारण अश्वत्थामा रुद्राच्या अंशानें जन्मला होता. ११. तितक्यांत, लगेच. १२. येथें मुद्दाम 'ब्राह्मण'शब्द वापरण्याचें कारण हें कीं, वर द्रौणीस 'महाकोपी' म्हटलें आहे, व आतां तो 'पुष्कळ खवळे' तेव्हां 'महाकोपी ब्राह्मणाचा कोप सहण्यास फार भयंकर होय' हें या शब्दानें सूचित होतें. १३. पुच्छ+च्छेद+आर्ति=पुच्छ तोडिल्यामुळें होणाऱ्या पीडेनें. १४. तीनशें बाणांनीं. १५. हजार बाणांनीं. १६. प्रस्तुत गीतींत 'कवी' व 'आचार्यपुत्र' हे शब्द साभिप्राय आहेत. 'कवी' म्हणजे शहाणा किंवा दैत्यगुरु शुक्राचार्य. (प्रस्तुतस्थलीं त्या-सारखा शहाणा असा अर्थ.) कोणताही अर्थ घेतला तरी या पदानें 'शरसंधानप्रकार' शिकविण्याची योग्यता ध्वनित होत आहे. 'आचार्यपुत्र'शब्दांतही असाच ध्वनि आहे. १७. बाण न चुकतां लक्ष्यावर सोडण्याचा प्रकार. १८. प्रस्तुत गीत्यर्धांतील उत्प्रेक्षेचा भावार्थ असा कीं, अश्वत्थामा रणांत न डगमगतां खालीं वर्णिल्याप्रमाणें अतिशीघ्र पण इतक्या सशास्त्र व यथोक्त रीतीनें बाण शत्रूवर सोडीत होता, कीं जणों काय तो युद्ध करीत नव्हता, (कारण युद्धाच्या धांदलींत बाण अशास्त्रपद्धतीनेंही सुटण्याचा संभव आहे,) तर शिष्यास धनुर्वेद शिकवीत होता.

तूर्णीर[1], चाप[2], तंडुण[3], भुज, कर, उर, वदन, लोचन, घ्राण[4], ।
कर्ण, शिर, अंग, लोमें[5], कवच, रथ, ध्वज हि वर्षती[6] बाण ! ॥ २२
ऐसें योगबळें[7] करि कौतुक तो मुनि[8] महामना; शर वी[9], ।
जेंवि प्रलयीं[10] प्रकटी किरण, कराया त्रिलोकनाश[11], रवी. ॥ २३
जैसा नभीं[12] न भी घन[13], गर्जे झांकोनि शीतभानु[14] रवी[15], ।
तैसा गुरुसुत हि रणीं आच्छादी[16] शरपटें, प्रभा तुरवी. ॥ २४
करि सिंहनाद[17] वेधुनि त्या नरनारायणांसि[18] शरजाळें ।

---

१. भाता. 'तूणीर' या शब्दाचीं 'तूणः' 'तूणीरः' व 'तूणी' अशीं तीन रूपें आहेत. 'तूणा' असें आकारांत स्त्रीलिंगी रूपही आहे, असें कित्येक कोशकारांचें म्हणणें आहे. २. तीरकमठा. ३. कमठ्याची दोरी. ४. नाक. ५. आंगावरील केंस. संस्कृतांत 'लोम' शब्द नपुंसकलिंगी आहे. ६. वर वर्णिलेला प्रत्येक पदार्थ म्हणजे द्रौणीच्या शरीराचा प्रत्येक भाग जणों काय बाणांचा वर्षाव करीत होता. बाणांचा होत असलेला संतत वर्षाव व त्यांचा अतिशय वेग इत्यादि गोष्टी या उत्प्रेक्षेनें सुरेख वर्णिलेल्या आहेत. बाणमोचनशीघ्रता दर्शविण्याकरितां 'तूणीरांतून बाण निघत नाहींत, तर ज्याच बाणांस प्रसविते कीं काय' अशी उत्प्रेक्षा पुष्कळ कवींच्या वर्णनांत आढळते. त्या उत्प्रेक्षेसही मागें हटविणारी पंतांची वरील उत्प्रेक्षा आहे. यांत बाण फारच शीघ्र निघत आहेत, येवढेंच नव्हे तर सर्व दिशांकडे पसरत आहेत असें दर्शविलें आहे. ७. योगसामर्थ्यानें; (पक्षीं) युक्तीच्या बळानें. 'योग'शब्दावर प्रस्तुत स्थलीं श्लेष साधला आहे. योग म्हणजे अष्टांगयुक्त योगविद्या किंवा प्रयत्न व युक्ति. या शब्दाचा 'कवचादि' असाही एक अर्थ आहे. पहिला अर्थ घेतल्यास २२ व्या गीतींतलें वर्णन स्वभावोक्ति आहे व खरोखरच द्रौणीच्या नासिकादि अवयवांतून बाण उत्पन्न झाले, असें म्हणावें लागेल. बाकीचे अर्थ घेतल्यास वरील गीतींतला उत्प्रेक्षालंकार कायम राहतो व मध्येंच दैविक उपाय न आणतां स्वाभाविक रीतीनेंच वीररसपोषण केल्याचें श्रेय कवीस येतें. शिवाय अश्वत्थामा योगाभ्यासाविषयीं विशेष प्रख्यात असल्याबद्दल कोठेंच उल्लेख नाहीं, म्हणून हा केवळ श्लेष समजावा. ८. खरोखर द्रौणी ऋषि किंवा मुनि नव्हता, तरी 'योगबळें'शब्दांतला श्लेष खुलण्याकरितां द्रौणि भरद्वाजमुनिकुलोत्पन्न म्हणून त्यास 'मुनि' म्हटलें आहे. ९. प्रसवे. शत्रूवर सोडी. १०. प्रलय (विश्वनाशाच्या) समयीं. ११. तिन्ही लोकांचा नाश. त्रिलोक=स्वर्ग, मर्त्य व पाताळ. १२. आकाशांत. 'नभीं न भी' हें छेकानुप्रासाचें उदाहरण आहे. जेव्हां दोन व्यंजनाक्षरांची भिन्नार्थांत आवृत्ति होते, तेव्हां त्या शब्दालंकारास छेकानुप्रास म्हणतात. १३. मेघ. १४. चंद्र. १५. शीतभानु झांकोनि व रवि झांकोनि=सूर्यचंद्रांस झांकून-असा अर्थ. १६. नरनारायणांस आच्छादी-असा अन्वय. १७. सिंहनाद करण्याचें कारण, आपण आतां विजयी झालों, अशी समजूत. १८. मागच्या जन्मीं अर्जुन नर या नांवानें व कृष्ण नारायण या नांवानें बदरिकाश्रमीं तपश्चर्या करीत होते. म्हणून जन्मांतरांतही तींच नांवें वापरलीं आहेत.

तें धीवरें पसरिलें [1]मीनांवरि काय घातकर [2]जाळें ! ॥ २५
अर्जुन म्हणे, 'मुकुंदा ! [3]मज तों हा सोसवे न [4]नाद रणीं, ।
व्याकुळ मन्मन होतें बहु [5]शत्रुकृतीं [6]तुझ्या अनादरणीं. ॥ २६
वधिलें आम्हां दोघां या [7]भावें सिंहनाद हा केला, ।
[8]ऐकेल काय सिंह प्रतिमल्लाच्या उगा चि हाकेला ? ॥ २७
मीं [10]भुजबळशिक्षांहीं करितों [11]भग्नप्रताप [12]हो; याचें ।
शरजाळ खंडितों. बा ! आहे संधान हें [13]पहायाचें. ॥ २८
एकैक बाण तोडिन तीं तीं ठायीं, पहा सख्या कृष्णा ! ।
गुरुपुत्राची या तों समयीं विफळा करीन मी [14]तृष्णा.' ॥ २९
ऐसें वदोनि सुखवी अर्जुन [15]दुग्धाब्धिनंदिनीहारा, ।
उडवी गुरुपुत्राच्या शरजाळा, वायु जेंवि [16]नीहारा. ॥ ३०

---

१. मत्स्यांवर. २. या शब्दानें असें सुचविलें आहे कीं, ज्याप्रमाणें मीनास जाळ्यांतून सुटून जातां येत नाहीं, त्याचप्रमाणें त्या शरपटलांतून बाहेर पडण्यास **कृष्णार्जुन** समर्थ नाहींत, असें **द्रौणीस** व प्रेक्षकांस वाटलें! या अर्थांत **उत्प्रेक्षालंकार** आहे. ३. मज तों=मला तर. ४. **अश्वत्थाम्यानें** केलेला सिंहनाद. ५. शत्रूनें केलेल्या. ६. माझ्या अनादरणाबद्दल नाहीं, पण तुझ्या अनादरणाबद्दल मला फार वाईट वाटत आहे—असा भाव. ७. समजुतीनें. ८. या गीत्यर्थांत **अप्रस्तुतप्रशंसा** (अन्योक्ति) अलंकार आहे. याचें लक्षण मागें आलेंच आहे. प्रस्तुत उदाहरणांत दोन अप्रस्तुतांची भेसळ आहे. सिंह प्रतिमल्लाच्या हाकेला उगा चि ऐकेल काय ?— असा अन्वय. 'सिंह—प्रतिसिंह' किंवा 'मल्ल—प्रतिमल्ल' असें पाहिजे होतें. पण प्रस्तुत स्थलीं एकास सिंह म्हटलें आहे, व दुसऱ्यास 'मल्ल' म्हटलें आहे. सिंह=मृगांचा राजा व मल्ल=पहिलवान. हे वीर प्रतिवीर कसे होऊं शकतील ?—हा दोष (खरोखर हा मोठासा दोष नव्हे) काढून टाकण्याकरितां सिंह=श्रेष्ठ असा अर्थ घ्यावा; किंवा **द्रौणी** माझ्यापुढें कसा ? तर सिंहापुढें यःकश्चित् मल्ल जसा—असा मुद्दाम अर्थ सुचविण्याकरितांच असा प्रयोग केला आहे, असें समजावें. ९. उत्तरास प्रत्युत्तर दिल्याशिवाय; युद्ध करण्यास गेल्याशिवाय. १०. भुजबलानें शिक्षा करून त्या योगानें; किंवा भुजबलाच्या शिक्षेनें (शिक्षणानें). माझ्या भुजबलास आजपर्यंत जें शिक्षण मिळालें, त्याच्या प्रभावानें. ११. भग्न झाला आहे प्रताप ज्याचा असा. १२. **अश्वत्थामा**. १३. हा प्रसंग पाहण्यासारखा आहे—असा भाव. १४. तहान, जयेच्छा. १५. दुग्ध+अब्धि+नंदिनी+हार=दूध+समुद्र+मुलगी+हरणारा. दुग्धसमुद्राची मुलगी जी लक्ष्मी, तिचा पति **विष्णु** त्याला. येथें '**कृष्णाला**'—असा अर्थ. १६. धुक्यास.

अश्वत्था[1] मागावा वर पूजुनि, परि नव्हे भला मुंजा[2], ।
अश्वत्थामा गावा[3], कीं तो गुरु, खंडिजे चि शरपुंजा. ॥ ३१
जिष्णुपुढें प्रागल्भ्यें द्रौणिशरांचें टिके चि न पटळ[4] तें, ।
जेंवि वसिष्ठमुनिपुढें झालें गाधिजमुनींद्रतप[5] टळतें[6]. ॥ ३२
गुरुसुतशरपटळातें खंडुनि, संशप्तकांसि तो[7] दंडी[8], ।
तेव्हां सुरमुनि म्हणती, 'शंकर[9]सम एक पार्थ कोदंडी[10].' ॥ ३३
विजय[11]शरसमूह, बहु क्षुधित, गिळी वीरसैन्य. हा[12] रीती ।
घटकर्णाची[13] धरि; कीं खंडी द्विज-बाण जैं, न्यहारी[14] ती[15]. ॥ ३४

---

१. अश्वत्थ वृक्षास; पिंपळाच्या झाडास. अश्वत्थ वृक्ष फार पुरातन काळापासून पूज्य मानिला जात आहे. भगवद्गीतेंतही कृष्णानें 'अश्वत्थः सर्ववृक्षाणाम्' (अध्याय १० श्लोक २६) असें म्हटलें आहे. हें गीतीचें पूर्वार्ध अप्रस्तुतप्रशंसामंडित व सुभाषितरूप आहे. याचा भाव असा कीं, सत्पुरुष जो असेल त्याचीच स्तुती करावी; नीचाची करूं नये. २. ब्रह्मराक्षस; बालपिशाच; सोडमुंज होण्यापूर्वीं मेलेल्या मुलाचें भूत. ३. अश्वत्थामा गावा=अश्वत्थाम्याची तारीफ केली पाहिजे. अश्वत्थामा वंद्य आहे–असा भाव. पूर्वार्ध-उत्तरार्धाचा संबंध असा कीं, ज्याप्रमाणें अश्वत्थ पूज्य पण मुंजा त्याज्य, त्याचप्रमाणें द्रौणी गुरु किंवा गुरुपुत्र म्हणून पूज्य, पण त्याचे शर मात्र खंडण्यासच योग्य. अश्वत्थ हवा, पण वरचा मुंजा नको; अश्वत्थामा हवा पण त्याचा शरपुंज नको. मुंजा घालवावाच, शरपुंज तोडावाच. या गीतींतल्या प्रथम व तृतीय चरणांतलीं अक्षरें एकच आहेत. अशा रीतीनें पंतांनीं प्रस्तुत स्थळीं सहा अक्षरांचें **आदियमक** साधिलें आहे. आदियमक, अंत्ययमक, अश्वधाटीयमक इत्यादि यमकांचे अनेक प्रकार आहेत. त्यांतून अंत्ययमक मराठी कवितेंत सर्वत्र दृष्टीस पडतें. आदियमक इत्यादि प्रकार पंतांच्याच कवितेंत दृष्टीस पडतात. ४. आच्छादन किंवा समूह. ५. विश्वामित्रतप. ६. टळतें झालें=फिक्कें पडलें, कमी योग्यतेचें ठरलें, शक्तिहीन झालें. ७. पार्थ. ८. मारी. ९. प्रख्यात धनुर्धरांत शंकराची गणना आहे. पिनाक धनु धरणारा म्हणून त्याची नेहमींची ख्याती आहेच. याशिवाय त्रिपुरदहनसमयीं मेरूपर्वतास शंकरानें धनु केला होता. १०. धनुर्धारी. ११. अर्थ व अन्वयः—विजयशरसमूह (अर्जुनाच्या बाणांचा समूह) बहु क्षुधित (फार भुकेला) [होता. तस्मात्] वीरसैन्य गिळी. हा (विजयशरसमूह) घटकर्णाची रीती (कुंभकर्णाची शत्रुसैन्यास तोंडांत टाकण्याची पद्धत) धरि (स्वीकारी); जै (जेव्हां) द्विजवाण (ब्राह्मण जो अश्वत्थामा त्याचे बाण) खंडी [तैं] (तेव्हां) [त्यास] (त्या शरसमूहास) ती (सैन्य गिळंकृत करण्याची ती रीति) न्यहारी (फराळच) [झाली] कीं (कीं काय !) १२. हा म्ह० विजयशरसमूह. १३. कुंभकर्णाची. १४. फराळ. १५. रीती.

क्षुधितार्जुनमार्गणगण[1] त्या संशप्तकबळा शरव्या[2] पी[3]; ।
निकट असो दूर वसो, रविकरसा[4], अभिमुखा[5] शर व्यापी[6]. ॥ ३५
जे शूर, दूर साग्रक्रोश[7] उभे, अश्वगजरथारूढ, ।
ते ही जिष्णुशरानीं व्यसु[8] केले फार, अल्प संमूढ[9]. ॥[10] ३६
अर्जुन युगान्त-भास्कर[11]; पसरुनि शरकरसहस्र[12] तो शोषी[13] ।
संशप्तकबळसागर[14]; निज तेज चि मल्ल वपु तसें पोषी[15]. ॥ ३७
शक्रें[16] वज्रें गिरितें, नाराचशतें तसें गुरुसुतातें[17][18] ।
अभिमन्युच्या[19], प्रमथिलें; जाणों समजाविलें चि रुसतातें[20]. ॥ ३८

---

१. अर्जुनाच्या भुकेलेल्या बाणांचा समूह. मार्गण=बाण, (पक्षीं) याचक. २. निशाणास. शरव्य म्हणजे ज्यावर शर मारितात तें निशाण. ३. पीत होता. 'पीत होता' असें न म्हणतां 'खात होता' असें म्हणावयाला पाहिजे होतें. किंवा 'तृषितार्जुनमार्गणगण' असें तरी म्हणावयाला पाहिजे होतें. म्हणजे ही गीति आणखी खुलली असती. ४. सूर्यकिरणाप्रमाणें. कारण कोट्यवधि कोसांवरून येणाऱ्या सूर्यकिरणास जवळ किंवा दूर हा भेदमुळींच नाहीं. 'कधीं कधीं उपमेंत बिंबप्रतिबिंबभाव झळकतो. [त्याप्रमाणें] या आर्येंत अर्जुन 'बिंब' असून 'रवि' हा त्याचें 'प्रतिबिंब' समजावें. (अलंकारमीमांसा–पृष्ठ १९). ५. समोर असलेल्यास. ६. शर व्यापी, म्ह० शर जाऊन पोहोंचत असे. दूरच्या शत्रूंसही जर्जर करीत असे–असा भाव. ७. संपूर्ण कोस. 'सार्ध क्रोश' असें पाठांतर. ८. प्राणरहित. ९. थोडे संमूढ (मोहित) केले, व्यसु फार [वीर] केले. १०. मोहित. ११. प्रलयकालीन सूर्य. १२. शररूपी हजार किरण. १३. आकर्षी; पिऊन घेई. १४. संशप्तकसैन्यरूपी समुद्र. येथें **परंपरितरूपक** आहे. १५. अन्वय व अर्थः—[जसें] (ज्याप्रमाणें) मल्ल (पहिलवान) वपु (मेवामिठाई इत्यादिकांनीं कुस्ती खेळून आपलें शरीर) पोषी (पोसतो), तसें (त्याचप्रमाणें) [अर्जुन संशप्तकांस मारून] निज तेज चि (आपलें तेज, आपलें शौर्य) [पोषी] (वाढविता झाला). १६. इंद्रानें 'शक्नोति दुष्टजये इति शक्रः' (दुष्टांस जिंकण्यास समर्थ म्हणून शक्र) अशी या शब्दाची व्युत्पत्ति आहे. इंद्रानें सर्व पर्वतांचे पक्ष तोडून टाकिले होते, या पौराणिक कथेस उद्देशून हें वाक्य आहे. १७. अश्वत्थाम्यास. १८. '...... तसें गुरुस तातें। अभिमन्युच्या......' असें पाठांतर. तातें अभिमन्युच्या=अभिमन्यूच्या बापानें, अर्जुनानें. येथें स्पष्ट अर्जुनानें असें न म्हणतां द्राविडी प्राणायामानें सांगण्याचें कारण यमक तर आहेच; पण या शब्दांनीं अभिमन्यूच जर तितका (सर्व कौरव वीरांस पुरेल असा) शौर्यवान निघाला, तर हा त्याचा बाप (अर्थात् त्याहून श्रेष्ठ) होय–हा ध्वनिही आहे. किंवा अभिमन्युवधप्रसंगीं कौरवांनीं केलेला अन्याय स्मरून अर्जुनानें द्रौणीस अधिक कोपानें प्रमथिलें–असाही ध्वनि असूं शकेल. १९. अभिमन्यूच्या [तातें]. २०. रुसलेल्यास. आपणासि टाकूनि परांसीं युद्ध करितो म्हणून–**पंत.** येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'रुसता तें' असा पाठ आहे.

गुरुसुत सोडी बहुशर कीं[1] सर्व हरीश[2] ते खिळावे ची; ।
क्षुधितशराजगरानीं[3] रथ पार्थासकट ही गिळावे ची. ॥ ३९

अर्जुन ते शर खंडी. तेव्हां आचार्यपुत्र बहु कोपे. ।
तच्छरपटलें[4] केवळ न विजयरथ, भानुचा[5] हि रथ, लोपे. ॥ ४०

धर्मज्ञ गृहस्थ[6] जसा, प्राप्तातिथिकारणें[7] गृह निवेदी,[8] ।
गुरुसुत तसा निजास्त्रें[9] अर्पी पार्थासि, विमुख[10] हों नेदी. ॥ ४१

संशप्तकांसि टाकी, स्वीकृति[11] गुरुसूनुची च पार्थ करी; ।
त्यजुनि आपांक्तेयांतें[12], पांक्तेयांतें[13] चि अतिथि जेंवि वरी. ॥ ४२

जैसे विमार्गगामी[14] गुरु,[15] कवि,[16] बुध, मंगल ग्रह क्रूर, ।
तैसें[17] लोकक्षयकर[18] युद्ध करिति पांडुगुरुजनी[19] शूर. ॥ ४३

---

१. मनांतला उद्देश हा कीं. २. विजयाश्व–पंत. हरि+ईश=अश्व+श्रेष्ठ=(अर्जुनाचे) उत्तम घोडे. 'हरीस' असें पाठांतर. हरीस=कृष्णास. ३. क्षुधित+शर+अजगर=क्षुधायुक्त बाणसर्पांनीं. ४. आचार्यपुत्राच्या शररूपी पटलानें. ५. सूर्याचाही. ६. गृहस्थधर्म जाणणारा. ७. प्राप्त झालेल्या (आलेल्या) अतिथीच्या प्रीत्यर्थ. आलेल्या अतिथीस संतुष्ट करून पाठविण्याकरितां धर्मादिग्रंथांत अतिथिसत्कार फारच योग्यतेचा मानिलेला आहे. अतिथिसत्कारास 'अतिथियज्ञ' हें बहुमानसूचक नांव दिलेलें आहे. ८. गृह निवेदी=गृह अर्पण करी. घरांतली पाहिजे ती वस्तु कांकूं न करितां देई, अतिथीस संतुष्ट करण्याकरितां सर्व स्वसामर्थ्य खर्च करी–असा भाव. ९. आपल्याजवळ जितकी अस्त्रविद्या होती ती सर्व. १०. विमुख म्हणजे ज्याचें तोंड फिरलें आहे. घरांतून परत जाणारा. येथें–पळून जाणारा. ११. स्वीकार. १२. पंक्तीस अयोग्य असे, बहिष्कृत, किंवा स्वभावतःच हीन जातीचे. १३. पंक्तीस घेण्यास योग्य जे त्यांस. १४. अयोग्य मार्गानें जाणारे. ज्या ज्या स्थानीं असावयाला पाहिजे त्या त्या स्थानीं न राहतां विषमस्थानीं जाणारे. ज्योतिषशास्त्रांत (जातकस्कंधांत) अमक्या स्थळीं ग्रह असल्यास शुभ फळ देणारा व अमक्या स्थलीं असल्यास अशुभ फळ देणारा होतो असे नियम आहेत. उदाहरणार्थ, 'केंद्राधिपत्यदोषस्तु बलवान् गुरुशुक्रयोः। मारकत्वेऽपि च तयोर्मारकस्थानसंस्थितिः ॥' म्हणजे, केंद्राधिपति असून जर गुरुशुक्र दुसऱ्या व सातव्या स्थलीं म्हणजे मारकस्थलीं असले, तर ते हटकून मरणास कारण होतात. अशाच रीतीनें बुधमंगलग्रहांविषयीं समजावें. या उपमेवरून पंतांस ज्योतिषशास्त्रांत जातक (जन्मपत्रिकासंबंधी) स्कंधाची तरी चांगलीच माहिती होती असें दिसतें. १५. बृहस्पतिग्रह. हा सर्व ग्रहांत पूर्ण सौम्य मानलेला आहे. १६. शुक्र. १७. 'तैसे' असें पाठांतर. १८. जगाचा नाश करणारे. १९. पांडुजनी व गुरुजनी. पांडुपुत्र अर्जुन व द्रोणपुत्र अश्वत्थामा.

सर्वांगीं, गुरुसुतशर [1]दोघां कृष्णांचिया, जयीं जडले, ।
गमति [2]युगांतार्क चि ते, भस्म करुनि लोक आपण हि [3]पडले. ॥ ४४
[4]द्रौणि [5]शरकवच, [6]भवचतुरास्यास्त्रज्ञार्जुनास हरिस हि, तें, ।
जेव्हां लेववि, चित्तें पार्थें द्विज पूजला चि [7]हरिसहितें. ॥ ४५
[8]द्विजरणकौशल सुखवी विजयमना; अतुळ ताप दे परि [9]तें, ।
[10]कीं, साक्षात् [11]जगदात्मा जो [12]उग्रें पीडिलें चि त्या हरितें. ॥ ४६
शिरले [13]परमोदारा [14]भगवंताच्या [15]यथेष्ट शर देहीं; ।

---

१. दोघां कृष्णांचिया=दोघां कृष्णांच्या; कृष्णाच्या व अर्जुनाच्या. अर्जुनासही 'कृष्ण' असें नांव होतें. 'बीभत्सुर्विजयः कृष्णः सव्यसाची धनंजयः'. २. युगांतकालीन सूर्य. ३. आपणही पडले असें म्हणण्याचें कारण ते (युगांतार्क) वर आकाशांत न दिसतां खालीं दिसत होते. प्रस्तुत स्थलीं उत्प्रेक्षा आहे. ४. अन्वय व अर्थ:—जेव्हां द्रौणी भवचतुरास्यास्त्रज्ञार्जुनास हरिस हि तें (आपलें) शरकवच (शरांनीं बनविलेलें कवच) लेववि (परिधान करवी), तेव्हां (त्या द्रौणीच्या शौर्यानें खूष होऊन) हरिसहितें पार्थें (कृष्णानें व अर्जुनानें) चित्तें (मनानें) द्विज (अश्वत्थामा) पूजिला चि (वाखाणिला; आराधिला). आपल्यासारख्या शूरांस बाणांनीं जर्जरित केलें म्हणून कृष्णार्जुन द्रौणीच्या शौर्यास वाखाणिते झाले-असा भाव. ५. शरांनींच बनविलेलें कवच. कवच=सर्व अंगास झांकणारें चिलखत. द्रौणीनें कृष्णार्जुनांवर इतके बाण सोडिले, कीं त्यांनीं ते पूर्णपणें झांकले गेले, म्हणून शरांवर कवचाचा आरोप केला आहे. ६. भव+चतुरास्य+अस्त्रज्ञ+अर्जुनास=शंकर+ब्रह्मा+अस्त्रें जाणणारा+अर्जुनास=शैवास्त्र (पाशुपत) व ब्रह्मास्त्र जाणणाऱ्या अर्जुनास. 'भवचतुरास्यास्त्रज्ञ' हें विशेषण साभिप्राय आहे. उत्तम व दुसऱ्यास दुर्लभ अशीं अस्त्रें जाणणाऱ्यासही द्रौणीनें जर्जर केलें-हा ध्वनि. येथें 'विशेषणांचें साभिप्रायत्व' आहे, म्हणून हा परिकरालंकार. ७. हरिसहितें पार्थें (कृष्णासह पार्थानें)-असा अन्वय. ८. ब्राह्मणाचें (द्रौणीचें) युद्धकौशल्य. ९. तें=द्विजारणकौशल्य. १०. कारण. द्विजरणकौशल अर्जुनास सुखवी व ताप दे; हे परस्परविरोधी परिणाम होण्याचीं कारणें द्रौणीचें शौर्य, व तो जगदात्म्या कृष्णास पीडितो हीं होत. 'एक' पदार्थावर एक किंवा दोन विरुद्ध धर्मांचा आरोप करण्यांत आला कीं विरोध झाला. (अलंकारमीमांसा, पृष्ठ ३३). म्हणून येथें 'विरोधा'लंकार. ११. जगाचा आत्मा किंवा जगत् आहे आत्मा ज्याचा. जो जगांत व्यापून आहे व जगत् ज्यांत व्यापून आहे असा. १२. अश्वत्थाम्यानें. उग्र=तामसी, भयंकर, विक्राळ. १३. अत्यंत उदार अशा. १४. कृष्णाच्या. 'भगवान्' या नांवाच्या उत्पत्तीविषयीं पुढील श्लोक लक्षांत ठेवण्यासारखे आहेत:—'ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसः श्रियः । वैराग्यस्याथ मोक्षस्य षण्णां भग इतीङ्गना ॥' (समग्र ऐश्वर्य, धर्म, यश, संपत्ति, वैराग्य आणि मोक्ष ह्यांस 'भग' असें म्हणतात. तें ज्यास आहे तो भगवान् होय.) 'उत्पत्तिं च विनाशं च भूतानामगतिं गति[illegible] वेत्ति [illegible] च स

[1]ब्रह्मण्यवदान्यसधनसाधूच्या [2]अर्थिजन जसे [3]गेहीं. ॥ ४७
तेव्हां अर्जुन योजी अस्त्र, जया नाम [4]सर्वतोधार, ।
शरधारा सर्वत्र प्रकटाव्या, जें असें [5]महोदार. ॥ ४८
तदपि न भी द्विज. व्हावी मृत्यूच्या ही [6]जिहीं व्यथा चित्ता, ।
वेधी तशा शरानीं [7]कृपणा पार्था हि, त्या हि [8]तद्वित्ता. ॥ ४९
खंडुनि ते शर, पार्थ द्रौणीतें [9]निजशरालयीं कोंडी, ।
पाडी संशप्तक-भट-[10]करिटिघटा, [11]वज्रधर जसा [12]धोंडी. ॥ ५०
[13]प्रळयीं जसा [14]कपर्दी, मर्दी संशप्तकांसि हा [15]जिष्णु ।
[16]भ्राजिष्णु स्वशरांहीं, दैत्यबळातें जसा [17]महाविष्णु. ॥ ५१

---

वाच्यो भगवानिति. ॥' (प्राणिमात्रांची उत्पत्ति आणि नाश, भावी संपत्ति आणि विपत्ति, ज्ञान आणि अज्ञान ह्या सर्वांचीं कारणें जो जाणतो, त्यास '**भगवान्**' म्हणावें). १५. 'यथेष्ट'चा मूळचा अर्थ 'इच्छेप्रमाणें'. येथें खूप, फार.

१. ब्रह्मण्य=ब्राह्मणाचें हित करणारा. वदान्य=दानशूर. किंवा मनोहर बोलणारा. सधन=धनवान्. २. याचक, भिक्षुक. ३. घरीं. ४. सर्वत्र धारा (शर) ज्याच्या असें. हाच अर्थ उत्तरार्धांत स्पष्ट केला आहे. ५. फार उदार. 'महोदार' म्हणण्याचें कारण मेघाप्रमाणें तें अस्त्र बाणांचा पाऊस पाडितें. ६. ज्यांनीं. ज्या शरांनीं—असा भाव. ७. **पा**र्थास कृपण म्हणण्याचें कारण असें कीं, ज्याप्रमाणें कृपण आपल्या धनाचें सर्व जगापासून नेहमीं काळजीनें रक्षण करीत असतो, त्याप्रमाणें **अ**र्जुन **कृ**ष्णास शत्रूच्या माऱ्यापासून वांचवीत होता. ८. त्याचें (अर्जुनाचें) वित्तच असा जो कृष्ण त्यास. **अ**र्जुन **कृ**ष्णास स्ववित्त (धन) मानीत होता. कल्पनासादृश्य:—'तत्तस्य किमपि द्रव्यं यो हि यस्य प्रियो जनः ।' (भवभूतिकृत उत्तररामचरित—अंक २।१९). ह्या पद्यांशाचें भाषांतर:—'तें त्यास धन विलक्षण जो ज्यास प्रिय असेल जन लोकीं. ।' (कै० परशुरामपंत तात्या गोडबोले). ९. आपल्या बाणांच्या घरांत. १०. हत्तींच्या समूहास. 'करटि' असें रूप विशेष पाहण्यांत आहे. 'करिटि' असें नाहीं. ११. ह्या गीत्यर्धाचा अर्थ:—(वज्रानें मोठमोठे पर्वत चूर्ण करणारा) इंद्र जसा धोंडी (मोठमोठे दगड) [सहज पाडितो, तसा पार्थ] संशप्तकवीरांच्या हत्तींच्या झुंडीच्या झुंडी हाणून पाडी. काळे हत्ती व काळ्या विशाळ धोंडी यांतील सादृश्य चमत्कृतिजनक आहे. 'नखाग्रांनीं येथें गुरुतर शिला भेदुनि करी । भ्रमानें आहे रे ! गिरिकुहरिं या निद्रित हरी' ह्या **ज**गन्नाथरायांच्या उक्तींतही हेंच साम्य दर्शविलें आहे. १२. मोठा धोंडा. १३. संहार करण्याचें काम **शि**वाचें म्हणून 'प्रळयीं.' १४. शिव, महादेव. कपर्द=शिवाचा जटाजूट. १५. जयशील असा **अ**र्जुन. १६. तेजस्वी. १७. '**विष्णु**'शब्दाची व्युत्पत्ति अशी:—'वेवेष्टि व्याप्नोति चराचरं जगत् स विष्णुः' जो सर्व चराचर जगत् व्यापून आहे तो **विष्णु**.

होतां[1] रक्तनदींत स्वरथगजहयांसमेत[2] ही मग्न, ।
संशप्तकबळ झालें असतां निजभुजबळें[3] रणीं भग्न[4], ॥ ५२
पुनरपि गुरुपुत्रातें, झांकी, निजशरपटें कविप्राया[5]. ।
पार्थ म्हणे, 'उष्णकरें[6] न स्पर्शो[7] देव अर्क[8] विप्रा या[9].' ॥ ५३
द्विजशरपंक्ति[10] उडवि शरपटल[11], जसा पटे[12] टिकों न दे वात्या[13], ।
सुजना जेंवि खळ, कळ[14] क्षण हि पडों दे नरा न देवा त्या. ॥ ५४
शिरति दुरुक्तसम[15] कठिन शर हृदयीं त्या रणांत पार्थाच्या, ।
करिति व्याकुळ ते शरचोर[16] प्रभुला हि साधुसार्थाच्या[17]. ॥ ५५

---

१. ही व पुढची गीति या दोहोंचा अन्वय एकत्र करावा. २. आपले म्हणजे पांडवांचे रथ, गज, घोडे यांसह. ३. आपल्या (अर्जुनाच्या) बाहुपराक्रमानें. ४. नष्ट. ५. शुक्रतुल्य. (कवि=शुक्र, शहाणा.) 'कविप्राया' हें 'गुरुपुत्रा'चें विशेषण. ६. तापलेल्या किरणांनीं. ७. 'उष्णकर' शब्दांनीं श्लेष (गरम हात; पक्षीं उष्णकिरण–असे दोन अर्थ) साधण्याकरितां येथें 'स्पर्श' शब्द वापरिला आहे. स्पर्शणें म्हणजे शिवणें किंवा हातानें लागणें किंवा त्वगिंद्रियास मात्र समजेल अशी क्रिया (तापविणें इ०) करणें. ८. सूर्य. ९. द्रौणीस यांत उत्प्रेक्षा आहे. कारण हें वाक्य खरोखर अर्जुनाच्या तोंडचें नसून, अर्जुन द्रौणीस जर्जर करण्यासच बाण सोडीत असतांही, जणों काय द्रौणीस सूर्यरश्मि लागूं नये असें म्हणून पार्थानें त्यास बाणांनीं आच्छादून टाकलें, अशी कवीची उत्प्रेक्षा आहे. ही पार्थाचीच उक्ति आहे, असें म्हटल्यास हें वाक्य अर्थात् अर्जुनानें थट्टेनें उच्चारिलें असें म्हणावें लागेल, व रसभंग होईल. वीररसवर्णनांत थट्टा शोभत नाहीं. १०. एकामागून एक सुटणारे अश्वत्थाम्याचे शर. ११. अर्जुनानें सोडिलेल्या शरांचें पटल. १२. कपडा. १३. वात्या=झंझावात. १४. 'कळ' हा लेखनप्रमाद दिसतो. येथें 'खळ' असा शब्द असावा. पंत क्वचित् 'ख' च्या ठिकाणीं 'क' चा उपयोग करितात. (सभापर्व, अध्याय ८–९ पहा). खळ=विसांवा. अन्वय:–जेंवि खळ (दुष्ट) सुजना क्षण हि खळ (विसांवा) पडूं न दे, तेंवि द्विजशरपंक्ति त्या नरा [आणि] देवा (कृष्णाला) खळ पडों न दे (यत्किंचित् विसांवा घेऊं देत नाहीं). १५. वाईट शब्द किंवा शिव्या यांसारखे. १६. शररूपी चोर. अन्वय व अर्थ–ते (द्रौणिप्रयुक्त) शरचोर (बाणरूपी चोर) साधुसार्थाच्या (साधुसंतरूपी व्यापारी जनसमूहाच्या–सज्जनरूपी व्यापारी मंडळीच्या) प्रभुला (यजमानाला–मोठ्या सावकाराला) हि व्याकुळ करिति (लुटून त्रास देती). या वाक्यांत पंतांनीं केवळ आपल्या बुद्धिसामर्थ्यानें उत्तमोत्तम परंपरितरूपक साधिलें आहे. शरांवर चोरांचा व कृष्णावर श्रेष्ठ सावकाराचा–असे सापेक्ष आरोप आहेत म्हणून परंपरितरूपक होय. १७. साधुरूपी व्यापारी संघाच्या. सार्थ=व्यापारी लोकांचा समाज. 'सार्थो वणिक्समूहे स्यादपि संघातमात्रके' इति मेदिनी.

राया[1] ! अशांत धांवुनि तवसुतबळ ही धनंजया वेढी; ।
त्यांत दिसे पार्थरथध्वज, जेंवि खळांत[2] वृषगणीं[3] मेढी[4]. ॥ ५६
एका पार्थावरि ते[5] करिते झाले चि वृष्टि शस्त्रांची, ।
अस्त्रांची[6] ही, त्यांच्या[7] स्त्रीवरि[8] करि जेंवि देव[9] वस्त्रांची[10]. ॥ ५७
खंडुनि शस्त्रास्त्रांतें, तव वीरांतें हि, गुरुसुतासकट, ।
पार्थें केला; पवनें[11] घन[12] वारुनि[13] भानुसा, रथें[14] प्रकट. ॥ ५८
त्यांच्या[15] चि क्षतजनद्या[16] त्यांतें[17] चि रणांगणांत वाहविती[18], ।
निजविषयवासना[19] बहु खवळोनि जसें न धैर्य राहविती. ॥ ५९
त्यांचे चि रक्तपूर[20] क्रूर[21], सुदुस्तर[22], तयांसि बुडवीती, ।
जैसे कुपुत्र[23] गज हि न आवरति, पदें-करूनि तुंडवीती[24]. ॥ ६०

---

१. धृतराष्ट्रा ! २. धान्य मळण्याच्या खळ्यामध्यें जशी मेढ दिसते, तशी. खळांत=खळ्यांत. 'खल' (=खळें) हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आहे. ३. बैलांच्या समूहांत. ४. खांब. बैल बांधण्याच्या आंगणांत लांकडाची 'मेढी' पुरलेली असते, तीस 'मेढ' असेंही म्हणतात; ती उंच असते; व दुरून दिसते. ५. सर्व कौरवसैनिक. ६. अस्त्रांची वृष्टि—असा अन्वय. ७. अर्जुनाच्या. ८. द्रौपदीवर. ९. कृष्ण. १०. द्रौपदीवस्त्रहरणप्रसंगास उद्देशून हें वाक्य आहे. [पंतकृत महाभारत—सभापर्व—अ० ५. पद्य]. ११. वायूनें. १२. मेघ. १३. दूर करून. १४. भानु (सूर्य) आकाशांत रथावर बसून फिरतो—अशी समजूत आहे. रथ प्रकट करण्याची क्रिया पार्थास व सूर्यास सामान्य आहे. १५. कौरवसैन्याच्याच. १६. रक्ताच्या नद्या. १७. कौरवसैन्यांतील मृत माणसांस. १८. वाहून नेती. इतके लोक बाणविद्ध होऊन पडले, कीं त्यांच्या आंगांतून निघालेल्या प्रवाहांनींच रणांगणांतील प्रेतें वाहून जात होतीं—असा भाव. १९. आपली विषयांच्या ठायीं असलेली आसक्ति, इच्छा. पंचभूतांसंबंधीं पांच विषय आहेत, ते असेः—शब्द, रूप, रस, गंध व स्पर्श. या विषयांस ग्रहण करणारीं पांच इंद्रियें अनुक्रमें अशीं आहेतः—कर्ण, नेत्र, रसना (जीभ), नासिका व त्वक्. या विषयांकरितां—रूपस्पर्शादि ऐहिक तुच्छ सुखांकरितां—मनुष्याचा जो ओढा त्यास वेदांतशास्त्रांत 'विषयवासना' म्हणतात. विषयवासना—दर्शनस्पर्शनादिक—उत्कट झाली असतां मनुष्य वेडा बनतो व त्यास त्या विषयाशिवाय कांहींच सुचत नाहीं व तो इतर कामें करण्यास पूर्णपणें असमर्थ होतो, हें प्रसिद्ध आहे. हेंच या गीत्यर्धांत सांगितलें आहे. आपल्याच विषयवासनारूप दुर्गुणांनीं जसा मनुष्य वाहविला जातो, तसेच ते रणांतले शूर आपल्याच रक्तांत वाहत होते—असा सांगण्याचा भाव. ही गीति म्हणजे एक उत्तम उपदेश आहे. २०. रक्तांचे पूर. २१. भयंकर. २२. तरण्यास अत्यंत दुःखकर. हीं 'रक्तपूर' याचीं विशेषणें. २३. हें गीत्यर्ध देखील

पार्थें तव[1] बळ मथितां, निज[2]हृदयीं बाण लागतां चि रणीं, ।
क्षोभे द्रौणि, जसा रविकांतमणि[3] स्पर्शतां चि तत्किरणीं[4]. ॥ ६१
शर एकदा चि सोडी दश, त्यांतुनि हृदय पांच विजयाचें ।
भेदिति[5], उरले[6] त्याचें[7] काळमुखीं[8] नाम वांचवि जयाचें[9]. ॥ ६२
उग्रशरक्षततनु[10] ते दोघे ही वीर शोणितें[11] वमती[12]; ।
भ्रमति[13] प्रेक्षक, देव हि; गमती[14] वधिले चि; कृष्ण[15] ही भ्रमती. ॥ ६३
कृष्ण म्हणे, "पार्था ! तुज म्हणताति भले[16] भले 'शहाणा.' या ।
रणयज्ञीं सावध[17] हो. न करीं संकोच लेश[18] हाणाया[19]. ॥ ६४
हा विप्र उग्रकर्मा क्लेशंकर[20] व्याधिसारखा; यासी, ।
न[21] उपेक्षावें. आळस[22] न धरील प्राणसार खायासी. ॥ ६५

---

सुभाषितरूप आहे. अनावर झालेल्या दुष्ट मुलाचें व मत्त गजाचें हें वर्णन यथार्थ नाहीं असें कोण म्हणेल ? २४. मूळांत आधार नसतांही पंतांनीं मागच्या व या गीतींत उत्तम उपदेशपर सुभाषितें गोंविलीं आहेत.

१. तुझें (धृतराष्ट्राचें) सैन्य. २. आपल्या छातींत. ३. सूर्यकांत नामक शिलाविशेष. या मण्याचा असा गुण आहे कीं, त्यास सूर्यकिरण लागतांच त्यांतून अग्नि उत्पन्न होतो. ४. तत्किरणीं=सूर्याच्या किरणांनीं. या शब्दांतील 'तत्' पदानें सूर्य निर्दिष्ट आहे. पण 'रविकांतमणि' या सामासिक शब्दांतील एका पदाला उद्देशून 'तत्' या सर्वनामाचा उपयोग करणें योग्य नाहीं. तरी प्रस्तुत स्थलीं अर्थ स्पष्ट होत असल्यामुळें हा कांहीं मोठासा दोष नव्हे. ५. 'वेधिति' असें पाठांतर. ६. उरलेले पांच बाण. ७. कृष्णाचें हृदय. ८. मृत्युमुखीं; मृत्युमुखांतून. मरणसमयीं हरिस्मरण केल्यास जन तरतात, या समजुतीला उद्देशून हें वाक्य आहे. स्पष्टपणें कृष्णाचें असें न सांगतां इतका वळसा घेऊन सांगण्याचें कारण असें कीं, मृत्युमुखांतून मनुष्यास तारण्यास ज्याचें केवळ नामच समर्थ आहे, त्यास हे बाण काय होत ? असें ध्वनित व्हावें. ९. जयाचें नाम काळमुखीं [लोकां] वांचवी त्याचें (कृष्णाचें) हृदय उरले पांच बाण भेदिती. १०. भयंकर बाणांनीं घायाळ केलें आहे शरीर ज्यांचें असे (ते कृष्णार्जुन). ११. रक्त. १२. ओकिती. १३. आश्चर्यचकित व संशयग्रस्त होती. १४. [कृष्णार्जुन] वधिलेचि (मारले गेलेच कीं काय असे) गमती (वाटतात). १५. दोघे कृष्ण, कृष्ण व अर्जुन. १६. भले भले (थोर थोर वीरजन) तुज शहाणा (युद्धकुशल) म्हणतात–असा अन्वय. १७. अश्वत्थाम्याचे बाण सोशीत स्वस्थ कां बसलास ? सावध हो–असा भाव. १८. किमपिही, कांहीं एक. १९. शत्रूस मारण्यास. हाणणें=बाणप्रयोग करणें. २०. त्रास व दुःख देणाऱ्या रोगासारखा. २१. न उपेक्षावें=याकडे दुर्लक्ष करूं नये. २२. [हा क्लेशकर व्याधीसारखा विप्र] [याची उपेक्षा केल्यास] प्राणसार (प्राणरूपी श्रेष्ठवस्तु)

[१]हूं. काय पाहसी? रे! हाण. [२]ने हा गुरु, [३]कुरु-प्रियैक-रुची, ।
[४]उग्रपिशाचाश्रय जो, छाया तापप्रदा चि, त्या तरुची.” ॥ ६६
आज्ञा होतां अर्जुन सर्वांगीं गुरुसुतासि तो [५]तोंसी. ।
चित्तीं म्हणे, ‘[६]तंई प्रिय मजला [७]प्राणांपरीस [८]होतासी.’ ॥ ६७
शिर, उर, [९]भुजोरु [१०]खंडी तुरगां, त्यांच्या हि तो लगामातें, ।
पार्थ म्हणे मनिं ‘[११]बंधो! तूं चि [१२]अदय. काय बोल गा! मातें?’ ६८
[१३]रक्षी द्रौणीतें, जो दृढ होता, आयुचा [१४]लगा, मरणीं; ।
[१५]अन्वर्थनाम हरि ही; दूर हरिति, खंडितां लगाम, रणीं. ॥ ६९

---

खायासी (प्राण घेण्यास) आळस न धरील (आळस करणार नाहीं. प्राण घेईलच घेईल.) गीतीचें उत्तरार्ध द्रौणीपर व व्याधिपरही लावितां येतें म्हणून हा **श्लेषालंकार** होय. हें अर्थ सुभाषितरूपही आहे.

१. शरांचा वर्षाव सुरू होऊं दे. उशीर करूं नकोस. प्रस्तुत गीतींत पंत कृष्णाशीं तादात्म्य झाले आहेत व जणों काय आपल्या हावभावांनींच अर्जुनास सांगत आहेत. २. हा कुरुप्रियेकरुची गुरु न. हा नेहमीं कौरवांचेंच हित चिंतिणारा असल्यामुळें गुरु नव्हे. कारण गुरूनें शिष्याचें हित इच्छिलें पाहिजे. पण हा तुझा नाशच इच्छितो, तस्मात् हा गुरु ही भावना सोडून हाण–असा भाव. ३. कौरवांचेंच प्रिय इच्छिणारा. ४. उग्र+पिशाच+आश्रय=भयंकर पिशाचांचें आश्रयस्थान. पिशाचादिक वृक्षांच्या आश्रयानें राहतात, अशी समजूत आहे. ५. बाणांनीं शरीर सोलून काढी. ६. त्या वेळीं; द्रोणाचार्याजवळ आपण विद्याभ्यास करीत असतांना. ‘चित्तीं म्हणे तई, ‘प्रिय……’ असा पाठ स्वीकारिल्यास ‘तई’ म्हणजे त्या युद्धाच्या धुमश्चक्रीच्या वेळीं–असा अर्थ करावा. तई चित्तीं म्हणे–असा अन्वय. ७. प्राणांपेक्षांही. ८. रा. पराडकर यांच्या प्रतींत ‘होतासि’ असा शब्द आहे. ९. भुज+ऊरु=बाहु आणि मांड्या. १०. खंडी म्हणजे बाणांनीं विद्ध करी, एवढाच अर्थ घेतला पाहिजे. लगामासंबंधानें मात्र ‘खंडी’=तुकडे करी, असा अर्थ घेतल्यास हरकत नाहीं. ११. या शब्दांनीं अर्जुनास अश्वत्थाम्याविषयीं किती प्रेमभाव वाटत होता, हें व्यक्त होत आहे. १२. निरपराध्यांस छळणारा. १३. जो आयुचा लगा (आयुष्याचा आश्रय) दृढ (पक्का) होता [तो] द्रौणीतें मरणीं (मरणसमयीं; मरणापासून) रक्षी–असा अन्वय. १४. आश्रय. या शब्दाचीं ‘लगा’ ‘लग्गा’ ‘लाग’ इत्यादि रूपें व ‘आश्रय,’ ‘साधन,’ ‘संधान’ ‘उपाय,’ ‘प्राप्ति,’ ‘फळ’ इत्यादि अर्थ आहेत. प्रस्तुत प्रसंगीं ‘आयुचा लगा’ शब्दांनीं अश्वत्थाम्याचें चिरंजीवित्व सुचविलें आहे. १५. हरि ही (घोडेही) अन्वर्थनाम (आपल्या नांवाप्रमाणें कृती करणारे) [होती.] घोड्यास ‘हरि’ हें नांव आहे. हरतीति हरिः (हरतो, नेतो म्हणून हरि.) अश्वत्थाम्यास रणांतून घेऊन पळून गेल्यामुळें घोड्यांचें ‘हरि’ हें नाम सार्थ झालें–असा भाव.

त्या अश्वःथाम्यातें, त्या व्यसनीं, अश्व दूर पळवीती; ।
'समयीं पति रक्षावा,' ऐसें ते पशु हि धर्म कळवीती. ॥ ७०
द्रौणि म्हणे मनिं, 'झाला जय विजयाचा चि अंकित स्पष्ट, ।
काय करावें? दैवें[2] आले भागासि आमुच्या कष्ट.'[3] ॥ ७१
मंत्रौषधयत्नांहीं[4] देहापासूनि रोगसा, नेला ।
अश्वानीं दूर द्विज[5]; अर्जुन संशप्तकांकडे गेला. ॥ ७२

---

## अध्याय बारावा.[6]

स्वव्यूहोत्तरभागीं[7] जातां ध्वनि[8] तुमुळ ऐकिला हरिनें, ।
तिकडे चि रथ फिरविला, साधुसखानें[9], असाधुच्या अरिनें. ॥ १
अर्जुन, म्हणे, 'सख्या हरि! जातां[10] संशप्तकांकडे, कां गा! ।
इकडे स्वरथ फिरविला? देवा! मज आपुल्या मुखें सांगा.' ॥ २

---

१. जय स्पष्ट (स्पष्टपणें) विजयाचा चि (अर्जुनाचाच) अंकित झाला. स्पष्टपणें आज विजयच विजयी झाला–असा अर्थ. प्रस्तुतस्थलीं 'जय' व 'विजय' या दोन्ही शब्दांचा उपयोग करून 'विजया'स 'विजय' प्राप्त होणें साहजिक आहे असें ध्वनित केलें आहे. २. दुर्दैवानें. ३. संकटें. युद्धांतून पळून जाणें इत्यादि. ४. मंत्र व औषध यांच्या प्रयत्नांनीं किंवा सामर्थ्यानें–असा भाव. रोग हटविण्यास मंत्र व औषध या दोहोंचेंही साहाय्य पाहिजे, अशी पूर्वजांची समजूत होती. म्हणून वैद्यचिंतामण्यादि वैद्यग्रंथांत रोगाची चिकित्सा दिल्याबरोबर, त्या रोगनिवारणार्थ कोणत्या ग्रहास किंवा देवास कोणत्या उपायांनीं आराधिलें पाहिजे, हें दिलेलें असतें. 'मंत्र' म्हणजे पंचाक्षऱ्यांचे भूतप्रेतविषयक मंत्र किंवा ग्रहशांत्यर्थ ब्राह्मणादिक जे मंत्र उच्चारितात ते. 'मंत्रौषध' या दोहोंचा उल्लेख करण्याचें प्रयोजन असें कीं, अश्वत्थाम्याच्या रथास दोन घोडे होते. प्रस्तुत स्थलीं अश्वत्थामा रोगाप्रमाणें त्याज्य आहे, असें सुचविलें आहे. ५. अश्वत्थामा. ६. यांत पंतांनीं मूळ कर्णपर्वाच्या १८ व्या व १९ व्या अध्यायांतील कथा आणिली आहे. ७. आपल्या सैन्याच्या व्यूहाच्या (रचनेच्या, मांडणीच्या) उत्तर दिशेस. ८. तुमुळ ध्वनि=कलकलाट. ९. 'साधुसखानें' व 'असाधुच्या अरिनें' हीं जीं विशेषणें कृष्णाला लाविलेलीं आहेत तीं साभिप्राय आहेत. त्या विशेषणांनीं रथ तुमुळ ध्वनीकडे वळविण्याचें कारण सुचविलें आहे. साधु जे पांडव त्यांचा तिकडे पराभव होत होता व असाधु जे कौरव त्यांची सरशी होत होती, म्हणून कृष्णानें तिकडे रथ फिरविला–असा भाव. 'साधुसख्यानें' असें पाठांतर. १०. जात असतां, जातां जातां मध्येंच.

'नृप [2]दंडधार मागध भगदत्तासम महाबळी पार्था ! ।
तव बळ मथितो, त्यातें मारुनि साधीं रणीं निज[3]स्वार्था.' ॥ ३
ऐसें बोलत बोलत, नेला [4]तत्काळ [5]तेथ रथ, [6]वातें ।
[7]तो [8]घन [9]त्या [10]दहनावरि नेला, [11]तत्काळ [12]चक्र अथवा तें. ॥ ४
त्या [13]धर्मसैनिकांचे झाले होते चि सर्व [14]आव रिते, ।
पार्थ न जाता तरि ते वीर न त्या मागधासि [15]आवरिते. ॥ ५
वर्षे [16]गांडीवघन प्रखर-शरांच्या उदंड धारा. तें ।
[17]वर्ष न शमवील कसें [18]रिपुकाननदहन दंडधारातें ? ॥ ६
भासे [19]मागधनृपगज [20]उग्रपणें [21]मूर्तकाळसा, [22]गरसा ।
[23]अविषह्यवेग, केवळ [24]अविलंघ्य प्रलयकाल-सागरसा. ॥ ७

---

१. हें कृष्णाचें उत्तर. २. दंडधार व मागध हीं नांवें एकाचींच आहेत. मागध म्हणजे मगधदेशाचा राजा. ३. आपल्या इच्छित हेतूस. ४. तेव्हांच; शीघ्र. ५. दंडधाराजवळ. ६. हवेनें. ७. अर्जुनरूपी. ८. मेघ. ९. दंडधाररूपी. १०. अग्नीवर. ११. त्या दंडधाराचा काळच कीं काय! येथें उत्प्रेक्षालंकार समजावा. १२. सुदर्शनचक्र. येथें रा० पराडकर यांनीं प्रसिद्ध केलेल्या प्रतींत 'तत्काळ वक्त्र' असा पाठ आहे व त्यावर 'त्या दंडधाराच्या काळाचें (मृत्यूचें) मुख' अशी टीप आहे. आम्ही स्वीकारिलेलाच पाठ शुद्ध व खरा असावा, असें आम्हांस वाटतें. 'चक्र' व 'वक्र' ह्यांतील अक्षरांच्या वळणांतील सादृश्य व पोथींतील अक्षरांच्या कांहीं भागाची शाई उडून जाणें–ह्या गोष्टी आमच्या तर्कास पुष्टी देतात. १३. दंडधारानें पीडिलेल्या युधिष्ठिरसैन्याचे. १४. अवसान, लढण्याची उमेद. १५. न आवरिते, सर्व सैन्याचा नाश करितांना थांबवून ठेवूं शकले नसते. सामना देण्यास अगदीं असमर्थ झाले असते. १६. गांडीवरूप मेघ. १७ वर्षाव, वृष्टी. १८. शत्रुरूप अरण्यांतील अग्निरूप मागधातें. १९. मगध राजाचा हत्ती. २०. भयंकर दिसण्यांत. २१. प्रत्यक्ष यमासारखा. या गीतींत हत्तीस तीन उपमानें आहेत. (१) यमासारखा भयंकर रीतीनें सेनांचा नाश करणारा. (२) (समुद्रांतून निघालेल्या) विषाप्रमाणें एकसारखा इकडून तिकडे व तिकडून इकडे धांवत जाऊन आपला प्रचंड वेग लोकांस दुःसह करणारा. (३) प्रलयकालाच्या समुद्राप्रमाणें कोणासही कोठेंही पळून न जाऊं देणारा. या तिन्ही उपमानांत जरी निरनिराळे धर्म सांगितले आहेत, तरी त्या सर्वांत लोकक्षयकर हा साधारण धर्म आहेच. २२. विषाप्रमाणें. २३. ज्याचा वेग साहण्यास कोणीही समर्थ नाहीं असा. या विशेषणानें प्रस्तुत स्थलीं 'गर' शब्दानें साधारण विष घ्यावयाचें नसून, समुद्रमंथनसमयीं उत्पन्न झालेलें विषच घेतलें पाहिजे, असें स्पष्ट होत आहे. तें फारच वेगानें सर्व विश्वांत व्यापून सर्वांचा नाश करूं लागलें,

वाटे काळाचा चि [1]द्विरदाकृति, तो महाशरीर, [2]गंडी. ।
[3]हाणी वीरांसि [4]वहन्मदनद, [5]रद पद शिरांवरी रगडी. ॥ ८
[6]पाडी [7]क्षितिवरि, जे नृप [8]गजतुरगरथीं हि शोभले; [9]चिरडी ।
[10]चरणीं तृणसे. [11]त्यांसीं भिडतां [12]खाती भले भले [13]चिरडी. ॥ ९
[14]प्रथम विलोकुनि ही त्या पांडवसिंहासि, तो [15]करीन खरा, ।
[16]नखरा नाराचगणा मानी [17]मानी च ना; करी [18]नखरा. ॥ १०
तो दंडधार [19]दुसरा भगदत्त चि. युद्ध तें[20] [21]महाभारी, ।

---

तेव्हां कोणीही त्याच्या समोर जाऊं शकला नाहीं, असें याचें पुराणांत वर्णन आहे. २४. ज्यास चुकवून किंवा ओलांडून कोणीही जाऊं शकत नाहीं, असा.

१. गजाकृति. २. तो महाशरीर (मोठ्या शरीराचा गज) काळाचा चि (यमाचाच) द्विरदाकृति (गजरूप धारण करणारा) गडी (दोस्तच कीं काय) वाटे—असा अन्वय. ३. सोंडेनें किंवा दांतानें बडवी. ४. मदाचा नद (मोठा प्रवाह) वाहणारा. त्या हत्तीच्या गंडस्थळांतून जणों काय मदाचा नदच वाहत होता. तो हत्ती मदोन्मत्त झाला होता—हा भाव. हें हत्तीचें विशेषण. ५. दांत. रद [ आणि ] पद (वीराच्या) शिरांवरी रगडी=दांतांनीं व पादांनीं वीरांस तुडवी. [किंवा 'रद' शब्दापुढें स्वल्पविराम देऊन—रद हाणी, पद शिरावरी रगडी—असा अन्वय करावा]. ६. यास कर्ता 'हत्ती' अध्याहृत. ७. भूमीवर. ८. हत्ती, घोडे व रथ यांवर (बसलेले). ९. चिरडून टाकी. १०. पायांखालीं. ११. त्या हत्तीशीं. १२. त्यासीं (युद्धीं) भिडतां भले भले (योध) चिरडी खाती—असा अन्वय. चिरडी खाणें=नाइलाज झाल्यावर सक्रोध मनुष्याची चित्तवृत्ती अशा प्रकारची होते, कीं तो मनुष्य जीवावर उदार होऊन पाहिजे तें करायला तयार होतो, अशी मनस्थिती होणें. चिरडी खाणें=चिरड खाणें, चिरडून संतप्त होणें. १३. 'खाती भले भले चि रडी' असा पाठ घेतल्यास 'रडी खाती=रडकुंडीस येतात'—असा अर्थ. १४. या गीतीचा सान्वयार्थः—त्या पांडवसिंहासि प्रथम विलोकुनि ही (अगोदर—पूर्वी पाहूनही—जाणत असतांही—याच्यापूर्वी पुष्कळ वेळां युद्धांत गांठ पडली असतांही—असा भाव.) तो खरा मानी (मानी स्वभावाचा) करीन (उत्तम हत्ती) [अर्जुनाच्या] नखरा नाराचगणा (सिंहाच्या नखांप्रमाणें फार तीक्ष्ण अशा बाणांसही) मानीच ना (जुमानीत नव्हता—बाणांस न जुमानितां पुढें पुढें धांवून वीरांस पाडीतच होता—असा भाव.) नखरा ( चेष्टा, धांगडधिंगा ) करी. [प्रस्तुत गीतींत **दामयमक, रूपक** व **स्वभावोक्ति** असे तीन अलंकार आहेत. पहिले दोन अलंकार स्पष्ट आहेत. 'करी नखरा' यांत थोडक्यांत मदोन्मत्त झालेल्या हत्तींच्या कृतीचें हुबेहूब सर्व वर्णन आहे, म्हणून ही **स्वभावोक्ति**.] १५. करी+इन=गजेंद्र. १६. बाणसमुदाय हाच नखर (नखें) त्यांस. १७. 'मानी-मानीच ना' हा **विरोधाभास.** १८. चेष्टा. १९. दुसरा. भगदत्तचि म्हणजे जणों काय भगदत्तच; भगदत्ताप्रमाणें शूर व पराक्रमी—असा भाव. २०. दंडधाराबरोबर अर्जुनानें केलेलें. २१. फार भयंकर व

आधीं नृपासि, मग शतबाणांहीं पार्थ हस्तिला मारी. ॥ ११
वधिला तसा चि त्याचा भ्राता नामेंकरूनि जो दंड[1], ।
शत्रूंसि काळदंड[2] चि भासे गांडीव[3]नाम कोदंड[4]. ॥ १२
स्तविति स्वकीय[5] सैनिकें पार्थातें निहतशत्रुचक्रातें[6], ।
जैसे अमर[7] समरपटु[8] वृत्रनमुचिजंभकाळशक्रातें[9] ॥ १३
पुनरपि पार्थरथातें तेथुनि तत्काळ केशिहा[10] फिरवी. ।
त्या विजयश्रीपतिला[11] कौरवसेनापुरींत तो[12] मिरवी[13]. ॥ १४
संशप्तकसेनेला नेउनि कृष्णें सितांश्व[14] भेटविला, ।
ग्रीष्मीं[15] गहनामध्यें[16] वायूनें दहन[17] जेंवि पेटविला. ॥ १५
नव नव निघति विजयशर[18], माहेरीं गीत[19] जेंवि दळपांत; ।

---

मोठें–असा भाव. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींतही हाच पाठ आहे. परंतु त्याबद्दल 'महामारी' असा खरा व शुद्ध पाठ असावा, असें आम्हांस वाटतें. मारिः=मारी=विध्वंस, तळपट व ( २ ) महामारी, पटकी. तेव्हां 'महामारी' म्हणजे ज्यांत मोठा नाश आहे, किंवा ज्यांत शत्रूवर मोठा मारा केला जातो, ज्यांत शत्रूवर मोठा मार पडतो तें युद्ध. 'महामारी युद्ध' असा प्रयोगही ग्रंथांतरीं आढळतो:—धाक घेतला झुंजारी । केशिकसैन्य पळालें दुरी । बळिभद्र पेटला महामारी । युद्ध वीरीं मांडिलें. ॥ ( एकनाथकृत रुक्मिणीस्वयंवर, अध्याय १०।३७ ).

१. दंडधारास. २. यमाचा दंडचि. ३. अर्जुनाचें धनुष्य. ४. धनुष्य. ५. पांडव-सैन्य. ६. शत्रुसमूहहंत्यातें. चक्र=सैन्य, समुदाय. ७. देव. ८. युद्धप्रवीण अशा. (हें 'शक्रा'चें विशेषण.) ९. वृत्रासुर, नमुचिनामक असुर व जंभासुर यांचा काळ म्हणजे यांस मारणारा–असा जो इंद्र, त्यास. प्रस्तुत स्थलीं पार्थास इंद्राची उपमा देऊन त्याची महती वाढविली हें तर खरेंच, पण या उपमेनें अर्जुन इंद्रपुत्र आहे असें ध्वनित करून उपमेची सार्थकता सुचविली आहे, हें विसरतां कामा नये. १०. केशीदैत्याचा हंता (कृष्ण). ११. विजयरूपी लक्ष्मीच्या किंवा वैभवाच्या नवऱ्यास (अर्जुनास.) या विशेषणानें विजयश्री पार्थाची नवी नवरी व तीं दोघें नवदंपती होत, असें ध्वनित केलें आहे. १२. तो कृष्ण. १३. नवदंपतीस मिरवूं लागला. १४. अर्जुन. १५. ग्रीष्मऋतूंत. ज्येष्ठ व आषाढ या महिन्यांस ग्रीष्म हें नांव आहे. १६. वनामध्यें. १७. अग्नि. १८. अर्जुनाचे बाण. १९. गाणें. दळतांना बायका गीत गातात. माहेरीं मोकळीक जास्त म्हणून चढाओढीनें गाणीं पुष्कळ व मोकळेपणानें गातात; तितकीं सासरीं गात नाहींत, किंवा गातां येत नाहींत. 'गीत'शब्द देशावर पुल्लिंगी, कोंकणांत नपुंसकलिंगी.

संशप्तकांत [1]शिरती, [2]हरिणाच्या जेंवि सिंह कळपांत ॥ १६
[3]संशप्तकमथनकथन पुष्कळ; [4]थोड्यांत सांगतों; परिसा. ।
[5]करिसारंगशशक [6]ते, [7]विजयविशिखगण [8]तदंतरीं [9]हरिसा. ॥ १७
[10]करितां [11]रिपुदलन, म्हणे वरचेवर [12]लोकनाथ '[13]बा ! हूं.' [14]तें ।
संशप्तकबलदलनीं दे परमोत्साह [15]पार्थबाहूंतें. ॥ १८
संशप्तक ते राक्षस, अर्जुन तो रघुपती. न [16]वरचील ।
[17]दृष्टान्त सज्जनप्रिय; [18]यास्तव न कवि सुमती [19]नव रचील. ॥ १९
कृष्ण म्हणे, '[20]विजया ! या रणभूमिकडे पहा महाबाहो ! ।
[21]बा ! हो सदैव विजयी. [22]स्वत्राणा [23]आर्तजन तुला [24]बाहो. ॥ २०
पार्था ! पहा पहा रे ! [25]नटताति चहूंकडे [26]कबंध रणीं. ।

---

१. यास कर्ता प्रथमचरणांतला 'विजयशर' शब्द होय. २. जेंवि हरिणाच्या कळपांत सिंह शिरती–असा अन्वय. या गीतीच्या दोन अर्धांत दोन्ही **उपमा** योजून **पं**तांनीं आपलें सादृश्ययोजनाकौशल्य दाखविलें आहे. पूर्वार्धातील उपमेनें **वि**जयशरांची निघण्याची शीघ्रता व उत्तरार्धातील उपमेनें त्यांची शत्रुसैन्यांत शिरण्याची क्रूरता स्पष्ट करून दाखविली आहे. ३. **सं**शप्तकांची मस्ती **पा**र्थानें जिरविली ती कथा. ४. मुळांत २५ श्लोकांनीं जो कथाभाग वर्णिला आहे, तो **पं**तांनीं तीन गीतींत आणिला आहे. ५. हत्ती, हरिण व ससे. ६. **सं**शप्तक. ७. अर्जुनाच्या बाणांचा समूह. ८. त्या **सं**शप्तकरूपी करिसारंगशशकांत. ९. सिंहासारिखा. १०. यास कर्ता 'अर्जुन.' ११. शत्रुसंहार. दलन करणें=तुकडे करणें. १२. **कृ**ष्ण. १३. बा पार्था ! हूं, चालूं दे. १४. कृष्णाचें 'बा ! हूं.' असें म्हणणें. १५. अर्जुनाच्या हातांस. १६. वरकड, अन्य. वर सांगितलेल्याहून अन्य. १७. सादृश्य, उदाहरण. येथें दृष्टांत म्हणजे **दृष्टांता**लंकार असें समजूं नये. कारण प्रस्तुत गीतींतील अलंकार **दृष्टांत** नसून **रूपक** आहे. १८. यास्तव सुमती (उत्तम बुद्धीचा, शहाणा) कवि [किंवा 'कविसुमति'=कवीची उत्तम मति] नव [दृष्टांत] न रचील–असा अन्वय. १९. नवीन दृष्टांत. २०. हें विशेष्य साभिप्राय आहे. कारण पुढच्या वर्णनावरून 'विजय' हें नांव सार्थक आहे असें सांगण्याचा कृष्णाचा उद्देश स्पष्ट आहे. म्हणून हा **परिकरांकुरालंकार** होय. २१. हें **दामयमक** आहे. २२. आत्मरक्षणार्थ. २३. संकटांत असलेले लोक. २४. बोलावो. २५. नाचत आहेत. या व याच्या पुढच्या आठ गीतींत **बीभत्सरस** प्रधान आहे. या रसांत शव, रक्त, मांस, भूत, पिशाच इत्यादिकांचें वर्णन असतें. प्रस्तुत स्थलीं या रसाचीं कबंध, रक्त इ० आलंबनें; कबंधाचें नाचणें, रक्ताचें वाहणें इ० उद्दीपनें; कृष्णाचे आनंदरोमांच, हस्तविक्षेप व शब्द हे अनुभाव व कृष्णार्जुनांचा आनंद हे व्यभिचारी भाव. साधारणतः बीभत्सरसाचे रोमांच नेत्रनिमील-

झाली तुझ्या रथास हि [1]वीरशरीरीं [2]सुदुर्गमा धरणी. ॥ २१
हे त्वां [3]महाभुजा ! भुज वीरांचे खंडिले असंख्य, [4]अही ।
गरुडें जसे नखांहीं. [5]दिसती अत्यंत उग्रमूर्ति [6]मही. ॥ २२
हीं मस्तकें [7]भटांचीं कमळेंसीं [8]विखरिलीं. [9]इहीं [10]भूतें ।
त्वां [11]पूजिलें, [12]उदारा ! केलीं तृप्तें [13]पलाशनें [14]भूतें. ॥ २३
तुज [15]हे देत्ये आशीर्वाद [16]मधुघ्नासि जेंवि दे, वसुधा. ।
सेविति यथेष्ट [17]भूत [18]क्षतजनदी, [19]जेंवि सर्व देव [20]सुधा. ॥ २४
[21]दुस्तर रक्तनदी हे, वाहवित्ये [22]द्विरदें ही, [23]बहु चि खोल. ।
हा [24]शोणितमांसांचा झाला सर्वत्र दुर्गम [25]चिखोल. ॥ २५
[26]भटकोटिकटक वर्ते [27]ज्याच्या आज्ञेचिया [28]कळेवरतें, ।

---

नादि अनुभाव असतात. पण प्रस्तुत स्थळीं बीभत्सरस नायकाच्या शौर्यापासूनच उत्पन्न झालेला असल्यामुळें त्यास त्यामुळें आनंद होणें साहजिक आहे. म्हणून प्रस्तुत स्थलीं अनुभाव व्यभिचारी भावांत फरक. या भावानुभावांविषयीं मागें दिलेली माहिती पाहणें. (पृष्ठ ३३ टीप ३ पहा.) २६. शिरोविहीन शरीर.

१. मृतवीरांचीं शरीरें दाट असल्यामुळें–असा भाव. २. गमन करण्यास कठीण अशी. ३. अर्जुन आजानुबाहू होता, म्हणून 'महाबाहो' 'महाभुजा' इ० विशेषणें केवळ स्तुतिपर नसून अन्वर्थ होत. ४. सर्प. ५. यास कर्त्री 'मही'. 'दिसते' असें पाठांतर. ६. पृथ्वी. ७. वीरांचीं. ८. पसरलीं. ९. या शिरकमळांनीं. १०. भूमीतें. ११. या गीतींत स्पष्ट जरी नाहींत तरी तीन अलंकारांचा ध्वनि आहे. पहिल्या चरणांतल्या 'कमळेंसीं' या शब्दानें **उपमालंकार** झाला. द्वितीय चरणांतील 'पूजिलें' या शब्दानें **रूपक** सूचित आहे. कारण पूजा करावयाची ती फुलांनीं. म्हणून 'इहीं' म्हणजे या 'शिरकमळांनीं' असें **रूपक** ध्वनित आहे. आणि पृथ्वीची पूजा केली नसून केली आहे असें म्हटल्यामुळें **उत्प्रेक्षा**. १२. हें सहेतुक विशेषण आहे. हें विशेषण लावण्याचा हेतु **अर्जुनानें** 'भूतें तृप्तें केलीं.' १३. मांस भक्षिणारीं. १४. वेताळ इत्यादि भूतगण. १५. वसुधा. दुष्टांच्या वधानें संतोपलेली पृथ्वी. १६. **मधुदैत्यांतकाला**. १७. भूतें, पिशाचें. 'भूत' शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे. १८. रक्ताची नदी. १९. जितक्या आनंदानें देव सुधा पिती, तितक्या आनंदानें भूतें रक्तनदी पिती–असा भाव. २०. अमृत. २१. तरून जाण्यास कठीण. २२. हत्ती देखील. २३. बहु चि (फारच) खोल [अशी] हे (ही) दुस्तर रक्तनदी द्विरद ही वाहविले–असा अन्वय. २४. रक्तमांसांचा. २५. चिखल. या शब्दाचें 'चिखोल' हें रूप चिंत्य होय. २६ कोटिवीरांनीं युक्त असें सैन्य. २७. ज्या कलेवराच्या. २८. कळ=इच्छेप्रमाणें यंत्र चालविण्यास किंवा बंद ठेवण्यास करून

पडलें धरावराचें[1] रणभूमितळीं पहा कळेवर[2] तें. ॥ २६
रत्नांगदमुकुटकटकहारपदकमुद्रिकादि[3] नग-रासी[4] ।
जिकडे तिकडे पडले. गेले भोक्ते[5] कृतांतनगरासी[6]. ॥ २७
हे[7] जळ मागति; धांवति हे आणायासि; हे पहा रडती ।
कीं न प्राशुनि[8] मेले; हे घेउनि आप्तनाम[9] आरडती. ॥ २८
शरचापतूंण[10]तोमरखङ्गगदाशक्ति[11]परशुपरिघांतें[12] ।
भग्नांतें[13] अवलोकीं. त्वां जय संपादिला चि अरिघातें[14]. ॥ २९
ऐसें कर्म कराया 'हरि[15] एक समर्थ, तूं तसा चि दुजा[16]; ।
पार्था ! सख्या ! निरंतर परिवृद्ध[17] असो भुजप्रताप तुजा.' ॥ ३०
रणभूमि दाखवीत प्रभु रथ फिरवी; अशांत तो कानीं ।
नाद शिरे, जो केला दुर्योधननृपबळांत लोकानीं[18]. ॥ ३१

---

ठेविलेला साधनविशेष. कळ फिरविल्याबरोबर ज्याप्रमाणें कळसूत्री घर चालूं लागतें त्याप्रमाणें ज्याच्या आज्ञेबरोबर 'भटकोटिसैन्य' पाहिजे तें काम करण्यास सिद्ध होत असे. कळेच्या ताब्यांत ज्याप्रमाणें सर्वस्वी यंत्र, त्याप्रमाणें ज्याच्या ताब्यांत 'भटकोटिकटक' वर्ते असा—असा भाव.

१. दंडधारराजाचें २. शरीर. ३. रत्नखचित बाहुभूषणादि अलंकारसमुदाय. 'राशी' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे. ४. नगांच्या=डागिन्यांच्या-राशी. ५. त्या आभरणांचे भोक्ते. या गीतींत कृष्णानें नग येथेंच पडले आहेत व भोक्ते यमपुरास गेले असें सांगून, ऐहिक ऐश्वर्य सर्व नश्वर व बरोबर न येणारें आहे, असें सुचविलें आहे. 'भोक्ते' शब्दानें इतका अर्थ ध्वनित असल्यामुळें **ध्वनि**काव्याचें हें एक उत्तम उदाहरणच आहे. ६. यमपुरासी. ७. युद्धभूमीवर प्रत्यक्ष घडत असलेल्या गोष्टी दाखवून कृष्ण त्यांचें वर्णन करीत आहे. ही **स्वभावोक्ति** करुणरसास पोषकच आहे. ८. आणिलेलें पाणी प्याल्याशिवाय मेले म्हणून. ९. मेलेल्या इष्टमित्रांचीं नांवें. १०. तूण=तूणीर, ज्यांत शर असतात तो. ११. आयुधविशेष. १२. परिघ=आयुधविशेष, लोखंडी कडीं लाविलेला सोटा. १३. ज्यांची मोडतोड झाली आहे अशा शस्त्रास्त्रांस. १४. शत्रुसंहारानें. १५. इंद्र. १६. दुसरा. १७. वृद्धिंगत. १८. सैनिकांनीं. पुढच्या अध्यायाची जणों काय कवीनें या गीतींत प्रस्तावनाच केली आहे. अशा रीतीनें कित्येक शब्दांनीं प्रेक्षकांचें लक्ष पुढच्या कथानकाकडे ओढण्याचें काम चतुर नाटककार करीत असतात.

## अध्याय तेरावा.[१]

तें रणे[२]चत्वर सत्वर लंघुनि जाऊनि कृष्ण जों पाहे, ।
तों धर्मसहाय नृपति पांड्य महाबाहु भांडतो आहे. ॥ १
नाम प्रवीर त्याचें, मलयध्वज हें हि, पांड्य नाम दुजें. ।
तेणें कर्णाचें बळ मथिलें, केलें चि भग्न सैन्य तुजें[३]. ॥ २
जो भीष्मद्रोणांसीं स[४]मता स्वप्नामधें हि साहेना, ।
[५]कृष्णार्जुनांपरीस [६]न्यूनत्व हि, अन्यतुल्य पाहेना. ॥ ३
त्यासि रणीं बहुमानें द्रौणि म्हणे, 'वीरभूषणा ! भूपा ! ।
[७]राजीवपत्रनेत्रा ! [८]भुजगाभभुजा ! मनो[९]ज्ञसद्रूपा ! ॥ ४
अश्वत्थामा सोडुनि कां मारिसि हें अशक्त बल हातें ? ।
रुद्रासीं अंधकसा, तूं मजसीं मात्र योग्य कलहातें.' ॥ ५
मग पांड्यातें द्रौणि, द्रौणीतें पांड्य विंधिती बाणीं; ।
उरलें नाहीं च स्थळ तिळमात्र [१०]अभिन्न [११]तत्तनुत्राणीं. ॥ ६
[१२]शिर उडवाया [१३]नव शर [१४]नवदा नव उग्र [१५]विप्रवीरानें ।
जे सोडिले, नवांहीं ते सर्व च्छेदिले प्रवीरानें. ॥ ७

---

१. या अध्यायांत पंतांनीं मुळांतील २० व्या अध्यायांतील कथाभाग आणिला आहे. २. रणांगण. ३. तुझें=धृतराष्ट्राचें; कौरवांचें. संजय धृतराष्ट्रास युद्धकथा सांगून राहिला आहे, हें लक्षांत असावें. ४. बरोबरी. भीष्मद्रोणांची बरोबरी ज्याला आवडत नसे; म्हणजे या अप्रतिम महावीरांपेक्षांही मी अधिक वीर आहें असा ज्याला अभिमान होता—असा भाव. ५. कृष्णार्जुनांपेक्षां. ६. कमीपणा. अन्यतुल्य पाहेना म्हणजे इतर सर्व वीर आपली योग्यता कृष्णार्जुनापेक्षां फार कमी आहे असें कबूल करीत होते; पण हा पांड्य त्यांच्याप्रमाणें कृष्णापेक्षां आपली योग्यता कमी समजत नव्हता. प्रस्तुत स्थळीं राजाच्या शौर्य-वैभवाचें वर्णन केलें आहे, म्हणून हा उदात्त अलंकार. ७. कमलपत्राक्षा. ८. भुजगसदृश-भुजा. ९. अत्यंत सुंदर रूप ज्याचें अशा. १०. अक्षत, विद्ध झालें नाहीं असें; टोंचलें गेलें नाहीं असें. ११. तत्+तनुत्राण=त्याच्या कवचांत. १२. पांड्यमस्तक. १३. नऊ. १४. अन्वयार्थः—शिर उडवाया जे नव (नवीन, कोरे) [व] उग्र (तीक्ष्ण) [असे] नव (नऊ) शर (बाण) नवदा (नऊदां, नऊ वेळां) विप्रवीरानें (अश्वत्थाम्यानें) सोडिले, ते सर्व (एकंदर, ९×९=८१ बाण) प्रवीरानें नवांहीं (नऊ बाणांनीं) छेदिले. सारांश, अश्वत्थामा प्रत्येक वेळीं नऊ बाण सोडी व प्रवीर ते सर्व एकाच बाणानें छेदी; असें एकंदर नऊ वेळां झालें. १५. अश्वत्थाम्यानें.

त्यान्हीं घोडे वधिले शर सोडुनि, गुण हि खंडिला भूपें, ।
द्रौणि क्रोधें पेटे, जैसा दावाग्नि सिंचिला[1] तूपें. ॥ ८
सेवकजन बहु सत्वर योजी त्याच्या रथासि वाजिवर[2], ।
द्रौणि हि गुण धनुला; बळ दावी जें दाविलें न आजिवर. ॥ ९
जैसि[3] योजिली सुचतुर प्रभुनें व्यापी समस्त जग [4]नीती, ।
तसि [5]गुरुशतशरवृष्टि क्षितिला आक्रमुनि जाय गगनीं [6]ती. ॥ १०
ती ही खंडुनि पांड्यें वधिले रथचक्ररक्षक क्षिप्र; ।
तेव्हां जसा [7]व्रजावरि [8]हरि, अरिवरि [9]या हि तेंवि तो विप्र. ॥ ११
गुरुसुत महेंद्र, धनु घन, शर ते जलवृष्टि, सैन्य तो [10]घोष, ।
[11]नृप [12]गोवर्धन, [13]त्याचा [14]धर्ता उत्साह [15]देव [16]निर्दोष. ॥ १२

---

१. जैसा तूपें सिंचिला ( सिंचिलेला, सिक्त ) दावाग्नि–असा अन्वय. २. उत्तम घोडे. ३. सुचतुर प्रभुनें ( शहाण्या राजानें ) योजिली (योजिलेली–नियुक्तकेलेली) नीती (राजनीति; कायदेकानू वगैरे) समस्त जग व्यापी (प्रत्येकास नियमाप्रमाणें वागावयास लावी. पेंढारी इत्यादि अराजक लोकांस शिक्षा देऊन त्यांसही नियमाखालीं आणी–अमक्या भागांत हा नियम पाळला जात नाहीं असें होऊं न देई) तसी इ०. ४. राजनीति; राज्यसंबंधी नियम. ५. मोठमोठ्या शेंकडों बाणांची वृष्टी. 'गुरुसुतशरवृष्टि' असें पाठान्तर. ६. वृष्टी. ७. गोकुळावर. ८. इंद्र. ९. याहि अरिवरि=पांड्यावर. १०. गवळीवाडा. ११. पांड्यराजा. १२. पर्वतविशेष. १३. नृपरूपी गोवर्धनाचा. १४. उचलून धरणारा, धारण करणारा. अन्वयः—त्याचा (नृपरूपी पर्वताचा ) धर्ता (उचलणारा) देव (श्रीकृष्ण कोण? तर) [त्या राजाचा] निर्दोष उत्साह ( उत्साहच होय. ) किंवा, निर्दोष उत्साह हाच उचलून धरणारा देव होय. दोषन्=हस्त; निर्दोष=हस्तरहित–असा अर्थ केल्यास–त्याचा धर्ता निर्दोष उत्साह [ रूपी ] देव [ होय ]. उत्साह हा मनाचा धर्म, त्याला हस्त नसणें, साहजिकच आहे. १५. कृष्ण. १६. निर्दोष' हें 'उत्साह' व 'देव' या दोहोंचेंही विशेषण मानितां येईल. प्रस्तुत गीतींतील **परंपरितरूपक** समजण्यास '**गो**वर्धनोद्धारण' नामक **भा**गवतांतील कथा अनुसंधेय आहे. ती कथा अशीः–एकदां नंदानें इंद्रयज्ञ करण्याची तयारी करविली. पण कृष्णानें इंद्रयज्ञ करण्यापेक्षां त्याच द्रव्यांनीं ब्राह्मणादि चातुर्वर्णांस व गोमहिषशुनकादि सर्व भूतांस संतुष्ट करणें चांगलें असें सांगून, त्यानें नंदाकडून तसें करविलें. त्यामुळें इंद्रास फार राग आला व त्यानें सर्व मेघांस आज्ञा देऊन त्या गवळीवाड्यावर भयंकर वृष्टी करविली. त्या वेळीं कृष्णानें गोवर्धनपर्वत एका बोटावर उचलून त्याखालीं गोपगोपीचें व धेनूंचें संरक्षण केलें. सात दिवसपर्यंत अतिभयंकर वृष्टी करून, तीमुळें नंदाचें कांहीं नुकसान न झाल्यामुळें, कृष्णचरितानें इंद्र भयभीत होऊन स्वस्थानीं चालता झाला.

ज्या आयुधशकटाला[1] वाहति वृष[2] आठ, तीं असीं प्रकटें[3], ।
द्रौणि रणीं करि रिक्तें अर्धप्रहरांत[4], आठ ही शकटें[5]. ॥ १३
ऐसे वरायुधांचे[6] गाडे, संपूर्ण आयते[7], ज्याची ।
भुजशक्ति[8] करि रिकामे; सांगावी गोष्टि[9] कांय[10] तेजाची ! ॥ १४
ते[11] बाणवृष्टि वायव्यास्त्रमहावेगपांड्यपवमानें[12], ।
लीलेकरुनि[13] उडविली, मानधनप्रीति[14] जेंवि अवमानें[15]. ॥ १५
ध्वजधनु[16] खंडी, मारी सूताश्वांतें[17] हि शूर-विप्र-कर[18], ।
पांड्यनृपप्रवराच्या[19] शस्त्रास्त्रांचा न[20] उरवि प्रकर[21]. ॥ १६
मारायाचा[22] समय[22] प्राप्त चि जाला, न मारिला परि तो[23]; ।
परितोष[24] तसा न दुजा[25] दे, कीं[26] नृप शुद्ध[27] युद्ध[27] हा करितो[28]. ॥ १७

---

१. आयुधांच्या गाड्याला. २. बैल. ३. प्रसिद्ध अशीं. ४. सुमारें दीड तासांत. ५. गाडे. 'शकट' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आहे. पण पंतांनीं येथें तो नपुंसकलिंगी कां योजिला असावा बरें ! ६. उत्तम किंवा श्रेष्ठ आयुधांनीं भरलेले. ७. आयते संपूर्ण= भरून तयार करून ठेविलेले. ८. बाहुबल; मनगटांतला जोर. ९. 'गोष्ट' व 'गोष्टी' अशीं या शब्दाचीं दोन रूपें आहेत. १०. काय सांगावी=अवर्णनीय. ११. ती. जुन्या ग्रंथांत तृतीयपुरुषी स्त्रीलिंगी एकवचनी सर्वनाम 'ती' नसून 'ते' आहे. सांप्रतही पत्रादिकांत 'कळावें. लोभ असावा. हे विनंति' इत्यादि स्थळीं अशा सर्वनामाचा कधीं कधीं उपयोग करण्यांत येतो. पंतांच्या वेळीं 'ती' व 'ते' हीं दोन्ही रूपें प्रचारांत होतीं असें दिसतें. १२. वायव्य नामक अस्त्राच्या महावेगानें युक्त जो पांड्यरूपी पवमान–वायु–त्यानें. 'बाणवृष्टि' व 'पांड्यपवमान' हीं सापेक्ष रूपकें म्हणून हें परंपरितरूपक. वाऱ्याच्या सोसाट्यामुळें पाऊस नाहींसा होतो, हें प्रसिद्धच आहे. १३. जणों खेळतां खेळतांच, सहज रीतीनें. १४. मान–सन्मान–स्वाभिमानरूपी धनाची आवड. १५. अपमानानें. अवमानें मानधनप्रीति उडते, म्हणजे जो नेहमीं अपमान सहन करून स्वस्थ बसतो, तो कांहीं दिवसांनीं स्वाभिमानविहीन (निलाजरा) बनतो–असा भाव. किंवा–मानी पुरुषाचा अवमान केल्यानें अवमान करणारावरची पूर्वीची मानी पुरुषाची प्रीति उडून जाते–अपमान झाला कीं मानधनाची मर्जी खप्पा होते–असा अर्थ करावा. १६. ध्वज=पताका; रथावरील झेंडा. १७. सारथी व घोडे यांस. १८. शूर विप्राचे (अश्वत्थाम्याचे) हस्त. १९. पांड्यनृपश्रेष्ठाच्या. २०. राहूं देईना. २१. समुदाय. २२. मारून टाकण्याचा. आतां बाण सोडल्यास हा खातरीनें मरणार अशी वेळ २३. पांड्यराजा. २४. संतोष. हें दामयमकाचें उदाहरण आहे. दाम=हार. एका

झंगडेल आपणासीं या कामें वांचवि प्रवीराला; ।
म्हणुनि म्हणति सुर, 'साधो ! तूं पुष्कळ वांच' विप्र-वीराला. ॥ १८
सोडुनि पांड्यनृपातें, मर्दी द्रौणि द्विपाधिरोह रणीं, ।
कमळावचयीं तैसा विगतश्रम वीरवरशिरोहरणीं. ॥ १९
तों एक सुकल्पित गज, धांवत मलयध्वजाकडे आला, ।
ज्याच्या अधिरोहातें वीरगुरु द्रौणि मारिता झाला. ॥ २०
त्या करिवरि, गिरिशिखरीं हरि तैसा, तो उडोनि पांड्य चढे; ।
तेव्हां प्रवीरभूपस्तोत्रातें शत्रुभटचमू हि पढे. ॥ २१
रविरश्मिप्रभ तोमर, गुरुपुत्रशिरःसरोज उडवाया, ।

---

अर्धाच्या शेवटचीं कांहीं अक्षरें दुसऱ्या अर्धाच्या आरंभीं आणून तीं अर्धे एकमेकांत गुंतवून त्यांचा जणुं काय हारच बनविलेला असतो म्हणून यास **दामयमक** म्हणतात. २५. पांड्याहून दुसरा कोणताही राजा. २६. कारण. २७. ज्यांत छळ (कपट) नाहीं असें, धर्मयुद्ध. २८. या गीतीचा अन्वयः—परि तो न मारिला, कीं (कारण, न मारण्याचें कारण हें कीं) हा नृप (पांड्य) शुद्ध युद्ध करितो [तस्मात् हा जसा परितोष दे] तसा परितोष दुजा (अन्य राजा) न दे.

१. आपणांसीं आणखी युद्ध करील. प्रस्तुत स्थळीं द्रौणीची युद्धप्रीति व शत्रुगुणग्रहणचारीणत्व हीं कवीनें मोठ्या खुबीनें वर्णिलेलीं आहेत. २. इच्छेनें. ३. अश्वत्थाम्याला. या गीतींत पंतांनीं अर्थाचा बिघाड होऊं न देतां **सप्ताक्षरी यमक** साधिलें आहे. ४. गजावर बसलेले. ५. कमळच्छेदाविषयीं. अवचय=संचय, जमा करणें. ६. श्रमरहित. विशेष श्रम ज्याला होत नाहींत असा. ज्याप्रमाणें कमळें तोडणें फारशा श्रमाचें काम नाहीं, त्याप्रमाणेंच द्रौणीला वीरांचीं शिरें उडविणें फारसें श्रमाचें काम नव्हतें—असा भाव. ७. वीरश्रेष्ठांचीं शिरें उडविण्यांत. ८. उत्तम रीतीनें सज्ज केलेला. 'अकल्पित' असें पाठांतर. ९. वर बसणाऱ्याला. १०. वीरांचा गुरु; वीरश्रेष्ठ. ११. हत्तीवर. या अर्धांत 'रि'चा असकृत् उच्चार होत आहे म्हणून हा **अनुप्रासा**लंकार. १२. पर्वतशिखरावर. १३. सिंह. १४. त्या प्रवीरनामक पांड्यराजाची स्तुति. १५. शत्रुवीरांची सेना देखील. १६. उच्चारूं लागली, त्याची स्तुति करूं लागली. येथें 'शत्रोरपि गुणा वाच्या दोषा वाच्या गुरोरपि' ह्या सुभाषितवचनाची आठवण होते. १७. सूर्यकिरणांप्रमाणें तेजस्वी. १८. अश्वत्थाम्याच्या शिरोरूपी कमळाला. प्रस्तुत स्थळीं कवीनें एका प्रसिद्ध कविसमयाच्या विरुद्ध वर्णन केलें आहे, असें म्हणावें लागतें. तोमरास 'रविरश्मिप्रभ' म्हणून त्यानें ज्यास उडवावयाचें, त्यास 'शिरःसरोज' म्हटलें आहे. रवि व सरोज यांची नेहमीं मैत्री असावयाची. असें असून येथें विरोध दाखविला आहे.

प्रेरी पांड्य भुजबळें, तोत्रें[1] गज[2] ही रथासि[3] तुडवाया. ॥ २२
तोमर सोडी तेव्हां मोठ्यानें तो प्रवीर भूप म्हणे, ।
'मेलासि द्रौणे! तूं मेलासि; स्मर हरीस[4] वीरमणे!' ॥ २३
कैंचें[5] वारण करणें? मरणें[6] नव्हतें म्हणोनि, तोमर तो ।
भूषण[7] चि हरि[8] शिरींचें. कीं[9] जो प्राणी गतायु[10] तो मरतो. ॥ २४
तें[11] पद्मराग[12]हीरक[13]गारुत्मत[14]शक्रनील[15]रत्नांचें[16], ।
केलें, किरीट, भस्म चि. परितापें[17] चित्त ही सपत्नांचें[18]. ॥ २५
हरितां[19] किरीट पादाहत[20] अहिपतिसा[21] चि, गुरुसुत क्षोभे; ।
अंधकमथनीं हरसा[22], पांड्यवधीं त्या रणांगणीं शोभे. ॥ २६
बाण चतुर्दश[23] सोडी, पांचांहीं[24] हस्तिपादकर[25] भेदी[26], ।

---

१. अंकुशानें. २. तोत्रें [स्व] गजही [शत्रूच्या] रथासि तुडवाया प्रेरी–असा अन्वय. ३. अश्वत्थाम्याच्या रथास. ४. विष्णूस. ५. त्या तोमरास निवारणें–प्रत्यस्त्रादिक प्रेरून त्यास निष्फळ करणें–अशक्य–असा भाव. ६. अश्वत्थाम्यास मरावयाचें नव्हतें; त्याची आयुर्मर्यादा संपली नव्हती म्हणून–असा अर्थ. किंवा 'मरणें' नव्हतें म्हणजे अश्वत्थामा चिरंजीवी असल्यामुळें त्यास मरण कधींच नव्हतें म्हणून, असाही अर्थ करितां येईल. ७. प्राणाच्या ऐवजीं फक्त भूषणच–किरीटच हरण करी. जीवावरची गोष्ट किरीटावरच गेली–असा 'भूषणचि' यांतील 'च'काराचा अर्थ. ८. हरण करी. ९. कारण. जीवावरची गोष्ट किरीटावर जाण्याचें कारण. १०. ज्याची आयुष्यमर्यादा संपली असा. आयुर्विहीन मरतो व ज्याची आयुर्मर्यादा संपली नाहीं तो कोणत्याही युक्तीनें मरत नाहीं–असा भाव. हा भाग सुभाषितरूप आहे. ११. येथें रा. पराडकर यांच्या प्रतींत 'ते' असा पाठ आहे, पण तो हस्तदोष असावा. १२. रक्तवर्ण माणिक्यविशेष. याची उत्पत्ति सिंहलांत होते, अशी समजूत आहे. १३. वज्रनामक मणि. याचा शुभ्रवर्ण. १४. गारुत्मत=मरकत, हिरा. १५. शक्रनीळ= इंद्रनीळ; मणिविशेष. १६. नवरत्नें प्रख्यात आहेत, त्यांचीं नांवें;—मौक्तिक, पद्मराग, वज्र, प्रवाळ, मरकत, नील, गोमेधिक, पुष्पराग व वैदूर्य इत्यादि रत्नांनीं केलेलें–हा या सामासिक शब्दाचा अर्थ. हें 'किरीट' याचें विशेषण. १७. परितापें (पश्चात्तापानें) सपत्नांचें चित्तही भस्म केलें–असा अन्वय. 'परितापे' असा पाठ आहे, तो घेतल्यास–परिताप (पश्चात्ताप) पावे–असा अर्थ. १८. शत्रूंचें. १९. हरण करितां; काढून घेतल्यानंतर. २०. पायांनीं तुडविलेला. २१. सर्पश्रेष्ठाप्रमाणें. २२. शिवासारखा. २३. चौदा. यांपैकीं किती किती बाणांनीं कोणतें काम केलें, हें पुढें दिलें आहे. २४. चौदांपैकीं पांच बाणांनीं. २५. हत्तीचे पाय व सोंड. २६. तोडून टाकी.

तदनुचर[1] महारथ[2] सा[3] साहीं, नृपबाहु[4] शिर[5] तिहिं[6] च्छेदी. ॥ २७
कुंडलमंडित **पांड्य**क्षितिपतिचें शिर धरातळीं पडलें; ।
भासे[7] पतन विशाखामध्यगपूर्णेंदुमंडला[8] घडलें ! ॥ २८
जसि इष्टि[9] 'दशहविष्का,[10]' तींत करिति पिष्टपिंड[11] दशधा,[12] ती,[13] ।
**आ**चार्यपुत्र दावी युद्धमखीं[14] [15]**पां**ड्यगजवधीं, जाती.[16] ॥ २९
[17]बळि जिंकितां जसा करि सुरपति[18] सत्कार **विष्णु**चा भूपा[19] ! ।
दुर्योधन **पांड्य**वधीं **द्रौ**णीची स्तुति करी तदनुरूपा.[20] ॥ ३०

---

१. त्याच्या (**पांड्या**च्या) मागें चालणारे. २. महारथ म्हणजे दहा हजार वीरांशीं भांडणारा. ३. सहा. तदनुचर (त्या राजाच्या मागें तद्रक्षण करीत असलेले) सा (सहा) महारथ (महारथांस) [**द्रौ**णी] साहीं (सहा बाणांनीं) च्छेदी–असा अन्वय. ४. **पांड्या**चे बाहु. ५. **पां**ड्यशिर. ६. तीन बाणांनीं. ७. ही अत्यंत सुंदर **उत्प्रेक्षा** आहे. कर्णकुंडलांचें विशाखा नक्षत्राच्या ताऱ्यांशीं तादात्म्य व कुंडलांमधल्या **पांड्य**मुखाचें चंद्राशीं तादात्म्य वर्णिल्यामुळें '**तादात्म्यस्वरूपोत्प्रेक्षा**' या उत्प्रेक्षाभेदाचें हें उदाहरण आहे. वैशाखमासाच्या पौर्णिमेस पूर्णचंद्र विशाखा नक्षत्रांत असतो. कवीस नक्षत्रांची, सूर्यचंद्रांच्या गतींची म्हणजे ज्योतिःशास्त्राची चांगलीच माहिती होती, असें या वर्णनावरून स्पष्ट होतें. कारण ही **उत्प्रेक्षा पं**तांचीच आहे, मूळांतली नव्हे. ८. विशाखा नक्षत्राचे दोन ठळक व दोन लहान असे चार तारे आहेत. त्यांपैकीं ठळक ताऱ्यांमध्यें आलेल्या पूर्ण चंद्रमंडळास. मंडल=[ सूर्य किंवा चंद्र यांचें ] बिंब. ९. यज्ञ. १०. दशहविष्कासंज्ञक इष्टींत पिष्टपिंडाचे दहा भाग करितात, तसे **पांड्य**गजाचे दहा तुकडे केले. ११. पिठाचा गोळा. १२. दहा विभाग, दहा तुकडे. १३. ती जाती ( तशी तऱ्हा, तसा प्रकार; सहा तुकडे करण्याचा प्रकार ) **पांड्य**गजवधीं **आ**चार्यपुत्र दावी–असा अन्वय. दहा तुकडे करी–असा भाव. १४. रणयज्ञांत. १५. **पांड्य**राज व त्याचा हत्ती यांस ठार मारण्याच्या कामीं. १६. पद्धति, प्रकार. १७. **ब**ळि दैत्य. **वि**रोचनाचा पुत्र व **प्र**ल्हादाचा पौत्र. यानें इंद्रपदाचें हरण केलें व **इं**द्रास पळवून लाविलें. तेव्हां **विष्णू**नें **वा**मनावतार घेऊन दानशूर जो **ब**ळी त्याच्याजवळ तीन पावलें जमीन मागितली. **ब**ळीनें 'तथास्तु' म्हटल्यावर **वा**मनानें विराट्स्वरूप धारण करून दोन पावलांत भूलोक व स्वर्गलोक व्यापिले व तिसरें पाऊल **ब**ळीच्या मस्तकावर देऊन त्यास पाताळीं घातलें, व **इं**द्राची गादी **इं**द्रास दिली–अशी कथा प्रस्तुत स्थळीं अनुसंधेय आहे. १८. **इं**द्र. १९. हे **धृ**तराष्ट्रा ! २०. तिच्या सारखी. **इं**द्रानें जशी **विष्णू**ची केली तशी.

## अध्याय चौदावा[1].

प्रज्ञाचक्षु[2] म्हणे, 'जयिं[3] परमसहाय प्रवीरभूप मरे, ।
काय करी तयिं अर्जुन[4] ? तो चि महाबळ सुरप्रभूपम[5] रे ! ॥ १
कर्णें ही बहु सैनिक धर्माचे पळविले चि असतील, ।
सन्मुख सिंह पहातां, क्षुद्र मृग स्वस्थ केंवि बसतील ? ॥ २
तें कळतां जिष्णूचें[6] चित्त क्षोभासि फार पावावें. ।
पुच्छ रगडितां नागें धावावें, कडकडोनि चांवावें. ॥ ३
मृत्युंजयें[8] दिला वर कीं, 'तूं सर्वत्र हो[9] अजय्य[10]' असा[11]. ।
त्यापासुनि[12] भीतों मीं. वद सूता[13] ! वर्तला सितांश्व[14] कसा ?' ॥ ४
सूत म्हणेः—त्या समयीं कृष्ण वदे, 'अर्जुना ! रणामाजी ।
धर्म दिसेना. कर्णें बहु संजयवीर मारिले आजी. ॥ ५
प्रथम पळाले पांडववीर, पुन्हां मुरडले[15], पहा, शूर. ।
हें शत्रुसैन्य त्यांच्या[16] धाकें धांके[17] चि, पळतसे दूर'. ॥ ६
पार्थ म्हणे, 'गोविंदा ! सत्वर हय चालवीं. अहा ! मीं तों[18] ।
निर्भय तव प्रसादें. परि न दिसे धर्म म्हणुनि बहु भीतों.' ॥ ७
ऐसें पार्थ वदे तयिं हाकी हा कीर्तनीयपद[19] वाजी[20]. ।

---

१. यांत २१, २२, २३, व २४ या मुळांतील अध्यायांतला कथाभाग आला आहे. २. धृतराष्ट्र. ३. जयिं=जैं, जेव्हां. ४. अर्जुन. ५. इंद्रतुल्य. ६. अर्जुनाचें. ७. ह्या गीतींत **प्रतिवस्तूपमा** आहे. ८. शिवानें. मृत्यूस—यमास—मार्कंडेयाच्या रक्षणाकरितां जिंकिल्यामुळें शिवास मृत्युंजय हें नांव पडलें. ९. अर्जुनास पाशुपतास्त्र देण्याच्या वेळीं शिवानें असा वर दिला होता कीं, 'सर्वत्र रणीं विजयी तूं नारायणसखा नरा ! हो रे ! । स्वप्नीं हि अयश तुझिया अवलंबुनि पदनखा न राहो रे ! ॥' [मोरोपंतकृत वनपर्व, अध्याय ३।३२.] या वरास उद्देशून येथें धृतराष्ट्राचें म्हणणें आहे. १०. अजिंक्य, कधींही पराभूत न होणारा असा. ११. 'अजय्यक—सा' असें पाठांतर आहे. १२. अजिंक्य असा जो अर्जुन त्यापासून. १३. संजया ! १४. अर्जुन. १५. उलटले, पळत असलेले सर्व वीर पुन्हा एकत्र होऊन, जोमानें शत्रूवर चाल करून आले. १६. मुरडून आलेल्या पांडववीरांच्या. १७. धाके=दबकून गेलें, भ्यालें. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'धाकें' असा पाठ आहे. १८. मी तर. १९. स्तुतीस पात्र आहेत पाय ज्याचे तो कृष्ण. २०. घोडे.

धन्य[1] तुम्हीं आम्हीं कीं नरनारायणचरित्र वेदवा[2] जी ! ॥ ८
भीमप्रमुख महात्मे पांडववीर प्रसिद्धकीर्ति[3] बळी; ।
आम्हीं कर्णप्रमुख[4] स्वजयार्थें मांडिली[5] रणांत फळी[6]. ॥ ९
कर्णें पांचाळांचे[7] वीस रथी मारिले अतिख्यात, ।
केला बहु वीरांच्या प्राणांचा त्या रणांगणीं घात[8]. ॥ १०
'धृष्टद्युम्न[9] वधावा, पुरवावा आजि काम हा मात्र'. ।
तव पुत्र म्हणे, तेव्हां [10]लोटिति गजनायकां महीमात्र[11]. ॥ ११
केरळे[12], कोसल, मागध, भद्र, निषध, अंग, वंग गजयोधी[13], ।
धृष्टद्युम्नावरि बहु वर्षति शस्त्रें महाबळ विरोधी[14]. ॥ १२
ते शरतोमरवृष्टि[15] द्विपयोधी[16] सोडिती सरी[17] घनसे[18]. ।
त्या शस्त्रांच्या पटलीं[19] एका ही रविकरास[20] रीघ नसे. ॥ १३
गिरिरुद्ध[21] वज्रकरसा[22] मानीं त्या पार्षतास[23] मीं. रण तो ।

---

१. कृष्णार्जुनांविषयीं पूज्य बुद्धि असल्यामुळें, संजयाचें हें म्हणणें आहे. २. अर्जुन काय करिता झाला? कृष्ण काय म्हणाला? इत्यादि प्रश्न विचारून कृष्णार्जुनचरित्र वदवा, व त्यामुळें आपण धन्य होऊं—असा भाव. ३. प्रसिद्ध आहे कीर्ति ज्यांची. ४. कर्ण आहे नायक ज्यांचा. ५. फळी मांडिली म्हणजे चेंडूफळीचा खेळ मांडिला—असाही अर्थ करितां येईल. (अध्याय ८।१७ व अध्याय ११।५ मध्यें शत्रुशिरोरूपी कंदुकक्रीडेचा उल्लेख आहे. त्यास अनुरूप असें येथील वर्णन आहे). ६. आंत दुसऱ्याचा प्रवेश न व्हावा म्हणून कटावानें व्यवस्थित मनुष्यांची पंक्ती करितात ती. ७. पांचाळ देशांतल्या द्रुपद राजाचे वीर. द्रुपद मेल्यामुळें आतां धृष्टद्युम्नच त्यांचा अधिपति होता. ८. नाश. ९. 'धृष्टद्युम्नास मार' म्हणून विशेषतः सांगण्याचें कारण असें कीं, तो पांडवसैन्याचाही अधिपति होता; तेव्हां त्यास मारणें म्हणजे भीष्मद्रोणांच्या मरणाबद्दल मोबदला घेणेंच होय. १०. महामात्र (महात) गजनायकां (गजश्रेष्ठांस, उत्तम गजांस) [युद्धरंगांत] लोटिति (मोठ्या जोरानें आणिती)—असा अन्वय. ११. महात. १२. हे सर्व देश कमी अधिक मानानें गजांविषयीं प्रख्यात आहेत. १३. गजावर बसून युद्ध करण्याविषयीं प्रसिद्ध असे योद्धे. १४. शत्रु. १५. बाण, व तोमर=घुसळण्याच्या रवीसारखें एक शस्त्र त्यांची वृष्टी. १६. गजयोधी. १७. पर्जन्यधारा. १८. अन्वयः—ते द्विपयोधी (गजयोधी) सरी (पावसाच्या धारा) [सोडणाऱ्या] घनसे (मेघाप्रमाणें) शरतोमरवृष्टि सोडिती. १९. समूहीं. २०. सूर्यकिरणास. २१. पर्वतरुद्ध, पर्वतांनीं अडविलेला. २२. इंद्रासारखा. २३. धृष्टद्युम्नास.

अद्भुत, कीं गजयोधी ते घन[1], पांचाळ[2] ही समीरण[3] तो. ॥ १४
सात्यकि, नकुळ, शिखंडी, सहदेव, द्रौपदेय इत्यादि ।
वृष्टि करिति शस्त्रांची. झाले संक्षुब्ध सर्व गजसादि[4]. ॥ १५
सात्यकिनें अंगनृपति, सहदेवें पुंड्रभूप, नकुलानें ।
अंगनृपाचा नंदन[5], वधिला[6], जैसा भुजंग[7] नकुलानें[8]. ॥ १६
अंगाच्या[9] वीरानीं नकुळासीं फार उग्र रण केला; ।
परि मांद्रीसुतहस्तें[10] त्या म्लेच्छांचा[11] मद क्षया गेला. ॥ १७
त्या पांडववीरांहीं वधिले ते म्लेच्छ वीर सर्व तसे[12]; ।
पडले[13] क्षितिवरि वज्रायुधपातांहीं[14] ससिंह[15] पर्वतसे. ॥ १८
सेनाटवींत[16] तूझ्या शिरला सहदेव दावपावकसा[17]; ।
'दुःशासना घना[18]!' भटमृग[19] म्हणती, 'शीघ्र धांव[20]. पाव[21] कसा.'[22] ॥१९

---

१. वर्णसादृश्यामुळें हत्तींवर मेघांचा आरोप केलेला आहे. प्रस्तुत अर्धात धृष्टद्युम्न गजयोद्धयांस किती सहज रीतीनें पळवून लावीत होता, हें **रूपकानें** स्पष्ट दाखविलें आहे. वाऱ्याच्या सोसाट्यानें मेघ उडून जातात व पाऊस पडेनासा होतो, ही सर्वांच्या अनुभवाची गोष्ट आहे. म्हणूनच हें **रूपक** विशेष रम्य होय. २. धृष्टद्युम्न. ३. वायु. ४. हत्तीवरील योद्धे. 'सादी' म्हणजे 'महात' असाही अर्थ होतो. ५. मुलगा. ६. 'वधिला' या क्रियापदास 'सात्यकिनें' 'सहदेवें' व 'नकुलानें' असे तीन स्वतंत्र कर्ते व क्रमानें 'अंगनृपति' 'पुंड्रभूप' व 'अंगनृपाचा नंदन' हीं स्वतंत्र कर्में आहेत. अन्वय करतांना, यांतून एकेक कर्ता व एकेक कर्म घेऊन क्रियेशीं जोडून तीन निरनिराळीं वाक्यें करावीं. ७. सर्प. 'भुजं कुटिलं गच्छतीति भुजंगः' म्हणजे भुज–कुटिल–वांकडा चालतो म्हणून भुजंग–ही व्युत्पत्ति. याच शब्दाचीं 'भुजग' व 'भुजंगम' अशीं आणखी दोन रूपें आहेत. ८. मुंगुसानें. ९. अंगराजाच्या. १०. नकुलाच्या हातून. ११. मूळचा संस्कृत शब्द 'म्लेच्छ.' 'म्लेंछ' हा त्याचा अपभ्रंश. महाराष्ट्रांत अपभ्रंशरूपच प्रचारांत आहे. म्लेच्छ म्हणजे गोमांसभक्षक व सर्वसंस्कारशून्य–अशी शब्दरत्नाकरकारांची व्याख्या आहे. १२. गजयोधी. १३. यास 'म्लेछ वीर' कर्ता. १४. वज्रनामक आयुधाच्या माऱ्यानें. १५. वर असलेल्या सिंहासह–हत्ती व त्यावरील योध–असा भाव. १६. सेना+अटवी=सेनारूप अरण्यांत. १७. दावाग्नीप्रमाणें, वणव्याप्रमाणें. १८ दुःशासनरूप मेघा! १९. कौरववीररूपी मृग. २०. धांवून ये. २१. पाव कसा=विलंब न करितां येऊन रक्षण कर. पावणें=प्रसन्न होऊन इष्टसिद्धि करणें. २२. या गीतींत **परंपरितरूपक** व **काव्यलिंग** असे दोन अलंकार आहेत. सेनेवर अटवीचा, सहदेवावर पावकाचा, दुःशासनावर घनाचा, भटावर मृगाचा, असे सापेक्ष सुंदर आरोप केल्यामुळें

त्या [1]भ्रात्यावरि धांवे भ्राता दुःशासन [2]प्रजापाळा ! ।
त्या भोंवता मिळाला वीरांचा, रण पहावया, [3]पोळा. ॥ २०
वक्षःस्थळीं तुझा सुत सहदेवातें शरत्रयें भेदी, ।
पांडव ही शत्रूचें [4]नाराचानें उरःस्थळ च्छेदी. ॥ २१
[5]शत्रूवरि सत्तर शर सोडी, [6]सूतावरी हि [7]तो तीन. ।
[8]जो तो ही जाय म्हणत, 'रिपु[9]जीवन निजमुखांत ओतीन.' ॥ २२
दुःशासन, धनु खंडुनि, मस्तक-वक्ष [10]त्रिसप्ततीं बाणीं ।
[11]हाणी. [12]तेव्हां घाली पांडव पाणी [13]भयंकर कृ[13]पाणीं. ॥ २३
सहदेवें मग, गरगर फिरवुनि, जो [14]खड्ग सोडिला चापा ! ।
तो तोडी तत्काळ चि [15]दृढ [16]बाणगुणांसमेत ही [17]चापा. ॥ २४
दुसरें धनुष्य [18]घेउनि रिपुचें भेदावयासि उर, [19]गमनीं ।
जो शर [20]सुपर्णसा, तो सोडी, [21]ज्या म्हणति '[22]नाथ' उरग मनीं. ॥ २५

---

**परंपरितरूपक** झालें आहे. या गीतींतील पहिल्या अर्धांत 'कारण' व दुसऱ्या अर्धांत 'कार्य' असा दोहोंत अनुक्त कार्यकारणसंबंध असल्यामुळें हा **काव्यलिंग** अलंकार समजावा.

१. चुलतभावावर. २. धृतराष्ट्रा ! ३. घेरा, समुदाय. ४. लोखंडी बाणानें. ५. दुःशासनावर. ६. सारथ्यावर. ७. सहदेव. ८. अन्वय व अर्थः–[त्या सत्तर. शरांपैकीं] जो तो ही (प्रत्येक शर) [मी] रिपुजीवन (शत्रु जो दुःशासन त्याचे प्राण) निजमुखांत (आपल्या तोंडांत) ओतीन (टाकीन–त्यास गिळून टाकीन; जिवें मारीन, असा भाव) [असें] म्हणत जाय (शत्रूवर जाई). ९. शत्रुप्राण. (पक्षीं) शत्रुरूपी उदक. 'ओतीन' ह्या शब्दामुळें येथील '**श्लेष**' स्पष्टच आहे. १०. त्र्याहत्तर. ११. ताडन करी. यास कर्म '**सहदेवास**' अध्याहृत. १२. तेव्हां (धनु तुटल्यावर) **पांडव (सहदेव)** भयंकर कृपाणीं (भयंकर तलवारीस) पाणी घाली (हात लावी. 'तलवार हातांत घेई'–असा भाव.) १३. भयंकर तलवारीचे ठायीं. १४. खड्ग=तलवार. 'खड्ग' हें शस्त्र आहे, अस्त्र नव्हे. तेव्हां 'खड्ग सोडिला' हा प्रयोग अप्रशस्त वाटतो. १५. हें 'चापा'चें विशेषण. १६. बाण व त्याच्या दोरीसहित. १७. दुःशासनाच्या धनुष्यास. १८. याचा कर्ता '**सहदेव**'. १९. जाण्यांत. २०. गरुडसा. गमनीं सुपर्णसा=गरुडाप्रमाणें शीघ्र चालणारा. २१. ज्या (ज्या शरास) उरग (सर्प) मनीं (आपल्या मनांत) नाथ म्हणति–असा अन्वय. २२. नाथ म्हणजे उरगनाथ म्हणति, किंवा सुपर्णनाथ म्हणति–असे दोन अर्थ करितां येतील. तो शर सर्पापेक्षांही अतिभयंकर व शीघ्र प्राणहरण करणारा असल्यामुळें सर्प देखील त्यास 'नाथ' म्हणजे आपला यजमान–

दुःशासनें हि तो शर तोडुनि, फिरवूनि तो[1] चि करवाल[2], ।
त्यजिला सहदेवावरि अरिहननीं जो[3] उदंड अरवाल[4]. ॥ २६
सोडुनि सहदेवावरि कृष्णोरगराजरूप[5] उग्रासी[6], ।
धनु सज्य करुनि घे शर, काळ हि ज्या[7] मानवेल उग्रासी[8]. ॥ २७
तो सहदेव हि देवा[9]! येतां त्वत्सूनुच्या[10] कृपाणातें[11], ।
क्षितिवरि[12] पाडी तोडुनि[13], सोडुनि अत्यंत तीव्र बाणातें. ॥ २८
तों[14] सहदेवरथावरि सोडी तव पुत्र शर चतुःषष्टी[15]. ।
पांचांहीं[16] एकेक[17] च्छेदी माद्रेय[18], परि नव्हे कष्टी[19]. ॥ २९

---

आपल्यांत श्रेष्ठ म्हणूं लागले—असा पहिला अर्थ. किंवा त्या शराचा सुपर्णासारखा अत्यंत वेग पाहून उरगही भ्याले व त्यास भीतीनें सुपर्णनाथ (गरुडश्रेष्ठ–विष्णुवाहन) समजूं लागले–असा दुसरा अर्थ.

१. तो चि म्हणजे जो करवाल (खड्ग) सहदेवानें दुःशासनावर फेंकिला तोच. (मागची २४ वी गीति पहा.) 'तोंचि' असा अन्य पाठ आहे. २. खड्ग. ३. जो (करवाल) अरवाल (हलका होता) [व] अरिहननीं (शत्रुवध करण्यांत) उदंड (फार होता, पुरेसा होता–असा भाव)–असा अन्वय. किंवा जो करवाल अरिहननीं (शत्रुनाश करण्यास) उदंड अरवाल (फार हलका–असमर्थ असा) होता, असाही अर्थ करितां येईल. कारण सहदेवानें दुःशासनास मारण्याकरितां म्हणून तो फेंकला होता. पण त्यानें तें काम केलें नाहीं. म्हणून असा कुचकामाचा करवाल मला नको असें म्हणून दुःशासनानें तो पांडवावर परत फेंकिला–असा भाव. दोन्ही अर्थ सुरस व संभवनीय असल्यामुळें यांतून पाहिजे तो घ्यावा. ४. अरवाल, हळुवार, हलका; व पटु, तीक्ष्ण, चपल–असे अर्थ आहेत. ५. कृष्ण+उरग+राज=कृष्णसर्पराजासारखा. ६. उग्र+असि=भयंकर खड्ग. ७. ज्या उग्रासी (ज्या उग्र शराला) काळ हि (यम देखील) मानवेल–असा अन्वय. तो शर इतका उग्र होता कीं, यम जरी आला असता, तरी त्याशीं भिडण्यास त्या शरानें मागेंपुढें पाहिलें नसतें. मानवणें=मान्य होणें, पसंत पडणें. ८. भयंकरासी. ९. धृतराष्ट्र. राजांस 'देव' शब्दानें संबोधण्याची चाल आहे. १०. तुझ्या मुलाच्या; दुःशासनाच्या. ११. खड्गातें. १२. जमिनीवर. १३. 'तोडुनि'–'सोडुनि' अनुप्रासालंकार. १४. इतक्यांत. सहदेव कृपाणास तोडतो न तोडतो इतक्यांत–असा भाव. १५. चौसष्ट. १६. पांच पांच बाणांनीं. १७. त्या चौसष्ट बाणांपैकीं एकेक–प्रत्येक; चौसष्ट शरांपैकीं प्रत्येकास पांच बाणांनीं तोडिलें म्हणजे सहदेवानें एकंदर ५×६४=३२० शर सोडिले–असा अर्थ. १८. माद्रीचा मुलगा सहदेव. १९. त्रस्त, बाणपीडित.

वृष्टि करी विशिखांची[1] प्रियनंदन पांडुचा धनुर्वेदी ।
एकैका बाणातें तीं[2] तीं बाणीं तुझा सुत च्छेदी. ॥ ३०
करिती प्रवेश दुःशासनशर त्या पांडुसूनुच्या[3] वर्मीं[4]; ।
भेटों इच्छिति जाणों स्वगुरुदुरुक्ताशुगांसि[5] हृन्मर्मीं[6] ॥ ३१
पीडुनि सहदेवातें हाणी सूतासि तीव्र नव[7] शर, हा[8] ।
काय म्हणे, 'यमधर्मा सोडुनि, होउनि नरास, न, वश, रहा.' ॥ ३२
तेव्हां सहदेव धरी, हस्तीं खर[9] बाण अंतकोपम[10] हा[11], ।
चित्तीं हि सर्वरिपुचा जेंवि करायासि अंत, कोप महा. ॥ ३३
आकर्ण[12] चाप ओढुनि, सहदेवें तीव्रें[13] सोडिला बाण; ।
तो कवचतनुक्षितितळ[14] भेदुनि[15] करि अरिसि[16] मूर्च्छितप्राण. ॥ ३४

---

१. बाणांची. याची व्युत्पत्ति अशी सांगितली आहे:–'विशीर्यते तनूक्रियते इति विशिखः.' धार देऊन जो बारीक केला जातो तो विशिख. किंवा 'विशन् खनतीति वा विशिखः' प्रवेश करून जो देहास खणतो तो विशिख. २. तीं तीं बाणीं=तीन तीन बाणांनीं. ३. पांडुपुत्राच्या; सहदेवाच्या. ४. कवचांत. ५. स्वगुरु+दुरुक्त+आशुग=आपला यजमान+दुर्भाषण, वाईट शब्द+बाण, म्हणजे त्या शराचा यजमान जो दुःशासन त्यानें द्यूतांत द्रौपदीवस्त्रहरणप्रसंगीं पांडवांस अति नीच असे जे शब्द उच्चारिले, ते बाणासारखे तीक्ष्ण शब्द पांडवांच्या हृदयास विदारून जे आंत शिरले ते अद्यापि तेथेंच होते. दुःशब्दरूपी शर दुःशासनाचेच व आतां सहदेवावर आलेले शरही त्याचेच. तेव्हां हे परस्पर बंधु झाले. म्हणून हे वर्मीं शिरलेले शर, दुःशब्दरूपी हृदयांतल्या शरांस–भावांस–भेटावयासच गेले कीं काय!–अशी कवीची उत्प्रेक्षा आहे. या एका शब्दांत इतका अर्थ भरलेला आहे. सर्वसंग्रहकारांनीं या सामासिक शब्दावर 'आपल्या गुरूला दुर्भाषणरूप बाणांस' व रा० पराडकर यांच्या प्रतींत 'आपल्या वडील भावासारख्या असलेल्या [दुःशासनाच्या वस्त्रहरणप्रसंगींच्या] दुरुक्तरूपी बाणांना' अशा टीपा दिलेल्या आहेत. गुरु=श्रेष्ठ, मर्मच्छेद करण्यांत पटाईत–असा अर्थ घेतला, तरी अर्थहानी होत नाहीं. ६. हृदयरूपी रहस्यस्थानीं. ७. नूतन. ८. अन्वयः–हा (दुःशासन किंवा सोडिलेला शर) [सूतासि] काय म्हणे (म्हणता झाला कीं) यमधर्मा सोडुनि (देव जो यम त्याला सोडून, त्याची चाकरी न करितां–म्हणजे मरून न जातां) नरास वश होउनि (यःकश्चित् मानव जो सहदेव त्याची सेवा करीत) न रहा (राहूं नकोस). नरसेवा सोडून यमसेवेला जा–असा भाव. ९. तीक्ष्ण. १०. यमासारखा. ११. अन्वयः–हा सहदेव जेंवि (ज्याप्रमाणें) सर्वरिपुचा (सर्व शत्रूंचा) अंत करायासि चित्तीं हि महा कोप धरी, [तेंवि सर्व रिपुचा अंत करायासि] तेव्हां हस्तीं (हातांत) अंतकोपम खर बाण धरी. १२. कानापर्यंत. १३. ज्यांत उष्णता, वेग व तेज अधिक आहे असा. १४. आंगावरील कवचाला फोडून, शरीरांतून आरपार निघून जमिनींत शिरला असा अर्थ. १५. विदारण करून, छिद्र पाडून. १६. दुःशासनाला.

पडतां मूर्च्छित, सूतें दुःशासन पळविला परा भूतें;[1] ।
सैन्यें मारुनि रक्तें तर्पी[2] सहदेव भूवरा![3] भूतें.[4] ॥ ३५
कुरुसेनाभुजगीतें[5] खंडी जो शरनखाननीं[6] नकुळ,[7] ।
त्यातें कर्ण निवारी, केलें जेणें[8] तुझें हि दीन कुळ. ॥ ३६
त्या कर्णातें पाहुनि नकुळ म्हणे, 'आजि बहुदिसां दृष्टी ।
करुणार्द्रा[9] देवांची, मजवरि पडली महासुधावृष्टी.[10] ॥ ३७
तूं वैरकलहसर्वानर्थाचें[11] मूळ, लोकहानिकर;[12] ।
हा निकर[13] कौरवांचा मेळा,[14] त्वां करविला महा निकर.[15] ॥ ३८
राजसभेंत खळा! त्वां आणविली कुळवधू[16] निहीनकुळा![17] ।
कृतकृत्यता[18] न, तुज न विमथितां खळजन[19] वधूनि ही, नकुळा. ॥ ३९
आजि रणीं मारिन तुज रिपुला विपुलापराधबीजाला,[20] ।
शक्र[21] हि रक्षूं न शके संहाराया सजेन[22] मीं ज्याला.' ॥ ४०

१. परा (दुसऱ्या) भूतें (भूमीकडे)=दुसरीकडे, दुसऱ्या ठिकाणीं. २. तर्पण करी, तहान भागवी. ३. राजा! ४. भूतपिशाचादि गणाला. ५. कौरवसेनारूप नागिणीतें. ६. शर+नख+आनन=बाणरूप नखांनीं व मुखांनीं. ७. माद्रीकुमर—परंतु श्लेष साधून 'मुंगुस' असा अर्थ घेतला आहे. ८. जेणें म्हणजे ज्या नकुळानें. ९. करुणेमुळें आर्द्र (ओली) अशी. हें भाषण औपरोधिक आहे. १०. अमृताचा मोठा पाऊस. ११. कौरवपांडवांमधील वैमनस्याचें आणि प्रस्तुत युद्धाचें व त्यामुळें होणाऱ्या सर्व अनर्थांचें. १२. जगाची हानी करणारा. १३. समूह. युद्ध करण्याकरितां येथें जमलेला हा कौरवांचा प्रचंड समूह तुझ्यामुळेंच मारला गेला—असा भाव. द्वामयमक. १४. 'केला' असें पाठांतर. अनुरूप गीतिः—या साध्वीस न दुःखद परकर चि, तुझा स्वकीर्तिहानिकर। हा निकर पातकांचा, कैसा केला खळें महा निकर? ॥ (पंतकृत—सभापर्व, अध्याय ५—३५). १५. कहर, नाश, क्षय. १६. द्रौपदी. द्रौपदीवस्त्रहरणास उद्देशून हें वाक्य आहे. १७. कुळविहीना!, नीच अशा सूतकुलोत्पन्ना! साभिप्राय संबोधन. 'विहीनकुळा!' असा पाठभेद. विहीनकुळांतला म्हणून कुळवधू सभेंत आणविली—असा भाव. १८. अन्वयः—तुज (कर्णाला) न विमथितां (न मारितां—तुला सोडून) खळजन (दुष्ट लोकांस, संपूर्ण कौरवांस) वधूनि ही (मारूनही) नकुळा (माद्रीपुत्र नकुळाला—मला) कृतकृत्यता न (कर्तव्य केल्याची धन्यता नाहीं). सर्व शत्रूंस मारूनही जर तुला मारिलें नाहीं, तर मी आपलें कर्तव्य बजाविलें, असें होणार नाहीं—असा भाव. १९. 'खळ—कुळ' असें पाठांतर. २०. पुष्कळ अपराधांचें मूळकारण अशा तुला. वृक्षबीजन्यायानें कर्ण व अपराध यांचा संबंध आहे—असा भाव. २१. इंद्र देखील. २२. सिद्ध होईन, उद्युक्त होईन.

कर्ण म्हणे, 'राजसुता ! बहु [1]न वदें, [2]बाहुपौरुष प्रकटीं. ।
[3]विक्रमरहितें वचनें शोभति न [4]जनीं, जसीं मुखें नकटीं. ॥ ४१
[5]असन्मानस तव भुजपौरुष देखावया असे लोल[6]; ।
बोल [7]प्रहार-बोलें, मोल तयाचें नव्हे; दुजें फोल. ॥ ४२
करुनि हि [8]अतुळ पराक्रम न वदति कांहीं च शूर. तूं [9]आधीं ।
किति वदसी ? वाचाळा ! [10]मग बोलें, जय पराक्रमें साधीं. ॥ ४३
क्षण हि न उरेल नकुळा ! [11]कर्णनृसिंहापुढें तुझा [12]दर्प, ।
सर्पप्राण जसे [13]खगपतिपासीं, शंभुनिकट [14]कंदर्प.' ॥ ४४
ऐसें वदोनि सोडी [15]वृष [16]नाराच [17]त्रिसप्तति क्रोधें. ।
ते लागतां चि नकुळें [18]ऐसीं शर अर्पिले महायोधें. ॥ ४५
चाप च्छेदुनि विंधी नकुळाला [19]आधिरथि तिसां बाणीं, ।
कवच विदारुनि [20]सेविति [21]रुधिर, जसे [22]अहि महीतळीं पाणी. ॥ ४६
घेउनि धनुष्य दुसरें बाहूनीं [23]भव्यवीर्यसिंधूनीं, ।

---

१. न वदें=बोलूं नकोस. उगाच बडबड करूं नकोस. २. भुजांचा पुरुषार्थ, बाहुबळ. ३. हें उत्तम सुभाषितरूप गीत्यर्ध आहे. ४. लोकांत. ५. माझें मन. ६. उत्सुक, चंचल. ७. प्रहारबोलें बोल (तोंडानें बडबड करण्यापेक्षां तुला जें बोलावयाचें तें प्रहाररूपी बोलानें बोल), [कारण] तयाचें (तशा बोलण्याचें, कृति करून दाखविण्याचें) मोल नव्हे (मोलच होऊं शकत नाहीं). दुजें (बोलणें, तोंडानें बडबड करणें हें) फोल (निरर्थक, मूल्यहीन) [होय]–असा अन्वयार्थ. येथें **विषमा**लंकार आहे. 'बोल प्रहार, बोलें मोल तयाचें नव्हे'–असा पाठ घेतल्यास अन्वय व अर्थः–प्रहार बोल (इतर गोष्टी बोलूं नकोस, तर प्रहारांनींच बोल–प्रहारांसच शब्द कर–बाणांनीं प्रहार करणें म्हणजेच बोलणें असें कर–असा भाव) तयाचें (प्रहाराचें, शौर्याचें) मोल (किंमत–बरोबरी) बोलें (शब्दांनीं; व्यर्थ बडबड केल्यानें) नव्हे (बडबड कितीही केली तरी प्रहाराची–शौर्याची बरोबरी होणार नाहीं.) दुजें (प्रहाराहून इतर गोष्ट—व्यर्थ बडबड–असा भाव) फोल (पोकळ, सारविहीन) [आहे]. ८. अप्रतिम. ९. कांहींच पराक्रम करण्यापूर्वीं. १०. [आधीं] पराक्रमें (पराक्रम करून–कोणालाही पराजित करून) जय साधी [व] मग बोलें–असा अन्वय. ११. कर्णरूप नृसिंहापुढें. १२. गर्व, अभिमान. १३. पक्षिश्रेष्ठ जो गरुड त्यापाशीं. १४. मदन. १५. कर्ण. १६. बाण. १७. त्रि+सप्तति=त्र्यहात्तर. १८. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'ऐसी' असा शब्द आहे १९. कर्ण. २०. प्राशन करिती, पिती. [ते बाण] रुधिर सेविति–असा अन्वय. २१. रक्त. २२. सर्प. २३. उज्ज्वल पराक्रमाचे समुद्रच अशांनीं. ( हें 'बाहूनीं' याचें विशेषण.)

गर्जे सिंहरवें[1] शरसप्ततिनें[2] कर्णकाय विंधूनी[3]. ॥ ४७
सारथिला तीं[4] बाणीं ताडुनि, तोडूनि चाप, तो नकुळ, ।
सोडी त्रिशत[5] शर, तिहीं[6] वृष वरिला जेंवि अलिकुळें[7] बकुळ[8]. ॥ ४८
नकुळें व्याकुळ केला जेव्हां युद्धांगणांत आधिरथी, ।
आश्चर्य म्हणति सुरगण, तव सेनेंतील धरिति आधि[9] रथी[10]. ॥ ४९
कर्ण दुजें[11] धनु घेउनि मार्गण[12] सप्त स्वकीयशत्रूच्या, ।
रोवी तो वीरशिरोमणिवर[13] कर्ण, स्थळांत जत्रूच्या[14]. ॥ ५०
सप्त[15] शरांहीं नकुळ हि पीडुनि कर्णासि, तद्धनुष्कोटी[16] ।
छेदी; तयिं[17] 'साधु नकुळ! साधु'[18] म्हणे मर्त्यदेवताकोटी[19]. ॥ ५१
अन्य शरासन[20] घेउनि कर्ण शरगणें[21] सुता[22] हि माद्रीच्या ।
झांकी, वृष्टिसमय[23] घनपटलें शिखरा जसा हिमाद्रीच्या[24]. ॥ ५२
कर्णाचें शरपटल च्छेदी तो नकुळ वीर, विशिखांचा[25] ।
पाडी घन[26] वृषगिरिवरि[27], तो ही[28] पाडी महीवरि हि खांचा. ॥ ५३

१. सिंहनादानें. २. सत्तर शरांनीं. ३. भेदून, टोंचून. ४. तीन बाणांनीं. 'तीन' बद्दल 'तीं' हा शब्द कवितेंत घालण्याची वहिवाट आहे. (पुढें अध्याय १५ गीति ४ पहा). ५. तीनशें. ६. त्यांनीं, त्या तीनशें बाणांनीं. अन्वयः–जेंवि (ज्याप्रमाणें) अलिकुळें (भृंगसमूह) बकुळ (बकुल-नामक वृक्षास) [वरिती] [तेंवि] तिहीं (त्या बाणांनीं) वृष वरिला [ते बाण वृषाच्या आंगास भुंग्यांप्रमाणें झोंबले–असा भाव]. ७. भ्रमरसमूहानें. ८. वृक्षविशेष, ज्यास 'प्राकृत'मध्यें 'वोवळ' असें म्हणतात. ९. मनःसंताप. १०. रथांतून लढणारे वीर. ११. दुसरें. १२. बाण, शर. १३. वीर+शिरस्+मणि+वर=शूर+डोकें+रत्न+श्रेष्ठ=वीरश्रेष्ठांमध्येंही श्रेष्ठ–असा भाव. या गीतींत पंतांनीं 'कर्ण' हा शब्द दोनदां योजिला आहे. वस्तुतः उत्तरार्धांत सर्वनामाचा उपयोग करावयास पाहिजे होता. १४. कंठनिकटप्रदेशीं. (बाहू आणि मस्तक यांच्या संधि-भागीं). स्वकीय शत्रूच्या जत्रूच्या स्थळांत रोवी–असा अन्वय. १५. सात बाणांनीं. १६. तत्+धनुस्+कोटी=त्याच्या धनुष्याचें अग्र. १७. तेव्हां. १८. 'शाबास नकुळा! शाबास'. १९. मर्त्यकोटी व देवताकोटी; जमिनीवरील मनुष्यसमूह व आकाशांतील देवसमूह. कोटी=समूह, वर्ग, संघ. २०. धनुष्य. २१. बाणसमूहानें. २२. माद्रीच्या सुताहि=नकुळासही. २३. अन्वयः–वृष्टिसमय (पावसाळा) जसा घनपटलें (मेघवृंदांनीं) हिमाद्रीच्या (हिमालय पर्वताच्या) शिखरा झांकी [तसा] इ०. २४. हिमालयपर्वताच्या. हिमाचा (बर्फाचा) अद्रि (पर्वत) तो हिमाद्री. २५. बाणांचा. २६. मेघ, प्रचंड वृष्टी. २७. कर्णरूपपर्वतावर. २८. तो ही (तो

झांकिति अन्योन्यांतें बाणपटें, उत्सवीं जसे व्याही, ।
शोभा सुधा चि धीरां, देवां सेव्या, परां न सेव्या ही. ॥ ५४
कर्णाचें शरपातस्थळ सोडुनि, पळति तेधवां दूर ।
शूर हि सोमक, जैसे दंशांचे संघ लागतां धूर. ॥ ५५
पांडवमार्गणपातस्थळ सोडुनि, पळति सर्व तंव सैन्यें, ।
श्रीरामनामकीर्तनरवभीताघें जसीं, धरुनि दैन्यें. ॥ ५६
नकुळशरगण गमे घन, झांकाया, कर्ण अर्यमा, वेंळला, ।
वृषविशिखराहुवदनीं पांडवनक्षत्रवर्य मावळला. ॥ ५७

---

मेघ किंवा शररूपानें संतत पडणारा पाऊस) महीवरि हि (जमिनीवर देखील-शत्रुदेहांतच नव्हे तर पृथ्वीवर देखील) खांचा पाडी-असा अन्वय. जमिनींत पावसामुळें मोठमोठ्या खांचा पडतात हें प्रसिद्धच आहे. तसाच तो बाणांचा पाऊस इतक्या जोराचा होता कीं, शत्रूंच्या देहांत खांचा पाडून पुन्हां जमिनीसही भेदून आंत शिरत असे-असा भाव.

१. बाणरूपी वस्त्रानें. २. सणांच्या दिवशीं किंवा लग्नादि प्रसंगीं. ३. वराचा बाप व वधूचा बाप. हे ज्याप्रमाणें उत्सवप्रसंगीं एकमेकांस वस्त्रादि वस्तूंचे अहेर करितात, तसे **कर्णनकुळ** एकमेकांस बाणांनीं झांकिते झाले-असा कवीचा आशय. ४. अन्वय व अर्थः—धीरां (धैर्यशीलांस-खऱ्या वीरांस) शोभा (**कर्ण-मा**द्रेयांप्रमाणें युद्धांत अतुळ पराक्रम केल्यामुळें जी शोभा येते ती) सुधा चि (सुधेप्रमाणेंच-अमृतच होय) [ती शोभा इतरां सेव्या नव्हे. कारण] ही [सुधा] देवां (अमरांसच) सेव्या (सेवण्यास-पिण्यास योग्य झाली). परां (दानवादिकांस) न सेव्या. किंवा धीरां (धीररूपी) देवां शोभा (रूपी) सुधा चि सेव्या; ही (शोभारूपी सुधा) परां सेव्या न-असा अर्थ करून **परंपरितरूपक** साधावें. किंवा शोभा धीरां सेव्या, ही परां न; सुधा चि देवां सेव्या [अन्या न]-असा अन्वय करून **क्रमालंकार** व **दीपकालंकार** देखील साधितां येतील. ५. 'शोभा सुधाचि धीरां' या वाक्यांतील 'सुधा'. ६. बाणाच्या टप्यांतील जागा. ७. पांडवांकडील सैन्यविशेष. ८. मधमाशांचे. ९. समूह. १०. **पं**डुपुत्र जो **न**कुळ त्याचे बाणाच्या टप्यांतील जागा. ११. तुझीं; (धृतराष्ट्राचीं). कौरवांचीं-असा भाव. १२. श्री+राम+नाम+कीर्तन +रव+भीत+अघें=शुभप्रद+दाशरथी राम+नांव+स्तुति किंवा पठन+शब्द+भ्यालेलीं+पापें=शुभप्रद रामनामाचें कीर्तन करीत असतां त्या 'राम'शब्दास भिऊन पळणारीं पापें. १३. दुरवस्था. १४. कर्णरूपी सूर्य. १५. उद्युक्त होऊन, सिद्ध होऊन आला. १६. कर्णाचे बाण हाच राहु, त्याच्या तोंडांत. १७. नकुळरूपी चंद्र. १८. अस्त पावला. या गीतींत प्रत्येक अर्धांत **एकेक** अशीं दोन **परंपरितरूपकें** आहेत. पूर्वार्धांतील 'गमे' शब्दानें **उत्प्रेक्षा** ध्वनित आहे. **उत्प्रेक्षेंत** केलेल्या विधानाविषयीं शंका असते; पण **रूपकांत** ती नसते. तेव्हां परस्परविरुद्ध

[1]अन्योन्यविशिखसदनीं शोभति [2]रत्नप्रदीपसे [3]शुद्ध, ।
[4]भ्रमरकुलावृत अद्भुत [5]कुसुमित [6]किंशुक चि; करिति ते युद्ध. ॥ ५८
नकुळाचे शर वेष्टिति कर्णातें, जेंवि [7]सर्प [8]नकुळातें, ।
कर्णाचे शर वेष्टिति नकुळातें, जेंवि [9]मधुप [10]बकुळातें. ॥ ५९
[11]सुरनरवर म्हणति, 'अहो ! सकळां युद्धांत युद्ध हें [12]कळस, ।
[13]बळसत्वसिंधु न धरिति [14]अळस. दिसति जेंवि [15]विकसले [16]पळस'. ॥६०
मग कर्णें धनु खंडुनि, सारथि पाडूनि, मारिले [17]वाजी, ।
केला रथ [18]शतचूर्ण चि उग्रशरानीं [19]मनुष्यदेवा! जी! ॥ ६१
मारूनि [20]चक्ररक्षक, [21]चक्र, गदा, खड्ग, [22]चर्म, जें [23]कांहीं ।
तें खंडिलें चि; [24]युद्धक्रतुचें [25]उपकरण राहिलें नाहीं. ॥ ६२
न [26]रिघाला माघारां नकुळ महावीर; शत्रुवरि घाला ।
[27]परि घालाया उचली तेव्हां अत्यंत घोर [28]परिघाला. ॥ ६३
कर्ण शरानीं खंडी त्या नकुळाच्या सुघोर परिघास, ।
[29]क्षुब्ध कराया टाकी अरिवरि शर, जेंवि [30]अग्न्युपरि [31]घांस. ॥ ६४

---

अलंकार एकत्र कसे ? अशी कदाचित् शंका येईल. तर **रूपक** शब्दगत आहे व **उत्प्रेक्षा** वाक्यगत आहे, म्हणून विरोधपरिहार होतो, असें समजावें.

१. एकमेकांच्या—एकमेकांनीं एकमेकांसाठीं—निर्मिलेल्या बाणांच्या घरांत. २. रत्नांच्या दिव्याप्रमाणें. ३. हें 'रत्नप्रदीप' व 'युद्ध' यांपैकीं कोणाचेंही विशेषण केल्यास चालेल. ४. भ्रमरसमुदायानें आच्छादित. **कर्णमाद्रेय** बाणावृत झाले होते म्हणून हें विशेषण आहे. ५. फुललेले. ६. पळस. ७. 'जेंवि नकुळ सर्पातें' असा अन्य पाठ आहे. ८. मुंगुसाला. ९. भ्रमर. १०. बकुळवृक्षाला. ११. सुरवर व नरवर, सुरश्रेष्ठ व नरश्रेष्ठ. १२. शिखराप्रमाणें, अतिश्रेष्ठ. १३. शारीरिक बल व मानसिक धैर्य यांचा समुद्र. हें **कर्ण** व **नकुळ** या दोघांचेंही विशेषण आहे. १४. (युद्ध करण्याच्या कामांत) आळस. १५. प्रफुल्लित झालेले. १६. फुललेल्या पळसासारखे दिसण्याचें कारण प्रत्येकाचें सर्व शरीर रक्तानें भरलें होतें. १७. रथाचे घोडे. १८. शंभर तुकडे. १९. हे राजा **धृतराष्ट्रा**! २०. रथाच्या चाकांचें रक्षण करणारे. २१. आयुधविशेष. २२. ढाल (गेंड्याच्या) चामड्याची करितात, म्हणून ढालेस 'चर्म' म्हणतात. २३. जें कांहीं **नकुळाजवळ** होतेंनव्हतें तें सर्व. २४. युद्धयज्ञाचें. २५. साहित्य. २६. फिरला. २७. **नकुळ** माघारां न रिघाला [इतकेंच नाहीं] परि शत्रुवरि घाला घालाया अत्यंत घोर परिघाला उचली—असा अन्वय. परि=तर उलट. २८. आयुधविशेष. २९. कोपाविष्ट. ३०. अग्नि+उपरि=अग्नीवर. ३१. तृण.

नाहीं शस्त्र, स्यंदन, सहाय, माद्रेय विकवच पळाला, ।
कर्ण धराया धावे त्या अरिला घालुनि कैव चपळाला. ॥ ६५
कर्णाला भिउनि पळे, जैसा हतदर्प सर्प नकुळाला. ।
पाठी लागोनि धरी तैसा तो आधिरथि हि नकुळाला. ॥ ६६
धांवडिला रथ सूतें, कर्णें माद्रेय गांठिला, अहितें; ।
घालुनि धनुष्य कंठीं धरिला, धरि गारुडी जसा अहितें. ॥ ६७
हांसत हांसत त्यातें कर्ण म्हणे, 'पांडवा ! पहा वरतें. ।
पहिलें वदलासि वृथा कीं झालें सत्य भाषण स्मर तें. ॥ ६८
हे कुरु गुरु वीरांचे. यांसीं भांडों नको, न लाजावें, ।
तुल्यांसीं झगडावें, नकुळा ! त्वां त्यजुनि भीतिला जावें. ॥ ६९
जा निजगृहासि बापा ! व्याकुळ झाली असेल माय पृथा, ।
कीं त्यां कृष्णांपासीं नकुळा ! आलासि संगरांत वृथा.' ॥ ७०
ऐसें वदोनि सोडी, कुंतीवचन स्मरोनियां न वधी, ।
अवधीरणा चि करि; तें मानधना दुःख ज्यां नसे अवधी. ॥ ७१

---

१. अन्वयः-[जवळ] शस्त्र, स्यंदन (रथ), सहाय (सहाय करणारा दुसरा कोणी शूर) नाहीं [व आपण] विकवच [म्हणून] माद्रेय पळाला. २. कवचरहित. ३. बाहुवेष्टन (मिठी). ४. शीघ्र पळणाऱ्याला. हें 'अरिला' याचें विशेषण. ५. भग्नगर्व, सामर्थ्यहीन. ६. मुंगुसाला भिउनि पळे-असा अन्वय. ७. तशा प्रकारचा. नकुळाप्रमाणें धावणारा (तो कर्ण). ८. अति वेगानें चालविला. ९. शत्रूनें. हें कर्णाचें विशेषण. १०. सर्पाला. ११. वर पहा. लज्जेनें मान खालीं घालूं नकोस. १२. पहिलें (पूर्वी मागच्या ३७-४० गीतींत) वदलासि (गर्वाच्या ज्या गोष्टी बोललास) तें वृथा झालें (व्यर्थ बडबड झाली) कीं सत्य भाषण [झालें] [हें] स्मर-असा अन्वय. १३. हे कुरु (हे दुर्योधनादिक कौरववीर) वीरांचे गुरु [होत] (सर्ववीरश्रेष्ठ होत). यांसीं भांडों नको (यांशीं भांडण्याची तुझी योग्यता नाहीं.) [तुझ्यापेक्षां श्रेष्ठ शत्रूशीं भांडून पराजित झाल्याबद्दल] न लाजावें (लाजण्याचें कारण नाहीं.)-असा या वाक्यांचा अन्वय व परस्परसंबंध. १४. समानांशीं, आपल्या बरोबरीचे असतील त्यांच्याशीं. १५. या शब्दानें तूं कृष्णार्जुनांच्या प्रोत्साहनावरून आलास. वस्तुतः तुझ्यांत शौर्य नाहीं, असें ध्वनित केलें आहे. १६. व्यर्थ. शौर्यविहीनाचें युद्धांत कांहींएक काम नसतां-असा भाव. १७. 'मारीन अर्जुनास चि समरीं, धर्मादिकां न चवघां मी' [उद्योगपर्व-अ० ११ गी० २८] असें कर्णानें कुंतीस वचन दिलें होतें. १८. तिरस्कारच, अपमानच. १९. मानच (सन्मानच) आहे धन ज्यांस, सत्कीर्तिलोलुपांस.

तेव्हां धर्मरथावरि नकुळ, असा होउनी[1] पराभूत, ।
गेला,[2] मांत्रिकनिर्जितशक्ति[3] शरण काय[4] ईश्वरा[5] भूत. ॥ ७२
कर्ण हि पांचाळांवरि हस्तींवरि केसरी[6] तसा गेला. ।
त्या वीरांचा मध्यंदिनसमयीं[7] नाश फारसा केला. ॥ ७३

[8]दुर्योधन [9]परमेश्वर, वाटे, तो [10]वीरभद्र कर्ण बळी, ।
धर्म हि दक्ष, [11]समर [12]मख, ऋत्विज पांचाळ. होय उग्र [13]कळी. ॥ ७४
[14]कीं वृष रवि, शर कर, भट [15]उडु, शोणितपूर अरुण, [16]भीरु तम, ।

---

२०. ज्या (ज्या दुःखाला) अवधी (सीमा) नसे, तें (असलें परम) दुःख, मानधना अवधीरणा च्चि करि–असा अन्वय. 'संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते,' म्हणजे 'संभावितास दुष्कीर्ति मरणापेक्षां अधिक दुःखकर होय' हेंच गीताशास्त्रांतलें (अध्याय २।३४) तत्त्व पंतांच्या या गीत्यर्धांत प्रतिबिंबित झालेलें आहे. २१. सीमा.

१. येथें 'होउनीं' असा शब्द रा० पराडकर यांच्या प्रतींत आहे. पुढें अध्याय १५ गीति ८ मध्येंही त्या प्रतींत असाच शब्द आहे. २. 'गेला' या क्रियेचा संबंध 'नकुळ' व 'भूत' यांशीं आहे. ३. मांत्रिकानें (पंचाक्षऱ्यानें) जिंकिली आहे शक्ति ज्याची. हें 'भूत' याचें विशेषण. ४. गेला कीं काय–अशी उत्प्रेक्षा. ५. शंकराला. कारण शंकर सर्व भूतांचा राजा. भूत=पिशाच. ६. सिंह. ७. मध्याह्नसमयीं. ८. प्रस्तुत गीतींत जें परंपरितरूपक आहे तें दक्षयज्ञविनाशकथेवर अवलंबून आहे. ती कथा अशी:–शंकराची स्त्री सती (जी पुढें हिमालयाच्या पोटीं जन्मून पार्वती झाली) दक्षप्रजापतीची मुलगी होती. दक्ष एकदां कैलासीं आला असतां शिव योगांत निमग्न असल्यामुळें त्यानें त्याचा सत्कार केला नाहीं. म्हणून दक्ष शिवाचा व सतीचा फार द्वेष करूं लागला. पुढें दक्षानें मोठा यज्ञ आरंभिला. त्या यज्ञास त्यानें शिव व सती यांशिवाय सर्व देवांस बोलाविलें. बापानें आरंभलेला यज्ञ पाहण्यास उत्सुक झालेली सती, शिव नको म्हणत असतांही बोलावण्यावांचून दक्षाच्या घरीं गेली. तेथें गेल्यावर दक्षानें तिचा अपमान केला व शिवाची निंदा केली. ती निंदा सतीस असह्य होऊन तिनें अग्निकुंडांत उडी टाकून देहाचा त्याग केला. कैलासांत शिवाला हें समजतांच त्यानें आपली जटा एका शिलेवर आपटली. तेथें वीरभद्र उत्पन्न झाला व त्यानें दक्षास, ऋत्विजांस व तेथें आलेल्या इतर देवांस मारून यज्ञाचा विध्वंस केला. ही कथा ध्यानांत ठेविली म्हणजे गीतींतलें रूपक चांगलें समजेल. ९. शंकर. १०. सांबाच्या जटेपासून उत्पन्न झालेला (शिवपुत्र). ११. युद्ध. १२. यज्ञ. १३. युद्ध. उग्र कळी होय–असें स्वतंत्र वाक्य. १४. या गीतींत देखील परंपरितरूपक झालें आहे. हीं सर्व रूपकें आकाशांतील ग्रहादिकांवरून साधलीं आहेत. त्याचा अर्थ असाः—कीं (किंवा)–वृष (कर्ण हा) रवि (सूर्य); शर (कर्णाचे बाण) कर (सूर्याचे किरण); भट (उभय सैन्यांतील किंवा पांडवसैन्यांतील वीर) उडु (नक्षत्रें होत. सूर्य उगवल्याबरोबर

विजय इनकांत, नृप विधु, बळप ग्रह, इष्ट पद्म हृष्टतम. ॥ ७५

## अध्याय पंधरावा.

धार्मिक धर्मसहाय त्वत्पुत्र युयुत्सु तव चमू पळवी, ।

---

नक्षत्रें मावळतात-हें प्रत्यक्ष आहे); शोणितपूर (रक्तप्रवाह) अरुण (उषःकाल). रक्तवर्णामुळें शोणितपुरास अरुण म्हटलें आहे. येवढेंच नाहीं तर ज्याप्रमाणें सूर्य अरुणास आधीं पाठवितो, त्याप्रमाणें जेथें कर्ण यावयाचा, तेथें आधीं रक्तप्रवाह करावयाचा; कर्णाच्या पुढेंच शत्रूंच्या रक्ताचा प्रवाह वाहत असतो-असा भाव). भीरु (रणांत जे भित्रे सैनिक होते ते) तम (अंधकार होत. सूर्योदयाबरोबर ज्याप्रमाणें तम नाहींसें होतें, तसे रण दिसल्याबरोबर, भित्रे पळून जात होते-असा भाव). विजय (अर्जुन) इनकांत (सूर्यकांत मणि होय. सूर्यकांताचा गुण असा कीं, त्यास सूर्यकिरण लागल्याबरोबर त्यांतून विस्तवाच्या ठिणग्या निघूं लागतात. त्याचप्रमाणें कर्णाचे शर लागल्याबरोबर अर्जुनही प्रदीप्त झाला खरा, पण त्या दिवशीं तो सूर्यापुढें यःकश्चित् मण्याप्रमाणें दिसत होता-असा भाव). नृप (धर्मराज) विधु (चंद्र. सूर्य असतां चंद्र फिका दिसतो हें प्रसिद्ध आहे). बळप (धृष्टद्युम्नादि सेनाधिप) ग्रह (सूर्यचंद्रेतर ग्रह-असा भाव. हिंदु ज्योतिषाप्रमाणें सूर्यचंद्रही ग्रह आहेत. पण गुरुशुक्रादि त्यांच्यापेक्षां तेजोहीन आहेत, हें स्पष्ट आहे). हृष्टतम (कर्णानें केलेल्या शत्रुक्षयामुळें फार संतुष्ट झालेले) इष्ट (दुर्योधनादिक इष्टमित्र) पद्म (कमळें होत. सूर्योदयीं कमळें विकसतात, हें कविसमयास अनुसरूनच आहे). १५. नक्षत्रें. १६. भित्रे.

१. सूर्यकांत. २. धर्मराज. ३. चंद्र. ४. सेनापति भीमधृष्टद्युम्नादि. ५. मित्र दुर्योधनादि. ६. येथें 'पद्म'शब्द अकारांत पुल्लिंगी आहे. म्हणूनच याचें अनेकवचन 'पद्म' असेंच ठेविलें आहे. 'पद्म'शब्द नेहमीं नपुंसकलिंगी असूनही क्वचित् पुल्लिंगी वापरला जातो. यास प्रमाणः- 'वा पुंसि पद्मम्' इत्यमरः. ७. अत्यंत संतुष्ट. ८. यांत पंतांनीं मूळांतील २५ व्या अध्यायांतील कथाभाग वर्णिला आहे. ९. धर्मराजाच्या बाजूनें युद्ध करणारा. धार्मिक म्हणजे धर्मशील. १०. तुझा पुत्र. ११. युयुत्सु हा धृतराष्ट्रास वैश्येच्या पोटीं झालेला मुलगा. हा लहानपणापासून दुर्योधनादिकांप्रमाणें दुष्ट नसून साधु होता. याच्या जन्मप्रकरणीं पंतांनीं म्हटलें आहे. 'सर्वांत साधु वैश्यानंदन, होईल हें पुढें प्रकट.' (आदिपर्व-अध्याय १८।२६). हा दुर्योधनादिकांबरोबर युद्धास आला होता खरा, पण युद्धास प्रारंभ होण्याच्या पूर्वी 'त्या दों कटकांत उभा धर्मात्मा धर्मराज राहोनी । उजवा बाहु उभारुनि उच्च वदे कौरवांसि पाहोनी ॥ न वरा असाधु नृप, कां पडतां राहुनि तया समीप दरीं ? । खलसंग त्यागुनि जो येइल, घेइन तयास मी पदरीं. ॥ भेटे युयुत्सु धर्मा, त्यजुनि ज्येष्ठा कृतानया भ्राता । जैसा साधु बिभीषण रघुकुलतिलका महादयाभ्रा त्या. ॥' (भीष्मपर्व-अध्याय १-१०६-१०८) १२. तव चमू=तुझी सेना; कौरवसेना.

[1]स्वविवेक [2]स्वकुमतिला जैसा, निजविक्रम स्वयें [3]कळवी. ॥ १
शकुनि [4]उलूक म्हणे त्या वीराला '[5]तिष्ठ, तिष्ठ', तों याणें, ।
शक्रें वज्रें गिरिसा, मर्मीं तत्काळ ताडिला बाणें. ॥ २
तोडुनि धनुष्य ताडी [6]कर्णिशरें शकुनि; तेधवां त्यातें, ।
विंधी युयुत्सु घेउनि चाप नवें [7]षष्टिमार्गणव्रातें. ॥ ३
सूतातें तीं बाणीं पीडुनि बहु, शरगणें पुन्हां [8]त्याला ।
हाणी, [9]न्हाणी त्याच्या रक्तें चि [10]रणक्रतूंत [11]न्हात्याला. ॥ ४
कोपें उलूक [12]विंशति बाणांहीं त्या युयुत्सुला ताडी, ।
छेदूनि [13]कांचनध्वज [14]कनकरथावरुनि भूमिवरि [15]पाडी. ॥ ५
हाणी स्तनांतरीं शर पांच शकुनिच्या [16]त्वदंगजनु [17]रागें; ।
[18]फुल्लपलाशवनीची होय सखी [19]शोणितार्द्र तनु [20]रागें. ॥ ६
छेदी उलूक [21]भल्लें सूताचें शिर, तुरंग ही मारी, ।
मर्मीं पांचां बाणीं हाणी, पीडी युयुत्सुला भारी. ॥ ७
अन्यरथावरि गेला [22]पुत्र तुझा होउनी पराभूत, ।
शकुनि हि पांचाळांवरि धांवे, तेव्हां गमे खरा भूत. ॥ ८
युद्ध शतानीकासीं, [23]श्रुतकर्मा तव तनूज, करि भारी; ।
सूतासह च्यारी ही अश्व निमेषांत [24]शत्रुचे मारी; ॥ ९

---

१. आपला विवेक, सदसद्विवेकबुद्धि. २. आपल्या दुष्ट बुद्धीला. मनुष्याचा विवेक जेव्हां जागा होतो–त्यास कर्तव्याकर्तव्यज्ञान प्राप्त होतें–तेव्हां त्याची दुष्टबुद्धि पार नाहींशी होते–असा भाव. ३. या गीतींतील 'धार्मिक त्वत्पुत्र' व 'स्वविवेक'; 'तव चमू' व 'स्वकुमति'; 'पळवी' व 'निजविक्रम कळवी.' यांत बिंबप्रतिबिंबभाव आहे म्हणून हा **दृष्टांता**लंकार. कारण **दृष्टांतां**त उपमान, उपमेय, व साधारणधर्म या सर्वांत बिंबप्रतिबिंबभाव असतो. ४. नामविशेष (**शकुनिपुत्र**). ५. थांब, थांब. ६. शरविशेषानें. कर्णी किंवा कर्णिक हा एक बाणविशेष आहे. ७. साठ बाणांच्या समुदायानें. ८. उलूकास. ९. स्नान घाली. १०. रणयज्ञांत. ११. स्नान करणारास. १२. वीस बाणांनीं. १३. सोन्याची पताका. १४. सोन्याच्या रथावरून. १५. ह्याचें कर्म–कांचनध्वज. १६. त्वत्+अंग+जनु=तुझा पुत्र **युयुत्सु**. १७. कोपानें. १८. फुललेल्या पळसाच्या अरण्याची. वनी=झाडी, राई. १९. रक्तानें भिजलेली तनु. २०. आरक्तपणानें. येथें **निदर्शना**लंकार आहे. २१. भाल्यानें. २२. **युयुत्सु**. २३. हा **धृतराष्ट्रा**च्या शंभर पुत्रांतील एक. २४. **शतानीका**चे.

वीर शतानीक गदा सोडी, मांत्रिक[1] जसी महाकृत्या[2]; ।
ती श्रुतकर्म्यावरि ये, दावी[3] अत्यंत दारुणा[4] कृत्या[5]. ॥ १०

सारथि-तुरग-रथांचें भस्म[6] करुनि, मेदिनीस[7] ही फोडी; ।
पूर्वींच उडी टाकी श्रुतकर्मा, म्हणुनि त्यास ती[8] सोडी. ॥ ११

होउनि विरथ[9] पहाती कोपें अन्योन्य मत्तवृषसम[10] ते, ।
युद्धांत भग्नदंत[11] द्विरदाधिपसे[12] चि जाहले गमते[13]. ॥ १२

संभ्रांत[14] श्रुतकर्मा जाय रथावरि विविंशुच्या पहिला[15], ।
जातां प्रतिविंध्यरथीं वीर शतानीक कांपवी महिला. ॥ १३

सौबल[16] शकुनि महाबल सुतसोमातें शरव्रजें[17] व्यापी; ।
सुतसोम हि शकुनीतें[18] दारुणशरपंजरांतरीं[19] स्थापी. ॥ १४

केला विरथ शकुनिनें, परि सुतसोम व्यथा न धरि पोटीं; ।
क्षितिवरुनि[20] हि विस्तारी[21] शरजाळें[22] सुबळनंदनीं[23] मोटीं. ॥ १५

सुतसोमाचे भाते चाप हि, सोडूनि[24] भल्ल बहु तूर्ण[25] ।

---

१. पंचाक्षरी. २. भयंकर भूतविशेष. हिला लोकांवर पाठवून मांत्रिक आपल्या शत्रूंचा नाश करितो, अशी समजूत आहे. ही समजूत पंतांच्या वेळी फार प्रचारांत होती असें दिसतें. या कृत्येचा उल्लेख पंतांनीं स्वकाव्यांत पुष्कळ ठिकाणीं केला आहे. ३. या चतुर्थ चरणाचा 'गदा' व महाकृत्या' या दोहोंशीं अन्वय लावितां येईल. ४. भयंकर. ५. कार्याला. ६. गदेनें रथादिकांचें चूर्ण झालें, असें वर्णन असावयास पाहिजे होतें. गदेनें भस्म कसें झालें? ७. पृथ्वीसही. ८. ती=शतानीकानें सोडिलेली गदा. ९. रथविहीन. १०. माजलेल्या पोळासारखे. ११. दांत तुटलेले. १२. गजश्रेष्ठाप्रमाणेंच. १३. द्विरदाधिपसे चि गमते (दिसते) जाहले–असा अन्वय. १४. चकित झालेला; भ्यालेला. १५. पहिला (प्रथम–शत्रूहून अगोदर–असा भाव) जाय–असा अन्वय. १६. सुबल नामक राजाचा मुलगा म्हणून शकुनीस सौबल हें नांव. १७. बाणसमूहानें. १८. शकुनि=(१) दुर्योधनाचा मामा. (२) एक प्रकारचा काळा पक्षी. हा शब्द प्रस्तुत स्थलीं दोन्ही अर्थीं योजून पंतांनीं श्लेष साधला आहे. या श्लेषास पुढील 'शरपंजरांतरी' हें रूपक पोषक आहे. १९. उग्र शररूप पिंजऱ्यांत. २०. पृथ्वीवरूनच. २१. विस्तृत करी; पसरी. पुढें शरावर 'जाळ्या'चा आरोप केला आहे. म्हणून 'विस्तारी' ह्या क्रियेचा प्रयोग. २२. बाणांचीं जाळीं. जाल (नपुंसकलिंग)=जाळें; जालें=जाळें=जाळीं. २३. सुबळाचा नंदन–शकुनि त्याच्या ठायीं. २४. भल्ल सोडून=भाल्यांनीं मारून, भाल्यांचा प्रयोग करून. २५. शीघ्र.

श्यालें[1] तुझ्या नृपाळा ! केलें युद्धोपकरण[2] तें चूर्ण. ॥ १६
तेव्हां सुतसोमानें खड्ग, स्वीकारिला, नभःश्याम[3], ।
तेणें चि सौबळाचा केला शतचूर्ण सायकग्राम[4]. ॥ १७

मग तो हि खंडिला[5] असि[6] राया ! त्वच्छ्यालकें[7] कृतस्पर्धें[8], ।
परि तोडिलें शकुनिचें, सुतसोमें, सगुणचाप[9], त्यां अर्धें[10]. ॥ १८
सा[11] पाउलें[12] उडोनि[12] स्वकरींचें खड्गखंड[13] ही बापा[14] ! ।
कोपें झुगारिलें, तें तोडी तत्काळ शकुनिच्या चापा. ॥ १९
श्रुतकीर्तिच्या रथावरि गेला सुतसोम, सौबल हि राया ! ।
त्या धर्मव्यूहावरि[15] जाय, ज्वरसा[16] चि तद्बळ[17] हिराया. ॥ २०

---

## अध्याय[18] सोळावा.

धृष्टद्युम्नातें कृप वारी[19], जैसा हरीस[20] शरभ[21] वैनीं[22], ।

---

१. तुझ्या श्यालें=तुझ्या साळ्यानें; शकुनीनें. गांधारीचा भाऊ म्हणून शकुनि धृतराष्ट्राचा साळा (श्यालक). २. युद्ध करण्यास आवश्यक अशी सामुग्री. ३. आकाशासारखा श्यामवर्ण असा. ४. बाणसमूह. समासोत्तरपदीं असतांनाच 'ग्राम'शब्दाचा 'समूह' असा अर्थ होतो. इतरत्र होत नाहीं. उदाहरणार्थः-शब्दग्राम=शब्दसमूह; गुणग्राम=गुणसमूह इ०. ५. तोडिला. ६. खड्ग. ७. त्वत्+श्यालकें=तुझ्या मेव्हण्यानें. ८. केली आहे स्पर्धा ज्यानें असा. प्रतिस्पर्धे-मुळें संक्षुब्ध—असा भाव. ९. धनुष्य व त्याची दोरी. १०. 'त्या अर्धें' म्हणजे अर्ध्या तुटलेल्या खड्गानें. याच्या हातांतील खड्ग शकुनीनें अर्धाच तोडिला असें यावरून दिसतें. ११. सहा. १२. सहा पाऊलें लांब. उडी मारून. १३. तो तलवारीचा तुकडाही. १४. हें साश्चर्यभीति-द्योतक संबोधन. १५. धर्मराजाच्या सैन्यबंधावर. १६. तापाप्रमाणें. मनुष्यास बलहीन करण्याविषयीं इतर रोगांपेक्षां ज्वराची विशेष ख्याती आहे. एका दिवसाचा ताप सहा महिन्यांची शक्ति हरण करितो, असें म्हणतात. १७. धर्माचें सैन्य, (पक्षीं) शक्ति. १८. यांत मुळांतील २६ व्या अध्यायांतील कथाभाग आलेला आहे. १९. अडवी, प्रतिबंध करी. २०. सिंहास. २१. एक काल्पनिक प्राणिविशेष. हत्तीचा जसा सिंह वैरी, तसा सिंहाचा हा वैरी आहे, असें समजतात. नृसिंहावतारीं विष्णूचा वध करण्यास शिवानें शरभावतार घेतला होता, असें शैवपुराणांत लिहिलें आहे. शरभ आठ पायांचा पक्षी आहे, असें कित्येकांचें म्हणणें आहे. कित्येक कोशांत हा सिंहाप्रमाणेंच एक चतुष्पाद प्राणी आहे, पण यास डोळे डोक्यावर असतात व म्हणून त्यास 'ऊर्ध्वलोचन' असें नांव आहे, असें लिहिलें आहे. या वर्णनावरून हा काल्पनिक प्राणी असावा असें वाटतें. २२. या गीतींत **सप्ताक्षरी यमक** आहे.

पडतां चि गांठि, कोंडी त्या द्रोणाच्या अरीस[1] शर-भवनीं[2]. ॥ १
प्रेक्षक सुर-नर म्हणती, 'वीर कृपाचार्य या रणामाजी, ।
वधितो चि पार्षतातें, दिसतो अत्युग्र[3] काळसा आजी. ॥ २
हा जैसे शर सोडी लघुकर[4], याचा, असे न शर, भाचा[5]. ।
पार्षतसिंह न साहे विक्रम या गौतमोग्रशरभाचा[6].' ॥ ३
पांचाळ[7] कृपाचार्यें मर्मस्थानीं च विंधुनी खिळिला[8], ।
मोह[9]महाजगरानें पांडुसुतांचा चमूपती[10] गिळिला. ॥ ४
न दिसे गुण[11] शर, न चले कर, पोकळ[12] होय मुष्टि[13] इष्वसनीं[14], ।
धृष्टद्युम्न भ्रमला[15]; न सुचे कर्तव्य[16] लेश हि व्यसनीं[17]. ॥ ५
त्यातें तत्सूत म्हणे, 'आहे कीं क्षेम[18] पार्षता ! सांगें, ।
गौतमबाणगणानें सारीं हीं चुंबिलीं[19] तुझीं आंगें. ॥ ६
ऐसी तुझी अवस्था नाहीं म्यां पाहिली कधीं हि. रवी[20] ।

---

१. द्रोणाच्या अरीस म्हणजे अन्यायानें द्रोणास मारणाऱ्या धृष्टद्युम्नास—असा भाव. २. बाणांच्या गृहांत. ३. खवळलेल्या यमाप्रमाणें. ४. त्वरितहस्त, बाण सोडण्यांत ज्याचा हात चपळ आहे, असा. ५. याचा भाचा (अश्वत्थामा) असे शर न सोडी. ६. गौतमरूप उग्र शरभाचा. कृप हा गौतमपुत्र शरद्वानाचा मुलगा, म्हणून त्यास गौतम असें म्हटलें आहे. गौतमगोत्रोत्पन्न सर्व गौतम, पराशरगोत्रोत्पन्न सर्व पाराशर, भरद्वाजगोत्रोत्पन्न सर्व भारद्वाज इ० असें समजावें. ७. पांचाळ, पार्षत व धृष्टद्युम्न हे सर्व समानार्थक शब्द आहेत. तोच तोच शब्द पुन्हां येऊं नये म्हणून कविजन पर्यायशब्द योजीत असतात. ८. जखडून टाकिला. ९. मोह (कर्तव्यबुद्धिनाश)रूप मोठ्या अजगरानें. १०. सेनाधिपति धृष्टद्युम्न. पांडवांच्या नऊ अक्षौहिणींचा अधिपति धृष्टद्युम्नच होता. तेव्हां त्याची त्रेधा उडाली म्हणजे पांडवांच्या पक्षाची बरीच त्रेधा उडाली—असा भाव 'चमूपति' शब्दानें सुचविला आहे. ११. धनुष्याची दोरी. १२. पोकळ होय=दृढ धरितां येईना. १३. मूठ. एका हाताच्या मुठींत धनुष्य धरितात, ती. १४. बाणप्रयोग करण्यांत, बाण सोडण्यांत. इषु+असन=इष्वसन=धनुष्य. इषु=बाण; असन=सोडणें, टाकणें. १५. गांगरला; कर्तव्यज्ञानहीन झाला. १६. आतां पुढें काय करावयाचें हें. १७. असल्या संकटस्थितींत. या गीतींत स्वभावोक्तीनें पंतांनीं धृष्टद्युम्नाची उडालेली त्रेधा वर्णिलेली आहे. सुंदर स्वभावोक्ति शंभर अलंकारांपेक्षां अधिक शोभते. १८. कुशळ. निर्भयपणें युद्ध करण्यास सामर्थ्य—असा भाव. १९. जखमी झालीं. चुम्ब्=हिंसा करणें. २०. रवि तिमिरीं भ्रमला हा असंभवालंकार होय; कारण येथें, रवि तिमिरीं भ्रमणें, या असंभाव्य अर्थाची प्राप्ती झाली, असें वर्णन आहे. याचें अन्य उदाहरणः—

तिमिरीं भ्रमला ! हा ! हा ! झाली मुखकांति पीवळी[1] हिरवी. ॥ ७
रक्षाया प्राण तुझे पळवीन[2] पळांत; दे मला आज्ञा. ।
हा निष्कृप[3] कृप दिसतो सर्वावध्य[4]; सरें हित प्राज्ञा[5] !' ॥ ८
धृष्टद्युम्न म्हणे, 'रे ! भ्रमतें मन, पावली हि तनु कंपा, ।
ने विजयापाशीं कीं भीमापाशीं करूनि अनुकंपा[6]. ॥ ९
आतां भस्म करील स्पष्ट कृपाकारकृष्णपथ[7] हा कीं, ।
याच्या दृष्टिपुढें मज तग[8] न निघे. पुंससि[9] काय ? रथ हाकीं.' ॥ १०
आज्ञा घेउनि सूतें भीमाच्या आश्रयासि रथ नेला.
पळतां पांचाळ, कृपें मागें लागोनि शंखरव[10] केला. ॥ ११
युद्ध शिखंडीसह करि कृतवर्मा[11] तें हि सांगतों आतां. ।
परिसावें सादर मन करुनि भरतवंशभूषणा[12] ! बा ! तां[13]. ॥ १२
शर पांच जत्रुदेशीं[14] सर्पासम झोंबतां चि कृतवर्मा, ।

---

'गज गोष्पदीं बुडाला ! हा दैवा ! सिंधु शोषिला मशकें ! । न शकें सोसाया हें, वधिला तें केसरी कसा शशकें ! ॥' (पंतकृत द्रोणपर्व, अध्याय १।२३).

१. अत्यंत तेजोहीन. यांत **लोकोक्ति** अलंकार आहे. कारण लोकापवादाचें अनुकरण केलें आहे. तेजोहीन मुखकांति 'खरोखर हिरवी पिवळी' होते असा प्रकार नव्हे, तर लोकांत असें म्हणण्याची चाल आहे, म्हणून हा शब्दप्रयोग केला एवढेंच. सुरेख लोकोक्तीचें योग्य वेळीं अनुकरण करून काव्यास खमंगपणा आणण्यांत पंत चतुर आहेत, हें त्यांच्या काव्यांतील विपुल लोकोक्तींवरून स्पष्ट होत आहे. २. तुला (धृष्टद्युम्नाला) पळवीन. ३. कृपारहित, निर्दय. ४. सर्वांना अवध्य. ५. प्राज्ञा ! (शहाण्या धृष्टद्युम्ना !) हित (स्वहित) सरें (स्मर). म्हणजे-आपल्या हिताची काळजी बाळग. सांप्रत पळून जाणें तुला हितप्रत आहे हें लक्षांत आण-असा भाव. ६. कृपा. ७. कृपाचार्यरूपी अग्नि. कृष्णपथ=अग्नि. कृष्ण (काळा) आहे पथ (रस्ता) ज्याचा तो कृष्णपथ. अग्नि जेथून जेथून जातो, तेथें तेथें जाळून जागा काळी करून जातो म्हणून त्यास 'कृष्णपथ' हें नांव. ८. टिकाव. ९. विचारतोस कशाला ?-असा भाव. १०. शंखनाद. शंख करणें म्हणजे स्वविजय कळवून शत्रूस हिणविणेंच होय. ११. दुर्योधनाकडील प्रख्यात यादववीर. १२. भरतकुलास शोभविणाऱ्या राजा धृतराष्ट्रा ! १३. त्वां. येथें यमकाकरितां 'त्वां'बद्दल 'तां' हें अक्षर लिहिलें आहे. 'त्वां'बद्दल 'तां' लिहिल्याचीं पंतांच्या काव्यांत पुष्कळ उदाहरणें आहेत. यावरून पंतांच्या वेळीं 'त्वां'चा उच्चार 'तां' सारखा लोक करीत असत, असें वाटतें. त्याशिवाय केवळ यमकासाठीं, भाषा परिशुद्ध ठेवण्याविषयीं काळजी घेणाऱ्या पंतांसारख्या कवीनें जबरदस्तीनेंच 'त्वां' च्या ठिकाणीं 'तां' लिहिला असेल, असें वाटत नाहीं. (अध्याय ३६।६, ४१।८ व ४२।४१ पहा). १४. कंठाच्या जवळच्या प्रदेशांत

षष्टि[1] शरांहीं विंधुनि खंडी पांचाळचाप, कृतकर्मा[2]. ॥ १३
त्यासि शिखंडी ताडी नवति[3] शरांहीं, धनुष्य ही तोडी; ।
पुनरपि अशीति[4] बाणीं सुदृढ हि कवच क्षणामधें फोडी. ॥ १४
डसले[5] शर-अहि[6] मर्मीं, सर्वांगें रक्तपूर तो वमला[7], ।
श्रमला[8] कृतवर्मा बहु; समरीं पुष्पितपलाशसा[9] गमला. ॥ १५
मग हार्दिक्य[10] दृढ दुजें, धनु सज्य करूनि, तीव्र शर सोडी; ।
ते द्रुपदसुतस्कंधीं[11] रक्ताची घेति आदरें[12] गोडी. ॥ १६
ते दिसति गैरिकारुण[13], वर्षाकाळीं[14] जसे महाशैल[15]; ।
अन्योन्यातें भेदिति शस्त्रीं[16], शृंगीं[17] जसे हठी[18] बैल. ॥ १७
गरुड जसा भुजगीतें[19], भोजाची[20] बाणवृष्टि तशि खंडी[21], ।
न शिखंडी[22] भी, तांडव[23] करि, जेंवि घनीं[24] प्रमोदित[25] शिखंडी[26]. ॥ १८
मग त्या भोजें केला, सोडुनि तीव्रेषु[27], मूर्च्छित शिखंडी, ।
जैसा[28] मेघें विद्युत्पातें[29] वृष्टिप्रमोदित[30] शिखंडी. ॥ १९

---

१. साठ बाणांनीं. २. केला आहे पराक्रम ज्यानें असा. 'धृतवर्मा' (=ज्यानें धारण केलें आहे कवच असा)—असें पाठांतर. ३. नव्वद शरांनीं. ४. ऐशीं बाणांनीं. ५. चावले. ६. बाणरूपी सर्प. ७. ओकला. ८. थकला. 'भ्रमला' असा पाठभेद. ९. फुललेल्या पळसाप्रमाणें. ही संस्कृतकवींची व प्राकृतकवींची अत्यंत आवडती उपमा आहे. युद्धप्रकरणांत पंतांनीं हिचा वीस पंचवीस वेळां तरी उपयोग केला असेल. १०. कृतवर्मा. ११. द्रुपदाचा मुलगा जो शिखंडी त्याच्या खांद्यांत (घुसून). १२. मोठ्या उत्सुकतेनें—असा भाव. १३. गैरिक+अरुण=कावेप्रमाणें लाल. गैरिकारुण हें पद ते व महाशैल या दोहोंसही देहलीदीपन्यायानें लागतें. शैलपक्षीं पावसाळ्यामध्यें वरची माती धुपून गेल्यामुळें आंतल्या कावेच्या थरांनीं लाल दिसणारे पर्वत. १४. पर्जन्यकाळीं. १५. मोठे पर्वत. १६. शस्त्रांनीं. १७. शिंगांनीं. १८. हट्टी. हट्टी बैलांचें झुंज प्रख्यातच आहे. १९. सर्पिणीला. २०. भोजकुलोत्पन्न कृतवर्म्याची. यादवांच्या एका कुळास भोज ही संज्ञा आहे. तत्कुलोत्पन्न म्हणून कृतवर्मा भोज. २१. यास कर्ता 'शिखंडी.' २२. द्रुपदपुत्र. २३. नृत्य. २४. मेघांनीं. २५. आनंदित. २६. मयूर. २७. तीक्ष्ण बाण. २८. ही उपमा अत्यंत योग्य आहे. द्रुपदपुत्र हा भोजाच्या बाणवृष्टीमुळें संतुष्ट होता, व भोजानेंच बाण सोडून त्यास मूर्च्छित केलें. मयूर मेघांमुळेंच संतुष्ट असतो, पण त्यास मेघानेंच विद्युत् पाडून मारावें, त्याप्रमाणें हें झालें. येथें मेघ, विद्युत्पात व जलवृष्टी यांशीं अनुक्रमें भोज, तीव्रेषु आणि शरवृष्टी यांचें साम्य दाखविल्यामुळें ही पूर्णोपमा झाली आहे. २९. विजेच्या पाडण्यानें. ३०. पावसानें संतुष्ट.

सूतें तो ही [1]धृष्टद्युम्न तसा पळवितां, [2]संपदि सेना ।
भंगे पांडुसुतांची, जीला त्या संकटीं [3]स्वप दिसेना. ॥ २०

---

## [4]अध्याय सतरावा.

[5]अर्जुनशरगणमारुत तव [6]बळघनतूळराशिला विखरी, ।
[7]पळवि परि न बहु गज वधि, [8]हरि, त्याला विजय लाज लावि खरी. १
संशप्तक, [9]नारायणबळ, शाल्व, शिबि, त्रिगर्त, कौरव ही, ।
धांवति धनंजयावरि; तेव्हां पावे उदंड कंप [10]मही. ॥ २
नृप सत्यसेन धांवे, दुसरा जो चंद्रदेव जयशाली. ।
तैसा चि मित्रदेव हि पार्थावरि धांव [11]आग्रहें घाली. ॥ ३
वीर रिपुंजय, सौश्रुति दृढधन्वा, चित्रसेन अभिमानी, ।
जयलुब्ध चित्रवर्मा, पार्थासीं गांठि बहु बरी मानी. ॥ ४
धांवे त्रिगर्तराज [12]आत्यांपुत्रांसमेत जिष्णुवरी, ।
त्यां सर्वां [14]स्वीकारी अर्जुन, [13]असुरांसि जेंवि विष्णु वैरी.' ॥ ५
ते [15]एकदा चि वर्षति शस्त्रांचे निकर, जेंवि घन पाणी. ।

---

१. धृष्टद्युम्नाप्रमाणेंच. ज्याप्रमाणें धृष्टद्युम्नास सूतानें पळविलें त्याप्रमाणें. २. तात्काळ. ३. आपला त्राता, स्वरक्षक. ४. यांत मूळांतील २७ व्या व २८ व्या अध्यायांतील कथाभाग आला आहे. ५. अर्जुनाचा शरसमुदायरूपी वायू. ६. तुझें सैन्य हीच घन (दाट) कापसाची राशी, तिला. ७. अन्वयार्थः—हरि बहु गज पळवि, परि न वधि. विजय त्याला खरी लाजलावि. म्हणजे–सिंह पुष्कळ हत्तींना भयानें पळवितो, पण त्याला एकदम पुष्कळ हत्ती मारितां येत नाहींत. अर्जुनानें हत्तीसारखे अनेक वीर एकदम मारिल्यामुळें त्यानें सिंहावर ताण केली, असा भाव. ८. सिंह. व्यतिरेकालंकार. ९. कृष्णानें कौरवांस दिलेलें एक यादवसैन्य. १०. पृथ्वी. ११. मोठ्या रोषानें, हट्टानें. १२. बंधु आणि पुत्र यांसह. सत्यसेन, मित्रसेन, सुशर्मा हे त्रिवर्ग त्रिगर्तराजाचे बंधुपुत्र होत. १३. दैत्यगुरु शुक्राचार्यांनें कोणीही सुरा पिऊं नये म्हणून नियम केल्यापासून दैत्यांनीं सुरा सोडून दिली, म्हणून त्यांस असुर हें नांव पडलें, असें कित्येकांचें म्हणणें आहे. १४. युद्ध करण्यास स्वीकारी. असंख्य असुर एकदम विष्णूवर येऊन पडत असत, व त्या सर्वांचा विष्णु चांगला समाचार घेत असे. तसेच अर्जुनावरही एकदम संशप्तकादि वीर येऊन पडले, म्हणून उपमेची पूर्णता. १५. एकदम. कोणकोणत्या राजानें किती बाण मारिले याचा तपशील असाः—सत्यसेनानें तीन सायक, मित्रदेवानें साठ मार्गण, चंद्रदेवानें तीन बाण, मित्रवर्म्यानें सात शर, संपातीनें ऱ्याहत्तर कंकपत्र, श्रुतंजयानें पांच विशिख, सुवर्म्यानें वीस कांड, इत्यादि.

साहे [1]नगसा, [2]ओपी [3]धनपतिसा बाण [4]बाणधनपाणी. ॥ ६
शत्रुंजयासि मारुनि, सौश्रुतिच्या तोडुनी शिरःपद्मा, ।
पार्थे गौरवुनि [5]शिरीं पाठविला चंद्रदेव [6]यमसद्मा. ॥ ७
पांचां पांचां बाणीं विंधी इतरांसि, त्या [7]गर्वितें ।
दावी प्रताप मोटा पृथिवीपति सत्यसेन सर्वांतें. ॥ ८
कीं तो तोमर सोडी, तेणें [8]भुजगेंद्रभोगनिभ भव्य, ।
श्रीकृष्णाचा, राया ! त्या समरीं [9]भेदिला चि, भुज [10]सव्य. ॥ ९
गळला [11]प्रतोद हस्तापासुनि, [12]ते [13]अश्वरश्मि हि गळाले. ।
[14]देवी-देव म्हणति, 'हा !' तैं [15]सिद्धांचे [16]स्वधीर हि पळाले. ॥ १०
तें पाहतां चि पार्थ प्रभुहूनि उदंड [17]पापताप धरी. ।
देवासि म्हणे, 'सखया ! ने रथ जेथें चि सत्यसेन अरी. ॥ ११
लीलेनें चि उडवितों मस्तक रिपुचें पळांत कंसारे ! ।
कौतुक पहा. [18]सहा. [19]भुजरुधिरें भरलासि [20]सुरवतंसा रे !' ॥ १२
कृष्णें तैसे चि पुन्हां धरितां [21]रश्मिप्रतोद [22]मोदानें, ।
हय चालवितां, पार्थे केली शरवृष्टि जसि [23]पयोदानें. ॥ १३

---

१. पर्वताप्रमाणें. २. अर्पण करी. ३. कुबेराप्रमाणें. ४. बाणरूपी द्रव्य ज्याच्या हस्तांत आहे असा अर्जुन. ५. शिरीं गौरवुनि=शिर उडवून. येथें 'शरीं' असा पाठ बरा दिसतो. ६. यमपुरास. ७. गर्विष्ठांना. ८. मोठ्या सर्पाच्या अंगाप्रमाणें लांब व पुष्ट. हें पुढील चरणांतील 'भुज' याचें विशेषण. भोग=सर्पाचें शरीर, फडा. ९. विदारण केला, जखमी केला. १०. उजवा. ११. चाबूक. १२. 'तैं' असा पाठ असता, तर तो बरा दिसला असता. १३. घोड्यांचे लगाम देखील. १४. आकाशांतील सुरांच्या भार्या व सुर. १५. सिद्ध=विद्याधर, गंधर्व इत्यादिकांबरोबर असणारा असा उपदेवविशेष. (याचें वसतिस्थान पृथ्वी आणि सूर्य यांच्या मध्यभागीं आहे). सिद्धांच्या अंगीं स्वभावतःच असणारा धीर पळाला (सुटला), तेव्हां इतर प्रेक्षकांचा धीर सुटलाच असला पाहिजे—असा भाव. १६. त्यांच्या अंगीं स्वभावतःच असणारे धीर; त्यांचें धैर्य. १७. पापिष्ठाविषयीं संताप. १८. थोडा वेळपर्यंत हें दुःख सहन कर, म्हणजे तुला त्रास देणाऱ्याची खोड मोडतों—असा भाव. १९. हातांतून निघालेल्या रक्तानें. २०. सुरभूषणा. येथें 'सुरावतंस' (=सुर+अवतंस)—असा शब्द असणें इष्ट होतें. अवतंस=शिरोभूषण. २१. लगाम व चाबूक. २२. हर्षानें. २३. मेघानें.

[1]अतिदारुणभल्लशरें त्या समरीं पार्थ, दि[2]व्यरूपाचें, ।
खंडी, कुं[3]डलमुकुटालंकृत शिर सत्यसेनभूपाचें. ॥ १४
तैसें चि [4]वत्सदंतें [5]आक्षेपुनि चित्रसेनरायाला, ।
अर्जुन शरवृष्टि करी [6]सहसा संशप्तकां मराया[7]ला. ॥ १५

मग मि[8]त्रसेन वधिला; भूप सु[9]शर्माहि जो [10]परम शत्रु ।
तो ही पार्थे केला, बाणगणें त्या रणीं, [11]व्यथितजत्रु. ॥ १६
वेढिति संशप्तक या पांडुसुता, सिंह जेंवि शरभा, ते ।
[12]करिति, [13]वदान्य जसे निज [14]कोष, तसे क्षीण सर्व शर-[15]भाते. ॥ १७
योजी [16]ऐंद्रास्त्र विजय, तें अमित [17]क्षुधित तापले शर [18]वी. ।
[19]नभ हि भरे बाणघनीं, [20]न करी सैन्यासि ताप लेश रवी. ॥ १८
त्या [21]बाणव्याघ्रांहीं संशप्तकहरिण मारिले [22]प्राज्य. ।
बहु पेटला [23]धनंजय, वरि पडतां शत्रुसैन्य तें [24]आज्य. ॥ १९
राजा धर्म महात्मा मर्दी कुरुसैन्य. त्यासि वाराया ।
ये दुर्योधन, जैसा[25] अंध[26]क रोधावया शिवा[27]; राया ! ॥ २०

---

१. अत्यंत तीक्ष्ण अशा भल्ल (चंद्राकृति) बाणानें. २. अत्यंत सुंदर स्वरूप ज्याचें अशा. ('सत्यसेनभूपाचें' याचें विशेषण.) ३. दोन्ही कानांतील कुंडलांनीं व डोक्यावरील किरीटानें सुशोभित. ४. बाणानें. ५. ताडण करून, प्रहार करून. आक्षेप=निंदा, वाक्ताडण, शब्दानें ताडण करणें. येथें शस्त्रानें भेद करणें. ६. एकाएकीं. ७. संशप्तक मरावे, ह्या हेतूनें. ८. 'चित्र-सेन' असें पाठांतर. ९. सुशर्मा+अहि=सर्पासारखा सुशर्मा. १०. मोठा. ११. पीडित आहे जत्रु (मस्तक आणि खांदा यांचा संधि) ज्याचा असा. १२. जसे वदान्य निज कोष क्षीण (दान-धर्मात सर्व पैसा खर्च) करिति, [तसे ते संशप्तक] सर्व शरभाते [क्षीण करिति]–असा अन्वय. १३. दाते. १४. धनभांडार. १५. शरांनीं (बाणांनीं) भरलेले भाते. हा शर+भाते–समास संकरज (संस्कृत व मराठी शब्दांचा) आहे. १६. इंद्राचें अस्त्र. १७. भुकेलेले. वीरांस खाण्यास–मारण्यास–तत्पर असे. १८. प्रसवे, उत्पन्न करी. १९. आकाश देखील. 'न भातीति नभः'. जें दिसत नाहीं, किंवा ज्याला स्वरूप नाहीं तें नभ. २०. त्या बाणरूपी मेघांमुळें सूर्याचे किरण सैन्यावर मुळींच पडत नसत–असा भाव. २१. बाणरूपी वाघांनीं. २२. पुष्कळ. २३. 'धनं-जय' शब्दाचे दोन अर्थ आहेत. (१) अर्जुन. (२) अग्नि. प्रस्तुत स्थलीं दोन्ही अर्थ घेऊन श्लेष साधावयाचा. २४. तूप. २५. या उपमेनेंच पुढें कोण पराजित होणार हें सुचविलें आहे. २६. अंधकासुर. २७. शंकरास.

ताडी प्रथम युधिष्ठिर, त्यासि[1] सुयोधन हि मग नवां बाणीं, ।
भल्लें मर्मस्थानीं धर्माच्या सारथ्यास ही हाणी. ॥ २१
हय[2]-सूतशिर-ध्वज-धनु-खड्गातें[2] सायकाष्टकें[3] खंडी[4], ।
पांचांहीं[5] तव[6] तनया[6] दंडी श्रीधर्म मुख्य कोदंडी[7]. ॥ २२
त्यजुनि हताश्वरथातें[8] दुर्योधन उतरला महीवरि. तें ।
व्यसन[9] विलोकुनि धांवति कर्ण, कृप, द्रौणि; वारिती[10] अरितें[11]. ॥ २३
दुर्योधनासि कौरव, पांडव धर्मासि, रक्षिती सुचिर[12]. ।
तैं द्वंद्वयुद्ध झालें कुरुपांचाळांत भारता! रुचिर[13]. ॥ २४
झालें युद्ध तुमुळ त्या कौरवपांचाळसैनिकांआंत[14], ।
केशीं[15] धरूनि[16] च्छेदिति शिर, चाविति वीर करकरां दांत. ॥ २५
भट मुष्टिनें[17] चि ताडिति, हाणिति रागें उरावरी लत्ता[18], ।
झाल्या शोणितगंधें[19] कौरवपांडवचमू[20] महोन्मत्ता[21]. ॥ २६
वधिति स्वपरांस[22] हि ते, उठले समरीं कबंध[23] ही शतशा[24]. ।
रक्तनदी ही वाहति[25]. जन-नाशा हेतु तूं महीश[26]! तशा. ॥ २७

---

१. युधिष्ठिरास. २. दुर्योधनाच्या रथाचे (चार) हय वगैरे आठांस. ३. आठ बाणांनीं. ४. याचा कर्ता पुढील वाक्यांतील श्रीधर्म. ५. पांच बाणांनीं. 'चापांहीं' असें पाठांतर. ६. तुझा मुलगा दुर्योधन, त्यास. ७. धनुर्धारी. ८. मारिले आहेत घोडे ज्याचे त्या रथाला. ९. संकट. १०. निवारिती; दूर करिती. ११. शत्रूस; धर्मराजास. १२. फार काळपर्यंत. १३. पाहणाऱ्यांस व ऐकणाऱ्यांस रम्य. १४. कौरवसैनिक=दुर्योधनाचे सैनिक; पांचाळसैनिक=धृष्टद्युम्नाचे सैनिक (धर्मास रक्षण्यास आलेले). १५. या पुढच्या वर्णनांत **बीभत्सरस** आहे. वीररसानंतरचा बीभत्सरस मागच्या वीररसास पुष्टिदायक होतो. १६. शेंडी हातांत धरून डोकें उडविती. रक्तगंधानें उन्मत्त झाल्याचीं हीं लक्षणें आहेत. १७. बुक्यांनीं. १८. लाथ. १९. रक्ताच्या दुर्गंधानें. शोणितगंध वीरांच्या उन्मत्तपणास वाढविता झाला—असा भाव. २०. सैन्यें. २१. अत्यंत उन्मत्त झालेल्या, ज्यांच्या अंगीं वीरश्रीचा संचार झाला आहे अशा. २२. आपल्याकडच्या वीरांस व शत्रूकडच्या वीरांसही. उन्मत्तावस्थेंत हा आपला, हा परका, असा भेद न समजल्यामुळें जो दिसला त्यास मारीत असत—असा भाव. यांत **रौद्ररसाची**ही झांक आहे. २३. शिरांवांचून देह, ते मुर्दां, (वीरांचीं) धडें. २४. शेंकडों; असंख्य. २५. वाहति=वाहती=वाहते. (अध्याय १२।२२ मध्यें असाच प्रयोग आढळतो.) २६. अन्वय व अर्थः—हे महीश (हे

## अध्याय[1] अठरावा.

(धर्मदुर्योधनयुद्ध.)

धृतराष्ट्र म्हणे, 'सूता ! झाले कौरव्य[2] मृत्युचा वांटा. ।
वृत्तश्रवणें आला सर्वांगीं आमुच्या पहा कांटा[3]. ॥ १
केला विरथ सुयोधन, त्याची गति काय ? सांग तें आधीं. ।
पाशीं[4] व्याघ्र शिरकतां[5] तन्नाशीं[6] करुणता[7] नुठे[8] व्याधीं[9].' ॥ २
संजय म्हणेः—सुयोधन, गिरिवरि हरिसा[10], रथांतरीं[11] चढला; ।
मान[12] स्नेह[13], कटाह[14] चि तो, परिभवकोपपावकें[15] कढला. ॥ ३
सूतासि म्हणे, 'रे रे ! मारावा आजि म्यां अरी हा, कीं ।
शीघ्र मरावें. घालीं धर्मासीं गांठि. हूं. हरी[16] हाकीं.' ॥ ४

---

राजा धृतराष्ट्रा !) तशा (तशा प्रकारच्या; वर वर्णिलेल्या भयंकर प्रकारच्या) जननाशा (लोकांच्या नाशास; जनसंहारास) हेतु (कारण) तूं (तूंच आहेस). संजय धृतराष्ट्रास टोंचून बोलतो, कीं कौरवपांडवांच्या युद्धांत जो एकंदर जननाश झाला, त्याच्या मुळाशीं तूंच आहेस. कारण पांडवांचा भाग पांडवांस देऊन युद्ध टाळण्याचें तुझ्या हातांत असतां, तसें तूं केलें नाहींस—असा भाव. येथील टोमण्यास मुळांत आधार नाहीं.

१. यांत मुळांतील २९ वा अध्याय आला आहे. २. कौरव सैनिक. ३. आंगीं कांटा येणें=दुःखानें किंवा भयानें शरीर रोमांचित होणें. ४. हें अर्ध सुभाषितरूप आहे. व्याघ्र पाशीं (जाळ्यांत) शिरकतां, तन्नाशीं (त्या व्याघ्राच्या नाशाविषयीं) व्याधीं (पारध्याचे ठायीं—त्याच्या मनांत) करुणता (दया) नुठे (न उठे; उत्पन्न होत नाहीं). प्रस्तुत स्थळीं 'व्याघ्र' पदानें दुर्योधन व व्याधपदानें धर्म सुचविले आहेत. हा **अप्रस्तुतप्रशंसा** किंवा **अन्योक्ति**नामक अलंकार आहे. कारण या अप्रस्तुत उदाहरणानें, दुर्योधन हातीं सांपडला असतां धर्म त्यास सोडणार नाहीं, असा प्रस्तुत अर्थ सुचविला आहे. ५. शिरकणें=प्रयासानें प्रवेश करून घेणें; शिरणें= अनायासें प्रवेश करणें. येथें 'शिरतां' असें पंतांनीं कां म्हटलें नाहीं बरें ? ६. तत्+नाश=त्या व्याघ्राचा नाश, तो करितांना. ७. दया, माया. ८. न+उठे=उत्पन्न होत नाहीं. ९. पारध्याचे ठायीं. १०. सिंहाप्रमाणें; सिंह जसा पर्वतावर चढतो, तसा. ११. अन्य रथावर, दुसऱ्या रथावर. १२. स्वाभिमान, दुर्योधनाचा अहंभाव. १३. तेल. दुर्योधनाचा स्वाभिमानच (दुराभिमानच) तेल. १४. कढई. तो (दुर्योधन) कढईच. 'मानस्नेहकटाहचि तो' असा ही पाठ आहे. तेव्हां तो (दुर्योधन) मानरूप स्नेहास (तेलास) कटाह (कढई)रूप असा—असा अर्थ करावा. कढईंत ज्याप्रमाणें तेल असतें, त्याप्रमाणें याच्या ठिकाणीं अभिमान भरलेला होता—असा भाव. १५. परिभवानें (धर्माच्या हातून झालेल्या पराभवानें) उत्पन्न झालेला जो कोप, तोच पावक (अग्नि), त्यानें. हें **परंपरितरूपक** होय. १६. घोडे.

प्रेषी सारथि वेगें रथ धर्माभिमुख[१] जेधवां नीट, ।
प्रेरी त्यावरि निजरथ धर्माचा सूत ही महाधीट. ॥ ५
शरवृष्टि करिति, भरिति[२] क्षणमात्रें विष्णुचें[३] पद भ्राते[४]. ।
केवळ त्यांसि न, रविस हि झांकी, शरघनघटा[५] अदभ्रा[६] ते[७]. ॥ ६
दुर्योधन धर्माच्या धनुला युद्धांत जेधवां खंडी, ।
क्षोभे त्यावरि पांडवनृपमति[८], महिषासुरीं जसी चंडी[९]. ॥ ७
धर्म दुजें धनु घेउनि तव पुत्राचें धनु ध्वज हि खंडी. ।
कुरुसेना बहु कांपे, पडतां शरवृष्टि, फार जंसि[१०] थंडी. ॥ ८
तेव्हां दुर्योधननृप सज्य करुनि घे धनुर्लता[११] दुसरी; ।
तींतुनि शरपंक्ति निघति, शरयू[१२]-आंतुनि जशा महा सुसरी[१३]. ॥ ९
पीडिति अन्योन्यांतें प्राण हरायासि पाहती संवड[१४]. ।
लाजति[१५] पंकफळनिचित[१६], त्यांच्या क्षतशतयुताकृतींस[१७], वेंड[१८]. ॥ १०

---

१. धर्म+अभिमुख=धर्मासमोर. २. शरांनीं गच्च भरून टाकिती—असा भाव. ३. **विष्णूचें** पद=आकाश. वामनावतारीं विष्णूनें एका पायानें आकाश व्यापून टाकिल्यामुळें तेव्हांपासून आकाशास 'विष्णुपद' हें नांव पडलें. ४. बंधु. धर्म व दुर्योधन. ५. ते (ती) अदभ्रा शरघनघटा केवळ त्यांसि (धर्मदुर्योधनांसि व तत्सैनिकांसि) झांकी [असें] न; रविस हि (सूर्यास देखील) [झांकी]—असा अन्वय. शर—घन—घटा=शररूपी मेघांचा समुदाय. 'घटा'शब्द, स्त्रीलिंगी असून 'समूह' व 'हत्तींचा समूह' असा त्याचा अर्थ आहे. ६. बहुत, मोठी. दभ्र=सूक्ष्म, लहान. ७. ती, शरघनघटा. ८. उपमान व उपमेय यांच्या लिंगांत होईल तोंपर्यंत साम्य असावें, असा आलंकारिकांचा नियम आहे. त्यास अनुसरून पंतांनीं 'चंडी' या उपमानाचें स्त्रीलिंगी रूप असल्यामुळें 'पांडवनृप' या पुल्लिंगी शब्दास 'मति' जोडून उपमेयही स्त्रीलिंगी केलें आहे. यावरून कवीचें अलंकारज्ञान व्यक्त होत आहे. ९. हें दुर्गेचें एक स्वरूप. येथें महिषासुरमर्दिनी—असा अर्थ घ्यावयाचा. १०. जसि थंडी पडतां कांपे तशी इ०—असा अन्वय. ११. धनुष्यरूप वेल. लता अथवा वल्ली हें पद भ्रू, विद्युत्, भुज, खड्ग, व चाप ह्या शब्दांशीं अथवा तशा अर्थाच्या दुसऱ्या शब्दांशीं अन्वित होऊन त्याचा अर्थ सौंदर्य, सौकुमार्य, सूक्ष्मता, तनुता—असा होतो. जसें:—भुजलता, भुजवल्ली, चापलता, धनुष्यवल्ली, भ्रूलता इत्यादि. १२. शरयूनामक नदींतून. शरयू ही रामायणीय नदी. अयोध्यानगरी हिच्या कांठीं असल्यामुळें हिची विशेष ख्याती. कोणत्या तरी एका नदीचें नांव घ्यावयाचें म्हणून हिचें नांव घेतलें एवढेंच. हिच्यांत इतर नद्यांपेक्षां अधिक मगरी असतात असें म्हणण्यास आधार नाहीं. १३. मगरी. १४. संधी. १५. प्रस्तुत ठिकाणीं **समाधि** नामक काव्यगुण आहे. 'लाजणें'

क्षतजें जेव्हां न्हाले तेव्हां पुष्पितपलाशसे गमती. ।
क्रोधाग्नि[3]ज्वाळाशा शोणितधारा क्षताननीं वमती. ॥ ११
धर्में तीं बाणांहीं दुर्योधन ताडितां चि, तो पांचीं ।
पीडी कौंतेयातें[6], कर्में उग्रें चि त्या सकोपांचीं. ॥ १२

धर्माचें सुमृदु हृदय, जें सर्वत्र हि सदा कृपारस वीं[9], ।
तें भेदाया सोडी दुर्योधन शक्ति सर्व-पारसवी. ॥ १३
तीं[11] बाणांहीं तीतें खंडी नृप, जेंवि तार्क्ष्य[12] भुजगीतें. ।
गौरविले देवानीं धर्माचे ते प्रतापिभुज गीतें. ॥ १४
शक्ति च्छेदुनि पांचां बाणानीं ताडितां चि नृप धर्में, ।
भेदी नवबाणानीं दुर्योधन पांडुसूनुचीं मर्में. ॥ १५
तेव्हां धर्म खवळला, सोडी अत्युग्रबाण, तो[13] यातें ।
भेदुनि महींत हि शिरे, प्याया[15] पाताळ[16]सिंधुतोयातें. ॥ १६

---

ह्या धर्म मनुष्याचा, त्याचा आरोप वडावर केला आहे. येथें मनुष्य ह्या अप्रकृत. त्याचा 'लाजणें' ह्या धर्म प्रकृत जो 'वड' त्याजवर आरोपिला आहे. तो लोकरूढीस अनुसरून आहे, म्हणून चमत्कृतिजनक झाला आहे. यास्तव ह्या **समाधि** नामक काव्यगुण होय. तल्लक्षण व उदाहरणः—'अन्यधर्मस्ततोऽन्यत्र लोकसीमानिरोधिना । सम्यगाधीयते यत्र स समाधिः स्मृतो यथा ॥ ९३ ॥ कुमुदानि निमीलन्ति कमलान्युन्मिलन्ति च । इति नेत्रक्रियाध्यासाल्लब्धा तद्वाचिनी श्रुतिः ॥ ९४ ॥'. [दंडीकृत **काव्यादर्श**]. १६. पिकलेल्या फळांनीं पूरित. १७. क्षत+शत+युत+आकृति=घाव+शंभर+युक्त+शरीर=शेंकडों क्षतांनीं युक्त शरीरास. १८. वडाचे वृक्ष.

१. रक्तानें; क्षतांतून उत्पन्न झालेलें तें क्षतज. २. येथील समकालीन क्रिया दर्शविणारीं क्रियापदें 'न्हाले' व 'गमती' हीं भिन्नकालीन आहेत, हें व्याकरणदृष्ट्या योग्य नाहीं. ३. क्रोधरूपी अग्नीच्या ज्वाळाच कीं काय अशा. ह्या अर्थात **उपमा** व **रूपक** यांचा संकर झाला आहे. ४. क्षत+आननीं=क्षतरूपी मुखांनीं. ५. वमन करिती; ओकती. ६. कुंतिपुत्र युधिष्ठिरास. ७. कोपयुक्तांचीं (धर्मदुर्योधनांचीं). ८. फार मृदु; कोमल. ९. वितें, प्रसवतें. १०. लोहमयी. पारसव=लोखंड, लोखंडी व नाश—असे अर्थ आहेत. सर्व-पारसवी=सर्वेषां पारसवः यस्मात् सा (सर्वांचा आहे नाश जीपासून ती)—असा विग्रह. ही शक्ति मूळ महाभारतांत स्वर्णदंड (सोन्याच्या मुठीची) होती, असें वर्णिलें आहे. ११. तीन. १२. गरुड. १३. धर्मानें सोडलेला अत्युग्र बाण. १४. दुर्योधनाला. १५. ह्या **उत्प्रेक्षालंकार** आहे. 'बाण पृथ्वींत शिरला, तो पाताळगंगेचें पाणी पिण्यासाठीं शिरलेला नव्हे. तेव्हां 'पाणी पिणें' हें बाणाच्या पृथ्वीमध्यें शिरण्याचें 'फल' नसतांही 'फल' कल्पिलें गेल्यामुळें, ही **'फलोत्प्रेक्षा'** झाली. 'जसा काय'

त्या काळीं कलहाचा अंत करावा असें मनीं आणी[1]; ।
धर्मवधार्थ गदा घे, जीच्या स्पर्शें जगे चि ना प्राणी. ॥ १७
तो, दंडहस्त[2] अंतक[3] तैसा, अवलोकिला गदापाणी[4]; ।
त्यातें धर्मनृप उरीं झडकरि अत्युग्रशक्तिनें हाणी. ॥ १८
शिरली स्तनांतरीं[5] ती कवच विदारुनि बिळीं जसी व्याळी[6]; ।
कुरुराज रथोपस्थीं[7] पडला[8], मोहें न देह सांभाळी. ॥ १९
रथ धांवडूनि तेव्हां येउनि धर्मासमीप भीम रणीं, ।
प्रार्थी कर जोडुनि कीं, 'अनृतापासूनि भीं, न भीं, मरणीं[9]; ॥ २०
तूं समरयज्ञदीक्षित[10] धर्मात्मा सत्यसंध[11], मीं होता[12]; ।
अधिकार धार्तराष्ट्राहुतिशतहोमीं[13] मला दिला होता[14]. ॥ २१

---

वगैरे उत्प्रेक्षावाचक शब्द नसल्यामुळें, ही '**प्रतीयमानोत्प्रेक्षा**'ही समजावी. (अलंकार-मीमांसा–पृष्ठ २३). १६. पाताळ+सिंधु+तोय=पाताळ+नदी+पाणी=पाताळगंगेतील पाणी.

१. या क्रियेचा कर्ता 'दुर्योधन' अध्याहृत. २. दंड आहे हस्तीं ज्याच्या. हें 'अंतका'चें (यमाचें) विशेषण. यमाचें 'दंडपाणी' हें नांव प्रसिद्ध आहे. ३. यम. ४. गदा आहे पाणींत (हातांत) ज्याच्या. [हें दुर्योधनाचें विशेषण]. ५. छातींत. ६. सर्पीण. ७. रथ+उपस्थ=रथ्यानें बसावयाकरितां जो रथाचा पुढील उंच प्रदेश, व त्याच्या बाजूस जी सखल जागा असते, त्यांत. ८. मूर्च्छित झाल्यामुळें पडला. 'मोहे, न देह सांभाळी' असा पाठभेद. मोहे=मूर्च्छित होई. ९. [मी] अनृतापासूनि भीं (भितों); मरणीं न भीं (मरणापासून भीत नाहीं). मला असत्याची जितकी भीति वाटते, तितकी मरणाचीही वाटत नाहीं. दुर्योधनास जर तूं आतां मारून टाकशील, तर त्याला मारण्याविषयींची माझी प्रतिज्ञा खोटी होईल. म्हणून मी मरणापेक्षांही या प्रतिज्ञाभंगास अधिक भितों–असा भीमाच्या म्हणण्याचा भाव. 'अनृतापासूनि भी, न भी मरणीं' असा पाठभेद. १०. युद्धरूपी यज्ञाचा यजमान. दीक्षित=ज्या यज्ञांत सोमपान आहे अशा यज्ञांत ज्यानें दीक्षा घेतली आहे तो. ११. सत्यप्रतिज्ञ. १२. एक ऋत्विज. अध्वर्युगण, होतृगण, ब्रह्मगण व उद्गातृगण असे यज्ञांतील ऋत्विजांचे चार गण आहेत. त्यांपैकीं '**होता**' ह दुसऱ्या गणाचा अधिपति. बहुतकरून अध्वर्यूकडे हवनाचें काम असतें. तरी होता व होतृगण यांकडेही तें काम सोंपवितात. १३. धार्तराष्ट्र+आहुति+शत+होमीं=धृतराष्ट्राचे दुर्योधनादिक पुत्र+अग्नीस अर्पिण्याचा पदार्थ+शंभर+होम करण्याविषयीं=धृतराष्ट्राच्या दुर्योधनादिक पुत्रांच्या शंभर आहुति अग्नीस अर्पण करण्याच्या कामीं. शंभर कौरवांसही भीमच मारणार होता, हें प्रसिद्ध आहे. १४. येथें भीमानें 'मला अधिकार दिला आहे' असें म्हणावयास पाहिजे. पंतांनीं येथें भूतकालदर्शक क्रियापदाची योजना कां केली असावी?

[1]यजमान पात्र म्हणती [2]ऋत्विक्संचितफळाप्रति ज्ञाते. ।
ज्याचें त्याच्या हातें हो कर्म, न हो [3]चळा [4]प्रतिज्ञा ते.' ॥ २२
भीमें वारण केलें धर्माचें नृपवधीं, [5]तसें हो! तें, ।
[6]गजगंडदलनसमयीं सिंहाचें जेंवि [7]त्याचिया [8]पोतें. ॥ २३

---

## [9]अध्याय एकोणिसावा.

दुर्योधन रक्षाया आला धावोनि वीर कृतवर्मा, ।
त्यावरि उठे [10]गदाधर भीम हि रक्षावया नृपा धर्मा. ॥ १
कर्णातें करुनि पुढें पुत्र तुझे [11]मुरडले पुन्हां युद्धा; ।
कौरवपांडवसेना भिडति, व्याघ्री जशा बहु क्रुद्धा. ॥ २
[12]अपराह्णीं बहु दारुण रण झाला, फार आटलें कटक, ।
[13]वृषविजयशरसमूह [14]श्येन गमति, भट, करी, हरी, [15]चटक. ॥ ३

---

१. दीक्षित, जो यज्ञ करितो तो यज्ञाचा यजमान. २. ऋत्विजांनीं सांठविलेल्या फळास. ऋतौ यजंति ते ऋत्विजाः; योग्य काळीं जे यजन करतात ते ऋत्विज. खरोखर यज्ञांतील सर्व कामें यजमानानेंच करावयाचीं, पण तीं सर्व एकट्याच्या हातून होऊं शकत नाहींत, म्हणून तो द्रव्य देऊन ऋत्विजांकडून तीं करवितो. वेळच्या वेळीं सर्व विधि आटोपण्यांत ते यजमानास साहाय्य करितात. हे आपल्या कामाबद्दल दक्षिणा घेतात, म्हणून कर्मफळ त्यांस प्राप्त होत नाहीं; यजमानास प्राप्त होतें. याविषयीं पूर्वमीमांसाभाष्यांत लिहिलें आहे कीं, 'जरी मंत्र ऋत्विज म्हणतो आणि त्या मंत्राप्रमाणें सर्व क्रिया करितो, तरी यज्ञाचें सर्व फळ यजमानासच मिळतें. कारण यज्ञ यजमानाकरितां करण्यांत येतो. 'हे अग्नि! मला तेज दे' असें जरी ऋत्विजानें मागितलें, तथापि तेज वास्तविक यजमानास प्राप्त होतें.' यावरून भीमाचें म्हणणें स्पष्ट होईल. ३. बदलणारी, मिथ्या. ४. भीमाची अशी प्रतिज्ञा होतीः–भीम म्हणे, 'जरि समरीं या मांडीवरि गदा न बसवीन। तरि पितृसालोक्यातें क्षण हि न पावेन, नरक वसवीन. ॥' (पंतकृत सभापर्व, अध्याय ६।२९). ५. वर सांगितल्याप्रमाणें. ६. गजगंडस्थळविदारणकाळीं. 'गजदंडदलनसमयीं' असाही पाठ आहे. दंड=गर्व, अभिमान. ७. सिंहाचिया. ८. छाव्यानें. ९. ह्या अध्यायांत पंतांनीं मूळांतील ३० व्या अध्यायांतील कथाभाग वर्णिला आहे. १०. या शब्दाचा रूढ्यर्थ 'विष्णु' असा आहे, पण प्रस्तुत स्थळीं हा 'गदा धारण करणारा' या यौगिकार्थांत योजिलेला असून 'भीमा'चें विशेषण आहे. ११. मागें गेलेले पुन्हां वळून युद्धरंगांत आले. १२. दोन प्रहराच्या नंतरचा काल. दिवसाचे प्रातःकाल, संगमकाल, मध्याह्न, अपराण्ह व सायंकाल असे पांच विभाग केले आहेत. त्यांत हा काल चौथा आहे. १३. येथें विजय=अर्जुन–असा अर्थ घेतां येत नाहीं, कारण तो अद्याप रणभूमीवर आलेला नाहीं. (गीति ७।८

कर्णानें त्या समयीं **सात्यकि** बहु पीडिला शरस्तोमें[1], ।
दिधले[2] ढेंकर भेरीनादमिषें बाणपूरित[3] व्योमें. ॥ ४
**सात्यकि**चे ही बाणव्रज[4] झाले त्या **वृषासि** घोळसिते[5], ।
जेंवि पिपीलिक[6] भुजगा, किंवा व्याघ्रासि जेंवि कोळसिते[7]. ॥ ५
**कर्णा**सि सहाय सुहृद[8] झाले, बहु करुनि भीरुकुत्सा[9]. हें ।
पाहुनि **सात्यकि**ला ही रक्षिति **पांचाळवीर** उत्साहें. ॥ ६
तों संपादुनि आन्हिक[10], पूजुनि[11] **परमेश्वरा** भवा[12] वरदा[13], ।
**नरनारायण** आले, काळ[14] हि पसरुनि मुखा विशालरदा[15]. ॥ ७
येतां चि **अर्जुना**नें वाजविला दिव्य **देवदत्त**[16] दर, ।

---

पहा). तेव्हां विजयः=विभावितः जयः यस्मात् सः=हटकून यशस्वी–असा अर्थ करावा. कर्णाच्या यशस्वी बाणांचा समुदाय ससाणा (श्येन) भासला व त्याच्यापुढें शत्रुपक्षीय वीर, हत्ती, घोडे हे चिमणे भासले–असा अर्थ. किंवा विजय म्हणजे यम असा अर्थ करून वृषावर यमाचें **रूपक** करावें. १४. ससाणापक्षी. १५. चिमण्या.

१. बाणसमुदायानें. २. बाणपूरित व्योमें (बाणांनीं खूप पोट भरल्यामुळें आकाशानें) भेरीनादमिषें (नगाऱ्याच्या शब्दाचें ढोंग करून) ढेंकर दिधले–असा अन्वय. प्रस्तुत ठिकाणीं **मिषापन्हुति** अलंकार झाला आहे. उपमेयाचा अपलाप करून त्यावर उपमानाचाच आरोप केल्यास **अपन्हुति** अलंकार होतो. उदा०–भेरीनाद नव्हे तर व्योमाचे ढेंकरच होत. अशा रीतीनें स्पष्ट अपलपन न करितां 'मिष'शब्द वापरून तोच अर्थ सुचविला आहे, म्हणून येथें **मिषापन्हुति** झाली. ३. बाणांनीं भरलेल्या आकाशानें. ४. बाणसमूह. ५. घोळणारे. घोळसणें=घुसळणें, दमविणें. (पंतकृत द्रोणपर्व, अध्याय २२।६१). ६. मुंगळे. पुष्कळ मुंगळे मिळून सर्पासही मारण्याचा यत्न करितात. ७. कोळसुंदा म्हणून एक जनावर आहे तें. हा प्राणी युक्तीनें वाघासही मारितो, असें म्हणतात. ८. मित्र. **दुर्योधना**श्वत्थामादिक. ९. मित्रांची निंदा, धिक्कार. १०. दिनकृत्य, मध्याह्नसंध्यावंदनादिक. ११. रोज **नरनारायण** त्रिकाळीं शिवाची अर्चा करीत असत. त्यास अनुसरून हें वर्णन आहे. १२. शिवाला, रुद्राला. 'व्योमकेशो **भवो** भीमः स्थाणू रुद्र उमापतिः' इत्यमरः. सर्वमस्मात् भवतीति भवः. सर्वांचा हा उत्पन्नकर्ता म्हणून भव. १३. वर देणाऱ्यास; कामना सिद्ध करणाऱ्यास. १४. काळ हि (यम देखील. **नरनारायण**च आले असें नाहीं, तर त्यांबरोबर **यम** देखील) [आपल्या] विशालरदा (मोठमोठे दांत आहेत ज्यांत अशा) मुखा पसरुनि [आला]–असा अन्वय. **नरनारायण** आल्याबरोबर लोकांचा अतिशयित संहार होऊं लागला–असा भाव. १५. विस्तीर्णदंता, मोठमोठे दांत असलेल्या. १६. **देवदत्त** नामक शंख. देवदत्त हें अर्जुनाच्या शंखाचें नांव. देवानें दिलेला तो देवदत्त. या स्थळीं देव हा शब्दानें इंद्रदेवाचें ग्रहण केलें पाहिजे.

ह[1]गले, मुतले हय गज, न[2] तसा त्यां सिंह[3]नाद [4]दत्तदर. ॥ ८
सज्य करूनि गांडीव [5]क्षणमात्रें पार्थ [6]बाणघन [7]पाडी, ।
[8]गजगिरि हि [9]क्षोणीवरि, रक्तनद्या सागराकडे धाडी. ॥ ९
वधितां [10]निर्जयूथातें व्याघ्रासि जसा [11]वराह, वाराया ।
धांवे तसा सुयोधन; करि पार्थासीं [12]वराहवा; राया ! ॥ १०
पार्थें छत्र-धनु-ध्वज खंडुनि, हयसहित मारिला [13]यंता; ।
[14]आठांहीं हें केलें; नववा मग बाण सोडिला [15]अंता. ॥ ११
त्या अतितीव्रशरातें खंडी गुरुपुत्र [16]सप्तधा [17]क्षिप्र, ।
विजयें धनु तोडुनि, [18]तो केला [19]गतगर्व तत्क्षणीं विप्र. ॥ १२
तों [20]विस्फारुनि कार्मुक, सरसावे कृप [21]नृपप्रियाकरितां, ।

---

अर्जुनानें एका प्रसंगी दानवयुद्धांत इंद्रास साहाय्य केलें होतें, तेव्हां इंद्रानें प्रसन्न होऊन हा शंख अर्जुनास दिला. (पंतकृत वनपर्व, अध्याय ५, गीति ११६–१७). येथील यमक पंतांचें आवडतें दिसतें (विराटपर्व, अध्याय ४।२).

१. प्रस्तुत स्थळीं पंतांनीं स्वभावोक्तीनें झालेली गोष्ट हुबेहूब वर्णिली खरी. पण हें वर्णन असल्या प्रौढ काव्यांत शोभण्यासारखें आहे, असें नाहीं. 'हगणें' 'मुतणें' हे शब्द ग्राम्य व अश्लील आहेत. तरी ते जनावरांस लाविले असल्यामुळें व हा महाकविप्रयोग आहे म्हणून साधुच समजावा; पण अनुकरण मात्र करूं नये. २. त्यां (त्या हयगजांस) तसा (जसा देवदत्त शंखाचा नाद भयंकर होता तसा) सिंहनाद (सिंहाची गर्जना देखील) दत्तदर (भीतिप्रद) न (नव्हता)–*असा अन्वय.* ३. *सिंहाची गर्जना.* ४. *भयदायक.* ५. *फक्त एका क्षणांत, अतिशीघ्र.* ६. *बाणांचा पाऊस.* ७. पार्थ *बाणघन पाडी [व] क्षोणीवरि (जमिनीवर) गजगिरि हि [पाडी,* व] सागराकडे रक्तनद्या धाडी–असा अन्वय. प्रस्तुत गीतींत अर्जुन हा इंद्रसमान आहे असें व्यंजनेनें सुचविलें आहे. कारण घनांकडून पाऊस पाडवून नद्या सागराकडे धाडणारा व गिरींस (पर्वतांस, वज्रानें पक्षच्छेद करून पर्वतांस) क्षोणीवर पाडणारा इंद्रच होय–हें प्रख्यात आहे. *प्रस्तुत स्थळीं व्यंग्यार्थ वाच्यार्थापुढें दबलेला आहे, म्हणजे व्यंग्य अप्रधान व वाच्य* प्रधान होय. जगन्नाथरायांच्या मतें हें उत्तम (दुसऱ्या दर्जाच्या) काव्याचें उदाहरण होय. 'यत्र व्यङ्ग्यमप्रधानमेव सचमत्कारकारणं तद्द्वितीयम्' [रसगंगाधर]. ८. गजरूपी पर्वत. ९. पृथ्वीवर. १०. आपल्या कळपास. ११. डुकर. १२. वर+आहवा=उग्रयुद्धा. १३. सारथी. १४. आठ बाणांनीं. १५. शेवट होण्यास. १६. सात ठिकाणीं. १७. शीघ्र. १८. तो विप्र=गुरुपुत्र अश्वत्थामा. १९. गर्वरहित. लज्जित–असा भाव. २०. टणत्कार करून. २१. राजाच्या (दुर्योधनाच्या) प्रियाकरितां (हिताकरितां).

त्याचें हि चाप खंडी पार्थ, गुणासीं[1] शिलीमुखा[2] धरितां. ॥ १३
कृतवर्म्याचें चाप, ध्वज ही छेदूनि मारिले वाजी[3]. ।
दुर्योधनधनु खंडुनि, जाय[4] वृषासीं[5] करावया आजी[6]. ॥ १४
आला अर्जुन ऐसें पाहूनि त्यजुनि सात्यकीसि रणीं, ।
कर्ण फिरे, तीं[7] बाणीं विंधी[8], रवि[9] जेंवि नीरदा[10] किरणीं[11]. ॥ १५
त्वरित विसां विशिखांनीं[12] विंधुनि कृष्णासि, कर्ण विजयातें, ।
ताडी नैकशरांहीं[13]; जाणों[14] दावी प्रताप निज यातें[15]. ॥ १६
प्रथम[16] अनादरिला तो सात्यकि कर्णा भटोत्तमा नवती[17] ।
आधीं, मग नव, मग शत शर अर्पी, तैं[18] समस्त मानवती. ॥ १७
धृष्टद्युम्न[19], शिखंडी, माद्रेय[20], द्रौपदेय[21] बळशाली, ।
आले कर्णावरि; तों तेथ युधामन्यु ही उडी घाली. ॥ १८
तों चेकितान धांवे, पावे[22] तेव्हां युयुत्सु ही सहसा[23]. ।
ये वीर उत्तमौजा, सुव्रत[24] नृप धर्म जो पितामहसा[25]. ॥ १९

---

१. धनुष्याच्या दोरीशीं. २. बाणास. [धनुष्यास बाण लावितांच—असा भाव]. ३. घोडे. 'वाजो वेगस्तद्योगात् वाजी,' वाज म्हणजे वेग आहे ज्यास, तो वाजी. ४. यास कर्ता मागच्या गीतींतील 'पार्थ'. ५. कर्णाशीं. ६. रण. ७. तीन. ८. प्रहार करी, आरपार भेद करी. ९. प्रस्तुत ठिकाणीं कर्णास सूर्याची व दोघां कृष्णांस नीरदाची उपमा योजिलेली आहे. कर्ण गौरवर्णाचा व दोघेही कृष्ण (कृष्णार्जुन) नीलमेघश्याम वर्णाचे असल्यामुळें ही उपमा फारच खुबीदार झाली आहे. १०. मेघाला. नीर (पाणी) देणारे म्हणून 'नीरद.' ११. किरणांनीं. १२. बाणांनीं. १३. अनेक बाणांनीं. न+एकशर=नैकशर=नव्हे एक इतके शर=अनेक शर. 'अनेक' शब्दही असाच झाला आहे. अन्+एक=अनेक. एक नव्हे ते 'नैक' किंवा 'अनेक'. १४. 'जाणों'शब्दानें येथें जी उत्प्रेक्षा केली आहे, तिची कांहीं गरज नव्हती. कारण कर्ण खरोखरच निजप्रताप अर्जुनास दाखवीत होता, तेव्हां 'जणों काय निजप्रताप त्यास दाखवीत होता' असें म्हणण्याची गरज काय? १५. अर्जुनातें. १६. [कर्णानें] प्रथम (यापूर्वी—अर्जुनाशीं युद्ध करण्याच्या उद्देशानें थोड्याच वेळापूर्वी) [जो सात्यकी] अनादरिला (युद्ध करितां करितां सोडून दिला) तो सात्यकि भटोत्तमा कर्णा...अर्पी—असा अन्वय व अर्थ. १७. नव्वद. १८. त्या वेळीं. तैं समस्त (योद्धे व प्रेक्षक) मानवती (माना डोलवून युद्धकौशल्य कबूल करिती)—असा अर्थ. १९. हे सर्व पांडवांच्या सैन्यांतील महारथी होत. २०. नकुल व सहदेव. २१. प्रतिविंध्यादि द्रौपदीचे पांच पुत्र यांसच 'उपपांडव' असें नांव होतें. २२. येऊन पोहोंचे. २३. एकदम. २४. उत्तम आहे व्रत ज्याचें असा. २५. भीष्माप्रमाणें.

कैकेयचेदिकारुषमत्स्यांचीं ही [1]जयैकलुब्ध बळें, ।
त्या कर्णावरि आलीं, [2]नानायुधमंडितें अतिप्रबळें. ॥ २०
केला निश्चय त्यांहीं कीं मारावाचि कर्ण आजि रणीं. ।
वर्षति [3]एकामें चि [4]प्राणहरप्रखरनैकशस्त्रगणीं. ॥ २१
त्या शस्त्रांचीं पटलें त्वरित [5]महास्त्रप्रयोगपटु कर्णें, ।
[6]लीलेनें चि उडविलीं, वातें गगनांत जेंवि तृ[7]णें–[8]पर्णें. ॥ २२
[9]नें कबंधावांचुनि बळ ठाकों दे कर्ण हा निकट कांहीं, ।
[10]स्वंःस्त्रीक्रीडा वरिली मग, आधीं प्राणहानि [11]कटकांहीं. ॥ २३

---

१. जयाविषयींच लोभी अशीं. २. अनेक आयुधांनीं सुसज्जित, किंवा सुशोभित. हा व याच्या पुढचा शब्द 'बळें' याचीं विशेषणें होत. ३. सर्व मिळून एकदम–असा भाव. 'एकसरेंचि' असा अन्य पाठ. ४. प्राण+हर+प्रखर+नैक+शस्त्र+गण=प्राणहारक आणि तीक्ष्ण अशा अनेक शस्त्रसमुदायांनीं. ५. ब्रह्मास्त्रप्रयोगकुशल अशा. ६. सहज; खेळतां खेळतांच. ७. गवत. प्रस्तुत स्थलीं 'तृ' या अक्षरानें मागच्या ऱ्हस्वाक्षरास दीर्घत्व आलें नाहीं. हें येथें मुद्दाम सांगण्याचें प्रयोजन असें, कीं आजकाल महाराष्ट्रांतील कित्येक कवि 'ऋ' या स्वरानें युक्त असलेल्या व्यंजनास संयुक्ताक्षर समजून मागील अक्षरास गुरुत्व देतात. असले प्रयोग साधु आहेत म्हणून 'केरळकोकिळा'सारखे टीकाकारही प्रतिपादीत आहेत. असले प्रयोग पंतांस असंमत नाहींत, असें कित्येक समजतात. असें प्रतिपादणें म्हणजे छंदःशास्त्राचें आपणास कांहींच ज्ञान नाहीं, असेंच सांगणें आहे. 'ऋ'युक्ताक्षरास जोडाक्षर मानण्यास कोणत्याही संस्कृत काव्यांत आधार नाहीं. पंतांचें एकंदर काव्य गीतिवृत्तांत असल्यामुळे–शार्दूलादि अक्षरगणवृत्तांत नसल्यामुळें–ऋयुक्ताक्षराविषयीं पंतांचा अभिप्राय काय होता, हें समजण्यास आधार नाहीं, असें 'केरळ-कोकिळा'नें म्हटलें होतें. पण हेंही त्यांचें म्हणणें खोटें आहे. अक्षरगणवृत्तें असोत, कीं मात्रागणवृत्तें असोत, त्यांत परसंयुक्ताक्षरावरून पूर्व-ऱ्हस्वाक्षरास दीर्घत्व आल्याचीं हजारों उदाहरणें सांपडूं शकतील. पंतांनीं ऋयुक्त व्यंजनानें पूर्व-ऱ्हस्वास दीर्घत्व कोठेंच आणिलें नाहीं. प्रस्तुत स्थल त्याचें उदाहरण आहे. अशा रीतीनें सर्व संस्कृत कवि व महाराष्ट्र कविकुलगुरु मोरोपंत यांच्या सर्वमान्य प्रयोगाच्या विरुद्ध 'पितृ' 'सदृश' 'सुहृत्' 'अमृत' इत्यादि शब्दांतील ऋयुक्ताक्षराच्या पूर्वींचीं अक्षरें दीर्घ आहेत असें मानून छंदोभंग करणें अत्यंत अलाक्षणिक असून कुकवीचें लक्षण आहे. ८. पानें. पंतांनीं 'तृणें पर्णें' असें वस्तुतः म्हणावयास पाहिजे होतें. तृणपर्णें=गवताच्या पाती. ९. कर्ण हा निकट (आपल्याजवळ) कबंधावांचुनि (शिरोरहित अशा धडां-शिवाय) बळ (सैन्य) कांहीं ठाकों न दे (उभें राहूं देईना). सैन्य जवळ आल्याबरोबर सैनिकांचीं डोकीं उडवून तो त्यांस कबंध करीत असे–असा भाव. १०. देवांगनांशीं क्रीडा. ११. कटकांहीं (सैन्यांनीं) आधीं (अगोदर) प्राणहानि वरिली; मग (मेल्यानंतर) स्वःस्त्रीक्रीडा (स्वर्गांगनासौख्य) [वरिली]–असा अन्वय.

[1]सुस्नात [2]युद्धशुद्धक्षेत्रीं [3]क्षतजापगांत [4]जे, त्यांतें ।
आलिंगिति [5]सुरकन्या, [6]सौंदर्यें इंदुच्या हि [7]जेत्यांतें. ॥ २४
[8]केले भग्न [9]पराङ्मुख झाले, चित्तीं धरूनि [10]आधि, रथी; ।
चोळिति कर, करकर [11]रद खाती, म्हणती '[12]असह्य [13]आधिरथी'. ॥२५
त्या समयीं पार्थानें कर्णाचें अस्त्र वारिलें अस्त्रें; ।
केलीं प्रकट [14]अहितशतकोटिमहामदविनाशकें शस्त्रें. ॥ २६
[15]कल्पांतमेघसा तो नर शरधारा [16]नराधिपा ! सोडी, ।
कुरुसेनेवरि पसरी [17]शरपटली जेंवि [18]भव्य पासोडी. ॥ २७
रक्त [19]प्राशिति, मूर्च्छित करिती, वधितीच, लागती [20]ज्यासी ।
त्याचें तेज [21]हरिति, शर ते [22]ब्रह्मग्रह चि [23]पार्थतरुवासी. ॥ २८

---

१. पुण्यक्षेत्रांतल्या नदींत स्नान केल्यास मनुष्य पवित्र होतो, ही कल्पना या गीत्यर्धांत गर्भित आहे. सुस्नात=उत्तम रीतीनें स्नान केलेले. २. युद्धाच्या पवित्र क्षेत्रांत (स्थलीं). ३. क्षतज+आपगांत=रक्तनद्यांत. ४. जे वीर–अर्थात् युद्धांत पडलेले. ५. अप्सरा. ६. आपल्या अप्रतिम सौंदर्यैंकरून चंद्रालाही जिंकणाऱ्या वीरांस. हें सौंदर्य त्यांस मरणोत्तर दिव्यदेह प्राप्त होऊन मिळालेलें समजावें. या जागीं वीररसांत शृंगाररस आहे. संस्कृत आलंकारिकांच्या मतें वीरशृंगार-रसांत अविरोध आहे:–'तत्र वीरशृंगारयोः......अविरोधः' [रसगंगाधर]. म्हणून वीरशृंगारांची भेसळ केल्याबद्दल पंतांस जे दोष देतात, त्यांनीं गीर्वाणसाहित्यशास्त्राचा अधिक अभ्यास करावा, येवढेंच उत्तर त्यांस पुरे आहे. ७. जिंकणारांना. ८. पराजित केलेले. ९. पाठ दाखवून पळूं लागले. १०. मनस्ताप. ११. दांत. १२. ज्याचा मारा साहणें अशक्य असा. १३. कर्ण. १४. अहित+शतकोटि+महामद+विनाशक=शत्रु+शंभरकोटी+मोठा गर्व+नाश करणारीं=असंख्य शत्रूंचा मोठा गर्वनाश करणारीं. १५. प्रळयसमयींच्या मेघाप्रमाणें. १६. हे धृत-राष्ट्रा ! १७. बाणांचें छप्पर. येथें उपमान व उपमेय यांच्या लिंगांत साम्य असावें म्हणून 'पटली' हा शब्द पंतांनीं मुद्दाम योजिला असावा. 'शरपटला' असा पाठ आहे, तोही अर्थास अनुकूलच आहे. १८. भव्य=लांबरुंद व जाडजूड. ह्या उपमानानें जाडी व विस्तार हे धर्म उपमेयाच्या ठिकाणीं वर्णिले आहेत. १९. पिती. २०. ज्या वीराला. २१. या सर्व क्रियेचे कर्ते 'शर' व 'ब्रह्मग्रह' होत. प्रस्तुत स्थलीं कवीनें अभेदाध्यवसायेंकरून 'शर' व 'ब्रह्मग्रह' यांचें वर्णन करून पूर्ण श्लेष साधिलेला आहे. 'शर'पक्षीं अर्थ तर स्पष्टच आहे. 'ब्रह्मग्रह' पक्षीं–ब्रह्मग्रह ज्यासी लागती (ज्याच्या आंगांत शिरती), त्याचें रक्त प्राशिति. (ब्रह्मराक्षस, ब्रह्मसमंध, पिशाच इत्यादि मनुष्याचें रक्त शोषून घेतात, व त्यास अशक्त करितात अशी समजूत आहे) [त्यास] मूर्च्छित करिती; [त्यास] वधितीच; त्याचें तेज हरिति (निस्तेज करितात). हीं

पडले कुरुसेनेवरि शर, लंके[१]वरि पराक्रमी कपिसे[२]; ।
झोंबति, खंडिति अंगें, अनिवार्य[३] प्राणहर[४], जसे च पिसे[५]. ॥ २९
विजयापुढें पळार्ध[६] हि तेज मिरविलें रणांत न क्षत्रें[७]. ।
झालीं नष्टप्रायें[८] शत्रुबळें[९], जेंवि उदयिं[१०] नक्षत्रें. ॥ ३०
पार्थ जयातें पावे, तों रवि ही अस्तगिरिचिया[११] शिखरा[१२]. ।
कर्ण[१३]पराभवसमयीं रुचला[१४] भृगुपात[१५] हा तयाशि[१६] खरा ! ॥ ३१
स्मरतां प्रियसुत[१७]गति रवि, होउनियां म्लान, सागरीं[१८] बुडतो. ।
उडुगण[१९] तयासि म्हणती, पडतां जलबिंदुवृंद जो उडतो. ॥ ३२

---

सर्व ब्रह्मराक्षसांचीं कृत्यें प्रसिद्धच आहेत. येथें कवीनें शब्दांच्या साध्या अर्थानींच श्लेष साधलेला आहे. मात्र 'लागती' शब्दाचे दोन भिन्न अर्थ आहेत. २२. ब्रह्मराक्षस. २३. अर्जुनरूपी वृक्षावर वास करणारे. पिप्पलादि वृक्षांवर ब्रह्मराक्षस वास करितात–अशी समजूत आहे.

१. प्रख्यात **पंचवटी**वादांत **रामायण, राजतरंगिणी** इत्यादि ग्रंथांवरून **सिंहल**च (सीलोनच) **रा**वणाची **लं**का होय, हें सिद्ध झालें आहे. २. वानरांप्रमाणें. प्रख्यात **रामरा**वणयुद्धांत **रा**माचें जें वानरांचें सैन्य होतें, त्या वानरांप्रमाणें–असा भाव. ३. ज्यांचें निवारण करितां येत नाहीं; जे एकदां आंगास झोंबले, कीं कोणत्याही उपायानें सुटावयाचे नाहींत असे. ४. प्राण घेणारे. ५. पिसा=वेडसर, पिसाट, ज्याचें माथें ताळ्यावर नाहीं असा, उन्मत्त. ६. थोड्या वेळापर्यंत देखील. ७. क्षत्रियानें. कोणत्याही क्षत्रियानें तेज मिरविलें नाहीं–असा भाव. ८. नष्टतुल्य; मेल्यासारखीं. हें विशेषण 'नक्षत्रां'सही पूर्णपणें लागू आहे. नक्षत्रें सकाळीं (सूर्योदयीं) नष्ट होत नाहींत–आकाशांतून जात नाहींत–नाहींशीं झाल्याप्रमाणें मात्र दिसतात. तेजोलोप झाल्यानें नष्टप्राय दिसतात–असा भाव. ९. कौरवसैन्यें. १०. प्रातःकालीं; अरुणोदयीं. ११. पश्चिमेकडील अस्तगिरिनामक पर्वताच्या. १२. शिखरा पावे–असा अन्वय. 'पावे' ही क्रिया दोन्हीकडे घ्यावयाची. १३. ही व याच्या पुढची **उत्प्रेक्षा** सुरेख आहे. १४. आवडला. १५. कडेलोट. अस्तगिरीवरून खालीं उडी घालणें. १६. सूर्याला. १७. प्रियपुत्र जो **क**र्ण त्याची गति (पराभव). "[सूर्याच्या] मुलाची जी दुर्दशा झाली, तिचें स्मरण हें रवीच्या नित्य नेमानें संध्याकाळीं निस्तेज होऊन बुडण्याचें कारण नसतांही कारणत्वानें वर्णन केलें आहे, म्हणून ही **'हेतूत्प्रेक्षा'**. हेतु=कारण. या उत्प्रेक्षेंत 'गमे, वाटे' किंवा असलाच दुसरा उत्प्रेक्षेचा वाचक शब्द नसल्यामुळें ही **'प्रतीयमानोत्प्रेक्षा'**ही होते." (अलंकारमीमांसा, पृष्ठ २३). १८. पश्चिमसमुद्रांत. १९. [सूर्य समुद्रांत] पडतां जो जलबिंदुवृंद (समुद्राच्या पाण्याचा बिंदुसमुदाय) [आकाशांत] उडतो, तयासि (त्या बिंदुवृंदास) (लोक) उडुगण (नक्षत्रसमुदाय) म्हणती. सायंकाळीं जे तारे आकाशांत दिसूं लागले, ते खरोखर तारे नव्हेत, तर कर्णपराभवदुःखानें सूर्यानें समुद्रांत उडी टाकली; तेव्हां त्यांतून अर्थात् पाणी वर

प्रथम चि पार्थशरांच्या पटलें तम[1] दाट दाटलें होतें, ।
रवि मावळतां सहसा काळाचें[2] वदन वाटलें हो! तें. ॥ ३३
तैं सर्व रात्रियुद्धाप्रति[3] भ्याले, मुरडले[4] चि कुरुवीर ।
कोणाच्या ही हृदयीं लेश हि नाहीं च राहिला धीर. ॥ ३४
दुःसहसायकभिन्नें[5] परिभवखिन्नें[6] धृतप्रकटदैन्यें[7], ।
फिरलीं, दुःखनिमग्नें[8] अर्जुनभग्नें[9] समस्त कुरुसैन्यें[10]. ॥ ३५
फिरले, हरिहतदंती[11] तैसे[12], खंती धरूनि जे[13] अहित. ।
मग परतले कृतार्थ[14] प्रमुदित[15] पार्थ[16] स्वसैनिकांसहित. ॥ ३६
धर्म नृपाचे सैनिक वर्णिति विजयाच्युतप्रतापातें[17]; ।
हांसति[18] सुयोधनातें; सांगावें दुःख[19] काय बापा! तें. ॥ ३७

---

उसळलें, तें असंख्य बिंदुरूपानें आकाशांत चमकत आहे. पण हें न समजल्यामुळें लोक त्या पाण्याच्या बिंदूंसच नक्षत्रें म्हणतात–असा भाव. 'उडुगण नव्हे जलबिंदुवृंद होय' असा अर्थ केल्यास **अपन्हुति.** 'उडुगण जणों जलबिंदुवृंद होय'–असा भाव घेतल्यास **उत्प्रेक्षा.** २०. येथेंही 'जलबिंदुवृंद' यांत 'वृं'मुळें 'दु'ला गुरुत्व आलें नाहीं. (मागें गीति २२ वरील टीपा पहा).

१. अंधकार; अंधार. 'दाट तम दाटलें' हा प्रयोग 'अंधकाराचें अतिशयाधिक्य' दर्शवितो. २. मृत्यूचें. ३. रात्रीं युद्ध करण्यास; रात्रीं युद्ध होईल म्हणून. रात्रीं युद्धास भिण्याचें कारण मागें जयद्रथवधानंतर दुर्योधन टाकून बोलल्यामुळें द्रोणाचार्यांनीं रात्रींही युद्ध चालू ठेविलें, तेव्हां घटोत्कचानें फार पराक्रम करून कौरवसैन्याची फारच खराबी केली होती. (पंतकृत द्रोणपर्व, अध्याय १८ व १९). ४. परतले; घराकडे फिरले. ५. असह्य बाणांनीं छिन्न अशीं. ६. पराजयानें खिन्न अशीं. ७. ज्यांनीं स्पष्टपणें दैन्य धारण केलें आहे अशीं. ८. अगदीं दीन दिसणारीं, दुःखांत निमग्न अशीं. ९. अर्जुनानें पराजित–छिन्नविच्छिन्न–केलेलीं. या गीतींतील सर्व विशेषणें 'कुरुसैन्यां'चीं आहेत. १०. लहान लहान समासांनीं व अनुप्रासांनीं भरलेली ही गीति, उद्वेगामुळें, मंद मंद गतीनें शिबिराकडे जाणाऱ्या कुरुसैन्याचें जणों अनुकरणच करीत आहे. ११. सिंहताडित गजाप्रमाणें. १२. त्याप्रमाणें. दंती जसे, त्याप्रमाणें–असा भाव. १३. 'जे' असें पाठान्तर. जे अहित=जे पांडवांचे अहित (शत्रु) होते ते. १४. आपलें काम ज्यांनीं केलें आहे असे. १५. आनंदित; संतुष्ट. १६. धर्मभीमादि सर्व वीर–असा भाव. १७. अर्जुनाच्या आणि कृष्णाच्या प्रतापाला. १८. धर्मार्जुनांशीं मूर्खपणानें त्या दिवशीं युद्ध केल्याबद्दल. १९. तो दुःखकारक वृत्तांत.

ते[1] रात्रीं शिबिरातें[2] गेले, पावोनि जय, रहायास; ।
'हां[3]!' या सर्व हि शब्दा पढती कौरव वृथा-महायास[4]. ॥ ३८

---

## अध्याय विसावा[5].

### (द्वितीयदिनयुद्ध.)

प्रज्ञाचक्षु[6] म्हणे, 'रे ! लीलेनें चि स्वशत्रु सितवाहें[7] ।
वधिले; वधिल हि उरले[8]. नुमजे[9] अद्यापि भावि कितवा[10] हें. ॥ १
काळमद[11] हि हरिल रणीं अर्जुन, वांचेल केंवि तदराती[12] ? ।
जी काळी[13] गज हि गिळी, गिळितां उगळील[14] काय बदरा[15] ती[16] ? ॥ २

---

१. **पां**डव २. सैन्य उतरलेल्या जागेस शिबिर म्हणतात. यालाच इंग्रजींत Camp म्हणतात. ३. सर्व हि **कौ**रव 'हा' (हाय! हाय! दुःखसूचक) शब्दा पढती (उच्चारिती). तिकडे **पां**डव आनंदांत होते, पण इकडे कौरव 'हाय! हाय!' करीत होते–असा सांगण्याचा भाव. ४. ज्यांचे महा आयास (श्रम) वृथा झाले (ज्यांची मोठी खटपट फुकट गेली आहे) असे. हें कौरवांचें विशेषण. '......पढती कौरव; वृथा महायास' असा पाठ स्वीकारिल्यास—[**कौ**रवांचा] महायास (युद्धादि प्रचंड परिश्रम) वृथा [होय]–असा अर्थ करावा. हा **सं**जयाचा अभिप्राय आहे. तो म्हणतो कीं, **पां**डव विजयी होणार व सर्व **कौ**रव मरणार हें खास. तेव्हां **कौ**रवांचे सर्व परिश्रम व्यर्थ आहेत; त्यांपासून कांहींएक फलप्राप्ती व्हावयाची नाहीं. ५. मूळ महाभारतांतील ७३ अनुष्टुप् श्लोकांचा ३१ वा अध्याय ह्या अध्यायाच्या ४२ गीतींत **पं**तांनीं आणिला आहे. ६. **धृ**तराष्ट्र. प्रज्ञा (बुद्धि) आहे चक्षु (डोळे) ज्याचे तो **प्रज्ञाचक्षु.** डोळ्यांनीं आंधळा असल्यामुळें **धृ**तराष्ट्र डोळ्यांचीं सर्व कामें आपल्या बुद्धीच्या जोरावर करीत असे, म्हणून त्यास हें नांव पडलें. ७. ज्याच्या रथाचे घोडे पांढरे होते अशा अर्जुनानें. ८. उरलेले. हें 'स्वशत्रू'चें विशेषण. ९. अन्वयः–हें (उरलेल्या सर्व **कौ**रवसैनिकांसही अर्जुन मारील हें) भावि (भविष्यत्, पुढें खातरीनें घडणारी गोष्ट) कितवा (जुगारी **दु**र्योधनाला) अद्यापि (इतके वीर अर्जुनानें मारल्यावरही) नुमजे (समजत नाहीं). १०. जुगारी **सु**योधनाला. ११. सर्वांचा संहार करणारा जो यम, त्याचा गर्व. १२. तत्+अराति=त्याचा शत्रु. १३. **का**ली हें **पा**र्वतीचें उग्रस्वरूप आहे. त्या स्वरूपांत तिचा आहार फारच प्रचंड असल्यामुळें ती गजासारख्या प्राण्यासही गिळून टाकिते, अशी समजूत आहे. अशा रीतीनें गजांसही गिळून टाकणारी **का**ली तोंडांत घातलेलें बोर गिळवत नाहीं म्हणून परत बाहेर टाकील काय? या अप्रस्तुत उदाहरणानें–ज्या अर्जुनानें मोठ्या मोठ्या वीरांचा नाश केला, तो आतां राहिलेल्या लहानशा सैन्याचा सहज नाश करील; हा प्रस्तुत अर्थ सुचविला आहे, म्हणून ही **अप्रस्तुतप्रशंसा.** या गीत्यर्धांत **काव्यार्थापत्ति** नामक अलंकारही झाला आहे. त्याचें लक्षणः–

बलभद्रप्रियभगिनी[1] कृष्णावरजा बळें चि ज्या वीरें[2], ।
शक्रसुधा[3] जसि गरुडें, हरिलि सुभद्रा[4] सती महावीरें[5]; ॥ ३
इच्छाभोजन[6] खांडववन[7] अर्पुनि अग्नि तर्पिला[8], हातीं ।
धरुनि शरचापचामर[9] शक्रायुधवृष्टिमक्षिकापातीं[10]; ॥ ४
जिंकुनि[11] पृथिवी केले सर्व हि नृप करद[12] या चि विजयानें, ।
वधिले निवातकवच[13] हि, तोषविला शक्र शत्रुविजयानें. ॥ ५
जो वीर घोषयात्राकाळीं[14] दुर्योधनादिकां रक्षी. ।

---

'कैमुत्येनार्थसंसिद्धिः **काव्यार्थापत्ति**रिष्यते.' [कुवलयानंद.] जेथें कैमुतिकन्यायानें अर्थसिद्धि होते, तेथें हा अलंकार होतो. कैमुतिक=किमुत याचा भाव=काय कथा, काय आश्चर्य, काय नवल. 'हे स्त्रिये ! तुझ्या मुखानें चंद्र जिंकिला, मग कमळाची काय कथा ?' हें या अलंकाराचें प्रसिद्ध उदाहरण आहे. प्रस्तुत स्थळीं, हत्तीस गिळणारी **का**ली बोरांला गिळूं शकेल, यांत काय आश्चर्य ?–असा अर्थ असल्यामुळें हा अलंकार झाला. १४. उगळणें=गिळूं शकत नसल्यामुळे तोंडांतून कोणताही पदार्थ बाहेर काढणें. १५. बोराला. १६. **का**लिका.

१. कृष्ण+अवर+जा=कृष्णाची कनिष्ठ भगिनी. २. **अ**र्जुनानें. ३. **श**क्राची (इंद्राची) सुधा (अमृत). **वि**नतेचा मुलगा जो **ग**रुड त्यानें आपल्या आईला सवतीच्या दास्यांतून मुक्त करण्याकरितां, स्वर्गांतून अमृत आणून आपले सावत्र भाऊ जे सर्प त्यांस दिलें. स्वर्गांतून अमृत आणतांना देवादिकांनीं त्यास अडविलें. त्यानें त्या सर्वांचा पराजय केला–ही कथा येथें अनुसंधेय आहे. [**मो**रोपंतकृत आदिपर्व, अ० ४ पहा ]. ४. **सु**भद्राहरण–कथेकरितां **मो**रोपंतकृत आदिपर्व अ० ३७ पहा. ५. 'तसी' असा पाठभेद. ६. इच्छाभोजन=खाणाऱ्यास आवडतील ते पदार्थ पाहिजे तितके खावयास देणें. ७. **खां**डववनदहनकथा **मो**रोपंतकृत आदिपर्व अ० ३७ मध्यें वर्णिलेली आहे. ८. तृप्त केला. ९. धनुष्यरूप चवरी. १०. **श**क्राच्या आयुधवृष्टिरूप माश्यांच्या पतनीं. **खां**डववन रक्षिण्याकरितां **इं**द्रानें जे बाण सोडले, ते **अ**र्जुनास माश्यांपेक्षां विशेष योग्यतेचे वाटले नाहींत; व चवरीनें जशा माश्या वाराव्या, तशा रीतीनें त्यानें त्या आयुधांचें निवारण केलें–असा भाव. हें सुरेख **रूपक पं**तांचें आहे. ११. **ध**र्माच्या **रा**जसूय यज्ञाच्या वेळेस **अ**र्जुनानें पुष्कळ राजे जिंकिले–त्या गोष्टीस उद्देशून हें वाक्य आहे. (**पं**तकृत सभापर्व अध्याय २). १२. करभार देणारे. १३. निवात (शस्त्रांनींही अभेद्य) कवचें आहेत ज्यांचीं ते **नि**वातकवच. या नांवाचे **प्र**ऱ्हादभ्राता **सं**ऱ्हाद याचे तीन कोटी पुत्र होते. ते समुद्रतीरीं राहत असून **इं**द्रासही अजिक्य होते. **पा**शुपतास्त्र मिळाल्यानंतर **अ**र्जुन **इं**द्रलोकीं गेला होता. तेव्हां त्यानें या सर्व दैत्यांचा संहार केला. [वनपर्व–अ० १६८–१७३]. १४. घोष=गवळवाडा. यात्रा=गमन. **पां**डव **द्वै**तवनांत असतां त्यांस आपलें वैभव दाखवावें म्हणून **दु**र्योधन आपल्या गाई पाहण्याच्या मिषानें सैन्यासह त्या वनांत गेला. पण तेथें कांहीं कारणावरून **चि**त्रसेनगंधर्वांचें व त्याचें

समयीं[1] पूर्वीं केल्या[2] अपराधांच्या न कोटि ही लक्षी; ॥ ६
हें सर्व असो. ज्यातें[3] भीति, सुधा सेविती तदपि, नाकी[4]; ।
तोषविला द्विभुजें[5] दशभुजविभु तो ही यशःपद[6] पिनाकी; ॥ ७
जेणें किरातरूपी[8] भगवान् भव[7] भूतनाथ[9] भुजयुद्धीं[10], ।
दुष्करतपःकृशें[11] ही पूजियला, जो[12] अदृश्य[13] अविशुद्धीं[14]; ॥ ८
ऐसा प्रबळ पृथासुत पाशुपताद्यस्त्रजातहृदयज्ञ[15]; ।
त्याच्या चि बळें सिद्धिसि[16] धर्माचा पावला चि रणयज्ञ. ॥ ९
विश्वप्रख्यात असा अर्जुन; त्यासीं करूनि ही कलहा, ।
धन्य[17] सुयोधन वाटे, कीं भुवनख्यात जाहला खल हा. ॥ १०

---

भांडण होऊन गंधर्व दुर्योधनाला बद्ध करून नेऊं लागला. तेव्हां अर्जुनानें त्यास सोडविलें. या प्रकरणास घोषयात्रा म्हणतात. [मोरोपंतकृत वनपर्व, अ० ७ पहा].

१. दुर्योधनादिकांच्या संकटसमयीं. २. केलेल्या, दुर्योधनानें पूर्वीं केलेल्या. ३. नाकी स्वर्गांतील देव)[जरी] सुधा सेविती, तदपि (अमृत पिऊन अमर झाल्यामुळें कोणापासूनही त्यांस भीति बाळगण्याचें कारण जरी नाहीं तरी) ज्यातें भीति (ज्या शंकराला पाहून मृत्युभयानें भितात–कारण यानें यमासही मारून टाकिलें होतें) तो ही दशभुजविभु (दहा हात ज्यास आहेत असा महादेव) यशःपद (जो सर्व यशांचे स्थान असा) पिनाकी (शंकर) [अर्जुनें] द्विभुजें (दोन हातांनींच) तोषविला (युद्ध करून संतुष्ट केला)–असा अन्वय. ४. नाकांत (स्वर्गांत) राहणारे देव. या गीत्यर्धाचा व पुढच्या गीत्यर्धाचा संबंध तोडून. ज्यातें (ज्या अर्जुनातें) नाकी भीति–असाही अर्थ होईल. ५. दशभुजविभु 'द्विभुजें' तोषविला म्हणण्यांत व्यतिरेकानें अर्जुनाचें श्रेष्ठत्व स्थापिलें आहे. ६. यशाचें स्थानच असा. ७. शिव. ८. भिल्लरूपी. ९. शंकर. भूतांचा (भूतप्रेतपिशाचांचा किंवा प्रपंचांतील सर्व प्राण्यांचा) नाथ. १०. कुस्ती खेळण्यांत. ११. कठीण तपश्चर्येनें कृश होऊनही. कृश असतांच शंकराशीं भांडणारा पुष्ट असतां फारच शौर्य करील असा ध्वनि. [अर्जुनकिरातकथेकरितां मोरोपंतकृत वनपर्व अ० ३ पहा]. १२. जो (जो शिव) अविशुद्धीं अदृश्य (अपवित्र लोकांना दिसत नाहीं); पवित्र लोकांसच दिसतो–अर्जुन फार पवित्र, हा ध्वनि. १३. जो दृश्य नव्हे तो, पाहण्यास अयोग्य. १४. पापी लोकांकडून. १५. पाशुपतादिक अस्त्रसमुदायाचें मर्म जाणणारा. जात=जाती, प्रकार. 'अस्त्रजाल' असा पाठभेद. १६. सिद्धिसि पावला=सांगोपांग पूर्ण झालाच समज. १७. प्रस्तुत गीतींत लेश नामक अलंकार आहे. त्याचें लक्षण:–'गुणस्यानिष्टसाधनतया दोषत्वेन, दोषस्येष्टसाधनतया गुणत्वेन च वर्णनं लेशः' [रसगंगाधर]. चांगल्या गुणापासून वाईट परिणाम होतो, म्हणून दोषाप्रमाणें त्याचें वर्णन व दोषापासून चांगला परिणाम होत असल्यामुळें त्याचें गुणाप्रमाणें वर्णन केल्यास लेश नामक अलंकार होतो. प्रस्तुत स्थळीं विश्वप्रख्यात अर्जुनाशीं दुर्योधनाचा द्वेष दोष खरा; पण त्यामुळें तो भुवनख्यात होऊन धन्य झाला म्हणून दोषाला गुण कल्पिल्यामुळें लेशालंकार झाला.

[1]प्रभुसीं वैर हि करितां दुष्ट हि [2]पावे प्रसिद्धिला लोकीं, ।
[3]रामद्वेषी [4]सीतादुःखद [5]दशकंठ खळ जसा तो कीं. ॥ ११
मग संजया ! स्वशिबिरा येउनि केलें सुयोधनें काय ? ।
काय म्हणे [6]वैकर्तन ? तो हि [7]विजयविजित [8]राजसमुदाय ?' ॥ १२
संजय वदे:–[9]पराभवखिन्ना दुर्योधनासि कर्ण म्हणे, ।
'कुरुनाथा ! धीर धरीं, मारीन समस्त शत्रु [10]राजमणे ! ॥ १३
[11]सावध होता अर्जुन, सारथि ही जाहला असे जो गा ! ।
तो गाढ धैर्य देतो, समयीं उपदेश ही जयाजोगा. ॥ १४
म्हणुनि [12]अकस्मात् पार्थें आम्हांला आजि [13]वंचिलें, प्राज्ञा ! ।
त्यांत दिवस ही सरला. करिन उद्यां सफळ मीं तुझी आज्ञा.' ॥ १५
ऐसें प्राशन केलें कुरुराजें, अभयवाक्य कर्णाचें; ।
[14]अमृत चि तें त्याच्या [15]रिपुसिंहध्वनिशूलतप्तकर्णाचें. ॥ १६
आज्ञा दिली [16]नृपांतें [17]शिबिरा जाया सुयोधनें मानें. ।
रात्रि क्रमिते झाले [18]विजयार्थी ते सुयोध [19]नेमानें. ॥ १७
झाले [20]प्रभातरात्रौ सर्व हि युद्धार्थ सिद्ध. त्या काळीं, ।

---

१. समर्थाशीं. २. 'यावे' असाही पाठ आहे. ३. दाशरथी रामाचा द्वेष करणारा. ४. सीतेला दुःख देणारा. ५. रावण. ६. रविपुत्र कर्ण. ७. अर्जुनानें जिंकलेला. ८. राजमंडळ. ९. पराभवानें दुःखित अशा. १०. राजांतील रत्ना, राजश्रेष्ठा. ११. स्वतः अर्जुन सावध होता, व सारथि जो कृष्ण, तोही त्यास जय मिळण्याजोगी युक्ति सांगत होता. 'अर्जुन सावध होतां' असाही अनुनासिकान्त पाठ आहे. तेव्हां:—गा ! अर्जुन सावध होतां (अर्जुन शत्रुहननाविषयीं उद्युक्त होतो त्या वेळीं), जो सारथि ही जाहला असे (सारथी झालेला कृष्ण देखील) [अर्जुनास] गाढ धैर्य देतो [व] समयीं (योग्य वेळीं; योग्य प्रसंग पाहून) जयाजोगा (जय प्राप्त होण्यासारखा) उपदेश ही (देतो)–असा अन्वय. १२. एकदम, नकळत. १३. फसविलें, अर्थात् पराभव केला, भंगिलें. १४. अमृतासारखें वाटण्याचें कारण पुढच्या लांब सामासिक पदांत दिलें आहे. १५. शत्रूंनीं जयोन्मत्त होऊन केलेला सिंहनादरूपी शूल (रोगविशेष) त्यानें तापलेल्या कानाचें. १६. तेथें जमलेल्या सर्व राजांस. १७. येथें शिबिर म्हणजे आपआपली रहावयाची जागा, पटगृह, डेरा. १८. विजयाची इच्छा करणारे. १९. नेम=प्रार्थना, धर्मानुष्ठान. परमेश्वराची प्रार्थना करीत–असा अर्थ. २०. पहांटेच्या रात्रीं.

भूपसभा[1] शोभेना कीं नव्हता कर्ण सत्तिलक[2] भाळीं. ॥ १८
दुर्योधनादिकांचें तेव्हां कर्णाकडे चि मन गेलें. ।
तें सर्व राजमंडळ निश्चळ निःशब्द चित्रसें ठेलें[3]. ॥ १९
कर्णें त्या नृपवृंदा भेटि दिली, जसि कलेवरा[4] जीवें; ।
करि भटमुखें[5] विकसितें तो[6], रविचा उदय जेंवि राजीवें[7]. ॥ २०
कर्ण म्हणे, 'कुरुनाथा ! पार्थासीं संगरांगणामाजी[8], ।
घालीन गांठि, त्यातें मीं कीं मारील तो मला आजी. ॥ २१
कार्यबहुत्वासाठीं[9] गांठि न पडली तयासवें मागें[10], ।
त्वां आम्हां दोघांचीं आजि पहावीं बळें महाभागें[11]. ॥ २२
मीं जिष्णुतें न वधितां आजि न मागें फिरेन, हे वाचा[12] ।
साची[13], असा[14] असावा निश्चय[15] चि तुझा मनुष्यदेवाचा[16]. ॥ २३
भस्म करुनि वीरबळें ठाकेन[17] प्रलयभास्कराभ[18] यदा[19], ।
घालील गांठि अर्जुन; कीं जाणे शक्ति ती[20] नसे भयदा. ॥ २४
म्यां[21] शक्रदत्तशक्ति[22] त्यजिली पूर्वीं[23] घटोत्कचावरि, तें ।
निजवधकारण[24] झालें नष्ट, असें ठावुकें असे अरितें[25]. ॥ २५
त्याचें माझें आयुध[26] वीर्य[27] असे सम चि. ज्यागुणें स्पष्ट, ।

---

१. दुर्योधनाची सभा. २. सत्+तिलक=सुरेख टिळा भाळीं=(राजसभेच्या) कपाळीं. ३. स्तब्ध राहिलें. ४. शरीराला. ५. वीरांचीं मुखें. ६. कर्ण. ७. कमळें. ८. संगराच्या अंगणांत, युद्धभूमींत. ९. इतर कामें पुष्कळ असल्यामुळें. १०. यापूर्वीं, आतांपर्यंत. ११. महा (मोठा) आहे भाग (भाग्य) ज्याचा (अशा त्या दुर्योधनानें). १२. शब्द. १३. सत्य. १४. 'असो' असें पाठांतर. १५. खात्री. तुझा निश्चय असावा=तूं निश्चित जाण, हें तूं पक्कें समज. १६. मनुष्यश्रेष्ठाचा, राजराजाचा. १७. धैर्यानें उभा राहीन. १८. कल्पांतसूर्यतुल्य. १९. जेव्हां. २०. वासवी शक्ति. २१. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'म्या' असा शब्द आहे. २२. ही शक्ति कर्णास इंद्राकडून कशी मिळाली, हें मोरोपंतकृत वनपर्व अ० १० यांत वर्णिलें आहे. २३. मोरोपंतकृत द्रोणपर्व घटोत्कचवधप्रकरण पहा. २४. आपल्या मरणाचें कारण. २५. अर्जुनास. शक्रदत्त शक्ति अमोघ असल्यामुळें ती कर्णाजवळ जेथपर्यंत होती, तेथपर्यंत कृष्णानें अर्जुनाची व कर्णाची गांठ पडूं दिली नाहीं. आतां ती शक्ति गेली, तेव्हां अर्थात् अर्जुन माझ्याशीं युद्ध करण्यास येईल-असा भाव. २६. युद्धसामुग्री. २७. पराक्रम.

मीं अधिक अर्जुनाहुनि, तें ऐकें; [1]स्वगुण बोलणें कष्ट. ॥ २६
[2]परकीयशस्त्रनाशन, [3]सत्वरशरमोक्षकुशळता, युद्धीं ।
[4]दूरस्थित[5]लक्ष्याचें भेदन, [6]वाखाणिलें जनीं शुद्धीं. ॥ २७
[7]उत्साह, [8]बळ शरीरीं, [9]अस्त्रीं अभ्यास, आणखी [10]राया ! ।
[11]लक्ष्यासीं बाणाच्या संबंधाच्या हि जाणणें ठाया. ॥ २८
[12]दिधलों [13]गुरुप्रसादप्रभुनें पूर्वोक्तसद्गुणां वतन, ।
न विसंबति क्षणार्ध हि करिती ऐक्यें समस्त ही जतन. ॥ २९
मीं अधिक या [14]गुणांहीं, मजसम नाहीं च [15]सव्यसाची ही, ।

---

१. आपले गुण आपण सांगणें चांगलें नव्हे–असा भाव. हें वाक्य सुभाषितरूप आहे. समानार्थक सुभाषित:—इन्द्रोऽपि लघुतां याति स्वयं प्रख्यापितैर्गुणैः । तसेंच पुढील पंतोक्ति पहा:–'गाती गातिलहि कवी, स्वगुण स्वमुखेंचि काय गाऊन? ।' (विराटपर्व, अध्याय ४।२०). २. शत्रूंच्या शस्त्राचा नाश करणें. ३. सत्वर बाण सोडण्याची कुशलता. ४. दूर असलेल्या पदार्थास न चुकतां निशाण मारणें. ५. 'लक्ष्यातें' असाही पाठ आहे. ६. हे माझे गुण शुद्ध म्हणजे पक्षपातरहित लोकांनीं वाखाणिले आहेत–असा भाव. ७. उल्हास, हिय्या. ८. शक्ति, पराक्रम. ९. अस्त्रप्रयोगाचा फार अभ्यास. १०. दुर्योधना. ११. लक्ष्यासीं (निशाणाशीं) बाणाच्या संबंधाच्या हि ठाया (बाणाचा जो संबंध आहे त्याची जागा–त्यांतलें मर्म–खुबी) जाणणें–हाही गुण माझ्यांत आहे. न चुकतां निशाण मारण्यास नेम कसे धरले पाहिजेत, हें मी अर्जुनापेक्षां अधिक जाणतों–हा कर्णाच्या सांगण्याचा भाव. ठाय=ठाव, खोली, साकल्य. १२. गुरुप्रसादप्रभुनें (कर्ता) [मी] (कर्म) पूर्वोक्तसद्गुणां (वर सांगितलेले जे सद्गुण त्यांस) वतन दिधलों–असा अन्वय. वतन देणारा राजा; म्हणून गुरुप्रसादावर प्रभू(राजा)चा आरोप केला आहे. हें **परंपरितरूपक.** या गीत्यर्धांतला कर्मणी प्रयोग विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. तृतीयांत कर्ता, प्रथमांत कर्म व कर्माच्या लिंगवचनाप्रमाणें क्रियापद या लक्षणास अनुसरून असेल तो कर्मणी प्रयोग खरा. पण यांत प्रथम(उत्तम)पुरुषीं कर्मपद आहे. कर्मणी प्रयोगांत कर्म प्रथम किंवा द्वितीय(मध्यम)पुरुषीं गद्यांत येत नाहीं. पण पद्यांत कवींनीं व विशेषतः पंतांनीं पुष्कळ ठिकाणीं याचा उपयोग केलेला आहे. पंतांच्या संमतीचे हे प्रयोग अनुकरणीय आहेत, किंवा नाहींत हें ठरणें इष्ट आहे. याचीं अन्य उदाहरणें:—(१) '**वरिलासि** मत्सखीनें, म्यांही वरिलासि **तूं** मनें' [आदिपर्व–अ० ११], (२) 'जाउनि तो सूत म्हणे कृष्णे! द्यूतांत **तूं** स्वयें **धर्में, हारविलीस**...' [सभापर्व–अ० ४], (३) प्रेमें रक्षतिल सदा म्हणुनि दिलें **मी** जयासि **मत्तातें**' [विराटपर्व–अ० १], (४) 'हरिला समस्तहि श्रितताप तुवां, म्हणुनि म्यांहि **वरिलास**' [उद्योगपर्व–अ० १.], १३. गुरुप्रसादरूपराजानें. 'दिधला गुरुप्रसादप्रभुनें' असाही पाठ आहे. १४. गुणांनीं. १५. अर्जुन देखील.

स्वस्तुति नोहे राया! [1]समयीं जाणाल [2]उक्ति साची ही. ॥ ३०
जें [3]विजयचाप, निर्मुनि दे [4]वज्रधरासि [5]विश्वकर्मा, तें ।
इंद्रें [6]रामासि दिलें, तेंचि [7]धनूरत्न राम दे मातें. ॥ ३१

करि एकवीस वेळां [8]जेणें [9]निःक्षत्रिया धरा राम, ।
तें आजि धनुष्य तुझा संपूर्ण करील [10]पार्थवधकाम. ॥ ३२
आतां अधिक धनंजय मजहुनि [11]ज्या ज्या गुणें असे तो तो ।
कथितों. [12]श्राव्य स्तव्य हि रिपुगुण हि गुणज्ञमंडळीं होतो. ॥ ३३
पार्थाच्या [13]चापाचा गुण दिव्य, ध्वज हि, रथ हि दिव्य असे, ।
ध्वजशिखरीं विस्मयकर [14]कपि ही, नसती [15]जनांत [16]अश्व तसे. ॥ ३४
[17]अक्षय भाते, बा! ते होती कल्पांतिंचे हि मेघ रिते, ।
अरितेजःक्षयकरिते, पूर्ण चि, शरकोटि वर्षती, तरि ते. ॥ ३५

---

१. योग्य समयीं, लढाईंत. २. भाषण, म्हणणें. ३. विजय नांवाचें चाप, किंवा—विजयप्रद चाप—असा अर्थ. ४. इंद्रास. ५. देवांचा कारागीर; देवविशेष. विश्व (सर्व जगत्) कर्म (कृतीनें साध्य) ज्यास तो विश्वकर्मा. ६. परशुरामास. परशुराम, दाशरथी राम व बलराम हे तिघेही रामनामधारी आहेत. तेव्हां राम म्हटल्यास संदर्भानुसार यांतला एक राम घ्यावा. ७. उत्तम धनुष्य. ८. ज्या धनुष्यानें. ९. क्षत्रियरहिता. परशुरामानें एकवीस वेळां निःक्षत्रिय पृथ्वी केली, हें प्रसिद्ध आहे. त्याची आठवण देऊन त्याच धनूनें मी आज लढतों, असें सांगून कर्णानें स्वविजयाचा विशेष संभव दाखविला, त्यामुळें वीररसास पुष्टी मिळाली. १०. अर्जुनाला मारण्याविषयींची इच्छा. ११. ज्या ज्या गुणें धनंजय मजहुनि अधिक असे, तो तो [गुण] कथितों (सांगतों)—असा अन्वय. १२. गुणज्ञमंडळीं (गुण ओळखणाऱ्या समाजांत) रिपुगुण हि (शत्रूचे सद्गुण देखील) श्राव्य (ऐकण्यास योग्य) [व] स्तव्य हि (स्तुती करण्यास योग्य) होतो. गुणज्ञ [जन] शत्रूचे गुण देखील वर्णितात—असा भाव. १३. गांडीवाचा. गांडीवाचा गुण (दोरी) दिव्य (स्वर्गसंबंधी—उत्तम) आहे, कारण गांडीव देवाकडून (अग्नीकडून) मिळालें होतें. १४. कपि ही (हनुमान् देखील) विस्मयकर असे—असा अन्वय. १५. इतर कोणत्याही लोकांजवळ. १६. पांढऱ्या घोड्यांचा रथ अर्जुनास खांडवदहनाच्या पूर्वीं अग्नीनें आणून दिला होता. हा त्यापूर्वीं सोमाचा होता. (ह्या रथाविषयीं विशेष माहिती पंतकृत विराटपर्व (काव्यसंग्रह ग्रंथमाला), पृष्ठ ८२ टीप १५ मध्यें दिलेली आहे). १७. कधींही रिकामे न होणारे भाते. अन्वयः—बा! ते कल्पांतिंचे हि मेघ रिते होती (प्रळयकालीन मेघही कदाचित् रिकामे होऊन जातील) [पण] अरितेजःक्षयकरिते (शत्रूच्या शौर्याचा नाश करणारे) शरकोटि (असंख्य बाण) [जरि] वर्षती, तरि ते अक्षय भाते (अग्नीनें अर्जुनास दिलेले भाते) पूर्ण चि [रिते न होती].

हें सर्व असो. जो प्रभु रचितो [1]इच्छेकरूनि [2]विश्वास, ।
[3]तो [4]विजयाचा सारथि, [5]येच्चरणीं धरिति साधु [6]विश्वास. ॥ ३६
आहें [7]ईहीं गुणीं त्या पार्थाहुनि [8]हीन मीं नरेशा ! हें, ।
जाणें. तथापि त्यासीं झगडाया इच्छितों चि उत्साहें. ॥ ३७
यास्तव [9]पार्थाधिक म्यां [10]व्हावें, तेव्हां घडेल जय; बापा ! ।
माझें [11]विजयशरासन [12]आचार्य चि होय [13]जिष्णुच्या चापा. ॥ ३८
[14]शरपूर्ण [14]शकट, [15]शतशा [16]स्यंदन ही, सिद्ध माझिया मागें ।
चालोत रणीं. त्वां हें [17]साहित्य असें [18]किजे महाभागें. ॥ ३९
[19]अश्वांच्या हृदयांचा ज्ञाता, [20]कृष्णासमान [21]कौशल्य ।
[22]जाणतसे, जरि माझें सारथ्य करील आजि हा शल्य, ॥ ४०
तरि मीं [23]धनंजयाधिक होइन, तुज जय घडेल [24]अभ्रान्त ।

---

१. केवळ इच्छामात्रेंकरून, सहज इच्छा उत्पन्न झाल्याबरोबर. २. ब्रह्मांडास. ३. श्रीकृष्ण. ४. अर्जुनाचा. येथें मुद्दाम 'विजय' शब्द वापरून जयाचें पारडें अर्जुनाकडेच झुकत आहे असें सुचविलें आहे. ५. ज्या चरणाच्या ठायीं. ६. तारील असा भरंवसा. ७. यांनीं (या गुणांनीं). 'हे' याचें 'इहीं' हें तृतीयेचें रूप आहे. 'या गुणीं'च्या ऐवजीं 'इहीं गुणीं' असें म्हणणें म्हणजे सर्वनामाची विभक्ति नामाच्या विभक्तीप्रमाणें बदलणें, हें संस्कृत प्रयोगाचें अनुकरण आहे. ८. उणा, कमी. ९. पार्थापेक्षां अधिक श्रेष्ठ. १०. व्हावें तेव्हां=होईन तेव्हां. ११. (परशुरामानें दिलेलें) यशस्वी धनुष्य. १२. गुरूच. १३. अर्जुनाच्या. १४. शरांनीं भरलेले गाडे. १५. शतशः, शेंकडों. १६. अनेक रथ देखील. एक रथ मोडल्यास दुसऱ्या रथांत बसण्यास. अर्जुनाचा कधींच न मोडणारा रथ व अक्षय भाते यांची बरोबरी करण्याकरितां हा उपाय आहे. १७. सामग्री, उपकरणें. किंवा—साह्य, पाठपुरावा. १८. 'कीजिये' या हिंदी रूपावरून 'किजे' हें रूप निघालें असावें, असें कित्येकांचें म्हणणें आहे. १९. अश्वांच्या हृदयांचा ज्ञाता म्हणजे घोड्यांच्या स्वभावांची ज्यास पूर्ण माहिती आहे तो. अश्वशास्त्र पूर्ण जाणत असल्यामुळें युद्धांत आपल्यास हितकारक होतील त्याप्रमाणें घोडे फिरविणारा; युद्धांत अत्यंत उपयोगी—असा सांगण्याचा भाव. २०. कृष्णाच्या सारखें. २१. कौशल्य जाणणें—असा भाषणसांप्रदाय नाहीं. तेव्हां येथें 'जाणतसे' हें पद प्रशस्त दिसत नाहीं. '...आंगीं कौशल्य आहे' असें पंतांनीं म्हणावयास पाहिजे होतें. २२. [जो] जाणतसे [तो] हा शल्य—असा पुढील गीतीशीं अन्वय करून युग्मक करावें. २३. धनंजयापेक्षां अधिक. धनंजयापेक्षां माझ्यांत कांहीं गुण मूळचेच अधिक आहेत, व माझ्यापेक्षां तो ज्या गुणांनीं अधिक होता ते वरील उपायांनीं मींही मिळविले, म्हणजे मी अर्जुनापेक्षां अधिक होईन—असा भाव. २४. निःसंशय.

मग [5]मज [1]पार्थान्त सुकर, जैसा [2]क्षुब्धानिळासि [3]अभ्रान्त.' ॥ ४१
तेव्हां म्हणे सुयोधन, 'हें आहे सर्व सिद्ध. मीं [4]आंगें ।
चालेन तुझ्या मागें. [5]मज भक्ताला [6]अभीष्ट तें सांगें. ॥ ४२

---

## अध्याय [7]एकविसावा.

[8]ऐसें वदोनि गेला विनयें शल्यासमीप मग [9]राजा. ।
[10]प्रणयेंकरूनि त्यातें प्रार्थी साधावया [11]महा काजा. ॥ १
'[12]सत्यव्रता ! समर्था ! मद्राधीशा ! महारथा ! [13]साधो ! ।
वंदूनि विनवितों बा ! तुझ्या [14]प्रसादें चि कार्य हें [15]साधो. ॥ २
[16]पदर पसरिला तुजला [17]रिपुगजपंचानना ! [18]नृपांमाजी, ।
व्हावें प्रसन्न मजला; द्यावा वर एक [19]याचका आजी. ॥ ३

---

१. पार्थ+अंत=अर्जुनवध. २. क्षोभलेल्या वायूस. ३. अभ्र+अंत=मेघनाश. ४. स्वतः. ५. 'मग' असें पाठांतर. ६. ज्याची ज्याची गरज असेल तें तें. ७. ह्या ४६ गीतींच्या २१ व्या अध्यायांत पंतांनीं मुळांतील ३२ व्या अध्यायाचे ६४, ३३ व्या अध्यायाचे ६०, ३४ व्या अध्यायापैकीं १२४—अशा एकंदर २४८ श्लोकांतील कथाभाग आणिला आहे. ८. विसाव्या अध्यायाच्या शेवटीं सांगितल्याप्रमाणें. ९. दुर्योधन. १०. प्रेमानें, विनयानें. प्रणय शब्दाचे प्रेम, प्रार्थना, विनय, विश्वास व परिचय इतके अर्थ आहेत. ११. अर्जुनावर जय मिळविणें हें मोठें कार्य. 'आर्य' शब्दापासून 'अज्ज' 'आजा' असा शब्द जसा झाला, तसाच 'कार्य' शब्दापासून 'कज्ज' 'काज' असा मराठी शब्द निघाला असावा. १२. यांपैकीं प्रत्येक संबोधन साभिप्राय आहे. 'सत्यव्रता' म्हणण्याचें कारण केवळ आपलें वचन पाळण्याकरितां शल्य आपले भाचे जे पांडव त्यांसही टाकून दुर्योधनाला येऊन मिळाला होता. 'समर्था' म्हणण्याचें कारण, पांडवांच्या वेळीं अंगबळाविषयीं व मल्लयुद्धाविषयीं जे अत्यंत प्रवीण होते, त्यांत शल्याची गणना होती. ते हेः—बळराम, जरासंध, कीचक, शल्य व भीम. यांना कुस्तींत जिंकण्याचें सामर्थ्य इतर कोणासही नव्हतें. 'मद्राधीशा,' व 'महारथा' यांचा अर्थ स्पष्टच आहे. 'साधो' म्हणण्याचें कारण शल्याची सत्वगुणप्रधान वृत्ती प्रख्यात होती. ह्या गीतींत 'परिकर' नामक अलंकार आहे. १३. हे सज्जना! १४. कृपेनेंच. १५. तडीस जावो, यशस्वी होवो. १६. हें लोकोक्तीचें उदाहरण आहे. पदर पसरणें म्हणजे फारच दीन होऊन याचना करणें. भीक मागतांना पदर पसरतात, त्यावरून या लोकोक्तीचा हा अर्थ निघाला आहे. १७. शत्रुरूप हत्तीस सिंहासारखा. १८. नृपांमाजी पदर पसरिला—असा अन्वय. १९. याचना करणाऱ्यास, भीक मागणाऱ्यास.

वरदा[1] ! त्वां कर्णवचन[2] केलें चि श्रवण, सुप्रबुद्धा[3] ! तें ।
सफळ करीं; पार्थासीं व्हावा अंगेंद्र[4] योग्य युद्धातें. ॥ ४
बा ! वासुदेवसम[5] तूं जाणसि सारथ्यकर्म[6], नरनाथा ! ।
तुजसम पटु[7] अन्य नसे; म्हणवुनि मीं ठेवितों पदीं माथा. ॥ ५
ब्रह्मा[8] महेश्वराचा[9] झाला, कीं कृष्ण जेंवि विजयाचा[10], ।
सारथि[11] तूं कर्णाचा हो, वरदा ! हेतु मुख्य विजयाचा. ॥ ६
तो कृष्ण संकटीं त्या पार्थातें रक्षितो यथा[12] राया ! ।
तूं कर्णातें रक्षीं, हो[13] सेतु[13] स्वयशतोय[14] थाराया[15]. ॥ ७

---

१. वर देणाऱ्या! दुर्योधनानें शल्याच्या मार्गावरील बंदोबस्त चांगला केला होता, तेव्हां शल्य खूष होऊन, 'असा ज्यानें बंदोबस्त ठेवला तो जें मागेल तें त्यास देईन,' असें म्हणाला. या गोष्टीस उद्देशून प्रस्तुत 'वरदा' हें संबोधन आहे. २. शल्य माझा सारथी होईल, तर मी अर्जुनास जिंकीन हें कर्णाचें भाषण. ३. फार हुशार व कर्तव्य करण्यांत तत्पर अशा. ४. अंग+इंद्र=अंगदेशाचा राजा कर्ण. ५. वसुदेवाचा पुत्र जो वासुदेव (कृष्ण) त्याच्यासारखें. ६. सारथ्याचें (रथ हांकण्याचें) काम. ७. फार प्रवीण. ८. ब्रह्मदेव. ९. शिवाचा. 'शिवः शूली महेश्वरः' इत्यमरः. त्रिपुरसंहाराच्या वेळीं ब्रह्मदेव शिवाचा सारथी झाला होता. १०. अर्जुनाचा. ११. तूं कर्णाचा सारथि [हो, व अशा रीतीनें] [माझ्या] विजयाचा मुख्य हेतु (कारण) हो–असा अन्वय. १२. जसा. १३. 'हो हेतु' असा पाठभेद आहे, तो घेतला तर या चरणाचा अर्थ असा–स्वयशतोय (स्वकीर्तिरूपी पाणी) थाराया (थांबवून धरण्यास) हेतु (कारण) हो. कौरवयशरूपी पाणी वाहत चाललें आहे. बांध घालून पाण्यास अडवितात, त्याप्रमाणें तूं आडवा होऊन तें यश स्थिर कर–असा भाव. सेतु=पूल, बंधारा. १४. स्वयशतोय=सु+अयशतोय=फार अयशरूपी पाणी. आजपर्यंत जो आमचा पराभव झाला, तो एक भला जंगी पाण्याचा समुद्र; तो थाराया–तरून जाण्याकरितां सेतु (पूल) हो–असा अर्थ. या समासाचे दोन विग्रह करितां येतील:–(१) सु+अयश+तोय=उत्तम+दुष्कीर्ति+पाणी=फार दुष्कीर्तिरूपी पाणी [अर्थात् जें पुलाशिवाय तरणें दुर्लभ]. (२) स्व+यश+तोय=आपलें+यश+पाणी=आपलें यशरूपी पाणी. आतां या दोन अर्थांपैकीं कोणता अर्थ प्रस्तुत स्थळीं विशेष योग्य आहे, हें वाचकांनीं आपआपल्या परी ठरवावें. आम्हांस दुसरा अर्थ बरा दिसतो. कारण जेथें तरण्याच्या व पाण्याच्या संबंधाचें रूपक आहे, तेथें तद्द्योतक गोष्ट अनिष्ट (नको आहे अशी) असली पाहिजे, त्याशिवाय त्यांतून तरून जाण्याची इच्छा कां उत्पन्न होईल? शिवाय नेहमीं पाण्याची व समुद्राची उपमा संकटांस देतात. या समासांत एक व्याकरणदोष दिसतो. 'यशस्' शब्द संस्कृतांत सकारांत व नपुंसकलिंगी आहे. तेव्हां समास 'स्वयशस्तोय' असा व्हावयास पाहिजे होता. पण येथें 'स्वयशतोय' असा पाठ आहे. अर्थात् हा पंतांचा पाठ नसावा, असें

भीष्म, द्रोण, द्रौणी, कृतवर्मा, शकुनि, कर्ण, कृप, तूं, मीं, ।
यांहीं मारावे रिपु, साधावी निश्चयें चि निजभूमी. ॥ ८
ऐसा निश्चय पहिला; त्यामध्यें भाग आपुला भीष्में ।
वधिला, द्रोणें हि बळें आटविल्या वाहिनी, जशा ग्रीष्में. ॥ ९
रिपुनीं ते वृद्ध रणीं वधिले कपटें करूनि, त्यामागें ।
प्रकट करावा विक्रम या कर्णें, त्वां हि बा ! महाभागें. ॥ १०
बळ अल्प पांडवांचें, परि त्यांहीं फार मर्दिलें सैन्य; ।
आतां निजपक्षींचे दोघे योद्धे तुम्हीं हरा दैन्य. ॥ ११
अरुण रवीचा सारथि, दहनाचा वायु, यत्न कीं विधिचा; ।
सारथि हो तूं तैसा कर्णाचा धैर्यबळपयोनिधिचा. ॥ १२
शल्य सुयोधनवाक्यें कोपे, चोळी करें करा, डोळे ।
आरक्त करी, चावे अधरातें, फार तो मनीं पोळे. ॥ १३

---

कोणासही वाटणें साहजिक आहे. कारण व्याकरणशुद्धीविषयीं प्रख्यात व संस्कृतप्रवीण असे पंत असा अशुद्ध प्रयोग वापरतील, अशी शंका देखील कोणास यावयाची नाहीं. शिवाय 'यशस्' शब्द सकारांत योजिल्याचीं त्यांच्या काव्यांत पुष्कळ उदाहरणें आहेत:–(१) 'वर्तसि तसेंचि कीं ? तूं करिसी कीं सद्यशोर्थ अर्थेत' [सभापर्व–अ० १ गी० १६], (२) 'मातेचा स्नेहहि होय यशोहेतु साधु रामाला' [वनपर्व–अ० ३ गी० ७५]. परंतु पंतवंशज रा० पराडकर यांनीं पंतलिखित पोथीवरून छापलेल्या प्रतींत 'स्वयशतोय' असाच पाठ आहे. शिवाय येथल्याप्रमाणें यमकासाठीं पंतांनीं विसर्गाशीं लपंडाव केल्याचीं अन्य उदाहरणेंही आहेत. पंतकृत 'प्रऱ्हादविजयां'त एके ठिकाणीं 'यशशीला' असें पद योजिलेलें आढळतें. तेव्हां हा अशुद्ध प्रयोग लेखकप्रमादजन्य नव्हे, हें स्पष्टच आहे. 'स्वयश–तोय' हा समास आहे, असें न समजतां पदें निराळीं आहेत, असें समजावें; असा आमच्या एका विद्वान् मित्राचा अभिप्राय आहे. या समाधानानें कुसंधिदोष जातो खरा, पण समास असून तो न केल्याचा विसंधिदोष येतो. १५. थारणें=थांबवून धरणें, अडविणें, स्थिर करणें.

१. स्वराज्य. २. सेना, (पक्षीं) नद्या. येथें श्लेष आहे. ३. ग्रीष्मऋतूनें. ४. कपटें करूनि=निरनिराळीं कपटें करून, शाठ्यनीतीचा अवलंब करून. ५. फार कमी, कौरवांपेक्षां कमी; कारण कौरवांचें अकरा अक्षौहिणी सैन्य होतें व पांडवांचें सात अक्षौहिणी होतें. ६. विपत्ति, अपेष्टा. ७. अग्नीचा. ८. प्रयत्न, दैवास पुढें नेणारा–चालविणारा प्रयत्न. पुरुषप्रयत्नाच्या बाजूचें हें एक उत्तम वाक्य आहे. ९. प्रारब्धाचा. १०. धैर्य आणि शक्ति यांचा केवळ समुद्रच अशा कर्णाचा. ११. हातानें हाताला. १२. अधरोष्ठातें. या गीतींत 'सारा'-लंकार आहे. १३. संतप्त होई.

मग कुरुराजासि म्हणे, 'राया ! अवमानितोसि बाहूनीं,[1] ।
म्हणसि,[2] 'धरीं, सोडुनि[3] धनु-शर, हयरश्मि[4]-प्रतोद[5] बाहूनीं.[6]' ॥ १४
करिसी बहु प्रशंसा या नरवरमंडळांत[7] कर्णाची, ।
सांगसि सारथ्याची पदवी मजलागि हीनवर्णाची.[8] ॥ १५
जो राजर्षिकुलोद्भव[9] राजा मूर्धाभिषिक्त,[10] या कामीं ।
योग्य कसा ? धर्मच्युत[11] होतां पावेन केंवि नाका[12] मीं ? ॥ १६
सिंहासनोचिताला[13] मज सारथ्याधिकार[14] हा नीच ।
इच्छिसि नृपा ! कराया मत्तेजाची[15] जनांत हानी[16] च. ॥ १७
'युद्धीं दुर्बळ[17] मीं' हें गमलें तुज, म्हणउनीं च भूपा ! हें ।
सारथ्य योजिलें; तरि[18] दे दावुनि भाग,[19] शक्ति तूं पाहें. ॥ १८
सांग मला भाग, तया जिंकुनि जाईन आपुल्या देशा ।
अथवा एक[20] चि मीं रिपुबळ मर्दिन, दे मला रणादेशा.[21] ॥ १९
माझे भुज भुजगप्रभ,[22] वज्रासम कठिन, जानुवरि[23] लांब, ।

---

१. बाहून, बोलावून. २. 'म्हणसी सोडुनि धनुशर धरिं हयरश्मिप्रतोद बाहूंनीं' असें पाठांतर. ३. 'सांडुनि' असें पाठांतर. ४. घोड्यांचे लगाम. ५. चाबूक. ६. हातांनीं. ७. श्रेष्ठ राजांच्या समाजांत. ८. नीचवर्णाची, हलक्या जातीची. ९. श्रेष्ठ राजांच्या कुळांत उत्पन्न झालेला. १०. ज्याच्या मस्तकावर अभिषेक झाला आहे असा. 'राजा' ही पदवी सर्व क्षत्रियांस साधारण आहे. इतर जे क्षत्रिय—ज्यांना राज्याधिकार नाहीं—जे मूर्धाभिषिक्त नाहींत, ते सूताचें काम करोत; पण ज्याला राज्याभिषेक झाला आहे, त्याला सूताचें काम सांगणें फारच गैरवाजवी—असें तात्पर्य. कृष्णानें सारथ्याचें काम कसें स्वीकारलें ? असें कदाचित् दुर्योधन विचारील, म्हणून त्या प्रश्नाला यांत उत्तर सुचविलें आहे. कृष्ण मूर्धाभिषिक्त राजा नव्हे. कारण यादवांस राज्यार्हता नाहीं म्हणून तो सारथी झाला—असा भाव. ११. स्वधर्मच्युत. राजाचें काम सोडून सूताचें काम करणें म्हणजे स्वधर्मत्याग व परधर्मस्वीकार होय. १२. स्वर्गास. १३. सिंहासन+उचित=सिंहासनाला योग्य अशाला. १४. सारथ्याचें काम. १५. माझ्या तेजाची—पराक्रमाची. १६. भंग, तेजोहानी. 'हा नीच'—'हानीच' हें पंतांचें ठरीव यमक आहे. १७. युद्ध करण्यांत अत्यंत असमर्थ; पराक्रमहीन. १८. तरि (असें वाटत असेल तर) भाग (शत्रूकडील अमके अमके लोक मारण्याचें काम तुझें असा विभाग) दावुनि दे (दाखवून दे) [मग माझी] शक्ति तूं पाहें—हा अन्वय. १९. वांटा. माझ्या वांट्याचें काम—असा अर्थ. २० कोणाच्याही साहाय्यावांचून मी एकटाच. २१. युद्धाची आज्ञा. २२. सर्पाप्रमाणें. २३. गुडघ्यापर्यंत. आजानुबाहु असणें शौर्याचें व शुभाचें लक्षण आहे, असें म्हणतात. य गीतींतलीं सर्व विशेषणें 'भुज' शब्दाचीं आहेत.

धनुगुणघातांकित[१], हे[२] विजयप्रासादहेतु[३], शुभ खांब. ॥ २०
राया ! प्रसंग पडतां कृत्या[४] ही हात जोडितील गेंदे[५], ।
माझे शरसर्प[६], पहा, रिपुहृदयांचे चि तोडिती लगदे[७]. ॥ २१
माझा, पहा, महारथ कांचनमणिखचित[८], अश्व ही जवन[९], ।
भवन[१०] श्रीधैर्याचें[११] यांचें वपु, यां[१२] 'सखे' म्हणे पवन. ॥ २२
भूमि विदारीन[१३] शरें, तेजें शोषीन वारिराशि[१४], खरी[१५] ।
गोष्टि[१५] तुला कथितों, मीं पिष्ट[१६] करिन कौरवेश्वरा ! शिखरी[१७]. ॥ २३
ऐसा मीं, त्या मजला नीचाची काय सांगसी सेवा ? ।
नीचोच्चवैपरीत्यें[१८] पापाला पात्र होसि कां ? देवा[१९] ! ॥ २४
ब्रह्मक्षत्रांचे[२०] हे परिचारक[२१] सूत, धर्म हा उघडा[२२], ।
क्षत्रिय सूताज्ञेतें करिल, कसें युक्त हें ? नृपा सुघडा[२३] ! ॥ २५

---

१. धनुष्याच्या दोरीच्या ओढण्यानें चिन्हित. २. भुज. ३. विजयरूपी महालाचे मुख्या-भारभूत. खांबावरच सर्व इमारत असते, त्याप्रमाणें माझे हात विजयाचे आधारस्तंभ होत–असा भाव. ४. तामसदेवताविशेष. ५. (माझ्या प्रचंड) गदेला. ६. शररूपी सर्प. हीच कल्पना सभापर्व, अध्याय ७।२४ मध्यें आढळते. ७. मांसाचे गोळे. लगदे तोडणें=चावून मोठे तुकडे तोडणें. हें कृत्य व्याघ्रादि हिंस्र पशूंच्या ठिकाणीं संभवतें. सापाचे ठिकाणीं संभवत नाहीं. म्हणून येथें शरांवर व्याघ्रादिकांचें रूपक करणें योग्य झालें असतें. ८. सोनें व रत्नें यांनीं मंडित. ९. वेगवान्. १०. यांचें (या घोड्यांचें) वपु (शरीर) श्रीधैर्याचें (लक्ष्मीचें–शोभेचें व धैर्याचें) भवन (घर) [होय]. [हे घोडे धांवण्यांत पटाईत असल्यामुळें] पवन (वायु) यां (घोड्यांस) सखे (आपले मित्र–आपल्या बरोबरीचे) [असें] म्हणे–असा अन्वय. अश्वशास्त्रज्ञ शल्याच्या तोंडीं आपल्या घोड्यांची ही तारीफ फारच समर्पक आहे. ११. शोभा व धैर्य यांचें. १२. घोड्यांना. १३. दुभंगीन. १४. समुद्र. १५. खरी गोष्ट. १६. पीठ. येथें 'पिष्ट' करण्याचें साधन कोणतें त्याचा उल्लेख पंतांनीं केला नाहीं. पूर्वार्धांत उल्लेखिलेल्या गोष्टी करण्याचीं साधनें येथें सांगितलेलीं आहेत. १७. पर्वत. ह्या गीतींत '**अत्युक्ति**' नामक अलंकार आहे. जेथें शौर्य, औदार्यादि गुणांचें अद्भुत किंवा अतथ्य वर्णन केलेलें असतें, तेथें '**अत्युक्ति**' नामक अलंकार होतो. १८. नीच व उच्च यांसंबंधी विपरीत भावानें; नीचास (कर्णास) उच्च (रथी) व उच्चास (मला, शल्याला) नीच (सारथी) करून–अशा रीतीच्या विलक्षण व्यवहारानें–असा भाव. १९. सार्वभौम राजा. २०. ब्राह्मण व क्षत्रिय यांचे. २१. सेवा करणारे, नोकर. २२. स्पष्टपणें सर्वांस माहीत असा. २३. शहाण्या राजा! येथें '**व्याजस्तुति**' अलंकार आहे. जेथें वरून स्तुति, परंतु आंतून निंदा; किंवा वरून निंदा, परंतु आंतून स्तुति अशा प्रकारचें वर्णन असतें, तेथें हा अलंकार होतो.

हे दास सूत बंदी, यांहीं आम्हां नृपांसि वानावें, ।
सारथि होउनि उच्चें, जो नीच रथी तेदुक्त[1] मानावें ? ॥ २६
'हो' म्हणसी 'सूताचा सूत' भला गा ! भला मला पदवी ।
देसी, हे, 'सीमा[2] चि न सुज्ञपणातें चि' हें असें[2] वदवी. ॥ २७
जातों गृहास, झालों कृतकृत्य प्राप्तमोक्षसम[3], यज्ञ[4] ।
प्रेक्षुनि धालों[5], कीं तूं धृतराष्ट्रसुता ! गुणज्ञ[6] समयज्ञ[7].' ॥ २८
ऐसें वदोनि मग नृप वीरसमाज त्यजूनि करि गमन, ।
आटोपेना त्याचें त्यास हि अपमानकोपकरिग[8] मन. ॥ २९
तेव्हां धांवे कुरुवर, दीर्घदृढप्रेमबाहुपाशांतें[9] ।
पसरोनि शीघ्र कवळी[10], नमुनि म्हणे, 'न करिं वंध्य[11] आशांतें[12]. ॥ ३०
ऋत[13] सत्य, अयन[14] आश्रय ज्यांसि, नृपा ! ते ऋतायन ख्यात, ।

---

१. तत्+उक्त=त्याचें बोलणें. २. 'तुझ्या शहाणपणाला मर्यादाच नाहीं' असें हें तुझें करणें [मजकडून] वदवी–असा अर्थ. हें भाषण अर्थात् औपरोधिक असल्यामुळें 'मूर्खपणाला'–असा भाव. 'देसी, हे सीमा तव सुज्ञपणाचीच, हें असें वदवी'–असा पाठभेद आहे. तोही अर्थास अनुकूलच आहे. त्याचा अर्थ असा–हें (तुझें करणें, अर्थात् नीचास उच्च बनविणें व उच्चास नीच बनविणें. तुझें करणें–कर्ता) तव सुज्ञपणाचीच हे (ही) सीमा (होय), असें [आम्हांकडून] वदवी–असा अन्वय. ३. प्राप्तमोक्षसम (ज्याला मोक्ष प्राप्त झाला आहे त्याप्रमाणें) कृतकृत्य झालों, यज्ञ प्रेक्षुनि धालों–असा अन्वय. ४. रणयज्ञ. ५. संतुष्ट, तृप्त झालों. ६. मनुष्याचे गुण नीट ओळखणारा. माझ्यासारख्या शूरास सारथ्याचें काम सांगतोस, तेव्हां तुला मनुष्याची परीक्षा मुळींच नाहीं–असा भाव. ७. समय=वेळ, प्रतिज्ञा, वचन. तेव्हां समयज्ञ=(१) कोणत्या वेळीं कोणतें काम करावयाचें हें जाणणारा. दुर्योधनाला त्या समयीं शल्यासारख्या शूरांची गरज फार होती. म्हणून त्या वेळीं त्यानें अशा वीरास राग येईल असें करणें योग्य नव्हतें. पण त्यानें तसें केलें म्हणून तो समयज्ञ नव्हता–असा भाव. (२) वचनाची किंमत ओळखणारा. मी तुझ्या वतीनें भांडेन असें जें शल्यानें वचन दिलें, त्याचा अर्थ अर्थात् मला अयोग्य असें सूताचेंही काम करून तुला सहाय करीन, असा घ्यावयाचा नाहीं. पण दुर्योधनानें तसा घेतला म्हणून तो असमयज्ञ–हा भाव. ८. अपमानजन्य क्रोधरूप हत्तीप्रमाणें स्वैर गमन करणारें. ९. मोठ्या आणि दृढ अशा प्रेमरूप व बाहुरूप पाशांतें. १०. कवटाळी, आलिंगन देई. ११. विफल. १२. जयप्राप्तीविषयीं माझ्या ज्या आशा आहेत, त्यांस. १३. ऋत=सत्य, पूज्य, प्रकाशित व शिलोंछवृत्ति. प्रस्तुत स्थलीं प्रथम व शेवटील अर्थ घ्यावयाचे. शिलोंछवृत्ति म्हणजे मार्गीं पडलेले धान्यकण व शेतांत पडलेलीं कणसें वेंचणें. प्रस्तुत गीत्यर्थात 'ऋतायन' या सामासिक शब्दाचा अर्थासह विग्रह केलेला आहे. ऋत (सत्य) आहे अयन (आश्रय) ज्यांस

तद्गोत्रज[1] म्हणउनि तूं आर्तायनि[2] नाम[3] विश्वविख्यात. ॥ ३१
शत्रूंच्या हृदयीं तूं शल्य[4] म्हणुनि 'शल्य' म्हणति तुज राया ! ।
कुब्जेसि[5] कृष्णसा तूं पटु[6] मज्जयसिद्धिलागि[7] उजराया[8]. ॥ ३२
बहु विक्रम कर्णाचा, न्यून पराक्रम तुझा असें न मनीं[9]; ।
असतें जरि तरि माजें शिर होतें सिद्ध हें कसें नमनीं[10] ? ॥ ३३
कर्णाहुनि मजहुनि तूं अधिक, अधिक यादवाधिपाहूनीं[11], ।
व्हावें प्रभो ! वरप्रद[12] मज, आजि पराभवाधि[13] पाहूनीं. ॥ ३४
पार्थाहुनि कर्णाला, कृष्णाहुनि अधिक जाणतों तुजला; ।
जयवांच्छा पुरवीं, हो सारथि, हा[14] जन न पाहिजे सुजला[15]. ॥ ३५
हयहृदय कृष्ण जाणे, त्याहुनि तूं द्विगुण जाणसी माम्या[16] ! ।

---

ते ऋतायन–सत्यपरायण–असा भाव. या अर्थातील सार्थ विग्रहाची पद्धत संस्कृत काव्यांवरील मल्लिनाथादिकांच्या टीकाग्रंथांतली आहे. यावरून पंतांनीं काव्यांचा योग्य तऱ्हेनें अभ्यास केला होता, असें म्हणण्यास हरकत नाहीं. १४. 'अयन' शब्दाचा मूळचा अर्थ 'मार्ग' 'रस्ता'–असा आहे. पण येथें त्याचा 'आधार,' 'आश्रय,' असा अर्थ घेतला आहे.

१. त्यांच्या गोत्रांत म्हणजे वंशांत उत्पन्न झालेला. २. ऋतायनपुत्र शल्य. ३. नांवाचा. ४. बाणाग्र. (पुढें अध्याय २३।१२ पद्य). ५. कुब्जा (कुबडी) ही सुगंधिक लेपनद्रव्यें तयार करणारी कंसाची दासी होती. बळिराम व कृष्ण हे कंसवधाकरितां जेव्हां मथुरापुरींत गेले, तेव्हां ही त्यांस रस्त्यावर दिसली. ही कृष्णाच्या रूपास मोहित झाली, व त्यास तिनें सुगंधिक द्रव्यें दिलीं. ही तीन ठिकाणीं वक्र होती. पण कृष्णानें तिचें कुबड नाहींसें करून तिला फार सुंदर रूप दिलें–या गोष्टीचा येथें उल्लेख आहे. ६. समर्थ. ७. मला जय प्राप्त करून देण्याविषयीं. प्रस्तुत माझा जय वांकडा आहे, माझ्या विरुद्ध आहे–त्यास सुस्थितीस आणण्यास—असा ध्वनितार्थ. ८. नीट करण्यास, सुधारण्यास, चांगल्या दशेला आणण्यास. ९. (माझ्या) मनांत. १०. तुला नमस्कार करण्यास. ११. कृष्णाहून. १२. इष्ट वर देणारा. १३. पराजयरूप आधि (व्यथा). १४. हा जन (मी दुर्योधन) [तुझ्याकरितां] सुजला न पाहिजे. सुजणार नाहीं असें कर–लौकर याची प्रार्थना स्वीकार–असा भाव. १५. सुजणें=अप्राप्त वस्तूविषयीं अत्यासक्त होणें. 'सुजणें' या शब्दानें अत्यंत आसक्ति, हांव, उत्कट इच्छा, यांचा बोध होतो. कोणा मनुष्यास कोणता एकादा पदार्थ खाण्याची इच्छा झाल्यास आणि त्याला तो पदार्थ न मिळाल्यास पोटाला बेंबीजवळ सूज येते, आणि त्यास तो पदार्थ मिळाला म्हणजे ती सूज उतरते–अशी समजूत आहे. यावरून 'सुजणें' शब्दाचा वरील अर्थ झाला आहे. 'सुजणें' या शब्दाचा उपयोग या अर्थी पंतांनीं अन्यत्र केला आहे. (उद्योगपर्व, अध्याय ७।१७ व ६५ पद्य). १६. शल्य पांडवांचा मामा म्हणून दुर्योधनाचाही मामाच. येथील 'माम्या' हें रूप चिन्त्य आहे. पंतांनीं

भुजयुद्धीं हि परिसिली न बळासि, तुझीच आण, सीमा, म्या. ॥ ३६
पार्थाधिक कर्ण तसा कृष्णाधिक तूं, म्हणोनि सार थिर्तो, ।
सुगुण न लोपीं, प्रकटीं; वरिली विधिनें हि शंभुसारथिता. ॥ ३७
शल्य म्हणे, 'राया ! मज राजसमूहांत हात जोडूनी, ।
म्हणसी 'कृष्णाधिक,' हें दुर्लभ यश; जात नाहिं सोडूनीं. ॥ ३८
झालों प्रसन्न, तुज मीं वर देतों, घे, करीन सारथ्य, ।
पथ्यअपथ्य न म्हणतां परि सोसावें, मदुक्त हें तथ्य. ॥ ३९
सारथि होतों परि मीं प्रभु सूतातें म्हणेंन कां 'हां जी ?' ।
गांजीन परि सहावें; म्हणिजे वैद्यें दिली सुधा कांजी.' ॥ ४०

---

'मामा' असें रूप अनेक ठिकाणीं योजिलें आहे, पण यमकासाठीं 'माम्या' असें रूप क्वचित् वापरिलें आहे (शल्यपर्व–अध्याय १ गीति ७८).

१. अन्वय व अर्थः–माम्या! तुझीच आण. (तुझी शपथ आहे, मी खोटें बोलून मुखस्तुती करीत असेन तर–असा भाव). म्यां [तुझ्या] बळासि भुजयुद्धीं हि सीमा परिसिली न (पाहिली नाहीं). बळासि सीमा म्हणजे बळ वाढत वाढत जाऊन, कांहीं वेळानें तिची वाढ खुंटते ती जागा. दुर्योधन म्हणतो, कीं बाहुयुद्धांत शल्याचें बल सदा वाढतच जातें. तिची वाढ खुंटली–म्हणजे आतां यापेक्षां शल्यास अधिक बल नाहीं, असें समजण्याचा प्रसंग कधींच येत नाहीं. २. 'परिसिला' असा रा० पराडकर यांच्या प्रतींत पाठ आहे. पण तो चुकीचा दिसतो. कारण संस्कृतांत 'सीमा' शब्द दोन आहेत. एक नकारांत व दुसरा आकारांत. पण दोन्हीही शब्द स्त्रीलिंगी आहेत. तेव्हां 'परिसिली' हाच योग्य पाठ समजला पाहिजे. ३. 'भुजयुद्धीं हि परिसिली न बळाची तुझीच आण सीमा म्यां' असें पाठांतर. याचा अन्वयः–म्यां भुजयुद्धीं हि तुझीच सीमा परिसिली. बळाची (बळभद्राची, बळरामाची) [सीमा] न [परिसिली.] आण (शपथ आहे.)–असा करावा. येथें सीमा=पराकाष्ठा. प्रख्यात बळराम याहूनही तूं भुजयुद्धांत प्रवीण–असा भाव. ४. सारभूत जो सुगुण (तुझ्या ठिकाणीं असणारा उत्तम गुण) तो थिता (स्वल्प) म्हणून न लोपीं–असा अर्थ. 'स्वगुण न लोपीं' असा पाठभेद. ५. महादेवानें देखील. ६. शंभूच्या सारथ्याचें काम. ७. [मी तुम्हांस] सोडूनीं [स्वदेशा] जात नाहिं, किंवा हें दुर्लभ यश सोडूनीं [मी पांडवांकडे] जात नाहीं. ८. पथ्यअपथ्य=हें हितप्रद आहे, हें अहितप्रद आहे असें. ९. गुपचुप ऐकून घ्यावें; प्रत्युत्तर करूं नये. १०. मी जें जें म्हणेन तें तें. ११. सत्य. १२. राजा, क्षत्रिय. १३. नम्रतासूचक वचन. १४. शब्दांनीं फार त्रास देईन; तुम्हांस आवडणार नाहींत असे कडु शब्द बोलेन. १५. वैद्यें दिली (दिलेली) कांजी (पेज) सुधा (अमृतच आहे असें) म्हणिजे–असा अन्वय. हें वाक्य सुभाषितरूप आहे. १६. पेज.

कर्ण-सुयोधन म्हणती, 'केलें मान्य त्वदुक्त[1] बापा ! हें; ।
अंगीकृतकार्याच्या[2] निर्वाहीं[3] सुयश. तूं हि बा ! पाहें.'[4] ॥ ४१
शल्यें[5] सारथ्याचा केला स्वीकार; तेधवां यांस ।
कुरुपति कथि इतिहास त्रिपुराचा[6], चित्त हृष्टवायास[7]. ॥ ४२
विश्रुतविभव[8], वरप्रद[9], विभु[10], वेदावास[11], विश्व जो रचितो, ।
सुरकार्यगौरवास्तव[12] हरसारथि होय; तदपि थोर चि[13] तो. ॥ ४३
गाय, श्रवण कराया, योग्य[14], परि ग्रंथविस्तराकरितां[15] ।

---

१. तुझें म्हणणें. २. स्वीकारलेल्या कामाच्या; सारथ्य करून तुला विजय मिळवून देईन, असें जें तुम्हीं कबूल केलें आहे, त्याच्या. ३. शेवटास नेण्यांत; साधून देण्यांत. ४. 'असे' हें अध्याहृत क्रियापद. ५. शल्यास. ६. त्रिपुरसंहाराचा इतिहास. मुळांत ही कथा फारच विस्तृत रीतीनें सांगितली आहे. तिचा सारांश असाः–तारकासुराच्या वधानंतर, विद्युन्माली, तारकाक्ष व कमलाक्ष या नांवाच्या त्याच्या तिघां मुलांनीं ब्रह्मदेवाच्या वरेंकरून लोह, रजत व सुवर्ण यांचीं तीन फिरतीं पुरें निर्मून घेतलीं. नंतर तारकाक्षाच्या मुलानें तपश्चर्या करून आपल्या पुरांत अशी एक विहीर निर्माण केली कीं, तिच्यांत कोणत्याही मृतदानवास बुडविल्या-बरोबर त्यांतून तितक्याच बलाचे दहा दानव उत्पन्न व्हावेत ! अशा रीतीनें प्रबल होऊन पुरत्रयांतील असुरत्रय जगत्रयास पीडूं लागले. तेव्हां सर्व देव ब्रह्मदेवास पुढें करून महादेवा-कडे गेले व त्या सर्वांनीं आपण पशु होऊन, महादेवास पशुपतित्व दिलें. तेव्हां महादेवानें पृथ्वीस रथस्थानीं, सूर्यचंद्रांस रथचक्रस्थानीं, चार वेदांस अश्वांच्या स्थानीं, ब्रह्मदेवास सारथ्याच्या स्थानीं व विष्णूस बाणस्थानीं कल्पून, तीं तीन पुरें समसूत्रांत आल्याबरोबर त्यांचा एकाच बाणानें नाश केला. ब्रह्मदेव सारथी झाला होता, हें शल्यास सांगण्याकरितां ही कथा येथें सांगितलेली आहे. ७. संतुष्ट करावयास. 'तुष्ट व्हायास' असें पाठांतर. व्हायास= व्हावयास, होण्यास. ८. विश्रुत (विख्यात) आहे विभव (ऐश्वर्य, वैभव) ज्याचें. या गीत्यर्धांत वकाराचा सुरेख **अनुप्रास** आहे. ९. वर देणारा. या अर्धातील सर्व विशेषणें ब्रह्मदेवाचीं आहेत. १०. व्यापक, सर्वशक्तिमान. ११. वेदांचें स्थानच असा. आवास=गृह. १२. देवांच्या कार्याचें मोठेपण (महत्व) जाणून. देवांचें मोठें काम होतें म्हणून. १३. ब्रह्मदेव. १४. पंत म्हणतात त्याप्रमाणें त्रिपुरसंहाराची कथा फारच योग्य आहे. जुन्या लोकांस पौराणिक कथा या नात्यानें फारच सुरस आहे, यांत संशय नाहीं. पण इतरांसही ही कथा अत्यंत बोधप्रद आहे. स्वराष्ट्रहित साधण्याकरितां ऐक्याची किती आवश्यकता असते, असल्या प्रसंगीं सर्वांनीं एकास पुढारीपण देऊन बाकीच्यांनीं त्याच्या पूर्ण आज्ञेत (सेवकाप्रमाणें) वागणें किती जरूर आहे, मोठमोठ्या लोकांनीं असल्या प्रसंगीं हलकेंही काम करण्यास मागेंपुढें पाहूं नये, इत्यादि उपदेश या कथेंत भरलेला आहे. नवीन तऱ्हेच्या कीर्तनांत ही कथा उत्तम शोभेल. पण असली उत्तम कथा पंतांनीं, नाइलाजानें कां होईना, गाळिली हें आमचें दुर्दैवच होय.

इतिहास गाळिला हा; झाला श्रम[1] मज हि चित्तें[2] आवरितां. ॥ ४४
सांगोनि त्रिपुरदहन-इतिहास प्रथम, मग दुजा[3] राया ।
कथि 'अकुलज[4] कर्ण' अशा शल्याच्या संशयासि वाराया. ॥ ४५
'माझ्या तातापासीं[5] ब्राह्मण इतिहास सांगता झाला, ।
मद्रेश्वरा ! परिस तूं, ज्यातें ऐकोनि मत्पिता धाला[6].' ॥ ४६

---

## अध्याय बाविसावा[7].

'भृगु[8]वंशीं जमदग्नी मुनि झाला; त्यासि होय सुत राम[9]; ।
तो करि रुद्राराधन[10], अस्त्रांचा धरुनि मानसीं काम. ॥ १
त्याच्या विशुद्धभावें[11] होउनि संतुष्ट भेटला भर्ग[12], ।
ज्या प्रभुच्या[13] भक्तांचें दास्य करिति सिद्धिकिंकरीवर्ग[14]. ॥ २
भगवान् महेश्वर[15] म्हणे, 'रामा ! झालों प्रसन्न मीं दाता, ।
कळलें वांच्छित[16], होसिल शुचि[17] तैं[18] येईल वर तुज्या हाता. ॥ ३

---

१५. ग्रंथ फार वाढेल म्हणून. इतर पदार्थांच्या बाहुल्यास 'विस्तार' व शब्दबाहुल्यास 'विस्तर' म्हणतात. 'विस्तारो विग्रहो व्यासः स तु शब्दस्य विस्तरः' इत्यमरः. पंतांनीं आपली ग्रंथविस्तर-भीति अनेक ठिकाणीं व्यक्त केली आहे. पण त्या सर्वस्थलांत प्रस्तुत स्थल मुख्य आहे. कारण आपणास फार आवडणारी अशी सबंध कथा पंतांनीं येथें गाळिली आहे. असें करण्याचें कारण त्यांनीं भारताच्या प्रारंभीं केलेली प्रतिज्ञा होयः—'व्यासकृत महाभारत लक्ष ग्रंथ प्रसिद्ध हा भारी। आर्यावृत्तें रचितों; स्वल्पांतच्चि आणितों कथा सारी. ॥' [आदि० अ० १. गी० ९].

१. 'भ्रम' असा पाठभेद. पंतांस 'भ्रम' झाला कीं 'श्रम' झाला? 'श्रम झाले' असा भाषणसांप्रदाय आहे, 'श्रम झाला' असा नाहीं. तेव्हां 'भ्रम झाला' असा खरा पाठ असावा. पण रा० पराडकर यांच्या प्रतींत 'श्रम झाला' असाच पाठ आहे. २. त्रिपुरसंहाराचा इतिहास गाळूं नये म्हणून सांगणाऱ्या मनास दाबून ठेवितांना. ३. दुसरा इतिहास. पहिल्या इतिहासा-पेक्षां हा दुसरा इतिहास गाळून टाकला असता तर विशेष हरकत नव्हती. पण कवीची इच्छा ! ४. असत्कुलोत्पन्न. ५. धृतराष्ट्रापाशीं. [ही कथा दुर्योधन शल्यास सांगत आहे, हें लक्षांत असावें]. ६. संतुष्ट झाला. ७. यांत मूळ अध्याय ३४ श्लोक १२५–१५८ यांतील कथाभाग आला आहे. ८. भृगु—एक प्रख्यात ऋषि. ९. परशुराम; भार्गवराम. १०. शिवाची आराधना. ११. निर्मल भक्तीनें. १२. महादेव. १३. त्या भर्गप्रभुच्या. १४. सिद्धिनामक दासीसमूह, सिद्धि=अणिमादि अष्ट सिद्धि. १५. शिव. १६. तुला काय पाहिजे तें. १७. अत्यंत परिशुद्ध, सर्व दोषरहित. १८. तेव्हां.

शुद्ध करावा आत्मा; अस्त्रें देईन शुद्धि पाहोनी; ।
[1]भद्र न करिति [2]अपात्रीं, होति अहित तीं मनांत राहोनीं.' ॥ ४
मस्तक ठेवुनि चरणीं राम म्हणे, 'भक्तवत्सला ! देवा ! ।
[3]जाणोनि पवित्र मला द्या अस्त्रें, [4]तों करीन मी सेवा. ॥ ५
होईन योग्य जेव्हां [5]वरदगुरो ! [6]अस्त्रधारणीं हा मीं, ।
तेव्हां तुम्हींच देवा ! सर्वज्ञा ! अस्त्रदान द्या स्वामी !' ॥ ६
ऐसें विनउनि भावें बहु वर्षें [7]ईश्वरासि आराधी; ।
[8]त्याची, जाय न पळ ही सोडुनि त्या [9]वेदशास्त्रसारा, [10]धी. ॥ ७
[11]देव प्रसन्न होउनि सुरपितरांच्या समक्ष रामातें, ।
[12]स्त्रीपाशीं वाखाणी कीं, 'वाटे राम बहु बरा मातें. ॥ ८
[13]गौरि ! [14]प्रणताभयदे ! देवि ! [15]असो [16]साधु या-असा हा ची. ।
भक्ति [17]दृढव्रत करितो [18]चातकखग जेंवि [19]वारिवाहाची.' ॥ ९

---

१. कल्याण. २. अपात्रीं (अयोग्य मनुष्याचे ठायीं, योग्यतारहित मनुष्याजवळ राहिल्यास) तीं (अस्त्रें) भद्र न करिति (कल्याण करीत नाहींत). [उलट] मनांत राहोनीं (अयोग्य मनुष्यास तीं शस्त्रें वापरतां येत नसल्यामुळें, त्यांस तो मनांत ठेवतो म्हणजे कामाशिवाय राहूं देतो-अशा रीतीनें राहून तीं) अहित (अहित करणारीं-कर्त्याचाच नाश करणारीं) होति-असा अन्वय. ३. मला पवित्र जाणोनि=मी पवित्र झालों असें तुम्हाला वाटेल तेव्हां. ४. तोंपर्यंत. ५. वरदात्यांत श्रेष्ठा. ६. अस्त्र स्वीकारण्यांत. ७. शंकरास. 'ईश्वर'शब्द कोशांत शंकर-पर्यायच आहे. 'ईश्वरः शर्व ईशानः शंकरश्चंद्रशेखरः'-अमर. ८. त्याची (त्या परशुरामाची) धी (बुद्धि) त्या वेदशास्त्रसारा (शंकरा) सोडुनि पळ[भर]हि [इतरत्र] न जाय-असा अन्वय. नेहमीं शंकराचेंच ध्यान करीत असे-असा भाव. ९. वेदशास्त्र यांमधला सारभूत जो शंकर त्यास. चार वेद व षट्शास्त्रें यांत प्रतिपादिलेल्या सर्व विषयांचा मथितार्थ काढला, तर त्यांत शिवाचें माहात्म्यच निघेल-असा भाव. १०. बुद्धि. ११. शंकर. १२. पार्वतीपाशीं. १३. पार्वतीस 'गौरी' हें नांव पडण्याचें असें कारण झालें कीं, ती पूर्वी काली (काळी) असल्यामुळें महादेवानें एकदां तिची थट्टा केली. तेव्हां ती रागावून तपश्चर्या करून गौरी (गोरी) झाली. १४. नम्र झालेल्यांस अभय देणारे. १५. या-असा (हा जसा आहे तसा-याच्या सारखा) साधु हा ची (हाच) असो-असा अन्वय. याच्यासारखा साधु हाच-दुसरा कोणीही नाहीं-असा भाव. येथें 'अनन्वया'लंकार आहे. 'अनन्वयां'त 'असमा'लंकाराचाही ध्वनि असतो. १६. सुजन, पुण्यात्मा. १७. दृढ आहे व्रत (नियम) ज्याचें असा. १८. चातकनामक पक्षी. १९. मेघाची.

ऐसें [1]असतां देवांदैत्यांसीं युद्ध होय, तों खळ [2]ते ।
करिति पराभव, तेव्हां सर्व हि [3]सुरवीर जाहले पळते. ॥ १०
आले शरण प्रमुख सुर, म्हंणती, '[4]ईश्वरा ! [5]स्मराराते ! ।
दैत्य न मरती, हरती [6]युष्मद्दत्ताधिकार [7]सारा, ते.' ॥ ११
भगवान् [8]भूतेश म्हणे, '[9]भ्यालां कां भागलां ? भलें कळलें. ।
आलां धांवत, कथिलें मज, आतां सर्व विघ्न तें टळलें.' ॥ १२
प्रभुनें असी [10]प्रतिज्ञा केली, मग राम [11]बाहिला जवळी; ।
तो येउनि सद्भावें [12]स्वें उरीं [13]प्रभुपादपंकजें कवळी. ॥ १३
शंभु म्हणे, 'रामा ! हे सुर असुरानीं [14]जितोनि पळवीले, ।
[15]यांहीं मज निजताप स्वमुखें येऊनि सर्व कळवीले. ॥ १४
यास्तव लोकहितार्थ त्वरित चि होवूनि सिद्ध, दैत्यांतें ।
तूं [16]मत्प्रियार्थ नाशीं, [17]चंडकर जसा समस्त [18]शैल्यांतें.' ॥ १५
राम म्हणे, 'देवेशा[19] ! [20]अस्त्रज्ञप्रबळदैत्यखळदमनीं ।
[21]अकृतास्त्रा मज कैंची शक्ति ? पहा तूं चि [22]भद्रबळद मनीं.' ॥ १६
शर्व म्हणे, 'वत्सा ! तूं जा माथां धरुनियां मदाज्ञा [23]ते; ।

---

१. अशा रीतीनें रामावर शिवपार्वतींची कृपा असतां. २. दैत्य. ३. देवयोद्धे. ४. 'ईश्वर' शब्द शंकराच्याच ठायीं अन्वर्थक आहे, अशाविषयीं कालिदासानें विक्रमोर्वशीयांत म्हटलें आहे कीं:-'यस्मिन्नीश्वर इत्यनन्यविषयः शब्दो यथार्थाक्षरः' [नांदी] (म्हणजे दुसऱ्यास लागू न होणारा ईश्वर शब्द ज्या (शंकराच्या) ठायींच अन्वर्थक होतो). ५. स्मर+अराते=मदन+शत्रु. तत्संबोधन. ६. युष्मत्+दत्त+अधिकार=तुम्हीं दिलेला अधिकार. ७. सर्व. ८. शंकर. ९. कां भ्यालां ? कां भागलां ? भिण्याचें व भागण्याचें कांहींच कारण नव्हतें-असा भाव. [मला दानवांचें दुष्कर्म] कळलें [हें] भलें (चांगलें) [झालें]. धांवत आलां [व] मज कथिलें. आतां (याउपर) तें सर्व विघ्न टळलें [असें समजा]-असा अन्वय. १०. वचन. वचन दिलें-असा भाव. ११. बोलाविला. १२. आपल्या. 'स्व' हें विशेषण आहे. त्याचा विशेष्याशीं समास झालाच पाहिजे असें नाहीं. १३. महादेवाचीं पदकमलें. १४. जिंकून. 'जिकोनि' असा रा० पराडकर यांच्या प्रतींत पाठ आहे. १५. या देवांनीं. १६. माझ्या प्रियाकरितां. १७. चंड आहेत किरण ज्याचे असा सूर्य. १८. थंडीला. १९. देवांच्या ईशा. २०. अस्त्र जाणते आणि बलवान जे दैत्य व इतर दुष्ट जन त्यांच्या नाशाविषयीं. २१. अस्त्ररहित अशा. २२. मंगल व शक्तिदाता. २३. ती मी दिलेली आज्ञा.

रिपु वधिशील; [1]मदुक्तीं धरिती विश्वास दृढ सदा ज्ञाते.' ॥ १७
[2]अभयवराशीर्वादें गौरवितां प्रभुपदीं करी नमना, ।
राम [3]कृतस्वस्त्ययन त्वरित निघे [4]दैत्यवाहिनीदमना. ॥ १८
भार्गव जाउनि गांठी दैत्यांतें, रण करावया [5]बोहे, ।
गर्जोनि म्हणे, 'प्रभुनें तुमच्या मथनार्थ धाडिलें आहे.' ॥ १९
भार्गववचनें झाले ते [6]दुर्मद [7]दैत्यदानव क्रुद्ध, ।
करिती त्या एकासीं, [8]उग्रायुधवृष्टि सोडुनी, युद्ध. ॥ २०
तो राम त्यां खळांतें [9]वज्रसमस्पर्शबाणनिकरानें ।
ताडुनि विकळ करि रणीं, ते ही पीडिति तयासि [10]निकरानें. ॥ २१
[11]दानवशस्त्रक्षततनु तो [12]रक्तस्नात राम जों झाला, ।
तत्काळ तेथ भगवान् [13]भव [14]भक्तभवान्तक स्वयें आला. ॥ २२
स्पर्शे [15]पिनाकपाणी परमेश्वर [16]पूतपाणिपद्मानें, ।
त्या रामासि विलोकी [17]नयनयुगें [18]सुप्रसादसद्मानें. ॥ २३

---

१. माझ्या म्हणण्यावर. २. अभयवर व आशीर्वाद यांहींकरून. ३. पुण्याहवाचन, गणपतिपूजनादि केलेला. ४. दैत्यसेनेच्या नाशार्थ. ५. बोलावी. ६. अत्यंत गर्वयुक्त. ७. दैत्य, दानव व देव हे सर्व सावत्रभाऊ होत. या सर्वांचा पिता कश्यपमहर्षि. दैत्यांची आई दिति, दानवांची दनु व देवांची अदिति. या सर्व दक्षाच्या मुली असून बहिणीबहिणीच होत्या. ८. भयंकर आयुधांचा पाऊस. ९. ज्याचा वज्रासारखा स्पर्श आहे, अशा बाणसमूहानें. १०. जोरानें. ११. दानवांच्या शस्त्रांनीं क्षत (घायाळ) झाली आहे तनु (शरीर) ज्याची तो (राम). १२. रक्तानें स्नान केलेला. १३. शिव. येथें **विरोधाभास** अलंकार झाला आहे. शिवास प्रथम 'भव' म्हणून, पुढच्याच शब्दांत त्यास 'भवांतक' म्हटलें आहे. तेव्हां भवच भवांतक कसा होऊं शकेल ? अशी सकृद्दर्शनीं शंका येण्याचा संभव आहे. पण या दोन 'भव' शब्दांचे निरनिराळे दोन अर्थ असल्यामुळें हा खरोखर विरोध नाहीं. (पहिला) भव=शंकर. (दुसरा) भव=संसार. याच अलंकारास **विरोध**ही म्हणतात. याचें लक्षणः–'**विरोधः** सोऽविरोधेऽपि विरुद्धत्वेन यद्वचः' [काव्यप्रकाश]. खरोखर विरोध नसतां विरोधाप्रमाणें जी शब्दांची मांडणी, तिला **विरोध** म्हणतात. यांत खरोखर विरोध नसतो; विरोधाचा केवळ आभास होतो. १४. भक्तजनांचा संसारनाशक. या चरणद्वयांत भकाराची कर्णमधुर आवृत्ति झाली आहे. १५. शंकर. पिनाक (तन्नामक धनु) आहे पाणींत (हातांत) ज्याच्या तो पिनाकपाणी. शंकराच्या धनुष्याचें नांव पिनाक आहे. १६. पवित्र हस्तकमलानें. १७. नेत्रद्वयानें. १८. सुप्रसादाचें (अत्यंत कृपेचें) सद्म (घर) त्यानें. हें 'नयनयुगा'चें विशेषण. शंकराचे नयन म्हणजे दयेचें माहेरघरच होत–असा भाव.

[1]पावन पाणिस्पर्शें केला तत्काळ दिव्यतनु राम, ।
परमेश्वरें पुरविले [2]पदपद्मपरागपूतजनकाम. ॥ २४
भगवंत म्हणे, 'वत्सा ! [3]शस्त्रनिपातें [4]कलेवरीं पीडा, ।
झाली [5]तुज चि न, मज ही, बापा ! [6]मच्चित्तहंससन्नीडा ! ॥ २५
करुनि [8]मदाज्ञा, धैर्यें [9]दुःसहशस्त्रप्रहार साहोनी, ।
[10]मानुषकर्मापासुनि [11]सुटलासि [12]भवान्तरा न [13]पाहोनी. ॥ २६
[14]सर्ववरास्त्रग्रहणीं आतां झालासि योग्य, घे, साधो ! ।
[15]आधोरण [16]शत्रुगजीं हो, वत्सा ! [17]भवदभीष्ट तें [18]साधो.' ॥ २७
[19]एवं प्रसन्न झाला रामावरि [20]सर्वलोकगुरु [21]शर्व, ।
[22]दे सर्वास्त्रें त्यातें [23]वरदर्षभ तो अभीष्टवर सर्व. ॥ २८

---

१. राम पाणिस्पर्शें (हस्ताचा स्पर्श करून) पावन (पवित्र) [व] तत्काळ (हस्तस्पर्श होतांच) दिव्यतनु केला-असा अन्वय. २. पादकमलपरागानें म्हणजे धुळीनें पवित्र अशा जनांचे हेतु. पकाराची पुनःपुन्हां आवृत्ति झाली म्हणून हा **वृत्त्यनुप्रास.** ३. शस्त्राच्या माऱ्यानें. ४. (तुझ्या) शरीरास. ५. तुज चि (तुलाच) पीडा झाली [असें] न (नाहीं) [तर] मज ही (मला देखील) पीडा झाली-असा अन्वय. यांत शंकरानें आपलें भक्तवात्सल्य दाखविलें आहे. भक्ताला झालेली पीडा मलाच झाल्यासारखी होय-असा सांगण्याचा भाव. ६. मत्+चित्त +हंस+सत्+नीडा=माझ्या चित्तरूप हंसाच्या उत्तम घरट्या ! ७. या शब्दानें शंकरानें असें सुचविलें आहे, कीं हंस ज्याप्रमाणें घरट्यांत असतो त्याप्रमाणें माझें चित्त नेहमीं माझ्या भक्तांच्या ठायीं असतें. मी भक्ताधीन आहें. घरट्यास धक्का लागल्याबरोबर ज्याप्रमाणें आंतील पक्ष्यास त्रास होतो, त्याप्रमाणें माझ्या भक्तांस दुःख झाल्याबरोबर माझें चित्त विव्हल होतें, असेंही यांत सुचविलें आहे. असे या सुंदर सामासिक पदांपासून पुष्कळ अर्थ निघतात. ८. दैत्यांबरोबर युद्ध करण्यास जा-अशी माझी आज्ञा. ९. सोसण्यास कठीण असा शस्त्रांचा मारा. १०. मनुष्याच्या जन्मांतरास कारण होणाऱ्या कर्मांपासून. ११. तुझ्या कर्मांचा नाश झाला; तूं मानवगुणास सोडून देवगुणी झालास-असा भाव. १२. जन्मांतरा, अन्य जन्म. आतां तुला जन्ममरणदुःख नाहीं-असा भाव. परशुराम चिरंजीवी आहे, हें येथें लक्षांत असावें. १३. न पाहतां. १४. अत्यंत श्रेष्ठ अस्त्रें स्वीकारण्यास. १५. महात. १६. शत्रुरूप गजावर. १७. भवत्+अभीष्ट=तुझें इष्ट. १८. संपादो, घडो. १९. अशा प्रकारें. २०. सर्व जगाचा गुरू किंवा सर्व लोकांत श्रेष्ठ. २१. शंकर. प्रलये भूतानि शृणाति हिनस्तीति शर्वः. 'शॄ हिंसायाम्.' प्रलयकालीं सर्व लोकांस मारतो म्हणून शर्व. २२. तो वरदर्षभ [शर्व] त्यातें (रामातें) सर्वास्त्रें [व] सर्व अभीष्टवर दे-असा अन्वय. २३. वरद+ऋषभ=वर देणारे+बैल

चरणीं वाहुनि मस्तकपद्म पुन्हां तत्प्रसाद घे नमुनी, ।
आज्ञा प्रभुची होतां, येता झाला निजाश्रमास[1] मुनी[2].' ॥ २९
ऋषि[3] हे ऐसी सांगे तातासि[4] कथा. असा[5] शिवच्छात्र[6] ।
भार्गव[7]. तेणें केला[8] स्वधनुर्वेदासि[9] कर्ण हा पात्र[10]. ॥ ३०
तिळमात्र[11] हि जरि पातक[12] असतें, तरि सर्वथा भृगूत्तम तो ।
याकारणें[13] न देता दिव्यास्त्रें; यावरूनि[14] शुचि गमतो. ॥ ३१
सूतकुळीं[15] हि न झाला, मज वाटे देवपुत्र[16] हा कर्ण; ।
क्षत्रकुळीं च उपजला, हें याचा स्पष्ट सूचवी वर्ण[17]. ॥ ३२
लोकांत[18] प्रकट न हो कुळ, कारण एक हें चि सत्य, जिला ।
झाला, तिणें उपजतां बाळपणीं[19] करुनि साहस[20] त्यजिला. ॥ ३३
हा दीर्घभुज[21] सकुंडलकवच[22] उपजतां[23] चि बाळ[24] भास्करसा, ।

---

(श्रेष्ठ)=वर देणाऱ्यांत श्रेष्ठ. सिंह, शार्दूल, ऋषभ इत्यादि शब्द श्रेष्ठतावाचक आहेत. 'सिंह-शार्दूलनागाद्याः पुंसि श्रेष्ठार्थवाचकाः'-अमर. शंकर वर देण्यांत मोठा भोळा आहे, पाहिजे त्यास पाहिजे तो वर देतो हें प्रख्यात आहे. म्हणून त्यास 'वरदर्षभ' हें नांव अन्वर्थक आहे.

१. पांडवांच्या वेळेस परशुरामाचा आश्रम पूर्वसमुद्राजवळील महेंद्रपर्वतावर होता. २. परशुराम. ३. धर्मप्रवीण नांवाचा ब्राह्मण. ४. माझ्या बापास; धृतराष्ट्रास. ५. वर वर्णिलेल्या प्रकारचा. ६. शिवशिष्य. ७. भृगुकुलोत्पन्न परशुराम. ८. त्या परशुरामानें. ९. आपल्या धनुर्विद्येस. १०. पात्र केला=योग्य म्हणून ठरविला. येथें योग्य म्हणून धनुर्वेद पढविला-असा भाव. ११. अत्यल्प देखील. १२. नीचकुलांत जन्मल्याचें पातक. १३. या कर्णाकारणें; या कर्णास. अत्यंत जो शुचि असेल, त्यासच अस्त्रें देण्याविषयीं शंकराचा उपदेश होता, म्हणून कर्ण जर अकुलज असता, तर यास रामानें तीं अस्त्रें दिलींच नसतीं-असा भाव. १४. यावरूनि (परशुरामानें तर यास अस्त्रें दिलीं यावरून) [हा कर्ण] शुचि (पवित्र वंशांतला) गमतो. १५. 'सूतकुळीं न च झाला' असा पाठ विशेष शोभेल. १६. कोणत्या तरी देवाच्या अंशानें जन्मलेला. १७. तेज. १८. [याचें] कुळ (वंश. हा कोणत्या वंशांत जन्मला, याचा बाप व आई हीं कोणकोणत्या वंशांतलीं होतीं हें) लोकांत प्रकट न हो (न होवो, नसो) (पण मला) हें चि एक सत्य कारण (वाटतें कीं), जिला [हा] झाला, तिणें [हा] उपजतां बाळपणीं (बाळ असतांच) साहस करुनि त्यजिला-असा अन्वय. 'कुळ प्रगट न हो' असें वाटण्याचें कारण हा देवपुत्र आहे, अयोनिज आहे, असें लोकांस वाटावें हेंच. १९. तें मूल लहान होतें तेव्हां. वस्तुतः 'उपजतां' (जन्मतांच) असें म्हटल्यानंतर 'बाळपणीं' असें म्हणण्याची मुळींच आवश्यकता नव्हती. २०. अविचार. २१. आजानुबाहु. २२. कुंडल व कवच

प्रसवे न यासि राधा. प्रसवेल सुधाकरासि काय रसा ? ॥ ३४
अजि[3] ! सिंधुशुक्तिगर्भी[4] मौक्तिक[5] उपजे; नदींत ही असती ।
पुष्कळ सिंप्या, परि तीं त्यांच्या उदरीं न मौक्तिकें[6] वसती. ॥ ३५
राधा धात्री[7] च गमे, कर्णाच्या[8] न जननी शरीरा या. ।
सांगा जी ! व्याघ्रासि प्रसवेल मृगी कधींतरी ? राया ! ॥ ३६
याचें विशाल[9] वक्षःपीठ[10] पहावें, बरें तुवां निपुणें, ।
भुज दीर्घवृत्तपीन[11] त्रिदशकरिकरापरीस[12] पूज्य गुणें[13]. ॥ ३७
हा[14] प्राकृत[15] पुरुष नव्हे. सांगावें काय म्यां तुला कविला[16] ? ।
कर्णाच्या तेजें बहुवीरांकरवीं[17] स्वगर्व टाकविला. ॥ ३८
सारथि होय पितामह[18] रुद्राचा, तेंवि तूं हि कर्णाचा, ।
लाजो[19] तुज रविरथहयगुणधर[20] तो बंधु ही सुपर्णाचा[21]. ॥ ३९

---

(चिलखत) यांसह. २३. हा बाळ उपजतां चि भास्करसा दीर्घभुज [व] सकुंडलकवच [असा होता]-असा अन्वय. २४. 'बाळभास्करसा' असें पाठांतर.

१. चंद्रास. हा **अप्रस्तुतप्रशंसा** नामक अलंकार आहे. येथें अप्रस्तुत शब्दांनीं प्रस्तुत अर्थ वर्णिलेला आहे. २. पृथ्वी. 'रसा' व 'सुधाकर' हे शब्द साभिप्राय आहेत. 'रसा' म्हणजे गोड, तिखट इत्यादि रसांस–ते ते रस देणाऱ्या पदार्थांस–उत्पन्न करणारी (पृथ्वी) अशा रीतीनें सर्व रसांस जरी उत्पन्न करणारी आहे, तरी ती अमृतमय जो सुधाकर (चंद्र) त्यास थोडीच उत्पन्न करूं शकते ? आपल्या परी पृथ्वी मोठी खरी, पण अमृतरसमय चंद्र उत्पन्न करण्यास असमर्थच–असा भाव. ३. अजी ! अहो ! ४. समुद्रांतल्या शिंप्यांच्या (शिंपल्यांच्या) पोटांत. ५. मोतीं. ६. ही संपूर्ण गीति **अप्रस्तुतप्रशंसेचें** उत्तम उदाहरण आहे. ७. धात्री म्हणजे दाईच. ८. कर्णाच्या या शरीरा जननी न–अन्वय. कर्ण राधेच्या पोटीं जन्मला आहे असें नाहीं; तर राधेनें त्याला वाढविलें इतकेंच; असा भाव. ९. अतिविस्तृत. १०. उरःस्थल. ११. ['भुज'शब्दाचीं विशेषणें] लांब, वाटोळे व बळकट. पीन=पुष्ट. १२. त्रिदश+करि+कर+परीस=देव+हत्ती+सोंड+पेक्षां=देवांचा हत्ती जो ऐरावत त्याच्या सोंडेपेक्षांही. १३. दीर्घवृत्तपीन या गुणांनीं–असा भाव. १४. हा कर्ण. १५. साधारण, कमी दर्जाचा. १६. शहाण्याला, सर्व माहीत असलेल्यास. १७. पुष्कळ वीरांच्या हातून किंवा अनेक वीरांकडून. कर्णानें आपल्या तेजानें पुष्कळ वीरांस जिंकून त्यांचा गर्वभंग केला–असा भाव. १८. ब्रह्मदेव 'ब्रह्मात्मभूः सुरज्येष्ठः परमेष्ठी पितामहः'–अमर. १९. 'लाजो तुला सुरथहयगुण धरितां बंधु ही सुपर्णाचा' असें पाठांतर आहे. २०. रवि+रथ+हय+गुण+धर=सूर्य+रथ+घोडे+दोऱ्या+धरणारा=सूर्याचा सारथी अरुण–असा भाव. २१. गरुडाचा अरुण हा वडील भाऊ. हे दोघेही विनतेचे मुलगे.

सारथि अधिक रथीहुनि[1] असतां चि घडे जय, प्रजापाळा[2] ! ।
पाळा[3] कर्णासि तुम्हीं, घालो[4] कंठांत[5] कीर्ति मणिमाळा.[6]' ॥ ४०

## अध्याय[7] तेविसावा.

शल्य म्हणे, 'इतिहास[8] श्रुत[9] आहे सन्मुखें[10] मला सारा[11], ।
कृष्णास[12] हि विदित असे, अमृतरसाहूनि हे कथा सारा[13]. ॥ १
जाणे सर्व म्हणोन चि म्हणती 'सर्वज्ञ[14]' सर्व ही त्याला[15], ।
जेंवि शिवाचा ब्रह्मा, पार्थाचा कृष्ण सारथी झाला. ॥ २
कर्ण कदाचित्[16] जरि[16] वध पार्थाचा करिल, तरि तुझीं कटकें[17] ।
हरि संहरील अंगें[18]. हें तूं मानूं नको नृपा ! लटकें[19]. ॥ ३
कोपेल कृष्ण तेव्हां राया ! त्याच्यापुढें न काल[20] टिके[21]. ।
ज्याला[22] सहाय भगवान् त्याच्या नाशीं प्रयास कां लटिके[23] ?' ॥ ४

---

१. जो योद्धा रथांत बसून युद्ध करतो त्याहून. २. राजा शल्या ! ३. शत्रूपासून रक्षण करा. हें दामयमकाचें उदाहरण आहे. ४. कीर्ति (कर्त्री) [कर्णाच्या] कठांत मणिमाळा घालो–असा अन्वय. 'घालुनि कंठांत कीर्तिमणिमाळा' असाही पाठ आहे. ह्या पाठापेक्षां मुळांतीलच पाठ विशेष सुरस आहे. कारण पुरुषाच्या गळ्यांत माळ घालणारी स्त्रीच पाहिजे. पुरुषाच्या गळ्यांत पुरुषानें माळ घातल्यानें रसपोषण होत नाहीं. ५. कोणाच्या कंठांत? कर्णाच्या कीं माझ्या (दुर्योधनाच्या) कीं आपल्या (शल्याच्या)? तीनही अर्थ संभवतात. 'घाला कंठांत कीर्तिमणिमाळा' असें पाठांतर. ६. [जयरूपी] मण्यांची माला. ७. यांत ४७ श्लोकांचा मूळ संस्कृत भारताचा ३५ वा अध्याय आला आहे. ८. कथा. ९. ऐकलेला. १०. सत्+मुखें=साधूच्या मुखानें. ११. सारा इतिहास म्हणजे कोणता? परशुरामाचा कीं कर्णाच्या जन्माविषयींचा? बहुतकरून दुसराच असावा. १२. कृष्णालाही माहीत आहे, असें सांगण्याचें कारण, पांडवांस कर्णाचें माहात्म्य कळत नसल्यामुळें त्याशीं युद्ध करण्याचें त्यांनीं साहस केलें आहे. अशी दुर्योधनाची जी समजूत होती ती घालवून, कर्णास पूर्णपणें ओळखूनच कृष्णार्जुन त्यावर चाल करून येत आहेत, असें कळविणेंच होय. १३. उत्तमा, सारयुक्त. १४. सर्व जाणणारा. १५. कृष्णाला. १६. येथें पंतलिखित पोथींत 'कदाचिज्जरि' असा शब्द आहे. १७. सैन्यें. १८. स्वतः. १९. लबाडीचें, खोटें. या शब्दाचीं 'लटकें' व 'लटिकें' अशीं दोन रूपें आहेत असें पुढील गीतीच्या अंत्ययमकावरून स्पष्ट होत आहे. २०. यम. २१. न टिके=युद्धांत धीर धरून उभा राहूं शकत नाहीं. २२. हें गीत्यर्ध उत्तम सुभाषितरूप आहे. 'जया देव तारी, तया कोण मारी ?' हें समानार्थक सुभाषित होय. २३. व्यर्थ.

दुर्योधन त्यासि म्हणे, 'राया ! कर्णावमान[1] कां करिसी[2] ? ।
हा[3] चि वधी त्या तैशा रजनीयुद्धीं[4] घटोत्कचा[5] अरिसी[6]. ॥ ५
याणें वृकोदराच्या[7] कंठीं जिंकोनि घातिलें[8] चाप, ।
मांत्रिक[9] मंत्रें मोहुनि[10] धरितो, जैसा पराक्रमें साप. ॥ ६
मूर्खा[11] पोटभरूला[12] बोलावें बोलिला तसें भीमा, ।
तेव्हां मज कळलें, कीं या कर्णाच्या बळा नसे सीमा. ॥ ७
माद्रीपुत्रांतें[13] ही जिंकुनि हा जीवदान दे, सोडी; ।
या एकानें[14] चि रणीं त्या सात्यकिची हि मोडिली खोडी[15]. ॥ ८
धृष्टद्युम्नादिक तों[16] केले बहुवार संगरीं भग्न[17]. ।
अर्जुन वदन[18] न दावी, झाला भयसागरांतरीं[19] मग्न. ॥ ९
या कर्णाला समरीं पांडव देखावया न शकतील; ।
काय पराभववार्ता[20] ? प्राणद्यूतीं[21] हि ते चि ठकतील. ॥ १०
मारील कोपतां हा कर्ण कुलिशपाणिला[22] हि अमरांत, ।

---

१. कर्णाचा अपमान. २. कृष्णादिकांच्या शौर्यादिकांचें वर्णन करून–असा भाव. ३. हाच कर्ण. ४. रात्रीच्या युद्धांत. जयद्रथ पडला त्या दिवशीं रात्रभर ही लढाई चालली होती. तेव्हांच घटोत्कच मेला. (पंतकृत द्रोणपर्व–अध्याय १९). ५. भीमास हिडंबीपासून झालेला मुलगा, त्याला. ६. शत्रूला. ७. भीमाच्या. वृक नामक अग्नि आहे उदरांत (पोटांत) ज्याच्या तो वृकोदर. किंवा वृका(लांडग्या)प्रमाणें आहे उदर ज्याचें तो–फार खाणारा–असा भाव. दोनही अर्थांनीं हा शब्द भीमास लागू आहे. ८. जयद्रथवधाच्या दिवशीं. ९. मंत्रादिकांनीं सर्पवृश्चिकादिकांस वश करणारा. १०. कोणीकडेही जाण्यास सुचणार नाहीं असें करून. ११. विवेकज्ञानहीन अशाला. (पंतकृत द्रोणपर्व, अध्याय १२). १२. पराक्रमहीन असून कोणत्या तरी उपायानें पोट भरीत आहे, अशा मृतप्रायाला. १३. नकुळसहदेवांस. १४. दुसऱ्याच्या सहायावांचून एकट्यानें. १५. खोड, वाईट चाल, दूषण. खोडी मोडणें=खोडकी जिरविणें, रग जिरविणें. ही 'लोकोक्ति' आहे. १६. तर. या शब्दानें ते याच्यापुढें अतिक्षुल्लक आहेत असें सुचविलें आहे. १७. पराजित. १८. तोंड दाखवीत नाहीं, कर्णापुढें येत नाहीं. १९. भयरूपी समुद्रांत. २०. पराजयाची गोष्ट. पांडव जर कर्णाला युद्धांत पाहूं देखील शकत नाहींत, तर त्याच्या पराभवाची गोष्ट कोणीकडे ?–असा भाव. येथें काव्यार्थापत्ति नामक अलंकार आहे. (मागें अध्याय २० गीति २ वरील टीपा पहा). २१. प्राणांच्या द्यूतांत, ज्यांत प्राणाचीच पैज आहे, अशा द्यूतांत. पूर्वी द्यूतांत पांडव सर्व राज्य हारून गेले, त्याचप्रमाणें आतांही या

त्या या वीरासि कसे[1] पांडव ते जिंकितील समरांत ? ॥ ११
भुजयुद्धीं तुजसम ही क्षितिवरि[2] नाहीं च अन्य बलशाली;[3] ।
तूं दुःसह शत्रुजना, शल्याख्या[4] यामुळें जगीं झाली. ॥ १२
अर्जुन मरतां कृष्णें अभिमानें, बळ[5] धरूनि, झगडावें, ।
कर्णविनाशीं[6] राया ! तें[7] तुजपासूनि काय न घडावें ? ॥ १३
'सारथ्य[8] चि करिन' अशी कळवी लोकत्रया प्रतिज्ञा, ते[9] ।
करिल मृषा[10] तरि म्हणतिल मग काय 'भला' तयाप्रति ज्ञाते ? ॥ १४
कृष्ण बळें,[11] अभिमानें, अन्यायें जरि वधील बल[12] हातें, ।
सत्यप्रतिज्ञ[13] तूं प्रभु[14] अभिमानी[15] न चुकसील कलहातें.[16] ॥ १५
कृष्ण वधील निजबळें माझीं कटकें, तरि स्वयें कां गा ! ।
न वधाल तुम्हीं[17] राया ! पांडवकटकें रणीं ? मला सांगा. ॥ १६
मेले रणीं सहायक्षितिपति[18] बंधू[19] हि जे मदीय,[20] नृपा ! ।
होईन अनृण[21] त्यांचा, जरि करिसिल आजि तूं चि पूर्ण कृपा.[22]' ॥ १७
शल्य म्हणे, 'कृष्णाहुनि मज म्हणसि विशिष्ट.[23] जाहलों तुष्ट. ।
सारथि होतों; परि मन तुमचें मद्भाषणें[24] न हो रुष्ट.[25]' ॥ १८

---

प्राणद्यूतांत आपले सर्व प्राण हारतील–मरून जातील–असा भाव. २२. कुलिश+पाणि=वज्र+हस्त=वज्र आहे हातांत ज्याच्या अशा इंद्राला देखील.

१. 'असे' असें पाठांतर. असे=असले, कमकुवत. २. पृथ्वीवर. ३. बळानें शोभणारा. ४. 'शल्य' असें नांव. (मागें अध्याय २१।३२ पहा). ५. बळ धरून=धैर्य धरून, हिंमत न सोडतां. ६. कर्णाचा विनाश झाला असतां. ७. कृष्णाप्रमाणें अभिमान धरून शत्रूंशीं भांडणें. ८. कृष्णानें 'मी भारतयुद्धांत केवळ अर्जुनाचें सारथ्य करीन; हातांत शस्त्र धरून युद्ध करणार नाहीं' अशी प्रतिज्ञा केली होती, तिला उद्देशून हें वाक्य आहे. ९. ते (ती प्रतिज्ञा) [जर] मृषा करिल (युद्ध करून खोटी करील) तरि मग ज्ञाते (शहाणे) तयाप्रति (त्या कृष्णास) भला म्हणतिल काय ? (अर्थात् नाहीं–असा भाव). १०. मिथ्या. ११. जबरदस्तीनें, तसें करणें योग्य नसतांही–असा भाव. १२. सैन्य. १३. सत्य आहे प्रतिज्ञा ज्याची असा, ज्याची प्रतिज्ञा कधींच चुकावयाची नाहीं असा. १४. समर्थ. १५. धन्याचा अभिमान धरणारा. १६. भांडण करण्यास, लढण्यास. १७. शल्य व सहाय करण्यास आलेले इतर राजे. १८. साहाय्यकर्ते राजे. १९. शंभर भावांतील कित्येक. २०. माझे. २१. उतराई, ऋणमुक्त. 'होइन अनृणी' असें पाठांतर. २२. रथसारथ्य स्वीकारण्याची. २३. विशेष शिष्ट, अधिक श्रेष्ठ. २४. मी युद्धांत

कर्णासह दुर्योधन 'आम्हांला मान्य हें' असें बोले. ।
त्या काळीं आनंदें सर्व हि नरशक्रचक्र ही डोले. ॥ १९
दुर्योधन कर्णातें भेटोनि म्हणे, 'सख्या ! पृथाजाचा ।
उतरीं मद, प्रताप प्रकट असे या जनीं वृथा ज्याचा.' ॥ २०
कर्ण म्हणे, 'राया ! मज गमतो मद्रेश नातिहृष्टमना. ।
मधुरोक्तें तूं पुनरपि बोल नृपासीं मनोव्यथाशमना.' ॥ २१
शल्यासि म्हणे कुरुपति, 'पार्थाचा सचिव कृष्ण तो जेंवीं, ।
तैसा तूं कर्णाचा हो, देवा ! अभयकर शिरीं ठेवीं. ॥ २२
पार्थातें कृष्ण तसा, कर्णातें तूं हि संगरीं रक्षीं. ।
त्वां मारुतें करावा कर्णबलाग्नि प्रदीप्त रिपुकक्षीं.' ॥ २३
हर्षे सुयोधनातें भेटे मद्रेश, तो म्हणे, 'युक्त; ।

---

जीं वाक्यें बोलेन त्या वाक्यांनीं. मी जीं वाक्यें बोलेन तीं तुम्हीं सहन केलीं पाहिजेत, असें शल्य म्हणतो. याचें कारण असें कीं, युद्धांत परुषवाक्यें बोलून कर्णाच्या उत्साहाचा भंग करीन, असें शल्यानें धर्मराजास वचन दिलें होतें. [मोरोपंतकृत उद्योगपर्व अध्याय २ गी० २१-२२ पहा]. २५. कुपित.

१. नर+शक्र+चक्र=नर+इंद्र+समूह=नरेंद्रसमूह. साधारणतः 'इंद्र' शब्दाचाच 'श्रेष्ठ' 'राजा' असा अर्थ समासांत होतो. प्रस्तुत स्थलीं 'इंद्र' शब्दाच्या ऐवजीं तत्पर्याय शब्द जो 'शक्र' तो योजिलेला आहे. अशा रीतीनें समासांत प्रसिद्ध शब्दाचे पर्याय शब्द वापरूं नयेत हा उत्तम मार्ग. कारण असें केल्यास अर्थ लौकर लक्षांत येत नाहीं. याचीं अन्य उदाहरणें:- अजांड=ब्रह्मांड; घटकर्ण=कुंभकर्ण; यतिशक्र=यतींद्र, इत्यादि. २. अर्जुनाचा. ज्याचा प्रताप वृथा (व्यर्थ, खरोखर तो प्रतापी नसतां-असा भाव) या जनीं (या सर्व जनांत) प्रकट (प्रख्यात) असे, [त्या] पृथाजाचा मद उतरीं-असा अन्वय. ३. न+अति+हृष्ट+मना=फार आनंद न पावलें आहे मन ज्याचें असा; जो विशेष आनंदित झाला नाहीं असा. ४. मधुर भाषणानें. ५. मद्रेश्वराशीं. ६. मनस्+व्यथा+शमन=मन+ताप+नाहींसे होणें=मनांतला ताप नाहींसा होण्याकरितां. ७. दुर्योधनाचें ह्याच अर्थाचें भाषण पुनः पुनः आलें आहे म्हणून जरा कंटाळवाणें झालें आहे. ८. मंत्री, सहाय्यक. येथें कृष्णास व शल्यास साभिप्रायानें 'सचिव' म्हटलें आहे, कारण आपणास साहाय्य करण्याकरितां जो नेहमीं आपणाबरोबर असतो, तो 'सचिव' होय-अशी याची व्युत्पत्ति आहे. ९. जेंवीं=जेंवी=ज्याप्रमाणें. 'जेंवीं' असा पंतलिखित पोथींत पाठ आहे. १०. तुला भय नाहीं-तुझें मी सर्वस्वी रक्षण करीन, असें सांगून जो हात दुसऱ्याच्या डोक्यावर ठेवितात तो. ११. वायूनें. १२. कर्णबलरूप अग्नि. १३. शत्रुरूप गवताचे ठायीं. रूपकालंकार. १४. तूं जें म्हणतोस तें योग्य आहे; त्याप्रमाणें मी करीन-असा भाव.

त्वत्प्रिय[1] करितों; परि बा! सोसावें आमुचें तुम्हीं उक्त[2].' ॥ २४
कर्ण म्हणे, 'शंभुहितीं[3] विधि, पार्थहितीं मुरारि[4] युक्त[5] सदा. ।
माझ्या हितीं तसा तूं हो युक्त. न हो मनीं उदास[6] कदा.' ॥ २५
शल्य म्हणे, 'निजनिंदा-स्तुति परनिंदा-स्तुति प्रशस्त नसे; ।
सद्वृत्त[7] चतुर्विध[8] हें आर्यांचें सज्जनासि मान्य असे. ॥ २६
मीं[9] सुरनाथाचें[10] ही सारथ्य करावयासि योग्य असें, ।
जाणें कौशल्य अतुल[11], जाणे तो मातलि[12] प्रसिद्ध जसें. ॥ २७
ऐसें[13] जाणतसें; कीं आर्यांहीं[14] साधु[15] शिक्षिला आहें. ।
आत्मस्तुतियुक्त[16] हि मीं बोलेन, तुझ्या हितार्थ तें साहें. ॥ २८
करितां रण पार्थासीं कर्णा ! मीं चालवीन हय[17] नीट; ।
तूं चित्तीं विज्वर[18] हो; आहें युद्धांगणांत बहु धीट.' ॥ २९
तेव्हां सुयोधन म्हणे, 'कर्णा ! मातलि जसा चि शक्राचा ।
सारथि तसा तुझा हा शल्य नृप हि शल्य[19] शत्रुचक्राचा[20].' ॥ ३०

---

१. तुला जें प्रिय (इष्ट) तें. २. बोलणें. ३. ब्रह्मदेव. ४. मुर नामक दैत्याचा अरि (शत्रु) जो तो, कृष्ण. ५. हितीं युक्त=हिताशीं जोडलेला, हित सोडून जो जात नाहीं, नेहमीं हित करण्यांतच तत्पर-असा भाव. ६. ब्रह्मदेव व कृष्ण ज्याप्रमाणें उदास न होतां संतोषानें सारथ्याचें काम करितात, त्याप्रमाणें तूंही उल्हासानें सारथ्याचें काम कर-असा भाव. ७. सत्+वृत्त=उत्तम वर्तन. ८. चार प्रकारचें (पूर्वार्धांत सांगितलेलें). ९. अन्वयः-जसें तो प्रसिद्ध मातलि [सुरनाथाचें सारथ्य करायासि] जाणे, [तसें] सुरनाथाचें ही सारथ्य करावयासि योग्य (लायक) असें अतुल कौशल्य मीं जाणें-असा एकत्र अन्वय करावा, किंवा स्वतंत्र वाक्यें आहेत असें समजून अन्वय करावा. १०. इंद्राचेंही. ११. अनुपम. १२. इंद्रसारथी. १३. ऐसें (सारथ्याचें काम इतक्या उत्तम रीतीनें) जाणतसें (मी जाणतों) कीं (विकल्पार्थीं किंवा कारण) आर्यांहीं (उत्तम लोकांनीं, या विषयांत प्रवीण अशा श्रेष्ठ लोकांनीं) [मी] (कर्म) साधु शिक्षिला (उत्तम तऱ्हेनें शिक्षित-शिक्षिलेला-शिकविलेला) आहें-असा अन्वय. कर्मणीप्रयोगांत कर्मपद उत्तमपुरुषीं (मराठी व्याकरणाप्रमाणें प्रथमपुरुषीं) असल्याचें हें आणखी एक उदाहरण आहे. १४. श्रेष्ठ पुरुषांनीं. १५. योग्य, उत्तम. १६. आत्मस्तुति करण्यास योग्य किंवा आपल्या स्तुतिपर वाक्यांनीं युक्त. शल्याचा म्हणण्याचा भाव असा, कीं मी आपली बढाई सांगत आहें व सांगणार हें खरें; पण तें माझ्या हिताकरितां नव्हे, तर तुझ्याच हिताकरितां होय. म्हणून आत्मस्तुतिपर व त्वन्निंदापर जीं माझीं वाक्यें तीं मुकाट्यानें सहन करणें तुझें काम आहे. १७. घोडे. १८. दुःखरहित. १९. शत्रूचा भेद करण्याविषयीं बाणाग्रासारखा. २०. शत्रुमंडळाचा, शत्रुसमूहाचा.

शल्यासि म्हणे, 'राया ! कर्णातें रक्षिसील, जरि वाजी[1] ।
चालविशील, तरि रणीं जिंकील धनंजयासि हा आजी.' ॥ ३१
शल्य 'अवश्य' म्हणे, तों कर्ण म्हणे, 'तरि[2] यथोक्त[3] रथ कल्पीं[4], ।
मद्रपते ! निजवूं दे सत्वर भीमानुजासि[5] शरतल्पीं[6].' ॥ ३२
शास्त्रप्रोक्तविधानें[7] रथ कल्पुनि शीघ्र आणिला शल्यें, ।
जेंवि[8] मनोरथ साक्षात्[9] केला दैवें चि सिद्ध वात्सल्यें[10]. ॥ ३३

---

## अध्याय चोविसावा.[11]

कर्ण प्रदक्षिणा त्या जैत्ररथातें[12] करूनियां भावें, ।
सूर्योपस्थान[13] करी, कीं युद्धीं प्राप्त शुद्ध यश व्हावें. ॥ १
मग कर्ण म्हणे, 'संध्याचंद्रद्युतिरंजितांबरीं[14] च ढगा, ।
रथशोभा[15] जिंको[16], तूं मद्रेशा ! प्रथम यावरी चढ गा !' ॥ २

---

१. घोडे. २. 'तूं' असा अन्य पाठ. ३. नियमाप्रमाणें. अर्थात् युद्धशास्त्रांत सांगितल्या-प्रमाणें. ४. योजीं, सिद्ध कर. ५. **भी**माच्या धाकट्या भावास (अर्जुनास). येथें योजिलेला 'भीमानुज' हा शब्द साभिप्राय आहे. ज्यानें भीमाचा पराभव केला, तो त्याच्या धाकट्या भावास जिंकीलच–असा भाव. 'भीमार्जुनासि' असा पाठभेद आहे. ६. बाणशय्येवर. ७. शास्त्रांत सांगितलेल्या नियमाप्रमाणें. ८. दैवें चि (सुदैवानें–कर्तृपद) वात्सल्यें मनोरथ सिद्ध केला–असा अन्वय. ही **उत्प्रेक्षा** आहे. 'जेंवि' शब्द स्पष्ट असल्यामुळें ही **वाच्योत्प्रेक्षा.** 'इव, नूनम्, मन्ये, जाने, अवैमि, ऊहे, तर्कयामि, शंके, उत्प्रेक्षे इत्यादिभिः प्रतिपादकैः सहिता यत्रोत्प्रेक्षासामग्री तत्र वाच्योत्प्रेक्षा. यत्र च प्रतिपादकशब्दरहितं तत्सामग्रीमात्रम्, तत्र प्रतीयमाना.' [रसगंगाधर.] उत्प्रेक्षेचे दोन भेद आहेत. एक वाच्या, व दुसरी प्रतीयमाना. जींत, जसें, जणों, वाटे इत्यादि शब्द स्पष्ट असतात ती वाच्या, व जींत हे शब्द मात्र नसतात पण उत्प्रेक्षा असते ती प्रतीयमाना. ९. प्रत्यक्ष. १०. कृपेनें, प्रेमानें. ११. यास आधार मुळांतील ३६ वा अध्याय आहे. १२. अवश्य जय करणाऱ्या (विजयी) रथाला. १३. सूर्याची उपासना. उपस्थान=सेवा, मंत्रविशेष. १४. संध्या+चंद्र+द्युति+रंजित+अंबर=सायंकाळ+चंद्र+कांति+शोभित+आकाश=सायंकाळच्या चंद्रकांतीनें शोभिवंत केलेल्या आकाशांत. १५. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'रणशोभा' असा पाठ आहे. परंतु टीपेंत 'रथशोभा' असा पाठ स्वीकारूनच अर्थ दिलेला आहे. यावरून 'रथशोभा' असा शुद्ध पाठ असावा, हें स्पष्टच आहे. १६. सायंकाळीं चंद्रकिरणांनीं व्याप्त आकाश फारच शुभ्र असतें; तेव्हां तसल्या आकाशांत काळा ढग विशेष शोभतो. तसल्या शोभेलाही आपली ही रथाची शोभा जिंको. रथ

शल्य बसे, मग बैसे [1]वैकर्तन, निजरथीं जसा [2]तरणी; ।
पाहुनि शोभा मानिति जन, कीं केला चि [3]पार्थघात रणीं. ॥ ३
[4]विप्र म्हणति, 'विजयातें पाव रणीं; कीर्ति हो जगीं [5]शुद्धा; ।
[6]कुरुराजमनोरथसहकारवसंता ! [7]विशंक जा युद्धा.' ॥ ४

---

चंद्रशोभित सायंकाळच्या आकाशाप्रमाणें शोभिवंत होताच. त्यावर नीलमेघाप्रमाणें शोभण्यास तूं आधीं चढ–असा कर्णाचा भाव. शल्य कृष्णाप्रमाणेंच नीलमेघश्याम होता. किंवा या गीतीचा असा अर्थ करावा:–सायंकाळच्या आकाशांत जसा चंद्रसान्निध्यानें व तत्तेजपरावर्तनानें ढग शोभतो, तद्वत् नुकतेंच सारथ्य स्वीकारून विजयप्रस्थान केलेल्या तुझ्या वीरवराच्या तेजानें भूषित झालेल्या रथाची कांति त्यावरच्या मेघकांतीस जिंको. यांत शल्य हा चंद्र, अंबर ही रणभूमि, व ढग हा रथ असा परस्पर संबंध जाणावा. मुळांत रथाचें वर्णन करितांना तो 'गंधर्वनगरोपम' होता, असें म्हटलें आहे. गंधर्वनगर म्हणजे सूर्यमेघसान्निध्यानें होणारा आकाशचमत्कार.

१. विकर्तन (सूर्य), त्याचा पुत्र (कर्ण). २. तरणी=सूर्य. 'तॄ प्लवनतरणयोः' या धातूपासून हा शब्द निघाला आहे. या शब्दाची अनेक तऱ्हांनीं व्युत्पत्ति सांगण्यांत येते:—(१) आकाशसमुद्रं तरतीति तरणिः–(आकाशसमुद्र) तरतो म्हणून तरणी, (२) जगदंधकारं तारयतीति तरणिः–(जगताला अंधकारापासून) तो तारतो म्हणून तरणी, (३) मुमुक्षुभिस्तीर्यते इति तरणिः–(मुमुक्षुजन) ज्याला तरून जातात तो तरणी. सूर्यलोकांतून मोक्षाचा रस्ता आहे, अशी समजूत आहे. ३. अर्जुनाचा अंत. ह्या गीतींत 'कर्ण रथारूढ होणें' असा कारण आणि कार्य यांचा एकाच काळीं योग वर्णिला आहे. यास्तव येथें **'अक्रमातिशयोक्ति'** नामक अलंकार झाला आहे. ४. कौरवांच्या बाजूस जे ब्राह्मण होते, ते कर्णास आशीर्वाद देऊं लागले. ५. पवित्र, अकलंकित, जी अन्यायानें मिळविलेली नाहीं अशी. ६. कुरुराज+मनोरथ+सहकार+वसंत=दुर्योधन+इच्छा+आम्रवृक्ष+वसंतऋतु=दुर्योधनाच्या इच्छारूपी आम्रवृक्षास वसंतकाळासारख्या कर्णा! वसंतऋतूंत आंब्याच्या वृक्षांस फळें येतात. त्याचप्रमाणें दुर्योधनाची पांडवांस मारण्याची जी इच्छा ती सफळ करण्यास तूंच (कर्णच) समर्थ आहेस–असा भाव. दुर्योधनावर सहकाराचा व कर्णावर वसंताचा आरोप केला आहे, व हे आरोप सापेक्ष आहेत म्हणून **परंपरितरूपक** होय. कर्णास वसंत म्हणून तन्मित्र दुर्योधन मदन होय, असें हळूच सुचविलें आहे. सहकार हा मदनाच्या नऊ बाणांपैकीं एक आहे. वसंत हा मदनमित्र होय. तेव्हां सहकार व वसंत हे शृंगाररसाचे उद्दीपक आहेत. म्हणून त्यांच्या उल्लेखानें प्रस्तुत स्थलीं कवीनें आदिरस उद्दीपित करण्याचा यत्न केला आहे, असें म्हणावें लागतें. पण संस्कृत साहित्यशास्त्रज्ञांचे मतीं शृंगारवीररसांस अविरोध आहे. (मागें पृष्ठ ११७ टीप ६ पहा). ७. शंकारहित होऊन; विजयी होईन–अशी खातरी बाळगून.

देती आशीर्वाद द्विज बंदी-सूत[1]-मागध स्तविती, ।
सानंद[2] वाद्यवादक[3] दुंदुभिमुख[4] वाद्यजात[5] वाजविती. ॥ ५
राजा[6] कर्णासि म्हणे, 'वीरवरा ! मित्रवत्सला[7] ! आजि ।
असुरांत शक्रसा हो विजयी पांचाळपांडवांमाजि. ॥ ६
भीष्मद्रोणांहीं जें कर्म न केलें, स्वयें करीं बा ! तें, ।
भंगावी रिपुसेना त्वां, जैसी घनघटा[8] महावातें[9]. ॥ ७
धर्म धरावा, किंवा मारावा पार्थ, वर मला दे हा, ।
अथवा पांच[10] हि मारीं विजयश्रीशुद्धकीर्तिच्या गेहा[11] ! ॥ ८
स्वजयाविषयीं[12] मानस हें न दुज्याचा धरी भरवसा, हो ! ।
नरसिंहा[13] ! न तवाद्भुतचापमुखींचा[14] अरीभ[15] रव साहो.' ॥ ९
ऐसें वदे जयार्थी[16] नृप[17], त्यासि म्हणे 'अवश्य' तो कर्ण; ।
झाला सिद्ध महात्मा वाराया सर्व आप्तलोकर्ण[18]. ॥ १०
हर्षें शल्यासि म्हणे[19], 'मद्राधीशा ! वरप्रतापा[20] ! हूं[21]; ।
प्रेरीं[22] वाजी; आजि त्वद्दर्शितयानशीघ्रता[23] पाहूं. ॥ ११
धर्म, वृकोदर, अर्जुन जेथें, तेथेंचि ने रथा, वेगा ।

---

१. ह्या तीन भाटांच्या जाती आहेत त्या. २. आनंदासह, आनंदानें. ३. रणवाद्य वाजविणारे. ४. दुंदुभिप्रमुख वाद्यसमूह. ५. एकूणएक वाद्यें. ६. दुर्योधन. ७. मित्राचे ठायीं दयाळु. [वत्सल=दयाळु. 'अंस' व 'वत्स' या शब्दांपुढें अनुक्रमें बल व दया हे अर्थ गम्य असतां, 'ल' प्रत्यय येतो; जसें—अंसल=बळकट; वत्सल—दयाळु.] ८. मेघसमूह. ९. मोठ्या वायूनें. १०. पांचही पांडव. ११. विजयश्रीपासून मिळालेल्या निर्मळ कीर्तीचें घरच अशा. १२. अन्वयः—हें (माझें) मानस (मन) स्वजयाविषयीं (माझ्या जयाकरितां—मला जय मिळवून देईल अशा विषयीं) [तुझ्याशिवाय] दुज्याचा (दुसऱ्याचा) भरवसा न धरी—असा अन्वय. १३. नररूपी सिंहा! अन्वयः—[हो नरसिंहा! तवाद्भुतचापमुखींचा रव (शब्द) अरीभ न साहो—असा अन्वय. १४. तव+अद्भुत+चाप+मुख=तुझ्या+अद्भुत धनुष्यरूपी मुखांतून [निघणाऱ्या बाणांचा] ध्वनि. 'तवादृतचापमुखींचा' असा पाठभेद. आदृत=उत्सुक, उत्कंठित. १५. अरि+इभ=अरिरूप गज. १६. विजय प्राप्त व्हावा अशी ज्यास इच्छा आहे असा. १७. राजा दुर्योधन. १८. आप्त+लोक+ऋण=आप्त लोकांचें ऋण. १९. यास कर्ता 'कर्ण'. २०. वर (श्रेष्ठ) आहे प्रताप ज्याचा तो वरप्रताप; तत्संबोधन. २१. झटपट चल. २२. प्रेरणा करीं; चालीव. २३. त्वत्+दर्शित+यान+शीघ्रता=त्वां दाखविलेली रथाची शीघ्रता (जलदी, वेग).

दावीं[१], दावीं[२] अनळा[३] मारुतसा[४]. आजि ते मथावे[५]; गा ! ॥ १२
माझ्या बाहूंचें बळ पाहो तो[६] आजि[७] आजिमाजि[८] अरी, ।
तो[९] ही जो हित[१०] त्याचा[११], ज्याच्या[१२] हस्तीं वसे सदैव अरी[१३]. ॥ १३
मारीन पांडव रणीं शल्या ! निश्चय चि जाण, ते जितकीं[१४] ।
शस्त्रें धरितिल खंडिन[१५], माझे अतितीव्र बाण तेजित[१६] कीं. ॥ १४
आजि कुरुश्रेष्ठाची[१७] राज्याशा[१८] जाहली च अनपार्था[१९], ।
माझ्या[२०] बाणें मरतां, युद्धीं बहु शोचितील[२१] जन पार्था. ॥ १५
शरवृष्टिनें[२२] धनंजय[२३] शांतीतें पाववीन मीं थोर ।
घन[२४], नृत्यरसीं[२५] सादर आजि रणीं या करीन कुरुमोर[२६].' ॥ १६

---

१. दाखीव. २. अरण्यांत. ३. अग्नीला. ४. वायूप्रमाणें. धर्म, वृकोदर, अर्जुन जेथें, तेथेंच रथा ने; दावीं अनळा मारुतसा, [ तूं ] वेगा दावीं–असा अन्वय. अग्नीचा सारथी जो वायू तो रानांत वणव्याला आपल्या वेगानें जसा सर्वत्र नेतो तसा, हे शल्या ! माझा रथ धर्म, भीम व अर्जुन जिकडे जिकडे जातील तिकडे तिकडे नेऊन आपली रथ हाकण्याची चपळाई दाखीव. ५. मथन=मर्दन, ठार मारणें. ६. अर्जुन. ७. आजच्या दिवशीं. ८. रणामध्यें. आजि=रण, युद्ध. ९. कृष्णही. तोही पाहो–असा अन्वय. १०. हितकर्ता. ११. त्या अर्जुनाचा. १२. ज्या कृष्णाच्या. १३. चक्र (सुदर्शन चक्र). १४. 'जित कीं' असा अन्य पदच्छेद. जित=जिंकले गेलेले. कीं जित=जिंकलेलेच होत–असा भाव. १५. [तितकीं] खंडिन–असा अन्वय. १६. पाजळलेले. १७. दुर्योधनाची. १८. राज्य+आशा=राज्य संपादण्याची आशा. १९. सार्थकरूपा, सफळ. अन्+अप+अर्थ=न व्यर्थ=सफळ. दोन 'न' कार मिळून एक 'हो' कार होतो, ह्या नियमाचें हें उदाहरण आहे. 'संभाव्यनिषेधनिवर्तने द्वौ प्रतिषेधौ' इति वामनः. २०. माझ्या बाणें [पार्थ] मरतां, [त्या] पार्था बहु शोचितील (त्या अर्जुनाकरितां पुष्कळ दुःख करतील)–असा अन्वय. २१. शोक करतील. वक्त्याच्या भाषणाचा मुख्य उद्देश जन शोचतील हा नव्हे, तर अर्जुन मरेल–हा आहे. २२. अन्वयः–आजि या रणीं, मीं (कर्णरूपी मीं) थोर घन (मोठा मेघ) शरवृष्टिनें (शररूपी वृष्टीनें) धनंजय (अर्जुन किंवा अग्नि, अर्जुनरूप अग्नीला) शांतीतें पाववीन (विझवून टाकीन) [व] कुरुमोर (दुर्योधनरूपी मोर) नृत्यरसी सादर करीन. मेघ अग्नीस विझवितो व मयूरांस नाचवितो–हें प्रसिद्ध आहे. येथें 'धनंजय'-शब्दानें श्लेष साधून परंपरितरूपक वर्णिल्यामुळें हें **श्लिष्टपरंपरितरूपक** होय. शर=बाण; (पक्षीं) उदक. २३. अर्जुन व अग्नि; प्रस्तुत स्थळीं धनंजयरूपी=धनंजय–अर्जुनरूपी अग्नि–असा भाव. २४. मेघ. 'घन वृष्टिरसीं' असें पाठांतर. २५. नाचण्याच्या रसांविषयीं, नर्तनप्रेमांत. २६. कुरुरूपी (कुरुवंशोद्भव दुर्योधनरूपी) मोर. 'कुरुमोर' हा समास चिंत्य आहे, कारण 'कुरु' संस्कृतशब्द व 'मोर' महाराष्ट्रशब्द.

[1]शल्य म्हणे 'सूतसुता ! कां गा ! अवमानिसी [2]सुभव्यजना ? ।
[3]वंशज हि [4]शूर्प न गुणें लंघी [5]सभ्याहता [6]शुभ व्यजना. ॥ १७
वदसील असें न सुखें येतां [7]गांडीवनाद कर्णातें, ।
[8]अजगवशार्ङ्गासीं ही स्वबळें [9]सांगेल वाट कर्णा ! [10]तें ॥ १८
न विलोकिला धनंजय म्हणउनि ऐसें यथेष्ट बोलवतें. ।
[11]न लवे [12]वेतसशिर, परि येतां [13]गुरु पूर तें किं हो लवतें. ॥ १९
अवलोकिसील [14]गजबलदलनीं सिंहासमान भीमासी ।
मग न वदसील हें तूं, [15]धूमस्तोमासि कां न भी [16]मासी ? ॥ २०
बळ कळवितील [17]गहना [18]अनिलानलसे चि नकुळ सहदेव, ।

---

१. कर्णा. खोंचून बोलण्याकरितां हा शब्द मुद्दाम योजिलेला आहे. २. पांडवांस. सु+भव्य+जना=अत्यंत मंगलदायक लोकांस. ३. वंश+ज=एककुलोत्पन्न, उत्तम कुलोत्पन्न, अथवा वेळूपासून जाहलेलें. ४. सूप. 'सूप' असाही पाठ आहे. अन्वय–शूर्प (सूप) वंशज हि (व्यजना-प्रमाणेंच वेळूपासून झालेला आहे तरी) सभ्याहृता (सभ्यांनीं–सभेंतील विद्वानांनीं देखील हातीं घेऊन आदरिलेल्या) शुभ व्यजना (उत्तम पंख्यास) गुणें (आपल्या गुणानें) न लंघी (अधिक होऊं शकत नाहीं–बरोबरी करूं शकत नाहीं–असाही भाव). एकाच कुळांत उत्पन्न झालेल्या सुपांत व पंख्यांत बरोबरी होऊं शकत नाहीं–एकाच कुळांत उत्पन्न झालेल्या पण कुसंगतींत व सुसंगतींत वाढलेल्या भावाभावांत जर महदंतर असतें, तर सूतसुत जो तूं व राजसुत जे पांडव यांच्या-मध्यें किती फरक असेल याचा विचार कर–असा शल्याचा भाव. किंवा कर्ण हा कुंतीचा मुलगा आहे, हें शल्यास माहीत असून तो स्पष्ट जरी नाहीं तरी गर्भित रीतीनें म्हणतो, कीं तूं जरी पांडवांच्या वंशांत जन्मलास, तरी सूतगृहीं वाढल्यामुळें तुझी सुपासारखी स्थिती झाली. ५. सभ्यांनीं स्वीकारिलेल्या. ६. उत्तम पंख्यास. ७. अर्जुनधनुष्य गांडीव–त्याचा शब्द. ८. अजगव+शार्ङ्ग=शिवधनुष्य+विष्णुधनुष्य. ९. वाट सांगणें=रस्ता दाखविणें, या रस्त्यानें पळून जा असें सांगणें, पराजित करणें. विष्णूच्या व शिवाच्या धनूंस पराजित करील, असा भाव. 'सांगेल वाद' असाही पाठ आहे. वाद सांगणें=बरोबरीनें वादविवाद करणें, तोंडास तोंड देऊन भांडणें. १०. गांडीव हा शब्द पुंनपुंसक आहे. 'गांडिवौ पुंनपुंसकौ' अमर. ११. वेतसशिर (नदीच्या कांठावरील वेताचें मस्तक) [कधीं] न लवे (वांकत नाहीं.) परि [नदीस] गुरु पूर (मोठा पूर) येतां तें (कधींच न वांकणारें वेतसशिर) लवतें किं हो–असा अन्वय. हें गीतार्ध सुभाषितरूप आहे. १२. वेताचा शेंडा. १३. मोठा. १४. गजाचें बळ विदारण करण्याविषयीं. १५. धुराच्या लोटास. १६. धुरानें मधमाशा उडून जातात, हें प्रसिद्ध आहे. हा प्रश्नालंकार आहे. १७. अरण्यास. १८. अनिल+अनल=वायू+अग्नि यांप्रमाणें. गहना अनिलानलसे चि [जेव्हां तुला] नकुळ, सहदेव बळ कळवितील (दावितील), तेव्हां–असा अन्वय.

हें न वदसील तेव्हां, जें म्हणतिल 'साधु'[१] जिष्णुसह[२] देव. ॥ २१
दृष्टिविष[३] व्याळ[४] तसा, जेव्हां तुज धर्मराज पाहेल, ।
कर्णा ! तुझा अनावर[५] हा तेव्हां चि प्रलाप[६] राहेल. ॥ २२
मंदभूतग्रस्ता[७] तुज धर्मात्मा[८] सिद्धमंत्र[९] पाहेल, ।
साधुपुढें[१०] मोह तसा, क्षणभरि[११] हि न हा प्रलाप[१२] राहेल[१३].' ॥ २३

---

## अध्याय पंचविसावा[१४].

कर्ण अनादरुनि[१५] वचन शल्यासि म्हणे 'सुशीघ्र हय हाकीं' ।
आकर्षिला कृतान्तें[१६], चुंबकमणिनें[१७] चि जेविं अय[१८], हो[१९] कीं ! ॥ १
उत्पात फार झाले, कर्णरथाचे तुरंग ही पडले, ।
रडले वारणवाजी[२०], अपशकुन अनेक तेधवां घडले ॥ २
क्षयसूचक[२१] उत्पात स्पष्ट चि, त्यांतें न मानिती हो ! ते. ।
शास्त्रज्ञ दूरदृष्टि[२२] हि, दैवें मोहान्ध[२३] जाहले होते. ॥ ३
कर्ण म्हणे, 'शल्या ! गति भीष्माची शत्रुनीं तसी केली, ।
गुरु हि अधर्में वधिला, विजयश्री ओढुनी बळें नेली. ॥ ४

---

१. वाहवा; भले ! नकुळसहदेवांचे पराक्रम पाहून आकाशांतील इंद्रादि सर्व देव जेव्हां शाबास म्हणतील तेव्हां—असा भाव. २. इंद्रासहवर्तमान. ३. दृष्टीमध्यें विष ज्याच्या असा. ह्या जातीच्या सापाचा उल्लेख अन्यत्र आढळतो. (वनपर्व–अध्याय २१।१३). ४. सर्प. ५. पुष्कळ. ६. बडबड, वल्गना. ७. मदरूपी पिशाचाची बाधा झाली आहे ज्यास, अशा. ८. पुण्यशील. ९. पंचाक्षरी, मांत्रिक. १०. साधुपुढें (नित्यानित्य वस्तुविवेक ज्याला आहे अशा वैराग्यशीलापुढें) [जसा] मोह (दारापुत्रादि ऐहिक मोह) [राहत नाहीं] तसा—असा सार्थान्वय. ११. 'क्षणभरही हा प्रताप' असा अन्य पाठ. १२. व्यर्थ बाता. प्रलाप म्हणजे वेडे वगैरे लोकांचें अर्थसंदर्भरहित बडबडणें. १३. राहून जाईल, बंद होईल. १४. यांत मूळ ३७ वा अध्याय आला आहे. १५. शल्याच्या वचनाकडे लक्ष न देतां. १६. यमानें. 'लौकर घोडे हाक' असें जें कर्ण म्हणाला त्यावर कवि उत्प्रेक्षा करतात, कीं यमरूपी लोहचुंबकानें कर्णरूपी लोखंडाला आपणाकडे ओढिलेंच कीं काय ! म्हणजे कर्ण खास मरणार होता, म्हणूनच त्यास युद्धांत जाण्याची इतकी घाई झाली—असा भाव. १७. लोहचुंबकानें. १८. लोखंड. १९. कर्ण. २०. हत्ती व घोडे. २१. क्षय (नाश) सूचक (सुचविणारे); भावी नाश सुचविणारे. २२. दूरवर विचार करणारे. २३. मोह+अंध=मोहानें आंधळे.

कळलें यावरुनि मला, कीं होणारापुढें न बळ चाले. ।
विश्वख्यात[1] पितामहगुरु[2] पुरुषव्याघ्र[3] मृत्युवश झाले. ॥ ५
केलें गुरुचें[4] काळव्याळानें[5] कवळ[6] जेधवां गात्र ।
शस्त्रास्त्रशास्त्र[7]मित्रें[8] झालीं न त्राणसद्यशःपात्र[9]. ॥ ६
परि[10] मी चित्तीं निर्भय युद्धोत्सुक सिद्ध जाहलों आहें. ।
पाहें उत्साह, जगीं निस्तुळ[11] माझें चि धैर्य बापा ! हें. ॥ ७
पार्थप्रताप साहे आहे मजवेगळा असा कोण ? ।
गंगासुत[12] वृद्ध भला[13], तो ब्राह्मण ही पुरातन[14] द्रोण. ॥ ८
भरतवधूंचीं[15] नेत्रें म्यां चि पुसावीं यशःकरें आजी[16], ।
आजी[17] धृतराष्ट्राची[18] सुखवावी करुनि अद्भुता आजी[19]. ॥ ९

---

१. विश्वविख्यात. २. पितामह व गुरु. आजोबा भीष्म व अस्त्रगुरु द्रोण. ३ पुरुषश्रेष्ठ. (मागें अध्याय २२, आर्या २८ वरील टीपा पहा). ४. द्रोणाचें. ५. काळरूपी सर्पानें. ६. घांस. अन्वयः–जेधवां काळव्याळानें गुरुचें गात्र (शरीर) कवळ (तोंडांतला घांस) केलें [तेधवां] शस्त्रास्त्रशास्त्रमित्रें त्राणसद्यशःपात्र न झालीं. शस्त्रास्त्रशास्त्राचा निधि जो द्रोणाचार्य, तोच जेव्हां रणांत पडला, तेव्हां शस्त्रास्त्रें आपले मित्र होत व ते आपलें संरक्षण युद्धांत करतीलच, अशी जी समजूत होती ती खोटी ठरली–असा भाव. ७. शस्त्र+अस्त्र+शास्त्र+मित्रें=शस्त्रें, अस्त्रें व शास्त्रें हीच मित्रमंडळी. ८. 'मित्र' शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी आहे व पंतांनीं त्याच लिंगीं योजिलेला आहे. यावरून संस्कृतव्याकरणाप्रमाणें मराठीही निबद्ध करण्याची पंतांची इच्छा व्यक्त होते. गीर्वाणाप्रमाणें प्राकृत नियमबद्ध करण्याची इच्छा उत्पन्न होण्यास संस्कृत-व्याकरणाचें सोपपत्तिक ज्ञान पंतांनीं संपादन केलें असलें पाहिजे, यांत संशय नाहीं. ९. त्राणाचें (संरक्षणाचें) सद्यश, संरक्षण केल्यापासून जें चांगलें यश प्राप्त होतें त्याचें पात्र (भाजन, स्थान). १०. शस्त्रास्त्रांचें उत्तम ज्ञान असून द्रोणाचार्यासारखेही रणांत पडले, हें माहीत असूनही. ११. अनुपम. १२. भीष्म. १३. भला वृद्ध=फार वृद्ध. १४. जुनाट, वृद्ध. १५. भरतवंशजांच्या स्त्रियांचीं. १६. आजी (आज) यशःकरें (युद्धांत पांडवांस मारून त्या यशस्वी हातांनीं) भरतवधूंचीं (आपले पति, बंधु इत्यादिकांना पांडवांनीं मारल्यामुळें त्यांच्या-करितां रडत असणाऱ्या कौरवस्त्रियांचीं) नेत्रें म्यां चि पुसावीं (पुसण्यास मीच समर्थ आहें–दुसरा कोणीच नाहीं–असा भाव). १७. अद्भुता आजी (युद्ध) करुनि धृतराष्ट्राची आजी (गंगा) [म्यांचि] सुखवावी–असा अन्वय. धृतराष्ट्राची आजी म्हणजे भीष्माची आई गंगा. पांडवांनीं भीष्माला मारल्यामुळें ती दुःखांत आहे. आतां मी तिच्या मुलास मारणाऱ्यांस मारून तिला सुखवितों–असा भाव. १८. धृतराष्ट्राची आजी=गंगा. १९. संग्राम.

गुरुमरणें कळलें, कीं मृत्यु चुकेना चि, [1]तो जना आहे. ।
मग भय धरूनि मागें [2]मद्रेशा ! कोण जाणता राहे ? ॥ १०
जेथें धर्म, धनंजय, भीम, [3]यमज, वासुदेव, सात्यकि, ती ।
सेना [4]म्यांचि सहावी, उरले धृतराष्ट्रसुत [5]अमात्य किती ! ॥ ११
[6]वैर [7]स्वैर उगवितां म्हणतिल मज देव '[8]किंनु [9]रुद्रो' ? [10]हें ।
न घडे, तरि [11]गुरुमागें न जगेन. [12]नसे भलें [13]गुरुद्रोहें. ॥ १२
माझें प्रिय बहु केलें धृतराष्ट्रसुतें; [14]तदर्थ साधीन. ।
या [15]विषयीं [16]प्रिय भोगांसह जीवित करिन [17]अन्तकाधीन. ॥ १३
श्री[18]रामें हा रथ मज दिधला, यावरुनि पार्थ मारीन, ।
[19]तद्रक्षणासि [20]अंतक आला, तरि मीं तयासि [21]वारीन. ॥ १४
जन्हि [22]सगण सकळ [23]हरि-यम-वरुण-कुबेरादि [24]लोकपति आले, ।

---

१. तो (मृत्यु) जना (मनुष्यमात्रास) आहे. २. (मद्र+ईश) शल्या ! ३. नकुल, सहदेव. यम=जुळे=अश्विनीकुमार; त्यांपासून झालेले ते यमज. ४. बाकी राहिलेले कौरव व त्यांचे अमात्य हे काय करूं शकणार? त्यांच्या शक्तीची माझ्यापुढें काय कथा? येथें '**काव्यार्थापत्ति**' नामक अलंकार आहे. ५. मंत्री. ६. दावा, विद्वेष. ७. यथेष्ट, यथेच्छ. मी पांडवांवर वैराचा सूड यथेच्छ उगविला म्हणजे देव मला शंकराची उपमा देतील–असा भाव. ८. किं नु रुद्रः=रुद्रच कीं काय? संहारसमयींच्या शिवास रुद्र हें नांव अन्वर्थक आहे. ९. येथें 'रुद्रः' याचें 'रुद्रो' असें रूप पंतांनीं कां केलें असावें? 'रुद्रः' पुढील शब्द तर मराठी आहे. तेव्हां येथें 'ओ'कार होण्याचें कारण दिसत नाहीं. १०. हें=भीष्मद्रोणांविषयींचा सूड उगविणें. ११. द्रोणाच्या मागें. १२. गुरुद्रोहें (गुरूच्या मरणाबद्दल सूड न उगवितां, व्यर्थ जिवंत राहणें–हाच गुरुद्रोह त्यानें) भलें (कोणालाही हित) नसे (नाहीं). हें वाक्य 'न जगेन' याचें कारण आहे. म्हणून हा **काव्यलिंगालंकार**. १३. येथें 'गुरूबद्दल सूड न उगविणें' अशा अर्थी 'गुरुद्रोह' हा शब्द योजिला आहे. यांतील 'द्रोह' पदाचा चिकीर्षित अर्थ संशयित दिसतो. १४. त्या दुर्योधनाचा पांडवहननाविषयींचा हेतु. १५. ह्या कार्यांत. विषय=व्यवहार, उद्योग. १६. 'प्रिय' याचें विशेष्य 'जीवित.' १७. यमाचे स्वाधीन. १८. परशुरामानें. १९. त्या अर्जुनाच्या रक्षणाकरितां. २०. यमाचें कार्य संहार करणें हें आहे, परंतु एकाद्याविषयीं त्याच्या मनांत अनुकंपा उत्पन्न होऊन त्यानें त्याचें संरक्षण करावयाचें, असें ठरविलें तरी–असा भावार्थ. २१. निवारीन, पराजित करीन. ही गीति '**संबंधातिशयोक्तीचें**' उदाहरण आहे, असें कै० वामन दाजी ओकांचें म्हणणें आहे. [काव्यसंग्रहांतील मोरोपंतकृत उद्योगपर्व, पृ० २५५पहा]. २२. गणांसहित. २३. इंद्र. २४. दिक्पाल. हे आठ

जिंकीन ते हि, मद्गुरुशक्तिपुढें[1] काळशक्ति[2] हि न चाले'. ॥ १५
इत्यादि आत्मविक्रम[3] जेव्हां स्वमुखें यथेष्ट कर्ण वदे ।
शल्य तया उत्तर दे उग्र[4], जसें विष[5] हरासि[6] अर्णव[7] दे. ॥ १६
'कर्णा! उगा उगा रे ! किति कत्थन[8]? हें न ऐकवे कानें. ।
त्यजिली[9], निर्मर्यादा[10] अ-सती[11] वाणी तुझी, विवेकानें. ॥ १७
नरवर अर्जुन कोठें[12]? पुरुषाधम सूतपुत्र तूं कोठें[12]? ।
वाचाळा[13]! नाचावें[14] सत्स्तवनीं न स्ववर्णनीं ओठें. ॥ १८

---

आहेत. एकेक दिशेला एकेक दिक्पति असतो. त्यांचीं नांवें:—'इन्द्रो वह्निः पितृपतिर्नैऋतो वरुणो मरुत् । कुबेर ईशः पतयः पूर्वादीनां दिशां क्रमात्'—अमर. अर्जुनाचें संरक्षण करण्यासाठीं अंतकाचा दिक्पालांच्या येण्याच्या क्रियेशीं संबंध नाहीं. असा जरी वास्तविक असंबंध आहे, तरी संबंधाची कल्पना करून, कर्ण आपला दृढनिश्चय अभिव्यक्त करीत आहे, म्हणून **'अतिशयोक्ति'**.

१. (मत्+गुरु+शक्ति) माझ्या मोठ्या शक्तीपुढें. २. काळशक्ति म्हणजे यमाची शक्ति—असा अर्थ येथें घेऊं नये, कारण यमाचा उल्लेख वरील गीतींत झालाच आहे. येथें काळशक्ति म्हणजे उत्पन्न झालेल्या वस्तूचा विनाश करणारें ईश्वराचें सामर्थ्य—असा अर्थ घ्यावा. ३. स्वपराक्रम. ४. देहलीदीपन्यायानें (उंबरठ्यावरील दिव्याच्या कृतीस अनुसरून) 'उग्र' हा शब्द 'उत्तर' व 'विष' या दोन्ही शब्दांचें विशेषण आहे, असें समजावें. ५. हालाहल. समुद्रमंथनसमयीं प्रारंभीं समुद्रांतून निघालेल्या भयंकर हालाहलास उद्देशून हें वाक्य आहे. त्याची कथा अशी आहे कीं, एकदां सुरांनीं व असुरांनीं मिळून चौदा रत्नांकरितां मंदरपर्वतानें दुग्धसमुद्र घुसळिला. प्रथम त्यांतून रत्नांच्या ऐवजीं एक प्रखर विष उत्पन्न होऊन त्रिभुवनासही जाळूं लागलें, तेव्हां सर्व देव भयभीत होऊन शंकरास शरण गेले व शंकरानें भूतहिताकरितां तें विष प्राशन करून टाकिलें. ६. शंकरास. ७. समुद्र. ८. सांगणें; व्यर्थ बडबड. ९. विवेकानें तुझी निर्मर्यादा असती वाणी त्यजिली—असा अन्वय. तुझ्या बोलण्यांत विवेक मुळींच नाहीं—असा भाव. १०. मर्यादारहिता. जिला (ज्या वाणीला) अमकें बोलावें, अमकें बोलूं नये, याविषयीं निर्बंधनच नाहीं अशी. हें विशेषण 'असती' (जारिणी) व 'वाणी' या दोहोंसही लागू आहे. ह्या अर्थात **'समासोक्ति'** नामक अलंकार आहे. ११. असभ्य. हें (वाणीचें) विशेषण. जारिणी असा 'असती' शब्दांत **श्लेष** आहे. या श्लेषानें असें सुचविलें आहे कीं, ज्याप्रमाणें जारिणी स्त्रियेला विवेक, मर्यादा (सभ्यता) हीं नसतात, तशींच तुझ्या वाणीलाही (बोलण्यालाही) नाहींत. १२. दोन 'कोठें' शब्द महदंतर सुचवितात. ह्या गीत्यर्धात **'विषमा'**लंकार आहे. १३. अन्वयः—वाचाळा ! (बडबड्या) सत्स्तवनीं (सज्जनांची स्तुति करण्यांत) ओठें (ओठानें—करणी तृतीया) नाचावें, स्ववर्णनीं (आत्मस्तुति करितांना) न (नाचूं नये). १४. ओठें नाचणें=ओठ फार हालवणें, फार बोलणें, आनंदानें अखंडस्तुति करणें. नाचणें हा धर्म पायांचा.

[१]इंद्रपुरींतूनि सुधा, [२]येदुनगरींतूनि तसि [३]पृथातनुजें ।
[४]पुरुषवराची [५]अनुजा हरिली, [६]करिजेल काय तें [७]मनुजें ? ॥ १९
[८]मृगवधकलहीं अर्जुन [९]भांडे [१०]परमेश्वरासवें आंगें. ।
विश्वांत [११]विश्वनाथप्रतिभट दुसरा असेल तरि सांगें ? ॥ २०
[१२]पांडव [१३]खांडववनहवि अर्पुनि तर्पी यथेष्ट अग्नीतें. ।
[१४]अद्यापि [१५]वर्णिजेतें यश देवीं [१६]पार्थबाणभग्नीं तें. ॥ २१
तुज नित्य [१७]घोषयात्रास्मरण असावें, [१८]परंतु हा मद तों ।
आहे चि विस्मृतीचें बीज, म्हणुनि लेशमात्र मीं वदतों. ॥ २२
कलहप्रिय अंधात्मज दुर्योधन, योग्य तूं हि त्यास [१९]गेंडी. ।

---

तो ओठावर आरोपिलेला आहे. म्हणून प्रस्तुत स्थळीं **'समाधि'** नामक काव्यगुण आहे (मागें अध्याय १८।१० वरील टीपा पहा). आनंदातिरेकानें मनुष्य नाचतो, त्याप्रमाणें सज्जनांची स्तुति करितांना मनुष्यानें संतोषानें खूप बोलावें, पण आत्मस्तुति करूं नये—असा भाव.

१. इंद्रलोकांतून सर्व देवांच्या समक्ष गरुडानें ज्याप्रमाणें सुधा (अमृत) हरून नेली—असा भाव. २. यादवांच्या नगरींतून, द्वारकेंतून. ३. अर्जुनानें. अर्जुनानें पराक्रमानें द्वारकेंतून सुभद्रा पळविली—यांतील द्वारकेस अमरावती व सुभद्रेस सुधा हें उपमान आहे. पण अर्जुनास उपमान कोणतें? पुराणांतील कथेस अनुलक्षून गरुड हा उपमान घ्यावा, तर तो येथें उक्त नाहीं. करितां येथें 'एकाद्या वीरानें जशी स्वर्गांतून सुधा आणावी त्याप्रमाणें' असा अर्थ करून 'एकादा वीर' असें अध्याहृत उपमान समजावें. ४. पुरुषोत्तमाची, कृष्णाची. ५. धाकटी बहीण (सुभद्रा). ६. तें (अर्जुनानें केलेलें दुर्घट काम) मनुजें करिजेल काय ? (मनुष्य करूं शकेल काय ?) करूं शकणार नाहीं—हा इत्यर्थ. सारांश, अर्जुन हा मनुष्य नसून देव आहे—असा भाव. ७. मनुष्यानें, कोणी सामान्य व्यक्तीनें. येथें प्रश्नालंकार आहे. तें=कार्य, कृत्य. ८. शूकराला कोणी मारिलें याविषयीं झालेल्या कलहांत शंकरानें किरातरूप धरून अर्जुनाशीं शूकरास्तव कलह केला त्या वेळीं. (पंतकृत वनपर्व, अध्याय ११ पहा). मृग=हरिणादिक श्वापदजाति. ९. आंगें भांडे=स्वतः युद्ध करी, किंवा शरीरानें युद्ध करी=कुस्ती करी. १०. शंकराबरोबर. ११. शंकराशीं प्रतियोद्धा. १२. अर्जुन. १३. खांडववनरूप हवनीय द्रव्य. १४. पार्थबाणभग्नीं (पार्थाच्या बाणांनीं पराजित झालेल्या) देवीं (देवांनीं) तें [अर्जुनाचें] यश अद्यापि वर्णिजेतें (वर्णित होतें, वर्णन केलें जातें)—असा अन्वय. १५.'करिजेल' 'वर्णिजेतें' इत्यादि हीं रूपें जरीं दिसतात, तरीं विध्यर्थी नसून, स्वार्थी आहेत असें समजावें. १६. पार्थाच्या बाणांपासून हनन पावलेल्यांत. १७. अध्याय २०, गीति ६ यांतील 'घोषयात्रा' शब्दावरील टीप पहा. १८. परंतु हा [तुझा] मद तों [तर] विस्मृतीचें बीज (विसरून जाण्याचें मूळ कारण) आहे चि—गर्विष्ठ लोक मागें झालेली आपली फजिती गर्वामुळें लौकरच विसरतात—असा भाव. १९. सोबती.

चिंतेची पेटविली पांडवहृत्पंकजीं[1] तुम्हीं[2] सेंगडी[3]. ॥ २३
कपटद्यूतें हरिलें राज्य, वैंना[4] धाडिले, तदपि डावा[5] ।
धरुनि, वधाया गेलां[6], कीं दुष्टमतें क्षमास्पद[7] पिडावा. ॥ २४
विपिनांत[8] घोषयात्राव्याजें[9] गेलां धरूनियां गर्वे; ।
दुर्योधनासि मार्गीं कलहीं जिंकूनि धरिति गंधर्वे. ॥ २५
तूं प्रथम पळालासि प्राणक्षयभय[10] धरूनि मनिं, मागें[11] ।
जिंकोनि बद्ध केला दुर्योधन खेंचरनायकें[12] रागें. ॥ २६
बंधविमुक्त[13] सुयोधन तेव्हां त्वां, कीं धनंजयें केला? ।
राधेय[14] अन्य तूं, तो अन्य चि, जाणों, पळोनि जो गेला ! ॥ २७
त्या गोग्रहप्रसंगीं[15] भीष्मद्रोणादि सर्व एकानें[16] ।
केले भग्न; दशा ते तुमची क्षण आयकों नये कानें[17]. ॥ २८
तेव्हां त्वां तो अर्जुन राधेया ! कां न जिंकिला ? शस्त्रें ।
अस्त्रें गेलीं होतीं कोठें, नेलीं हरोनि जैं वस्त्रें[18] ? ॥ २९

---

१. येथें चिंतेवर शेगडीचें **रूपक** केलें आहे, पण तें सदोष आहे. शेगडी **इष्ट** असते, चिंता कधींच इष्ट नसते. कमल करपतें तें थंडीच्या कडाक्यानें, अग्नीच्या उष्णतेनें **नव्हे.** करितां 'हृत्पकंज' हें **रूप**कही सदोष आहे. २. **पां**डव+हृत्+पंकज=पांडवांच्या **हृदयकमळांत.** ३. शेगडी. सगडी–हा शब्द 'अंगार–शकटी' ह्यापासून झाला असावा. ४. 'वना धाडिलें' असा पाठभेद. ५. वैर. ६. ह्याचा कर्ता तुह्मी, अर्थात् दुर्योधनकर्णादि. ७. क्षमा+आस्पद=दयेचें स्थानच असा जो **धर्म**, तो. ८. अरण्यांत. ९. घोषयात्रेच्या मिषानें. १०. प्राण नाश पावतील अशी भीति. ११. तुझ्या मागें; तूं पळून गेल्यानंतर. १२. ख+चर+नायक=स्वर्गीं गमन करणारे जे गंधर्व, त्यांचा नायक **चित्र**सेन गंधर्व त्यानें. १३. बंधनापासून मोकळा. १४. जाणों तूं अन्य राधेय [आणि घोषयात्रेच्या वेळीं] जो [राधेय] पळोनि गेला तो अन्य चि–असा **अन्वय. शल्य** उपरोधानें ह्मणतो, कीं घोषयात्रेच्या वेळीं पळून गेलेला **रा**धेय तूं नसून जणों त्या नांवाचा दुसराच कोणी होता–असें तुझ्या या गर्वोक्तीवरून वाटतें. ह्या अर्थात **उत्प्रेक्षा** व **अतिशयोक्ति** यांचा संकर आहे. १५. उत्तरगोग्रहणसमयीं. (पंतकृत विराटपर्व, अध्याय ३ पहा). १६. एकट्या **अर्जुनानें**. १७. ते तुमची दशा कानें क्षण आयकों नये=त्या वेळेस **एका** अर्जुनानें सर्व **कौ**रवांची इतकी फजिती उडविली, कीं ती ऐकण्यासही आमच्यासारख्या **वीरांस** वाईट वाटतें–असा भाव. कानानें ऐकण्यासही आम्हांस वाईट वाटतें, अशी दुर्दशा स्वतः **अनुभवूनही** पुनः तूं निलाजरा तो निलाजराच–असाही भाव यांत गर्भित आहे. १८. **अर्जुनाच्या सांगण्या**वरून **उत्तरानें भी**ष्माशिवाय करून **मूर्च्छित** झालेल्या सर्व **कौ**रवांच्या अंगावरील **वस्त्रें** काढून नेलीं होतीं तेव्हां. (पंतकृत विराटपर्व, अध्याय ६ पहा).

झालें युद्ध उपस्थित[1] आजि, पळेनासि[2] तरि तुला पार्थ ।
मारील निश्चयें. हें कर्म करिसि निजवधूविलापार्थ.[3]' ॥ ३०
ऐसें सज्जनसंमत हित सत्य श्राव्य[4] जें वदे शल्य, ।
कर्णाच्या कर्णा दे दुःख; तसें तप्त ही न दे शल्य[5]. ॥ ३१

---

## अध्याय सव्विसावा.[6]

कर्ण म्हणे, 'गा ! शल्या ! मागील कथा कशास ? जरि आजी ।
मज जिंकील[7], तरि खरें तव कत्थन[8], शीघ्र चालवीं वाजी.' ॥ १
शल्य म्हणे 'बहु बरवें. पार्थासीं गांठि घालितों तूर्ण[9]. ।
ईश्वरवरानुकूळें[10] दैवें[11] होताति कामना[12] पूर्ण.' ॥ २
यांपरि[13] बोलत जातां पांडवपृतना[14] विलोकिली दूर. ।
'कोठें[15] अर्जुन?' ऐसें सादर ज्या त्यासि तो[16] पुसे शूर. ॥ ३
कर्ण म्हणे, 'सुखवावा भूपसखा[17] करुनि शत्रुचें निधन; ।
सांगेल[18] पार्थ मज जो, देइन मागेल तें तयासि धन. ॥ ४
मानील धन दिलें तें अल्प, तरि तयासि आणखी प्रकट[19] ।
देईन, मी संतोषें[20] सद्रत्नांहीं भरूनियां शकट[21]. ॥ ५

---

१. मागें सांगितल्याप्रमाणें तुझें व अर्जुनाचें अनेक वेळां युद्ध झालें व त्या सर्वांत तूं पराजित होऊन पळालास व आतां पुनः युद्ध प्राप्त झालें—असा त्याचा भावार्थ. २. पळून जाणार नाहींस. ३. स्वकांतेला शोक देण्याकरितां; मरण्याकरितां. येथें **पर्यायोक्त** अलंकार आहे. ४. श्रवण करण्यास योग्य. ५. लोहाग्र. भाला, बाण—असे 'शल्य' या शब्दाचे आणखी अर्थ आहेत. ६. यांत मुळांतील १८ वा अध्याय व १९ व्या अध्यायांतील १२ श्लोक इतका कथाभाग आला आहे. ७. याचा कर्ता संदर्भानें 'अर्जुन' असा घ्यावा. ८. बडबड. ९. सत्वर. १०. ईश्वर+वर+अनुकूळें=ईश्वराच्या वरामुळें अनुकूळ असलेल्या. यांत ईश्वर=परमेश्वर व शिव, असा श्लेष साधून ईश्वराचा (शिवाचा) वर अर्जुनास अनुकूल व परमेश्वराचा तुला प्रतिकूल आहे, असें सुचविलें आहे. ११. दैवानें. कोणाच्या इच्छा पूर्ण होतात त्या मुख्यतः दैवानें, पराक्रमानें नव्हेत. दैवही नुसतें नव्हे, तर ईश्वराच्या कृपेनें अनुकूळ झालेलें—असा अर्थ. १२. इच्छा. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १३. याप्रमाणें. १४. पांडवांचें सैन्य. १५. त्या सैन्यांत अर्जुन कोणत्या ठिकाणीं आहे? १६. कर्ण. 'ज्यां त्यांसि तो पुसे' असें पाठांतर. १७. सखा भूप=मित्र जो राजा दुर्योधन. १८. पार्थ सांगेल=पार्थ कोठें आहे हें सांगेल. १९. स्पष्ट. हा शब्द येथें निरर्थक पडलेला दिसतो. २०. आनंदानें. २१. गाडे.

थोडें म्हणेल हें तरि, देती अवलोकितां चि ज्या शुभ[1], त्या, ।
मीं, कांस्यदोहना[2] शत गाई देईन, ज्या भल्या दुभत्या. ॥ ६
हें अल्प पार्थदर्शक[3] मानील तरी तयासि सुग्राम[4] ।
शत देइन, कीं[5] मद्गुरु याचकचातकवरांबुमुग्[6] राम. ॥ ७
अंजननिभ[7] कच[8] ज्यांचे, वर्णें[9] ज्या क्षीरगौर अश्वतरी[10], ।
तद्युक्त[11] रथ तया मीं देईन. म्हणेल तें हि अल्प तरी, ॥ ८
ज्यासि वहाती गज सा[12] तो अर्जुनदर्शकासि रथ वाहो[13], ।
रुचिरचतुरसालंकृतयुवतिशतविलासपात्र[14] अथवा हो. ॥ ९
गज शत, सुग्राम हि शत, कांचनरथ[15] शत, दहा सहस्र हय, ।

---

१. शुभ=(१) क्षीर, दूध; (२) कल्याण, कुशल. येथें श्लेष आहे. गोमातेचें दर्शन मंगलकारक असतें, हें प्रसिद्धच आहे. २. कांस्य (कांशाचें भांडें) भर दूध देणाऱ्या. कांशाची चर्वी धार काढण्यास घेण्याची चाल त्या काळीं होती, असें दिसतें. पण ती चर्वी केवढी मोठी असे? शत=शंभर कीं शेंकडों? ३. पार्थास दाखविणारा. ४. उत्तम गांव. ५. कीं (कारण; मी अशा रीतीनें दान करीन याचें कारण असें कीं) मद्गुरु राम (माझा गुरु जो परशुराम तो) याचकचातकवरांबुमुक् [होय]-असा अन्वय. ६. याचक+चातक+वर+अंबु+मुग्=याचक+पक्षिविशेष+श्रेष्ठ+पाणी+सोडणारा=याचकरूपी चातकांस मोठा मेघच असा राम. [अंबुमुक्=पाणी सोडणारा=मेघ]. परशुराम खरोखरच मोठा दाता होता, म्हणून हें त्यास लाविलेलें विशेषण अन्वर्थक आहे. परशुरामानें सगळी पृथ्वी जिंकून ती ब्राह्मणांस अर्पण केली-ही कथा प्रख्यातच आहे. कर्ण म्हणतो कीं, असा प्रख्यात दाता माझा गुरु. तेव्हां मीही त्याचें अनुकरण करतों यांत नवल नाहीं. ७. काजळासारखे काळे भोर. ८. केश. ९. दुधासारखा शुभ्रवर्ण ज्यांचा अशा. 'गौर' शब्दाचे लाल, पांढरा, पिंवळा व स्वच्छ-इतके अर्थ आहेत. १०. खेचरी. ११. त्या खेचरांनीं युक्त. अर्थात् खेचरी जुंपलेला (रथ). यावरून त्या वेळीं खेचराच्या रथांतही सभ्य लोक बसत असत, असें वाटतें. १२. सहा. १३. ज्यासि सा गज वाहती तो रथ अर्जुनदर्शकासि वाहो-असा अन्वय. म्हणजे, असा रथ मी त्यास देईन-असा भाव. १४. रुचिर+चतुर+सालंकृत+युवति+शत=सुंदर+चतुर+अलंकारमंडित+स्त्री+शंभर=सुंदर, चतुर व सालंकृत अशा शंभर स्त्रियांचें विलासस्थान असा. या समासांतील 'चतुर' व 'विलास' या शब्दांस नाट्यशास्त्रांत विशेष अर्थ आहेत. चतुर=अभिनयहस्तविशेष. विलास=स्त्रियांच्या आल्हादजनक यानावलोकनादि (चालणें, पाहाणें इत्यादि) क्रियारूपी शृंगारचेष्टा. अशा रीतीनें या शब्दांचे विशेष अर्थ घेतले म्हणजे या गीतींत जो शृंगाररस आहे तो स्पष्ट होईल. साधे दिसणारे पण विशेष अर्थाचे शब्द वापरून कवीनें आपलें कौशल्य मोठ्या खुबीनें दाखविलें आहे. १५. सोन्याचे रथ.

अर्पीन, अर्जुना जो दावील, तया; न आवरीन [1]शय. ॥ १०
[2]शिक्षित साधु [3]सुगति हय शत देइन, [4]कुशळ रथ वहायाचे, ।
[5]अत्युत्तमजातीचे [6]प्रबळक्षतशल्यभर [7]सहायाचे. ॥ ११
[8]तुष्ट न होतां [9]कांचनशृंगी धेनू तयासि शत [10]चारी ।
देइन, पंचशत कनकभूषित [11]धवलाश्व [12]तदभिमतचारी. ॥ १२
[13]मुदित न होतां देइन अणखी मीं [14]दान्त अश्व अठरा [15]यां ।
[16]कांबोजयुक्त [17]शुभ्रस्यंदन ही; चालवीन हठ, [18]राया! ॥ १३
[19]पश्चिमकच्छीं झाले, [20]हस्तिपकांहीं [21]विनीत जे केले, ।

---

१. हात. २. साधु शिक्षित=चांगले शिकविलेले. ३. चांगली आहे गती ज्यांची, फार लौकर चालणारे. ४. रथ वहायाचे कुशळ=रथ वाहून नेण्यांत फार कुशळ (अश्वांचें विशेषण). 'वहायाचे' हा षष्ठीचा प्रयोग लक्षांत ठेवण्यासारखा आहे. रथ वहावयाचे=रथ वहावयाचेंच काम करणारे. बसण्याच्या किंवा ओझीं वाहण्याच्या कामीं जे लाविले जात नसत असे. ५. अति उत्तम जातीचे. ६. अति भयंकर घाव व बाणाग्रें यांचे भर. ७. साहूं शकणारे, साहण्यास समर्थ—असा भाव. या सर्व षष्ठ्यंत शब्दांचा 'हय' शब्दाशीं अन्वय आहे. ८. वर वर्णिलेले पदार्थ घेऊनही अर्जुनास दाखविणारा जर संतुष्ट होणार नाहीं तर—असा 'तुष्ट न होतां' याचा अर्थ आहे. ९. सोन्याचीं शिंगें आहेत ज्यांस; (किंवा) सोन्यानें मढविलीं आहेत शिंगें ज्यांचीं. १०. चारशें. ११. पांढरे घोडे. १२. तत्+अभिमत+चारी=त्याच्या (दान घेणाऱ्याच्या) इच्छेप्रमाणें गमन करणारे. १३. संतोषित. १४. दमित, शिकविलेले. १५. अर्जुन दाखविणाऱ्या जनास. जेथें 'तो' किंवा 'त्या' हे शब्द शोभतील, तेथें 'हा' किंवा 'या' हे शब्द पंत वापरतात. उदाहरणार्थ—'वंदुनि पुत्र सुहृज्जनशोकनटाच्या मनोज्ञ अजिरा या' [मागें अध्याय १ गीती ५]. १६. कांबोजदेशीं झालेले घोडे त्यांसहवर्तमान. १७. पांढरे रथ. प्रस्तुत स्थळीं पांढरे रथ म्हणजे पांढऱ्या आच्छादनांनीं युक्त रथ—असा भाव दिसतो. रथ पांढरे होते असें वर्णन करण्यांत विशेष खुबी आहे असें नाहीं. शुभ्र स्यंदनही देईन—असा अन्वय. १८. राया! (हे शल्या!) [त्याचा] (मला जो कृष्णार्जुनांस दाखवून देईल त्याचा) हठ (हट्ट) चालवीन—मला अमकाच पदार्थ पाहिजे असा तो हट्ट घेऊन बसला व जरी तो पदार्थ फार दुर्लभ असला, तरी मी त्याला तो मिळवून देईन—असा भाव. १९. पश्चिम कच्छ प्रांतांत उत्पन्न झालेले. मूळांत 'उत्पन्नानपरांतेषु'—असें असून त्यावर 'अपरांतेषु=पश्चिमकच्छेषु' अशी नीलकंठी टीका आहे. यावरून पंतांनीं ही किंवा दुसरी टीका पाहिली होती, म्हणजे आपलें भारत रचण्याच्या पूर्वी संस्कृत भारताचा चांगलाच अभ्यास केला होता, असें दिसतें. २०. महातांनीं. २१. सुशिक्षित. [विनयसंपन्न—असाही या शब्दाचा अर्थ होतो].

कांचन[1]मंडित ष[2]ट्शत गज देइन, कीं[3] सुहृत्करीं[4] गेले. ॥ १४
जेथ विपुल जल, खलबल[5] तिळ हि नसे, वस्तु बहु समर्घ[6] विके, ।
वैश्य[7]ग्राम चतुर्दश ओपीन, जयांत सर्व धान्य पिके. ॥ १५
दे[8]ईन निष्क[9]कंठी तरुणी शत एक मागधी[10]दासी. ।
विनवूनि[11] पुसेन, जसा शिष्य[12] म्हणे 'इष्ट माग' धीदासी[13]. ॥ १६
हें सर्व तुच्छ ऐसें जरि गणिलें पार्थदर्शकें चित्तें, ।
देइन सुत[14] हि स्त्री[14] ही, जीं जीं असतील संग्रहीं[15] वित्तें. ॥ १७
जो दाखवील मजला कृष्णार्जुन तो[16] न लोक सामान्य, ।
पूर्वोक्ताल्पधनाच्या[17] दाना होईल तो कसा मान्य[18] ? ॥ १८
मारीन कृष्ण[19] दोघे, तन्मणिधन[20] सर्व हरुनि आणीन, ।

---

१. सोन्यानें मढविलेले. २. सहाशें. ३. जणों ते सर्व माझ्या मित्राच्याच घरीं गेले–म्हणजे त्याबद्दल मला वाईट न वाटतां आनंदच होईल–असा भाव. ४. सुहृत्+करीं=जिवलग मित्राच्या हातीं. 'कीं न ते वृथा गेले' असा पाठभेद. ५. गडबड, गलबला; इतर लोकांकडून कोणत्याही प्रकारचा त्रास नसून जी जागा अति शांत आहे–असा भाव, किंवा जेथें खलबल (दुष्टाचें बळ) तिळ हि (मुळींच) नसे–म्हणजे जी जागा इतकी सुरक्षित आहे कीं, दुष्ट शत्रूचें बळ तेथें मुळींच चालूं शकत नाहीं–असाही अर्थ करावा. ६. स्वस्त. ७. ज्यांत वैश्य (वाणी, व्यापारी) फार आहेत असे गांव. वैश्य फार असल्यामुळें कोणत्याही पदार्थाची वाण पडणार नाहीं–असा भाव. ८. निष्ककंठी तरुणी शत एक (शंभरेक) किंवा एक शत व मागधीदासी एक शत देईन असा, किंवा निष्ककंठी तरुणी मागधीदासी एक शत देईन–असा अन्वय करावा. ९. पदक ज्यांच्या गळ्यांत आहे अशा. निष्क=वक्षस्थळाचें भूषण. १०. मागध ही एक सेवकांची जात आहे. ही प्रथम मगध देशांतून आली असावी. ११. मी मोठ्या विनयानें अर्जुनदर्शकास पुसेन–असा भाव. १२. विद्या संपवून गुरुकुळ सोडून गृहस्थ होण्याकरितां जाणारा शिष्य, विद्यादानाबद्दल वाटेल ती गुरुदक्षिणा मागा, असें गुरूस विनवितो–त्या चालीस उद्देशून हें वाक्य आहे. १३. धीदासी=बुद्धि व विद्या देणाऱ्या अशा गुरूस. १४. माझीं मुलें व स्त्रीदेखील. १५. माझ्या संग्रहीं. १६. तो सामान्य लोक (मनुष्य) न–असा, किंवा–तो (अर्जुनास दाखविणारा) लोकसामान्य न (लोकांत सर्वसाधारण जे लोक दिसतात तसला नाहीं, तर तो अलौकिक असला पाहिजे)—असा सान्वयार्थ करावा. १७. पूर्व+उक्त+अल्प+धन= पूर्वीं सांगितलेल्या स्वल्प धनाच्या. १८. हा प्रश्नालंकार. मान्य नाहींच होणार–असा भाव. १९. कृष्ण असें अर्जुनासही नांव आहे. म्हणून दोघे कृष्ण म्हणजे कृष्णार्जुन. २०. कृष्णार्जुनांजवळ असलेलीं रत्नें व द्रव्य.

मग तेणें मीं प्रेमें [1]त्या [2]परमप्रियकरासि न्हाणीन. ॥ १९
कृष्णार्जुनदर्शक जरि तेणें हि न होय [3]सुप्रसन्नमना, ।
[4]बहु काय ? [5]काय हा, [6]शय जोडुनि, वाहीन करुनि [7]सन्नमना'. ॥ २०
ऐसें वदोनि कर्णें वाजविला [8]कंबु [9]अंबुदध्वान, ।
त्याच्या प्रतिध्वनीतें पुरे असा होय [10]दिविषदध्वा न. ॥ २१
दुर्योधन [11]कर्णोक्तिश्रवणें हर्षोनि करि [12]दरस्फुरण, ।
वाजविति शंख [13]सैनिकें, ये सर्वांला हि सत्वर स्फुरण. ॥ २२
शल्य म्हणे, 'राधेया ! वांटिसि कां धन [14]कुबेरसा ? [15]अज्ञा ! ।

---

१. पार्थ दाखविणारास. २. मला परम (अत्यंत) प्रिय (हित) करणारा जो अर्जुनदर्शक त्यास. ३. सु (उत्तम तऱ्हेनें किंवा फार) प्रसन्न (संतुष्ट) झालें आहे मन ज्याचें असा. ४. अन्वय व अर्थः—बहु काय? (फार काय सांगूं?) शय जोडुनि (हात जोडून) सन्नमना करुनि (चांगला-भक्तीनें-नमस्कार करून) हा काय (हें माझें शरीर) [त्या अर्जुनदर्शकास] वाहीन (समर्पण करीन)–[चवथ्या गीतीपासून तों विसाव्या गीतीपर्यंत जें हें कर्णाचें भाषण आहे, तें **सारालंकाराचें** उत्तम उदाहरण आहे. अर्जुनास दाखविणाऱ्या मनुष्यास देण्याच्या ज्या ज्या वस्तू वर्णिल्या आहेत, त्या त्या एकापेक्षां एक अधिक महत्त्वाच्या असून शेवटीं स्वशरीर अर्पण करीन असें सांगून कळस केला आहे. 'गुणस्वरूपाभ्यां पूर्वपूर्ववैशिष्टये सारः' असें रसगंगाधरांत याचें एक लक्षण आहे. पदार्थांचे गुण किंवा स्वरूप उत्तरोत्तर पायरीपायरीनें वर चढून शेवटीं अगदीं अखेरच्या (सारभूत) गुणस्वभावांचें वर्णन झालें, म्हणजे हा अलंकार होतो. याचीं उदाहरणें:–'पर्वत मोठा आहे. त्याहून सागर, त्याहून आकाश, त्याहून ब्रह्म व त्याहून आशा मोठी आहे.' 'हे सुंदरि, तुझें मुख आरशास, कमलास व चंद्रास तुच्छ मानीत आहे.' वेदांतही हा अलंकार आढळतो:–'महतः परमव्यक्तमव्यक्तात्पुरुषः परः । पुरुषान्न परं किंचित् सा काष्ठा सा परा गतिः ॥]. ५. देह. ६. हात. ७. या कर्णाच्या भाषणांत अर्जुनाला पाहण्यास तो किती उत्सुक झाला होता हें दाखविलें आहे. ८. शंख. ९. मेघासारखा शब्द करणारा. ध्वान=शब्द, ध्वनी. १०. दिविषत्+अध्वा=देवांचा+मार्ग=आकाश. अन्वयः–त्याच्या (त्या शंखाच्या) प्रतिध्वनीतें पुरे असा (प्रतिध्वनी मावूं शकेल इतका) दिविषदध्वा न होय. त्या शंखाचा इतका मोठा ध्वनि झाला कीं, तो गगनांत मावेना–असा भाव. येथें आधारापेक्षां आधेय मोठें आहे, म्हणून '**अधिका**'लंकार झाला आहे. ११. कर्ण+उक्ति+श्रवणें=कर्ण+म्हणणें+ऐकून=कर्णाचे वरील उल्हासजनक शब्द ऐकून. १२. शंखवादन. १३. सेनेंतील वीर. १४. धनद व धनाधिपती जो वैश्रवण त्यासारखा. 'कुबेरसा वांटिसि' या शब्दावरून कुबेर मोठा दाता होता असें वाटेल, पण त्याची दानाविषयीं ख्याती नाहीं. फक्त 'धनद' (धन देणारा) हें नांव आहे खरें. 'कुबेरसा वांटिसि' म्हणजे कुबेराप्रमाणें कधींही न सरण्याइतकें आपल्याजवळ धन आहे, असें समजून धन उधळीत आहेस, असा अर्थ करावा. १५. मूर्खा.

पार्थ पहासील सुखें. व्ययवेत्ते वित्त वेचिती यज्ञा. ॥ २३
नेणसि अपात्रदानीं दोष, धनत्याग मूढसा करिसी, ।
कार्य अयत्नें होतां, धन वेंचुनि अयश-पाप कां वरिसी ? ॥ २४
'त्या दोघां कृष्णांतें' म्हणसी 'मारीन' मोहें हा. कवणें ।
'वधिले सिंहें शृगाळें' ऐसें लोकांत ऐकिलें श्रवणें ? ॥ २५
इच्छिसि न इच्छिजे तें, संसारीं तुज नसे चि हित मित्र; ।
पडसी पतंगसा जरि धनंजयीं, वारिती न, हें चित्रें. ॥ २६
कार्याकार्य न जाणसि; अश्राव्य अवाच्य वदसि बहु; एणें ।
कालग्रस्त गमसि; कळि करिजे हरिसीं न सावधें एणें. ॥ २७
कंठीं बांधोनि शिळीं बाहुबळें जेंवि सागरीं तरण, ।
कीं भृगुपतन, तसें हें, जें तूं करणार त्यां अरींत रण. ॥ २८

---

१. विशेष श्रमाशिवाय. 'अयत्नेनैव राधेय द्रष्टास्यद्य धनंजयं' असें मुळांतील वाक्य आहे. २. कोणत्या वेळीं खर्च करावा व कोणत्या वेळीं करू नये हें जाणणारे, अर्थशास्त्रज्ञ. व्ययवेत्ते यज्ञा (यज्ञाकरितां-उत्तम कार्याकरितां) वित्त वेचिती—आणि तूं तर मूर्खपणाच्या कृत्यांत धन खर्च करितोस-असा भाव. मुळांत असें आहे-'यत्त्वं प्रेरयसे वित्तं बहु तेन खलु त्वया । शक्यं बहुविधैर्यज्ञैर्यष्टुं सूत यजस्व तैः ॥'. ३. खर्च करितात. वेचणें किंवा वेंचणें ह्याचा टिपून वेणें असा दुसरा अर्थ आहे. ४. अयोग्य पुरुषास दान देण्यांत. ५. भ्रम, अज्ञानोत्पन्न कल्पना. ६. कोणी, कोणत्या मनुष्यानें. ७. येथें **असंभव** नामक अलंकार झाला आहे. जेथें असंभाव्य अर्थाची प्राप्ती झाली आहे, असें वर्णन असतें, तेथें हा अलंकार होतो. ८. कोल्ह्यानें. ९. कानानें. १०. असें म्हणण्याचें कारण पुढच्याच अध्यायांत सांगितलें आहे. ११. या शब्दावर **श्लेष** आहे. अर्जुनावर, (पक्षीं) अग्नींत-असा अर्थ. १२. यास कर्ते 'हित,' व 'मित्र'. वारिती=निवारण करिती. १३. आश्चर्य. १४. काळानें ग्रासलेला. १५. कलह. १६. सिंहाशीं. १७. प्राणांविषयीं सावध अशा. १८. हरिणानें. १९. दगड. २०. तरून जाणें. २१. कडेलोट. २२. कृष्णार्जुनादिक शत्रूंमध्यें. या गीतींत **निदर्शना** नामक अलंकार झाला आहे. कारण 'कंठीं शिळा बांधोनि सागरीं तरण' 'भृगुपतन' व 'कर्णाचें अरीबरोबर रण'—हीं सर्व एकच आहेत—या सर्वांत पूर्णपणें अभेद आहे, असें वर्णन या गीतींत आहे. या अलंकाराचें लक्षण:-जेथें उपमानोपमेयवाचक वाक्यार्थावर ऐक्यारोप केलेला असतो, तेथें **निदर्शना**-अलंकार होतो. या अलंकाराचे **सदर्थ** व **असदर्थ** निदर्शना असे दोन भेद आहेत. त्यांचीं उदाहरणें:—(१) दुष्टावर उपकार करणें हें सापास दूध पाजणें आहे. (२) मूर्खास बोध करणें हें उपळ्या घागरीवर पाणी ओतणें आहे. प्रस्तुत गीतींत ही **सदर्थनिदर्शना** समजावी. या गीतीच्या पूर्वार्धांत **असंभव** अलंकारही गर्भित आहे.

व्यूह रचोनि [१]सकळनृपबंधुसुतसुयोधनादिकांसहित, ।
पार्थासीं युद्ध करीं, जरि म्हणसि, 'स्वहित हो, न हो अहित'. ॥ २९
कुरुपतिचें अहित न हो, हो हित चि, म्हणोनि [२]वाहिनीपा ! हें, ।
कथितों. [३]श्रद्धा धरिं जरि जगणें आहे; [४]विचारुनी पाहें.' ॥ ३०
कर्ण म्हणे 'शल्या ! मीं [५]स्वभुजबळें [६]प्रार्थितों रणीं पार्था; ।
हे [७]प्रभु सहाय असतां, साधीना कर्ण कोणत्या [८]स्वार्था ? ॥ ३१
तूं निश्चित [९]हितशत्रु, स्तविसी [१०]घडिघडि सधर्मभीमातें, ।
[११]साच्युतधनंजयातें; कीं देवूं पाहतोसि [१२]भी मातें. ॥ ३२
या [१३]दृढमदभिप्रायापासुनि वारूं शके न शक्र मला; ।
[१४]मर्त्यांची [१५]काय कथा ? [१६]प्राकृतसा काय कर्ण हा गमला ?' ॥ ३३

---

१. सर्व राजांस, बंधूंस, मुलांस व दुर्योधनादिक कौरवांस स्वरक्षणाकरितां आपल्या भोवतीं ठेऊन—असा भाव. '०सुयोधनादिकीं सहित' असा रा० पराडकर यांच्या प्रतींत पाठ आहे. २. सेनापते. ३. भाव. ४. माझें म्हणणें खरें आहे कीं खोटें याचा विचार कर. ५. आपल्या मनगटाच्या जोरावर; दुसऱ्याच्या शक्तीवर नव्हे—असा उद्देश. दुर्योधनादिकांस बरोबर घेऊन युद्ध कर, नाहीं तर मरशील—असें जें शल्याचें म्हणणें होतें त्यास हें उत्तर आहे. ६. प्रार्थितों= पकडतों. प्रार्थ्=इच्छा करणें, चाल करून जाणें, पकडणें. ७. हे सामर्थ्यवान् माझे भुज. हे समर्थ भुज—पंत. ८. स्वकार्यास. 'स्वार्थ' शब्दाचा हा अर्थ लक्षांत ठेवण्यासारखा आहे. ९. बाहेरून मित्रत्व दाखवून आंतून शत्रुत्व करणारा जो तो. १०. 'घडिघडिस धर्मभीमातें' असा 'सर्वसंग्रह'—कारांचा अन्य पाठ—अन्य पदच्छेदच म्हणावयाचा—आहे. हा पाठ बरा नव्हे. कारण यांत 'धर्म भीमातें' यांतील 'मा' वर अनुस्वार पाहिजे. पण चतुर्थ चरणाचें यमक 'भी मातें' असें असून 'मा' वर अनुस्वार नाहीं. अनुस्वारव्यत्यय दोष यमकांत फारसा बाधतो असें नाहीं. पण पंत होईल तेथपर्यंत हा दोष होऊं देत नाहींत, म्हणून आम्हीं 'सर्व-संग्रह'—कारांचा पाठ सोडून 'नवनीतकारां'चा पाठ मुळांत ठेवला आहे. रा० पराडकर यांनीं सुद्धां हाच पाठ स्वीकारिला आहे. ११. स+अच्युत+धनंजय=कृष्णासह अर्जुन. १२. 'भी' म्हणजे—भीति, भय. हा शब्द आतां बहुतेक उपयोगांतून गेलेला आहे. १३. दृढ+ मत्+अभिप्राय=दृढ अशा माझ्या युद्ध करण्याविषयींच्या अभिप्रायापासून. १४. मरणाधीन मनुष्याची. १५. शक्रसुद्धां वारूं शकत नाहीं, तेव्हां मनुष्य काय वारूं शकेल—अशा कैमुतिकन्यायानें अर्थसिद्धि असल्यामुळें हा काव्यार्थापत्तिनामक अलंकार झाला. १६. पामराप्रमाणें, क्षुल्लक मनुष्याप्रमाणें. 'विवर्णः पामरो नीचः प्राकृतश्च पृथग्जनः'—(अमर). 'प्राकृत' या शब्दाची व्युत्पत्ति अशी:—प्रकृतौ यथा जातस्तथैव वर्तमानो न व्युत्पन्न इति प्राकृतः.

## अध्याय सत्ताविसावा.[1]

शल्य म्हणे, 'राधेया ! जेव्हां तुझिया स्मरोनि कर्मातें,[2] ।
अर्जुन तीव्र शरानीं समरीं भेदील सर्व मर्मातें, ॥ १
तेव्हां पश्चात्तापा बापा ! तूं पावसील पापानें,[3] ।
सापानें[4] धरिला प्लव[5] न जगे; बडबडसि तूं जसा पानें.[6] ॥ २
विजयें वाजवितां, तव कर्णा[7] कर्णा[8] ! रुचेल, कंबु,[9] कसा ? ।
पळसील, भ्रमसील चि, आइकतां सिंहनाद,[10] जंबुकसा.[11] ॥ ३
अंबांकस्थित[12] शिशु शशिमंडळ कवळावया जसा पाहे, ।
तूं विजयासि वधाया वांच्छिसि; हें कोण जाणता[13] साहे ? ॥ ४
पाचारिजे[14] मृगाधिप[15] बाळमृगें[16] धरुनि युद्धकाम[17] रणा, ।
विजयासीं कळि तैसी;[18] न[19] वरिसि[20] तूं अप्रबुद्ध[21] कां मरणा ? ॥ ५
शवमांसमत्त[22] जंबुक तूं, गजमुक्ताश[23] सिंह तो जिष्णु; ।

---

जसा जन्मला तसाच ज्ञानहीन राहणारा तो प्राकृत. शैव व वैष्णव पथांत तत्तन्मतांतील विशेष संस्कार जो करून घेत नाहीं, त्यास 'प्राकृत' म्हणतात. १७. ह्या गीत्यर्धांत '**वक्रोक्ति**' नामक अलंकार आहे.

१. मुळांतील अध्याय ३९ श्लोक १३–३५ व चाळिसावा अध्याय इतका कथाभाग यांत आलेला आहे. २. दुर्योधनानें केलेलीं सर्व कर्में कर्णप्रेरितच होतीं, म्हणून 'तुझिया कर्मातें' असें शल्यानें म्हटलें आहे. सभेंत द्रौपदीला उद्देशून कर्ण जे शब्द बोलला, ते मात्र त्याच्या स्वतःचे. [ मोरोपंतकृत सभापर्व–अ० ६ पद्य ]. ३. 'तापा–बापा-पापा'-**वृत्त्यनुप्रास.** पापानें=आजपर्यंत केलेल्या पापाचरणामुळें. ४. 'पापानें-सापानें-जसा पानें' येथें 'पानें' याच्या आवृत्तीमुळें **वृत्त्यनुप्रास** झाला आहे. ५. बेडूक. ६. मद्यप्राशनानें. ७. कानाला. ८. 'कर्णा–कर्णा' हा **छेकानुप्रास.** ९. शंख. १०. सिंहाचा शब्द; किंवा वीरध्वनि. ११. कोल्ह्याप्रमाणें. १२. अंबा+अंक+स्थित=आईच्या मांडीवर बसलेला. १३. अर्जुनसामर्थ्य व कर्णसामर्थ्य जाणणारा. १४. बोलाविजे. १५. सिंह. १६. हरिणशिशूनें. मृग शब्द अरण्यांतील पशु, हरिण, हत्ती या अर्थीं योजितात. १७. युद्धाची इच्छा. १८. तैसा (मागच्या चरणांतल्या सादृश्यासारखा) [तुझा] विजयाशीं (अर्जुनाशीं) कळि (वैर, युद्ध) [होय]. १९. तूं अप्रबुद्ध मरणा कां न वरिसि (वरशीलच)–असा अन्वय करावा. किंवा सर्व गीति एकच वाक्य आहे, असें समजून–तैसा (जैसा तो बाळमृग तैसा) अप्रबुद्ध तूं मरणा (आपल्या मरणाकरितां) विजयासीं कळि (युद्ध) कां न वरिसि–असा अन्वय करावा. २०. स्वीकारिसी. २१. अज्ञानी. २२. प्रेताचें मांस खाऊन उन्मत्त झालेला असा. २३. गजगंडस्थलस्थ मुक्ताफल खाणारा.

तूं शशक[१], पार्थ गजपति[२]; कीं दानव तूं, सिताश्व[३] तो विष्णु. ॥ ६
स्वबिलैंस्थकृष्णसर्पा[४] काष्ठें[५] टोंचोनि खवळिसी कां ? गा ! ।
तीव्रत्रिशूल[६]वदनें तूं खाजवितोसि आपुल्या आंगा[७]. ॥ ७
तूं सर्प दर्पपरवश[८] युद्धा पाचारितोसि पक्षीना[९]; ।
मग तो कां निजदैवोपस्थित[१०] योग्य स्वभक्ष्य भक्षीना ? ॥ ८
पार्थ-पयोधर[११] गर्जे, स्पर्धा[१२] मंडूक[१३] तूं[१४] वृथा धरिसी, ।
त्याच्यापुढें 'डुरु[१५] डुरुरु टरौं[१६] टरौं' शब्द हे किती करिसी ? ॥ ९
श्वान[१७] स्वपोषकाच्या सदनाच्या आश्रयें उभा राहे, ।
जिकडे वनांत गर्जे शार्दूल[१८] तया दिशेकडे पाहे. ॥ १०

---

१. ससा. २. गजश्रेष्ठ. ३. अर्जुन. ४. आपल्या बिळांत बसलेल्या काळ्या सर्पास. ५. लांकडानें, काठीनें. ६. तीक्ष्णशूलाच्या टोकानें. ७. शरीरास. या गीतींतली वर्ण्य गोष्ट, तूं अर्जुनासारख्या शूरास उगीच चिडवून स्वमृत्यु ओढवून घेतोस, अशी पहिल्या अर्धांत, व अति भयंकर अर्जुनाशीं भांडण करितोस अशी दुसऱ्या अर्धांत असून त्यांचें प्रतिबिंब जे कृष्णसर्प व गरुड त्यांचें वर्णन केलें आहे. म्हणून हा **ललित** नामक अलंकार होय. त्याचें लक्षण:–'प्रकृतधर्मिणि प्रकृतव्यवहारानुल्लेखेन निरूप्यमाणोऽप्रकृतव्यवहारसंबन्धो ललितालंकार:' [रसगंगाधर:]. म्हणजे, कर्त्या (प्रकृतधर्मी) विषयीं जो वृत्तांत सांगावयाचा, तो न सांगतां दुसऱ्या एकाद्या त्याजसारख्या अप्रस्तुतरूप वृत्तांतानें तो सुचित केल्यास **ललिता**लंकार होतो. जसें–'पाणी निघून गेल्यावर हा पूल बांधण्यास इच्छितो'=हा योग्य समयीं प्रयत्न न करितां प्रसंग निघून गेल्यावर धडपड करतो. या अलंकारांत, **अप्रस्तुतप्रशंसेंत** व **निदर्शनेंत** थोडथोडा भेद आहे. तो लक्षांत न ठेवल्यास या तीन अलंकारांत घोंटाळा होण्याचा संभव आहे. तो भेद असा:—**अप्रस्तुतप्रशंसें**त प्रकृतधर्मी (म्ह० ज्याचें वर्णन चाललेलें असतें त्याचा उल्लेख नसतो. त्याविषयीं देखील अप्रस्तुत विषयांत बोलण्यांत येतें. **ललितां**त जो प्रकृतधर्मी त्याचा उल्लेख असलाच पाहिजे; व अप्रस्तुत रीतीनें जें सांगावयाचें असतें तें त्याविषयीं सांगितलेलें असतें. **निदर्शनेंत** प्रस्तुत व अप्रस्तुत अशा दोन्ही विषयांचा उल्लेख असतो, पण **ललितां**त फक्त **अप्रस्तुता**चाच असतो. ८. गर्वानें परवश झालेला, आपणास व आपल्या योग्यतेस विसरलेला. ९. पक्षी+इन=पक्ष्यांच्या स्वामीला, गरुडाला. १०. निज+दैव+उपस्थित=आपल्या सुदैवानें प्राप्त झालेलें. ११. मेघ. १२. वैर. १३. बेडूक. १४. कर्ण. या गीत्यर्धांत पार्थावर पयोधराचा (मेघाचा) व 'तूं' या सर्वनामानें बोधित होणाऱ्या व्यक्तीवर (कर्णावर) मंडूकाचा (बेडकाचा) आरोप केला आहे, म्हणून येथें '**रूपका**'लंकार आहे. १५. 'डुरु डुरुरु टरौं टरौं' हे–बेडकाच्या ओरडण्याचे अनुकरणवाचक शब्द आहेत. १६. 'डुरु डुरू टरों टरों' असाही पाठ आहे. १७. ही व याच्या पुढच्या दोन गीति सुभाषितरूप आहेत. १८. वाघ. गीति ९ व १० मध्यें **स्वभावोक्ति** आहे.

भुंके बळें यथेष्ट, [1]व्यथित करी [2]निकटवर्तिजनकर्णा, ।
[3]अर्जुनदृष्टि न पडली तों[4] चि तसा भुंकतोसि तूं कर्णा ! ॥ ११
[5]शशमंडळींत कोल्हा म्हणतो 'मी सिंह' [6]वल्गना करितो, ।
[7]जोंवरि न पाहिला [8]गजमुक्ताफळकवळभक्षिता [9]हरि तो. ॥ १२
[10]आखु [11]बिडाल, श्वान व्याघ्र, [12]शृगाल [13]द्विपारि, [14]शशक [15]करी, ।
विष अमृत, सत्य अनृत हि, [16]तूं पार्थ, [17]तयां तुम्हां नसे चि [18]सरी'. ॥ १३
[19]कर्ण म्हणे, '[20]गुणवद्गुण जाणे [21]गुणवंत, [22]अगुण नेणे ची ।
[23]प्रसवे ती च अभिज्ञा शल्या ! तैसी न [24]वांज [25]वेणेची. ॥ १४

---

१. पीडित. २. जवळ असणाऱ्या मनुष्यांच्या कानांला. ३. तुझ्यावर अर्जुनाची दृष्टि पडली नाहीं तोंपर्यंत. 'अर्जुन दृष्टि न पडला तों चि' असा पाठभेद. ४. तोंपर्यंत. ५. सशांच्या मंडळींत. ६. बढाईच्या गोष्टी. ७. 'तोंवरि करि जंबुक गर्जना । जोंवरि न पाहि पंचानना.' हें सुभाषित या गीतीशीं समानार्थक आहे. ८. गज+मुक्ताफळ+कवळ+भक्षिता=हत्ती+गंडस्थलांतील मोतींरूपी फळें+घांस+खाणारा. हत्तीच्या गंडस्थलांत मोतीं असतात व हत्तीस मारून सिंह तीं भक्षितो, असा **कविसमय** आहे. कविसमय म्हणजे कविजनांनीं ठरविलेला नियम. 'गजगंडपललकवळभक्षिता' (=हत्तीच्या गंडस्थळांतील मांस खाणारा)-असा रा० **पराडकर** यांच्या प्रतींत पाठ आहे. पण आम्ही स्वीकारिलेला पाठच विशेष प्रचारांत आहे. ९. सिंह. ही गीति **अप्रस्तुतप्रशंसे**चें प्रख्यात उदाहरण आहे. येथें शश=कौरव, कोल्हा=कर्ण, व सिंह=अर्जुन-असा शल्याच्या म्हणण्याचा भाव. १०. मूषक. ११. मांजर. १२. कोल्हा. १३. सिंह. १४. ससा. १५. हत्ती. ह्या आर्यैंत दोन भाव निघतात ते हे कीं, एक दुर्बळ आणि बलवान यांची उपमा; आणि दुसरा ग्राह्य व अग्राह्य यांची उपमा-**कर्णार्जुनांस** दिली आहे. १६. तूं [आणि] **पार्थ** [अनुक्रमें] आखु बिडाल [इत्यादि आहां]-असा अन्वय. जी दोन दोन शब्दांची एकेक जोडी या गीतींत आहे, त्यांपैकीं पहिला **कर्ण** व दुसरा **अर्जुन** यांस लागू आहे. पण 'सत्य अनृत हि' ही जोडी चुकीची आहे. येथें 'विष अमृतानृत सत्य हि' असा पाठ असावयास पाहिजे होता, म्हणजे जोड्यांचा अनुक्रम चुकीचा झाला नसता. हा **यथासंख्य** किंवा **क्रमालंकार** होय. १७. तयां तुम्हां=त्यांना व तुम्हांला=ज्यांचे धर्म वर सांगितल्याप्रमाणें परस्परविरुद्ध आहेत अशा तुम्हां दोघांना. १८. बरोबरी. १९. ह्या कर्णाच्या भाषणांत **वीररस** ओतप्रोत भरलेला आहे. २०. जो गुणवान् त्याचे गुण. २१. गुणवान्. २२. अगुण (जो गुणरहित-मूर्ख तो) गुणवद्गुण नेणे ची (जाणत नाहीं)—असा अन्वय. २३. [जी] प्रसवे (बाळंतीण होते-मुलांस जन्म देऊन आई होते) तीच वेणेची (प्रसववेदनेची) अभिज्ञा (जाणणारी-तीच जाणते-असा भाव); तैसी (मुलाच्या आईप्रमाणें) वांज (वंध्या) [वेणेची अभिज्ञा] न [जाणे]-असा अन्वय. प्रस्तुत गीति पुढील प्रख्यात गीर्वाण श्लोकाचें

तूं गुणहीन गुणागुण[1] कैसा गा ! जाणसील ? अंधानें ।
कैसें नाट्य पहावें ? कीं स्वर्गीं सुख असत्यसंधानें[2] ? ॥ १५

शस्त्रांतें, अस्त्रांतें, जिष्णूच्या[3] त्या हि दिव्यें[4]चापातें[5], ।
क्रोधातें, वीर्यातें, शल्या ! मीं जाणतों प्रतापातें. ॥ १६

रिपु[6]नृपसर्पसुपर्णा कर्णास[7] हि एक जाणतों मीं[8] च ।
विंध्या[9]सि मेरु, मेरुसि विंध्य चि जाणे, नें[10] अन्य नग[11] नीच. ॥ १७

मीं आपणासि जाणें, जाणें त्या जिष्णुला हि तत्त्वानें[12], ।
तैसें न जाणिजे त्वां, इतरें बा[13] ! तत्त्वहीन सत्त्वानें[14]. ॥ १८

जाणें निजवीर्यातें[15], तद्वीर्यातें[16], रणीं, म्हणोनी[17] च ।
विजया बाहें, बा ! हें नेणुनि मज 'साहसी[18]' म्हणो नीच. ॥ १९

पार्थवधाचें साधन आहे, तें सांगतों तुला जेणें[19] ।
आजि द्वैरथ[20]युद्धीं विजयाचे प्राण निश्चयें घेणें. ॥ २०

---

रूपांतर आहे:–'विद्वानेव हि जानाति विद्वज्जनपरिश्रमम् । नहि वंध्या विजानाति गुर्वीं प्रसववेदनाम् ॥.' ही **प्रतिवस्तूपमा** होय. २४. 'वांझ' असें पाठान्तर. २५. वेणेची अभिज्ञा=बाळंतीण होण्याच्या वेळचें दुःख जाणणारी. वेणा=प्रसववेदना. 'वेण' असें या शब्दाचें एकवचन आहे, परंतु प्रचारांत अनेकवचनीच रूप वापरतात.

१. गुण व अवगुण. २. ज्याची प्रतिज्ञा असत्य आहे त्यानें. ३. या गीतींतील प्रत्येक नामाशीं 'जिष्णूच्या' या शब्दाचा अन्वय आहे. ४. प्रख्यात. ५. गांडीवनामक धनुष्यास. ६. रिपु+नृप+सर्प+सुपर्णा=शत्रु+राजे+सर्प+गरुडा=शत्रुनृपरूपी सर्पांस गरुडासारख्या अशा. ('कर्णासहि' याचें विशेषण). सर्पगरुडांचें स्वाभाविक वैर प्रसिद्धच आहे. ७. 'मला मी जाणतों' असें म्हणणें किंचित् गर्वद्योतक आहे. पण 'कर्णास मी जाणतों' असें कर्णानेंच म्हणणें स्वाभिमानसूचक आहे. म्हणून कवीनें प्रस्तुत स्थलीं खुबीदार शब्दयोजना केली आहे, असेंच म्हटलें पाहिजे. ८. स्वतः कर्णच. ९. पर्वतविशेष. १०. अन्य नीच नग न (जाणे)–असा अन्वय. ११. पर्वत. १२. तत्वदृष्टीनें, यथार्थ रीतीनें. १३. येथें रा० **पराडकर** यांच्या प्रतींत 'वा' असा पाठ आहे, पण तो हस्तदोष असावा. १४. शक्तिहीन प्राण्यानें. 'सत्वहीन सत्वानें'=(बुद्धिरहित प्राण्यानें) असाही पाठ आहे. १५. आपल्या सामर्थ्यास. १६. त्याच्या (अर्जुनाच्या) पराक्रमास. १७. म्हणूनच; याच कारणाकरितां. म्हणोनी च [मी] विजया रणीं बाहें (बोलावीं.) बा ! (अगा !) नीच (नीच मनुष्य) हें नेणुनि (मी स्वसामर्थ्य व शत्रुसामर्थ्य ओळखूनच युद्धास जात आहें, हें न समजून) मज 'साहसी' [म्हणेल तर] म्हणो–असा अर्थ. १८. अविचारी. १९. ज्या साधनानें. २०. रथ्यांच्या द्वंद्वयुद्धांत.

आहे [1]अहिमय [2]सायक [3]मृदुचंदनचूर्णपूर्णभात्यांत, ।
त्यावांचुनि शर दुसरा नाहीं च क्षोणिवल्लभा ! [4]त्यांत. ॥ २१
शत्रुशिर च्छेदाया समयीं सोडीन त्या चि [5]आहेया ।
माझ्या शरा निवारी ऐसा विश्वांत कोण आहे [6]या ? ॥ २२
तो [7]आहेय शरोत्तम सोडुनि, मीं मेरुतें हि फोडीन, ।
कवचाची काय [8]कथा ? पार्थी कीं केशवीं च सोडीन. ॥ २३
दुःसहसर्पशरबळें पार्थासीं आजि लावितों झगडा, ।
[9]पगडा पाडीन जगीं, [10]शरटंकें करिन [11]चूर्ण त्या [12]दगडा. ॥ २४
सर्वां [13]यदुवीरांची [14]श्री त्या कृष्णीं [15]प्रतिष्ठिता आहे; ।
सकळां पांडुसुतांचा जय त्या [16]एकीं धनंजयीं राहे. ॥ २५
त्या दोघांसीं पडतां गांठि, [17]स्वहितेच्छु कोण परतेल ? ।
[18]भुवनीं प्रसरतें[19] असतां [20]यश सहज चि, जेंवि [21]वारिवर तेल. ॥ २६

---

१. सर्पमय. २. बाण. ३. मृदुचंदनाच्या चूर्णानें पूर्ण अशा भात्यांत. ४. त्या भात्यांत. ५. सर्परूपी (बाणाला). अहिसंबंधी तो आहेय. 'आहेयः=सर्पमयः' **नी**लकंठी टीका. ६. ह्या माझ्या शरा निवारी ऐसा–असा अन्वय. ७. अहिरूपी. ८. **काव्यार्थापत्ति**नामक अलंकार प्रस्तुत स्थलीं आहे. ९. पगडा पाडणें=दुमऱ्यावर आपली श्रेष्ठता स्थापणें. 'पगडा बसविणें' असा भाषणसांप्रदाय सध्यां प्रचारांत आहे. १०. बाणरूप टांकीनें. ११. चुरा, पूड. १२. दगडाप्रमाणें कठीण अशा **अ**र्जुनास. १३. **याद**ववीरांची. १४. वैभव. 'श्री'शब्दाचे अनेक अर्थ आहेत. त्यांपैकीं कांहीं येथें देतों:–(१) लक्ष्मी, (२) ऐश्वर्य, (३) शोभा, (४) त्रिवर्ग (धर्मार्थकाम), (५) वृद्धि, (६) अलंकरण, (७) सरस्वती, (८) कीर्ति, (९) बुद्धि, (१०) वीणा, (११) उपकरण, (१२) बिल्व इत्यादि. हा शब्द फार शुभप्रद समजला जातो. १५. विद्यमान, बसलेली. १६. एकट्या. १७. आत्महित इच्छिणारा. अशा महाशयांशीं युद्ध करून, विजयी होण्यांत किंवा पराजित होण्यांतही स्वहित आहे. म्हणून स्वहितेच्छूनीं असला सुप्रसंग दवडूं नये–असा भाव. १८. [**कृष्णा**र्जुनांशीं युद्ध केल्यास] यश (आपली कीर्ति), जेंवि वारिवर तेल, [तेंवि] भुवनीं सहज चि (विशेष परिश्रमाशिवाय आपोआप–फक्त त्यांचा प्रतिपक्षी मी आहें एवढ्याच कारणावरून) प्रसरत असतां कोण स्वहितेच्छु परतेल ?–असा अन्वय. कोणीही परतणार नाहीं–असा भाव. हा **प्रश्नालंकार.** १९. 'पसरत असतां' असें पाठांतर. २०. यश हें कीर्तीपेक्षां श्रेष्ठ मानितात. पराक्रमानें यश मिळतें, दानपुण्यानें कीर्ति मिळते; यश सर्व-दिशाव्यापी असतें, कीर्ति एकदिशागामी असते–असा यश आणि कीर्ति यांमध्यें भेद आहे. 'दानपुण्यकृता कीर्तिः पराक्रमकृतं यशः । एकदिग्गामिनी कीर्तिः सर्वदिग्विस्तृतं यशः. ॥' (कुमारसंभव, सर्ग २।४७ वरील टीका). २१. पाण्यावर.

येतील कृष्ण दोघे मज एकावरि; जगांत मीं धन्य; ।
लोकत्रयीं[१] सुजन्मा[२] मत्सम माझ्या मतें नसे अन्य. ॥ २७
गांडीवसुदर्शनधर[३] कपिपक्षिपकेतु[४] कृष्ण ते दोघे, ।
मज हर्षप्रद समरीं; त्यांपासुनि[५] भीति, भीरु जो, तो घे. ॥ २८
तूं झालासि कुदेशीं[६]; संगरपांडित्य[७] काय तुज ठावें ? ।
शल्या ! कल्याणगुणा[८] पात्र जगीं पुण्यसंग्रहें व्हावें. ॥ २९
भ्यालासि मूढबुद्धे ! बडबडसी, फार वानिसी अरिला; ।
भाव तुझा मज कळला, धीर तुझा मृत्युच्या[९] भयें हरिला. ॥ ३०
यावरि उगा चि राहें, पाहें मत्कर्म नीट, सावध हो; ।
त्यां[१०] दोघांचा जैसा, न तुझा ही मत्करें[११] तसा वध हो[१२]. ॥ ३१
हितशत्रुत्व[१३] न दे सुख, नाहीं च विचार लेश ही अधर्मीं[१४], ।
पाहसि मज भिववाया, परि[१५] करिन अशा गुणें तुझा वध मीं. ॥ ३२
ते मारितील मज कीं त्यांलां[१६] मारीन मीं, स्वबळ[१७] जाणें; ।

---

१. तीन लोकांत (स्वर्गमृत्युपाताळांत). २. उत्तम आहे जन्म ज्याचें असा; कृतार्थजन्मा. ३. गांडीव आणि सुदर्शन धारण करणारे अर्जुन व कृष्ण. ४. कपिकेतु आणि पक्षिपकेतु (मारुती व गरुड ज्यांच्या ध्वजीं आहेत असे) कृष्णार्जुन. ५. जो भीरु (भित्रा) तो त्यांपासुनि (कृष्णार्जुनांपासून) भीति घे (भय पावे). ६. कुदेशीं तुझा जन्म झाला–असा भाव. मद्रदेशाला 'कुदेश' म्हणण्याचें कारण पुढें सांगितलें आहे. ७. युद्धपांडित्य. ८. कल्याणप्रद (हितप्रद किंवा शुभ) सद्गुणांस पुण्यसंग्रहें पात्र व्हावें; पण कुदेशांत जन्मलेला जो तूं, त्याला पुण्यसंग्रह नाहीं. तस्मात् संगरपांडित्य इत्यादि कल्याणगुण तुझ्यांत नाहींत–असा भाव. ९. (मृत्यूच्या) भयें (कर्ता) तुझा धीर (कर्म) हरिला (हरण केला, नाहींसा केला). १०. त्या दोघांचा (कृष्णार्जुनांचा) मत्करें जैसा [वध होणार आहे] तसा तुझा ही वध न हो (होवो.) ११. माझ्या हातानें. १२. गीतीच्या प्रथमार्धांत व द्वितीयार्धांतही 'हो' हाच शब्द असल्यामुळें एकच शब्द दोन्हीकडे चमकांत आला आहे, असें वाटण्याचा संभव आहे. पण तसें नव्हे. प्रथम 'हो' आज्ञार्थी आहे व द्वितीय 'हो' आशीर्वादार्थ (होवो) आहे, असें समजावें. पहिला द्वितीयपुरुषी व दुसरा तृतीयपुरुषी भिन्नार्थी प्रयोग आहे. १३. बाहेरून हितकर्त्याप्रमाणें दिसून आंतून जो शत्रु असतो तो हितशत्रु–त्याचा भाव. १४. अधम मनुष्याचे ठायीं. १५. तुझ्या धमकीच्या भाषणानें मी भिणार तर नाहींच, पण तुझेंच डोकें उडवीन–असा भाव. १६. कृष्ण व अर्जुन यांस. १७. मी आपली शक्ति जाणतों.

कृष्णांला कर्ण न भी, तनु टाकुनि एकदा असे जाणें[2]. ॥ ३३
दोघांची कांय[3] कथा ? जरि **कृष्णार्जुन** सहस्र[4] येतील, ।
तरि माझे शर त्यांच्या प्राणधनातें हरूनि[5] घेतील. ॥ ३४
तूं[6] उपजलासि जेथें, सकळां देशांत देश तो खोटा, ।
जेथें स्त्रीपुरुषांच्या व्यवहारीं पातकां नसे तोटा. ॥ ३५
सेविति गोमांसादिक मांस, व्यभिचार, मद्य, जन सर्व, ।
जेथें जन्म तुझें तें राष्ट्र महापापवृद्धिचें पर्व[7]. ॥ ३६
त्यां धृतराष्ट्रापासीं विप्रमुखें मद्रदेशवृत्त असें[8], ।
शल्या ! बहु आयकिलें. सुब्राह्मण[9] अनृत बोलतील कसें ? ॥ ३७
मिथ्याभाषण, मित्रद्रोह, व्यभिचार, वैर आमरण[10], ।
इत्यादि दोष पुष्कळ मद्रीं[11]. झालें तुझ्या गुणें सरण[12]. ॥ ३८

---

१. दोघांही **कृष्णा**र्जुनांस. कर्ण **कृष्णा**र्जुनांस भीत नाहीं, कारण काय ? तर एकदां केव्हां तरी शरीर टाकून–मरून जाणें–आहेच. हा **काव्यलिंग** अलंकार होय. कारण गीतीच्या तृतीय व चतुर्थ चरणांत कार्यकारणभाव आहे. '[ह्या] आर्येंत **वीररसा**ची अगदीं कमाल आहे. आर्या तर अगदीं सरळ व साधी, पण वीररसाची तर कमाल.' (अलंकारमीमांसा–पृष्ठ ८). २. गमन करणें, मरणें. ३. **काव्यार्थापत्ति** नामक अलंकार. ४. एक हजार. ५. 'हिरोनि' असें पाठांतर. ६. येथून **मद्र**देशाची निंदा सुरू झाली आहे. या निंदेवरून **भारतरचनाकाळीं मद्र**देशाविषयीं लोकांची काय समजूत होती, हें स्पष्ट होत आहे. हा भाग इतिहाससंशोधकांस फार उपयोगाचा आहे, यांत संशय नाहीं. ७. पुण्यदिन. पर्व=अमावास्याप्रतिपत्संधिकाल, अमावास्या, व प्रतिपदा यांतील संधिकाल. पंचपर्वें प्रसिद्ध आहेत, तीं हीं:–अष्टमी, चतुर्दशी, अमावास्या, पौर्णिमा व संक्रांत. या दिवशीं पुण्यकर्म केल्यास पापांचा क्षय होतो–अशी समजूत आहे. **कर्ण शल्या**स म्हणतो, कीं सर्व पर्वें पापनाशाचीं आहेत, पण तुझें राष्ट्र हें पापवृद्धीचें पर्व आहे. ८. वर वर्णिल्याप्रमाणें. ९. त्या ब्राह्मणानें जें जें सांगितलें, तें तें खरेंच असलें पाहिजे. कारण सद्ब्राह्मण खोटें बोलणार नाहींत–असा भाव. येथें **अर्थांतरन्यास** नामक अलंकारध्वनि आहे. १०. मरणापर्यंत. 'आ' हा उपसर्ग, नामाच्या प्रारंभीं लागून 'तेथपर्यंत' असा अर्थ देतो. उदाहरणार्थः–आकंठ, आबालगोपाल, आचंद्रार्क (चंद्रसूर्य असतील तोंपर्यंत) इत्यादि. ११. **मद्र**देशांत किंवा **मद्र**देशस्थाच्या ठायीं. 'आहेत' हें क्रियापद अध्याहृत आहे. १२. 'सरण' शब्दानें सरणालंकार झाला असें वाटण्याचा संभव आहे, पण तसें नाहीं. कारण प्रस्तुत स्थळीं रमणीयार्थक प्रतिपादन कांहींच नाहीं. तेव्हां याला अलंकारच म्हणतां येत नाहीं.

जे जे ब्रह्मद्वेषी[1] त्यांसि पराभव परोपरी[2] घडती; ।
तैसें चि मद्रकांसीं संगत करितां चि नारकीं[3] पडती[4]. ॥ ३९
'मद्रकदेशीं[5] संगत नाहीं च, यथार्थ[6] हें असेल जरी, ।
रे वृश्चिका ! तुझा विषपावक[7] पावो विनाश शीघ्र तरी.' ॥ ४०
हा अर्थ ज्यांत ऐसा आथर्वण[8] सिद्धमंत्र[9] अद्भुत रे ! ।
या मंत्रें अतिसत्वर वृश्चिकविषवीर्यवेदना[10] उतरे. ॥ ४१
थोर[11] चमत्कार असे ! प्रत्यय आला मला चि मंत्राचा, ।
वृश्चिकविषवीर्याच्या निःशेषप्रशमनीं[12] स्वतंत्राचा[13]. ॥ ४२

---

१. ब्रह्मशब्द परमात्मा, वेद व ब्राह्मण या तीन अर्थीत प्रयुक्त आहे, म्हणून ब्रह्मद्वेषी म्हणजे या तिहींचा द्वेषी. २. निरनिराळ्या प्रकारचे, किलेक. ३. नरकांत. ४. या क्रियेचा कर्ता 'लोक' किंवा 'जन' हा अध्याहृत आहे. या गीतींत ब्रह्मद्वेषी व मद्रक हे सारखेच होत, असें सुचविलें आहे. ५. मद्रदेशांत कोणाशीं संगत होत नाहीं, कोणीही विश्वासाई मित्र मिळत नाहीं. सर्व मित्रद्रोहीच आहेत. ही गोष्ट जर खरी असेल, तर हे वृश्चिका! तुझें विष उतरून जावो–असा अर्थ. हा एका आथर्वणमंत्राचा अर्थ आहे, असें पुढच्या गीतींत पंतांनीं सांगितलें आहे. याविषयीं मुळांत असें आहे:–'मद्रके संगतं नास्ति हतं वृश्चिक ते विषम् । आथर्वणेन मंत्रेण यथा शांतिः कृता मया ॥ इति वृश्चिकदष्टस्य विषवेगहतस्य च । कुर्वंति भेषजं प्राज्ञाः सत्यं तच्चापि दृश्यते. ॥' [अ० ४०. श्लो० ३३–३४]. या श्लोकांवरून ह्या गीतींचा अर्थ स्पष्ट होऊन दोन साध्या अनुष्टुप् श्लोकांच्या पंतांनीं दोन उत्तम गीति कशा बनविल्या आहेत, हेंही लक्षांत येईल. ६. खरें. ७. विषरूप अग्नि. ८. अथर्ववेदासंबंधीं. साप, विंचू इत्यादिकांचे व भूतपिशाचादिकांचे मंत्र चौथ्या म्हणजे अथर्ववेदांत आहेत, अशी एकंदर लोकांची समजूत आहे. अथर्ववेद इतर तीन वेदांपेक्षां नवीन आहे, असें शोधकांचें म्हणणें आहे. ९. ज्या मंत्रानें कार्यसिद्धि होते तो सिद्धमंत्र. १०. विंचवाच्या विषाच्या प्रभावापासून उत्पन्न होणारी पीडा. 'वृश्चिकविषवीर्यदेवता' असा पाठ आहे. त्याचा स्वीकार केल्यास पुढीलप्रमाणें अर्थः—विंचवाचें विष हेंच आहे वीर्य (सामर्थ्य) ज्या देवतेचें ती. ११. वृश्चिकविषवीर्याच्या निःशेष–प्रशमनीं स्वतंत्राचा (दुसऱ्या मंत्रांच्या साह्याशिवाय विषाचा संपूर्ण नाश करण्यास समर्थ अशा) मंत्राचा (वर सांगितलेल्या आथर्वण मंत्राचा) मला चि प्रत्यय आला, थोर चमत्कार असे!–असा अन्वय. कर्ण म्हणतो कीं, मद्रदेशांत खरा मित्र एकही सांपडावयाचा नाहीं, सर्व मित्रद्रोही आहेत, हें म्हणणें माझ्याच अनुभवानें खरें ठरलें. तूं माझा मित्र असून मला निरुत्साही करून मित्रद्रोह करूं पाहतोस. तेव्हां माझ्या अनुभवावरूनही मंत्रांतलें म्हणणें खरें ठरलें–असा भाव. १२. समूळ शांतीविषयीं. १३. स्वसमर्थ असलेल्या मंत्राचा.

[1]निर्लज्जा अपवित्रा मदिरारस सेविती स्त्रिया [2]अ-सती, ।
असती तशा न कोठें, [3]हंगती, मुतती, [4]उभ्या; न त्या बसती. ॥ ४३
[5]त्यांचा सुत तूं शल्या ! ठावें तुज [6]धर्मतत्व तें काय ? ।
मज उपदेश कराया ते मात्र [7]समर्थ [9]रामगुरु[8]पाय. ॥ ४४
[10]शरशयनीं च निजावें हा क्षत्रियधर्म मुख्य बहु शुद्ध, ।
[11]बहुजन्मार्जितपुष्कळनिर्मळपुण्यद्रुमैकफळ युद्ध. ॥ ४५
[12]माझा सखा सुयोधन; हो [13]धनकायव्यय प्रियनृपार्थी. ।
[14]तूं काय मूढ ? मज रणविमुख कराया पराक्रम न पार्थी. ॥ ४६
तुज [15]भेदिलें [16]परानीं स्पष्ट, म्हणुनि बोलसी असें खोटें, ।
[17]सर्वां पापांमध्यें हें मित्रद्रोहपाप बहु मोटें. ॥ ४७
मज वाराया तुजसम शत जरि करितील यत्न न वळेन, ।
रिपुबळवर्णन करितां अधिक चि मीं कर्ण आजि खवळेन. ॥ ४८

---

१. हीं सर्व स्त्रियांचीं विशेषणें आहेत. २. जारिणी. येथें 'दामयमक' आहे. ३. हा चतुर्थ चरण गाळला असता तर बरें झालें असतें. मुळांतही इतक्या स्पष्ट रीतीनें वर्णन नाहीं. ४. हीं कृत्यें उभें राहून करण्याचा धर्मशास्त्रांत निषेध आहे. ५. मद्रदेशस्थ स्त्रियांचा, किंवा मद्रदेशस्थांचा. अर्थात् शल्याचे आईबाप मद्रदेशनिवासी असल्यामुळें त्यांचा. ६. धर्मरहस्य. धर्माधर्माविषयींचे सूक्ष्म विचार. ७. परशुरामच समर्थ आहे. तूं नाहींस–असा भाव. ८. परशुराम जो माझा गुरु, त्याचे पाय. गुरूविषयीं विशेष भक्ति दाखविण्याकरितां शिष्य गुरूच्या पायांचा उल्लेख करीत असतात. उ०–'पूज्यपाद श्रीशंकराचार्य,' 'महाराजांच्या पायांच्या प्रतापानें' इत्यादि. ९. हा समास चिंत्य आहे. कारण 'रामगुरु' हा संस्कृत व 'पाय' हा प्राकृत शब्द आहे. १०. शरांच्या पलंगावरच. अनुरूप गीत्यर्ध–'शय्येवरि न पडाया योग्य, रणक्षितिवरीच, हा काय.' [विराटपर्व–अध्याय ३।४४]. ११. पुष्कळ जन्मांपासून संपादिलेलें, फार सांचलेलें व निर्मळ (शुद्ध; पापाचा किंचित् अंशही नसलेलें) जें पुण्य, तद्रूपी द्रुमाचें (झाडाचें) एक (अद्वितीय, दुसरें कोणतेंही फळ ज्याच्या बरोबरीचें नाहीं असें) फळ (सत्परिणाम). १२. सुयोधन माझा सखा (आहे), [त्या] प्रियनृपार्थी (त्या प्रिय राजाकरितां) धनकायव्यय हो (होवो)–अन्वय. १३. धन, देह हीं खर्चीं घालणें. १४. मज (मला) रणविमुख कराया (रणांतून पळून जावयास लावण्यास) पार्थी (अर्जुनाचे ठायीं) [देखील] पराक्रम न [मग] तूं मूढ काय [होय] (कांहींच नाहींस, असमर्थ आहेस)–असें तात्पर्य. येथें **काव्यार्थापत्ति** नामक अलंकार झाला आहे. १५. फितुर केलें. १६. शत्रूंनीं. १७. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे.

प्रतिभटगजमथनोद्यतनागनिवारण[1] करील काय ऐसा ? ।
शक्य नसे तुजला हें; समरीं होईल विमुख कर्ण कसा ? ॥ ४९
नास्तिकवचनें[3] धर्मीं विमुख[4] न होईल धर्मसमयज्ञ[5]. ।
आम्हां वीरांसि नसे सुगतिप्रद[6] अन्य युद्धसम यज्ञ. ॥ ५०
करितां विलाप[7] शल्या ! व्याकुळ होसील, कंठ वाळेल[8]. ।
अ-सती[9] तव उक्ति, ईला[10] धर्मात्मा कर्ण हा न भोळेल[11]. ॥ ५१
समरीं तनु टाकिति त्यां नरसिंहांची सुनिर्मळा सुगती ।
रामें कथिली, तीतें स्मरतां मद्भुजभुजंग[12] हे फुगती. ॥ ५२
माराया अहितांतें[13], धृतराष्ट्राचे कुमार रक्षाया, ।
रुचलें पुरूरव्याचें[14] वृत्त, प्रख्यात युद्धदक्षा यां[15]. ॥ ५३
मज युद्धाभिप्रायापासुनि[16] मार्गें बळें चि फिरवील ।
ऐसें भूत[17] नसे चि त्रिजगीं, जें यां[18] यशासि मिरवील. ॥ ५४
न्यावें निजमित्राचें[19] अर्जुनवधकार्य सिद्धिला वहिलें[20]; ।

---

१. प्रतिभट+गज+मथन+उद्यत+नाग+निवारण=शत्रुरूप गजाच्या मथनाविषयीं उद्युक्त जो गज, त्याचें निवारण. पांडवांचें मथन करण्यास उद्युक्त झालेला जो मी, त्याचें (माझें) निवारण करण्यास तूं असमर्थ आहेस–असा भाव. २. हें अर्ध सुभाषितरूप व **अन्योक्त्य**लंकृत आहे. ३. नास्तिक=ईश्वर व आत्मा यांचें अस्तित्व नाकबूल करणारे. मनूनें 'नास्तिको वेदनिंदकः' अशी नास्तिकाची व्याख्या केली आहे. विशेषेंकरून चार्वाक, बुद्ध व जैन यांस नास्तिक हें नांव आहे. ४. पाठमोरा. ५. धर्माचे नियम जाणणारा. ६. मोक्ष देणारा. अनुरूप गीत्यर्धः– '……समरासम राया! तुज न अन्य हित याग' [सभापर्व–अध्याय १।१०८). ७. प्रलाप, बटबट. ८. तोंडाला कोरड पडेल, घसा कोरडा होईल. ९. सती (पतिव्रता) नव्हे ती, जारिणी. १०. हिला; तुझ्या उक्तीला. ११. भुलेल. १२. मत्+भुज+भुजंग=माझे बाहू हेच कोणी सर्प, ते. १३. शत्रूंना. १४. पुरूरवा यास विक्रम असेंही नामांतर आहे. हा चंद्राचा मुलगा जो बुध, त्यास इलेपासून झालेला मुलगा. यापासूनच एकंदर चंद्रवंशाची वृद्धि झाली. उर्वशी नामक अप्सरा याची स्त्री होऊन कांहीं दिवस पृथ्वीवर राहिली होती. इंद्रशत्रु जे दानव, त्यांचा संहार करून हा इंद्रास नेहमीं साहाय्य करीत असे. या प्रसंगाचाच प्रस्तुत स्थळीं उल्लेख केला आहे. १५. मला. १६. युद्ध करण्याच्या इच्छेपासून. १७. प्राणी. पिपीलिके (मुंगी) पासून तों ब्रह्मापर्यंत जे प्राणी आहेत, तीं सर्व भूतें होत. १८. मला मागें फिरवून मिळणारें जें यश, त्याला. १९. आपला मित्र जो दुर्योधन, त्याचें. उत्तरार्धांत 'जें मुख्य सत्यसंधें' असा पाठ आहे. त्यास अनुसरून पुढीलप्रमाणें अन्वय करावा:—जें म्यां

जें सख्य सत्यसंधें म्यां अंगीकारिलें असे पहिलें; ॥ ५५
हें का[1]रण एक; दुजें चित्तीं लोका[2]पवादभय मोटें[3], ।
'शल्य त[4]पस्वी कर्णें वधिला,' म्हणतील लोक, तें खोटें[5]; ॥ ५६
स[6]हजा क्ष[7]मा हि तिसरें कारण; या का[8]रणत्रयें हात ।
धरिला माझा, म्हणउनि शल्या ! केला नसे तुझा घात. ॥ ५७
नाहीं तरि गृ[9]ध्रशिवाकाकशृगालोदरांत जातास; ।
माझ्या स[10]र्वप्राणिप्रियदानव्रत असे चि हातास. ॥ ५८
पुनरपि जरि तूं ऐसें म[11]च्छ्रवणमनःश्रमभ्रमदशील ।
कुवचन, दुराग्रहानें शल्या ! माझ्या समीप वदशील, ॥ ५९
तरि घालील तव शिरीं हा प्रभु माझा महाभुज गदेतें, ।
'[12]कीं, त्व[13]द्वचाहुनि उणें ता[14]पद विष, जें महाभुजग दे, तें.' ॥ ६०

---

मुख्य सत्यसंधें पहिलें (पूर्वीं किंवा सर्वांच्या अगोदर) अंगीकारिलें असे [तें] निजमित्राचें अर्जुनवधकार्य वहिलें सिद्धिला न्यावें–असा अन्वय. २०. सत्वर.

१. तूं इतके कटु शब्द बोललास, तरी तुला न मारण्याचें कारण. २. लोक+अपवाद+भय=लोकनिंदाभय. ३. मोठें. ४. सज्जन, साधु. ५. शल्य साधु असून कर्णानें त्याचा वध केला, असें त्याचें म्हणणें खरोखर खोटें. कारण तूं तपस्वी नसून मित्रद्रोही आहेस–असा भाव. ६. जन्मापासून झालेली. ७. दुसऱ्याचे अपराध क्षमा करण्याचा माझा जो लहानपणापासून स्वभाव आहे, तोही. ८. तीन कारणांनीं (कर्ता). ९. गृध्र+शिवा+काक+शृगाल+उदर=गिधाड+भालू+कावळे+कोल्हे+यांच्या पोटांत. येथें **पर्यायोक्त** अलंकार आहे. १०. सर्व प्राण्यांस त्यांची प्रिय असेल ती वस्तु दान करण्याचें व्रत. दानाविषयीं कर्णाची प्रख्याति जगत्प्रसिद्धच आहे. ही गीति **काव्यलिंग** अलंकाराचें उदाहरण आहे. शल्या ! तूं कोल्ह्याकुत्र्यांच्या उदरांत गेला असतास. कारण सर्व प्राण्यांस संतुष्ट करण्याचें माझें व्रत आहे. येथें समर्थनीय अर्थाचें समर्थन (सयुक्तिक प्रतिपादन) केलें असून यांतील कार्यकारणभाव 'म्हणून' 'कारण' इत्यादि शब्दांनीं दाखविला नाहीं. ११. मत्+श्रवण+मनस्+श्रम+भ्रम+द+शील=माझे+कान+मन+आयास+भ्रम+देण्याचा+धर्म=माझ्या कानांस श्रम आणि मनास भ्रम देण्याचा धर्म आहे ज्याचा. या समासांत **यथासंख्य** अलंकारानें श्रवणाचा श्रमाशीं व मनाचा भ्रमाशीं संबंध आहे असें समजावें. १२. कीं (कारण, गदेनें तुझें डोकें ठेंचण्याचें कारण असें कीं) महाभुजग (प्रचंड सर्प) जें विष दे, तें त्वद्वचाहुनि उणें तापद [होय]–असा अन्वय. तुझे कडू शब्द सर्पाच्या विषाहूनही कडू आहेत. सर्पाचें डोकें काठीनें ठेंचतात, त्याचप्रमाणें तुझें डोकें मी गदेनें चूर्ण करीन–असा भाव. १३. त्वत्+वच=तुझें भाषण. १४. दुःख देणारें.

इत्यादि बहु वदें, मग कर्ण म्हणे त्यासि 'चाल गा ! चाल.' ।
कवि[1] हो ! निवाल[2] पुढती, जरि शल्याची सदुक्ति वाचाल. ॥ ६१

---

## अध्याय अठ्ठाविसावा.[3]

### (हंसकाकीयाख्यान[4])

मग मद्राधीश म्हणे, 'कर्णा ! जे धर्मनीतिचें[5] वतन[6], ।
गोब्राह्मणशरणागत ज्यांहीं[7] केले चि सर्वथा जतन, ॥ १
संग्रामीं न पळाले[8], यज्वे[9], मूर्धाभिषिक्त जे राजे, ।
ज्यांच्या शुद्धयशासीं[10] तुळितां क्षण ही न चंद्रमा साजे; ॥ २
त्या राजर्षिवरांच्या[11] वंशीं झालों, स्वधर्मपथगामी[12], ।
सूत[13] नव्हें, वर देउनि चालवितां[14] हा त्वदीय रथ गा ! मीं. ॥ ३
त्या[15] मज ही हित कथितां म्हणसी 'हितशत्रु', मत्तसा वदसी, ।
तुज मति मलिना[16] चि रुचे, चोरा जसि कृष्णपक्षिं चौंवदसी[17]. ॥ ४

---

१. शहाणे वाचक हो ! [ही पंतांची वाचकांस सूचना आहे]. २. संतोषाल, तृप्त व्हाल. ३. मुळांतील ४१ वा अध्याय यांत आला आहे. ४. ह्या अध्यायास 'हंसकाककथानक' असेंही नांव आहे. ५. सद्धर्म व सन्नीति यांचें. ६. परंपरागत आश्रयस्थान, हक्काची जागा. ७. ज्यांहीं (ज्या माझ्या पूर्वजांनीं) गोब्राह्मणशरणागत (गाई, ब्राह्मण व शरण आलेले लोक) सर्वथा जतन केले चि—असा अन्वय. जतन करणें=काळजीपूर्वक जपणें, दुसऱ्याकडून त्रास होणार नाहीं, अशा रीतीनें त्यांचें संरक्षण करणें. ८. जे राजे संग्रामीं न पळाले—असा अन्वय. ९. यज्ञ करणारे. १०. स्वच्छ कीर्तीशीं. कीर्तीचा रंग पांढरा वर्णिला पाहिजे—असा कविसमय आहे. तेव्हां शल्य म्हणतो, कीं माझ्या पूर्वजांची कीर्ति इतकी स्वच्छ आहे, कीं चंद्राचा पांढरेपणाही त्यापुढें कमीच आहे. येथें **व्यतिरेकालंकार** आहे. ११. राज+ऋषि+वरांच्या=राजर्षिश्रेष्ठांच्या. १२. स्वधर्ममार्गानें जाणारा, योग्य धर्मानें चालणारा. १३. मी आतां तुझ्या सूताचें काम करीत आहें, म्हणून मी खराच सूत आहें असें समजूं नको—असा भाव. मी तुझ्याप्रमाणें सूतपुत्र नसून राजपुत्र आहें—असाही यांत गर्भितार्थ आहे. १४. चालवितों म्हणून. 'सूत नव्हे, वर देउनि चालविता हा त्वदीय रथ गा ! मी' असा पाठभेद. चालविता=चालविणारा. १५. त्या मज ही=तुला वर देऊन म्हणजे तुझ्या इच्छेप्रमाणें तुझें सारथ्य करून तुझ्यावर उपकार करणारा जो मी, त्यावरही. १६. पापी, कपटी, दोषयुक्त. तुला वस्तुस्थिति सांगणारा, खरा प्रकार दाखवून देणारा आवडत नाहीं; तुझी खोटी स्तुति करणारा तुला आवडतो—असा भाव. १७. चतुर्दशी. 'चावदसी' हें रूप चिन्त्य आहे.

तूं या [1]महाप्रमादें व्यसनीं बुडसी, म्हणोनियां हित मीं ।
कथिन पुन्हां हि तुज, [2]भले भ्रमतां पथ दाविती खळा हि तमीं. ॥ ५
[3]काककथा कथितों, ती ऐकावी, मग यथेष्ट वर्तावें; ।
[4]पडतां गिरिशिखरच्युतबृहदुपलें कीं [5]खलें न पर्तावें. ॥ ६
कां अपराध न करितां मज मारूं पाहतोसि [6]अनघातें ? ।
होइल कल्याण कसें [7]धर्मज्ञहितेच्छुसाधुजनघातें ? ॥ ७
अंधासि डोळसानें सांगावें 'काढ पाय, हा खळगा.' ।
[8]व्यसनीं स्वजनोपेक्षा मद्रेश करील ? काय हा खळ ? गा ! ॥ ८
सारथिनें रक्षावा [9]स्वरथी, राजा जसा अमात्यानें; ।
मानावें पितरांसम [10]त्यां हितकर्त्या सुहृत्तमा त्यानें. ॥ ९

---

१. मोठ्या बेसावधपणानें. २. भले (भले लोक-सज्जन) खळा हि (दुष्टालाहि) तमीं भ्रमतां (अंधारांत, खरा मार्ग टाकून इकडे तिकडे, भ्रमतां) पथ (रस्ता) दाविती (दाखवितात). हें सुभाषितरूप वाक्य आहे. सामान्यसिद्धांतानें विशेषसिद्धांताचें किंवा विशेषसिद्धांतानें सामान्यसिद्धांताचें जेथें समर्थन केलेलें असतें, तेथें **अर्थांतरन्यास** नामक अलंकार होतो. ह्या गीतींत 'हित मी कथिन पुन्हां ही तुज' या विशेषाचें 'भले भ्रमतां पथ दाविती खळा हि तमीं' ह्या सामान्य सिद्धांतानें समर्थन केलें आहे म्हणून **अर्थांतरन्यास.** तम=अंधकार, पातक. ३. कावळ्याची गोष्ट. ह्या पद्यांत **'दीपका'**लंकार आहे. ४. [कारण] गिरिशिखरच्युत-बृहदुपलें (पर्वतावरून खालीं पडणाऱ्या मोठ्या दगडानें) कीं (किंवा) खलें (दुष्ट मनुष्यानें) पडतां (अधोगतीस जात असतां) [स्वेच्छावर्तनापासून] न पर्तावें. (परावृत्त न व्हावें, मागें फिरूं नये). सारांश—काककथा ऐक, व मग वाटेल तसें वाग. अर्थात् माझें बोलणें फोलच होणार, हें मला माहीत आहे. कारण मूर्ख लोक इतके हेकेखोर व हट्टी असतात, कीं पर्वतावरून खालीं पडणाऱ्या दगडाप्रमाणें ते आपला अधःपतनमार्ग सोडून परत मागें फिरत नाहींत-असा भाव. ५. खलें=दुष्टानें. तुझ्यासारख्या खळानें-असा भाव. ६. निष्पाप्यास. ७. धर्मज्ञ+हितेच्छु+साधुजन+घातें=धर्म जाणणाऱ्या व तुझें हित इच्छिणाऱ्या सज्जनाला मारल्यानें. ८. मद्रेश व्यसनीं (संकटसमयीं-संकटांत असलेल्या) स्वजनोपेक्षा (स्वजनाची उपेक्षा) करील? (करील काय? अर्थात् करणार नाहीं-असा भाव). हा (मद्रेश) खळ काय? (दुष्ट आहे काय?-अर्थात् नाहीं). खल जो आहे तो स्वजनांची संकटीं उपेक्षा करील. मद्रेश खळ नाहीं, तेव्हां तो कदापि स्वजनांस संकटांत सोडणार नाहीं, ९. आपला रथी, आपण ज्याचें सारथ्य करतों तो. येथें **'परिसंख्या'** नामक अलंकार आहे. कारण सारथीनें रक्षण करण्यास योग्य अशा पदार्थांमध्यें स्वरथीची निवड करून, स्वतःच्या देहासारख्या पदार्थांचें त्याज्यत्व शब्दानें गर्भित केलें आहे. १०. त्या हितकर्त्या (हित करणाऱ्या) सुहृत्तमा (मित्रश्रेष्ठ जो सारथि त्याला) त्यानें (रथ्यानें) पितरांसम मानावें.

सांभाळितो कुटुंबी[1] स्वकुटुंब तसा चि सारथी रथिला, ।
व्हावें तव भद्र[2] बरें, मद्रवरें[3] म्हणुनि नय[4] भला कथिला. ॥ १०
स्पर्धा साधुजनासीं लाविसि, नेणोनि आत्मशक्ति मदें, ।
तुज पथ्य[5] तथ्य[6] वचनें गुरुचीं नीचासि भासति श्रमदें[7]. ॥ ११
दृष्टान्त[8] सांगतों तुज याविषयीं, श्रवण नीट दे, कर्णा ! ।
मन आटोपूनि धरीं, जह्रि सुहृदुपदेश वीट दे कर्णा[9]. ॥ १२
पूर्वी सागरतीरीं साधुनृपाच्या पुरांत एक धनी[10] ।
सन्मान्य वैश्य[11] होता, नांदे ज्याच्या स्वधर्म नीति[12] मनीं. ॥ १३
त्या धनिका वैश्याचे होते बहु पुत्र–पौत्र[13] गुणवन्त; ।
त्यांतें आशीर्वादें गौरविती सर्वदा सदय सन्त[14]. ॥ १४
त्या वैश्यकुमारांचें भक्षी उच्छिष्ट[15] एक काक सदा, ।
बाळक उदार[16]मति ते न वदति वाणी कदापि साध्वसदा[17]. ॥ १५
देती वैश्यकुमारक मांसौदन[18], सेवया[19], वडे, मांडे, ।
मधु[20], घृत, पायस[21] वायस खाय सदा, पक्षिपांसवें[22] भांडे. ॥ १६

---

१. कुटुंबाधिपती, यजमान. २. कल्याण. ३. मद्रदेशातला श्रेष्ठ (राजा) जो मी, त्यानें. 'भद्र बरें'–'मद्रवरें' हा **वृत्यनुप्रास.** ४. न्याय. ५. हितकर. [पथ्य=पथापासून (योग्य मार्गापासून) अनपेत (सुटलें नाहीं–तें)=हितकर, योग्य. यासारखे झालेले इतर शब्द अर्थ्य, न्याय्य, धर्म्य हे होत. 'धर्मपथ्यर्थन्यायादनपेते' या **पा**णिनीय सूत्राचे आधारें हा अर्थ होतो]. ६. खरीं. ७. दुःख देणारीं अशीं. ८. तुझ्या चरिताला प्रतिबिंबरूप होईल असलें एक कथानक. ९. कानास. वीट=कंटाळा, त्रास. १०. श्रीमान्. ११. हा वैश्य फार धार्मिक–यज्ञयागादि करणारा, शांत आणि दांत होता, असें मुळांत वर्णन आहे. हा वैश्य धृतराष्ट्राचा प्रतिबिंबभूत होय, हें लक्षांत ठेविलें, म्हणजे हीं विशेषणें कां योजिलीं आहेत, हें समजेल. १२. व्यवहार. ज्याच्या मनीं स्वधर्म नांदे [व] नीति [नांदे]–असा अन्वय. १३. त्या वैश्याचे नातू (पौत्र) व त्यांच्याचसारखे अल्पवयी असलेले मुलगे (पुत्र). १४. साधुलोक (संत) हे सदय (दयाळू) असतातच, तेव्हां त्यांस 'सदय' असें म्हणण्यांत कांहीं स्वारस्य आहे, असें वाटत नाहीं. १५. उष्टें. १६. 'उदारमतिनें' असाही पाठ आहे. १७. साध्वस+दा=भय देणारी अशी. १८. मांस+ओदन=मांसयुक्त भात, पुलावा. १९. शेवया. २०. मधु=मध, उदक, साखर, फुलांतील मकरंद, द्राक्षरसापासून काढिलेले मद्य असे अर्थ आहेत. २१. खीर. 'पायस–वायस–खाय सदा' हें **अनुप्रासाचें** उदाहरण आहे. २२. पक्षिश्रेष्ठांबरोबर. 'पक्षियांसवें' असाही पाठ आहे.

सागरतीरीं तेथें आले दैवें[1] कदाचित मराळ,[2] ।
जे मुक्ताफळ[3] भोजन करिती, बिसतंतु[4] भक्षुनि फराळ. ॥ १७
पाहुनि हंसांतें ते बाळ स्वोच्छिष्टपिंडपुष्टातें[5] ।
म्हणती, 'तूं चि विहंगा! सर्वखगश्रेष्ठ' त्या सुदुष्टातें[6]. ॥ १८
करिति प्रतारणा[7] असि काकाची अल्पबुद्धि ते बाळ; ।
तों[8] तो फुगे, कुगेहद्वारीं[9] मूत्रें हि जेंवि जंबाळ[10]. ॥ १९
गर्वें मूर्खपणें तो मानी बाळोक्त[11] सर्व साचार,[12] ।
अधिक[13] चि माजे स्तवनें, न विचार करी मलीमसाचार[14]. ॥ २०
गेला उडोनि गगनीं[15] मग नीच सगर्व काक तो त्यांत,[16] ।
साधूंत खळ जसा, कीं कांचमणी[17] परमशुद्ध[18] मोत्यांत. ॥ २१

---

१. त्या कावळ्याच्या सुदैवानें. अर्थात्–त्या कावळ्याचा गर्वभंग करण्याकरितां. २. हंस. ३. मोतीं. राजहंस मुक्ताफळ व मृणाल भक्षण करितात–असा कविसमय आहे. ४. कमळाच्या देठांतील तंतु. जे मुक्ताफळ भोजन [व] बिसतंतु भक्षुनि फराळ करिती—असा अन्वय. ५. स्व+उच्छिष्ट+पिंड+पुष्ट=आपल्या उच्छिष्ट पिंडानें (अन्नानें) पुष्ट जाहलेल्या काकास. ६. फार दुष्ट जो काक त्याला. ७. फसवणूक, थट्टा. ८. अन्वयः—तों (अशी प्रतारणा केल्याबरोबर) तो (काक) फुगे (गर्वानें चढला). [कसा फुगे? तर] जेंवि कुगेहद्वारीं (वाईट घराच्या) दाराजवळ) मूत्रें हि जंबाळ (चिखल) [फुगे] (अधिक होतो). ९. घाणेरड्या घराच्या दाराशीं. कुगेह=आरोग्याच्या दृष्टीनें ज्याची मांडणी केलेली नाहीं असें; किंवा, जेथें झाडलोट होत नाहीं असें घर. १०. जंबाळ=जंबाल=(१) चिखल व (२) शेवाळ–असे अर्थ आहेत. त्या मुलांनीं केलेली वृथा स्तुति ऐकून कावळा गर्वानें फुगला. कसा? तर, जशी शेवाळ घाणेरड्या घराच्या दाराशीं सांडपाण्यानें व मूत्रानें फुगते तसा. मूत्रेंहि=मुतानें सुद्धां. शेवाळ पाण्यानें तर फुगतेच, पण मुतानें शुद्धां फुगते–असा भाव. 'मूत्रेंहि' ह्या शब्दानें 'कुगेहा'ची स्पष्ट कल्पना होते. ११. वैश्यकुमारांनीं म्हटलेले शब्द. १२. खरें १३. दुर्गुणी मनुष्य आपली स्तुति ऐकून ज्यास्तच शेफारतो, व ती स्तुति खरी कीं खोटी ह्यासंबधीं विचार त्याचे मनांत येत नाहींत–असा भावार्थ. ह्या अर्थात सामान्य विधान केलेलें असून त्यानें या व पूर्वीच्या गीतींतील विशेष विधानांचें समर्थन होतें, म्हणून ह्या दोन गीति मिळून **'अर्थान्तरन्यास'** अलंकार साधला आहे. १४. मलीमस+आचार=मलीन आचार करणारा, दुर्वर्तनी. १५. आकाशांत. **'गगनीं–मग नीच'** हें **अनुप्रासाचें** उदाहरण. १६. हंसांत. १७. मोत्याच्या आकाराची व पाणीदार कांच. १८. परमशुद्ध=खरीं, अस्सल, बनावट नसलेलीं (मोतीं).

[१]जाणे त्या हंसांत श्रेष्ठ जयालागि त्यासि तो काक, ।
'दोघे उडों, तुझें बळ पाहों दे, मत्समीप ये ठाक'. ॥ २२
ऐसें वायस वदतां हांसति ते हंस त्या [२]खगापसदा, ।
[३]कीं शुद्धासीं [४]मत्सर मूर्ख करी, ज्यांत ताप-पाप सदा. ॥ २३
म्हणती हंस तयातें, 'गर्वभरें करिसि वायसा [५]चोर, ।
आम्हीं [६]मानसवासी, सर्वखगांचे हि [७]राय साचार. ॥ २४
आम्हीं [८]सुदूरपाती हंस, खगांमाजि पूज्य, [९]खगनीचा ! ।
[१०]क्षीरधितीरविहारी, [११]जलकेलि करूं नदींत [१२]गगनींच्या. ॥ २५
करिसी बरोबरी तूं हंसाची काय ? [१३]वायसापसदा ! ।
करितो घात तुझा मद, [१४]मारील चि जो गृहांत साप सदा. ॥ २६
रे [१५]बलिपुष्टा ! दुष्टा ! [१६]कैसें हंसांसमेत उडशील ? ।
साहस करितां सहसा स्पष्ट व्यसनार्णवांत बुडशील.' ॥ २७

---

१. तो काक त्या हंसांत जयालागि (ज्यास) श्रेष्ठ जाणे (समजे) त्यासि [म्हणे]—असा अन्वय. 'जाणे त्या हंसांत श्रेष्ठ जया त्यासि तो म्हणे काक' असाही पाठ आहे. त्याचा अन्वयः–तो काक त्या हंसांत जया (ज्या हंसाला) श्रेष्ठ जाणे (समजे), त्यासि म्हणे. २. खग+अपसद=पक्ष्यांत नीच अशा काकास. ३. हें गीत्यर्ध उत्तम सुभाषितरूप आहे. ४. मत्सरांत, निष्कारण जो सज्जनाचा मत्सर, त्यांत. ५. चेष्टा. ६. मानससरोवरीं राहणारे. ७. राजे. ८. फार दूर उडणारे. ९ सर्व पक्ष्यांमध्यें नीच अशा काका ! 'खगांमाजि पूज्य' व 'खगनीच' हीं पदें परस्पर विरोध सुचवितात. किंवा हे नीचा ! 'आम्ही–हंस खगांमाजि पूज्य खग [आहों]' असाही अन्वय होईल. १०. क्षीरसागराच्या तीरावर विहार करणारे. ११. जल-क्रीडा. करूं=करीत असतों. १२. आकाशांतील, अर्थात् स्वर्गांतील मंदाकिनी नामक नदींत,–असा भाव. १३. पक्ष्यांतील नीचा. १४. जो साप सदा गृहांत [वास करी, तो त्या घरांतील जनांस] मारील चि–असा अन्वय. प्रस्तुत स्थलीं 'मद' व 'साप', 'करितो घात' व 'मारीलचि' यांत वस्तुप्रतिवस्तुभाव आहे म्हणून ही **प्रतिवस्तूपमा.** घात करणें व मारणें समानार्थकच आहेत. १५. बलि खाऊन माजलेला. बलि=पितृदेवांच्या प्रीत्यर्थ जें अन्न अर्पण करतात तें. तें खाणें फार गर्हणीय समजतात. तें मनुष्यांनीं खाऊं नये, म्हणून पशुपक्ष्यांस देतात. १६. येथें 'कैसें' च्या ठिकाणीं 'कैसा' असा पाठ असणें इष्ट होतें. कारण अकर्मक-कर्तरिप्रयोगांत क्रियाविशेषण क्रियापदाशीं सधर्म असतें. येथील वाक्यरचना सदोष आहे, कारण त्या नियमाचें येथें उल्लंघन झालेलें आहे.

वायस बहु हंसांच्या हित[1]वचनाची करूनि कुत्सा[2], हें ।
वदता झाला त्यांसीं पुनरपि तो[3] गर्वराशि उत्साहें. ॥ २८
'शतपात[4] जाणतों मीं उडेन एकैकपात[5] शतगावें[6], ।
मजसीं उडतां अन्यां खगमांचें[7] पक्षवीर्य[8] न तगावें. ॥ २९
उड्डीन एक, दुसरें अवडीन, तिजें प्रडीन, संडीन[9], ।
इत्यादि पांत[10] शत मीं दावूनि विपक्षगर्व[11] खंडीन. ॥ ३०
गति[12] शत दावीन, तुम्हां तेव्हां माजें कळेल बळ साचें; ।
निवडे निकट चि, वर्णे दूर[13] सम चि पद्म[14] पुष्प पळसाचें. ॥ ३१
गगनीं तुम्हांत एका भलत्यासीं[15] मीं उडेन हो ! खं-गती[16] ।
सांगावी जी माने, किंवा म्यां दाविजे शत खगती !' ॥ ३२

---

१. (वर सांगितलेल्या) हितकारक भाषणाची, उपदेशाची. २. तिरस्कार, अनादर. ३. तो गर्वराशि (गर्वाचा ढीगच) कावळा. ४. शंभर प्रकारचीं उड्डाणें. ५. एक एक प्रकारच्या उड्डाणानें. ६. चारशें कोस. ७. पक्ष्यांचें. ८. पंखांची शक्ति. न तगावें=टिकाव धरूं शकणार नाहीं. ९. हीं सर्व उडण्याच्या प्रकारांचीं नावें आहेत. अवडीन=उच्च प्रदेशावरून नीच प्रदेशीं येणें. प्रडीन=पक्ष्याचें त्वरित किंवा इकडे तिकडे उडणें. संडीन=पक्ष्याच्या उतरण्याचा गतिविशेष. १०. उडण्याचे प्रकार. ११. शत्रूचा गर्व. १२. अन्वय व अर्थः-[मी रंगानें तुमच्यासारखा आहें म्हणून तुम्ही मला आपल्याबरोबरीचा समजत असाल. पण मीं तुम्हांपेक्षां श्रेष्ठ आहें.] [मीं जेव्हां] तुम्हां शत गति दावीन, तेव्हां माजें साचें (खरें) बळ कळेल; वर्णे (रंगानें) दूर पद्म [व] पळसाचें पुष्प सम चि, निकट चि निवडे (जवळ आल्यावर त्यांतला भेद समजतो.) पद्म व पळसाचें फूल दुरून रंगानें सारखींच लाल दिसतात. परंतु जवळ गेल्यावर त्यांतल्या सुगंधाच्या भेदामुळें त्या दोहोंतला भेद जाणतां येतो. तसें माझें व हंसाचें बळ तोलावयाचें असेल तर, उभयतांचे दोन हात झाल्याशिवाय तें कसें तोलतां येईल? १३. दुरून. १४. कमल. ह्या गीतींत **'दृष्टांत'** अलंकार आहे. माझ्या शंभर गती तुम्ही प्रत्यक्ष पाहिल्या, म्हणजे मी व तुम्ही यांतील अंतर तुम्हाला कळून येईल. हल्लीं माझी गति तुम्ही पाहिली नसल्यामुळें तुम्हांस आपल्यांतील तारतम्याची कल्पना करितां येत नाहीं. सध्यां तुम्ही मला आपल्यासारखाच समजतां, श्रेष्ठ समजत नाहीं. यास दृष्टांत—कमल व पलाशपुष्प हीं दोन्ही रंगसादृश्यानें दुरून सारखींच दिसतात, पण त्यांची निवड जवळ गेल्यानेंच करितां येते—असा स्पष्टार्थ. १५. तुमच्यापैकीं वाटेल त्याजबरोबर—असा भाव. १६. आकाशांतल्या गति (उडण्याचे प्रकार). अन्वयः—हो (अहो) जी खगती (मीं वर सांगितलेल्या उड्डीनादि गतींतून जी गति) [तुम्हां] माने (आवडे) [ती] सांगावी [म्हणजे त्याप्रमाणें उडेन], किंवा म्यां शत खगती (उडण्याचे शंभर प्रकार) दाविजे? (दाखवाव्या कीं) [काय हें सांगा]. 'खगती'च्या बद्दल 'खग! ती' असा पदच्छेद केल्यास 'हो खग! जी माने ती सांगावी' असा अन्वय.

ऐसें पुष्कळ बोले, दावी बहु गर्व मूढ तो [1]करट. ।
[2]स्तनमान काय पावे जरि हि उरीं वृद्धि पावलें [3]करट ? ॥ ३३
हांसोनि एक हंस [4]ध्वांक्षासि म्हणे, 'तुझ्या गती [5]शतशा; ।
आम्हीं हंस समस्त हि एक चि गति जाणतों, दुज्या न [6]तशा. ॥ ३४
जाणें एका गतिला, त्या चि गतीनें उडेन आकाशीं, ।
[7]माने तीनें उड तूं' बोले ऐसें मराळ काकासीं. ॥ ३५
तों बहु हांसति जे कीं आले होते मिळोनि [8]तज्ज्ञाती, ।
[9]शतविधगतिहुनि अधिका, परि तुच्छा भासली [10]अंतज्ज्ञां, [11]ती. ॥ ३६
'[12]शतपातपंडितासीं या असन्मित्रबंधुकाकासीं ।
[13]हा एकपातमात्रज्ञाता कैसा उडेल आकाशीं ? ॥ ३७
एका पातांत चि यां हंसांला हा स्वबंधु हारवितो.' ।
ऐसें हांसति [14]वायसखद्योत, परी करि क्षमा रवि तो[15]. ॥ ३८
हंस उडे तों त्यासीं स्पर्धेनें कावळा उडे [16]व्योमीं, ।
[17]शतपात [18]पातकालय दावी. सांगों प्रकार किति तो [19]मीं ? ॥ ३९

---

१. कावळा. २. स्तनाची योग्यता. एकादें खांडूक स्त्रीच्या उरावर झालें व तें मोठें वाढलें म्हणजे स्थान व परिमाण यांच्यामुळें जरी त्यानें स्तनाची बरोबरी केली, तरी त्यांत दुधाची उत्पत्ति होऊं शकेल काय? अर्थात् नाहीं–हें उत्तर. या गीत्यर्धांत **दृष्टांत** व **प्रश्न** असे दोन अलंकार आहेत. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ३. गळूं. ४. कावळ्यास. ५. 'शतशा आहेत' असा भाव. ६. तशा (तुझ्यासारख्या) दुज्या (दुसऱ्या, अनेक) [गति] न [जाणतों]–असा अन्वय. ७. 'माने तिनें उडें तूं' असा पाठभेद. माने तीनें (तुला जी गती आवडेल त्या गतीनें) तूं उड. 'सांगावी जी माने' या ३२ व्या गीतींतील काकाच्या वाक्याला 'माने तीनें उड तूं' हें हंसाचें खोंचून उत्तर आहे. ८. तत्+ज्ञाती=त्या कावळ्याचे ज्ञातिबांधव. ९. शंभर प्रकारच्या गतींहून. १०. मूर्खांस. ११. हंसाची गती. १२. 'शत-पातपंडित' व 'एकपातमात्रज्ञाता' हे दोन शब्द परस्पर भेद दाखविण्याकरितां मुद्दाम योजलेले आहेत. पात=उडण्याचा प्रकार. १३. उडण्याचा फक्त एकच प्रकार जाणणारा हंस. १४. काकरूपी काजवे. १५. तो (काकाबरोबर उडणारा हंसच) रवि (सूर्य होय)–हें **परंपरितरूपक** होय. १६. आकाशांत. १७. [तो] पातकालय (पापाचें घरच असा कावळा) [आपले] शतपात दावी–असा अन्वय. १८. पातक+आलय=पापाचें घर असा काक. १९. शल्य.

उड्डीन[1]प्रमुखें जीं होतीं शतसंख्य[2] ठाउकीं पतितें[3], ।
तीं सारीं दाखविलीं हंसप्रवरापुढें[4] चि त्या पतितें[5]. ॥ ४०
स्वज्ञातिश्रेष्ठाचें[6] गतितांडव[7] पाहतां चि, काकानीं ।
हर्षभरें नभ भरिलें, 'का[8] का का का' अशा स्व हाकानीं. ॥ ४१
अप्रिय बोलति पुष्कळ, हांसति बहु हेळसोनि[9] हंसातें, ।
अवमानिती, अमंगळ खळ ते खगकुळशिरोवतंसातें[10]. ॥ ४२
मृदुपातें[11] हंस उडे, काकाहुनि हीनशक्तिसा[12] भासे, ।
ऐसें मुहूर्तभरि[13] तो दावी, तों काकमंडळी हासे. ॥ ४३
हंसांसि काक म्हणती, 'हां ! हारविला[14] चि कीं भवज्ज्ञाती[15].' ।
आयकिली[16] दूरुनि त्या सर्व मराळोत्तमें[17] अवज्ञा [18]ती. ॥ ४४
मग पश्चिमदिग्देशीं शीघ्र शिरे हंस, काक ही मलधी[19], ।

---

१. उड्डीन=वर वर उडत जाण्याची जी गति ती. २. शंभर आहे संख्या ज्यांची. ३. उडणीं-पंत. ४. हंसश्रेष्ठापुढें. यांतील 'चि' पदानें हंसप्रवरापुढें आपले उडण्याचे प्रकार दाखविण्याची काकाची योग्यता नसूनही त्यानें ते गर्वानें दाखविले, असा अर्थ पंतांनीं ध्वनित केला आहे. ५. कावळ्यानें. 'पतित'शब्दाचा मूळचा अर्थ 'पडलेला' व धर्मग्रंथांत 'स्वधर्मच्युत' असा आहे. प्रस्तुत स्थळीं 'नीच' असा अर्थ घ्यावा. ६. गीति ४१, ४२ व ४३ यांत काकगत हर्ष, गर्व, असूया इत्यादि भाव व्यक्त झाले आहेत. 'प्रस्तुत पद्यांत काक ह्या नीच पक्ष्यांनीं हंस ह्या पक्षिश्रेष्ठाची अपमानपूर्वक स्पर्धा केली, असें वर्णन आहे. थोरांची स्पर्धा नीचांनीं करणें अनुचित होय. असा अनुचितपणा व्यक्त झाल्यामुळें येथें वर निर्दिष्ट केलेले हर्ष, गर्व, असूया इत्यादि भाव पुष्ट झाले नाहींत; यास्तव येथें **भावाभास** झाला.' (अलंकारप्रकाश). ७. गतिरूप नृत्य. ८. कावळ्याच्या शब्दाचें हें अनुकरण आहे. प्रस्तुत स्थळीं कवीचा उद्देश कावळ्यांची फजीती करण्याचा आहे. त्या उद्देशास प्रस्तुत अनुकरण पोषक आहे. पंतांनीं असे अनुकरणवाचक शब्द योजून कोठें कोठें मोठी बहार करून दिली आहे. अशा स्थळीं अर्थ आणि ध्वनि हे परस्परांस इतके अनुरूप आणि अनुगुण आहेत कीं, त्यांवरून पंतांचें समर्पक शब्दरचनाचातुर्य आणि भाषाप्रभुत्व हे गुण सुव्यक्त होतात. ९. हेळणा करून. १०. खगकुळाच्या शिरास अवतंस म्हणजे भूषण अशा हंसाला. ११. हलक्या उडीनें. १२. कमी आहे शक्ति ज्याची असा. १३. दोन घटका. १४. पराभूत केलाच. 'हा हारविला चि' असें पाठांतर. '[काकें] हा भवज्ज्ञाती हारविला चि'–अन्वय. १५. भवत्+ज्ञाती=तुमचा जातभाई, भाऊबंद. १६. त्या मराळोत्तमें ती सर्व अवज्ञा दूरुनि आयकिली–असा अन्वय. १७. हंसश्रेष्ठानें. १८. ती अवज्ञा=त्या काकांनीं केलेली अप्रतिष्ठा. १९. मलिनबुद्धि, दुष्टबुद्धि (काक).

जिकडे होता कर्णा ! गंभीर अपार खालता[1] जलधी[2]. ॥ ४५
मागें धांवे वायस[3], हंस पुढें, सोडिला जसा तीरें. ।
स्पर्धेंत[4] काक नेणे कीं केवळ दूर राहिलें तीरें[5]. ॥ ४६
पक्षांचें[6] बळ सरलें, गर्व मनींचा मनांत चि जिराला[7]; ।
घे[8] धाक काक, सागर सर्वत्र दिसे, निराश्रय विराला[9]. ॥ ४७
न[10] दिसे अग[11] नग[12], मग तग[13] गगनीं खग[14] नीच काय काढील? ।
चित्तीं म्हणे, 'समय[15] हा मज काळाच्या मुखांत वाढील.' ॥ ४८
जावूनि[16] दूर आला किंवा नाहीं असें, फिरे, पाहे, ।
राहे, न करि उपेक्षा, हंसें[17] खळाची हि काळजी वाहे. ॥ ४९
आला हंसापाशीं प्रतिक्षणक्षीणशक्ति[18] करटे[19]-पती, ।
आतां पडेल ऐसें जाणुनि ज्या[20] खावया मकर टपती. ॥ ५०
अवलोकिला मराळें अत्यंतासन्नपतन[21] पामर[22] तो. ।

---

१. खालच्या बाजूला. 'खोल तो जलधी' असाही पाठ आहे. २. समुद्र. ३. काक, कावळा. ४. बाण. ५. तट, किनारा. जेथून काक निघाला तिकडची समुद्रप्रांतभूमि. ६. पंखांचें. ७. जिरला; नाहींसा झाला. 'जिरला'बद्दल 'जिराला' व 'विरला'बद्दल 'विराला' हे प्रयोग चिंत्य आहेत. वृत्ताच्या सोईकरितां शब्दाचा उपांत्य-ह्रस्वस्वर दीर्घ करण्याची चाल इतर मराठी कवितेंतही दृष्टीस पडते. उदाहरणार्थ—'मला' बद्दल 'माला' असा प्रयोग पुष्कळ ठिकाणीं पाहण्यांत येतो. पण असले प्रयोग अनुकरणीय नव्हेत. ८. काक धाक घे; [त्यास] सर्वत्र सागर दिसे; [त्यामुळें तो] निराश्रय [होऊन] विराला (विरघळला—संपूर्णगर्वहीन व दुःखभग्न असा झाला). ९. विरघळला. १०. [त्या खगास बसून विश्रांति घेण्याकरितां] अग [किंवा] नग न दिसे; मग [तो] नीच खग गगनीं तग काढील काय? (अर्थात् नाहीं—असा भाव). ११. वृक्ष. १२. पर्वत. १३. टिकाव. १४. 'अग-नग-मग-तग-गगनीं-खग' हें **अश्वधाटी यमकाचें** कर्णमनोहर उदाहरण आहे. १५. हा संकटसमय. १६. गीतीचा अन्वयः—हंस दूर जावूनि [काक] आला किंवा नाहीं असें (हें जाणण्याकरितां) फिरे (मागें वळे) [व] पाहे, [व तो काक जवळ येईपर्यंत उभा] राहे; [त्याची] उपेक्षा न करि. [हंस] खळाची हि काळजी वाहे. १७. या चतुर्थ चरणानें सज्जन आपला द्वेष्टा जो दुर्जन त्यावरही उपकार करितो—असें सुचविलें आहे. 'हंस'शब्द श्रेष्ठतावाचक आहे म्हणून हें वाक्य सुभाषितरूप आहे, असें समजावें. १८. प्रति+क्षण+क्षीण+शक्ति=प्रत्येक+क्षण+कमी+शक्ति=प्रत्येक क्षणास कमी कमी होत चालली आहे शक्ति ज्याची असा. १९. कावळ्यांचा राजा. २०. 'त्या' असें पाठान्तर. २१. अत्यंत+आसन्न+पतन=अगदीं पडावयास झालेला असा. २२. मूर्ख (कावळा).

मग आणिलें मनीं कीं, 'यावरि म्यां न करितां कृपा मरतो. ॥ ५१
रक्षावा चि, उपेक्षा[1] व्यसनीं अरिची हि न करिती सन्त'. ।
पाहों नये चि आंगीं बळ असतां दीनजंतुचा अन्त[2]. ॥ ५२
ऐसें सत्पुरुषव्रत आठविलें, मग म्हणे मराळ, 'अगा! ।
बहुगतिचतुरा[3] ! पतितें[4] शत कथिलीं त्वां स्वयें चि, काकखगा[5]. ॥ ५३
परि जें निजगुह्यपतित[6] आम्हांसि न सांगसी च कां गा! तें? ।
झालें[7] सख्य परस्पर, दूर उडालों नभांत[8] सांगातें[9]. ॥ ५४
तुंडाग्रें[10] पक्षयुगें[11] शिवसी काका! क्षणक्षण जळाला[12]. ।
या गतिचें नाम कथीं, दे टाकुनि सर्व संशय, जळाला[13]. ॥ ५५
वद काय नाम काका! या पाताचें? शतीं असे हा, कीं ।
त्याहूनि वेगळा चि? स्पष्ट कथीं मौन एकदा[14] टाकीं. ॥ ५६
ये[15] ये झडकरि, हा मीं हंस तुझी वाट पाहतों, करटा! ।
या लक्षयोजनांबुधिपरतीरीं[16] आमुचा असे घरटा[17]'. ॥ ५७
नेत्रीं नाकीं कानीं क्षीरोदक[18], पक्ष जाहले ओले; ।

१. हें उत्तम सुभाषित आहे. २. शेवट (सत्व). ३. उडण्याचे पुष्कळ प्रकार ज्यास माहीत आहेत अशा. ४. उडण्याचे प्रकार. ५. कावळ्या. ६. आपला आवडता व कोणासही न सांगतां गुप्तपणें जपून ठेवलेला उड्डाणविशेष. [हंसाचें हें सर्व भाषण थट्टेचें आहे]. ७. (कोणी सात पावलें मिळून चालल्यास ते मित्र होतात, असा नियम आहे) आपण तर पुष्कळ दूर एकत्र आकाशांत उडून आलों, तेव्हां आपलें परस्पर सख्य (मैत्री) झालें म्हणून हा तुझा आवडता उडण्याचा प्रकार मला सांग—असा भाव. ८. आकाशांत. ९. मिळून, एकत्र, बरोबर. १०. चोंचीनें. ११. दोन्ही पंखांनीं. १२. उदकाला. १३. जळून गेला, पार नाहींसा झाला. १४. 'एकदा'शब्द व्यवहारांत द्व्यर्थी प्रयुक्त आहे:—(१) फक्त एक वेळ. या अर्थीं एकदां मौन टाकीं म्हणजे एकदां बोल; पुनः पाहिजे तर बोलूं नकोस—असा अर्थ होईल. (२) पुनः न करण्याच्या उद्देशानें, शेवटच्या वेळीं (once for all) या अर्थीं मौन एकदां टाक व पुनः मौन धरूं नकोस—असा भाव. १५. 'ये ये झडकरि' या शब्दांनीं काक येऊं शकत नाहीं, असें सुचविलें आहे. मी हंस करटाची वाट पाहतों आहें, असें सांगून 'हंस' व 'करट' ह्या शब्दोच्चारणानें आपली योग्यता व त्याची हीनता सुचविली आहे. लक्षयोजनविस्तीर्ण समुद्राच्या पलीकडे आपला घरटा आहे, असें हंसानें सांगून 'लक्षयोजन' शब्दानें काकास भिवविलें आहे. १६. लक्ष योजनें विस्तीर्ण अशा समुद्राच्या पलीकडे. १७. घर. 'घरटें' असा शब्द विशेष प्रचारांत आहे. या पांच गीतींतील हंसाचें उत्तर अत्यंत मर्मभेदक आहे. १८. (समुद्राचें), खारें पाणी.

[१]केवळ विव्हळ दुर्बळ तो खळ आर्तस्वरें असें बोलेः—॥ ५८
“-‘का’ ‘का’ शब्द करूनि [२]भ्रमती, त्यांच्या कुळांत मीं झालों; ।
[३]प्राणोपायन घेउनि [४]तो आतां शरण मीं तुला आलों. ॥ ५९
ने मज सागरतीरीं हंसा ! दे प्राणदान दीनातें; ।
उडतां व्याकुळ झालों, भ्यालों या [५]दुस्तरा [६]नदीनातें.” ॥ ६०
ऐसें [७]वदतां पडला [८]सिंधुजळीं काक धाक पावोनीं; ।
त्याच्या समीप गेला [९]सदयजनोत्तंस हंस धावोनी. ॥ ६१
हंस म्हणे, “रे काका ! [१०]सांगत होतासि ‘पात शत [११]जाणें.’ ।
[१२]आत्मश्लाघा [१३]ज्यांत, स्मर, तें [१४]ज्ञातिप्रमोदकर [१५]गाणें. ॥ ६२
मजहूनि अधिक तूं कीं इतुक्यांत चि भागलासि ? सांग मला ।
शतपातपंडिता ! तुज हा श्रम [१६]अल्पा [१६]पंथीं च कां गमला ? ॥ ६३
[१७]कीं [१८]पर्व [१९]अपूर्व असे, जें [२०]परमोदार द्यावया सुख ? गा ! ।
म्हणउनि [२१]मज्जन करिसी ? वद, झाले कर्ण हे [२२]पिपासु खगा !” ॥ ६४
काक म्हणे, ‘मी भक्षुनि [२३]उच्छिष्टें फार मातलों बा ! गा ! ।
कीं आपणासि मानीं गरुड चि हंसोत्तमा ! महाभागा ! ॥ ६५
म्यां काक अन्य खग ही पुष्कळ अवमानिले [२४]अदभ्र मदें. ।

---

१. या गीत्यर्धांत ‘ळ’काराची असकृत् आवृत्ति होऊन ती कर्णास मधुर झाली आहे. अर्थ-हानी न करितां असे अनुप्रास साधणें पंतांशिवाय इतर मराठी कवींना फारच थोडें साधतें. २. फिरती, भ्रमण करिती. ३. प्राणरूप नजराणा. ४. वर वर्णिल्याप्रमाणें नीच कुळांत जन्मलेला असा. ५. तरून जाण्यास फार कठीण अशा. ६. नदी+इन=नदीपति=समुद्र. ७. वदत असतां किंवा वदून. ८. समुद्राच्या पाण्यांत. ९. सदय+जन+उत्तंस=सदय जनांना भूषण असा. १०. ‘शत पात मीं जाणें’ [असें तूं] सांगत होतासि—असा अन्वय. ११. मी जाणतों. १२. आत्मस्तुति. १३. गाण्यांत. १४. ज्ञातीला (इतर कावळ्यांस) आनंददायक असें जें गाणें तें. १५. लांब हकीकत, बढाई. १६. थोड्या वाटेवरच; फार न उडतांच. १७. ही शुद्ध थट्टा आहे. जें सुख द्यावया परमोदार [असें] अपूर्व पर्व [आज] असे म्हणउनि मज्जन करिसी कीं ?—असा अन्वय. १८. एकादशी, अमावास्या, पूर्णिमा, सूर्यचंद्रग्रहणें इत्यादि दिवसांस पर्वदिवस म्हणतात. १९. पूर्वीं कधीं न आलेलें. फार महत्त्वाचें—असा भाव. २०. परम+उदार=(सुख देण्यास) फार उदार. २१. स्नान. २२. [श्रवण करण्यास] तृषित. पिण्याची इच्छा=पिपासा, ती आहे ज्यांस ते पिपासु. २३. उष्टें. २४. अ+दभ्र=पुष्कळ. दभ्र=सूक्ष्म, बारीक, लहान.

ऐकविलीं बा ! [१]तुंज ही दुर्वाक्यें [२]सज्जनश्रुतिश्रमदें. ॥ ६६
केली तुजसीं स्पर्धा, तत्फळ हें व्यसन पावलों [३]सद्या; ।
शरणागतासि रक्षीं, हो कीर्ति तुझी जनांत [४]अनवद्या. ॥ ६७
हो [५]बेटें, भेट, हंसा ! असती तूं दक्ष रक्षणीं [६]आंगें. ।
[७]पाळिति संत [८]व्यसनीं दीन मुकें बधिर आंधळें पांगें. ॥ ६८
सदया ! [९]निजदेशाप्रति जरि मज नेसील तरि विभो ! मग मीं ।
[१०]शलभीं हि [११]नम्र होइन, बा ! सांगों काय [१२]मदधिकीं [१२]खगमीं ?' ॥ ६९
ऐसें [१३]वदे, रडे बहु, खाय गटकळ्या जळांत, करि 'का' '[१३]कौं.' ।
धावे मराळ, [१४]चरणीं कवळुनि काढी क्षणांत वरि काका. ॥ ७०
वाहे त्या [१५]दीनातें पृष्ठीं तो [१६]ब्रह्मवाहन हि हंस; ।
घेउनि गेला सागरतीरातें [१७]सर्वसज्जनवतंस. ॥ ७१
हंस [१८]यथागत गेला दावुनि माहात्म्य [१९]साधुसंगाचें, ।
स्थापुनि पूर्वस्थानीं, [२०]आश्वासन [२०]करुनि त्या [२१]विहंगांचें. ॥ ७२
काक, मराळद्वेषें होतां [२२]बळसर्वगर्वहानि, वळे; ।

---

१. तुला सुद्धां. 'तुज हीं' असा अन्य पाठ आहे. २. साधु लोकांच्या कर्णास श्रम देणारीं. ३. तत्क्षणींच; लगेच. हा शब्द संस्कृतांत 'सद्यस्' असा सकारांत आहे, व त्याचें प्राकृतांत 'सध्यां' असें रूप प्रचारांत आलें आहे. ४. तुझी कीर्ति अनवद्या (निर्दोष) हो—असा अन्वय. किंवा 'अनवद्या' हें हंसाचें विशेषण करावें. अनवद्या=दोषरहिता. ५. समुद्रांत मला बेटाप्रमाणें आधारभूत हो—असा भाव. ६. स्वयें, स्वतः. ७. हें अर्ध उत्तम सुभाषितरूप आहे. अशा सुरेख **अर्थांतरन्यासो**त्पन्न सुभाषितांमुळें **पं**तांनीं ठिकठिकाणीं काव्यास शोभा आणिली आहे. ८. संकटांत. ९. माझ्या देशास, मी ज्या देशाच्या तीरावरून निघालों तेथें. १०. टोळापुढेंही. टोळ जरी उडणाऱ्या प्राण्यांमध्यें खालच्या पायरीचा आहे, तरी—असा भाव. ११. विनययुक्त. १२. मजपेक्षां अधिक उंच उडणाऱ्या पक्ष्यापुढें. खगम=पक्षी. १३. ही **स्वभावोक्ति** आहे. १४. पायांनीं. १५. दीन व ब्रह्मवाहन हे शब्द साभिप्राय आहेत. म्हणून येथें **परिकरा**लंकार झाला आहे. ब्रह्मदेवास पाठीवर बसवून नेण्याची ज्याची योग्यता, तो या हलक्या कावळ्यास वाहून नेता झाला—असा भाव. १६. ब्रह्मदेवाचें वाहन हंस आहे म्हणून या हंसास 'ब्रह्मवाहन' म्हटलें आहे. १७. सर्व सज्जनांमध्यें तुऱ्यासारखा. वतंस=अवतंस=तुरा. १८. आला तसा. १९. शरणागत शत्रूस देखील साधुजन रक्षितात, हेंच साधुमाहात्म्य. २०. 'भिऊं नकोस' म्हणून धैर्य देऊन. २१. पक्ष्याचें. २२. मराळद्वेषें बळसर्वगर्वहानि होतां (सर्व बळ व सर्व गर्व नाहींसा होऊन गेल्यावर) काक वळे (दुर्मार्गवृत्ति टाकून सज्जन होई). असाधु असा (अशा रीतीनें) श्रमदा (त्रास देणाऱ्या) दुराग्रहा (हट्टास) त्यजुनि

कर्णा ! असा असाधु, त्यजुनि श्रमदा दुराग्रहा, निवळे. ॥ ७३
जैसे[1] ते वैश्यात्मज उच्छिष्टें करिति पुष्ट [2]बलिपुष्टा, ।
तैसे चि [3]धार्तराष्ट्र स्वोच्छिष्टें पोषिताति तुज दुष्टा ! ॥ ७४
[4]स्वसमांतें [5]अधिकांतें अवमानी दुष्ट काक, तूं हि तसा; ।
[6]तो [7]बहुमत वैश्यसुतां, धृतराष्ट्राच्या सुतांसि तूं [8]हितसा. ॥ ७५
भीष्म, द्रोण, द्रौणी, कृप, [9]नृप होते सहाय तुज सारे, ।
[10]उत्तरगोग्रहणीं, त्वां न [11]निर्वटिला तो धनंजय कसा ? रे ! ॥ ७६
पार्थें [12]भ्राता वधितां कुरुवीरां-देखतां पळालासी; ।
त्या हि [13]महाद्वैतवनीं गंधर्वभयें कसा गळालासी ? ॥ ७७
गंधर्व चित्रसेनप्रमुख रणीं जिंकिले चि सितवाहें, ।
बद्ध [14]सदार सुयोधन [15]सोडविला; विसरलासि [16]कितवा ! हें. ॥ ७८
कथिला सभेंत [17]रामें [18]कृष्णकिरीटिप्रभाव जो [19]पहिला; ।
[20]भीष्म द्रोण हि वदले, 'सुख देतिल हरुनि भार [21]हे [22]महिला.' ॥ ७९

(टाकून दिल्यास) निवळे (पवित्र होई. सन्मार्गवर्ती होई)–असा अन्वय. निवळणें=स्वच्छ होणें. जसा काक दुराग्रह टाकून हंसास शरण गेला व वांचला, तसा तूं ( कर्णा ! ) पांडवांस शरण जाऊन वांच–हा या **अर्थांतरन्यासा**चा भाव.

१. येथून वरील 'काकहंसकथानक' शल्य उकलून सांगत आहे. २. काकबळी खाऊन आधींच पुष्ट झालेल्याला. ३. धृतराष्ट्रपुत्र. ४. आपल्या बरोबरीच्यांस. ५. आपल्यापेक्षां श्रेष्ठ असे जे, त्यांस. ६. काक. ७. प्रिय, आदरास पात्र. ८. हितप्रद असा. 'सा'वर्णानें खरोखर हितप्रद नसून तसा दुर्योधनादिकांस तूं भासतोस, असें सुचविलें आहे. ९. दुर्योधन. १०. मोरोपंतकृत विराटपर्व, अध्याय ३ पहा. ११. निर्दाळिला. १२. कर्णाच्या भावास अर्जुनानें उत्तरगोग्रहणसमयीं मारिलें होतें. संस्कृत विराटपर्व अ० ५४ श्लो० १८।१९ मध्यें कर्णाच्या या बंधूचा निर्देश फक्त वैकर्तनभ्राता एवढाच केला आहे. (काव्यसंग्रह–विराटपर्व पृ० ९९ टी० २५ पहा). १३. येथें घोषयात्राकथा अनुसंधेय आहे. (मोरोपंतकृत वनपर्व, अध्याय ७ पहा). १४. स्त्रियांसहित. १५. अर्जुनानें सोडविला–असा भाव. १६. ठका, धूर्ता. १७. परशुरामानें. अन्वयः–रामें सभेंत जो पहिला (पूर्वींचा; पूर्वजन्मींचा) कृष्णकिरीटिप्रभाव (कृष्णार्जुनप्रभाव,) [तो] कथिला. कुरुसभेंत परशुरामानें कृष्णार्जुनांची नरनारायणावताराची कथा सांगितली. (मोरोपंतकृत उद्योगपर्व, अध्याय ८ पहा). १८. कृष्णाचा व अर्जुनाचा प्रभाव. १९. पूर्वींचा; गतजन्मींचा. २०. हे (कृष्णार्जुन) भार हरुनि महिला सुख देतिल. [असें] भीष्म द्रोण हि वदले. २१. कृष्णार्जुन. २२. पृथ्वीला.

सकळां[1] भूतांहूनि ब्राह्मणसा, पार्थ तुजहुनी अधिक, ।
तो सिंधु तूं सरोवर, सामर्थ्य तुझें प्रसिद्ध[2] सावधिक[3]. ॥ ८०
आतां चि सूतपुत्रा[4] ! येईल प्रत्ययासि[5] वाचाळा ! ।
वेडावेल[6] चि रसना[7]. न[8] करी सिंहापुढें शिवा[9] चाळा[10]. ॥ ८१
व्यसनीं वायस[11] वांचे जैसा जातां मराळपा[12] शरण, ।
जा[13] तूं ही; न तव[14] गळां घालु यमाचा कराळ[15] पाश[15] रण. ॥ ८२
तव दर्प, सर्पसम[16] शर हाणोनि उरीं, हरील जिष्णु रणीं; ।
तैं उमजसील; न उरे व्याघ्ररवें[17] वीर्य लेश ही उरणीं[18]. ॥ ८३
लोकप्रसिद्ध सन्मत तेजस्वी कृष्ण[19] चंद्रसूर्य[20] तसे; ।
खद्योत[21] प्राकृत[22] तूं; ते त्वत्तेजांत लोपतील कसे ? ॥ ८४
नरसिंह[23] केशवार्जुन; जरि मिळतिल तुजसमान कोटि ससे, ।
त्यांचा नसे पराभव; गरुडासि सदर्प सर्प काय डसे ? ॥ ८५
ऐसें जाणोनि वृषा[24] ! आटोपीं परम चंचला जिभली[25], ।
कर्णा ! सावध सावध सावध रे ! गति[26] नसे चि आजि भली." ॥ ८६

---

१. सर्व प्राण्यांपेक्षां. २. प्रसिद्ध म्हणण्याचें कारण कर्णाचे पराभव सर्वांस प्रसिद्धपणें माहीत होते. ३. स+अवधिक=मर्यादा (सीमा) युक्त, परिमित, अमर्याद नव्हे असें. ४. कर्णास हिणविण्याकरितां हा शब्द शल्यानें मुद्दाम वापरला आहे. ५. अनुभवास, माझें म्हणणें प्रत्ययास येईल—असा भाव. ६. वेडी होईल, जड होऊन बसेल. ७. जिव्हा. ८. ८१, ८३, व ८५ या गीतींत सुरेख सुभाषितें आहेत. ही सर्व पंतांचीच कृती आहे. संस्कृतभारतकारांची नव्हे. ९. कोल्ही, जीस भालू असें म्हणतात ती. १०. वेडेपणाची कृती. ११. कावळा. १२. हंसश्रेष्ठास. १३. तूं ही [पांडवां] शरण जा. १४. रण तव गळां यमाचा कराळ पाश न घालु—असा अन्वय. पाश गळां घालणें म्हणजे यमपाशानें ओढला जाणें. १५. भयंकर फांस. १६. 'शरां'चें विशेषण. 'दर्पा'चें नव्हे. १७. वाघाच्या भयंकर शब्दानें. १८. मेंढरांत. १९. कृष्ण व अर्जुन. २०. या अर्धांतील विशेषणें सूर्यचंद्रांस व कृष्णार्जुनांस लागू पडतात. २१. काजवा. २२. साधारण. २३. वरील व या गीतींतील रूपकें कथित अर्थासच दृढ करण्याकरितां योजिलेलीं आहेत. हें पिष्टपेषण नव्हे. २४. कर्णा ! २५. 'जीभ' न म्हणतां 'जिभली' म्हणून कर्णाविषयींची आपली अनादरबुद्धि दर्शविली आहे. २६. शेवट, परिणाम.

## अध्याय एकुणतिसावा[1].

कर्ण म्हणे, 'शल्या ! मीं तुजहुनि बहु केशवार्जुनां जाणें. ।
तद्यश कथिसि मज, जसें बाळाचें नारदा[2]पुढें गाणें. ॥ १
जरि ते शस्त्रज्ञगुरू[3] सुगुणनिधी शत्रुमीनबक[4], लेश ।
भय[5] मज नाहीं, जरि ते, जाणें, दोघे समर्थ सकलेश[6]. ॥ २
त्यांसीं युद्ध करीन चि जरि असती दोन विप्रगुरुशाप[7]. ।
कां परि[8] कांप रिपुभयें पावेन ? न दे चि मृत्यु मज ताप. ॥ ३
शल्या[9] ! संपादावें दिव्यास्त्र असा धरूनियां काम[10], ।
म्यां विप्रच्छद्मानें[11] जेव्हां पूर्वी उपासिला राम[12], ॥ ४
पार्थहितार्थी[13] वज्री[14] विघ्न करी; होय उग्रतनु[15] कीट[16]; ।
माझी मांडी फोडी, परि नाहीं कांपलों चि मीं धीट. ॥ ५
ती दुःसह पीडा म्यां बहु धैर्यें साहिली च, कीं[17], गुरु हा ।
जागा न हो, मदंकीं[18] निजेला[19] ठेवुनि सुखें शिरोंबुरुहा[20]. ॥ ६
मांडीस कीट खालें[21] भेदी, भित्तीस[22] जेंवि आखुपती[23]. ।
निश्चळ[24] तसा चि होतों जऱ्हि दुःसह दांत ते मला खुपती. ॥ ७
पुष्कळ रक्त निघालें, उठतां रामें विलोकिलें बा ! तें[25]; ।

---

१. यांत मुळांतील ४२–४५ या चार अध्यायांतील कथाभाग पंतांनीं आणिला आहे. २. नारद व तुंबरु हे गाण्याविषयीं प्रख्यात आहेत. ३. शस्त्रविद्या जाणणाऱ्यांचे गुरु. ४. शत्रुरूप मत्स्यास बगळ्यासारखे. ५. ते दोघे (कृष्णार्जुन) समर्थ [व] सकलेश [आहेत हें] जरि [मी] जाणें [तरि] मज भय नाहीं–असा अन्वय. हें कर्णाचें भाषण वीररसाचें एक सुरेख उदाहरण आहे. ६. सकल+ईश=सर्वांचे स्वामी. ७. विप्रशाप व गुरुशाप असे दोन शाप. या शापांची कथा कर्णानें स्वतःच पुढें सांगितली आहे. ८. रिपुभयें कां परि (काय म्हणून) कांप (कंप; भीति) पावेन? पावणार नाहीं–असा भाव. ९. कर्ण येथून गुरुशाप-वृत्तांत सांगत आहे. १०. इच्छा. ११. ब्राह्मणाच्या सोंगानें. १२. परशुराम. १३. अर्जुनाचें हित करण्याचा उद्देश आहे ज्याचा असा. १४. इंद्र. १५. उग्र (भयंकर–मनुष्यास इजा करण्यास योग्य) आहे तनु (शरीर किंवा नांगी इत्यादि शरीरावयव) ज्याचा. १६. किडा. १७. उद्देश हा कीं. १८. मत् अंकीं=माझ्या मांडीवर. १९. मदंकीं निजला (निजलेला) गुरु हा जागा न हो–असा अन्वय. २०. शिरस्+अंबुरुहा=शिरकमलास. २१. खालीं. २२. 'भिंतीस' असें पाठान्तर. २३. मूषकश्रेष्ठ. आखु=उंदीर. २४. स्थिर. २५. रक्त.

'हें काय? कसें झालें?' ऐसें शल्या! विचारिलें मातें. ॥ ८
कथितां [1]वृत्त म्हणे गुरु, 'तूं विप्र न होसि. कोण तूं? सांग. ।
[2]धैर्य [3]अतुळ निश्चळ हें कीटें [4]आतृप्त भक्षितां आंग!' ॥ ९
मग मीं [5]सत्य चि वदलों. [6]कपटास्तव कोप [7]तन्मन व्यापी. ।
'[8]अस्त्रस्मृति, प्रतिज्ञारक्षण समयीं [9]नसो' असें शापी. ॥ १०
'[10]ब्रह्मास्त्र न स्फुरो तुज युद्धीं येईल जेधवां मरण.' ।
ऐसें राम [11]म्हणे तें सत्य चि; न [12]ब्राह्म देइल स्मरण. ॥ ११
तोडीन अर्जुनाचें शिर, तो सोडीन [13]पन्नगाशुग मीं. ।
[14]बहुगुरुकार्याविषयीं [15]योग्य ब्रह्मास्त्र तें, न या [16]सुगमीं. ॥ १२

---

१. झालेली हकीकत, रक्त निघण्याचें कारण. २. हें गीत्यर्ध वरील अर्धांतील 'तूं विप्र न होसि' याचा हेतु आहे. किड्यानें मांडी फोडली तरी स्वस्थ राहण्याइतकें धैर्य, ब्राह्मणाला नसतें. क्षत्रियालाच असलें धैर्य स्वाभाविक आहे—असा भाव. ३. ज्यास तुलना नाहीं असें. ४. तृप्त होईपर्यंत. ५. मी क्षत्रिय (किंवा—शूद्र) आहें असें. ६. ब्राह्मण नसून ब्राह्मण आहें असें सांगितल्याबद्दल. ब्राह्मणेतरांस ब्रह्मास्त्राचें शिक्षण द्यावयाचें नाहीं, असा भार्गवरामाचा नियम होता. म्हणूनच कर्णानें आपण ब्राह्मण आहों असें, परशुरामास प्रथम सांगितलें होतें. ७. तत्+मन=रामाचें मन. ८. अमक्या अस्त्राचा आतां उपयोग करावा व अमक्याचा नंतर उपयोग करावा याची आठवण. ९. विशेषतः या शापामुळें पांडवांस फार फायदा झाला. इंद्रदत्त शक्ति अर्जुनावर सोडीन अशी प्रतिज्ञा रोज कर्ण करीत असे. पण युद्धांत आल्याबरोबर ती प्रतिज्ञा व अस्त्रज्ञान विसरून जात असे. शेवटीं वासवीशक्ति त्यानें घटोत्कचावर सोडली. [ द्रोणपर्व, घटोत्कचवधप्रकरण पहा]. १०. या शापाचें वर्णन मोरोपंतकृत शांतिपर्व, अध्याय २ गीति ४९–५२ या ठिकाणीं व अमरचंद्रसूरिविरचित बालभारत–उद्योगपर्व–सर्ग ५ श्लोक ४५–४७ या ठिकाणीं सुरेख केलेलें आहे. ११. 'ब्रह्मास्त्र न स्फुरो तुज युद्धीं येईल जेधवां मरण' हें रामाचें म्हणणें. १२. ब्रह्मास्त्र. रामाच्या शापाप्रमाणें मला ब्रह्मास्त्राचें स्मरण आतां होणार नाहीं, तेव्हां मरण समीप आहे हें खास, तरी मी भीत नाहीं—असा कर्णाच्या सांगण्याचा भाव. 'राम म्हणे तें झालें सत्य चि, त्याचें नसे मला स्मरण' असा पाठभेद आहे. १३. सर्पबाण. तो=प्रख्यात. येथें सर्प म्हणजे तक्षकाचा पुत्र अश्वसेन. तक्षकाची भार्या स्वपुत्राचें (अश्वसेनाचें) मुख व पुच्छ आपल्या मुखांत धरून (खांडवदाहसंबंधी) अग्निप्रलयांतून बाहेर जात असतां अर्जुनानें तिचा शिरश्छेद केला, तेव्हां इंद्रानें अश्वसेनास मुक्त केलें. तेव्हांपासून अश्वसेन अर्जुनाचा वध करावा या उद्देशानें कर्णापाशीं येऊन राहिला. (आदिपर्व—अ० २२५ श्लो० ५–८). १४. फार मोठ्या कार्याविषयीं. १५. तें ब्रह्मास्त्र बहुगुरुकार्याविषयीं योग्य, या सुगमीं (अर्जुनवधरूपी सुलभ कार्याविषयीं) न (त्याची जरूर आहे असें नाहीं). १६. वध करण्याविषयीं सुलभ असा जो अर्जुन त्याच्या ठायीं.

पार्थपराक्रमपाथोनिधिचा[1] परमोग्र वेग हेलेनें[2] ।
शल्या ! निवारिजेल प्रबळविजयचापवल्लिवेलेनें[3]. ॥ १३
नृपभूषण[4], तेजस्वी, दृढ, धरि उदरांत जेंवि भूमि हिरा[5], ।
प्रसवे पृथा जया कीं जैसी अदिती तया विभू मिहिरा[6], ॥ १४
त्या पार्थासि, तयाच्या त्या हि सहायोत्तमाच्युतासि[7] पणें ।
मारिन, खेळेन रणीं रिपुरक्तांचें करूनियां सिर्पणें[8]. ॥ १५
मारीन त्यासि अथवा त्याच्या चक्रें[9] मरेन; हो भावी[10] ।
कोणातरि प्रकारें, सत्कीर्ति जगत्रयांत शोभावी[11]. ॥ १६
तूं भीरु मूर्ख निष्ठुर हितशत्रु क्षुद्र[12] मद्रदेशमळा[13] ! ।
निंदिसि, करिसी तेजोभंग, मज तुझा कुसंग दे शमळा[14]. ॥ १७
स्नेह करी, हृष्ट करी, तर्पी, रक्षी, सदैव, संमानी[15], ।
पावे सुखें सुख हि तें[16] मित्र, असें म्हणति सर्व हि ज्ञानी. ॥ १८
तें सर्व मित्रलक्षण माझ्या[17] ठायीं च नित्य नांदे; हें ।
जाणे दुर्योधन ही. साधूं तत्कार्य मीं न कां देहें[18] ? ॥ १९
खंडी[19], दंडी, करि कृश, मारी, पेढवी[20] हि उष्ण सुसकारे, ।

---

१. पार्थपराक्रमरूप समुद्राचा. २. लीलेनें. ३. विजयचाप=विजयशील असें माझें (कर्णाचें) चाप. प्रबळविजयचापवल्लिवेलेनें=प्रबळ व विजयशील अशी (माझी) धनुष्यवल्ली तीच मर्यादा (हद्द, समुद्रकिनारा) तिनें. वेला=समुद्राचा किनारा, सीमा, मर्यादा. ४. हें 'अर्जुन' व 'हिरा' या दोहोंचें विशेषण. ५. जेंवि भूमि हिरा उदरांत धरि, जैसी अदिती विभू मिहिरा प्रसवे, [तेंवि] जया पृथा प्रसवे त्या पार्थासि-इत्यादि अन्वय. ६. सूर्या. विभू=सर्वव्यापी. ७. सहायोत्तम+अच्युतासि=सर्वांत श्रेष्ठ असा जो साहाय्यकर्ता अच्युत त्यास. ८. शिंपणें. ९. सुदर्शन चक्रानें. 'हातें' असें पाठान्तर. १०. होणार. जें होणार असेल तें होवो-असा भाव. ११. ही गीति वीररसाचें व सुभाषिताचें उदाहरण आहे. १२. हलका. १३. मद्रदेशाच्या मळा ! (उकिरड्या !). १४. पापास. शमल=पाप. १५. उत्तम रीतीनें मान देई. १६. संस्कृताप्रमाणें मराठींत 'मित्र' शब्द नपुंसकलिंगी नसतांही पंतांनीं तो नेहमीं नपुंसकलिंगी वापरला आहे. यावरून संस्कृत व्याकरणाप्रमाणें महाराष्ट्र व्याकरणही परिशुद्ध ठेवण्याचा पंतांचा मानस होता असें दिसतें. ही सर्व गीति उत्तम सुभाषितरूप आहे. १७. माझ्या. १८. देहाची आशा न धरितां, देह समर्पून, १९. निरुत्साह करितो. २०. अतिदुःखित करी-असा भाव. ही गीति शत्रुलक्षणरूप असून सुभाषित आहे.

कष्टवि तो शत्रु; [1]तुवां हा सूचविला स्वभाव [2]असका रे ! ॥ २०
मीं [3]शुद्ध युद्धधर्में पूजाया ईश्वरासि, त्या अरितें ।
गांठीन, भीत नाहीं गांडीवा, [4]शौरिच्या हि त्या [5]अरितें. ॥ २१
[6]दंडगदापाशाशनिधर काल कुबेर कीं वरुण शक्र, ।
यांचें हि भय नसे मज जरि हि [7]श्वभ्रीं पडेल रथचक्र. ॥ २२
[8]गुरुशाप एक कथिला, विप्राचा शाप ही दुजा [9]परिसें. ।
[10]अरिस स्वमर्म कथितों, अधिक नसे धैर्य अन्य [11]यांपरिस. ॥ २३
अस्त्रार्थ फिरत असतां एका समयीं नृपा ! असें घडलें, ।
[12]शापव्यसन अकस्मात् दैवबळें आमच्या गळां पडलें. ॥ २४
[13]संधानलाघवार्थें सोडित होतों वनांत मीं बाण; ।
[14]द्विजहोमधेनुच्या तों [15]वत्साचे एक शर हरी प्राण. ॥ २५
[16]अज्ञानें वत्साचा वध घडला; विप्र कोपला; शापी ।
कीं, 'रे ! असावधाना ! पात्र चि दंडासि तूं असा पापी. ॥ २६
[17]दुस्तर [17]भयांत युद्धीं रथचक्र तुझें पडो महा[18]श्वभ्रीं, ।
जेंवि [19]महाकल्पान्तीं रविमंडल निश्चयें बुडे [20]अभ्रीं.' ॥ २७

---

१. शल्यानें. २. सर्व, संपूर्ण. हा शब्द पंतांच्या कवितेंत अन्यत्र आढळतो. (सभापर्व, अध्याय ४।७ व ५।६ पद्य). ३. 'शुद्ध'शब्दानें मी ईश्वरास पुष्पगंधादिकांनीं पूजित नाहीं असें सुचविलें आहे. या सर्व गीति **वीररस**परिप्लुत आहेत. ४. कृष्णाच्या. ५. चक्रातें. ६. दंड, गदा, पाश व अशनि (वज्र) हे अनुक्रमें धरणारे. हा **क्रमा**लंकार किंवा **यथासंख्य** अलंकार. जेव्हां पदार्थांचें वर्णन ज्या क्रमानें पहिल्यानें झालेलें असतें, त्याच क्रमानें पुन: दुसऱ्या पदार्थांशीं त्यांचा अन्वय लागत असला म्हणजे **'यथासंख्य'** अलंकार होतो. ७. खळग्यांत. ८. परशुरामाचा शाप. ९. ऐक. १०. शत्रूस. या गीतीनें **वीररसा**चा उत्तम पोष झाला आहे. ११. यापेक्षां. १२. शापरूपी संकट. १३. निशाण मारण्यांत पटाईत व्हावें म्हणून. १४. एका ब्राह्मणाच्या यज्ञोपयोगी गाईच्या; यज्ञास आवश्यक घृतादि द्रव्यें देणाऱ्या गाईच्या. १५. वांसराचे. १६. नकळत. १७. अत्यंत भीतीच्या प्रसंगीं १८. मोठ्या खळग्यांत. १९. महाकल्पाच्या शेवटीं, प्रळयसमयीं. तीस कल्पांचा मिळून एक महाकल्प होतो. महाकल्प म्हणजे ब्रह्मदेवाचा एक महिना. कृत, त्रेता, द्वापार आणि कलि या चार युगांचा एक पर्यय (चौकडी). असे पर्यय सहस्र झाले म्हणजे ब्रह्मदेवाचा प्रात:कालापासून सायंकालपर्यंत केवळ दिवस होतो, इतकीच पुढें रात्र. याप्रमाणें एक जें अहोरात्र त्यास 'कल्प' असें नांव आहे. प्रस्तुत सत्त्विसावा श्वेतवाराहकल्प चालला आहे. २०. आकाशीं.

[1]दशशत धेनू, षट्शत [2]वृष देतां हि, द्विज क्षमा न करी. ।
स्वीकारीना शल्या ! [3]सप्तशत [4]क्षोणिधरसमान [5]करी. ॥ २८
बहु दासी-दासशतें देतां हि न विप्र तो [6]बंधे, [7]नुगळे; ।
मीं तद्भयें गळालों, व्याघ्रभयें [8]जेंवि काय धेनु गळे. ॥ २९
जें [9]बहुकाम [10]संमृद्ध स्वगृह, स्वद्रव्य सर्व ही होतें, ।
प्रार्थूनि देत असतां, इच्छीना धन [11]अखर्व ही [12]हो! तें. ॥ ३०
जातां मज विप्र म्हणे, अनृत नव्हे तो [13]अमोघशाप-रवा ।
‘[14]धनदाची हि नसे, मग अन्याची काय निःस्पृहा [15]परवा ?’ ॥ ३१
हे शाप [16]सुहृद्भावें कथिले, कीं, मज तुझा नसे [17]लेखा; ।
[18]मत्क्रोध[19]अहि न खवळे तों चि [20]खलाखो ! [21]सुकीर्तिसेले खा. ॥ ३२
[22]भ्याडासि भेडसावीं, मीं भ्याया उपजलों नसें कांहीं; ।
वि[23]क्रमयश साधाया [24]झालोंसें. [25]चाल, [26]पंथ पुढें [27]पाहीं. ॥ ३३

---

१. हजार. २. बैल. ३. सातशें. ४. क्षोणिधर+समान=पर्वत+सारखे=पर्वतासारखे. क्षोणिधर म्हणजे पृथ्वीस धरणारे. पर्वत पृथ्वीस उचलून धरतात व त्यामुळें शेषाचें ओझें कमी होतें अशी समजूत आहे. म्हणून पर्वतांस ‘क्षोणिधर’ हें नांव आहे. ५. गज, हत्ती. ६. वळे. ‘जुमानी’ ‘पर्वा करी’ या अर्थी हा शब्द ज्ञानेश्वरींत वापरला आहे. ७. न+उगळे=वश न होई. ८. जेंवि काय=जणों काय. ९. सर्व इच्छा पूर्ण करणारें असें. हें ‘स्वगृहा’चें विशेषण. १०. सर्व आवश्यक पदार्थांनीं युक्त. ११. विपुल, फार. खर्व=ठेंगणा, वामन. अखर्व=उंच मनुष्य, यावरून अखर्व म्हणजे फार–असा अर्थ निघाला. १२. ‘होतें–हो तें’ हें पंतांचें ठरींव यमक. १३. न चुकणारा शापशब्द ज्याचा असा. अमोघ=न चुकणारा, ज्या कामाकरितां योजलेला आहे, तें काम हटकून करणारा. रव=शब्द. १४. कुबेराचीही. १५. हें गीत्यर्ध उत्तम सुभाषिताचें आणि **काव्यार्थापत्ति** व **अर्थांतरन्यास** या अलंकारांचें उदाहरण आहे. १६. स्नेहभावानें, दोस्त या नात्यानें. १७. गणना, पर्वा. १८. मत्+क्रोध+अहि=माझा क्रोधरूपी सर्प. १९. समास असून पंतांनीं समास न केल्याचें हें एक उदाहरण आहे. २०. खल+आखो=नीच मूषका! २१. उत्तम कीर्तिरूप शेले. ‘सुकीर्ति’ हा संस्कृत शब्द, ‘सेले’ हा प्राकृत शब्द. तस्मात् ‘सुकीर्तिसेले’ हा व्यभिचारी समास आहे. हें गीत्यर्ध **परंपरितरूपकाचें** उदाहरण आहे. हें रूपक शेवटल्या–‘सेले खा’ या यमकाकरितां मुळांत नसतांही–तयार करण्यांत आलें. तेव्हां यमकाकरितां नेहमीं अर्थ बिघडतोच असें नाहीं. २२. भित्र्या मनुष्यास. २३. पराक्रम आणि कीर्ति. २४. झालों असें, जन्मास आलों आहें. हा प्रयोग ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. २५. पुढें चाल; पुढचा रस्ता काढ, रथ चालीव. २६. रस्ता. २७. ‘पांहीं’ असा पाठ रा० पराडकर यांच्या प्रतींत आहे.

आहें सहाय समयीं मज मीं च सहस्रशल्यतुल्य[1] गुणें. ।
तुज रक्षिलें[2] क्षमेनें. वधितां माझें पडेल काय उणें ?' ॥ ३४

शल्य म्हणे, 'रे ! सूता[3] ! बडबड करितोसि फार मद्यपसा[4]. ।
गुरुसागर[5] बहु गर्जे[6], परि मुनिचा[7] एक ही भरे न पसा[8]. ॥ ३५

कर्णसहस्रें[9] हि न जें कार्य घडे तें घडेल शल्यकरें. ।
एकें[10] अमृतकरें[11] चि व्योम[12] धवळतें[13], न तें उडुप्रकरें[14].' ॥ ३६

कर्ण म्हणे, "बैस उगा. शुद्धासि अशुद्ध[15] निंदिसी उलटा. ।
साधुसभास्तुतसाध्वीशुचिशीलांला[16][17] हि हांसती कुलटा[18]. ॥ ३७

जो[19] पापाचाराचें केवळ माहेर मद्रदेश, तशा ।
राष्ट्रीं षड्भागग्रहकर्ता[20] तूं, जोडिती[21] अघें शतशा. ॥ ३८

---

१. हजार शल्यांसमान. २. दुष्ट शब्द जे बोललास त्याबद्दल दंड न करितां रक्षिलें. ३. कर्णा ! ४. दारू प्यालेल्या मनुष्यासारखा. ५. गुरुसागर=मोठा समुद्र. ६. भयंकर गर्जना करी. ७. अगस्त्य मुनीचा. प्रस्तुत स्थलीं अगस्त्यऋषीनें समुद्रपान केल्याची पौराणिक कथा अनुसंधेय आहे. ती थोडक्यांत अशी:–पूर्वी कालकेय नामक असुर दिवसा समुद्रांत लपून राहून, रात्रीं मुनिजनांस त्रास देत असत. तेव्हां अगस्त्यऋषीनें संपूर्ण समुद्र प्राशिला, त्यामुळें कालकेय त्याच्या उदरांत प्रविष्ट होऊन मरण पावले. ८. अगस्त्यऋषीनें एका आचमनानेंच सर्व समुद्र पिऊन टाकिला–अशी कथा आहे. म्हणून समुद्र मुनीचा पसाही न भरे–असें म्हटलें आहे. ९. हजार कर्णांच्या हातून. १०. हें अर्ध सुभाषितरूप आहे. ११. चंद्रानेंच. १२. आकाश. १३. उजळतें. १४. नक्षत्रसमूहानें. १५. अपवित्र, पापी. [तूं] अशुद्ध [असूनही] शुद्धासि उलटा निंदिसी–असा अन्वय. 'चोराच्या उलट्या बोंबा' ह्या म्हणीची येथें आठवण झाल्याशिवाय राहात नाहीं. १६. साधु+सभा+स्तुत+साध्वी+शुचिशील=सज्जन+सभा+वर्णिलेली+अनुकरणीय स्त्री+पवित्रवर्तनशील=सज्जनांच्या सभेंत जिची प्रशंसा होते व जिचें वर्तन फार पवित्र आहे, अशा अनुकरणीय स्त्रियांस देखील. या गीतींत दृष्टांतालंकार आहे. कारण उपमान, उपमेय व साधारणधर्म या सर्वांतही बिंबप्रतिबिंबभाव आहे. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ३५,३६ व ३७ या तिन्ही गीतींतील द्वितीय चरण सुरेख सुभाषितें आहेत. ही सर्व पंतांचीच कृति आहे. मुळांत हीं सुभाषितें नाहींत. १७. '°शुचिशीळाला' असा पाठ रा० पराडकर यांच्या प्रतींत आहे. १८. जारिणी. १९. मद्रदेशाची निंदा कर्ण करीत आहे. मूळ संस्कृत महाभारतांत ४४ व ४५ असे दोन अध्याय या निंदेच्या पायीं वाहिलेले आहेत. पण पंतांनीं ही निंदा ३,४ गीतींत आटपून घेतली आहे. २०. कररूपानें सहावा भाग ग्रहण करणारा (राजा). २१. कोण जोडिती? मद्रदेशांतील लोक ! 'जोडिशी' असा पाठ आहे, तोच खरा पाठ असावा. पण पंतलिखित प्रतींत 'जोडिती' असा पाठ आहे. जोडिशी=तूं (शल्य) जोडिशी.

'म्लेच्छ मनुष्यांचा मळ, त्या म्लेच्छाचा मळ स्वयें तेली[१]; ।
त्या तेल्यांचा मळ ते, ज्यांची पुंप्रकृति[२] संक्षया[३] गेली; ॥ ३९
त्यांचा[४] हि राजयाजक[५], याज्य तयांचा हि मद्रकांचा[६] ही ।
मळ तुज हो,' हें म्हणतां लागलिया[७] राक्षसासि बहु दाही[८]. ॥ ४०
या शापापासुनि बहु घेती राक्षस हि पाप वित्रास[९], ।
पळती सोडुनि शल्या ! जेंवि अघें[१०] हरियशःपवित्रास[११]." ॥ ४१
शल्य म्हणे, 'रे कर्णा ! आर्तां[१२] पितरांसि ही तुझ्या अंगीं[१३] ।
त्यागिति, विकिति स्त्री सुत, अंगेशाच्या[१४] हि पाप हें अंगीं. ॥ ४२
रथें[१५] अतिरथ कथितां जे भीष्में तुज दाविले तुझे दोष, ।
ते आठवीं स्वचित्तीं, हित वदतां येतसे तुला रोष. ॥ ४३
सर्वत्र[१६] भले ब्राह्मण सुक्षत्रिय-वैश्य-शूद्र ही असती; ।

---

१. तेली म्लेच्छांहून नीच कां? २. ज्यांची पुरुषप्रकृती नाश पावली आहे असे (षंढ). ३. 'क्षया' असें पाठांतर. ४. 'त्याचाहि राजयाजक मळ, त्याचा मद्र, मद्रकाचाही । मळ हो, तुज हें ह्मणतां लागलिया राक्षसास बहु दाही. ॥' असाही पाठ आहे. पण त्यांत 'याज्य' शब्द नाहीं. मुळांत 'राजयाचकयाज्यानां मद्रकाणां च यन्मलम्' असा पाठ असल्यामुळें पंतांचा पाठ 'त्यांचा हि राजयाचक॰' असा असावयास पाहिजे होता. दुसऱ्या पाठांत पूर्ण सारालंकार आहे. 'याज्य'शब्द प्रस्तुत स्थळीं कां योजिला नाहीं, हें समजत नाहीं. ५. राजाचा पुरोहित. याजक=धनादि लाभाच्या आशेनें दुसऱ्यासाठीं यज्ञ करणारा. ६. मद्रदेशस्थ जनांचा. ७. लागलेला जो राक्षस त्यास. ८. दहन करी, जाळी, संताप उत्पन्न करी. गीतीचा सारांश असा कीं, सर्वांचा मळ (सर्वांपेक्षां नीच–असा भाव) जो मद्रक (मद्रदेशस्थजन) त्याचा मळ तुला लागो असें ह्मटल्याबरोबर, या शापास भिऊन (अंगांत शिरलेला, लागलेला) राक्षस देखील पळतो. ह्मणजे मद्रदेशस्थ लोक इतके नीच आहेत कीं, त्यांच्या नीचतेस राक्षसही भितात. अशा अर्थाचे मंत्र (जारणमारण) पूर्वीं एका कालीं प्रचारांत असून त्यांस 'आथर्वणमंत्र' असें ह्मणत असत. हल्लींच्या बीरमंत्रांतही अशाच तऱ्हेच्या शपथा भुतांखेतांस घातलेल्या असतात. ९. विशेष त्रास. १० पापें. ११. हरीच्या यशानें पवित्र झालेल्यास. १२. म्हातारपण, दौर्बल्य इत्यादि संकटांनीं युक्त. १३. अंगदेशांत. १४. अंगदेशाचा राजा हा निग्रहकर्ता असल्यामुळें–असा भाव. १५. कौरवांच्या सैन्यांतील अतिरथी, महारथी, रथी इत्यादिकांची गणना करीत असतां. (पंतकृत उद्योगपर्व, अध्याय १२ पद्य ). १६. मद्रदेशांतील लोक नीच आहेत, असा जो कर्णानें सिद्धांत ठोकून दिला, त्यास शल्य उत्तर देतो कीं, प्रत्येक देशांत कांहीं चांगले व कांहीं वाईट जन असावयाचेच. कोणत्याही देशांतील लोकांविषयीं बोलतांना सर्वसामान्य असा सिद्धांत ठरवितां येत नाहीं.

वसती सर्वत्र सं[1]ती; केवळ सर्वत्र दु[2]ष्कृती नसती. ॥ ४४
हास्य-विनोद-क्रीडा आहे सर्वत्र, धर्म ही आहे. ।
दुष्ट प[3]रच्छिद्र जसें पाहे, तैसें न आपुलें पाहे. ॥ ४५
सर्वत्र धर्मरक्षक राजे आहेत, लाविती[4] वाटे[5], ।
दंडिति खळांसि; धार्मिक असती सर्वत्र; तुज न हें वाटे[6]. ॥ ४६
जऱ्हि पापदेशवासी तऱ्हि न करी पाप स[7]र्वजन कांहीं; ।
नित्य[8] खळांत चि असतां साधु खळांच्या गुणा सिकत नाहीं. ॥ ४७
पंकांत[9] पद्म न मळे, काकांच्या दुर्गुणा सिके न पिक[10], ।
चंदन प[11]रगंध न घे, होय तृणां[12]माजि तृण चि काय पिक[13]? ॥ ४८
मद्देशीं जन असती तैसे नसतील सुर हि व[14]रशील. ।
यावरि बडबड करितां माझ्या हातें क्षणांत मरशील.' ॥ ४९
तेव्हां दुर्योधन नृप निजकार्याचा न व्हावया घात, ।
कर्णासि मित्रभावें वारी, शल्यासि जोडुनीं हात. ॥ ५०

---

१. साध्वी, शीलसंपन्न स्त्रिया. २. पापी. ३. दुसऱ्याचे दोष. हें अर्ध सुभाषितरूप आहे. ४. खळांसि दंडिति [व] वाटे लाविती (सन्मार्गास लावतात)=असा अन्वय. ५. मार्गास. ६. समजे. ७. सर्व लोक. ८. हें उत्तम सुभाषित होय. ९. चिखलांत. १०. कोकिल. कोकिलांचीं आंडीं कावळ्यांकडून रक्षिलीं जातात, हें सर्वप्रसिद्ध आहे. अशा रीतीनें कोकिळा कावळ्यांत मिसळून राहूनही काव, काव, असे कटु शब्द न शिकतां मंजुळ गायनच करिते—असा सांगण्याचा भाव. ११. इतर वृक्षांचा गंध. चंदनाच्या भोंवतीं इतर वृक्ष असतात, तरी चंदनवृक्ष स्वसुगंध सोडून परगंध घेत नाहीं—असा भाव. १२. गवतांत. चंदन परगंध न घे [व] तृणांमाजि पिक (पीक) तृण चि न होय काय?—असा अन्वय. ह्या अर्धांतील 'न' चा उपयोग काकाक्षिगोलकन्यायानें घे व होय—ह्या दोन्ही क्रियापदांशीं करावयाचा. १३. पिक=पीक. धान्यादिकांचें पीक. ही सर्व गीति उत्तम सुभाषिताचें व '**अतद्गुण**' नामक अलंकाराचें उदाहरण आहे. तल्लक्षणः—'तद्रूपाननुहारस्तु हेतौ सत्यप्यतद्गुणः' [साहित्यदर्पण]. आपणाशीं संयुक्त अशा वस्तूंचा गुण जेव्हां एकादा पदार्थ घेत नाहीं, तेव्हां अतद्गुण हा अलंकार होतो. ज्याचा संबंध झाला त्याच्या गुणाचा स्वीकार झाला नाहीं ह्मणजे हा अलंकार झाला. ही व या पुढील गीति पंतांच्याच आहेत. मुळांत या उत्तम अलंकारास व सुभाषितास मुळींच आधार नाहीं. १४. श्रेष्ठ आहे शील (सद्वृत्त) ज्यांचें असे.

नृपबहुमानें[1] झाले अतिवाद त्यजुनि उपशमा[2] वरिते[3]. ।
मग, हरिवर[4] करिवरसे, गेले दोघे नरोत्तमावरि[5] ते[6]. ॥ ५१

---

## अध्याय तिसावा[7].

कर्ण त्रिदशगुरुमतें[8] रचुनि महाव्यूह तन्मुखीं[9] ठाके. ।
बार्हस्पत्यव्यूहा[10] पाहुनि बहु धर्मराज तो धाके[11]. ॥ १
धर्म म्हणे विजयाला, 'हा व्यूह प्रेक्षितां चि भय वाटे. ।
न करी कर्ण[12] पराभव ऐसें योजीं, धरूनि नयवाटे[13].' ॥ २
अर्जुन म्हणे, 'नृपाळा ! या व्यूहाचा प्रधानवध[14] घात; ।
कर्ण प्रधान त्यातें ध्वंसीन, जसा पयोधरा[15] वात'. ॥ ३
भूप म्हणे, 'तूं चि करीं कर्णासीं युद्ध, उद्धरीं[16] कांटा. ।
भांडो सुयोधनासीं भीम, तयाचा चि तो[17] असे वांटा[18]. ॥ ४
सहदेव सौबलासीं[19], वृषसेनासीं हि नकुल बलशाली ।

---

१. राजा दुर्योधनानें आपणास गौरवून संबोधिल्यामुळें, किंवा राजाविषयीं त्यांच्या मनांत असलेल्या गौरवामुळें. २. 'उपरमा' पाठांतर. उपशम=शांति. ३. अतिवाद त्यजुनि उपशमा वरिते (शांतीचा स्वीकार करिते) झाले. ४. ते दोघे हरिवर (सिंहावर) करिवरसे (दोन मोठ्या हत्तींप्रमाणें) (त्या) नरोत्तमावरि गेले—असा अन्वय. (सिंहावर) चालून जाऊन गज जसे नाश पावतात, त्याप्रमाणें यांचा पुढें नाश झाला—असा ध्वनितार्थ. ५. अर्जुनावर. ६. कर्ण व शल्य. ७. या अध्यायांत मूळ संस्कृत भारतांतील ४६–४८ या अध्यायांचा व ४९ या अध्यायांतील २२ श्लोकांत वर्णिलेला कथाभाग आला आहे. ८. त्रिदश+गुरु+मतें=देव+गुरु+मतें=देवगुरु बृहस्पती याच्या मतास अनुसरून. ह्मणजे बृहस्पतीनें आपल्या युद्धशास्त्रविषयक ग्रंथांत सांगितल्याप्रमाणें. ९. तत्+मुखीं=त्या व्यूहाच्या द्वारीं. १०. बृहस्पतीनें सांगितलेल्या व्यूहाला. ११. भय पावे. १२ कर्ण [आपला] पराभव न करी (करणार नाहीं) ऐसें नयवाटे धरूनि (न्यायमार्गाचें अवलंबन करून) योजीं (योजना कर). १३. न्यायमार्गानें. 'नय' हा शब्द संस्कृत व 'वाट' हा शब्द प्राकृत. अशीच शब्दयोजना पंतकृत सभापर्व, अध्याय ४ गीति १० मध्यें आहे. यमकाधीनत्वामुळें पंतांच्या कवितेंत असले अप्रशस्त समास केव्हां केव्हां आढळतात. १४. प्रधानाचा (सैन्याधिपतींचा) वध तो. प्रधानाचा ह्मणजे कर्णाचा वध हाच या व्यूहाचा घात ह्मणजे विनाश होय. १५. मेघास. पयस्=पाणी. पय धारण करणारे ह्मणून मेघांस 'पयोधर' हें नांव. १६. उपटून काढ. १७. सुयोधन. १८. हिस्सा, वांटणीस आलेलें काम. १९. शकुनीशीं.

घालोत गांठि; पुष्कळ रिपुरक्तें पाहिजे धरा[1] घाली. ॥ ५
समर शतानीक करो दुष्टा दुःशासनासवें आजि[2]; ।
सात्यकि हार्दिक्यासीं[3], द्रौणीसीं पांच्य ही करूं[4] आजि[5]. ॥ ६
झगडेन मीं कृपासीं, असती धृतराष्ट्रपुत्र जे शिष्ट[6] ।
त्यांसीं गांठि शिखंडी घालो, ते द्रौपदेय ही शिष्ट[7].' ॥ ७
अमृतरसाची[8] धारा धर्माची श्वेतवाह[9] आज्ञा पी. ।
होय पुढें, सैन्यातें 'ऐसें वर्ता[10]' म्हणोनि आज्ञापी. ॥ ८
होउनि[11] वाजी वाहे वह्नि जया[12], ज्यावरि स्वयें पहिला[13] ।
ब्रह्मा, रुद्र, हरि, वरुण बैसे, रथ तो चि उतरला महिला. ॥ ९
त्या दिव्यरथीं बसले जे पूर्वीं बदरिकाश्रमीं वसले; ।
नरनारायण[14] दिसले, ज्यांचें[15] यश खलमनीं अनादि[16] सले[17]. ॥ १०
शल्य म्हणे, 'राधेया ! तो येतो जिष्णु विष्णुसमशील[18], ।
गरुडीं[19] कालिय[20] तैसा ज्यांवरि[21] तूं कोपगरल वमशील. ॥ ११

---

१. धरा घाली (तृप्त झाली) पाहिजे—असा अन्वय. 'पाहिजे धरा न्हाली' असा पाठभेद. २. आजच्या दिवशीं. ३. कृतवर्म्याशीं. ४. करो. ५. युद्ध. ६. अवशिष्ट, शेष. ७. श्रेष्ठ. ८. अन्वय–(जशी) अमृतरसाची धारा [तशी] धर्माची आज्ञा श्वेतवाह पी. ९. अर्जुन. १०. वागा. ११. हें अर्जुनाच्या रथाचें वर्णन आहे. येथें 'वन्हि जया [रथा] वाजी (अश्व) होउनि वाहे'–असें म्हटलें आहे. पण यास कोठेंही पुराणांत आधार नाहीं. अनुसंधेय कथा वेदांतली असावी, असा अ० ४६ श्लो० ३८–३९ वरील नीलकंठी टीकेवरून अंदाज होतो. पण ती कथा प्रख्यात नाहीं. खांडवदहनसमयीं हा रथ अग्नीनें वरुणापासून आणून अर्जुनास दिला, येवढा मात्र कथाभाग आढळतो. अर्जुनाच्या रथास गंधर्वहय होते असा एके ठिकाणीं उल्लेख सांपडतो. १२. ज्या रथास. १३. पहिला ब्रह्मा=सृष्टिकर्ता तस्मात् आदिदेव जो ब्रह्मा तो, नंतर क्रमानें रुद्र, हरि व वरुण बसले–असा भाव. १४. नरनारायण दिसले म्हणजे नरनारायणासारखे किंवा हे गतजन्मींचे नरनारायणच होत असे दिसले. 'दिसले' या पदाचा 'अलौकिक असे दिसले' असाही अर्थ करावा. १५. ज्या नरनारायणांनीं अनादिकालापासून खलांचा नाश करण्याचें काम स्वीकारल्यामुळें त्यांचें यश अनादिकालापासून खलांच्या मनांत सलत आहे–असा चरणाचा भाव. १६. पूर्वींपासून. १७. या गीतींतील चाऱ्ही चरणांत यमक साधलेलें आहे. 'बसले–वसले; दिसले–अनादि सले' हा शब्दचमत्कार श्रोत्रानंदप्रद आहे. १८. विष्णूसमान ज्याचें शील आहे असा. १९. ज्यावरि (ज्या जिष्णुवरि) तूं गरुडीं कालिय तैसा (ज्याप्रमाणें कालिय गरुडीं विष वमला, पण त्याचा कांहीं एक परिणाम झाला

कर्णा![1] पुससी ज्याला आला तो पार्थ दावपावकसा[2]; ।
वधितो मृगांसि हरिसा; सोसेल परांसि तत्प्रभाव कसा? ॥ १२
तो ध्वजशिखरीं दिसतो वानरवर[3] शत्रुधैर्यघनवात[4]; ।
न नवा तत्सम झाला लोकीं कपि; करि रवें[5] चि बलघात[6]. ॥ १३
चक्रगदाशार्ङ्गदर[7] प्रेक्षीं, तो कृष्णकंठिंचा झळके ।
श्रीकौस्तुभमणि, ज्याच्या दीप्तिपुढें चंद्रसूर्य ही मळके[8]. ॥ १४
त्रिजगत्पूजित कूजित[9] गांडीवाचें हि हें शिरे कानीं. ।
बळ मथिलें बाणानीं दर्शितवज्राहिपातिरेकानीं[10]. ॥ १५
वीरशिरप्रकर[11] पहा, कंदुकवृंदा-असा[12] नभीं गमतो; ।
वरिचेवरि झेलाया तो गृध्रश्येनसंघ ही भ्रमतो[13]. ॥ १६
ते भुजदंड सहायुध[14] भूवरि गगनीं उडोनियां गळती; ।

नाहीं त्याप्रमाणें) कोपगरल (कोपरूपी विष) वमशील—हा सार्थान्वय. गरुड व कालिय यांची कथा अशी आहे:—कालिय नांवाचा नाग पूर्वीं रमणक द्वीपांत राहत असे. 'त्या द्वीपांत गरुडानें वारंवार जाऊन, नागास भक्षण करावें. त्यामुळें सर्व नागांनीं मिळून एकदां असा विचार केला कीं, गरुडास आपण सर्वांनीं कांहीं नियमित भक्ष्य देण्याचें ठरवावें. याप्रमाणें त्यांनीं ठरवून गरुडास तो विचार कळविला......एकदां असें झालें कीं, गरुडाचा भक्ष्य त्यास न देतां यानें (कालियानें) भक्षिला, त्या कारणास्तव गरुडाचें व याचें मोठें युद्ध झालें; परंतु त्याच्या पुढें कांहीं उपाय चालेना असें पाहून हा जो तेथून पळाला, तो यमुनेच्या डोहांत येऊन लपला'. [भा. ऐ. को.]. २०. 'कालीय तसा' असें पाठांतर. २१. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'ज्यांवरि'—असा पाठ आहे, पण तो अर्थास अनुकूल नाहीं.

१. प्रास व अनुप्रास यांमुळें ही गीति कर्णास फार मधुर लागते. २. दावानलसा, वणव्यासारखा. ३. वानरश्रेष्ठ हनुमान्. ४. शत्रुधैर्यरूप मेघास वायूसारखा. ५. फक्त शब्द करून, शब्दमात्रेंकरून. रामरावणयुद्धसमयीं मारुतीनें हुंकारेंकरून अनेक राक्षसांचा नाश केला—अशी कथा आहे. ६. (पर)सैन्याचा नाश. ७. चक्र (सुदर्शन), गदा (कौमोदकी), शार्ङ्ग (धनुष्य), (आणि) दर (पांचजन्य शंख) (हीं कृष्णाचीं आयुधें). (त्याचप्रमाणें) श्रीकौस्तुभमणि प्रेक्षीं (पहा)—असा सार्थान्वय. ८. मलिन, निस्तेज. ९. शब्द. १०. दाखविलें आहे वज्रापेक्षां व शेषापेक्षां आधिक्य ज्यांनीं. 'दर्शितवज्राधिपातिरेकांनीं' असा पाठभेद आहे. त्याचा अर्थ:—दर्शित (दाखविला) आहे वज्राधिपाचा अतिरेक (आधिक्य) ज्यांनीं अशा. हें 'बाणा'चें विशेषण. ११. वीरांच्या शिरांचा समूह. येथें 'वीरशिरःप्रकर' असा पाठ असावयास पाहिजे होता. पण पंतलिखित प्रतींत आम्ही वर दिलेलाच पाठ आहे. पंत पुष्कळदां विसर्गाचा लोप करितात. (पृष्ठ १४९ टीप १४ पहा). १२. चेंडूंच्या समुदायासारखा. असा=सारखा, प्रमाणें. १३. भ्रमण करितो. १४. आयुधांसह.

भुजगभ्रमें[1] भुजांतें[2] कवळुनि घारी हेंळूहळू पैळती[3]. ॥ १७
अर्जुनशरप्रहारें गज, वज्रध्वस्तनग[4] तसे, खचले. ।
पार्थापुढें[5] तसें बळ कर्मविपाकापुढें[6] जसें न चले. ॥ १८
खचती विमानतुल्य[7] स्यंदन[8] कर्णा! पहा अहाहा! रे! ।
झटती[9] भट तीव्रशरी[10], परि दुर्जय विजय[11] कीं न हा हारे. ॥ १९
सिंहें मृगयूथ[12] तसें व्याकुळ तव सैन्य अर्जुनें केलें. ।
वांटे[13] पार्थें चि सदा दृढनियमें शंभु पूजिला बेलें. ॥ २०
कुरुवीरघनघटांत[14] स्पष्ट विजयभानु लोपला घटिका; ।
तो ध्वज मात्र दिसतसे; गर्जेति[15], जय मानिती कुरू लटिका. ॥ २१
तो[16] शरपटलपट[17] लया नेउनियां पार्थ जाहला दृश्य[18]. ।
नाग[19] न शकती तेथें हरिसि[20] कसे कोंडितील हो! ऋश्य[21]? ॥ २२
तुजसीं धनंजयासीं गांठि पडाया नको चि बहु वेळ. ।
पाहीन मीं तयाचा आणि तुझा ही रणांगणीं खेळ. ॥ २३
वधिसील जिष्णुला तरि कर्णा! होसील आमुचा राजा. ।
परि हें दुर्घट इंद्रा, जरि काय सहाय आणिला आजा[22].' ॥ २४

---

१. हे सर्प आहेत अशा भ्रांतीनें. २. ह्या शब्दानें वीरभुज भुजंगांपेक्षां अधिक जड होते, हें सुचविलें आहे. ३. गीति १६ व १७ ह्या 'बीभत्स' रसाचें उदाहरण होत. ४. वज्रानें चूर्ण होऊन पडलेल्या पर्वतांप्रमाणें. ५. जसें कर्मविपाकापुढें बळ न चले, तसें पार्थापुढें बळ (न चले)-असा अन्वय. ६. कर्माचा विपाक ह्मणजे परिणाम त्यापुढें. ७. विमानतुल्य ह्मणजे विमानाइतके उंच. ८. रथ. ९. 'झटती-भट' या टकारप्रासानें भटांची खटपट ध्वनित केली आहे. १०. तीव्रशर (बाण) ज्यांच्याजवळ आहेत असे. 'तीव्रशरीं' असें पाठान्तर. तीव्रशरीं=तीक्ष्ण अशा बाणांनीं. अन्वय-[अर्जुनास पराजित करण्यास] तीव्रशरी भट झटती; परि हा दुर्जय विजय कीं, हारे न. ११. 'विजय' शब्द साभिप्राय आहे. 'दुर्जयत्वा'चें व 'हारे न' याचें कारण 'विजय'शब्दानें सुचविलें आहे. १२. मृगसमूह. १३. या गीतींतील उत्तरार्धं पूर्वार्धाचें कारण आहे. १४. कुरुवीररूपी मेघसमुदायांत. १५. अर्जुन कौरवसैन्यांत दिसेनासा झाला, तेव्हां अर्जुन मेला, अशी खोटीच समज करून घेऊन कौरव आनंदानें जयशब्द करूं लागले-असा भाव. १६. येथें 'त्रों' असा पाठ आहे, व तो अर्थास परिपोषक आहे. १७. बाणसमूहरूप वस्त्र. १८. दृश्य जाहला=दिसला. १९. गज. २०. सिंहाला. २१. मृग, काळवीट. हा काव्यार्थापत्ति अलंकार. २२. इंद्राचा आजा ब्रह्मदेव तो.

तो [1]आव्हानध्वानें अर्जुन संशप्तकांकडे गेला. ।
निजनाशार्थ करिकुळें [2]चीत्कार करूनि [3]सिंहसा नेला. ॥ २५
[4]दुःसह दुर्जय शिरला, [5]अपथ्यशीलांत रोगसा, पार्थ ।
संशप्तकांत; करितो क्रीडा त्यांच्या चि [6]घाततापार्थ.' ॥ २६
कर्ण म्हणे, 'मद्रेशा ! नीट पहा पार्थकेतुचा सेंडा ।
संशप्तकांत झाला मग्न, जसा [7]सागरोदरीं [8]भेंडा. ॥ २७
[9]अज्ञ तपस्वी [10]शिरला [11]विषयांत [12]तपोबलें कधीं न तरे. ।
[13]संशप्तकांत [14]वांचो जरि त्यां होईल निजवधीं [15]नत रे !' ॥ २८
शल्य म्हणे, '[16]वरुणातें कोण समुद्रोदकांत बुडवील ? ।
विझवील [17]तृणें [18]दहना ? [19]अनिलाला करुनि [20]बद्ध तुडवील ? ॥ २९
प्राशील [21]सप्तसागर कोण ? [22]तैसा अर्जुनासि साहेल ।
[23]ऐसा कोण्ही नाहीं. काळ हि पार्थाकडे न पाहेल. ॥ ३०

---

१. निमंत्रणशब्दानें. २. हत्तीचा शब्द. ३. अर्जुन–सिंह; संशप्तक–करिकुळ; आव्हान–चीत्कार–या जोडींत उपमेयोपमानसंबंध आहे. ज्याप्रमाणें गजसमूह चीत्कार करून सिंहास बोलावतो, त्याप्रमाणें संशप्तकांनीं आव्हानदर्शक गर्जना करून अर्जुनास स्वनाशार्थ बोलाविलें–असा भाव. ४. हीं दोन विशेषणें रोग व पार्थ यांस सामान्य आहेत. ५. कुपथ्य करणाऱ्यांत. ६. त्याचा घात ( नाश ) व्हावा व त्यास ताप ( दुःख ) व्हावें या हेतूनें. ७. सागर+उदरीं=समुद्रामध्यें. ८. मातीचा गोळा, हातानें बनविलेली कच्ची वीट. हा शब्द वामनपंडितकृत यथार्थदीपिकेंत आढळतो. ( अध्याय ६।१६२ पहा). ९. अज्ञानी. अन्वयः–विषयांत शिरला (शिरलेला) अज्ञ तपस्वी तपोबळें कधीं न तरे. १०. शिरलेला. ११. रूपरसगंधस्पर्शशब्द हे पंचेंद्रियांचे विषय होत. रूप म्हणजे सुंदर वस्तु, सुंदर स्त्रिया इत्यादि नेत्राचे विषय. असेच इतर इंद्रियांचे विषय समजावे. विषयांत शिरला=इंद्रियवश झाला. १२. तपस्वी जरी झाला तरी विषयाधीन झाला कीं मुक्तीस मुकला–हा भाव. १३. संशप्तकांत शिरलेला अर्जुन विषयांत शिरलेला तपस्वीच होय. तो जसा तरत नाहीं, तसा अर्जुन संशप्तकांतून जिवंत बाहेर पडणार नाहीं. जरि निजवधीं (स्वमरणसमयीं) [अर्जुन] त्यां [संशप्तकांस] नत (शरण) होईल [तर] (तो) संशप्तकांत वांचो (वांचेल)–हा अन्वय. १४. 'वांचे' असें पाठान्तर. १५. शरण. १६. वरुण हा समुद्राधिप आहे. १७. गवतानें. १८. अग्नीला. १९. वायूला. २०. बंधन. २१. लवणसमुद्र, इक्षुसमुद्र, सुरासमुद्र, सर्पिसमुद्र, दधिसमुद्र, क्षीरसमुद्र, स्वच्छजलसमुद्र, हे सप्तसमुद्र होत. २२. वरील दुर्घट कर्में करणारा. २३. अर्जुनास साहणारा.

क्षिति[१] उचलील भुजांहीं; कोपें जाळील जो[२] प्रजा सर्व; ।
पाडील देव भूवरि[३]; जिंकील तयासि एक तो शर्व. ॥ ३१
तो भीमदहन[४], व्हावें[५] ज्यांत शलभ[६] आमुच्या अनीकानीं[७]. ।
अद्यापि असति भरलीं ज्याच्या[८] तीं दुर्वचें[९] मनीं कानीं. ॥ ३२
तो धर्मराज साक्षात् धर्म पहा रे ! पहा महातेजा, ।
'धन्य' म्हणति राजर्षि ब्रह्मर्षि हि सत्पथीं रहाते[१०] ज्या[११]. ॥ ३३
अनिलानलसे[१२] दुर्जय, माद्रीचे पुत्र नकुळ-सहदेव. ।
ते दिसति, ज्यांसि समरीं साहों न समर्थ जिष्णुसह[१३] देव. ॥ ३४
ते द्रौपदेय[१४] दुसरे[१५] पांच युवे[१६] पांडव प्रतापरवी. ।
वरवीरमान्य[१७] शिक्षा[१८] ज्यांची चापश्रुतीमधें[१९] बरवी. ॥ ३५
तो गुरुशिरःसरोरुहकर्तनपरमोग्रकर्मपटुबाहु[२०][२१] ।
द्रुपदकुमार पुरःसर[२२] धृष्टद्युम्न स्वशत्रुशशिराहु[२३]. ॥ ३६
जो[२४] पार्थधनुःश्रुतिवाग्देवीवरपाणिनिष्ठकीर[२५] चि तो ।

---

१. पृथ्वी. २. शिव. ३. पृथ्वीवर. 'पाडी देवां भूवरि' असा पाठभेद. ४. भीमरूप अग्नि. ५. शलभ व्हावें=टोळाप्रमाणें जळून जावें. ६. टोळ. ७. सैन्यांनीं. ८. ज्या भीमाच्या. ज्याच्या मनीं [व] कानीं तीं अद्यापि भरलीं असती–असा अन्वय. तीं 'दुर्वचें' म्हणजे सभेंत दुर्योधनदुःशासनादिक द्रौपदीस वस्त्रहरणप्रसंगीं जे शब्द बोलले ते. ९. दुर्+वच=वाईट भाषणें. १०. राहणारे. ११. ज्या धर्मराजास. १२. वायु आणि अग्नी यांसारखे. १३. इंद्रासहवर्तमान. ज्यांसि समरीं जिष्णुसह [ सर्व ] देव साहों ( सहन करण्यास ) समर्थ न, ते ( नकुळ–सहदेव ) दिसति–असा अन्वय. १४. द्रौपदीचे पुत्र. १५. दुसरे तरुण पांच पांडवच होत–असा भाव. प्रतिविंध्यादि पांचांस उपपांडव असें नांव होतें. १६. तरुण. १७. श्रेष्ठ वीरांस मान्य. १८. शिक्षण. १९. धनुर्वेदांत. २०. गुरु+शिरस्+सरोरुह+कर्तन+परम+उग्र+कर्म+पटु+बाहु=द्रोणाचार्य+शिर+कमळ+छेदन+अतिभयंकर+काम+कुशल+हात=गुरूचें शिरकमळ छेदन करणें हेंच जें अतिशय भयंकर कर्म, त्याविषयीं कुशल आहे भुज ज्याचा असा (धृष्टद्युम्न). २१. प्रायोपविष्ट द्रोणास धृष्टद्युम्नानें मारिलें–ही कथा येथें अनुसंधेय आहे. २२. अग्रेसर, पुढें चालणारा. धृष्टद्युम्न हा पांडवांचा सैन्याधिपति होता, म्हणून त्यास 'पुरःसर' म्हटलें आहे. २३. स्वशत्रुरूप चंद्रास केवळ राहूच असा. २४. सात्यकी. २५. अर्जुनाच्या धनुर्वेदरूप सरस्वतीच्या मुख्य हस्तावर बसलेला रावाच (पोपटाप्रमाणें धनुर्वेद बोलणारा–असा भावार्थ).

दिसतो पहा महात्मा स्वजयार्थ व्यूह सात्यकी रचितो.' ॥ ३७
ऐसें जों कर्णासीं शल्य वदे तों चि शीघ्र त्या सेना ।
मिळती, [1]मारणमरणाहूनि दुजें अधिक ज्यांसि भासेना. ॥ ३८
कुरुपांडवसेनांसीं होतां संग्राम, [2]रामशिष्यमणी, ।
[3]गजयूथावरि हरिसा धांवे; मारी अनेक वीरें[4] रणीं. ॥ ३९
वधिले प्रभद्रकांचे वीर रणीं [5]सप्तसप्तति क्रोधें, ।
[6]दुर्जय [7]संस्कार जसे विषयांचे [8]आत्मतत्वसद्बोधें. ॥ ४०
मग कर्ण [9]पंचविंशति पांड्यभटांचीं [10]शिरोंबुजें छेदी, ।
भेदी नाराचांहीं हृदयीं, मारी सहस्रशा [11]चेदी. ॥ ४१
पांचाळ पांच पहिले, मग दश वधिले रणांत कर्णानें, ।
[12]विषवह्निकुंडतुंडव्याल जसे नखमुखें [13]सुपर्णानें. ॥ ४२
रथचक्ररक्षक तयीं कर्णसुत सुषेण सत्यसेन बळी, ।
वृषसेन [14]पृष्ठगोप्ता, शत्रूंची फोडिती क्षणांत फळी. ॥ ४३
धृष्टद्युम्न शिखंडी सात्यकि [15]यम भीम चेदि पांचाळ, ।
[16]पंच प्रतिविंध्यादिक, अन्य हि कैकेय मत्स्य भूपाळ. ॥ ४४
हे सर्व हि [17]विविधायुधवृष्टि करिति [18]कर्णवीररथरत्नीं, ।
जैसे गिरिवरि वर्षति [19]घन. [20]जनमन [21]अनवनज्ञ चि सपत्नीं. ॥ ४५

---

१. मारावें किंवा मरावें याहून. २. कर्ण. ३. गजसमूहावर. ४. 'वीरमणी' असें पाठांतर. ५. सत्याहत्तर. ६. जसे आत्मतत्वसद्बोधें दुर्जय विषयांचे संस्कार [वधिजे तसे]...–असा अन्वय. दुर्जय ह्मणजे आत्मतत्वसद्बोधाशिवाय कोणाकडून जिंकले जाणार नाहींत असे. ७. विषयांचे संस्कार ह्मणजे स्त्रीसुतधनादिकांच्या सहवासानें त्यांच्याविषयीं जी प्रीति उत्पन्न होते ती. संस्कार ह्मणजे इंद्रियजन्यज्ञानामुळें मनावर जो परिणाम होतो तो. ८. जीवात्मा व परमात्मा यांच्या ऐक्यरूपी तत्वाच्या बोधानें. ९. पंचवीस. १०. शिररूपी कमळें. ११. चेदिदेशोत्पन्न वीर. १२. विषरूप अग्नीचें कुंड हेंच ज्यांचें तोंड असे सर्प. १३. गरुडानें. १४. पाठिराखा. १५. नकुळ व सहदेव. १६. 'पांच' असें पाठान्तर. १७. अनेक अस्त्रांचा पाऊस. १८. कर्णवीराच्या उत्तम रथावर. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'कर्णवीररथ-रक्षीं' असा पाठ आहे. पण तो हस्तदोष असावा, असें वाटतें. रक्ष=रक्षक. १९. मेघ. २०. सामान्य लोकांचें मन (चित्तवृत्ति). जनमन सपत्नीं (सापत्न संबंधांत किंवा शत्रूंचे ठिकाणीं अनवनज्ञ–(अन्+अवन+ज्ञ)च्चि (रक्षण करणें न जाणणारें ह्मणजे नाश करण्यास तयार असें असतें)–असा सान्वयार्थ. हा **अर्थान्तरन्यास** आहे. २१. अन्+अवन+ज्ञ=नाहीं+रक्षण+जाणणारें.

तेव्हां सुषेण तोडी भीमाचें चाप बाप[1] रक्षाया, ।
विंधी सप्तशरानीं मर्मस्थानीं च युद्धदक्षा या[2]. ॥ ४६
भीम इतर धनु सज्जुनि, खंडुनि धनु, मार्गणांचिया दशकें ।
तोडी[3] त्यासि[4]. भिडावें पक्षबळें विपतिसीं[5] कसें मशकें[6]? ॥ ४७
कर्णाप्रति त्रिसप्तति[7] बाणांहीं भीम तत्क्षणीं ताडी; ।
आश्चर्यांत प्रेक्षकसुरमुनिगंधर्वमानसें[8] पाडी. ॥ ४८
सोडी दुःसह तापद शर शारदभानुभानुसे[9], नाचे, ।
तो भीम प्राण हरी कर्णप्रियसूनुभानुसेनाचे[10]. ॥ ४९
चापें खंडुनि भीमें कृप कृतवर्मा हि पीडिला रागें, ।
दुःशासनासि शासन केलें बाणत्रयें महाभागें[11]. ॥ ५०
शकुनि[12]उलूकपतत्री दाविति बळ, नुरवि भीम[13]पत्री तें[14], ।
त्यजि न पराभूति[15] खळा, जसि अनसूया[16] त्यजी न अत्रीतें[17][18]. ॥ ५१

---

१. कर्ण. २. भीमास. ३. मारी. ४. सुषेणासि. ५. वि+पति=पक्षि+राजा=गरुड. ६. घुंगुरट्यानें. ७. त्र्याहात्तर. ८. युद्ध पाहाणारे जे देव, मुनि, गंधर्व त्यांचीं मनें. ९. शरदृतूंतील सूर्याच्या किरणासारखे. भानु=सूर्य. भानु=किरण. आश्विन व कार्तिक या दोन महिन्यांच्या काळास 'शरदृतु' ह्मणतात. वर्षाकाळानंतर शरद् येत असल्यामुळें सूर्य मेघमंडलाच्या आच्छादनापासून मुक्त होऊन देदीप्यमान होतो, ह्मणून शारदभानूच्या किरणाची उपमा. १०. कर्णाचा प्रिय पुत्र जो भानुसेन त्याचे. ११. हें भीमाचें विशेषण. १२. शकुनि व उलूक नांवाचे वीर हेच पक्षी; किंवा शकुनि हाच कोणी उलूक ह्मणजे घुबडपक्षी. पतत्रिन्=पक्षी. १३. भीम हा ससाणापक्षी. १४. बळ. १५. पराभूति खळा न त्यजि=दुष्टाचा नेहमीं पराभव होतोच होतो. पराजयास अनसूयेची उपमा द्यावयाची असल्यामुळें पंतांनीं 'पराभव' हा पुल्लिंगी शब्द न वापरतां मुद्दाम 'पराभूति' हा स्त्रीलिंगी शब्द वापरला आहे. १६. अनसूया ही कर्दमऋषि व देवहूति यांची कन्या ह्मणजे कपिल महर्षींची सख्खी बहीण व अत्रिऋषीची पत्नी. ही परम पतिव्रता व तपस्विनी होती. पतीस सोडून कधींही राहत नसे ह्मणून उपमाप्रसंग. १७. ब्रह्ममानसपुत्र. हा एक गोत्रकर्ता महर्षि आहे. १८. यांत **'विकस्वर'** नामक अलंकार झाला आहे. जेथें कांहीं एक विशेषार्थाच्या समर्थनासाठीं सामान्य अर्थ (विधान) सांगून त्या सामान्यार्थाच्या प्रतिपादनासाठीं पुनः उपमा दिली जाते, अथवा अर्थांतरन्यासाच्या योगें अन्य विशेष अर्थ सांगितला असतो, तेथें **'विकस्वर'** अलंकार होतो. या अलंकारांत विशेषार्थ, सामान्यार्थ आणि पुनः अन्यविशेषार्थ अशीं तीन विधानें असतात. प्रस्तुत गीतींत (१) पूर्वार्ध, (२) तृतीय चरण व (३) चतुर्थ चरण, हीं तीन वाक्यें यथानुक्रम विशेषार्थ, सामान्यार्थ आणि अन्यविशेषार्थ यांच्या स्थानीं आहेत असें समजावें.

भीम 'सुषेण[1] ! हतोऽसि[2]; स्थैर्यं[3] कुरु' हें वदोनि शर सोडी, ।
तों कर्ण तूर्ण[4] पुत्रप्राणत्राणार्थ[5] बाण तो तोडी. ॥ ५२
भीमें पाठविला शर दुसरा हि सुषेणजीवनाचमना[6], ।
कर्ण तयास हि खंडी, ये मार्गण[7]फलविघात हाच मना. ॥ ५३
वैकर्तन[8] त्रिसंतति[9] बाणांहीं त्या वृकोदरासि रणीं ।
व्यापी, अंचलासि[10] जसा ग्रीष्मीं[11] रवि तापदायकीं[12] किरणीं. ॥ ५४
इतुक्यांत सुषेण बळी सहसा[13] सजुनि स्वचाप नकुळाला ।
हाणी तीव्रशरानीं, जैसा विषमत्त[14] साप नकुळाला[15]. ॥ ५५
कर्णसुताचें प्रेक्षकजनलोचन[16]तृषितभृंगतोयजसें[17], ।
युद्ध नकुळसहदेवांसह, देवांदानवांत होय जसें. ॥ ५६
सात्यकि वृषसेनाच्या सूतासि वधी, धनुष्य ही मोडी[18], ।
घोडीं च्यारी मारी, एका चि शरें ध्वजासि ही तोडी. ॥ ५७
बाणानीं उर ताडी, मूर्च्छित पाडी मुहूर्त[19] वृषसेना, ।
भी सात्यकिला कौरवसेना, व्याघ्रासि जेविं वृष[20]-सेना. ॥ ५८
सावध होतां धांवे[21] सात्यकिवरि धरुनि शीघ्र तरवारी, ।
परि खड्गचर्म[22] तोडुनि शैनेय[23] तयासि शीघ्रतर[24] वारी. ॥ ५९

---

१. हे सुषेणा. २. मेलास बघ. ३. स्थैर्यं कुरु=धीर धरून उभा रहा. ४. शीघ्र. ५. पुत्राचे प्राण वांचविण्याकरितां. ६. सुषेणाचा जीव ह्मणजे प्राण, आचमना ह्मणजे पिण्याकरितां. ७. मार्गण=बाण किंवा भिक्षुक. पुत्रप्राणयाचक जो बाण त्याला भग्नमनोरथ करून टाकिला. कर्णानें आजपर्यंत दुसऱ्या कोणत्याही प्रसंगीं याचकास विन्मुख दवडिलें नव्हतें, परंतु या खेपेस तसें करणेंच युक्त वाटलें. पंतांनीं या श्लेषानें अर्थचमत्कृतीचीही बहार केली आहे. मना ये=मनास ये, पसंत पडे. ८. कर्ण. ९. त्र्याहात्तर. १०. पर्वतास. ११. ज्येष्ठ व आषाढ या महिन्यांस ग्रीष्म ह्मणतात. १२. येथें 'तापदावकीं'—असा पाठ आहे. त्याचा अर्थः—तापद व प्रज्वलित अशा. १३. एकाएकीं. १४. विषानें मत्त झालेला. १५. मुंगुसाला. १६. पहाणाऱ्या लोकांचीं नेत्रें जीं, तेच तान्हेलेले भ्रमर त्यांस कमळसे. हें 'युद्धा'चें विशेषण. १७. या चरणांत 'तृ' व 'भृ' या अक्षरांच्या मागचीं अक्षरें गुरु झालीं नाहींत. १८. या व पुढच्या दोन चरणांत मिळून 'मोडी' 'घोडी' 'तोडी' 'ताडी' व 'पाडी' असा **अनुप्रास**चमत्कार आहे. १९. दोन घटका, किंवा अठ्ठेचाळीस मिनिटांच्या काळास मुहूर्त ह्मणतात. २०. बैलांचा समुदाय. २१. ह्याचा कर्ता 'वृषसेन'. २२. तरवार आणि ढाल. २३. सात्यकी. २४. फार लौकर.

विरथा[1] वृषसेनातें दुःशासन आपुल्या रथावरि घे, ।
मागें पळे जिजीविषु[2], बाहुबळें क्षुब्धसागरीं[3] न रिघे. ॥ ६०
अन्यरथीं बैसे, ये वृषसेन पुन्हां संजोनि[4] नाग[5] जसा; ।
मर्दी पांडवसैन्या, चूर्ण करी, वारिरुहवना[6] गजसा. ॥ ६१
टाकी शर त्रिसप्तति[7] कृष्णापुत्रांवरि[8] व्यथाकारी[9]; ।
शर षष्टि[10] भीमसेना, सहदेवाला हि पांच शर मारी. ॥ ६२
शर सप्त शतानीका[11], सात्यकिला पांच, तीस[12] नकुळाला, ।
अर्पी शिखंडिला दश, शत धर्माला बुधालिबकुळाला[13]. ॥ ६३
यापरि[14] अरिवरि[15] करि बरि[16] खरतरशरवृष्टि, दृष्टि हरि[17] त्यांची[18]; ।
रक्षी पृष्ठ[19] पित्याचें[20], रीति मिरवि शुद्ध-युद्ध-करित्यांची[21]. ॥ ६४
दुःशासनासि तेव्हां सात्यकि करि विरथ; आणि आभाळीं ।
केतू[22] तीन तसे, शर तीन चि रोवी तयाचिया[23] भाळीं. ॥ ६५
अन्यरथावरि बैसुनि आला केला जऱ्ही पराभूत[24], ।
दुःशासन न वृषाला सोडी, निधिला[25] जसा बरा[26] भूत[27]. ॥ ६६

---

१. ज्याला रथ नाहीं अशा. २. जीवसंरक्षण होण्याविषयीं इच्छिणारा असा. ३. खवळलेल्या समुद्रांत=भयंकर युद्धांत. प्रस्तुत स्थलीं फक्त उपमानाचाच उल्लेख केला आहे. ४. युद्धास सिद्ध होऊन. ५. हत्ती, किंवा सर्प. ६. कमलाच्या वनाला. ७. त्र्याहात्तर. ८. उपपांडवांवर. ९. इजा करणारे. ['शरांचें' विशेषण.] १०. साठ. ११. नकुलापासून द्रौपदीस झालेला मुलगा. १२. 'तीन' असें पाठांतर. १३. बुध(सज्जन)रूप भ्रमरांस बकुळीच्या पुष्पांसारखा जो त्याला (धर्माला). १४. यापरि (याप्रमाणें) [वृषसेन] अरिवरि (शत्रूवर) बरि (चांगली) खरतरशरवृष्टि (कर्तृपद) (फार तीक्ष्ण बाणांचा पाऊस) करि [व] त्यांची बरि (बरी, चांगली) दृष्टि हरि—असा अन्वय. १५. 'अवार' (?) असें पाठांतर. १६. 'वरि' असाही पाठ आहे. १७. या अर्धांत 'र'काराची आठ वेळां आवृत्ति झाली आहे. १८. कृष्णापुत्रादिकांची. १९. पिछाडी. मागच्या बाजूनें कोणी येणार नाहीं अशा रीतीनें रक्षण करी—असा भाव. २०. कर्णाचें. २१. करणारांची. २२. धूमकेतु, शेंडेनक्षत्र. २३. दुःशासनाच्या. २४. पराभवयुक्त. २५. द्रव्याला. २६. मोठें. २७. जमिनींत पुरून ठेवलेल्या धनाजवळ, ज्याचें धन असेल तो भूत होऊन राहतो व इतरांस त्या धनाजवळ येऊं देत नाहीं, अशी समजूत आहे, त्यास उद्देशून ही उपमा.

तेव्हां भीम शिखंडी [1]यम धृष्टद्युम्न सात्यकी धर्म ।
द्रौपद्यात्मज अन्य हि ताडिति कर्णासि लक्षुनी [2]मर्म. ॥ ६७
[3]एकामें चि [4]अनेकप्राणहरद्वेषिशरमहावृष्टि ।
[5]कर्णानिलें उडविली, [6]रक्षामंत्रें जसी [7]कुजनदृष्टि. ॥ ६८
[8]दशशतबाणानीं तो एकैकातें रणांगणीं हाणी, ।
न करी च पंक्ति[9]भेद श्रीकर्णाचा [10]उदारवरपाणी. ॥ ६९
अरि एक बाण हाणी, तों हाणी कर्ण शर तया तिपट, ।
[11]निपट [12]प्रत्युपकृतिपटु [13]झांकी रिपु पसरुनि [14]स्वहेतिपट. ॥ ७०
[15]काढी, जोडी, ओढी, सोडी शर कर्ण, [16]लाघवास्तव तें ।
न दिसे, दिसे [17]शरासनमंडल [18]हतशत्रुबल हि [19]त्यां[20]भंवतें. ॥ ७१
[21]वाडववह्नि [22]अबिंधन, [23]मग काय [24]अपांपतींत पोसेना ? ।

१. जुळे भाऊ (नकुळ व सहदेव). २. नाजूक जागा. ३. एकदम (हा शब्द मागें अध्याय १९।२१ मध्यें आला आहे). ४. अनेक+प्राण+हर+द्वेषि+शर+महा+वृष्टि=पुष्कळ+प्राण+हरण करणारे+शत्रु+बाण+मोठा+पाऊस=शत्रूंच्या प्राणांचा नाश करणाऱ्या अनेक बाणांचा मोठा पाऊस. ५. कर्णरूप वायूनें. ६. रामरक्षादि मंत्रानें. ७. दुर्जनाच्या दृष्टीमुळें मनुष्यास हानि होते (दृष्ट लागते) अशी समजूत आहे. ८. हजार बाणांनीं. ९. पंक्तिभेद ह्मणजे एकास एका तऱ्हेनें व दुसऱ्यास दुसऱ्या तऱ्हेनें वागविणें. १०. फार उदार असा हात. गीति ६९ व ७० ह्या किंचित् विनोदात्मक आहेत. ११. केवळ. १२. प्रत्युपकाराविषयीं कुशल. १३. अन्वयः—निपट प्रत्युपकृतिपटु [ कर्ण ] ( केवळ परोपकारपरायण असा कर्ण ) स्वहेतिपट पसरुनि रिपु झांकी—हीं वाक्यें औपरोधिक आहेत. १४. आपलें शस्त्ररूपी (बाणरूपी) वस्त्र. १५. या गीतींतील शब्दांची मांडणी, अनुप्रासचमत्कार व स्वभावोक्तिवर्णन हीं अनुपमेय आहेत. १६. चपलतेस्तव. या सर्व क्रिया इतक्या लौकर घडतात कीं, त्या लोकांस दिसत नाहींत व त्यांचा परिणाम मात्र दिसतो. 'कदा नेणों वोढी शरधि-तुनि काढी शर कदा' इत्यादि रघुनाथपंडितकृत नलवर्णनसादृश्य येथें लक्षांत घेण्यासारखें आहे. १७. बाण व धनुष्य यांच्या चक्राकार राशी (समूह). १८. मेलेल्या शत्रूंचें सैन्य. १९. त्यांभंवतें ह्मणजे शरासनाच्या भंवतें. या गीतींत **'अत्यन्तातिशयोक्ति'** नामक अलंकार आहे. जेथें कारण व कार्य यांचा व्युत्क्रम होतो, ह्मणजे अगोदर कार्य होऊन मग कारण झालें, असें वर्णिलें असतें तेथें **अत्यन्तातिशयोक्ति** होते. २०. वृत्ताच्या सोईकरितां 'भोंवतें' हा शब्द 'भंवतें' असा उच्चारिला जातो. २१. समुद्रांतील अग्नि. २२. अप्+इंधन=उदकच आहे ज्याचें इंधन (सर्पण) तो. २३. अन्वय व अर्थः—वाडववन्हि (समुद्राग्नि, वडवानल) अबिंधन (पाणीच सर्पण आहे ज्यास असा, पाण्याच्या सहायानेंच वृद्धिंगत होणारा) [होय]; मग [तो वाडववन्हि] अपांपतींत (समुद्रांत) पोसेना काय ? (पोसला जातोच—असा भाव.) महिस (पृथ्वीस मात्र) [तो वाडववह्नि] क्षण[हि] सोसेना. २४. समुद्रांत.

सोसेना[1] महि स[2] क्षण. तापवि तेजस्विवर्य तो[3] सेना[4]. ॥ ७२
व्यूहीं न शिरों द्यावा म्हणउनि होतीं बैलें उभीं दाट, ।
परि वणव्यासि तृणें[5]सीं, कटकें कर्णासि ओपिती[6] वाट. ॥ ७३
सायकघनें[7] खचति रथ, दवदहनें[8] जळति कुंजें[9] रानीं कीं[10], ।
नग अशनिनें[11] विखरिले, जइं शिरला कर्ण कुंजरानीकीं[12]. ॥ ७४
वधिले चेदींचे रथ तीनशत क्रूरविक्रमें कर्णें, ।
शस्त्रें जसीं विखरिलीं न तसीं वर्षांत[13] ही घनें[14] अर्णें[15]. ॥ ७५
हरि[16] करिपतिवरि[17] तैसा धर्मावरि कर्ण धांवला; तंव ते ।
सात्यकिभीमशिखंडिप्रमुख सुभट ठाकले नृपाभवते. ॥ ७६
पांडवभट धर्मातें, कौरवभट रक्षिती स्वबळपातें[18], ।
दापिति अन्योन्य बळें वीर, जसे व्याघ्र धेनुकळपातें. ॥ ७७
वीरांसि कर्णमार्गण, जैसे मल्लांसि मल्ल लोळविती, ।
प्रियसखसे[19] यमनगरीप्रति रक्तें रंगवूनि बोळविती. ॥ ७८
वीर शतसहस्रायुत वधिले कर्णें, तथापि कटकांहीं ।
तो कर्ण रोधिला[20] चि, न जावूं दिधला नृपानिकट[21] कांहीं. ॥ ७९
मंत्रौषधिक्रियातिग[22] रोग जऱ्ही रोधिला तऱ्ही खवळे, ।

---

१. 'सोसेना महि न क्षण' असा रा० पराडकर यांच्या प्रतींत पाठ आहे, पण तो अपपाठ दिसतो. २. या तिन्ही चरणांचा प्रस्तुत कथानकाशीं असा संबंध आहे कीं, ज्याप्रमाणें वडवानल समुद्रांत वृद्धिंगत होतो, त्याप्रमाणें कर्णाची शक्ति युद्धांत वृद्धिंगत होते, समुद्राचें पाणी ज्याप्रमाणें वडवानलास प्रज्वलित करण्यास कारणीभूत होतें, त्याप्रमाणें युद्ध कर्णाच्या शौर्यास वाढवितें, पण ज्याप्रमाणें पृथ्वी वडवानलास धारण करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें पांडवसैनिक कर्णशौर्य सहन करण्यास असमर्थ झाले—असा भाव. ३. कर्ण. ४. सेना. ५. गवताप्रमाणें. ६. 'अर्पिती'—असा पाठभेद. ७. शररूप घणानें. ८. अरण्याग्नीनें. ९. झुडपें, वेलांच्या जाळ्या. १०. 'कीं' शब्दानें प्रस्तुत स्थलीं 'जणों काय' असा अर्थबोध होतो. ११. वज्रानें. नग=पर्वत. ह्या गीतींत **असंगति** व **अतिशयोक्ति** ह्या अलंकारांचा संकर आहे. १२. गजसमुदायांत. १३. पावसाळ्यांत. १४. मेघानें. १५. उदकें. १६. सिंह. १७. हत्तींच्या नायकावर. १८. स्व+बल+प=आपला सेनापति जो कर्ण, त्यातें. १९. प्रियमित्राप्रमाणें. २०. आडवून धरिला. २१. धर्माजवळ. २२. मंत्र+ओषधि+क्रिया+अतिग=मंत्र व औषधिक्रिया यांचें उल्लंघन करणारा.

तैसा कर्ण महाबल रोधूं म्हणती तथापि तो न[1] वळे. ॥ ८०
पांचाळपांडुकैकयवीरानीं[2] रोधिला चमूपाल[3], ।
लंघावया शकेना त्यांसि[4] जसा ब्रह्मविज्जना[5] काल. ॥ ८१
निर्जबलरुद्धवृषाप्रति[6] धर्म वदे रुक्ष[7]; तें तसें चि घडे; ।
पंजररुद्धव्याघ्राप्रति[8] लोक विशंक मारितात खडे[9]; ॥ ८२
धर्म म्हणे, 'रे कर्णा ! राधेया ! भारताश्रितापसदा[10] ! ।
जोडिसि निजधर्माश्रयनयलयकर[11] दुर्मतें चि पाप सदा. ॥ ८३
स्पर्धा धनंजयासीं करिसी, आम्हासि पीडिसी, छळिसी, ।
मंद[12]–सुयोधनदुर्मतिविषवल्लीसेकमूळ[13] तूं कळिसी[14]. ॥ ८४

---

१. आटोक्यांत न येई. २. पांचाळदेशचे, पांडवांचे व केकय देशचे सैनिक. इंद्रप्रस्थाच्या (दिल्लीच्या) पूर्वेस एक व पश्चिमेस एक असे दोन पांचाल देश आहेत. केकयदेश, आग्नेय कोसलाच्या उत्तरेस आहे. याची राजधानी गिरिव्रजनगर. ३. सेनापति, कर्ण. ४. त्या सैन्यांस. ५. ब्रह्मवित्+जन=ब्रह्म जाणणारे+लोक=परब्रह्म किंवा परतत्त्व याचें ज्ञान ज्यांस झालें आहे, त्या लोकांस. समाधींत निमग्न होऊन ब्रह्माशीं तादात्म्य पावलेल्या जनांस मृत्यु येत नाहीं, अशी समजूत आहे. तीस उद्देशून हें वाक्य आहे. ६. आपल्या सैन्यानें अडविलेल्या कर्णास. ७. मनाला ताप देणारे शब्द. ८. पिंजऱ्यांत अडकलेल्या वाघाप्रत. ९. 'सांपळयामध्यें व्याघ्र सांपडे । बायकामुळें मारिती खडे ॥' ही तुकोक्ति पंतांनीं या गीतींत आणिली आहे. या गीतींत 'विकस्वर' नामक अलंकार झाला आहे. 'धर्म रुक्ष वदे' ही प्रथम उक्ति. हिच्यावरून सुचलेली सामान्योक्ति 'तें तसें चि घडे' ( हा जो प्रकार घडला तो नेहमीं पाहण्यांत येतो. सर्वसामान्य आहे–असा भाव) ही होय. व या सामान्योक्तीच्या समर्थनार्थ गीतीच्या उत्तरार्धात विशेषोक्ति दिलेली आहे. १०. भारत+आश्रित+अपसद=भरतकुलोत्पन्न+आश्रयास राहिलेले+नीच= भरतकुलोत्पन्न दुर्योधनाच्या आश्रित जनांतील नीचा ! ११. स्वधर्मास ( तुझा जो सूतधर्म त्यास ) अनुसरून असणारी जी नीति तिचा नाश करणाऱ्या. (हें 'दुर्मति' किंवा 'दुर्मत' यांचें विशेषण समजावें.) धर्माच्या म्हणण्याचा भाव असा कीं, कर्ण सूतपुत्र असल्यामुळें त्यानें सूताचें कर्म करावें हीच त्याची नीति. ती सोडून तो युद्धकर्म करतो, म्हणून तो स्वधर्मापासून भ्रष्ट झाला. प्रस्तुत गीतींत ( १ )'राधेया !' ( सूतस्त्री जी राधा तिचा मुलगा), (२) 'भारताश्रितापसदा' यांतील 'आश्रित' शब्द, (३) व 'निजधर्माश्रयनयलयकर' या शब्दांनीं धर्मानें कर्णास तूं नीच सूतकुलांतला आहेस, आम्हां क्षत्रियांबरोबर लढण्याची तुझी मुळींच योग्यता नाहीं, असें सुचविलें आहे. हीं सर्व विशेष्यविशेषणें साभिप्राय आहेत. तस्मात् हे परिकर व परिकरांकुरालंकार. १२. कर्तव्याकर्तव्यज्ञानविहीन. हें गीत्यर्ध सुरेख परंपरितरूपकाचें उदाहरण होय. १३. मूर्ख सुयोधनदुर्मतिरूप जी विषाची वेल, तिचें सिंचन करण्याविषयीं कारण. १४. कळशी, लहान घागर.

दावीं सबल पराक्रम, पौरुष[1] पाहों, रहा उभा नीट; ।
युद्धश्रद्धा हरितों आतां चि रणांगणांत; हो धीट.' ॥ ८५
ऐसें वदोनि धर्में शरदशकें[2] कर्ण ताडिला कोपें; ।
तितुक्यां चि मार्गणांहीं धर्म हि कर्णें कृ[3]ताईतालोपें. ॥ ८६
हांसे[4] कर्ण, अवगणी; ते युद्धीं उमजतां[5] निजावज्ञा, ।
क्षणभरि ही साहेना त्या धर्मात्म्या हि सर्वभावज्ञा. ॥ ८७
मग जो[6] तेजें पविरविसम[7], समयीं शापसापसा[8] परहा[9], ।
शर सोडिला नृपें, तो[10] गर्जे, जाणों म्हणे 'सपाप रहा.' ॥ ८८
तो बाण सव्यपार्श्वी[11] कर्णाच्या लागला जसा गोळी[12], ।
मूर्च्छित पडतां कंठीं तत्पंचप्राण जाहले गोळां[13]. ॥ ८९

---

१. पुरुषार्थ. युद्धश्रद्धा=युद्धांत खात्रीनें यश मिळेल अशी समजूत. २. दहा शरांनीं. ३. कृत+अर्हता+अलोपें. धर्मानें आपणावर बाण सोडून दिलेला जो मोठेपणा, त्याचा लोप न करितां म्हणजे तो सहून, कर्णानेंही तितकेच बाण धर्मावर सोडिले व ऋणमुक्त झाला—असा भाव. ४. धर्मानें बाण सोडितांच कर्णानेंही शरवृष्टि केली व हांसून धर्माचा उपहास केला. कर्ण हांसे [व] अवगणी. [अशा प्रकारची] ते युद्धीं (युद्धांत होत असलेली) निजावज्ञा उमजतां त्या सर्वभावज्ञा धर्मात्म्या हि क्षणभरि ही साहेना'—असा अन्वय. 'साहेना' म्हणजे सहन होईना. त्या युद्धांत कर्णाच्या मनांत धर्माबद्दल अवज्ञा उत्पन्न झाली, तो धर्मास हांसूं लागला, व तिरस्कार करूं लागला. सर्वभावज्ञ (मनांतील सर्व भाव मुखविकारावरून ओळखणारा) अशा धर्मराजाच्या लक्षांत त्या आपल्या अवज्ञा आल्यामुळें अर्थातच त्या कुचेष्टा त्यास क्षणभर देखील सहन झाल्या नाहींत—असा भाव. ५. लक्षांत येतांच, समजतांच. 'उपजतां' असें पाठांतर. ६. जो तेजें पवि (वज्र) [व] रवि (सूर्य) सम, समयीं (आवश्यक प्रसंगीं) शाप [व] साप [यांसारखा] परहा (शत्रूस मारणारा) [असा] शर नृपें (धर्में) सोडिला—असा सान्वयार्थ. प्रस्तुत स्थलीं एकेक उपमेयास दोन दोन उपमानें दिलेलीं आहेत, म्हणून ही **द्वंद्वोपमा**. 'शापसापसा परहा' हा **समासगतमालोपमे**चा भेद समजावा. ७. या गीतींतील 'पवि–रवि', 'सम–समयीं', हा कर्णानंदप्रद **अनुप्रास**चमत्कार वर्णनीय आहे. म्हणजे या चरणांत कवीनें शब्दार्थालंकार सुरेख साधिले आहेत. ८. 'शापसापसा' हा संस्कृतप्राकृतमिश्रित समास चिंत्य आहे. ९. शत्रूस किंवा इतरांस मारणारा. ('शराचें विशेषण). १०. तो (शर) गर्जे (ध्वनि करि) जाणों (तो) [कर्णास] म्हणे [ तूं ] सपाप (आपल्या पापांसह) रहा (विश्रांति पाव. तूं आपल्या पापांसह परलोकास जा—असा भाव). ११. डाव्या बाजूस (बरगडींत). १२. तोफेचा गोळा. १३. एकत्र.

कर्णाचें तनुधनुसह[1] जेव्हां बळ अतुल धैर्य, रक्त, पळे, ।
प्रियजननयनापासुनि अश्रु हि,[2] झाले चि बाष्परुद्ध[3] गळे.[4] ॥ ९०
कौरवकटकीं[5] 'हा ! हा !' पांडवसैन्यांत सिंहनाद रणीं, ।
वृष सावधान झाला क्रुद्ध हि[6] निजशक्तिच्या अनादरणीं.[7] ॥ ९१

---

## अध्याय एकतिसावा.[8]

### ( कर्णधर्मयुद्ध. )

धर्म वधावा ऐसें चित्तीं चिंतूनि, चाप आकर्ण[9] ।
ओढी भास्करतनुजनु[10] मनुजवर कृती[11] महामना[12] कर्ण. ॥ १
सोडी बाणगण, रणीं झांकी धर्मा, दिवाकरा घनसा; ।
धर्मशरीरीं जडले शर, कंटक[13] जेंवि सर्वथा पनसा.[14] ॥ २
पांचाल्य[15] चंद्रदेव प्रबल, कुशल दंडधार दुसरा, हे,[16] ।
प्रख्यात चक्ररक्षक[17] धर्माचे, कर्ण त्यांकडे पाहे. ॥ ३
धर्माच्या दों पार्श्वीं दोघे, पूर्णेंदुच्या पुनर्वसुसे,[18] ।
शोभत होते शक्रोभयमार्गीं[19] संगरीं सखे वसुसे.[20] ॥ ४

---

१. शरीर व धनुष्य यांबरोबर. हें **सहोक्ति** अलंकाराचें उदाहरण आहे, असें वाटण्याचा संभव आहे. पण ही **स्वभावोक्ति** आहे. **सहोक्तीची** किंचित छटा मारीत आहे येवढेंच. २. अश्रु हि गळति—असा अन्वय, ३. गहिंवरानें दाटले. ४. कंठ. ५. **कौरवसैन्यांत.** ६. 'क्रुद्ध हि झाला'—असा अन्वय. ७. अशा रीतीनें **धर्मराजानें** व त्याच्या सैन्यानें आपल्या शक्तीचा अपमान केला म्हणून क्रुद्ध झाला—असा अर्थ. ८. यांत मुळांतील ४९ व्या अध्यायांतील २३ व्या श्लोकापासून ८४ व्या श्लोकापर्यंतचा कथाभाग आला आहे. ९. कानापर्यंत. फार जोरानें—असा भाव. १०. सूर्याच्या शरीरापासून झालेला. सूर्यपुत्र. ११. कुशल. १२. उदार. १३. कांटे. १४. फणसास. १५. **पांचाल** देशाचा. १६. दोघे. १७. चक्ररक्षक म्हणजे चाकांचें रक्षक करणारे. रथी दुसऱ्याशीं युद्ध करण्यांत गुंतला असतांना त्याच्या रथाचें रक्षण करणें हें यांचें काम असे. १८. भचक्रांतील सप्तम नक्षत्र. यांत एकंदर चार तारे असतात. पौर्णिमेच्या दिवशीं ज्या महिन्यांत चंद्र या नक्षत्राजवळ येतो, त्या रात्रीची शोभा खरोखर अवर्णनीय असल्यामुळें ही पंतांची उपमा ज्योतिर्विदांस व प्राकृत जनांसही पसंत पडेल, यांत संशय नाहीं. १९. शक्र+उभय+मार्गीं=इंद्राच्या दोहों बाजूंस. २०. अष्ट वसूंसारखे. वसु आठ आहेत. त्यांपैकीं चार इंद्राच्या एके बाजूस व चार दुसऱ्या बाजूस असे.

ते दोघे ही कर्णें वधिले तेव्हां पृथासुत क्षोभे, ।
कनक-विकृत[1] शर सोडी दुःसहतेजा[2] खरांशुसा[3] शोभे. ॥ ५
त्या कर्णाच्या आंगीं खोवी आपुंख[4] धर्म शर तीस, ।
परि कर्णशक्ति न दमे; कलहीं[5] कुलटा[6] अजिंक[7] गरतीस[8]. ॥ ६
शर ओपिले नृपाळें त्या कर्णा वीरसत्तमा नवती[9], ।
शल्यास हि त्रिसप्तति[10], तैं साधुगुणज्ञ[11] लोक मानवती[12]. ॥ ७
कर्णाचे सुत दोघे सुषेण अणि सत्यसेन जे त्यांतें, ।
नृप तीं तीं[13] विशिखानीं[14] ताडी प्रबलारिच्या[15] हि जेत्यांतें[16]. ॥ ८
कर्णाच्या गोप्त्यांतें[17] प्रत्येक शरत्रयें[18] चि तो हाणी, ।
तों तों हांसे गर्वें धर्माला कर्ण सद्धनुष्पाणी[19]. ॥ ९
आधीं भल्लें भेदी, षष्टिशरांहीं[20] मग क्षमापाळा[21], ।
गर्जे वृष; तों चि मिळे पांडूंचा त्या सभोंवता पौळा[22]. ॥ १०
धृष्टद्युम्न, शिखंडी, सात्यकि, यम, भीम, चेकितान कृती[23], ।
शिशुपाळसुत युयुत्सु हि, पांडव द्रुपदात्मजात्मज[24] हि सुकृती[25]; ॥ ११
कारूष, मत्स्य, कैकय, कोशल, काशि, प्रभद्रक क्षुब्ध[26], ।
झाले[27] सागरसे; वृषनिधनीं[28] हि, धनीं दरिद्रसे, लुब्ध[29]. ॥ १२
पांचाल्यवीर जनमेजयनामा, हे[30] समस्त ही योध, ।

---

१. सुवर्णानें विकार पावलेला (सुवर्णमय). २. दुःसह आहे तेज ज्याचें असा. (हें 'पृथासुता'चें विशेषण). ३. सूर्याप्रमाणें. ४. मुळापर्यंत. ५. ही **उपमा** कांहीं अंशीं नीचोपमा आहे, असें म्हटल्यास चालेल. ६. व्यभिचारिणी. ७. अजिक्य. ८. सभ्य स्त्रियेस, गृहिणीस. 'गरती' शब्द 'गृहरता' ह्या शब्दापासून निघाला असें कित्येकांचें म्हणणें आहे. येथें **दृष्टांत** नामक अलंकार आहे. ९. नव्वद. १०. त्र्याहात्तर. ११. साधूंच्या गुणांस ओळखणारे; किंवा साधु व गुणज्ञ—असा अर्थ करावा. १२. संतुष्ट होती. १३. तीन तीन. १४. बाणांनीं. १५. प्रबळ शत्रूच्या. १६. जिंकणारे जे त्यांतें. १७. रक्षणकर्त्यांतें. १८. तीन शरांनीं. १९. उत्तम धनुष्य आहे हातीं ज्याच्या असा. २०. साठ शरांनीं. २१. धर्मास. २२. झुंड. २३. सामर्थ्यवान् २४. द्रौपदीचे पुत्र. २५. पुण्यवान्. २६. क्रोधयुक्त. २७. सागरसे क्षुब्ध झाले. दरिद्रसे लुब्ध झाले—असा अन्वय. २८. कर्णाच्या मरणाविषयीं. २९. लोभी, अभिलाषशील. ३०. वरील गीतींत ज्यांचा उल्लेख आहे, ते वीर.

क्रोधन[1] वृषासि हाणिति, जाणों[2] भट मत्तवृषभ तो[3] रोध[4]. ॥ १३
नाराच[5] वत्सदंत[5] क्षुरप्र[5] नालीक[5] दुःसह विपाट[5], ।
मार्गण[5] वराह[5] कर्ण[3] हि वर्षति, न दिसे चि रवि असे दाट[6]. ॥ १४
त्या समयीं ब्रह्मास्त्रें[7] सर्वांसि पराभवी अमिततेजा[8]; ।
पांडव[9]-वनांत पेटे दावानलसा[10] चि, कक्ष[11] रिपु ते ज्या[12]. ॥ १५
करुनि सहायभटदलन[13] हांसे तो कर्ण, चाप आकर्षी, ।
सोडी बहु दारुण शर, तेव्हां हाहेति[14] वदति नाकर्षी[15]. ॥ १६
धर्माचें धनु एकें[16], नवति[17] शरानीं हि तोडिलें कवच, ।
तेव्हां[18] गगनीं क्षितिवरि न उठे 'हा !' वर्णवंध्य एक वच. ॥ १७
गळतां कवच नृप दिसे अनिलें[19] घनपटल उडवितां रविसा, ।
क्षतकंचुक[20] लेववितो बाणाच्या त्यासि सार्ध[21] चार विसा[21]. ॥ १८
गळतां कवच, नृपति बहु शोभे, अहि[22] जेंवि कंचुकापगमीं[23], ।

---

१. क्रोधाविष्ट. ह्याचें विशेष्य 'योध'. २. पंत **उत्प्रेक्षा** करितात, कीं जाणों ते सर्व **पांडवभट** मत्तवृषभ (मदोन्मत्त बैल) व तो (**कर्ण**) रोध (तट) होय. ३. **कर्ण**. ४. डगर, तट. ५. नाराचादिक बाणविशेषांचीं नांवें. ६. रवि न दिसे चि असे (इतके) दाट [बाण] वर्षति–असा अन्वय. ७. ब्रह्मास्त्राचा प्रयोग करून. ८. कर्णाचें विशेषण. ९. ते रिपु (शत्रु) ज्या (ज्या कर्णाला) कक्ष (तृणप्राय होत) (तो) पांडव [रूपी] वनांत दावानलसा चि (वनांत वणवा पेटावा त्याप्रमाणें) पेटे–असा अन्वय. १०. वणव्याप्रमाणें. ११. गवत. १२. धर्माला. १३. साह्यभूत योद्ध्यांचें विदारण. १४. हाहा+इति=हा ! हा !, हाय हाय–या शब्देंकरून (दुःखप्रदर्शन करिती). १५. स्वर्गींचे ऋषी. १६. एकें [शरें] धर्माचें धनु तोडिलें–हा अन्वय. १७. नव्वद शरांनीं. १८. तेव्हां (धर्माचें धनुष्य व कवच कर्णानें तोडिलें त्या वेळीं) गगनीं [व] क्षितिवरी 'हा' वर्णवंध्य ('हा' ह्या वर्णानें रहित, ज्यांत 'हाय हाय' अशीं अक्षरें नाहींत असें) एक (एक देखील) वच (वचन) न उठे (ऐकावयास न येई). सारांश, देवांच्या व मानवांच्या तोंडून 'हाय ! हाय !' असेच दुःखोद्गार बाहेर पडत असत–असा स्पष्टार्थ. येथें '०न उठे हा वर्ण 'वध्य' एक वच' असा पाठ आहे. त्याचा स्वीकार केल्यास पुढीलप्रमाणें अन्वयार्थ करावा:– तेव्हां गगनीं क्षितिवरि (आकाशांतील देवांपैकीं किंवा पृथ्वीवरील उभय सैन्यांतील वीरांपैकीं एकाच्याही मुखांतून) हा 'वध्य' (हा धर्म वध्य म्हणजे वधण्यास योग्य किंवा वधिला जाईल) (असा) वर्ण (असला शब्द, हीं अक्षरें) न उठे–असा अन्वय. धर्म अत्यंत पूज्य व पराक्रमी असल्यामुळें तो वध्य आहे, असें कोणीही म्हणेना–असा भाव. १९. वायूनें. २०. व्रणरूप अंगरखा. २१. अर्धयुक्त चार विसा म्हणजे नव्वद. २२. सर्प. २३. कंचुक+अपगम=कांत टाकणें.

मानीं[1] कल्पांतदहनदग्धवन[2] स्वर्णमय[3] चि तो नग[3] मीं[1]. ॥ १९
धर्में पाठविली रिपुमथना सर्वायसी[4] महाशक्ति. ।
ती जाय जसी कृत्या[5] भृत्याची[6] सफल व्हावया भक्ति. ॥ २०
कुंतीनंदन[7] चंदन, झाली तत्खंडनक्षणीं[8] जागी, ।
धांवे कर्णावरि भुजशाखेपासूनि, शक्ति ते नागी[9]. ॥ २१
तीतें[10] अर्धपथीं[11] च च्छेदिति शर सूर्यसूनुचे[12] सप्त; ।
निजशक्ति[13] खंडितां, बहु कोपें तो धर्म जाहला तप्त. ॥ २२
तोमरचतुष्टयें[14] मग भाळीं बाहुद्वयीं उरीं रिपुला ।
तोडी[15], पांडव कोपे, करि समरामाजि गर्जना विपुला. ॥ २३
कर्ण क्षतजें न्हाला, त्या काळीं तरुण[16] अरुणसा[16] साजे; ।
घन[17]सिक्त–सनिर्झर[18] पविहत[19] गैरिक[20]नग न कां तया[21] लाजे[22]? ॥ २४
क्रुद्ध[23]व्यालप्रतिमें कर्णे ध्वज धर्मसूनुचा[24] भलें ।
भंगुनि, शीघ्र रिचविला[25], मल्ल चि रंगीं[26] जसा महामल्लें. ॥ २५

---

१. मीं मानीं=मीं समजतों, मला वाटतें. मीं=संजय. २. प्रलयकालच्या दहनानें दग्ध झालें आहे अरण्य ज्यावरील, असा (नग). ३. स्वर्णमयचि नग=मेरुपर्वत. ४. सर्व+आयसी= संपूर्ण+लोखंडाची. लोहमयी–असा अर्थ. ५. तामसदेवता. ६. सेवकाची. ७. या गीतींतील **परंपरितरूपक** सुरेख आहे. कुंतीनंदन (धर्मराज) [हा] चंदन (चंदनवृक्ष होय), ते शक्ति (धर्मानें सोडलेली ती शक्ति) नागी (नागीण), तत्खंडनक्षणीं (त्या वृक्षास म्हणजे धर्मास कर्ण तोडीत असतां) जागी झाली; [व ती] भुजशाखेपासूनि (धर्मराजाचा हातच चंदन-वृक्षाची फांदी त्यापासूनि), कर्णावरि धांवे. चंदनवृक्षास वेष्टून सर्प असतात, अशी समजूत आहे. ८. तत्+खंडन+क्षणीं=त्या चंदनवृक्षाचें खंडन होतां क्षणीं. ९. नागीण. १०. त्या शक्तीला. ११. अर्ध्या रस्त्यांतच. १२. कर्णाचे. १३. आपली शक्ति (अस्त्रविशेष). १४. घुसळण्याच्या रवीसारखीं जीं चार शस्त्रें त्यांनीं. १५. 'ताडी पांडव कोपें' असा पाठभेद. १६. बालार्काप्रमाणें. (लाल–असा भावार्थ.) १७. मेघांनीं सिंचन केलेला. हें रक्तस्नानाचें प्रतिबिंब आहे. १८. ज्यांत झरे आहेत असा. क्षतांतून गळणाऱ्या रक्ताचें प्रतिबिंब. १९. वज्रानें हनन पावलेला. शस्त्रताडनाचें प्रतिबिंब. २०. कावेचा पर्वत. हें कर्णाच्या शरीराचें प्रतिबिंब. २१. त्या कर्णाला. २२. कां न लाजे? म्हणजे लाजेलच. कर्ण गैरिकनगापेक्षांही लाल होता–असा भाव. यांत **अधिक** व **प्रश्न** असे दोन अलंकार आहेत. २३. क्रोधयुक्त सर्पासारख्या. २४. यमपुत्राचा (धर्माचा). २५. कोसळून पाडला. रिचविणें=मोडून तुकडे करून पाडणें. २६. तालीमखान्यांत.

विंधुनि तीं बाणानीं भूपति, भाते हि तोडिले तूर्ण, ।
हाणोनि बाण दारुण केला रथ त्या रणांगणीं चूर्ण. ॥ २६
[1]गजदं[2]तगर्भवर्णप्रजवसबलकालबालहययु[3]क्तीं ।
स्वरथीं चढोनि राजा धर्म पळे, जो[4] प्रशंसिला मु[5]क्तीं. ॥ २७
धाकें धर्म पळाला, ह[6]रि अ[7]रिनें, शंभु कीं वृ[8]कें पिटिला; ।
कर्ण धराया धावे जेंवि हि[9]रण्याक्ष त्या मं[10]हाकिटिला. ॥ २८
गांठुनि धर्म, स्कंधीं स्पर्शे निजशुद्धि[11]काम कर्ण करें ।
मत्स्यध्वजकूर्मांबुजवज्रच्छत्रांकुशादि[12]लक्ष्मधरें. ॥ २९
इच्छी धरावया तों कर्णमनातें पृ[13]थोक्त आठव दे, ।
शल्य हि स[14]मयोचित-हित-धर्म, नयां[15] नार्पितां चि पाठें, वदे. ॥ ३०

---

१. गज+दंत+गर्भ+वर्ण+प्रजव+सबल+काल+बाल+हय=हत्ती+दांत+अंतर्भाग+रंग+शीघ्रगतियुक्त+बलयुक्त+काळे+केंस+घोडे=हस्तिदंताच्या गाभ्यासारखे शुभ्र, वेगवान्, बळकट आणि कृष्णकेशसहित जे घोडे, त्यांनीं युक्त अशा. २. गर्भ=आंतील भाग. हा फार शुभ्रवर्ण असतो. हत्तीच्या दांतांचा बाहेरील भाग माती वगैरेंनीं अस्वच्छ असतो, म्हणून 'गर्भ'पदाची योजना. ३. हें 'स्वरथी' याचें विशेषण. ४. जो धर्म. ५. जीवन्मुक्तांनीं. ६. कृष्ण. ७. जरासंध-कालयवनादिकांनीं कृष्णास पळविलें होतें, त्याचा येथें उल्लेख आहे. ८. यास भस्मासुर असें नामांतर आहे. यानें ज्याच्या मस्तकीं हात ठेवावा त्यानें दग्ध व्हावें, असें यास शिवाकडून वरप्रदान होतें. पण हा एकदां शिवाच्या मस्तकावरच हात ठेवण्यास धांवला असतां शिव पळत सुटले—अशी कथा आहे. ९. हिरण्यकशिपूचा भाऊ व प्रल्हादाचा चुलता. हा पृथ्वीस चटईप्रमाणें गुंडाळूं लागला, तेव्हां विष्णूनें वराहावतार घेऊन त्यास मारिलें. १०. मोठ्या वराहाला. म्हणजे—वराहावतारी विष्णूला. ११. (धर्मस्पर्शानें) आपली शुद्धि करूं इच्छिणारा. पंत उत्प्रेक्षा करितात कीं, जणों धर्मराजाच्या स्पर्शानें पवित्र होण्याकरितांच कर्ण धर्मास धरण्यास उद्युक्त झाला. येथें 'शुचि व्हाया धर्मातें पाहे स्पर्शावयासि कर्ण करें'—असा अन्य पाठ आहे. १२. मत्स्य, ध्वज, कांसव, कमळ, वज्र, छत्र, अंकुश इत्यादि चिन्हें धारण करणाऱ्या अशा. ('करें' या शब्दाचें विशेषण). १३. पृथा+उक्त=कुंतीचें भाषण. पांडवांस मारूं नकोस असें कुंतीचें म्हणणें व त्यावर अर्जुनाशिवाय इतर पांडवांस मी मारणार नाहीं, असें कर्णाचें म्हणणें यांस उद्देशून हें वाक्य आहे. [उद्योगपर्व—अ० ११ पहा]. १४. समय+उचित+हित+धर्म=प्रसंगाला साजेल असा व हितकारक आचार; अर्थात् त्या समयीं कर्णास भिववून धर्मास रक्षावयास उपयोगी पडेल असा सल्ला. १५. नीतीला पाठ न दाखवितां, न्यायानें.

'कर्णा! सावध सावध, हा[1] वध राव[2] धरितां तुझा करितो, ।
बा[3]! घात, हात हा तव, व्हाया, चक्षुर्हणाहिला[4] धरितो. ॥ ३१
तीव्रतपोनिधि[5] राजा, हा जाळील क्षणांत राधेया! ।
आधेया[6] तूळाला[7] शुचिसा[8], तुजला[9]; न काळ बाधे याँ[10]. ॥ ३२
उग्र तपोनिधि राजा त्र्यंबकसा[11], कामसाम्य[12] तुज आहे, ।
स्त्रीस[13] हि तुझ्या रतीचें, जरि कोपें तुजकडे नृपति पाहे.' ॥ ३३
हांसत हांसत तो वृष बोले, 'जन्मोनि शुद्धसंतानीं[14], ।
कोण पळेल क्षत्रिय, धर्मीं शिक्षित असोनि संतानीं[15]? ॥ ३४
कां पळसी मरणभयें? होतां हांसें[16] कशास[17] वांचावें? ।
सांचावें[18] लज्जेचें ओझें माथां, सदैव कांचावें[19]. ॥ ३५
युद्धीं परमार्थ[20] मिळे निश्चित, मिळणें पलायनें तोटा; ।

---

१. 'शल्य हि समयोचितहित धर्मनया नार्पितां च्चि पाठ वदे'–असा पाठ आहे. तो घेतल्यास अन्वयः–शल्य पाठ नार्पितां च्चि (पाठ न दाखवितां म्हणजे न भीतां, कर्णाची भीति न बाळगितां) समयोचित (प्रसंगास योग्य), हित (हितप्रद) [व] धर्मनया (धर्म व नीतियुक्त वचनें) वदे. किंवा—धर्म (युधिष्ठिर) पाठ नार्पितां च्चि शल्य ही समयोचित हितनय वदे. धर्म पळून जात आहे तोंच शल्यही कर्णास अशा समयीं धर्मास फायदेशीर असा उपदेश करिता झाला. २. अन्वयः–धरितां (तूं यास पकडशील तर) हा राव (धर्म) तुझा वध करितो, म्हणजे खात्रीनें करीलच. ३. बा! हा तव हात [तव] घात व्हाया चक्षुर्हणाहिला धरितो–असा अन्वय. ४. चक्षुर्हण+अहि=पाहण्याबरोबर प्राण घेणाऱ्या सर्पाला. ह्या जातीच्या सापाचा उल्लेख पंतांच्या काव्यांत अन्यत्र आढळतो. (वनपर्व, अध्याय ११।१३ पहा). ५. उग्र अशा तपाचा समुद्र. ६. वर ठेवलेल्या. ७. कापसाला. ८. अग्निसा. ९. तुजला जाळील–असा अर्थ. १०. धर्माला. ११. त्रि+अंबक=त्रिनेत्रसा, शिवासारखा. (येथें त्र्यंबकच म्हटलें पाहिजे, कारण मदनाचा नाश त्र्यंबकाच्या तृतीय नेत्रानें झाला आहे). १२. मदनाची योग्यता. १३. तुझ्या स्त्रीस देखील रतीचें साम्य आहे. कारण धर्मराज जर तुझ्याकडे कोपानें पाहील, तर तूं मदनाप्रमाणें भस्म होशील व तुझ्या बायकोला रतीप्रमाणें रडत बसावें लागेल–असा भाव. १४. उत्तम वंशांत. कर्ण हा खरोखर सूर्यपुत्र होता, सूतपुत्र नव्हता, म्हणून हा शब्द साभिप्राय समजावा. १५. संतानीं (कृप, द्रोण, धौम्य यांसारख्या सज्जनां–कडून) धर्मीं शिक्षित असोनि (राजधर्म शिकून) कोण क्षत्रिय पळेल?–असा अन्वय. १६. उपहास. १७. वांचून काय उपयोग? कारण आपलें हांसें करून घेऊन जीवंत राहिल्यास लज्जेचा भार डोक्यावर चढवून घेऊन मनुष्य सतत झुरणीस लागावयाचा–असा भावार्थ. १८. सांठवून ठेवावें, वहावें. १९. कांचणें=भीतीनें कृश होणें. २०. जन्मसाफल्य.

हें जाणोनि पळे तो मातेच्या रोग पातला पोटा. ॥ ३६
न क्षेत्रधर्मकुशल, ब्राह्मणधर्मप्रवीण तूं सौम्यें[2], ।
वाटे पढवी उचित स्वाध्याय[3] मखक्रिया[4] चि तो धौम्य[5]. ॥ ३७
कुंतीसुता ! इतःपर[6] युद्ध करायासि गांठि वीरांसीं ।
घालूं नको नको[7] चि; स्पर्धा हि करूं नको चि धीरांसीं. ॥ ३८
आम्हां वीरांप्रति तूं यावरि अप्रिय वदों नको लेश, ।
वनकोलयूथनाथें[8] जिंकावा[9] केंवि यज्ञकोलेश[10] ? ॥ ३९
यावें महारणाप्रति न पुन्हां, हा रंग वीरमल्लांचा; ।
येथें[11] न कुश[12] स्रुक्[13] स्रुव[14], संभार[15] असे गदासिभल्लांचा[16]. ॥ ४०
जा[17]. गा[18] मद्दानगुणा[19], दिधलें तुज जीवदान जा जा[20] गा ! ।

---

१. क्षत्रियांस योग्य अशा युद्धधर्मांत कुशल. २. शांत स्वभावाचा. ३. वेद. ४. यज्ञयागादि कर्म. ५. पांडवांचा पुरोहित (ऋषी). ६. यापुढें कधींही. ७. 'नको' शब्द दोन वेळां उच्चारून कर्णानें आपल्या मनांतील तिरस्कारभाव स्पष्ट व्यक्त केला आहे. ८. रानडुकरांच्या कळपाच्या पुढाऱ्यानें. ९. यांत **अप्रस्तुतप्रशंसा** नामक अलंकार आहे. १०. यज्ञवराह. ११. या रणभूमीवर. धर्मराज राजसूयादि यज्ञ करून प्रख्यात झाल्यामुळें कर्ण धर्माच्या यज्ञास उद्देशून ही थट्टा करीत आहे. १२. दर्भ. १३. होमकुंडांत तूप ओतण्याचें पात्र. १४. तूप घेण्याचें पात्र. १५. समूह, समुच्चय. प्रस्तुत गीतींत '**विधि**' नामक अलंकार आहे. जेथें सिद्ध अशा गोष्टींचेंच विधान केलेलें असतें, तेथें **विधि** नामक अलंकार होतो. युद्धांत गदादिकांचें काम असतें, कुशादिकांचें काम नसतें हें प्रसिद्ध असूनही, धर्माची थट्टा करण्याकरितां औपरोधिक रीतीनें त्याचा प्रस्तुत स्थलीं उल्लेख केला आहे, म्हणून **विधि**. १६. गदा+असि+भल्ल=गदा, खड्ग व बाण यांचा. १७. अन्वय व अर्थः–जा (निघून जा; पळून जा); मद्दानगुणा (जीवदान दिलेल्या माझ्या दातृत्वास) गा (गायन कर; वर्णन कर;) तुज जीवदान दिधलें; गा! (अगा!) जा जा (पळून जा, पळून जा); [गजानें] दाटुनि गर्वोक्तीनें दाटून किंवा चिडवून. मागील अध्यायांतील धर्मोक्ति पहा. (गीति ८३,८४ व ८५). हरि (सिंह) जागा केल्या (केल्यास) [त्या] गजा वांचाया जागा (जगांत कोठेंही स्थल) नसे. १८. गान कर. येथें 'कीर्तनासि नर हो तुम्हि जागा' ह्या वामनपंडितांच्या प्रसिद्ध श्लोकाची आठवण होते. १९. माझ्या दातृत्वाला. २०. या गीतींत **आदियमक** व **आद्यंतयमक** अशीं दोन यमकें साधिलीं आहेत. **आदियमक** म्हणजे गीतींत पहिल्या व तिसऱ्या चरणाच्या प्रारंभीं तींच अक्षरें असणें. चरणाच्या किंवा अर्धाच्या आरंभीं व अखेर यमक साधिलें, तर त्याला **आद्यंतयमक** म्हणतात. 'जागा' हीं दोन अक्षरें निरनिराळ्या चार अर्थांनीं प्रस्तुत गीतींत योजिलेलीं आहेत. गीतीचें उत्तरार्ध **अप्रस्तुतप्रशंसेचें** उदाहरण आहे.

[1]जागा दाटुनि केल्या हरि, वांचाया नसे गजा [2]जागा.' ॥ ४१
ऐसें वदोनि कर्णे सांपडला धर्म सोडिला राया ! ।
मग पीडिली [3]तयांची सेना [4]पूर्वी जसी च [5]तज्जाया. ॥ ४२
[6]अरिहरिपासुनि सुटतां [7]करि [8]करिभूपति पलायन त्वरित, ।
सरलें सुरांसि तेव्हां [9]कालयवनभीतशौरिचें [10]चरित. ॥ ४३
[11]राजामागें सात्यकि [12]यम भीम द्रौपदेय ही पळती, ।
जाणों [13]कर्णदवशरज्वालावलयांत ते [14]करी जळती. ॥ ४४
श्रुतकीर्तिच्या रथावरि धर्म चढे, मग म्हणे स्ववीरांतें, ।
'मागें फिरा, फिरा हो ! उचित पलायन नव्हे चि धीरांतें. ॥ ४५
आला कीं कर्ण बळी, जैसा [15]अनिवार्य [16]कर्मपरिपाक, ।
कोठें पळाल ? अरि हरि होती, [17]पळणार होति [18]करिपाक. ॥ ४६

---

१. जागृत. २. स्थल. ३. धर्मांची. ४. पूर्वी जसी तज्जाया पीडिली तशी सेना पीडिली—असा अन्वय. ५. तत्+जाया=त्याची स्त्री, द्रौपदी. ६. अरिरूप (शत्रुरूप) हरिपासुनि (सिंहापासून). ७. 'पलायन करि'—असा अन्वय. ८. करि (हत्ती) तुल्य भूपति. ९. कालयवनास भ्यालेल्या कृष्णाचें. प्रस्तुत स्थलीं अनुसंधेय असलेली कथा अशी आहे:—कोणी एका यवनराजानें यादवांच्या पराभवार्थ आपल्या स्त्रियेच्या ठायीं गर्गमुनीपासून निर्माण करविलेला पुत्र हा कालयवन होय. हा एकदां मोठ्या सैन्यासह यादवांवर चालून आला. हा आपणास अजिंक्य आहे, हें जाणून व युक्तीनें याचा वध करावा या उद्देशानें कृष्णानें पळ काढला व हा त्याच्या मागें लागला. पळतां पळतां कृष्ण एका पर्वतदरीत शिरला. तींत मुचकुंदराजा निजला होता. त्याच्या आंगावर आपलें उपवस्त्र घालून कृष्ण पलीकडच्या आंगास लपून बसला. यवन कृष्णामागून दरींत शिरला व उपवस्त्र पांघरून कृष्णच निजला आहे असें समजून त्यास त्यानें लत्ताप्रहार केला. तेव्हां मुचकुंद जागा होऊन त्यानें कोपानें नेत्र उघडले व त्याच्या कोपानलानें यवन मरण पावला. [भागवत—स्कं० १० अ० ५१]. १०. यवनास भिऊन कृष्ण पळत सुटला, त्या प्रसंगास उद्देशून हा 'चरित' शब्द आहे. प्रस्तुत गीति स्मरणालंकाराचें उत्तम उदाहरण आहे. प्रस्तुतच्या अनुभवानें पूर्वीच्या सदृश अनुभवाची जी आठवण, तिला स्मरणालंकार म्हणतात. प्रस्तुत स्थलीं, धर्मांचें पळणें पाहून कृष्णाच्या पळण्याची आठवण झाली, असें म्हटलें आहे, म्हणून हा अलंकार झाला. ११ येथें 'राज्यामागें' असा शब्द रा० पराडकर यांच्या प्रतींत आहे. १२. नकुल व सहदेव. १३. कर्णरूपी दवाच्या (दावाग्नीच्या) शररूपी ज्वालांच्या वलयांत (वेढ्यांत). १४. ते करी=सात्यकि इत्यादि हत्ती. १५. जो कधींही चुकवितां येणार नाहीं असा. १६. केलेल्या कर्माचा परिणाम. १७. पळणार (युद्धांत पळून जाणारे) करिपाक (हत्तीचे बच्चे) होति (होती)—असा अर्थ. १८. करि+पाक=हत्तीचें बालक. 'पोतः पाकोऽर्भको डिम्भः'—अमरकोश.

आलीं कौरव[1]कटकें, आला राधेय हा पहा पाठीं, ।
पिटितो आम्हांसि, जसा गोपें[2] पशूतें धरूनियां काठी. ॥ ४७
सारे मिळोनि मारा कर्णातें. काय पाहतां? [3]मुरडा. ।
भाजा [4]प्रतापदहनीं [5]खलबल, हो [6]घसरांतका हुरडा. ॥ ४८
भीमप्रमुख महारथ मग मागें मुरडले [7]प्रकंपनसे; ।
घनसे कौरव झाले, मरणभयें [8]एक ही [9]संकंप नसे. ॥ ४९
विहरति [10]ते कृतवैर स्वैर रिपुबळीं, [11]शिखी जसे [12]विजनीं, ।
नाचति [13]भटनट, [14]कटकट [15]कटकयुगीं होय हो! [16]यशस्विजनीं. ॥ ५०
सांगावें काय? किती? झालें मोठें चि त्या रणीं [17]खणकें. ।
उठलीं बहुत कबंधें; [18]गणिले मृतवीर काळसद्गणकें. ॥ ५१
[19]अभिमुखहतांसि घेती स्वविमानीं [20]अप्सरा [21]स-राग-मती; ।
तें पाहुनि भट झटती [22]मरणीं च; [23]रणीं वश सरा गमती! ॥ ५२
[24]हतनरतुरगगजांच्या रक्ताची [25]गुरुतरंगिणी वाहे, ।

---

१ कौरवसैन्यें. २. गुराखी, गोपाल. ३. मागें फिरा. ४. प्रतापरूप अग्नींत. ५. 'खलबल याचा 'भाजा' आणि 'हो' (होवो) या दोहोंशीं अन्वय. ६. अतिशय खाणाऱ्या ( खादाड ) काळास. घसर=खादाड. ७. महावातसे. ८. कौरवांच्या सैन्यांतील कोणींही एक वीर–असा भाव. ९. भीतियुक्त, भित्रा. १०. कौरव व पांडव. ११. मयूर, मोर. १२. एकांत स्थळीं. १३. भट (सैनिक)रूपी नट. १४. भांडण, लढाई. १५. दोन्ही सैन्यांत. १६. यशस्वी असे जन आहेत ज्यांत अशा. ('कटकयुगीं' याचें विशेषण). 'यशस्वी' ह्या शब्दाचें स्वारस्य नीटसें लक्षांत येत नाहीं. १७. तुमुल युद्ध; निकराचें लढणें. खणकें=शस्त्रास्त्रांचा शब्द, खणखणाट. १८. मृतवीरांची संख्या मानवगणक सांगूं शकले नाहींत; काळ(मृत्यु)रूपी सद्गणकें (फरड्या कारकुनानेंच) मृतवीर गणिले–हा भाव. १९. अभिमुखहतांसि=समोर मेलेल्यांस म्हणजे शत्रूशीं अभिमुख होऊन लढत असतां मृत झालेल्यांस. २०. 'अप्सरस्'शब्द संस्कृतांत नेहमीं अनेकवचनी वापरला जातो. २१. प्रीतियुक्त बुद्धि ज्यांच्या अशा. २२. जीवापाड लढून मरण्याविषयींच. २३. रणीं (युद्धीं–जेथें स्मरविकाराचा संबंध नाहीं तेथें) [वीर] स्मरा वश गमती. (अप्सरांना मोहित झाल्यासारखे दिसले). 'वीरशृंगारयोः·········अविरोधः' [रसगंगाधर]. म्हणून आपल्या साहित्यशास्त्रज्ञांच्या मतें वीररस वर्णन करितां करितां शृंगार वर्णन करण्यास हरकत नाहीं. यामुळें युद्धवर्णनांत हल्लींच्या वाचकांस असंबद्ध दिसणारें आदिरसवर्णन जुन्या काव्यांतून येत असतें. २४. मेलेले मनुष्य, घोडे व हत्ती यांच्या. २५. मोठी नदी.

साक्षात् [1]सरस्वती ती, स्वर्ग जन [2]जिच्या [3]निमज्जनें लाहे. ॥ ५३
[4]रक्तनदीच्या स्नानें, पानें, गंधें हि वीर ते भुलले, ।
दिसती वसंतसमयीं [5]किंशुकतरु [6]कटककाननीं फुलले. ॥ ५४
कौरवकटक पराङ्मुख केलें भीमादिकीं; [7]पळे, न टिके; ।
झाले भग्न रणीं [8]ते, जैसे न्यायीं खऱ्यापुढें लटिके. ॥ ५५
जन्हि दुर्योधन वारी, न फिरति मागें भयाकुळें कटकें. ।
[9]उपदेशें कार्य नव्हे, घडतें [10]काळें चि कार्य तें [11]घटकें. ॥ ५६

---

## अध्याय [12]बत्तिसावा.

### (भीमकर्णयुद्ध.)

सौबल शकुनि महाबल कौरवभट दंडताडिताहि [13]तसे ।
रागें मागें फिरले, भासति दुर्योधनासि जे हितसे. ॥ १
भीमावरि कौरवभट उठतां प्रेरी वृष [14]स्वसूतातें ।

---

१. ही नदी वैदिककालीं फार महत्त्वाची होती. प्रयागीं जेथें गंगायमुनेचा संगम झाला, तेथेंच ही सरस्वती येऊन मिळाली, अशी समजूत आहे. ही सांप्रत गुप्त आहे, असें म्हणतात. सांप्रत गंगा जशी पवित्र समजतात, तशी वैदिककालीं सरस्वती पवित्र समजत होते. ह्या नदीच्या पाण्याचा रंग तांबडा असल्यामुळें प्रस्तुत स्थळीं तिचा उल्लेख केला असावा. २. जिच्या निमज्जनें जन स्वर्ग लाहे–असा अन्वय. ३. स्नानानें. ४. यांत 'समुच्चय' अलंकार आहे. 'अनेक पदार्थ, अनेक गुण किंवा अनेक क्रिया, यांचा सहभाव इष्ट असला म्हणजे 'समुच्चय' झाला.' [भागवतकृत अलंकारमीमांसा.] 'स्नानें, पानें व गंधें' या तिन्ही पदार्थांचा युगपद्भाव कवीस मान्य आहे. एकानेंही भुलून जाणें साहजिक असून तिहींचा संयोग झाला, म्हणून पूर्ण परिणाम झाला–हा कवीचा आशय. ५. पळसाचे वृक्ष. ६. सैन्यरूपी अरण्यांत. ७. 'वळे' असा पाठ आहे, पण तो अपपाठ दिसतो. ८. ते=कौरववीर. 'झालें भग्न रणीं तें' असाही पाठ आहे. ९. उपदेशें नव्हे (घडत नाहीं); काळें चि घटकें (काळरूपी घटकाच्या कर्तृत्वानें) तें कार्य घडतें–हा अन्वय. १०. नियमित काळानेंच. ११. घडवून आणणारा जो काळ, त्याच्याकडून. १२. या अध्यायांत मूळ संस्कृत भारतांतील कर्णपर्वाच्या ५०, ५१, ५२ व ५३ या अध्यायांतील कथाभाग आलेला आहे. मूळ व प्रस्तुत अध्याय यांच्या वाचनानें पंतांची भाषांतर करण्याची रीति स्पष्ट होईल. पुष्कळ कथाभाग थोडक्यांत कसा आणावा, अनवश्यक वर्णनें कशीं गाळून टाकावीं, हें पंतांस चांगलें माहीत होतें, हें या अध्यायावरून स्पष्ट होईल. १३. दंडताडिताहि तसे=काठीनें डिवचलेल्या सर्पाप्रमाणें. १४. आपल्या सारथ्यातें (शल्यातें).

जैसा [1]पुरदहनोद्यत हर [2]हरिनाभ्यंबुजप्रसूतातें, ॥ २
राधेय आपणावरि येतो जाणोनि, भीम [3]रायाचें ।
रक्षण सात्यकि–धृष्टद्युम्नां सांगे रणीं करायाचें. ॥ ३
पूर्वी [4]शिवप्रसादें [5]काळापासूनि [6]विप्र तो सुटला; ।
[7]संप्रति कर्णापासुनि [8]नृप. नवल घट न [9]महोपलीं फुटला ! ॥ ४
म्यां रक्षाया दिधला तुमच्या हातीं [10]युधिष्ठिरन्यास, ।
कर्ण-दरवडा न पडो; भीं ना मीं तस्करा [11]तदन्यास. ॥ ५
मारीन आजि कर्णा किंवा मारील तो रणांत मला; ।
[12]आम्ही देखत [12]असतां असद्गुरु धर्म दीनसा ग[13]मला.' ॥ ६
एवं वदोनि सात्यकि–धृष्टद्युम्नांसि धर्म तो [14]निरवी. ।
भीम वृषाप्रति गेला, [15]तुहिननगाप्रति जसा तपोनि रवी. ॥ ७
शल्य म्हणे, 'आला रे ! आला [16]कालानलप्रबल भीम; ।
[17]मी मन काळाचें ही, यास [18]प्रतिमल्ल एक [19]बलभीम. ॥ ८
[20]बहुकाळसंचितोग्रक्रोधगरळ तुजवरी च ओकाया, ।

---

१. पुर+दहन+उद्यत=त्रिपुराचा नाश करण्याविषयीं उद्युक्त झालेला. २. हरि+नाभि+अंबुज+प्रसूत=हरिनाभिकमलोत्पन्न ब्रह्मदेवातें. त्रिपुराचा नाश करावयाचे वेळीं शंकरांनीं ब्रह्मदेवास आपलें सारथ्य दिलें होतें. ३. धर्मराजाचें. ४. शंकराच्या कृपेनें. ५. यमापासून. ६. मार्कंडेय ऋषि. हा मृकंडऋषीचा शिवप्रसादानें जन्मलेला मुलगा. याच्या वयाची मर्यादा सोळा वर्षें होती. म्हणून सोळा वर्षें पूर्ण होतांच यम ऋषिपुत्राचे प्राण हरण करण्यास आला. त्या समयीं हा शिवाची आराधना करीत होता. तस्मात् शिव प्रत्यक्ष होऊन यमास परत फिरविता झाला व त्यानें मार्कंडेयास चिरंजीवित्व दिलें–ही कथा येथें अनुसंधेय आहे. ७. प्रस्तुत. ८. धर्म. ९. महा+उपलीं=मोठ्या दगडावर. उपल=दगड. १०. धर्मरूप ठेवा. ११. तदन्यास (त्याहून निराळ्या) तस्करा (चोराला)–असा अर्थ. १२. आमच्या देखत, आमच्या समक्ष. १३. ही गीति काव्यलिंग अलंकाराचें उदाहरण आहे. कारण गीतीच्या पूर्वार्धांत व उत्तरार्धांत कार्यकारणभाव आहे. मारीन किंवा मरेन असलें स्फुरण चढण्याचें कारण 'धर्म दीनसा गमला.' १४. स्वाधीन करी. या क्रियेचा कर्ता 'भीम'. १५. हिमाचलाजवळ. १६. प्रलयकाळच्या अग्नीप्रमाणें भयंकर. १७. हें दामयमकाचें उदाहरण. १८. जोडीदार, जोड. १९. मारुति. २०. पुष्कळ काळापासून सांठवून ठेवलेलें भयंकर कोपरूप विष.

हा भीम–भुजग[1] आला; सावध हो; देख तेजओका[2] यां.[3]' ॥ ९
कर्ण म्हणे, 'मद्रेशा ! सत्य चि वदतोसि, भीम हा साचा ।
घेईल सूड समरीं, आम्हीं केल्या महोपहासाचा.[4] ॥ १०
हा वीर धीर कोपी प्रबळ, नसे यासि चाड देहाची. ।
चौघांहूनि शतगुण[5] प्रीति द्रुपदात्मजेसि[6] दे हा[7] ची. ॥ ११
कीचक[8] नीच कलुषमतिरत[9] शत,[10] न तसें अशोभन गरांत,[11] ।
अज्ञातवास करितां येणें वधिले विराटनगरांत. ॥ १२
खलबककिर्मीरजरासंधहिडिंबघ्न[12] हा न भी मरणीं ।
हा दंडधरयमासीं भांडेल गदा धरूनि भीम रणीं. ॥ १३
याला वधीन किंवा विरथ तरी मी करीन कोपार्थ;[13] ।
याच्या कैवारें तरि मजसीं घालील गांठि तो पार्थ.' ॥ १४
शल्य म्हणे, 'न वदें बहु; आधीं भीमासि चाल वाराया.[14]' ।
कर्ण म्हणे, 'तुज[15] सागर भासे, मज भीम कालवा[16] राया ! ॥ १५

---

१. सर्प. 'भुजग' व 'भुजंग' अशीं दोन रूपें या शब्दाचीं आहेत. २. तेजाच्या गृहा, तेजस्वी अशा. तेजसां ओको–निवासस्तेजस्वी–पंत. ३. या तेजओका [भीमा] देख–असा अन्वय. ४. (महा+उपहास) मोठ्या थट्टेचा. ५. शंभरपट. ६. द्रौपदीस. गीतीच्या या उत्तरार्धास मुळांत आधार नाहीं. 'द्रौपद्याः प्रियकामेण' येवढें मात्र मुळांत आहे. ७. भीमचि. ८. अन्वय–शत (शंभर) कीचक नीच [व] कलुषमतिरत; तसें अशोभन (वाईटपणा) गरांत (विषांत) न. [तसले शतकीचक] येणें अज्ञातवास करितां विराटनगरांत वधिले. सारांश–ह्या कीचकांच्या ठिकाणीं जसें दुष्टत्व भरलें होतें, तसें दुष्टत्व प्रत्यक्ष विषांत सुद्धां सांपडावयाचें नाहीं. येथें व्यतिरेकालंकार आहे. ९. पातकबुद्धींत मग्न. १०. कीचकाचे धाकटे भाऊ एकशें पांच होते. त्यांस उपकीचक असें म्हणण्याचा प्रघात आहे. पंतांनीं येथें 'शत' कीचक असें म्हटलें आहे, पण ती संख्या अंदाजानें दिलेली दिसते. ११. विषांत. १२. दुष्ट जे बक, किर्मीर, जरासंध व हिडिंब यांस मारणारा असा. १३. (पार्थास) कोप आणण्याकरितां. १४. निवारण्याकरितां. १५. हें 'उल्लेख' नामक अलंकाराचें उदाहरण आहे. याचें लक्षण—'एकस्य वस्तुतो निमित्तवशाद्यदनेकैर्ग्रहीतृभिरनेकप्रकारकं ग्रहणं तदुल्लेखः' [रसगंगाधर]. अर्थ—एकच वस्तु निरनिराळ्या जनांस भिन्नकारणेंकरून निरनिराळ्या प्रकारची दिसते, असें वर्णन असल्यास उल्लेख अलंकार होतो. प्रस्तुत स्थलीं कर्णाच्या म्हणण्याचा उद्देश हा कीं, तूं भित्रा असल्यामुळें तुला भीम 'सागर' भासतो, व मी शूर असल्यामुळें मला भीम 'कालवा' भासतो. म्हणजे एकच भीम भिन्न कारणांनीं दोघांस दोन तऱ्हेचा दिसतो. १६. पाट (पाण्याचा लहान ओघ).

स्नेहें[1] लालन केलें माथां[3] धरिला हि मलिन[4] वक्र[5] कच[6]. ।
तव शब्द तसा; भेदी हृदय, न दारुण असा नैव[7] क्रकच[8]. ॥ १६
कर्णे रणीं धनंजय कीं कर्ण धनंजयें वधावा, हे ।
आहे खरी[9] प्रतिज्ञा; न फिरे; उलटी[10] न निम्नगा[11] वाहे. ॥ १७
युद्धीं च मन असों दे; सत्वर रथ ने वृकोदरानिकट, ।
चाल, पहा होइल तें. त्यांस[12] चि सधना धनाधिसा[13] चिकट.' ॥ १८

---

१. प्रेमानें किंवा तेलानें. एक अर्थ शल्यपक्षीं व दुसरा कचपक्षीं. स्नेह=प्रेम व तेल. २. वाढविणें. ३. येथें कचपक्षीं–माथां धरिला=शिरावर वाढविला (कारण केंस डोक्यावर वाढवितात). शल्यपक्षीं–माथां धरिला=फार गौरविला. ४. काळा व पापी, घाणेरडा. ५. वांकडा, कुटिल स्वभावाचा. हें गीत्यर्ध **पूर्ण श्लेषाचें** उत्तम उदाहरण आहे. शल्य व कच (केश) या दोहोंस हें लागू पडतें. कर्णाच्या सांगण्याचा भाव असा कीं, रोज सुगंधिक तैल लावून डोक्यावर वाढविलेले केंस जसे काळे व वांकडे, त्याप्रमाणें आम्हीं तुला मोठ्या प्रेमानें बागवितों व तुझा मोठा गौरव करितों, तरी तूं माझी निंदा व पांडवांची स्तुति करून कुटिलपणानें वागतोस. प्रस्तुत गीतीशीं कांहीं अंशीं समानार्थक अशी 'कचदेवयानी' आख्यानांतील प्रख्यात गीति पाहण्यासारखी आहेः—'तूं मलिन, कुटिल, नीरस, जड चि, पुनर्भवपणें हि कचसाच । धरिला शिरीं हि न स्वप्रकृतिगुण त्यजिसि; नाम कच साच ॥ ६३ ॥' [आदिपर्व–अ० ९]. ६. केश. स्नेहें [कचाचें] लालन केलें [व तो] माथां धरिला [तरी] तो मलिन व वक्र [असतो] 'तसा तूं आहेस' (हे शब्द अध्याहृत घेतले पाहिजेत)–असा भाव. ७. नवीनच धार लावलेला. ८. करवत. ९. हे प्रतिज्ञा खरी आहे, म्हणजे ही प्रतिज्ञा खरी करून मी दाखवीन–असा भाव. १०. नदी उलटी वाहत नाहीं; उगमाकडे जात नाहीं; आपला स्वभाव सोडीत नाहीं. हा **दृष्टांत** अलंकार. हा वैधर्म्य दृष्टांत होय. मी आपली प्रतिज्ञा खरी करीन असें सांगून नदी उलटी वाहत नाहीं, हा व्यतिरेकात्मक दृष्टांत दिला आहे. 'दृष्टांतालंकार व अर्थांतरन्यास हे कांहीं अंशीं सारखे आहेत. एकादा विशेष प्रकृतार्थ मनांत येण्याकरितां दुसऱ्या विशेष अप्रकृतार्थाचें उदाहरण दिलें असतां दृष्टांत होतो; व प्रकृत सामान्यार्थाचा बोध होण्याकरितां विशेष अप्रकृतार्थ सांगणें किंवा प्रकृत विशेषार्थ मनांत बिंबण्याकरितां अप्रकृत सामान्यार्थ सांगणें ह्यास अर्थांतरन्यास म्हणतात.' [अनेकविद्यामूलतत्त्व–'वाक्यांतले अलंकार']. ११. नदी. १२. त्यासचि=भीमासचि. धनहीन ज्याप्रमाणें सधनजनास चिकटून राहतो, त्याप्रमाणें तूं भीमास व भीमाच्या पराक्रमास चिकटून त्याचीच नेहमीं तारीफ करीत रहा. किंवा–चाल, [जें] होइल तें पहा. [आणि] सधना धनाधिसा (श्रीमंताला जसा द्रव्यरक्षणाच्या काळजीचा रोग असतो तसा) [तूं] त्यास चि (फक्त काय होईल तें पाहाण्याच्या कामास) चिकट (चिकटून रहा, इतर पंचायती करूं नको) –असा भाव. १३. धन+आधि+सा=धनाविषयीं चिंता आहे ज्याला, त्याप्रमाणें.

पांडवकर्णसमागमसमयीं [1]बहुसाल वाजलीं [2]तूर्यें; ।
[3]न दिसे, जाणों निज मुख [4]शरपटलपटें चि झांकिलें सूर्यें. ॥ १९
भीमातें नाराचें ताडी कर्ण स्तनांतरीं आधीं; ।
मग बुडवि शरसमुद्रीं, [5]कपि [6]गिरितें जेंवि [7]दुस्तरागाधीं. ॥ २०
भीम हि झांकी कर्णा बाणपटें, तत्तनूंत नव रोप [8] ।
खोवी; तो वीरमणी स्वमनीं तेव्हां धरी अमित कोप. ॥ २१
तोडुनि धनु, भीमाच्या खर नाराच स्तनांतरीं हाणी; ।
[9]वल्मीकांत भुजगसा, शिरला तो [10]तूर्ण [11]तत्तनुत्राणीं. ॥ २२
दुसरें सुदृढ शरासन घेउनि करि सज्ज भीम मग राया ! ।
ताडी बहु बाणांहीं उग्रा [12]कुरुवाहिनीस्थमगरा या. ॥ २३
भीमासि पंचविंशतिबाणांहीं तेधवां [13]अशुल्कांहीं ।
ताडी राधेय, जसा [14]मदमत्तद्विपपतीस [15]उल्कांहीं. ॥ २४
जोडी भीम [16]धनुगुणीं, कर्णवधेच्छा धरूनि मनिं, रोप; ।
[17]अर्जुनभाग स्मरतां [18]भंगार्थ चि दे, वधार्थ न, निरोप. ॥ २५
[19]गुण शर कर हे गेले धर्मज्ञ [20]गुरूक्तिसेवनप्रवणा, ।

---

१. नाना प्रकारचीं. २. वाद्यें. ३. 'शरपटलें न दिसे कीं स्वमुख पटें भिउनि झांकिलें सूर्यें' असाही पाठ आहे. ४. शररूप वस्त्राच्या पडद्यानें. ५. मारुति. ६. समुद्रोल्लंघनसमयीं मारुतीनें मैनाकपर्वतास खालीं चेंपून समुद्रांत बुडविलें–त्या प्रसंगास उद्देशून हें वाक्य आहे. ७. दुस्तर+अगाधीं=तरण्याविषयीं अशक्य आणि खोल अशा समुद्रांत. ८. बाण. ९. वारुळांत. १०. लवकर. ११. तत्+तनु+त्राण=त्या भीमाच्या कवचांत. १२. कुरुरूप नदींत असणाऱ्या सुसरीस. 'वाहिनी' शब्दावर श्लेष आहे. वाहिनी=सेना, (पक्षीं) नदी. १३. अमूल्य अशा. १४. मदानें उन्मत्त झालेल्या हस्तिश्रेष्ठास. १५. ज्वाळांनीं, मशालींनीं. १६. धनुष्याच्या दोरीवर. 'धनुर्गुणिं' असें पाठान्तर. १७. पुढील गीतींतील 'संकल्पद्वया'चा खुलासा येथें केला आहे. कर्णास मारावें असा आधीं निश्चय केला. पण इतक्यांत त्यास आठवण झाली कीं, कर्णास मारीन अशी प्रतिज्ञा अर्जुनानें केली आहे. तेव्हां कर्णास मारण्याचा हक्क त्याचा. म्हणून त्यानें कानाजवळ आलेल्या बाणास 'कर्णाचा फक्त पराभव कर' अशी आज्ञा दिली–असा भाव. १८. पराभवाकरितां. (भंगार्थ निरोप दे; वधार्थ न दे). १९. भीमानें चाप आकर्ण ओढून बाण सोडिले–हा या गीतीचा भाव आहे. हा भाव पंत उत्प्रेक्षेनें सांगतात. अन्वयः–गुण (दोरी), शर [व] कर (हात) हे धर्मज्ञ गुरूक्तिसेवनप्रवणा श्रवणा (आपला स्वामी जो भीम त्याचें म्हणणें ऐकण्यांत तत्पर अशा कर्णास. ऐकणें हा धर्म कर्णाचा म्हणून हें विशेषण.) स्वप्रभुसंकल्पद्वयसिद्धांत पुसावयास च्चि गेले (म्हणजे कानापर्यंत गेले–असा भाव). २०. गुरूची आज्ञा सेवन करण्याविषयीं प्रवण (नम्र) अशा.

[1]स्वप्रभुसंकल्पद्वयसिद्धांत पुसावयास चि, [2]श्रवणा. ॥ २६
जो वध तो चि पराभव, रिपु[3]भंगें [4]प्रभुनियोगसिद्धि घडे, ।
ऐसें बहुधा [5]कर्णें कथितां [6]कर्णीं विशंक बाण पडे. ॥ २७

तो शर शिरे शरीरीं [7]सौरीच्या, [8]शिखरिच्या जसा [9]अशनी, ।
[10]नं शनि क्रूर अहिपति हि, रत ते [11]स्नेहींमृतीं, न [12]असृगशनीं. ॥ २८
झाला वृष [13]तनुभंगें [14]हततेज न हें नृपा! [15]गमो; त्यातें ।
[16]शररचितक्षत [17]भूषणहेतु, जसा [18]रंध्रयोग मोत्यातें. ॥ २९

---

१. आपला प्रभु ( स्वामी जो **भीम** त्याचें जें ) संकल्पद्वय ( दोन विचार–एक **क**र्णास मारण्याचा व दुसरा फक्त त्याचा पराभव करण्याचा–या संकल्पद्वयाचा वरील गीतींत उल्लेख आहे. या संकल्पांपैकीं **क**र्णास मारणें कीं पराभव करून सोडणें असा जो द्वंद्वविचार **भी**माच्या मनांत चालला होता, त्यांपैकीं कोणता विचार कायम करावयाचा हें जाणण्याकरितां. २. कानास. ही गीति **उत्प्रेक्षे**चें उदाहरण आहे. यांत 'जणों' इत्यादि शब्द नसल्यामुळें ही **प्रतीयमानोत्प्रेक्षा.** ३. कर्णाचा पराभव केल्यानें. ४. प्रभूचा (आपला स्वामी जो **भीम**, त्याचा) नियोग (आज्ञा) त्याची सिद्धि. ५. **भी**माच्या कानानें. (कर्तरी). ६. **क**र्णावर. ही **उत्प्रेक्षा** होय. ७. **क**र्णाच्या. सूरि=सूर्य, त्याचा मुलगा तो **सौ**री, त्याच्या. ८. पर्वताच्या. ९. वज्र. १०. या गीत्यर्धाचा अर्थ असा करावा:–**श**नि (व) अहिपति (सर्पाचा राजा, वासुकी) हे क्रूर खरे, पण ते देखील त्या शराइतके क्रूर नव्हेत. कारण ते असृगशनीं (रक्तपानीं) रत न; ते अनुक्रमें स्नेहाचे ( तेलाचे, पक्षीं मैत्रीचे ) व अमृताचे ठायीं रत. शनिग्रह शांतविण्याकरितां तैलादिक द्रव्यें ब्राह्मणांस दान देतात. या समजुतीस अनुसरून **श**नि स्नेहीं रत–असें कवीनें वर्णिलें आहे. वासुकी हा पाताळांतील राजा असून त्याचेजवळ अमृतकुंडें आहेत. ११. प्रस्तुत स्थलीं **क्रमालंकार** आहे. (मागें पृष्ठ १८९ टीप १६ पहा). **श**नि स्नेहीं व अहिपति हि अमृतीं–असा अन्वय. ही सर्व गीति **अधिक** नामक अलंकाराचें उदाहरण आहे. १२. असृक्+अशनीं=रक्तपानीं. १३. शरीर बाणविद्ध झाल्यानें. १४. निस्तेज. १५. नृपा! (राजा धृतराष्ट्रा!) (तो=कर्ण) हततेज झाला असें तुला न वाटो. प्रस्तुत स्थलीं **विशेषोक्ति** नामक अलंकार आहे. त्याचें लक्षण:– *'प्रसिद्धकारणकलापसामानाधिकरण्येन वर्ण्यमाना कार्यानुत्पत्तिर्विशेषोक्तिः.'* [रसगंगाधर.] म्हणजे प्रसिद्ध कारणें हजर असतांही कार्याची उत्पत्ति झाली नाहीं, असें वर्णन असलें म्हणजे **विशेषोक्ति** होते. प्रस्तुत स्थलीं 'तनुभंग' हें कारण असूनही 'हततेज' होणें हें कार्य घडलें नाहीं, असें वर्णन आहे. तस्मात् **विशेषोक्ति.** १६. शरांनीं केलेलें क्षत. १७. भूषणास कारण असें, भूषणप्रद, शरीरास शोभा आणणारें. या उत्तरार्धांत **विषम** नामक अलंकार आहे. *'कारणापासून स्वगुणविलक्षण (विरुद्ध) कार्योत्पत्ति'* हा **विषमा**चा एक प्रकार आहे. क्षतांपासून अभूषणप्रद असाच परिणाम व्हावयास पाहिजे होता. पण तसा न होतां तो

पळवी शल्य; [1]इतरथा होता तेव्हां चि कर्ण मरत रणीं; ।
[2]तरणी [3]तमांत झाला [4]सज्जन, न पिता [5]सहस्रकर [6]तरणीं. ॥ ३०
नसतां गोप[7] जसा दे व्याघ्र पशूंच्या भयास कळपाला, ।
कीं वायु ने दिगंतीं [8]वृक्षच्युत वाळला सकळ पाला, ॥ ३१
तैसा भीम कुरुबळ त्रासी, मारी, दिगंतरीं पळवी, ।
[9]ऐसें असुरबळमथन [10]शक्रें केलें, असें जना कळवी. ॥ ३२
भीमा वाराया [11]कुरुपति धाडी [12]बंधु पंधरा; [13]ज्याला ।
मी गज, हरिला शश किति? [14]देती सुतशोक [15]अंधराजाला. ॥ ३३
[16]नंदोपनंद, विकट, क्राथ, सह, विवित्सु मारिले स[17] हे; ।
उरले नव हि पळाले. यमदंडा कोण हो बळी साहे? ॥ ३४
सावध होतां कर्ण हि गांठी भीमासि तेधवा; [18]त्यांहीं ।
[19]शरवृष्टिहीं उडविलीं बळें, [20]तृणें जेंवि [21]उग्रवात्यांहीं. ॥ ३५
लोक म्हणति, 'दारुण रण, नेणों होईल आज काय कसें? ।
दोघे हि प्रबळ हठी, दिसतें हें युद्ध भीतिदायकसें.' ॥ ३६

---

भूषणप्रद झाला, असें वर्णन आहे. तस्मात् **विषम.** १८. वेज पाडण्याचा लाभ. मोत्यांस वेज पाडतात त्यामुळें त्यांची शोभा कमी होते असें नाहीं, तर त्यामुळें तीं दोरींत गोविलीं जातात व अलंकार बनतात—असा भाव.

१. न पळविता तर. २. नौका. ३. त्या क्लेशांत. ४. शल्य. ५. अन्वयः—तमांत (संकटसमयीं) तरणीं (तरून जाण्याकरितां) सज्जन (शल्य) तरणी (नौका) झाला; [कर्णाचा] पिता सहस्रकर (सूर्य) तरणी ('तरणी' हें सूर्याचें नांव—या नांवाप्रमाणें कर्णास 'तरणी'=नौका) झाला नाहीं—असा भाव. प्रस्तुत स्थलीं 'तरणी' शब्दावर 'नौका' व 'सूर्य' असा **श्लेष** आहे. ६. तारण्याविषयीं. ७. गोपाल, गुराखी. ८. वृक्षापासून गळून खालीं पडलेला. ९. अशाच प्रकारचें. १०. इंद्रानें. ११. दुर्योधन. १२. दुर्योधनाचे पंधरा बंधु. या सर्व शंभर बंधूंस मारण्याची भीमानें प्रतिज्ञा केली होती. १३. ज्याला गज मी [त्या] हरिला (सिंहाला) शश किति? अर्थात् कांहींच नव्हेत—असा भाव. १४. ते बंधु भीमाच्या हातानें मरण पावले व आपला बाप जो अंधराजा (धृतराष्ट्र) त्यास सुतशोक देते झाले. या गीतीच्या तृतीय चरणीं **काव्यार्थापत्ति** व चतुर्थचरणीं **पर्यायोक्त** आहे. १५. धृतराष्ट्राला. १६. वरील धृतराष्ट्रपुत्रांपैकीं मेलेल्या सहांची हीं नांवें. १७. सहा. १८. त्या कर्णभीमांनीं. १९. शरवृष्टींनीं. २०. गवतें. २१. प्रचंड वावटळींनीं. वात्या=वावटळ.

झांकी भीम वृषातें, रवितें घन जेंवि आपुल्या पटलें; ।
भीमासि कर्ण ताडी नवभल्लांहीं म्हणे, 'रणीं न टळें[1].' ॥ ३७
विंधी सप्तशरानीं त्यासि पुन्हां भीम, तो हि भीमातें, ।
आच्छादी बाणपटें, भीम हि त्या, युद्ध न धरि सीमा तें. ॥ ३८
मग कंकपत्रदशकें[2] ताडुनि पार्था[3], तदीय कोदंड ।
कर्ण च्छेदी भल्लें, तैं भासे मृत्युचा चि[4] तो दंड. ॥ ३९
तेव्हां कोपें कार्तस्वरपट्टविभूषितोग्रपरिघातें[5] ।
भीम प्रेषी, व्हाया पांचाळीशोकशांति[6] अरिघातें[7]. ॥ ४०
कर्ण प्रखरतरशरव्रातें[8] छेदी पळांत परिघास; ।
आलीकडे[9] चि रक्षा होय[10], न पडतां हि वन्हिवरि घांस[11]. ॥ ४१
केलें सज्ज दुजें धनु मनुजेंद्रें[12], तीव्र शर शरामागें ।
सोडूनि भीमसेनें वृष वृषभस्कंध झांकिला रागें. ॥ ४२
मग कर्ण कर्णमूळीं[13] ताडी बाणत्रयें पृथाजाला, ।
करितां[14] प्रतिकारा[15] जो समरीं भागेल तो वृथा ज्याला[16]. ॥ ४३
पांडव सोडी खर शर शरदर्ककरप्रभ[17] स्वरिपुघाता; ।

---

१. प्रतिज्ञेत अंतर पाडूं नको, पळून जाऊं नको. २. कंकपक्ष्याच्या पिसांनीं युक्त अशा दहा बाणांनीं. ३. **भी**मास. 'पार्थ'शब्द जरी नेहमीं **अर्जुन** या अर्थीं वापरतात, तरी तो **धर्म**, **भीम** व **अर्जुन** या तिघांसही लागू आहे. कारण **पृथे**चा (**कुं**तीचा) मुलगा तो **पार्थ**. ४. भाला. ५. कार्तस्वर+पट्ट+विभूषित+उग्र+परिघ=सुवर्णाच्या पट्ट्यांनीं शोभित अशा भयंकर परिघास. (परिघ=आयुधविशेष, कड्या लावलेला सोंटा.) ६. **द्रौ**पदीचें दुःखनिवारण. सभेंत **द्रौ**पदीस टोंचून बोलणारा **क**र्ण मेल्यानें तिच्या दुःखाची शांति होईल–असा भाव. ७. शत्रूच्या (**क**र्णाच्या) नाशानें. ८. अत्यंत तीक्ष्ण अशा शरसमूहानें. ९. अलीकडेच. थोड्याशा अंतरावर असतांनाच. १०. वन्हिवरि घास (गवत) न पडतां हि आलीकडे चि रक्षा होय=विस्तवावर पडण्यापूर्वीच त्या विस्तवाच्या दाहानें गवत भस्म होतें. 'छेदी' व 'रक्षा होय' यांत बिंबप्रतिबिंबभाव असल्यामुळें हा **दृष्टांत** अलंकार. ११. गवत. ही **अतिशयोक्ति** आहे. १२. **भी**में. १३. कानाच्या मुळांत. १४. शत्रूचा प्रतिकार करीत असतां जो [मनुष्य] समरीं भागेल (दमेल) तो वृथा ज्याला (व्यर्थ जन्मास आला)–असा अन्वय. **क**र्णानें **भी**मावर व **भी**मानें **क**र्णावर याप्रमाणें न भागतां एकमेकांवर शरप्रहार केलेला पाहून कवि म्हणतात कीं, असेंच पाहिजे. कारण शत्रूच्या माऱ्यास भिऊन मागें हटणाऱ्याचें जीवित व्यर्थ होय. १५. प्रतिक्रियेला. १६. जन्मला, जगला. 'झाला' असें पाठान्तर. १७. शरत्+अर्क+कर+प्रभ=शरदृतूंतील सूर्यकिरणांप्रमाणें कांतियुक्त.

वातासम जंव[1] दावी, समयीं यमसा[2] चि जाहला जाता. ॥ ४४
तो कर्णाचें आर्धीं कवच शरीर हि सुपुंख[3] शर महिला ।
भेदी; भोगवतीप्रति[4] जाय चि जाणों भजोनि परमहिला[5]. ॥ ४५
जेव्हां असें महाबळ भीम शरें दिनकरांगजा[6] ताडी, ।
तद्वेदना वृषातें क्षणभरि मोही, जसी गजा ताँडी[7]. ॥ ४६
क्षितिकंपें[8] पर्वतसा, स्वल्प चि तो प्रथम पांडुसुतरोपें[9], ।
कांपे कर्ण महाबळ, मग पुष्कळ आलिया प्रबलकोपें. ॥ ४७
नाराच पंचविंशति कर्णें, काळें[10] स्वकीय सेवकसे, ।
भीमाप्रति पाठवितां सुर भीति, न भीति मर्त्यदेव[11] कसे ? ॥ ४८
बाणामागुनि बाण प्रेषी, करि रिक्त कर्ण शत भाते; ।
अद्भुत शोभा पावे रविची तत्सुतशरोपहत[12] भा[13] ते.[14] ॥ ४९
शर सोडिले त्वरेनें समरीं वृषकेतुच्या[15] असे तातें; ।
झांकिति भीमा देवद्विजप्रिया[16], जेंवि शलभ[17] सेतांतें[18]. ॥ ५०
छेदी एकैकशरें ध्वज, सारथिमूर्ध[19], चाप तो कर्ण, ।
विरथ करी भीमातें; होय रणीं 'जय[20] महेश गोकर्ण !' ॥ ५१
हांसे भीम, मनिं म्हणे, 'जरि नसता कर्ण जिष्णुचा वांटा, ।

---

१. वेग. २. 'धाता–वाता' 'सम–यम' हा **अनुप्रास**चमत्कार श्रवणीय आहे. ३. चांगल्या मुठीचा. ४. भोगवती=नागलोकांतली नदी. गंगेचे तीन भाग होऊन ते स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ या तीन लोकांत गेले आहेत. त्यांचीं नांवें अनुक्रमें मंदाकिनी, भागीरथी आणि भोगवती अशीं आहेत. पृथ्वीरूपी परस्त्रीला बाणानें स्पर्श केला त्या पापाच्या क्षालनार्थ तो पातालगंगेंत स्नान करण्यास गेला–अशी **उत्प्रेक्षा**. ५. परस्त्री. ६. दिनकर+अंगज= सूर्यापासून उत्पन्न झालेला जो कर्ण त्याला. ७. मद्यविशेष. ८. भूकंपानें. ९. रोप=बाण. अन्वय–प्रथम पांडुसुतरोपें स्वल्प चि कांपे, मग आलिया (आलेल्या) प्रबलकोपें पुष्कळ कांपे. राग अनावर झाल्यामुळें कर्ण थरथर कांपूं लागला–असा भाव. १०. यमानें. ११. नरदेव (राजे). १२. तत्+सुत+शर+उपहत=त्या सूर्यपुत्राच्या शरांनीं नाश पावलेली अशी. १३. कांति. १४. अन्वय–ते (ती) रविची भा (कांति) तत्सुतशरोपहत (त्याचा जो मुलगा कर्ण, त्याच्या शरांनीं नाहींशी झाली) [तस्मात् ती] अद्भुत शोभा पावे. १५. वृषकेतु हें कर्णाच्या एका मुलाचें नांव. १६. देव आणि ब्राह्मण यांना प्रिय अशा. १७. टोळ. १८. पंतांनीं 'शेत' हा शब्द यमकाकरितां 'सेत' असा लिहिला आहे. १९. सारथ्याचें मस्तक. २०. 'हर हर महादेव !' असा जयशब्द झाला, असा भावार्थ.

कां टाकितों सुयश ? कां गुरुहृदयांतिल[1] न काढितों कांटा ? ॥ ५२
या कुरुसेनापतिच्या[2] देखत मर्दीन आजि कुरुसेना, ।
दयिता[3] प्रसन्न होइल मजवरि, अणि जिष्णुचें धनु[4] रुसेना.' ॥ ५३

---

## अध्याय तेतिसावा.[5]

(अर्जुनसंशप्तकयुद्ध.)

ऐसें मनांत आणुनि पांडव टाकी उडी रथावरुनीं, ।
दयितेची[6], मूर्तिमंती[7], कुरुहननाज्ञा[8], गदा करीं धरुनीं. ॥ १
त्यां श्रीमद्भीमाची[9] हृत करि अरिभटमदा गदाचंडी, ।
खंडी बल, बहु कांपवि, पडली जाणों सुदुःसहा थंडी. ॥ २
कुरुसेनेसीं घाली जेव्हां समरांगणीं गदा फुंगडी[10], ।
तैं काळदृष्टि[11] झडकरि पक्ष्मकपाटें[12] पहावया उघडी. ॥ ३
गज सार्धसप्तशत[13] त्या समरीं वधिले वृकोदरें सगदें[14]; ।
नग[15] देववरें[16] वज्रें मथिले, कीं गद[17] चिकित्सकें[18] अगदें[19]. ॥ ४
मारुतिनें[20] रथ शतशा, शतशा सादी[21] हि, पत्ति[22] ही शतशा ।

---

१. धर्मराजाच्या मनांतील. २. कर्णाच्या. ३. भार्या द्रौपदी. ४. कर्णास मारण्याचें काम जिष्णूच्या धनूचें. तेव्हां तें काम दुसऱ्यानें केल्यास त्यास राग येईल व तसें न करितां कुरुसेनाच मर्दिल्यास त्यास राग येणार नाहीं—हा भाव. भीमास विरथ केल्यामुळें त्यास फार राग आला व एकदम कर्णावर पडून त्याचा नाश करूं कीं काय असें भीमास वाटलें. पण इतक्यांत कर्णास मारण्याची प्रतिज्ञा अर्जुनानें केली याची त्यास आठवण झाली, व त्यानें आपला मोर्चा कौरवसैन्याकडे वळविला—इतका अर्थ या भीमाच्या भाषणांत ग्रथित केलेला आहे. ५. यांत मुळांतील ५४ व ५५ ह्या अध्यायांचा गोषवारा आलेला आहे. ६. द्रौपदीची. ७. मूर्तिमंत. ८. कौरवांस मारण्याची आज्ञा. गदा नव्हे तर द्रौपदीनें कौरवांस मारण्यास जी आज्ञा दिली, तीच गदारूपानें आली—असा भाव. ९. त्या श्रीमद्भीमाची गदाचंडी (गदारूपी चंडी—उग्र देवता) अरिभटमदा (शत्रुसैन्यगर्व) हृत करि (हरण करी); बल खंडी; बहु कांपवि—असा अन्वय. १०. 'फुगडी' शब्दानें गदेची अव्याहत गति ध्वनित केली आहे. ११. काळ (यम) डोळे वटारून पाहूं लागला; पुष्कळ लोक मरूं लागले—असा भाव. १२. पापण्यारूप कवाडें. १३. स+अर्ध+सप्तशत=७५०. १४. गदायुक्त अशा. १५. पर्वत. १६. इंद्रें. १७. रोग. १८. वैद्यें. १९. औषधानें. २०. भीमानें. २१. घोडेस्वार. २२. पायदळ.

मारुनि[1], रक्तें तटिनी[2] भरिल्या; उदकें हि वारिदें[3] न तैशा[4]. ॥ ५
तापविलें बळ सूर्यें भीमें हि, जसें हुताशनीं[5] चर्म[6]; ।
पावे संकोचं[7] तसें भक्तिज्ञानोदयीं[8] जसें कर्म. ॥ ६
अनिलें[9] जलदपटलसें[10], भीमबलें शत्रुसैन्य तें वितुळे; ।
एका ही सिंहासीं मदमत्त हि हस्तियूथ[11] कंवि तुळे[12]? ॥ ७
भंगुनि खलबल, चढला मग भीम रथीं वृषाकडे जाया; ।
तों कर्ण[13] हि, गजपतिला हरिसा, गांठी युधिष्ठिरा; राया! ॥ ८
बाणांहीं धर्मातें झांकी, हयरश्मिचालका[14] मारी, ।
भीम वृषावरि ये, विधिवरि[15] जैसा भूतपाल[16] कामारी[17]. ॥ ९
मागूनि भीम हाणी बाणानीं, कर्ण तेधवां परते; ।
शर तेजस्वी सोडी; पडती पार्थी[18] बहु व्यथाकर ते. ॥ १०
भीमासीं वृष झगडे, तों सात्यकि त्यासि शरगणें ताडी; ।
तन्हि तो कर्ण न मुरडे, बहु सायकवृष्टि[19] पांडवीं पाडी. ॥ ११
कृतवर्मा, कृप, शकुनि, द्रोणात्मज हे वृषासि रक्षाया, ।
रण करिति पांडवांसीं, जैसे हरि करिवरांसि भक्षाया. ॥ १२
प्रवरभट[20] परतले हें कळतां कुरुसैन्य[21] ही पुन्हां परते; ।
देवासुरसे[22] करिती कुरुपांडव युद्ध कीर्तितत्पर ते. ॥ १३

---

१. या गीतीत पंतांनीं आदियमक साधलें आहे. २. नद्या. ३. वारि+द=मेघानें. ४. वारिदें तशा तटिनी उदकें हि न भरिल्या—असा अन्वय. ५. अग्नींत. ६. चामडें. ७. संकोच पावे म्हणजे कमी होई. सैन्य कमी झालें—असा भाव. ८. भक्ति व ज्ञान यांचा उदय झाला असतां कर्म नाहींसें होतें, त्याप्रमाणें. ९. वायूनें. १०. मेघसमूहाप्रमाणें. ११. हत्तींचा कळप. १२. समान होई. समान होणार नाहीं, कमीच होईल—हा भाव. हा दृष्टांत व प्रश्नगर्भित अधिकालंकार. १३. 'तो कर्णहि' असें पाठांतर. १४. हय+रश्मि+चालक=घोड्यांचे दोरे चालविणारास (सारथ्यास). १५. ब्रह्मदेवावर. ब्रह्मदेवानें सरस्वतीस उत्पन्न केल्यावर त्यालाच तिच्याविषयीं पापवासना उत्पन्न झाली. ह्या बाबतींत शंकरांनीं ब्रह्मदेवाचा मोड करून त्रिशूळानें त्याचें एक शिर छेदून टाकिलें व त्याला चतुर्मुख केलें—अशी कथा आहे. १६. प्राणिमात्राचें पालन करणारा. १७. काम+अरि=शिव. १८. भीमावर. १९. बाणांचा पाऊस. २०. महान् योद्धे. २१. कर्ण मूर्च्छित झाला तेव्हां पळालेले सैनिक. २२. देवदैत्यांप्रमाणें.

उठलीं अमित कबंधें, [1]रक्ताच्या वाहिल्या [2]असीम नद्या; ।
तन्हि भट म्हणति परस्पर ‘हूं’ हाणा, घ्या, यशोरसीं मन द्या. ॥१४
[3]कौसुंभरंगरंजितवस्त्रानें शोभती जसी [4]महिला, ।
[5]हतकटकरक्तरंगें आली शोभा रणीं तसी [6]महिला. ॥ १५
संशप्तकवीरांचे पावति [7]सुगतिद्रणांत [8]असु [9]शर्मा; ।
[10]पार्थहरिपुढें गमला [11]शशसम, परि धरि भयासि न [12]सुशर्मा. ॥ १६
वेधी दशबाणानीं पार्थाला, [13]तदनु [14]तत्सहायाला, ।
[15]दक्षभुजीं तीं बाणीं ताडी. प्रभु भील[16] कां [17]सहायाला ? ॥ १७
एकें भल्लें ताडी [18]केतूतें, तेधवां [19]कपी कोपे, ।
गर्जे; त्या नादानें सेनेची स्मृति महाभयें लोपे. ॥ १८
ती सेना निश्चेष्टा होय, न [20]धृति मानसीं टिके कांहीं; ।
कपिच्या हाकांहीं [21]भी, जसि [22]भुजगी [23]मत्तकेकिकेकांहीं. ॥ १९
[24]कपिरवराहूपशमीं सावध [25]तेजस्विवीररवि झाले, ।
[26]जेंवि घनाच्या सरिनें क्षण शमले दाववन्हि न विझाले. ॥ २०

---

१. ‘रक्तांच्या’ असें पाठान्तर. २. अमर्याद. ३. कुसुंब्याच्या रंगानें रंगविलेल्या (तांबड्या) वस्त्रानें. ४. स्त्री. ५. मेलेल्या सैन्याच्या रक्ताच्या रंगानें. ६. ‘महिला=सती’ व ‘महिला= पृथ्वीला’–हें पंतांचें ठरींव यमक आहे. प्रस्तुत गीतींतील उपमेयांतल्या शृंगारानें रणवर्णनात्मक वीररसास बहार आली आहे, हें रसज्ञ ओळखतीलच. ७. चांगली गति देणाऱ्या रणांत. रणांत मरणाऱ्यांस स्वर्गप्राप्ति होते, या समजुतीस अनुसरून हें वाक्य आहे. ‘हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।’ (भगवद्गीता, अध्याय २।३७). ८. संशप्तक वीरांचे असु (प्राण) शर्मा पावति–अन्वय. ९. सौख्य, आनंद. १०. अर्जुनरूप सिंहापुढें. ११. सुशर्मा शशसम (सशाप्रमाणें) गमला–अन्वय. १२. पांडव अज्ञातवासांत असतां, विराटनगरावर हाच सुशर्मा चालून गेला होता. हा संशप्तकांपैकीं एक. १३. त्यानंतर. १४. कृष्णाला. १५. उजव्या बाहूवर. १६. भील=भिईल, डरेल. १७. सहन करायाला. १८. ध्वजातें. १९. अर्जुनाच्या ध्वजावरील मारुती. २०. धैर्य. २१. सैन्य भी–असा संबंध. २२. नागीण, सर्पीण. २३. मत्तमयूरशब्दांनीं. २४. कपि+रव+राहु+उपशम=कपिध्वनिरूप राहूचें उपशमन झालें असतां. २५. तेजस्वी वीररूपी रवि. हा परंपरितरूपकालंकार. २६. ज्याप्रमाणें न विझाले (पूर्णपणें विझून गेले नाहींत असे) व क्षण शमले (कांहीं काळपर्यंत दबून राहिलेले) दावाग्नि (अनेकवचन–वणवे) पुनः पेट घेतात, त्याप्रमाणें सैनिक मारुतीच्या गर्जनेनें कांहीं वेळ मूर्च्छित होऊन पुन्हां सावध झाले–असा स्पष्टार्थ.

तों [1]एकदां चि कोपे संशप्तकयोघसंघ करि [2]लगट, ।
जाणों [3]बळकल्पांतोदधि [4]विजयाचलवरासि करिल [5]गट. ॥ २१
भस्म चि करि, परि पडती [6]ज्वलदनलावरि पतंगसे भट ते, ।
झाले [7]यक्षहतकृपणसम शरहत निधिसमार्जुना झटते. ॥ २२
कोण्हीं [8]ईषा, कोण्हीं हयरथचक्रें, मुकुंदभुज धरिती; ।
बुडतां भवांत [9]तारकगुरुसेत्ववलंब [10]साधु ते करिती. ॥ २३
कोण्ही वीर रथावरि चढले, [11]जडले चि, ओढिती तनुतें, ।
धनुतें ध्याया झोंबति, परि भय वरिलें न [12]भूतिकान्तनुतें. ॥ २४
[13]सुगतिद [14]वदान्यवर नरनारायण दीनबंधु सांपडले; ।
म्हणउनि [15]काय तयांच्या ते [16]सद्गतिकाम भट गळां पडले. ॥ २५
चावावा [17]दहनाचा आत्मविनाशार्थ गांधिलीं [18]काय. ।
[19]शशकें कधींतरी [20]हरिमांसें [21]पुष्ट्यर्थ [22]रांधिलीं काय? ॥ २६

---

१. 'तो एकदाचि' असें पाठान्तर. २. लगट करणें=एकदम येऊन आंगावर पडणें, शरीरास शरीर लावणें. ३. सैन्यरूपी कल्पांत—समुद्र. ४. अर्जुनरूप पर्वतश्रेष्ठास. ५. गट करील=गिळून टाकील. ६. ज्वलत्+अनल=पेटणाऱ्या अशा अग्नीवर. ७. द्रव्यावरील समंधापासून मार खाल्लेल्या कृपणासारखे. यक्ष म्हणजे भूमिगत वगैरे द्रव्यावरील समंध. समंधाचें द्रव्य घेण्यास येणाऱ्या लोभी मनुष्यास जरी त्या पिशाच्चापासून त्रास झाला, तरी तो पुनः पुनः तें मिळविण्याचा प्रयत्न करितो; त्याप्रमाणें संशप्तक योद्ध्यांना जरी वरचेवर बाणांचा मार मिळे, तरी ते अर्जुनास धरण्यास पुनः पुनः झटत—असा अर्थ. येथें संशप्तक वीर हे कृपण, अर्जुन हा निधी आणि शर हे यक्ष. ही **पूर्णोपमा.** ८. इसाड. 'ईषा लांगलदंडः स्यात्'—अमर. प्रस्तुत स्थलीं रथाग्रभाग. ९. तारक+गुरु+सेतु+अवलंब=तारणारा जो मोठा सेतु त्याचा आश्रय. १०. गुरुसेत्ववलंब करणारे म्हणून साधु. ही **उत्प्रेक्षा** कृष्णाच्या पवित्रतेस अनुलक्षून आहे. कवि म्हणतात कीं ते संशप्तक कृष्णास मारण्यास धांवले नाहींत तर भवांत बुडतां (संसार-समुद्रांत बुडत असतां) तरण्याकरितां कृष्णरूपी पुलाचा आश्रय करितात. ११. कृष्णार्जुनांस चिकटले. १२. भूति+कांत+नुत=लक्ष्मीकांतानें स्तविलेल्या अशा अर्जुनानें. भूति=ऐश्वर्य—अर्थात् लक्ष्मी. १३. उत्तम गति देणारे, मुक्ति देणारे—असा भाव. १४. दानशूरांत श्रेष्ठ. १५. 'म्हणुनिच काय तयांच्या' असा अन्य पाठ. १६. सद्गति इच्छिणारे. तेविसाव्या व या गीतींतील आशय एकच आहे. १७. गांधिलीं (गांधील माश्यांनीं) आत्मविनाशार्थ (आपण मरण्याकरितांच) दहनाचा (अग्नीचा) काय (शरीर) चावावा. गांधील माशी जर अग्नीस चावण्यास धांवेल तर भस्म होईल. त्याप्रमाणें कृष्णावर धांवलेले संशप्तक मरतील—हा भाव. १८. देह. १९. शशकांनीं सिंहास मारिलें काय?—हा विचारण्याचा भाव. २०. सिंहाचीं मांसें. २१. अधिक बल

निजनाशार्थ चि पडले भट कृष्णाच्या गळां, [1]न तन्नाशा, ।
मरति [2]ज्वरार्त, न जगति [3]पूरवितां [4]दुग्धसर्पिरन्नाशा. ॥ २७
जैसा मत्त [5]मतंगज [6]झाडुनियां देह [7]हस्तिपक पाडी, ।
तैसा कृष्ण हि [8]निजभुजसक्त सुभट पाडितां स्वभुज झाडी. ॥ २८
निजभुज झाडुनि उडवी **संशप्तक** [9]शूरसूनुसुत दूर, ।
वाटे नक्र तटीं तो टाकी [10]क्षुब्धार्ककन्यकापूर. ॥ २९
**पार्थ** हि रथातळीं निज तेजें सकळ स्वशत्रुभट लोटी, ।
[11]स्वर्गाखालें ढकली [12]शक्र जसा [13]वेचतां [14]सुकृत कोटी. ॥ ३०
ज्याचा [15]नामोच्चारणनाद–प्रतिशब्द [16]नागपा [17]शासी, ।
कैसा वश होइल तो [18]गरुड महाभाग [19]नागपाशासी ? ॥ ३१
जाळिति **धनंजयाच्या** [20]शस्त्रज्वाला [21]अरातिकक्षातें; ।
रिपुबळ जिंकील कसें [22]परमेश्वरमान्ययुद्धदक्षातें ? ॥ ३२

---

येण्याकरितां. २२. शिजविलीं काय? अर्थात् शिजविलीं नाहींत. सिंहास मारून तन्मांस पचन करणें सशांस कधीं तरी साध्य आहे काय?–अर्थात् नाहीं. त्याचप्रमाणें **अर्जुनास** जिंकणें **सं**शप्तकांस अशक्य. ही गीति **अप्रस्तुतप्रशंसे**चें उत्तम उदाहरण आहे. हिलाच **अन्योक्ति** म्हणतात. या गीतींत **पर्यायोक्त** व **प्रश्न** हेही अलंकार आहेत.

१. **कृष्णाच्या** नाशाकरितां नव्हे. २. ज्वरानें पीडित. ३. दूध व तूप यांनीं मिश्रित अन्न ताप आलेल्या जनास दिल्यास तो मरतो. अपथ्य पदार्थांच्या सेवनानें रोगी मरतो. ४. दुग्ध+सर्पिः+अन्न+आशा=दुग्ध आणि सर्पि (तूप) यांहींकरून युक्त जें अन्न त्याची इच्छा. ५. हत्ती. ६. झटका देऊन. ७. महात. ८. आपल्या हातांस चिकटून राहिलेले. ९. **शूराच्या** मुलाचा मुलगा, **कृष्ण**. **वसुदेवाच्या** बापाचें नांव **शूर**. १०. क्षुब्ध+अर्क+कन्यका+पूर=क्षोभलेल्या **यमुनानदीचा** पूर. अर्ककन्यका=सूर्याची मुलगी, यमुना. ११. ‘स्वर्गाखालीं’ असें पाठान्तर. १२. इंद्र. १३. क्षीण होतां, खर्च होतां, सरून जातां. पुण्य क्षीण होतांच इंद्र मानवांस स्वर्गांतून पृथ्वीवर ढकलतो, या समजुतीस अनुसरून हें वाक्य आहे. (भगवद्गीता, अध्याय ९।२१ पद्य). १४. सुकृत=पुण्य. कोटी=उत्कर्ष, प्रकर्ष. सर्व पुण्य खर्च झालें असतां–असा भाव. १५. ज्याच्या नामोच्चाराच्या गर्जनेचा प्रतिध्वनि. येथें ‘ज्याचा नामोच्चारणनाद प्रतिपक्षनागपा शासी’ असा पाठभेद आहे. प्रतिपक्षनागपा=शत्रुरूप मोठ्या सर्पास, शेषास. १६. सर्पांच्या राजास, शेषास. १७. शासन करी. १८. स्वतः गरुड–असा अर्थ. १९. ही गीति **अन्योक्ती**चें उदाहरण आहे, व उत्तम सुभाषितरूपही आहे. २०. शस्त्ररूपी अग्निज्वाळा. २१. अराति+कक्षातें=शत्रुरूप गवतातें. २२. **परमेश्वरास (शिवास)** मान्य झालेला असा युद्धप्रवीण जो **अर्जुन** त्यातें. **प्रस्तुत स्थलीं किरातार्जुनयुद्धाची कथा अनुसंधेय आहे. [मोरोपंतकृत वनपर्व, अध्याय ३ पद्य.]**

जरि होति कोळ[1]से परि धनंजयीं पडति; टोळ[2] सेना कीं; ।
येथ[3] र[4]जीं रक्तीं वपु, तदधिक सुरतांत [5]घोळसे [6]नाकीं. ॥ ३३
संशप्तक भट वधिले [7]असिनालीकादिकीं च [8]जवळील; ।
[9]दूरील हि द[10]व कवळी, जवळील तृणांसि कां न कवळील? ॥ ३४
पार्थ म्हणे, 'कृष्णा! हा ऐसा र[11]थबंध कोण साहेल? ।
दा[12]रुणकर्मखलबलव्यसनीं जीवंत कोण राहेल? ॥ ३५
तुझिया [13]प्रसादपात्रें पार्थें चि स्वयश रक्षिलें आजी, ।
शक्र हि, गमे, श्रमेल चि, करितां संशप्तकांसवें [14]आजी. ॥ ३६
वधिले बहु; परि मागें पद हि न ठेविति, जसे वनीं [15]डांस; ।
झोंबति तुज्या भुज्यांस हि योगिमनोरा[16]जहंसनीडांस.' ॥ ३७
ऐसें वदोनि पार्थें त्या समयीं देवदत्त वाजविला; ।
कृष्णें हि पांचजन्यध्वनिनें ब्रह्मांडगोल गाजविला. ॥ ३८
[17]त्यां शंखांच्या नादें, जेंवि [18]अयश्चुंबकाचलें लोह[15], ।

---

१. अन्वयार्थः—(सैनिक) जरि कोळसे होति (जळून खाक होती) परि (तरि) [न भीतां व मागें न हटतां] धनंजयीं पडति; सेना टोळ कीं (जणों काय हें सैन्य म्हणजे अग्नीवर पडून नाश पावणारे टोळच होत). २. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'डोळसेना' असा शब्द आहे. पण तो हस्तदोष असावा. ३. येथ=येथें=या जगांत. किंवा ह्या रणांगणांत. अन्वयार्थ—येथ वपु रजीं रक्तीं घोळसे, नाकीं तदधिक (रज व रक्त यांपेक्षां अधिक किळसवाण्या अशा) सुरतांत (अप्सरादिकांच्या विलासांत) [वपु घोळसे] (निमग्न होई). ४. धुळींत. ५. घोळसणें=घुसळणें, दमविणें. हा शब्द पंतकृत द्रोणपर्व, अध्याय २२।६१ मध्यें आढळतोः—'जो घोळसी तुज, जसा सुरतीं अति-कामरस कलत्रास.' 'कोळसे' 'टोळसे' 'घोळसे' हा **अनुप्रास** ऐकण्यासारखा आहे. ६. स्वर्गीं. ७. तलवार व भाला इत्यादिकांनीं. असि=खड्ग, तलवार; नालीक=भाला, बर्ची. ८. जवळील भट वधिले—अन्वय. ९. दूरील हि तृणांसि दव कवळी—अन्वय. १०. वणवा, अरण्याग्नी. ११. रथाचें बंधन, रथास चालूं न देतां चहूंकडून कोंडून धरणें. १२. भयंकर आहे कर्म ज्याचें असें खलबल (दुष्टांचें सैन्य), त्याच्यामुळें उत्पन्न होणाऱ्या संकटांत. १३. प्रसादास (कृपेस) पात्र झाला आहे अशानें. (पार्थाचें विशेषण). १४. युद्ध. १५. गांधील माशा, रानमाशा. १६. योग्यांचीं मनेंच राजहंस, (श्रेष्ठ हंस) त्यांस नीड (घरटीं—आश्रयस्थान). [हा शब्द 'भुजांसहि' याचें विशेषण.] 'हंस'=पक्षिविशेष, परमात्मा, जीवात्मा, योगी. कृष्ण योगिजनांस आश्रयस्थान आहे—असा ह्या शब्दाचा भावार्थ. १७. 'त्या शंखाच्या नादें' असें पाठांतर. १८. लोहचुंबकाच्या पर्वतानें. लोहचुंबकाचा एक पर्वत आहे; व लोहचुंबकाची उत्पत्ति

हरिलें संशप्तकबलधैर्य, सकल सैन्य पावलें मोह. ॥ ३९
रिपुवीरपादबंधन करि नर योजूनि नागपाशास्त्र[1]; ।
समयीं स्फुरे[2] चि गुरुनें, जें कथिलें, करुनियां कृपा, शास्त्र. ॥ ४०
खलसेना[3] निश्चेष्टा केली बांधोनिया तिचे पाय; ।
काय यशःपय[4] द्याया[5] बांधियली फार मारकी गाय[6]. ॥ ४१
अहिर्पाशीं[7][8] रिपुसेना बांधुनि विवशा करी असी तो[9]; हें ।
उचित चि, कीं कर्मफलद[10] परमेश्वर सृष्टि बांधितो मोहें. ॥ ४२
तो पादबंध उचित चि, कीं निर्मर्याद[11] रिपु गळां पडती. ।
जाणों स्वाधर्माची[12] देती येथें चि वीर ते झडती[13]. ॥ ४३

---

त्या पर्वतांतून होते, अशी समजूत मुसलमानांचीही असावी, असें आरेबियन् नाइट्स्वरून वाटतें. १९. जेंवि अयश्चुंबकाचलें लोह हरिलें (आकर्षिलें जातें) [तेंवि] त्यां शंखांच्या नादें संशप्तकबलधैर्य [हरिलें] (नाहींसें केलें)—असा अन्वय.

१. या अस्त्राच्या योगानें सर्प उत्पन्न करून शत्रुसैन्यास बद्ध करून टाकितां येतें. २. ह्या गीत्यर्धांतील वाक्याचा सामान्य सिद्धांतपर अर्थ करून तें सुभाषित समजावें. ३. 'खलसेना निश्चेष्टा केलीच यशोर्थ बांधुनी पाय । दुग्धार्थ बद्ध करिजे गोपें जसि फार मारकी गाय ॥' असें पाठांतर. ४. यशोरूप दुग्ध. ५. तिनें द्यावें म्हणून. 'घ्याया' असें पाठान्तर. ६. ही **उत्प्रेक्षा** पंतांची असून फार सुरेख आहे. ७. 'दारुण कर्म अहितबल अहिपाशें दृढ निबद्ध करि तो हें । विश्व जसें कर्म फलद परमेश्वर बांधितो सुदृढ मोहें ॥'—असें पाठांतर. गीति ४१ आणि ४२, तशाच ४३ आणि ४४ ह्या एकार्थाच्या असून पंतलिखित प्रतींत यथानुक्रमें अंक घातलेले आहेत. परंतु ते नजरचुकीनें घातले गेले असावे. कारण दोन दोन गीतींचा अर्थ एक असून उपमाभेदही नाहीं, यास्तव पंतांनीं दिलेला अनुक्रमांक टाकून ४२,४४ ह्या गीति आम्ही पाठभेद म्हणून टीपेंत घेतल्या आहेत. अशीच योजना रा० पराडकर यांच्या प्रतींत केलेली आहे. ८. नागपाशांनीं. ९. तो [अर्जुन] अहिपाशीं बांधुनि रिपुसेना असी विवशा करी—अन्वय. १०. कीं (कारण) परमेश्वर [फक्त] कर्मफलद (कर्मफल देणारा. जो जितकें करील त्यास तितकें देईल. एक एका स्थितींत असून दुसरा अन्य स्थितींत असण्यास ईश्वर जबाबदार नाहीं. तर त्याचें कर्मच कारण होय—हा भाव) [व ईश्वर] मोहें (मायेनें, मायेच्या प्रेरणेनें) सृष्टि बांधितो. ११. ज्यांना मर्यादा (मान, गौरव) नाहीं असे. मर्यादा वगैरे न जाणतां ते कृष्णार्जुनांच्या गळां पडले म्हणून त्यांस ही शिक्षा झाली. १२. स्व+अधर्माची=आपण केलेल्या अपराधाची, कृष्णार्जुनांचा उपमर्द केल्याची. १३. प्रस्तुत स्थलीं **'अनुमान'** नामक अलंकार आहे. 'पादबंधन' व 'निर्मर्यादा' या दोन गोष्टींच्या अवलोकनानें अनुमान होतें कीं, यांत कार्यकारणभाव आहे. असल्या अलंकारांत 'जणों' इत्यादि शब्द जरी आले, तरी ही 'उत्प्रेक्षा' समजूं नये, असा पंडितराय जगन्नाथ यांचा अभिप्राय आहे.

बांधोनि पाय पांडव हाणी रिपु[1]वाहिनींसि [2]बाणकशा; ।
जाणों म्हणे, '[3]पुराणा [4]गुरुसि बळें आजि झोंबलांत कशा ?' ॥ ४४
तेव्हां वीर सुशर्मा सौ[5]पर्णास्त्रें करूनि शर [6]भारी, ।
सोडी, तों अमित गरुड झाले [7]अहिपाशनाशकर [8]भारी. ॥ ४५
गेले गरुडत्रासें भुजग दिगंतीं पळोनि वेगानें, ।
[9]अहिकृतताप जसा भवताप [10]अजितकीर्तिच्या निवे [11]गानें. ॥ ४६
भक्षिति गरुड, पळति अहि, [12]महिसहित हि [13]अहित कांपती धाकें, ।
[14]पक्षिपपक्षपवनरय भय दे, '[15]जय देव !' [16]म्हणितलें [17]नाकें. ॥ ४७
गेले नाग हि गरुड हि, संशप्तकसैन्य जाहलें मुक्त, ।
होय पुन्हा नरनारायण जिंकायासि सं[18]गरोद्युक्त. ॥ ४८
झांकी [19]संशप्तककृतनानाविधशस्त्रवृष्टि [20]वासविला, ।
[21]भासविला हाकानीं जय, तरि भी ना चि वाघ [22]आसविला. ॥ ४९
नेदी आंगा [23]लागों, छेदी शस्त्रें, उरःस्थळीं भेदी, ।
[24]ते दीन [25]श्रांत म्हणुनि दे दी[26]र्घस्वाप [27]नरें धनुर्वेदी. ॥ ५०

---

१. शत्रुसेनेस; (पक्षीं) वाहिनी=घोडी. २. बाणरूप चाबूक. ३. नारायण (विष्णु) हा ब्रह्मदेवाचाही पिता असल्यामुळें त्यास 'पुराणा गुरु' असें म्हटलें आहे. ४. कृष्णास. ५. गरुडास्त्रानें. ६. अभिमंत्रित करी. ७. नागबंधनांचा नाश करणारे. ८. भा+अरी=प्रकाशाचे शत्रु. प्रभाहर–पंत. आकाशांत अमित गरुड उत्पन्न झाल्यामुळें पृथ्वीवर सूर्यप्रकाश पडेनासा झाला म्हणून 'भारी' ह्या विशेषणाचें प्रयोजन. ९. सर्पांनीं दिलेलें दुःख. १०. विष्णूच्या नामसंकीर्तनाच्या. अजित=अजिंक्य, विष्णु, शिव. प्रस्तुत स्थलीं विष्णु असा अर्थ करावा. अन्वयः–जसा अजितकीर्तिच्या गानें भवताप (संसारताप) निवे (शमे) [तसा] अहिकृतताप [निवे]. ११. गायनानें. १२. पृथ्वीसहितही असे. १३. दुष्ट लोक. १४. पक्षिप+पक्ष+पवन+रय=गरुड+पंख+वायु+वेग=गरुडाच्या पक्षवायूचा वेग. १५. भयानें व आश्चर्यानें 'जय देव!' म्हणाले–असा भाव. १६. हें रूप जुनें आहे. १७. स्वर्गानें (स्वर्गस्थ लोकांनीं–असा भाव). १८. संगर+उद्युक्त=युद्धाविषयीं उत्सुक. १९. संशप्तकांनीं केलेली नानाप्रकारच्या शस्त्रांची वृष्टि. २०. अर्जुनाला. २१. (शत्रूंनीं) हाकानीं (मोठ्यानें ओरडून) जय भासविला (आपलाच जय झाला, असें खोटेंच ध्वनित केलें) तरि वाघ आसविला भीनाचि. येथें शत्रुसेना हें आसविल आणि अर्जुन हा वाघ होय. अप्रस्तुतप्रशंसा अलंकार. २२. आस्वलाला. कोठें कोठें आस्वलाला 'आसविल' म्हणतात. हें रूप पंतकृत सभापर्व, अध्याय ५।६५ मध्यें आलें आहे. २३. शस्त्रें आंगा लागों नेदी–असा अन्वय. २४. पंत उत्प्रेक्षा करितात कीं, ते वीर मेले

तेव्हां वीर सुशर्मा हाणी शर जिष्णुच्या [१]सकवचोरा; ।
पा[२]र्थाचें मन त्याला लाभे जैसें निधान न[३]व चोरा. ॥ ५१

सुदृढा हि उरा फोडी ती[४]क्ष्णेषु, जसी म[५]होपला टांकी; ।
[६]दुःसहशरप्रहारव्यथितमना पार्थ लो[७]चनें झांकी. ॥ ५२

'मेला अर्जुन; मेला; झाला जय;' म्हणति गर्जती कटकें; ।
वाद्यें वाजविति सुखें, [८]न गमे स्वप्नांत जोडिलें लटकें. ॥ ५३

अर्जुन सावध झाला [९]संशप्तकवाद्यसिंहनादानीं, ।
कीं हरि करि[१०]नादानीं खवळे, प[११]न्नग जसा [१२]धनादानीं. ॥ ५४

[१३]ऐंद्रास्त्रातें [१४]ऐंद्रि प्रकट करी, तों असंख्य शर वी [१५]तें; ।
[१६]तैं सर्व हि कर जिंकी, भी बा[१७]णाश्रित तमिस्र न रवीतें. ॥ ५५

चवदा सहस्र [१८]सादी, गज तीन सहस्र, रथ सहस्र दश, ।
वधिले पार्थें; तेव्हां म्हणति तयाला 'भला! भला!' त्रि[१९]दश. ॥ ५६

तऱ्हि पार्थासि न सेना त्यजिति, म[२०]धुहरासि जेंवि स[२१]रघाली; ।

---

नाहींत, तर ते फार थकले होते म्हणून अर्जुनानें त्यांस निजवून विश्रांति दिली. २५. थकलेले. २६. दीर्घनिद्रा. २७. पार्थ.

१. स+कवच+उर=कवचसहित उराला. २. 'पार्थाचें उर त्याला लाभे' असा पाठभेद. ३. 'नव' (नवें) हें 'निधान' (ठेवा) याचें विशेषण. ४. तीक्ष्ण+इषु=तीक्ष्ण बाण. ५. महा+उपल=मोठ्या दगडास. ६. सोसण्यास कठीण अशा बाणांच्या माऱ्यानें पीडित आहे मन ज्याचें असा. हें अर्जुनाचें विशेषण. ७. लोचनें झांकी=(भोवळ आल्यामुळें) डोळे झांकी. ८. स्वप्नांत जोडिलें (जोडिलेलें, मिळविलेलें) लटकें (खोटें) [होय, हें त्यांस] न गमे. अर्जुन मेला हें स्वप्नांतील आनंदाच्या गोष्टीप्रमाणें खोटें होय; हें त्या ओरडणाऱ्या संशप्तकांस समजलें नाहीं—असा भाव. ९. अर्जुन मेला अशा उद्देशानें संशप्तकांनीं शंखभेरी इत्यादि जीं वाद्यें वाजविलीं त्यांच्या नादानें. १०. हत्तीच्या गर्जनांनीं. ११. संचित धनावर सर्प बसलेला असतो व धन हरण करणाऱ्यांस तो दंश करितो—अशी समजूत आहे. १२. धन+आदानें=द्रव्य काढते समयीं. १३. इंद्र ज्या अस्त्राची देवता आहे अशातें. १४. इंद्रपुत्र अर्जुन. १५. ऐंद्रास्त्र. १६. तैं (तेव्हां) बाणाश्रित तमिस्र [रवीचे] सर्व हि कर जिंकी (सर्व किरणांस नाहींसें करी), रवीतें न भी. १७. बाणाचा आश्रय करणारा अंधकार. १८. घोडे. माहुत, स्वार, सारथी. 'वाजी' असें पाठांतर. १९. देव. २०. मध नेणारास. २१. सरघा+आली=मधमाशांचा समुदाय. अनुरूप गीत्यर्धः—तो भीष्मावरि कोपें सुमधुहराउपरि जेंवि सरघाली. । (भीष्मपर्व, अध्याय ४।३९).

जो तो विजयीं सायकवृष्टि[1], नगीं[2] मेघ जेंवि सर[3] घाली. ॥ ५७
शकुनि उलूक सुयोधन कृतवर्मा द्रौणि कर्ण कृपयोध।
संशप्तकसेनेला बळ देति, जसे नदीस सुपयोध[4]. ॥ ५८

---

## अध्याय चौतिसावा[5].

सृंजय वधितां, केला विरथ शिखंडी कृपें सचर्मासि[6], ।
धांवे आचार्यावरि[7] तो आपुलिया स्मरोनि धर्मासि[8]. ॥ १
मंत्रें भूत, तसा तो त्या विप्रें सायकोत्करें[9] खिळिला[10], ।
झाला निश्चेष्ट[11], जैसा[12] क्षुधिताजगरें बळाढ्य ही गिळिला[13]. ॥ २
धृष्टद्युम्न कृपावरि धांवे हार्दिक्य[14] तों तया अडवी; ।
सायकजालामध्यें कृतवर्मा त्या महारथा दडवी[15]. ॥ ३
पार्षत[16] कृतवर्म्याचें छेदुनि शरजाल, सारथी वधुनी, ।
कुरुबल मथितां निर्मी रक्ताची[17], ती भरे अतीव, धुनी[18]. ॥ ४
मग चित्रकेतुचा सुत वीर सुकेतु स्वयें कृपाचार्या ।
वारी; पळे शिखंडी; आला[19] प्राणात्ययीं[20] भला कार्या. ॥ ५
वधिला सुकेतु विप्रें[21], भग्न[22]गजसहाय गज जसा हरिनें[23], ।
अरि नेले चि दिगंतीं आचार्यें, दैत्यभट जसे हरिनें[24]. ॥ ६

---

१. बाणांचा पाऊस. २. पर्वतावर. ३. पावसाची सर. ४. उत्तम जलसंचय. पयोध=सागर, मेघ, जलाशय–असे अर्थ आहेत. ५. ह्यांत मुळांतील ५६ व्या अध्यायाचा सारांश आला आहे. ६. स+चर्म+असि=ढाल व तरवार ज्याच्या हातांत आहे असा. हें 'शिखंडी'चें विशेषण. ७. कृपाचार्यावर. ८. क्षत्रियधर्मास. ९. सायक+उत्कर=बाणसमूहानें. १०. खिळून टाकिला, हालेनासा केला. ११. चलनरहित. १२. जसा क्षुधिताजगरें (भुकेलेल्या अजगरानें) गिळिला (गिळिलेला) बळाढ्य ही (बळवान् मनुष्य देखील) [निश्चेष्ट होतो, तसा] निश्चेष्ट झाला–असा अन्वय. १३. गिळलेला. १४. कृतवर्मा. 'हार्दिक्य तो तया अडवी'–असें पाठान्तर. १५. लपवी. १६. धृष्टद्युम्न. १७. रक्ताची (जी धुनी) [निर्मी] ती अतीव भरे. १८. नदी. १९. यास कर्ता 'सुकेतु'. २०. प्राण+अत्यय=मरणसमय. २१. कृपाचार्यानें. २२. हरिनें (सिंहानें) जसा भग्नगजसहाय (सिंहाशीं लढून पराभूत झालेल्या हत्तीच्या साहाय्यास येणारा दुसरा) गज भग्न [करावा तसा] विप्रें सुकेतु वधिला–असा अन्वय. २३. सिंहानें. २४. विष्णूनें.

धर्म[1] कृपावरि उठला, त्यावरि गुरुपुत्र धांवला यमसा, ।
सेना नृपा न सोडी, जेंवि प्राचेतसाश्रमा[2] तमसा[3]. ॥ ७
करि शरवितान[4] गगनीं; कोण न त्या द्रौणिलाघवा[5] लाजे ? ।
'धन्य' म्हणति सुरमुनिजन, धाले[6] पाहोनि लाघवाला[7] जे. ॥ ८
सात्यकि, युधिष्ठिरप्रभु, पांचाळ, द्रौपदेय हे त्यांतें[8], ।
पीडिति शस्त्रांहीं, निजवीर्यें आप्तांसि तापदेत्यातें. ॥ ९
शैनेयादि[9] भटांतें ताडुनि तो द्रौणि धन्व[10] धर्माचें ।
तोडी, सोडी बहु शर, करि भेदन कवचगुप्तमर्माचें[11]. ॥ १०
तों अश्वत्थाम्याचें सात्यकिनें चाप खंडिलें क्षिप्रें[12], ।
तेव्हां शैनेयाच्या सूताला शक्तिनें[13] वधी विप्रें[14]. ॥ ११
घेउनि धनुष्य दुसरें, सोडुनि शर सात्यकीस झांकि[15] रणीं, ।
मध्यान्हीं सूर्य जसा प्रलयीं रविकांतसन्नगा[16] किरणीं. ॥ १२
सात्यकि[17] धीर धरी, परि हरि[18] धरिति न धीर एक ही पळ ते; ।
पावे अंता यंता[19] म्हणउनियां स्वैर जाहले पळते[20]. ॥ १३
धर्माज्ञेनें धावति धर्माचे त्या द्विजावरि पुरोग[21]; ।
परि न गणिले चि तेणें, पथ्यैकपरें[22] जसे स्वरिपु रोग. ॥ १४

---

१. धर्मराजाला. २. प्राचेतस+आश्रमा=वाल्मीकीच्या आश्रमाला. ३. तमसा नदी. हिच्या कांठीं वाल्मीकीचा आश्रम होता. ४. शरांचें छत. ५. अश्वत्थाम्याच्या हस्तचापल्यास. ६. संतोष पावले. ७. कौशल्याला. ८. अश्वत्थाम्यातें. ९. सात्यकी आदिकरून वीरांना. १०. धनुष्य. ११. चिलखतानें आच्छादिलेल्या मर्मस्थानाचें. १२. लौकर. १३. आयुधविशेष. १४. द्रोणपुत्र. १५. यास कर्ता मागच्या गीतींतील 'विप्र'शब्द. १६. सूर्यकांतपर्वताला. (प्रलयकालीं सूर्याच्या प्रखर किरणांनीं तो पर्वत दिसेनासा होतो. त्याप्रमाणें तो झांकी—असा भावार्थ). 'सन्नग' ह्यांतील 'सत्' ह्या पदाचें स्वारस्य दिसत नाहीं. सूर्यकांताचा पर्वत इतकीच विवक्षा येथें आहे. तो बरा किंवा वाईट ह्या गोष्टीला येथें महत्त्व नाहीं. १७. सात्यकी जागा सोडूं इच्छित नव्हता, पण त्याच्या रथाचे घोडे मुळींच थांबले नाहींत—असा भावार्थ. १८. घोडे. १९. सारथी. २०. यंता (सारथि) अंता पावे म्हणउनियां, ते [हरि] स्वैर पळते जाहले—असा अन्वय. २१. अग्रेसर. २२. पथ्यानें राहणारानें. पथ्याचें पूर्णपणें सेवन करणारा मनुष्य आजूबाजूस हवेमध्यें संचार करणाऱ्या रोगबीजांस आपल्यावर जसा परिणाम करूं देत नाहीं, त्याप्रमाणें—असा ह्या उपमेचा अर्थ आहे.

नाचे अश्वत्थामा धर्मपुरोगांसि पाहतां हांसे; ।
[1]टाकी त्यांवरि [2]असुहरशर यम जैसे [3]गतायुवरि [4]फांसे. ॥ १५
प्रेरिति शरगण [5]धृतिहृतिदक्ष [6]पृथासूनुचे [6]पुरोगम जे, ।
झाले विफळ गुरुसुतीं, रंभेचे श्री[7]शुकीं जसे [8]गमजे. ॥ १६
[9]द्रौणिप्रतापतपनें [10]तापविलें सैन्य [11]दैन्य [11]घे, न [12]धजे; ।
कांपति भट, [13]हटकोनि [14]क्षम [15]हरिचा ही करावया [16]वध जे. ॥ १७
बळ झांकिलें समस्त हि धर्माचें द्रौणिनें [17]शरवितानीं, ।
[18]द्विजविशिखवृष्टिनीं भट [19]वरिले, हरिहर जसे [20]सुकवितानीं. ॥ १८
हयरथगजांवरूनि क्षितिवरि बलशालि-वीर बहु खचले; ।
द्रौणिपुढें धर्माचें [21]बल, [22]सबला [22]विधिपुढें तसें, न चले. ॥ १९

---

१. 'टाकी त्यावरि' असा रा० **पराडकर** यांच्या प्रतींत पाठ आहे. २. प्राणहरण करणारे शर. ३. गत+आयु+वरि=आयुष्य संपलेल्यावर. ४. **यम**पाश. मृतजनांस **यम** किंवा **यमा**चे दूत पाशबद्ध करून नेतात, अशी समजूत आहे. ५. धैर्य हरण करण्याविषयीं दक्ष. ६. **पृ**थासूनुचे (**ध**र्मराजाचे) पुरोगम जे धृतिहृतिदक्ष शरगण प्रेरिति [ते] गुरुसुतीं विफळ झाले-असा अन्वय. ७. **शुक** हा **व्यास** व शुकीरूपी **घृ**ताची अप्सरा यांचा मुलगा. हा जन्मतःच वैराग्यशील असून जन्मल्याबरोबर तपश्चर्येस निघून गेला. हा अखंड तपश्चर्या करीत असतां याच्या तपाचा भंग करण्याकरितां **इंद्रा**नें **रंभे**स पाठविलें. तिनें नृत्य, गीत, वाद्य, शृंगारलीला इत्यादिकांनीं **शु**कास मोहांत पाडण्याचा यत्न केला, पण जितेंद्रिय **शु**क तिला वश झाला नाहीं, व **रं**भेस हिरमुष्टी होऊन परत जावें लागलें-या कथानकाकडे प्रस्तुत स्थलीं कटाक्ष आहे. ८. नखरे. ९. अश्वत्थाम्याच्या प्रतापरूपी सूर्यानें. १०. तापविलेलें. ११. सैन्य हैराण होऊन गेलें. १२. युद्ध करण्यास न धजे. १३. हटकोनि=(१) हटकून, खात्रीपूर्वक. (२) लढाईस आह्वान देऊन. (३) शिवीसारखा एकादा मर्मभेदक शब्द बोलून. १४. समर्थ. १५. **इं**द्राचाही. किंवा-सिंहाचा. १६. पूर्वी **इं**द्रासही जिंकण्यास समर्थ; प्रस्तुत **अश्वत्थाम्या**शीं लढण्यास असमर्थ; अशा परस्परविरुद्ध गुणांचें वर्णन केलें आहे म्हणून हा **विरुद्धगुणन्यास** (Contrast) अलंकार. यांत **अश्वत्थाम्या**चें आधिक्य विशेष वर्णिलें आहे म्हणून हा **अधिका**लंकार. १७. बाणरूपी चांदव्यांनीं. १८. अश्वत्थाम्याच्या शरवृष्टींनीं. १९. वश केले, निवडून काढिले, पसंत केले. जसे सुकवितानीं (कर्तृपद) हरिहर [वरिले,] तसे द्विजविशिखवृष्टिनीं भट वरिले-असा अन्वय. कवीच्या म्हणण्याचा आशय हा कीं, उत्तम कवितेचा विषय म्हटला म्हणजे **शिवविष्णु**कथा, तसेंच बाणांचा उत्तम विषय म्हणजे योद्धा. २०. उत्तम कवितांनीं. २१. 'धर्माचें बल' ह्या शब्दप्रयोगांत **श्लेष** आहे. धर्माचें बल=धर्मराजाचें सैन्य; (पक्षीं) पुण्याईचा जोर. २२. बलवत्तर दैवापुढें.

द्रोणप्रियशिष्य नृप क्षोभोनि द्रौणिला म्हणे, 'गुरुजा! ।
कुरु ज्या दुर्मतिला वश तूं हि तिला, बरि न हे, जसी कु-रुजा.॥ २०
तुज 'गुरु' म्हणतों आम्ही, परि तूं अस्नेह अकृप अकृतज्ञ. ।
गुरुमत जतन करिति जे त्यांला चि 'सुपुत्र' म्हणति जन तज्ज्ञ. ॥ २१
मजला चि वधूं पाहसि पुरुषव्याघ्रा ! स्वसिक्तशुचितरुची ।
शास्त्रज्ञमता रक्षा बरि, न प्राकृतमतें, त उचित-रुची. ॥ २२

---

१. धर्म. २. गुरुपुत्रा! ३. अन्वयार्थ:-ज्या दुर्मतिला कुरु (दुर्योधन) वश [असे] तिला (त्याच दुर्मतिला) तूं हि [वश असति]. हे (ही दुर्मति) जसी कुरुजा (दुष्टरोग) [तसी] बरि न (चांगली नव्हे-दुष्टरोगाप्रमाणें त्याज्य आहे-असा भाव.) 'कुरु' शब्द प्रस्तुत स्थलीं कौरव या अर्थी वापरला आहे. ४. पांडवांचा नाश करण्याविषयींची जी दुष्टबुद्धि तिला. ५. दुष्टरोग. रुजा=रोग. हा कोणताही असला तरी वाईटच, म्हणून येथील 'कु' हें विशेषण विशेष उपयुक्त दिसत नाहीं. 'कुरु ज्या' 'कुरुजा' हा छेकानुप्रास श्राव्य आहे. ६. स्नेहरहित, कृपारहित व केलेले उपकार न स्मरणारा-असा शेवटील तीन शब्दांचा अर्थ. ७. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. जे पुत्र बापाच्या आचाराविचाराप्रमाणें वागतात, तेच सुपुत्र होत-असा आशय. गुरुमत=गुरूची आपल्याविषयींची बुद्धि, आपल्याशीं केलें जाणारें सदय वर्तन. ८. सुपुत्रलक्षण जाणणारे. तज्ज्ञ=तें जाणणारे, विद्वान्, शास्त्रज्ञ. ९. पुरुषश्रेष्ठा. 'सिंहशार्दूलनागाद्याः पुंसि श्रेष्ठार्थवाचकाः'-अमर. पुल्लिंगी शब्दांपुढें सिंह, शार्दूल (वाघ), नाग इत्यादि शब्द किंवा तत्समानार्थक शब्द असल्यास 'श्रेष्ठ' असा अर्थ होतो. 'पुरुषा' पुढील 'व्याघ्र' हें उपमान क्रूरत्वाचें किंवा शूरत्वाचें सूचक आहे, असें येथें समजावयास हरकत नाहीं. १०. आपण सिंचन करून पोसलेल्या शुद्ध वृक्षाची. ११. स्वसिक्तशुचितरुची शास्त्रज्ञमता (पंडितांस मान्य अशी) रक्षा (रक्षण) बरी; प्राकृतमतें [जी रक्षा] त (त=ते; संस्कृतसंधिनियमास अनुसरून 'ते' चा 'त' झाला आहे) [तुला] उचितरुचि (अभिलाष करण्यास योग्य) न (नाहीं)-असा अन्वय. आपण स्वतः पाणी घालून वाढविलेल्या वृक्षाची रक्षा योग्य असते व अयोग्यही असते. योग्य कोणती? तर जी विद्वानांस मान्य ती, अर्थात्-रक्षा म्हणजे रक्षण करणें. अयोग्य कोणती? तर जी सामान्य लोकांस पसंत ती, अर्थात्-रक्षा म्हणजे राख किंवा भस्म. वृक्षाची राख करणें म्हणजे तो जाळून टाकणें हें अयोग्य. सारांश, तुला जिची आवड आहे अशी 'रक्षा' म्हणजे सामान्य लोकांस पसंत असलेली 'राख' (नाश) योग्य नाहीं. येथें 'शास्त्रज्ञमता रक्षा, बरि न प्राकृतमतें, न उचित रुची' असा पाठ आहे. त्याचा स्वीकार केल्यास अन्वयार्थ पुढीलप्रमाणें:—स्वसिक्त-शुचितरुची रक्षा शास्त्रज्ञमता (शास्त्यांस किंवा पंडितांस मान्य) [असते],—प्राकृतमतें [ती रक्षा] बरी न. [पण ही प्राकृतांची] रुची उचित न. धर्माच्या म्हणण्याचा भावार्थ असा कीं-आपण वाढविलेल्या उत्तम वृक्षाचें रक्षण करून त्याच्या फळाफुलांचा लाभ घेणें हें योग्य होय, असा पंडितांचा अभिप्राय आहे. मूर्खांना तें संमत नाहीं, त्यांना झाडाची राख करणेंच

अध्ययन दान[1] तप हें विप्राचें कर्म वेदसिद्ध; रणीं[2] ।
लववावें धनु, धर्मे रक्षावी क्षत्रियें सदा धरणी. ॥ २३
तें निज[3]कर्म त्यजिलें, वरिलें त्वां चाप पाप जोडाया, ।
तूं ब्राह्मणब्रुव[4] ध्रुव[5], वर्तसि सुख[6]हेतुसेतु मोडाया. ॥ २४
परधर्मस्वीकारें, तूं निजधर्माचिया परित्यागें, ।
मज विप्राधम गमसी प्रणत[7]जनपराभवें हि अत्यागें[8]. ॥ २५
तूं ब्रह्मबंधु[9] धर्मभ्रष्ट कसें रक्षिसील[10] पाहेन, ।
मारीन कौरवांतें तुज देखत; मी जयासि लाहेन[11].' ॥ २६
धर्माचें वचन असें परिसे गुरुपुत्र साधु[12]मानद तो, ।
चित्तांत म्हणे, 'सत्य चि धर्मज्ञ अजातशत्रु हा वदतो.' ॥ २७
उत्तर न दे चि करि शरवृष्टि यथा[13]पूर्व जन्हि खिजे[14] पार्थ[15]; ।
वृष्टि करी च, न राहे प्रावृड्[16]घन जेंवि जरि भिजे सार्थ[17]. ॥ २८
असुहर[18]खरतरशरधरगुरुपुत्रा धर्म पाठि[19] दे, चुकवी; ।
दे[20] फटकाळा[21] काळा[22] टाळा, पाळावया[23] नया सु-कवी. ॥ २९

---

आवडतें. पण हें त्यांचें मत अयोग्य होय. सारांश, धर्माच्या म्हणण्याचा भाव असा कीं, द्रोणाचार्यांनीं आम्हांला मोठ्या प्रेमानें वागविलें व वाढविलें. असें असून तूं आमचा नाश करूं पाहतोस हें अयोग्य होय. १२. रक्षण. १३. अज्ञजनांच्या मतें. भस्मासि रक्षा म्हणतात–पंत. १४. येथें 'त्वदुचितरुची' असें पद असतें, तर विद्यमान पाठांतील प्रामादिक रचना टळली असती.

१. दान घेणें व दान देणें. २. क्षत्रियें रणीं धर्मे (न्यायानें, अकारणीं नव्हे) धनु लववावें (युद्ध करावें) [व] सदा धरणी रक्षावी–अन्वय. वेदाध्ययन विप्राचें कर्म व युद्ध क्षत्रियाचें कर्म–हा भाव. ३. ब्राह्मणकर्म. ४. ब्राह्मण म्हणविणारा परंतु ब्राह्मणासारखीं कर्में न करणारा, केवळ नांवाचा ब्राह्मण. ५. खरोखर. ६. सुख होण्यास कारणभूत जो धर्मसेतु तो. ७. शरण आलेल्याचा पराभव केल्यामुळें. ८. अति+आग=मोठा अपराध. ९. ब्राह्मणाधम. 'बंधु' शब्द समासाच्या शेवटीं आल्यास केवळ नांवाचा, अधम, त्या वर्गांत नीच, असा अर्थ होतो. उ० क्षत्रबंधु इत्यादि. १०. कौरवांतें कसें रक्षिसील? 'कसे रक्षिसील' असें पाठान्तर. ११. पावेन. लाहणें=लाभणें, प्राप्त होणें. १२. साधुजनांस मान देणारा. साधुजनाच्या गौरवास ओळखणारा अश्वत्थामा. या विशेषणाचें प्रयोजन पुढील गीत्यर्ध. १३. पूर्वीप्रमाणें. १४. चिडे. १५. धर्मे. १६. वर्षाऋतूंतील मेघ. १७. सौदागरांचा (व्यापाऱ्यांचा) समुदाय. १८. प्राण हरण करणाऱ्या आणि अतिप्रखर अशा बाणांना धरणाऱ्या अश्वत्थाम्यास. १९. पाठ दाखवून पळून जाई. २०. सुकवी नया पाळावया फटकाळा (दुष्ट) काळा (यमास, मृत्यूस) टाळा दे–असा अन्वय.

कुरुपतिहित गुरुसुत करि परिभव, परि नृप नै कुरुकटक रक्षी, ।
गृहरक्षणा विझवितां उदकें स्नेहाग्नि जेंवि गृह भक्षी. ॥ ३०
पांचाळचेदिकैकयबलवेष्टित भीम वारिला कर्णे, ।
शर सोडिले तयावरि गिरिवरि जैसीं पयोधरें अर्णे. ॥ ३१
कर्णापुढोनि तेव्हां समर न करितां चि वीर भीम निघे; ।
त्यजि जिष्णुभाग म्हणउनि, म्हणति अतत्वज्ञ लोक 'भी मनिं घे.' ॥ ३२
कुरुकटकांत वृकोदर शिरला, संशप्तकांत तो जिष्णु, ।
पांचाळांत वृष, जसा दितिकुलजांत स्वयें महाविष्णु. ॥ ३३

---

२१. दुर्वृत्त जो काळरूप गुरुपुत्र त्यास. २२. नया पाळावया म्हणजे दूरदर्शीपणा किंवा धोरण राखण्याकरितां. आपण जर असेंच अश्वत्थाम्याशीं युद्ध करावें तर आपल्याला तो भारी आहे, त्यामुळें येथें गुंतून राहण्यांत अर्थ नाहीं. त्यापेक्षां याला टाळून बाकीच्या कौरवसैन्याचा समाचार घ्यावा असा सुकवी म्हणजे शहाणा जो धर्म त्यानें विचार केला—असा भावार्थ. या गीतींतील **अश्वधाटीयमका**चीं उदाहरणें अर्थाचा अनर्थ न करितां अत्यंत कर्णमधुर झालीं आहेत.

१. दुर्योधनाचा मित्र. २. धर्म. ३. कौरवसैन्याचा नाश करी, नृप कुरुकटक न रक्षी म्हणजे धर्मानें अश्वत्थाम्याचा शरप्रहार चुकवून कौरवांच्या सैन्यावर हल्ला केला व त्यांतील कित्येक सैनिकांस ठार मारिलें, त्या सैन्याची उपेक्षा केली नाहीं. ४. तैलोत्पन्न अग्नि. तेलामुळें घर पेटून जळूं लागल्यास त्यावर पाणी ओतलें तर ती आग ज्यास्तच वेगानें भडकते व घराचा नाश करिते. त्याप्रमाणें धर्म शत्रुसैन्याशीं लढत असतांना अश्वत्थामा प्रतिकार करूं लागला, तेव्हां धर्मानें अधिकच त्वेषानें त्याच्या सैन्यावर हल्ला केला व अनेक सैनिकांस ठार मारिलें. येथें सैन्यास घराची, अश्वत्थाम्यास पाण्याची व धर्मास अग्नीची उपमा दिलेली आहे. ही **पूर्णोपमा**. पेटलेलें तेल शांत करण्याकरितां वर पाणी घातलें असतां तें अधिकच भडकतें; तद्वत् अश्वत्थाम्यानें जरी एकीकडे पांडवसैन्याचा पराभव केला, तरी दुसरीकडे धर्मानें कौरवसैन्याचा पुष्कळ पराभव केला—असा भाव. ५. हीं पांडवसैन्यें—अर्थात् भीमाच्या साहाय्यास आलेलीं. ६. मेघानें. 'पयोधर'शब्द 'कुच' व 'मेघ' या अर्थीं वापरतात. पयस्=जल, दूध. ७. उदकें. मोठ्या पावसामुळें पर्वतावरील वृक्ष मुळापासून उपटले जातात व मोडतात, हें प्रसिद्धच आहे. ८. 'कर्णापुढेंचि' असें पाठांतर. ९. कर्ण हा अर्जुनाचा भाग म्हणजे कर्णास मारण्याची प्रतिज्ञा अर्जुनानें केली होती म्हणून भीम कर्णास सोडून निघाला—असा भाव. १०. तत्व न जाणणारे, खरें कारण न जाणणारे. अतत्वज्ञ लोक म्हणति, '[हा भीम] मनिं भी (भीति) घे.' ११. या गीतींतील 'वृकोदर', 'जिष्णु' व 'वृष' हे शब्द साभिप्राय आहेत. वृकनामक अग्नि आहे ज्याच्या उदरांत तो 'वृकोदर' तस्मात् सर्वभक्षक. 'जिष्णु' म्हणजे जयशील. 'वृष' म्हणजे पोळ. याची अभ्याहतगति प्रसिद्धच आहे. म्हणून तिन्ही शब्दांनीं सैन्यनाश सुचविला आहे. अलंकार **परिकरांकुर**. १२. दैत्यकुळांत. १३. स्वयें=एकटाच, आपल्या स्वतःच्या उत्साहानें.

[१]क्षत्रियहरिणकुलावरि हननार्थ चि ते [२]चिते सकोप तिघे ।
[३]सोडूनि, हतशतांतें सेवाया, काय काळ तो पति घे. ॥ ३४
[४]कुरुपति [५]यमांसि पीडी, पीडिति कुरुपतिसि यम हि; तैं वारी ।
धृष्टद्युम्न [६]नृपाला, [७]माद्रेयांचा समर्थ कैवारी. ॥ ३५
केला विरथ सुयोधन, तैं पळवी दंडधार नृप त्याला; ।
[८]पार्षतभग्नसुयोधन [९]मांत्रिकपरिभूतभूतसम झाला. ॥ ३६
तों पांचाळावरि [१०]वृष धांवे, [११]अहिवरि सकोप मुंगससा; ।
भी [१२]बल परिसुनि [१३]वृषधनुनाद जसा [१४]सिंहनाद [१५]तुंग ससा. ॥ ३७
[१६]पार्षतकर्णसमागम [१७]उग्रग्रहसंगमासम चि वाटे, ।
[१८]कुरुपांडुवाहिनीशतजीवन बहुतेक तेधवां [१९]आटे. ॥ ३८
वृषचापाचे [२०]नाद चि दुःसह; जो [२१]भटसमूह ऐके [२२]यां ।
तो मोहे चि; न मोहिति [२३]शर कां पांचालचेदिकैकेयां? ॥ ३९

---

१. क्षत्रियरूपी हरिणांच्या समूहावर. २. चित्ते. (व्याघ्रांतील जात). ३. तो **काळ** पति (चित्त्यांचा यजमान, शिकारी **यम**) ते तिघे चिते सोडूनि **हतशतांतें** (मेलेल्या शेंकडों वीरांस) सेवाया (भक्षाया) घे काय [असें वाटे].—अन्वय. सारांश, काळ हाच कोणी शिकारी, खवळलेले तिघे वीर भीम, अर्जुन व कर्ण हेच कोणी चित्ते, क्षत्रियरूपी हरिणांच्या समुदायावर सोडून, ठार झालेल्या शेंकडों वीरांना खाण्याकरितांच जणूं काय घेता झाला—असा भाव. शिकारी लोक शिकलेल्या पाळीव चित्त्यांकडून सावजांची शिकार करवितात—ह्या गोष्टीस अनुलक्षून हें म्हटलें आहे. ४. दुर्योधन. ५. नकुळसहदेवांस. ६. दुर्योधनाला. ७. माद्रीपुत्रांचा कैवारी (साहाय्यकर्ता धृष्टद्युम्न). ८. धृष्टद्युम्नापासून अपजय पावलेला दुर्योधन. ९. मांत्रिकापासून पराभव पावलेल्या भूतासारखा. १०. कर्ण. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'नृप' असा पाठ आहे, पण तो हस्तदोष असावा. ११. सर्पावर. १२. सैन्य. १३. कर्णाच्या धनुष्याचा शब्द. १४. सिंहाची गर्जना. १५. उंच, मोठा. हें 'सिंहनादा'चें विशेषण अनवश्यक असून यमकाकरितांच वापरलेलें आहे, असें दिसतें. १६. धृष्टद्युम्न व कर्ण यांचा सामना. १७. क्रूरग्रहांची युति होते तेव्हां पर्जन्य पडत नाहीं, नद्या वगैरे आटतात, तशा येथें कुरुपांडुवाहिनी आटल्या—असा भाव. १८. कौरवपांडवसेनारूप ज्या शतशः नद्या त्यांचें जें पाणी तें. येथें वाहिनी व जीवन ह्या पदांत **श्लेष** आहे. वाहिनी=नदी, (पक्षीं) सैन्य. जीवन=पाणी, (पक्षीं) प्राण. १९. सप्तग्रहसंगम किंवा अतिक्रूर ग्रहांचा संगम होतो, तेव्हां पृथ्वी निर्जला होते—अशी समजूत आहे. २०. ध्वनी देखील. २१. जो भटसमूह यां ऐके तो मोहे चि (मोहित होई). [मग] शर पांचाळचेदिकैकेयां कां न मोहिति? अलंकार—**काव्यार्थापत्ति**. २२. यां=नादांना. २३. चापाच्या नादानें मोह पडतो मग प्रत्यक्ष शरांपासून तो कां न पडेल?—असा भाव.

गुरु[1] कुरुपितामह[2] नृप हि बहु होते वीरवर[3], परंतु तिहीं, ।
केलें न वृष जसें करि कर्म, स्तुत तें सुरासुरस्तुतिहीं[4]. ॥ ४०
भीमें कुरुबळ मथिलें जन्हि केलें गुरुसुतादिकीं[5] जतन; ।
हत नष्ट रुद्ररोषें होय जसें दक्षमखमहायतन[6]. ॥ ४१

---

## अध्याय पस्तिसावा[7]

संशप्तकांत तेज प्रगट करिति जिष्णुचे हि बहुत[8] भुज; ।
समरीं[9] भटांसि तैसें मृगांसि उरवी वनांत न हुतभुज[10]. ॥ १
पार्थ मुकुंदासि म्हणे, 'संशप्तक मारिले पहा कृष्णा ! ।
कृष्णा[11]देवीची जसि तसि पुरवाया स्व[12]भूमिची तृष्णा[13]. ॥ २

---

१. द्रोण. २. भीष्म. ३. वीरवर नृप हि बहु होते–अन्वय. ४. सुरासुरस्तुतिहीं तें [कर्म] स्तुत असे. सुरासुरांनीं आपल्या वचनांनीं त्या कर्माची स्तुति केली–असा भाव. ५. गुरुसुतादिकांनीं जरी जतन केलें (रक्षिलें) [तरि] भीमें कुरुबळ मथिलें. [कसें ? तर] जसें [सर्व देवांनीं रक्षिलेलें] दक्षमखमहायतन रुद्ररोषें (शिवाच्या कोपानें) हत [व] नष्ट झालें. ६. दक्षप्रजापतीच्या यज्ञाचें मोठें स्थान. अर्थात् यज्ञमंडपांत जमलेली मंडळी. दक्ष हा ब्रह्ममानसपुत्रांतील एक. हा एकदां कैलासास आला असतां शिव योगाभ्यासांत निमग्न असल्यामुळें त्यानें त्याचा योग्य सत्कार केला नाहीं. म्हणून त्या दिवसापासून दक्ष शिवाचा व आपली मुलगी जी सती तिचा द्वेष करूं लागला. पुढें दक्षानें मोठा यज्ञ आरंभिला. त्या यज्ञास त्यानें शिव व सती यांशिवाय इतर सर्व देवांस बोलाविलें. बापानें आरंभिलेला यज्ञ पाहण्याविषयीं उत्सुक झालेली सती, शिव नको म्हणत असतां, आमंत्रणाशिवायच दक्षाच्या घरीं गेली. तेथें अर्थात् तिचा अपमान झाला व तिला राग येऊन तिनें योगाग्नि चेतवून त्यांत स्वदेहाचा त्याग केला. हें वर्तमान शिवास समजतांच त्या यज्ञाचा नाश करण्याकरितां त्यानें वीरभद्रास पाठविलें. वीरभद्रानें जमलेल्या सर्व देवांस लाथांनीं व बुक्क्यांनीं बडवून दक्षाचा शिरच्छेद व यज्ञाचा नाश केला–ही कथा प्रस्तुत स्थलीं अनुसंधेय आहे. ७. यांत मूळ कर्णपर्वाच्या ५६ व्या अध्यायांतील ८७ व्या श्लोकापुढचा कथाभाग, ५७ वा अध्याय व ५८ व्या अध्यायांतील सहा श्लोक यांतील कथाभाग आला आहे. ८. हें 'तेजा'चें विशेषण. ९. जिष्णुचे हि भुज संशप्तकांत बहुत तेज प्रकट करिति. [हें तेज] समरीं भटांसि न उरवी, [जैसा] हुतभुज वनांत मृगांसी न [उरवी]–असा अन्वय. उत्तरार्धांतील 'तैसें' या शब्दाबद्दल 'तैसे' असा पाठ आहे, त्यास अनुसरून पुढीलप्रमाणें अन्वय करावा:—जैसे वनांत हुतभुज (अग्नि) मृगांसि न उरवी, तैसे जिष्णुचे भुज भटांसि (न उरविती). देहलीदीपन्यायानें 'उरवी' शब्द उभयत्र वापरावा. १०. अग्नि. ११. द्रौपदीची. १२. 'स्व'शब्दानें पृथ्वीवर आपला पैतृक हक्क आहे, असें पार्थानें सुचविलें आहे. १३. इच्छा.

शतशा हत[1]शात्रवनवरक्तासवपान करुनि [2]मही माजो, ।
[3]देवसभा ही सेवुनि तव [4]दासाचा विचित्र महिमा जो. ॥ ३
[5]यमदूत, दोष, विघ्न [6]त्वत्कीर्तनरवभयें जसे पळती, ।
तैसे चि [7]मद्धनुर्ध्वनिभीत भट [8]क्षिप्र पळति, तों [9]गळती. ॥ ४
कर्णाचा [10]गजकक्षध्वज दिसतो आमुच्या बळांत चि तो, ।
[11]पुरुषव्याघ्रप्राया वीरांचे [12]राशि संगरीं रचितो. ॥ ५
चाल सख्या ! हरि ! सत्वर तेथें ने तन्निवारणार्थ मला; ।
[13]यम लाजो तव दासा, वाटे वृष काळ पांडवां गमला. ॥ ६
विधि[14]हत [15]राज्यच्युत जन्हि तन्हि केले त्वां चि सत्य [16]पांडवसे. ।
काय अशक्य तुज विभो ! सत्वेंत तुज्या चि [17]सत्यपांड वसे. ॥ ७
कर्णातें साहेसा न दुजा मजवेगळा तुला कळतें; ।

---

१. मरण पावलेले जे शेंकडों शत्रुसमुदाय, त्यांच्या नवरक्तरूप मद्याचें प्राशन. शतशा पान करुनि महि माजो—असा अन्वय. शात्रव=शत्रूंचा समूह. २. पृथ्वी. ३. स्वर्ग देखील. देवसभा ही माजो—असा अन्वय. ४. तुझा दास जो मी त्याचा. 'तव दास' शब्दांनीं हा सर्व महिमा तुझाच आहे, असें सुचविलें आहे. ५. यमदूत पळती; दोष पळती; विघ्न (विघ्नें) पळती—असा अन्वय. 'विघ्न' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे. ६. तुझ्या कीर्तनाच्या गजराच्या भयानें. ७. माझ्या धनुष्याच्या रवानें भय पावलेले. ८. शीघ्र. ९. गळति तों पळती—असा अन्वय. माझ्या धनुष्याचा शब्द ऐकून वीर भिऊन जमिनीवर पडेपर्यंत पळत जातात—असा अर्थ. 'ते गळती' असें पाठान्तर. १०. हत्तीच्या गळ्याला बांधावयाचा जो दोर ती कक्षा; तद्युक्त ध्वज ज्याचा असा. मुळांत सुद्धां 'गजकक्षध्वज' असेंच पद आहे. (अध्याय ३६ गीति ६ वरील टीप पहा). ११. पुरुषांत जे वाघाप्रमाणें अशांस, वीरश्रेष्ठांस. 'पुरुषव्याघ्र प्राया वीरांचे' असा पाठ घेतल्यास—पुरुषश्रेष्ठ (कर्ण) प्राया (बहुधा) वीरांना मारून त्यांचे खच पाडीत आहे—असा अर्थ. १२. वीरांस मारून त्यांचा ढीग रचितो—असा भाव. १३. वृष (कर्ण) पांडवां (पांडववीरां) काळ (मृत्यु, यम) गमला; [तस्मात् मी त्याचा पराभव करीन व यमसदनास पांडववीरांना जाऊं देणार नाहीं व अशामुळें] यम तव दासा (मला) लाजो. म्हणजे यमाच्या पराक्रमापेक्षां अर्जुनपराक्रम विशेष आहे. किंवा वृष पांडवां (पांडवपक्षीयांना) काळ (यम) गमला (वाटला) (पण आतां मी असा कौरवनाश करीन कीं त्या योगें) तव दासा (प्रत्यक्ष) यम लाजो ! म्हणजे यमावरही मी ताण करीन—असाही अर्थ होईल. यम लाजेल—असा भाव. १४. दैवहीन. १५. राज्यभ्रष्ट. १६. पांडवांप्रमाणें. दुर्दैवी व म्हणून राज्यभ्रष्ट झालेले पांडव खरोखर तूंच फिरून पांडवांसारखे केलेस. भिकाऱ्याप्रमाणें वनवासांत हिंडत असतांना पांडव राजपुत्राप्रमाणें नव्हते. त्यांना सैन्य वगैरे मिळवून देऊन तूंच राजपुत्रांप्रमाणें युद्धास समर्थ केलेस—असा मथितार्थ. सत्य=खरोखर, खरोखरीचे. १७. सत्य+प+अंड=सत्यलोक+पति+अंड=ब्रह्मांड.

अद्भुत तेज जयाचें[1], भस्म चि केलें असेल गा ! बळ तें. ॥ ८
वर्जुनि[2] वृषासि मज निजकटकीं[3] च प्रथम ने. प्रभो ! अथवा ।
माने[4] तें करिं, यूथप[5] तूं यूथशिवज्ञ[6], तज्ज्ञ[7] मीं न थवा.' ॥ ९
सुस्मितमुख[8] सुखसागर कृष्ण म्हणे, 'प्रथम[9] कौरवांत शिरें; ।
कांपों[10] दे देवांचीं त्वद्भुजगुणगानगौरवांत[11] शिरें[12].' ॥ १०
ऐसें वदोनि हरिनें हरिवर[13] ते प्रेरिले अरिबळांत; ।
वायूनीं घन तैसे अश्वानीं उधळिले रिपु पळांत. ॥ ११
दीपपथ[14] जसा तिमिरें, सोडिति कटकें रथप्रवेशपथ[15]; ।
न टिकति रिपु जिष्णुपुढें, जैसे दिव्यापुढें[16] कुंडे[17] शपथ[18]. ॥ १२
तो दुष्प्रेक्ष्य[19] स्यंदन अहितां, घूंकद्विजां[20] जसा तरणी[21]; ।

---

१. जयाचें अद्भुत तेज [अशा कर्णें] तें बळ भस्म चि केलें असेल–असा अन्वय. २. वृष ज्या बाजूस आहे त्या बाजूनें रथ न नेतां माझें सैन्य ज्या बाजूस आहे तिकडे ने–असा भाव. कर्णाच्या पाठीमागच्या बाजूनें मारा न करितां पुढून सामना देण्याचा अर्जुनाचा आशय दिसतो. असा अर्थ केल्याशिवाय 'वर्जुनि वृषासि'चा अर्थ बरोबर लागत नाहीं. वर्जुनि=टाकून. पण वरील संदर्भावरून अर्जुनाचा उद्देश कर्णाशीं युद्ध करण्याचा दिसतो; त्यापासून पळून जाण्याचा दिसत नाहीं. ३. माझ्या सैन्यांत; पांडवसैन्यांत. ४. तुला वाटेल तें कर. तूं अमकें कर, तमकें कर, असें मी सांगत नाहीं, तर तुला जें योग्य दिसेल तें कर–असा भाव. ५. यूथ= कळप, सजातीय प्राण्यांचा समूह. यूथप=लोकांचा अधिपति. ६. यूथाचें हित कशांत आहे हें जाणणारा. ७. कृष्णा! तुला वाटेल तें तूं कर. कारण कळपाच्या कल्याणाचा मार्ग त्याच्या अग्रणीलाच उत्तम कळतो. आमचा अग्रणी तूं आहेस. अर्थात् आमचें हित तुलाच चांगलें कळतें, तसें मला किंवा इतर मंडळीला कळत नाहीं–असा स्पष्टार्थ. येथें 'न' हें पद काकाक्षि-गोलकन्यायानें 'मी' व 'थवा' ह्या दोहोंशीं अन्वित करावें. मी तज्ज्ञ न=मी जाणता नाहीं. थवा तज्ज्ञ न=इतरही जाणते नाहींत. थवा=यूथ, समुदाय, मंडळी. ८.'सस्मितमुख' असें पाठान्तर. ९. अगोदर कौरवसैन्यांत जा. १०. शिरें कांपों दे=डोलूं दे. ११. तुझ्या भुजांच्या पराक्रमादि गुणगानानें (गाऊन) गौरविण्यांत. १२. मस्तकें. १३. श्रेष्ठ घोडे. १४. जसा तिमिरें (काळोखानें) दीपपथ (दिव्याचा रस्ता; दिव्याचा प्रकाश जेथपर्यंत पडतो तेथपर्यंतचा प्रदेश) [सोडावा तसा] कटकें रथप्रवेशपथ सोडिती–असा अन्वयार्थ. १५. रथ आंत शिरण्याचा रस्ता. सैन्य दुभंगून रथ आंत शिरला–असा भाव. १६. तप्त तैलांत टाकलेले पदार्थ काढणें वगैरे दिव्य करण्याचे वेळीं. १७. खोट्या. १८. शपथा. 'शपथ' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे. १९. पहाण्यास अशक्य असा. २०. घुबडपक्ष्यांस. २१. सूर्य.

शर ते किरणसम, गमति, तमसम रिपु; होय तद्विघात रणीं. ॥ १३
दुर्योधन पुनरपि ते संशप्तक अर्जुनावरि प्रेषी, ।
धांवति हरिप्रियावरि, यज्ञावरि जेंवि निर्जरद्वेषी. ॥ १४
चौदा सहस्र सादी, रथ एक सहस्र, तीन शें हत्ती, ।
श्रीमत्पार्थरथावरि दोन शतसहस्रें धांवले पत्ती. ॥ १५
त्यांहीं शरवृष्टि तशी केली गोवर्धनीं हि न घनांहीं; ।
परि शस्त्रवर्ष पार्थीं आत्मज्ञीं जेंवि होय अघ नाहीं. ॥ १६
रिपुसेनाशर विजयीं जयद चि आशीःप्रयुक्त अक्षतसे, ।
मोहिति न उर्वशीचे जेंवि कटाक्ष प्रमोहदक्ष तसे. ॥ १७
दक्षकृतगर्हणा जसि गिरिशें तसि अर्जुनें स्वरिपुसेना, ।

---

१. तत्+विघात=त्या शत्रूंचा नाश. २. रणीं तद्विघात (त्या शत्रूंचा नाश) होय-असा अन्वय. ३. देवांचे द्वेषी म्हणजे शत्रु, राक्षस. ४. घोडेस्वार. ५. शत सहस्र=लक्ष. ६. पायदळ. ७. त्यांहीं (त्या संशप्तकांनीं) [जसी] शरवृष्टि केली तशी घनांहीं (मेघांनीं) गोवर्धनीं हि (गोवर्धन पर्वतावर देखील) न केली. प्रस्तुत स्थलीं गोवर्धनोद्धारणकथा अनुसंधेय आहे. ती कथा अशीः- प्रतिवर्षीं नंद इंद्रयाग करीत असे. एकदां कृष्णानें तो याग बंद करवून गोवर्धन पर्वताजवळ दुसराच याग करविला. त्यामुळें इंद्रास राग येऊन त्यानें गोकुलावर अतिवृष्टि करविली. पण कृष्णानें गोवर्धन पर्वत छत्राप्रमाणें धरून गोकुलाचें त्या वृष्टीपासून संरक्षण केलें-अशी भागवतांत कथा आहे. ८. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'घनाहीं' असा शब्द आहे. ९. शस्त्रांचा पाऊस. १०. आत्मस्वरूप जाणणाऱ्या पुरुषाच्या ठायीं. ११. नाहीं होय=निष्फल होय. जेंवि आत्मज्ञीं अघ (पाप) नाहीं (नाहींसें) होय [तेंवि] पार्थीं शस्त्रवर्ष [नाहीं होय]-असा अन्वय. १२. शत्रूच्या सैन्यानें सोडिलेले बाण. १३. जयच देणारे. १४. आशीः+प्रयुक्त अक्षत=आशीर्वादयुक्त अक्षता. १५. जेंवि [ज्याप्रमाणें] प्रमोहदक्ष (मोह वाढविण्यास समर्थ) उर्वशीचे कटाक्ष तसे रिपुसेनाशर (अर्जुना) न मोहिति (मोहित करीत नाहींत, एवढेंच नव्हे पण उलट) आशीःप्रयुक्त अक्षतसे विजयीं जयद चि [झाले]-असा सार्थान्वय. १६. मोह पाडण्यास समर्थ. १७. 'जेंवि-तेंवि' अशा प्रयोगाच्या ऐवजीं 'जेंवि-तसे' असा प्रयोग आहे. १८. दक्षप्रजापतीनें केलेली निंदा. दक्षानें केलेली निंदा शंकरानें सहन केली. तसा शत्रुसैन्याचा मार तीव्र असूनही अर्जुनानें सहन केला, हें योग्यच आहे. कारण धैर्य धारण न केल्यास सत्कीर्ति मिळत नाहीं. येथें अर्जुनानें शत्रूंचा खरपूस समाचार घेतला. शंकरानेंही दक्षास ताबडतोब प्रायश्चित्त दिलें. पण ही वस्तुस्थिति पाहिल्यास तद्विरुद्धार्थक 'साहिलें' हें पद अयोग्य वाटतें. 'प्रतिकार करणें' ह्या अर्थाचें क्रियापद येथें असावयास पाहिजे होतें. १९. शिवानें. वर दिलेल्या दक्षयज्ञध्वंसकथानकावरून शिवानें दक्षकृत निंदेचा प्रतिकार कसा केला हें

उमा हि साहिली; कीं, सद्यश धृति टाकिल्यावरि पुसेना. ॥ १८
हरिनामबळें न गणी प्रल्हाद विपत्तिला, अरिचमूला ।
गांडीवबळें पार्थ हि; पावे [2]ती च स्वयें [3]लय [4]समूला. ॥ १९
[5]तों द्रौणि अर्जुनावरि [6]हरिवरि [6]हरि जेंवि ये रण कराया, ।
सोडी शर; [7]तद्गणनीं कुशळ नसे [8]गर्ग ही [9]गणक राया ! ॥ २०
वि[10]प्रव्याघ्रभयें ती [11]पांडवपृतना पळे जसी हरिणी; ।
[12]हें ही स्वल्प चि [13]तच्छरहरिलक्षें लक्षिली [14]चमूकरिणी. ॥ २१
निश्चेष्ट कृष्ण केले, मेलेसे लेखिले चि ले[15]खगणें; ।
[16]न तगे ज्ञानिमनीं त्या धैर्यें प्राकृतजनीं कसें तगणें ? ॥ २२
[17]गोप्ते [18]चराचराचे गिळिले [19]गुरुसुतशरव्रजाजगरें; ।
बहु मोह पावले [20]सुर [21]असुर नर हि, जेंवि [22]सर्पराजगरें. ॥ २३

---

स्पष्टच आहे. साहिली=योग्य प्रकारें प्रतिकार करून आपली श्रेष्ठता संपादिली. हाच अर्थ वर 'कर्णातें साहेसा' इत्यादि ८ व्या गीतींत 'साहेसा' या पदांत आहे. साहणें=टिकाव धरणें.

१. धृति टाकिल्यावर (धैर्य सोडून दिल्यावर, भित्रे झाल्यास) सद्यश पुसत नाहीं (सद्यश ढुंकूनही पहात नाहीं)—असा भाव. २. विपत्ति किंवा अरिचमू. ३. स्वयें=स्वतः. ती अर्जुनाचा नाश न करी, तर स्वतःच मरे. ४. समूळ, संपूर्ण. ५. 'तो द्रौणि' असें पाठान्तर. ६. एका सिंहावर दुसरा सिंह. ७. तत्+गणनीं=त्या बाणांच्या गणनेविषयीं. येथें **'अत्युक्ति'** अलंकार आहे. ८. ज्योतिषशास्त्रज्ञ ऋषि. याच्या नांवानें **'गर्गसंहिता'** प्रख्यात आहे. ९. ज्योतिषी. १०. अश्वत्थामारूपी वाघाच्या भयानें. ११. पांडवसैन्य. १२. हें=पूर्वार्धातील वर्णन. 'हे' असें पाठान्तर. हे=पूर्वार्धातील उपमा. १३. तत्+शर+हरि+लक्ष=त्याचा+बाण+सिंह+लक्ष= त्याच्या बाणरूपी लक्ष (लाखों) सिंहांनीं. १४. सेनारूप हस्तिनी. १५. देवगणानें. १६. [जें] ज्ञानिमनीं न तगे त्या धैर्यें प्राकृतजनीं (सामान्य लोकांमध्यें) कसें तगणें (टिकावें ?). हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १७. रक्षक. १८. स्थावरजंगमांचे. 'चराचरांचे' असें पाठान्तर. १९. अश्वत्थाम्याच्या शरसमूहरूपी अजगरानें. २०. समुद्रमंथनसमयीं शेषास, रवीनें घुसळण्याकरितां दोरा केला होता. मंथनास प्रारंभ झाल्यावर शेष स्वशरीर व पर्वत यांच्या घर्षणानें अस्वस्थ होऊन विष ओकूं लागला. तेव्हां त्या विषानें सुरासुर व नर भीति पावले. या कथेस अनुलक्षून हें वाक्य आहे. २१. हे सुरासुरनर प्रेक्षकवर्गांतील समजावे. २२. शेषाच्या विषानें.

'हा ! हा !' म्हणति मुनीश हि, महि कांपे, भूमि[1] होय हततेजा;[2] ।
तो[3] तो भ्रमे चि, दिसले जेंवि रवींदू[4] तमास्यगत[5] ते ज्या. ॥ २४
गुरुसुत खरशरपूरीं बुडवुनि गांडीवपाणि[6] अरिपाणी,[7] ।
अरिवदनींचें[8] तें किति ? सुरवदनींचें हि सर्व हरि पाणी.[9] ॥ २५
वर्णूं शरवृष्टि कशी ? पाडी बहुदाट अंधकारा ती,[10] ।
वांटे[11] न द्विजें,[12] करितो विश्वासि सपाट[13] अंधकाराती.[14] ॥ २६
कृष्ण म्हणे, 'तापवितो प्रळयीं लोका[15] जसा रवि प्रबळ, ।
पार्थ[16] तसा चि अरिजना, परि दिसतें आज सार[17] विप्रबळ.[18]' ॥ २७
द्विज वर्धमान[19] केवळ पार्थ सखा[20] हीयमान[21] हें पाहे, ।
क्षोभे स्वभक्तवत्सल देव, न निजदासदुर्दशा साहे. ॥ २८
पाहे[22] त्या विप्रा प्रभु जैसा कीं पुष्पसायका[23] पुरहा;[24] ।

---

१. एकदां महीबद्दल विधान केल्यावर भूमीचें विधान निराळें करण्याचें कारण काय ? भूमि निस्तेज झाली म्हणजे काय ? भूमि (अर्थात् माती) ही तेजस्वी म्हणून कधीं कोणत्या कवीनें वर्णिली आहे ? येथें 'भूमि' बद्दल 'भानु' असा पाठ आहे, तोच शुद्ध पाठ असावा. पण पंतलिखित प्रतींत 'भूमि' असाच पाठ आहे. २. तेजोविहीन. ३. अन्वयः—ज्या (ज्या ज्या मनुष्यास) ते (कृष्णार्जुन) जेंवि तमास्यगत रवींदू [तेंवि] दिसले तो तो (तो तो मनुष्य) भ्रमे चि (कृष्णार्जुन मेले असा भ्रम त्यांस झाला)—हा भाव. ४. रवि+इंदु=सूर्य व चंद्र. ५. तम+आस्य+गत=राहूच्या मुखांत गेलेले, ग्रहण लागलेले. ६. गांडीव आहे पाणींत (हातांत) ज्याच्या, असा अर्जुन. ७. चक्रपाणि, कृष्ण. अरि=चक्र. ८. अरिवदनाचें पाणी पळविणें फारसें मोठें काम नाहीं. ९. तेज. येथें पंतलिखित प्रतींत 'पाणीं' असा शब्द आहे. १०. शरवृष्टि. ११. पंत उत्प्रेक्षा करितात कीं, अंधकाराती (शिव) जगासि सपाट करि; द्विज (अश्वत्थामा) न करि. अश्वत्थामा द्रौणीचा नाश करीत नाहीं, तर प्रत्यक्ष रुद्रच जगत्प्रळय करीत आहे. अश्वत्थामा रुद्राच्या अंशानें जन्मला होता, हें येथें लक्षांत ठेवावें. १२. अश्वत्थामा. १३. सपाट करणें=उध्वस्त करणें १४. अंधकासुराचा शत्रु (शिव). १५. लोका=मृत्युलोकास. 'लोकां' असें पाठान्तर. १६. पार्थ तसा चि अरिजना—या वाक्यांत 'नेहमीं' हें पद अध्याहृत समजावें. १७. उत्तम. १८. अश्वत्थाम्याचें बळ. नेहमीं पार्थाचें बळ अधिक असे; पण आज पार्थापेक्षां द्रौणीचेंच बळ अधिक दिसतें—असा भाव. १९. वाढणारें तेज ज्याचें असा. २०. सखा=मित्र, कृष्ण. पार्थ हीयमान [आहे] हें सखा पाहे—असा अन्वय. २१. क्षीणतेजा असा, तेज कमी होत आहे ज्याचें असा. २२. त्रिपुरांतक शंकरानें मदनाकडे जसें दारुण कोपानें पाहिलें, तसें कृष्णानें अश्वत्थाम्याकडे पाहिलें—असा भाव. २३. मदनास. २४. पुरहा—त्रिपुरांचें हननकर्ता शिव.

तेव्हां वाटे होइल दे[1]वदृगग्नींत काय का[2]पुर हा[3]. ॥ २९
विजयास हि क्षण क्षण पाहे प्र[4]णयें, खि[5]जे, मुरारि पुसे ।
पार्था 'गमतों[6] आम्हीं प्रिय किंवा या ध[7]रासुरा रिपुसे ? ॥ ३०
खेळसि कीं तूं भांडसि ? आहे बळ तव भुजांत कीं नाहीं ? ।
चाप असे कीं त्यजिलें बाहूनीं श[8]क्तिधैर्यहीनांहीं ? ॥ ३१
आहेसि कीं रथावरि ? निजला नाहींस कीं ? र[9]णाजिर हें, ।
न गृह; न पर्यंक हि, हा रथ; सु[10]ख येथें निजेचिया विरहें. ॥ ३२
गुरुसुत म्हणोनि मा[11]निसि, करिसि उपेक्षा; परंतु हा का[12]ळ ।
नोहे चि उपेक्षेचा, बंधु[13] न हा, क्षोभ[14]ला म[15]हाकाळ.' ॥ ३३
पार्थ प्रताप दावी स्वीकारुनि विष्णुचा सुबोध मनें, ।
जाणों प्रदीप्त केला प[16]वनानें मंद वन्हि तो ध[17]मनें. ॥ ३४
धनु खंडी, ध्वज तोडी, छत्र च्छेदी सु[18]वत्सदंतानीं; ।
मग श[19]त्रुजत्रुदेशीं ताडी गाया प्रताप संतानीं[20]. ॥ ३५

---

१. देवाच्या (कृष्णाच्या) दृक् (दृष्टि)रूपी अग्नींत. २. अग्नींत कापूर होईल, म्हणजे जळून भस्म होईल. ३. अश्वत्थामा. ४. प्रेमानें. ५. चिडे, लज्जा व कोप या विकारांनीं युक्त होई. ६. येथें 'आपण' ह्या शब्दाची योजना समर्पक झाली असती. ७. ब्राह्मणाला, अश्वत्थाम्याला. *हा अश्वत्थामा आपणास शत्रु समजतो कीं मित्र समजतो? तो आपणास मित्र समजतो,* अशी तुझी समजूत झाली आहे, असें तुझ्या कृतीवरून वाटतें. पण ती समजूत खरी नव्हे—असा कृष्णाचा भाव. ८. सामर्थ्य व साहस यांनीं हीन अशांनीं. हें 'बाहूनीं' याचें विशेषण. बाहूंच्या ठिकाणीं शक्ति संभवते, पण धैर्य कसें संभवणार? म्हणून येथें धैर्य=टिकाव, नेट—असा अर्थ घ्यावा. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'शक्तिधैर्यहीनाहीं' असा शब्द आहे. ९. रणांगण. १०. येथें (रणांगणांत) [झोंप घेतल्यानें सुख प्राप्त होत नाहीं तर] निजेचिया विरहें (झोंपीं न जातां, जागृत राहिल्यानें) सुख [प्राप्त होतें]. ३१ व ३२ या गीतींत **निश्चय** नामक अलंकार आहे. तल्लक्षण:—'अन्यन्निषिध्य प्रकृतस्थापनं निश्चयः पुनः' [साहित्यदर्पण-१० परिच्छेद]. 'भ्रमाचें प्रसंगोचित निवारण करून वस्तुस्थितीचें कथन केलें म्हणजे **निश्चया**लंकार होतो.' अर्जुनास भ्रम झाला आहे, अशी शंका घेऊन कृष्ण भ्रमनिरास करीत आहे म्हणून प्रस्तुत स्थलीं हा अलंकार. ११. सन्मानिसी. १२. समय. १३. हितचिंतक. १४. क्षोभलेला. १५. यम, मृत्यु. मृत्यूचें भयंकरत्व दर्शविण्यासाठीं त्यास नुसता 'काळ' असें न म्हणतां 'महाकाळ' असें म्हटलें आहे. १६. वायूनें. १७. फुंकण्यानें. १८. वत्सदंत नांवाच्या उत्तम बाणांनीं. १९. शत्रूचें डोकें आणि धड यांच्या संधिभागीं. २०. साधूंनीं.

मूर्छित होय द्रौणी, [१]ध्वजयष्टि धरी, म्हणोनि सूतानें ।
विप्र क्षिप्र पळविला, [२]मंत्रक्षत जेंवि भूत भूतानें. ॥ ३६
करि हरिसख [३]मखदमनासम समरीं कर्म, गुरुसुता पळवी, ।
पळ वीर धीर न धरिति, [४]नुरति तृणें ज्यांत [५]शुचि [६]इनोपळ वी. ॥ ३७
भीमें कौरव मथिले, संशप्तक मारिले नरें [७]अजितें, ।
वधिले पांचाळ वृषें, वीरनिधन [८]मज न सांगवे अजि ! तें. ॥ ३८
नाचति रणीं कबंधें, 'कीं [९]सार्थक जाहलें भलें' [१०]म्हणती, ।
हांसति [११]मुखें सुखें; त्या तद्भाग्या, [१२]त्यांस ही नसे गणती. ॥ ३९
धर्म [१३]क्षतार्त होउनि माघारा एक कोस तो सरला, ।
जैसा वृष्टि करुनियां आणाया [१४]तोयें मेघ [१५]ओसरला. ॥ ४०
त्या काळीं दुर्योधन कर्णप्रमुखस्ववीरसंघाला ।
प्रार्थूनि म्हणे, '[१६]हरिसे, अरिसेनेवरि उठा, उड्या घाला. ॥ ४१
स्वर्गद्वार उघडलें, हें दुर्लभ पुण्य[१७]पर्व; कां मरणीं ।
भ्यावें ? त्यजितां [१८]नश्वर वपु, साधति नित्य सर्व [१९]काम, रणीं. ॥ ४२

---

१. ध्वज बांधण्याकरितां रथावर जी काठी उभारितात ती. मूर्च्छित होऊन पडतां पडतां अश्वत्थाम्यानें ती काठी धरिली. २. पंचाक्षऱ्याच्या मंत्रांनीं पीडिलेलें. मंत्रामुळें त्रस्त झालेल्या भूतास दुसऱ्या साह्यकारी भुतानें जसें पळवावें तसें. ३. शिवासम. ४. ज्यांत (ज्या तृणांत) इनोपळ (सूर्यकांत मणि) शुचि (अग्नि) वी (प्रसवे, उत्पन्न करी) [तीं] तृणें नुरति–असा अन्वय. ५. अग्नि. ६. इन+उपळ=सूर्य+मणि=सूर्यकांत. ७. अजिंक्यानें. ८. कोण कोण वीर मरण पावले हें सांगणें पंतांस मोठें दुःखकारक वाटत आहे, असें पंत सांगतात. पण खरोखर वर्णनाचा संक्षेप करण्याची ही संधी पंतांनीं साधिली आहे. ९. (जन्माचें) साफल्य. १०. म्हणती=जणूं काय बोलत होतीं! ११. गीतीचा अन्वयः–रणीं कबंधें नाचति. मुखें (कबंधांवरून खालीं पडलेलीं मुंडकीं) '[जन्माचें] भलें सार्थक जाहलें कीं,' [असें] म्हणती [व] सुखें (आनंदानें) हांसति; त्या तद्भाग्या (कबंधांच्या वैभवास) (आणि) त्यांस ही (मुखांसही) गणती नसे (असंख्य मुखें–असा भाव). १२. त्यांस=त्या नाचणाऱ्या कबंधांस व हंसणाऱ्या तोंडांस. १३. क्षतानें दुःखित. १४. पाणी. १५. रिकामा होऊन निघून गेला. १६. सिंहाप्रमाणें. १७. पर्वकाळ. ज्या काळीं स्नानजपादि कर्में केल्यास पापाचा क्षय होतो त्यास 'पर्व' म्हणतात. १८. अशाश्वत शरीर. १९. इच्छा. रणीं नश्वर वपु त्यजितां सर्व नित्य काम साधति (प्राप्त होती). या वाक्यांत 'नश्वर वपु' व 'नित्य काम' या शब्दांत **विरुद्धगुणन्यास** आहे. 'नश्वर' या विशेषणानें रणीं जरी नाहीं, तरी कधीं तरी कोठें तरी वपूचा नाश होणार हें सुचविलें आहे. नित्य=शाश्वत, अनश्वर. नश्वर देह रणीं सोडिल्यानें शाश्वत मुक्ति मिळते–असा भाव.

मारूनि पांडवांतें मजसह सेवाल सर्व हे वसुधा[1]; ।
मेल्या हि वीरलोकीं प्याल चि, होऊनि, दिव्य, देव, सुधा[2].' ॥ ४३
तैं हृष्ट वीर गर्जति, तों चि कृपाचा स्वयें वदे भाचा[3], ।
'धृष्टद्युम्नाचा वध करिन पणें, हरि जसा मदेभाचा[4]. ॥ ४४
जेणें न्यस्तायुध[5] गुरु वधिला त्याचा करीन जरि[6] वध मीं, ।
तरि उतरीन कवच हें, नमनें[7] ही न द्रवेल मन अधमीं. ॥ ४५
होतां वृथा प्रतिज्ञा सद्गति न घडो मला, घडो पतन[8], ।
भीमासि[9], अर्जुनास हि, मारीन, करील त्यासि जो जतन[10]. ॥ ४६
करितां गुरु[11] प्रतिज्ञा गुरुपुत्रें, भारती[12] चमू खवळे; ।
धांवे धर्मचमूवरि; जयगतिकीर्त्यर्थ[13] ती[14] हि कां न वळे ? ॥ ४७
सैनिक जैं निकरानें भांडति तैं चालती न रविवाह[15]; ।
वाटे रंगें[16] खेळति, समर[17] न तो, भाग्यवन्नरविवाह[18]. ॥ ४८
शीतळ मंद सुगंध श्रमशमन[19] श्वसन[20] संगरीं वाहे, ।
सुरजन सहाप्सराजन[21], मन देउनि, शुद्ध युद्ध तें पाहे. ॥ ४९
शीतसुगंधद्रव्यद्रव सिंचिति भटमहानटांवरि त्या[22], ।
कंठीं माळा घालिति, मरणापूर्वीं च जाहल्या वरित्या. ॥ ५०

---

१. पृथ्वी. २. अमृत. 'दिव्य' हें सुधेचें विशेषण. ३. अश्वत्थामा. ४. मद+इभ=मदोन्मत्त हत्ती. ५. आयुधें खालीं ठेविलेलीं आहेत ज्यानें असा. ६. येथें 'जरि-तरि' चा अर्थ 'जेव्हां तेव्हां' असा आहे. ७. मला तो शरण आला तरीही. ८. नरकवास. ९. त्यासि (धृष्टद्युम्नाला) जो (कोणीही–मग तो भीम किंवा अर्जुन कां असेना ?) जतन (रक्षण) करील [त्या] भीमासि [किंवा] अर्जुनास हि मारीन. १०. जो त्यासि (भीमास किंवा अर्जुनास) जतन करील त्यासि (कृष्णास) मारीन–असा अर्थ केला तरी चालेल. ११. मोठी. १२. कौरवांचें सैन्य. येथें 'फार ती चमू खवळे' असाही पाठ आहे. १३. विजय, सद्गति व सत्कीर्ति हीं मिळविण्याकरितां. १४. पांडवसेना ही–पंत. १५. सूर्याच्या रथाचे घोडे. कौरवपांडवांचा अद्भुत संग्राम पाहण्यांत गुंग झाल्यामुळें सूर्याचे घोडे चालेनासे झाले. १६. रंगानें. जणूं काय एकमेकांच्या अंगावर रंगच टाकीत आहेत. १७. हा अपन्हुति अलंकार. पण यांत उत्प्रेक्षेचीच विशेष छटा मारीत आहे. १८. भाग्यवत्+नर+विवाह=श्रीमान् पुरुषाचें लग्न. १९. श्रम निवारण करणारा. २०. वायु. २१. अप्सरांच्या समुदायासह. 'सहाप्सरोजन' असें पाठांतर. २२. अप्सरा.

वीरवरातें सेवी कल्पुनि सुव्यजन[1] अंचळाला[2] जे, ।
त्या अप्सरेसि, जाणों, अवलोकुनि फार चंचळा[3] लाजे. ॥ ५१
वैरि तळपति, पैळ[4] पैतिता[5] न उपेक्षिति, झेलिती सती अमरी;[6] ।
पद्मवनासि विकासापूर्वीं[7] हि क्षण न सोडिती भ्रमरी.[8] ॥ ५२
त्यां[10] भटमणिवरि[11] करिति च्छत्र निजा अंचळासि अच्छा[12] या ।
देवी,[13] छत्रें तुटलीं ज्यांचीं, ज्यांवरि रणांत न च्छाया. ॥ ५३
मंदाकिनीसरोरुहमकरंदनिषेकशीतळें[14] पदरें ।
वीरांचें मुख पुसिती, वीजिति,[15] यैन्मन[16] धरी न कंप दरें.[17] ॥ ५४
मृति[18] वरि भटकटकाला, दुर्लभरसपानकामुकाला हे ।
अमृतप्रपा[19] चि आजि;[20] स्वःस्त्रीचा[21] जन निका[22] मुका लाहे. ॥ ५५

---

१. उत्तम पंखा. अन्वयः—जे [जी अप्सरा] अंचळाला (आपल्या पदराला, व्यजनाच्या अभावीं) सुव्यजन कल्पुनि वीरवरातें सेवी (वारा घाली), त्या अप्सरेसि अवलोकुनि जाणों चंचळा फार लाजे. अप्सरा पदरानें वारा घालीत असल्यामुळें तिच्या पदराखालचा शरीराचा भाग क्षणांत दिसे व पुनः क्षणांत दिसेनासा होई. अशा रीतीनें शरीराच्या पिंवळसर रंगानें व दृश्यादृश्यतेनें ती अप्सरा विजेस लाजवी—असा कवीचा आशय. ही सर्व कल्पना पंतांचीच होय. ही शृंगारपरिप्लुत कल्पना कालिदासास ही शोभण्यासारखी आहे. २. पदराला. ३. वीज. ४. आकाशांत. ५. पळभर देखील. ६. युद्धांत पडलेल्यास. ७. अप्सरा. ८. प्रफुल्लित होण्याच्या पूर्वींही. ९. **प्रतिवस्तूपमा**लंकार. १०. अन्वयः—रणांत ज्यांचीं छत्रें तुटलीं [व त्यामुळें] ज्यांवरि रणांत च्छाया न, त्या भटमणिवरि या देवी (अप्सरा) निजा (आपल्या) अच्छा अंचळासि च्छत्र करिति. ११. येथे 'भटमणिंवरि' असा अनेकवचनी पाठ असावयास पाहिजे होता. १२. अच्छ=स्वच्छ, पांढरा. १३. देवी=देवस्त्री, अप्सरा. (राजाची पट्टाभिषिक्त स्त्री असा अर्थ आहे, तो येथें घ्यावयाचा नाहीं). १४. मंदाकिनी+सरोरुह+मकरंद+निषेक+शीतळ=आकाशगंगा+कमळ+रस+पडणें+थंड=आकाशगंगेतील कमळपुष्पाच्या रसानें भिजलेल्या शीतळ अशा. निषेक=प्रोक्षण, मार्जन, शिंपडणें. १५. वारा घालिती. १६. ज्या स्त्रियांचें मन. १७. भयानें. १८. सान्वयार्थः—भटकटकाला मृति (मरण) वरि; हे आजि (अशा रीतीनें वीर ज्यांत मरतात व अप्सरा ज्यांस गांठतात तें युद्ध) दुर्लभरसपानकामुकाला (कष्टानें मिळणारें स्वर्गस्त्रियांचें अधरामृत पिण्याविषयीं हपापलेल्या लोकांस) अमृतप्रपा चि (अमृताची पोयच); [कारण त्या युद्धामुळें] जन स्वःस्त्रीचा (स्वर्गसंबंधी स्त्रियेचा, अप्सरेचा) निका (खरा) मुका लाहे. १९. अमृताची पोय. २०. रण. २१. स्वःस्त्री=स्वर्गस्त्री (अप्सरा). २२. निका=खरा. 'निका' शब्द हिंदुस्थानी भाषेंत 'लग्न'पर वापरतात. तोही अर्थ प्रस्तुत स्थलीं विनोदकर होईल.

भीमार्जुनकर्णांच्या बाणानीं जे रणांगणीं मेले, ।
ते [1]झेलिले [2]सुरींहीं [3]सुरपुष्पांचे जसे नवे झेले. ॥ ५६
गुरुपुत्रादि महारथ जिंकुनि अर्जुन म्हणे सख्या हरिला, ।
'देवा ! पहा स्वसेनामद कर्णें आजि सर्व संहरिला. ॥ ५७
तें पळतें धर्माचें कटक, जसें हस्तियूथ भी हरिला; ।
[4]भ्यालें [5]केवळ देवा ! त्या उग्रा सूतनंदना अरिला. ॥ ५८
धर्म दिसेना, त्याचा ध्वज हि दिसेना; असे दिवस थोडा, ।
[6]तिसरा वांटा उरला; चाला, हे [7]शैवमयी [8]धरा सोडा. ॥ ५९
वधिले वीर, पळविले, मजसीं कोणीं न येति भांडाया, ।
भ्यां न वधावें पळतां; चाला; मारूनि काय रांडा [9]या ? ॥ ६०
आधीं राजा पाहूं. बा ! 'हूं' म्हण, चाल, गा ! [10]लगाम ढिले ।
नेदीं, [11]स्वरुण दिसति [12]शय [13]कां [14]रश्मिसुवर्णतंतुनीं [15]मढिले. ॥ ६१
[16]सानुज राजा कुशली प्रथम विलोकुनि करीन मग युद्ध; ।
[17]आधीं धर्म पहावा, कीं गुरु, तद्रहित कर्म न विशुद्ध.' ॥ ६२

---

१. ते मृत वीर अप्सरांनीं ताज्या पुष्पगुच्छांप्रमाणें (कोमल हातांनीं, फार जपून) झेलिले–असा अर्थ. २. अप्सरांनीं. ३. कल्पवृक्षाच्या पुष्पांचे गुच्छ. ४. 'भ्याले' असें पाठांतर. भ्याले=सैनिक भ्याले. ५. पूर्णपणें. ६. दिवसाचा तिसरा भाग. ७. प्रेतांनीं व्यापिलेली. ८. भूमी. ९. या रांडा (भीतीनें पळून जाणाऱ्या योद्ध्यांस उद्देशून तिरस्कारबुद्धीनें हा शब्द वापरला आहे) मारुनि काय? (मारून काय फायदा–कांहींच नाहीं–असा भाव). रांडा=भित्र्या भागुबाई. १०. लगाम ढिले नेदीं=लगाम ढिले सोडूं नको. ११. सु+अरुण=अत्यंत आरक्त. १२. हात. १३. येथें 'कां' हें उत्प्रेक्षावाचक पद आहे. १४. रश्मिसंबंधी (लगामसंबंधी) सुवर्णाच्या (सोन्याच्या) तंतुंनीं (दोऱ्यांनीं). १५. जणूं काय तुझे हात सोन्याच्या दोऱ्यांनीं (जरीनें) केलेल्या लगामानें मढिले (मढविलेले, सुशोभित केल्याप्रमाणें लाल) दिसति. घोड्यांचे लगाम ओढून ओढून कृष्णाचे कोमल हस्त आरक्त झाले होते–असा भाव. १६. भावांसह. १७. आधीं=रणकर्म करावयाच्या पूर्वीं. धर्म आधीं पहावा, कीं (कारण) [तो धर्म] गुरु (श्रेष्ठ, राजा, या सर्व सैन्याचा आधार होय); तद्रहित कर्म (राजा शत्रूच्या हातीं सांपडल्यानंतर त्याच्या सैन्यानें दाखविलेला पराक्रम) विशुद्ध न–असा सान्वयार्थ. येथें 'धर्म' हें पद श्लिष्ट आहे. धर्मरहित (अधर्मानें केलेलें) कार्य विशुद्ध नव्हे–असा दुसरा अर्थ सुभाषितरूप करावा.

## अध्याय छत्तिसावा.

### ( अश्वत्थामा–धृष्टद्युम्नयुद्ध. )

विजयाच्या वचनें प्रभु रथ फिरवी, युद्धभूमिला वर्णी; ।
केशव ते शवनिकर[2] प्रेक्षी, स्तवि[3], पार्थवीर आकर्णी[4]. ॥ १
वर्णी[5] केशव जे शवदेश वर त्रिभुवनांत ते पूत[6], ।
भू[7] तद्योगें शुद्धा, तेथ न येती च मृत्युचे[8] दूत. ॥ २
औदार्य नीरदाचें[9] वर्नि जेंवि मयूरराय[10] केकानीं[11], ।
नारायण[12] क्षणक्षण रण वर्णी, जिष्णु आयके कानीं. ॥ ३
पार्थ म्हणे कृष्णातें, 'चाल सख्या ! धर्मराज पाहों दे; ।
आहों[13] देवा ! तुज वश, तव यश हें तव पदीं च वाहों दे.' ॥ ४
मग शीघ्र दूर जाउनि कृष्ण म्हणे, '[14]धांवले नृपावरिते[15] ।
कौरव; भीमें पिटिले; पळति पहा; भग्न[16] जाहले अरि ते. ॥ ५
तो भग्नकुरुबळातें ज्वलनप्रभ[17] कर्ण रोधितो[18] पळतां; ।

---

१. ह्यांत मुळांतील ५८ व ५९ ह्या अध्यायांतील कथाभाग आला आहे. २. प्रेतसमूह. ३. अर्जुनाच्या पराक्रमाची तारीफ करी. केशव स्तवी–असा अन्वय. ४. ऐके. ५. जे शवदेश केशव वर्णी [ते] त्रिभुवनांत वर (श्रेष्ठ) [व] पूत. केशवाच्या वर्णनानें ते प्रदेश पूत झाले–असा भाव. ६. पवित्र. ७. भूमी. ८. यमाचे. मृत्यूचे दूत तेथें न येती, कारण तेथें पतन पावलेल्या वीरांस देवदूत स्वर्गांत नेत होते–असा भावार्थ. ९. मेघाचें. १०. उत्तम मोर. ११. मयूराच्या शब्दास 'केका' हें नांव आहे. 'केका वाणी मयूरस्य'–अमर. अन्वयः–जेंवि वानिं मयूरराय केकानीं नीरदाचें औदार्य वर्णी [तेंवि] नारायण क्षणक्षण रण [ वर्णी ]. १२. नारायण(कृष्ण) युद्धाचें वारंवार वर्णन करी. कां? तर वीरांस ठार मारून अर्जुन भूभार हलका करीत होता. मयूर मेघास स्तवितो, कारण तो पाण्याचा वर्षाव करितो. जलाचें वर्षण मेघांस इष्ट, तसें अर्जुनकृत वीरांचें पातन कृष्णास इष्ट होतें. ह्या इष्टत्वामुळें येथें सुरेख **उपमा** साधली आहे. १३. देवा! तुज [आम्ही, पांडव] वश आहोंत. हें तव यश तव पदींच वाहों दे. या शत्रुविनाशाबद्दल वारंवार माझी जी तारीफ करतोस, ती योग्य नाहीं. हा सर्व तुझाच प्रताप. हें शत्रुहननाचें यश तुझेंच. माझें कांहीं एक नाहीं–असा भाव. 'आहें देवा! तुज वश' असें पाठांतर. आहें=मी (अर्जुन) आहें. १४. या गीतींतील लहान लहान वाक्यें युद्धांत एकामागून एक घडणाऱ्या प्रसंगांचें हुबेहूब वर्णन करून युद्ध डोळ्यांपुढें चाललें आहे, कीं काय, असें भासवितात. १५. धर्मावर. १६. पराजित. १७. अग्नीप्रमाणें तेजस्वी. १८. अडवितो, पळून जाऊं देत नाहीं, मागें फिरवितो.

पार्था ! ओळखिला कीं [1]गजकक्षाकेतुनें महाबळ तां [2]? ॥ ६
तो वि[3]प्रसिंह आला बाहेरि त्यजुनि [4]कुरुचमूखदरी; ।
तो धृष्टद्युम्न पहा त्यावरि खवळोनि चालिला [5]तदरी'. ॥ ७
ऐसें दूरुनि दावी हरि, हाकी हं[6]सवर्ण हयरत्नें; ।
ने रथ जिकडे कौरवपांडव विजयार्थ करिति रण यत्नें. ॥ ८
इकडोनि जाय अर्जुन, तों तिकडे विजयशालि कर्णासीं ।
भांडे धृष्टद्युम्न, [7]प्लवगेश्वर जेंवि कुंभकर्णासीं. ॥ ९
कर्णातें तो [8]पार्षत, कर्ण हि त्या पार्षतासि, माराया ।
दारुण संगर करिती; त्यांच्या धैर्या नसे सि[9]मा राया ! ॥ १०
पार्षतवधार्थ कर्णें शर एक, यमें स्वदूतसा, पिटि[10]ला; ।
पळतां नीट म्हणेल चि 'मंदा[11] ! मागें रहा' म[12]हाकिटिला. ॥ ११
बहु घांव घेतली, कीं, 'सत्वर मारूं खळा, भरो पानें ।
र[13]क्ताच्या पोट,' असें चिंतुनि [14]कालानलाभरोपानें. ॥ १२
त्या उग्रा बाणातें, [15]नागवरातें जयापरि शि[16]खंडी, ।
[17]सात्यकि, रक्षाया [18]बळपति, मोडाया वृषा अरिसि, खंडी. ॥ १३

---

१. हत्तीचें चित्र फडकत आहे ज्यावर, अशा कापडाच्या निशाणानें. कक्षा=पट, उत्तरीय, हत्तीच्या आंगावर घालितात तो कपडा. हा शब्द 'कक्ष्या' असाही वापरतात. कर्णाच्या ध्वजावर हत्तीचें चित्र होतें, असें या वर्णनावरून दिसतें. २. त्वां. (मागें पृष्ठ १२२ टीप १३ पहा). ३. अश्वत्थामा. ४. कुरुसेनारूप आपली गुहा. ५. तत्+अरि=त्याचा+शत्रु=अश्वत्थाम्याचा शत्रु धृष्टद्युम्न. ६. पांढरे (हंसाच्या रंगाचे). ७. प्लवग+ईश्वर=मर्कट+अधिपति=सुग्रीव. हें सादृश्य केवळ यमकासाठीं नाहीं. प्लवगेश्वर आपल्या प्लवगांच्या (वानरांच्या)साहाय्यानें आपल्यापेक्षां अधिक बलवान् शत्रूवर चालून गेला, तसाच पांचालाधिपति धृष्टद्युम्न आपल्या पांचालांच्या जोरावर वीरश्रेष्ठ कर्णावर हल्ला करावयास गेला—असा भाव. ८. धृष्टद्युम्नाचा आजा 'पृषत' नांवाचा होता म्हणून यास 'पार्षत' हें नांव. ९. सिमा=सीमा, मर्यादा. १०. पिटाळला, वेगानें पाठविला. ११. मूर्खा ! १२. मोठ्या वराहाला. मोठा सूकर देखील त्याच्याइतक्या वेगानें पळत नाहीं—असा भाव. १३. रक्ताच्या पानें पोट भरो—असा अन्वय. १४. काल+अनलाभ+रोप=प्रलयकालीन अग्निसदृश तेजोयुक्त बाणानें. १५. सर्पश्रेष्ठातें. १६. मयूर. १७. बळपति रक्षाया, वृषा अरिसि (शत्रु जो कर्ण त्यास) मोडाया, सात्यकि त्या उग्रा बाणातें खंडी—असा अन्वय. १८. धृष्टद्युम्न. अठरा दिवसपर्यंत पांडवांचा सैन्याधिपति हाच होता.

[1]भोगहरावरि जेंवि व्याघ्र फिरे कर्ण सात्यकीवरि तो; ।
जाणों संग्राम [2]बळी स्वर्गार्थ [3]स्वर्पतीसवें करितो. ॥ १४
[4]तों गांठी [5]पांचाळा द्रौणि, जसा क्षुधित सिंह [6]रंकु-शता, ।
[7]ज्याच्या तीव्रशरानीं धरिली [8]अरिकरिकुळांत [9]अंकुशता. ॥ १५
द्रौणि म्हणे, 'रे अधमा ! रे [10]ब्रह्मघ्ना ! रहा रहा पापा !' ।
जैसा [11]गरुड दटावी [12]भोगहरा [13]काळियाव्हया सापा. ॥ १६
'मजपासुनि जीवंत ब्रह्मघ्ना ! आजि तूं न सुटसील; ।
[14]शरमुद्गरप्रहारें तूं [15]आयुर्मद्यकुंभ फुटसील. ॥ १७
[16]यासि जसा पाहुनि गुरु, गुरुपुत्रास हि [17]शिखीप्रतिम हा ही ।

---

१. आपला भक्ष्य हिरावून नेणाऱ्यावर. २. दैत्यांचा राजा बळी. एकदां बळी स्वर्गांत इंद्रावर चालून गेला व कित्येक दिवसपर्यंत स्वर्गास वेढा देऊन इंद्राशीं लढला. देवदैत्यांचें घोर युद्ध झालें व देवांचा पराभव होऊन इंद्रादिक स्वर्ग सोडून पळून गेले, अशी भागवतांत कथा आहे. या इंद्रबलियुद्धास अनुलक्षून प्रस्तुत गीत्यर्ध आहे. ३. इंद्राशीं. येथें 'स्वःपतीसवें' असाही पाठ आहे. ४. 'तो गांठी' असें पाठान्तर. ५. धृष्टद्युम्नास. ६. हरिणशतास. ७. ज्या द्रौणीच्या. ज्याचे तीव्र शर अरिरूपी हत्तींस अंकुशाप्रमाणें टोंचते झाले—असा भाव. प्रस्तुत गीति रूपकयुक्त औपम्यपर्यवसायी निदर्शनेचें उदाहरण होय. अंकुशता धरिली=अंकुशाप्रमाणें असह्य झाले. ८. अरिरूपी हत्तीच्या कुळांत. ९. अंकुशपणा, तीव्रता. १०. ब्राह्मणवधकर्त्या. ११. 'पूर्वी रमणक द्वीपांत गरुडानें वारंवार जाऊन नागांस भक्षण करावें, त्यामुळें सर्व नागांनीं मिळून असा विचार केला कीं, गरुडास आपण सर्वांनीं कांहीं नियमित भक्ष्य देण्याचें ठरवावें. त्यांनीं गरुडास तो विचार कळविला. त्यानें तो मान्य केला. व प्रत्यहीं तो नियमित भक्ष्य भक्षून जाऊं लागला. एकदां असें झालें कीं, गरुडाचा भक्ष्य त्यास न देतां तो काळियानें भक्षिला. त्या कारणास्तव गरुडाचें व त्याचें मोठें युद्ध झालें.' या कथेचा प्रस्तुत स्थलीं उल्लेख आहे. १२. भक्ष्य हरणाऱ्या. १३. काळिय+आव्हय=काळिय ज्याचें नांव अशा. १४. शर हाच मुद्गर, त्याच्या प्रहारेंकरून. १५. आयुष्यरूपी मद्याचें मडकें. आयुर्मद्यकुंभ [असा] तूं फुटसील=तुझें आयुष्य सरेल. अश्वत्थामा म्हणतो, 'हे धृष्टद्युम्ना ! तूं केवळ मातीचा घडा आहेस. ह्या घड्यांत मद्य भरलेलें असल्यामुळें तो अपवित्र अर्थात् फोडण्यास योग्य आहे. तुझें आयुष्य हेंच मद्य. मद्य जसें पापास कारण, तसेंच तुझें आयुष्य. तूं जीवंत राहिलास तर पापाचरणांतच आपलें आयुष्य घालविशील, म्हणून तुझ्या आयुष्याचा अंत करणें हेंच योग्य—असा भावार्थ. १६. जसा गुरु (द्रोणाचार्य) यासि (धृष्टद्युम्नास) [विलोकुनि अनतिहृष्टमना होय व] जेंवि महाही शिखीप्रति-विलोकुनि अनतिहृष्टमना होय [तेंवि] गुरुपुत्रास हि [विलोकुनि] शिखीप्रतिम हा ही (धृष्टद्युम्न देखील) [अनतिहृष्टमना होय]—धृष्टद्युम्न आपल्या मरणाकरितां जन्मला होता म्हणून त्यास पाहून

होय [1]अनतिहृष्टमना जेंवि विलोकुनि [2]शिखीप्रति [3]महाही. ॥ १८
[4]समरीं अवध्य [5]शस्त्रें [6]आपण, जाणे असें, न मी [7]मरणा, ।
द्रोणसुतावरि पार्षत जाय, मनिं म्हणे, 'करीन [8]भीमरणा.' ॥ १९
व्याघ्र व्याघ्रावरि ये द्रौणिवरि [9]द्रोणशत्रु तो नीट; ।
दोघे ही [10]अन्योन्यक्षयकाम क्रूर [11]विक्रमी धीट. ॥ २०
आच्छादुनि बाणपटें द्रौणि म्हणे, 'जा यमाकडे आधीं. ।
मीं पाठवितों तुज, [12]जा; घे प्रायश्चित्त, [13]शुद्धिला साधीं. ॥ २१
रे [14]पांचाळापसदा ! गुरुवधपाप स्मरोनि रडसील, ।

---

द्रोण भीत असे. मोरास पाहून सर्प भितो हें प्रसिद्धच आहे; त्याचप्रमाणें धृष्टद्युम्न द्रौणीस पाहून भिऊं लागला–असा भाव. १७. अग्नीसारखा (तेजस्वी) असा हा धृष्टद्युम्न देखील.

१. अनति+हृष्ट+मन=फारसें प्रसन्न नाहीं मन ज्याचें असा, उद्विग्न आहे मन ज्याचें असा. २. मोराला. ३. महा+अही=मोठा सर्प. ४. वरची गीति व ही गीति जरा परस्परविरुद्ध आहेत. धृष्टद्युम्न भ्याला असें वरच्या गीतींत आहे, व तो धैर्यानें युद्धास गेला असें ह्या गीतींत आहे. पण मुळांतही अशाच अर्थाचे श्लोक आहेतः—'तथा द्रौणिं रणे दृष्ट्वा पार्षतः परवीरहा। नातिहृष्टमना भूत्वा ज्ञातवान् मृत्युमात्मनः ॥ २२ ॥ स ज्ञात्वा समरेऽत्मानं शस्त्रेणावध्यमेव तु । जवनाभ्यद्रवेत् द्रौणिं कालः कालमिव क्षये ॥ २३ ॥' [अ० ५९.] या श्लोकांवरून व समानार्थक गीतींवरून आणि श्लोकांतील 'नातिहृष्टमना' व गीतींतील 'अनतिहृष्टमना' या शब्दांवरून हें पर्व लिहितांना पंत नेहमीं मूळ पाहून काव्यरचना करीत असत असें दिसतें. ५. धृष्टद्युम्न स्वतःस 'समरीं शस्त्रें अवध्य' मानितो, पण तो शस्त्राचा उपयोग न करितांच मारला गेला (सौप्तिकपर्व, अध्याय २ पहा). तो अवध्य नसूनही आपण अवध्य आहों, असेंच समजत असे, असें दिसतें. ६. आपण शस्त्रें अवध्य [आहों] असें जाणे (समजे) [व म्हणून] मरणा न भी–असा अन्वय. 'समरीं......आपण जाणे, असे न भी मरणा' असा पाठभेद. ह्या पाठानुसार 'समरीं आपण शस्त्रें अवध्य [आहों असें] जाणे [आणि त्याला] मरणा (मरणाविषयीं) भी (भीति) न असे–असा अन्वय. ७. अश्वत्थाम्याला पाहतांच जरी प्रथम धृष्टद्युम्नाला कांहींशी भीति वाटली, तरी आपण युद्धांत शस्त्रानें अवध्य आहों, हें लक्ष्यांत येतांच त्याची भीति नाहींशी झाली–असा भावार्थ. ८. भयंकर युद्ध. ९. धृष्टद्युम्न. १०. एकमेकांचा नाश करण्याविषयीं इच्छा बाळगणारे. ११. पराक्रमी. १२. यमलोकीं जा. 'मी पाठवितों तुजला' असें पाठांतर. १३. पापविमुक्तीला. मी तुला मारून यमलोकीं पाठवीन. असें केल्यानेंच तुला ब्रह्महत्येबद्दल प्रायश्चित्त मिळेल. अर्थात् यमलोकांतील यातना भोगूनच तूं पापमुक्त होशील–असा भाव. १४. पांचाल+अपसद=पांचालांतील नीच. अपसद=नीच, ब्राह्मणक्षत्रियादिकांस त्यांपेक्षां नीच कुळांतील स्त्रियेपासून उत्पन्न झालेला मुलगा.

धारातीर्थीं[1] मग्न न होतां, नरकांत तूं चि पडेसील[2]. ॥ २२
जरि न पळसील, जरि तुज विजय न रक्षील तरि, तुझी आण[3], ।
हा मदसि[4] काळपाश[5] खगळां पडला चि, हें मनीं आण[6].' ॥ २३
धृष्टद्युम्न म्हणे, 'रे वाचाळा ! तें च तें च किति वदसि ? ।
जेणें[7] पित्यासि दिधलें उत्तर देईल तो चि तुज मदसि. ॥ २४
द्रोण जसा विप्राधम[8], तत्सुत तैसा चि तूं हि; जरि त्यांतें, ।
वदसि, मदसि वधि, ऐसें, वधिल न कां तुज कुकर्मकरित्यातें?' ॥ २५
ऐसें वदोनि पार्षत ताडी द्रौणीस मार्गणें निशितें[10], ।
द्विजशरगण हि तयातें[11], द्याया गृध्रादिकांसि तत्पिशितें[12]. ॥ २६
अन्योन्यांतें झांकिति बाणानीं द्रौणिपार्षत क्रोधी, ।
पांचाळपांडवांतें[13] तेव्हां राधेय एकला रोधी. ॥ २७
तों[14] पांचालाखंडल[15] खंडी कोदंडदंड[16] गुरुज्याचा[17], ।

---

१. युद्धांत. शस्त्रधारारूप तीर्थांत मग्न न होतां मेलास तर नरकांत पडशील; कारण गुरुवधजन्य पापाचें प्रायश्चित्त केलें तरी नरकनिवृत्ति होणार नाहीं, आणि या तीर्थीं मेलास तर मुक्त तरी होशील. २. तूं नरकांत चि पडशील–असा अन्वय. ३. शपथ. अश्वत्थाम्यानें धृष्टद्युम्नाची शपथ वाहाणें, हें त्यास शोभत नाहीं, कारण त्याच्या दृष्टीनें धृष्टद्युम्न पूज्य नसून अधम होता. ४. मत्+असि=माझा खड्ग. ५. यमाचा पाश. ६. जर तूं माझ्यासमोरून पळाला नाहींस, अथवा अर्जुनानें तुला पाठीशीं घातलें नाहीं तर–ह्या अटी म्हणजे अश्वत्थाम्याच्या आचरटपणाची कमाल होय. येथील हें असलें मर्यादित विधान अश्वत्थाम्याच्या तोंडीं मुळींच शोभत नाहीं. ७. जेणें (ज्या माझ्या असीनें) [तुझ्या] पित्यासि उत्तर दिधलें तो चि मदसि (माझी तरवार) तुज (तुला) उत्तर देईल. तुला निराळें उत्तर देण्याची गरज नाहीं; तुला मारणें हेंच उत्तर होय–असा भाव. ८. ब्राह्मणकर्म सोडून क्षत्रियकर्म स्वीकारल्यामुळें, द्रोणास हें विशेषण लाविलें आहे. ९. द्रोणातें. जरि 'त्यातें मदसि वधी' ऐसें वदसी [तरी] कुकर्मकरित्यातें तुज [तो मदसि] कां न वधील ?–असा अन्वय. द्रोणाचार्याला माझ्या तरवारीनें मारिलें, असें तूं म्हणतोस, तर तीच तरवार दुष्कर्म करणारा जो तूं त्या तुला (तूं द्रोणाहून कमी योग्यतेचा असल्यामुळें) कां मारणार नाहीं ? खात्रीनें मारीलच–असा अर्थ. १०. तीक्ष्णें. ११. पार्षतातें. द्विजशरगण हि तयातें ताडिती–असा अन्वय. १२. तत्+पिशित=त्यांचें मांस. १३. धृष्टद्युम्नाच्या साहाय्यास येऊं नये म्हणून कर्णानें पांचाळ (धृष्टद्युम्नाचे सैनिक) व पांडव यांस अडवून धरिलें. १४. 'तो पांचालाखंडल' असें पाठांतर. १५. पांचालेंद्र (धृष्टद्युम्न). आखंडल=इंद्र. १६. तीरकमठा. १७. गुरुपुत्राचा.

पांचाळवधीं धरिती फार भरंवसा[1] समस्त कुरु[2] ज्याचा. ॥ २८
द्विज जैं सज्य दुजें[3] करि, भासे[4], त्या[5] सुप्रचंड[6] कोदंडें[7], ।
गुरुघातपातकहता[8] हाणितसे काय काळ तो दंडें ! ॥ २९
खंडी धनु–शक्ति[9]–ध्वज–हय–सूत–रथादि, विरथ करि अरिला, ।
तों पांचालें द्रोणग्रीवारक्ताक्त[10] खड्ग करिं धरिला. ॥ ३०
द्रौणिवधार्थ विरथ ही पार्षत उठला करीं धरुनि असिला; ।
खवळे चि पीडकावरि[11] पन्नग, भोगार्धशेष[12] जरि असिला[13]. ॥ ३१
इच्छी करावया जों गुरुबंधुप्राणघात[14], करवाळी[15] ।
पार्षत उतरों[16] पाहे, जैसा सुग्रीवघातकर[17] वाळी, ॥ ३२
तों[18] गुरुसुत दे त्यातें बहु ताप, करूनि भग्न करवाळा; ।
कुजनीं[19] पवि गर, सुजनीं गुरुकर पांटीर[20], रात्रिकर[21], वाळा. ॥ ३३

---

१. या गीत्यर्धानें कवीनें असें सुचविलें कीं, कौरवांचा भरंवसा खोटा ठरावयाचा होता. २. कौरव. ३. 'कोदंड'शब्द पुल्लिंगी व नपुंसकलिंगी वापरतात. ४. ही सर्व उत्प्रेक्षा पंतांची आहे. ५. त्या गुरुघातपातकहता–असा अन्वय. तें अश्वत्थाम्याचें सुप्रचंड कोदंड नव्हे, तर काळाचा दंड होय असा भास झाला–हा भाव. ६. अन्वयः–द्विज जैं दुजें (कोदंड) सज्य करि [तैं] तो त्या सुप्रचंड कोदंडें, दंडें काळ (यम) गुरुघातपातकहता हाणितसे काय [असें] भासे. ७. धनुष्यानें. ८. द्रोणघाताचें जें पाप, तेणेंकरून मृतप्राय झालेल्यास. ९. अस्त्रविशेष, ज्यास सैती भली असें म्हणतात ती. १०. द्रोणाच्या मानेंतील रक्तानें न्हालेला, अर्थात् ज्या खड्गानें द्रोणाची मान कापिली होती तो. ११. पीडा देणाऱ्या मनुष्यावर. सर्प अर्धा जरी तुटला, तरी आपणास त्रास देणाऱ्या मनुष्यावर उलट करीत असतो. हा दृष्टांतालंकार. १२. भोग+अर्ध+शेष=अर्धे शरीर तुटलें आहे ज्याचें असा सर्प. १३. असला. १४. गुरुबंधु जो अश्वत्थामा, त्याच्या प्राणांचा घात. १५. खड्गधारी, ज्याच्या हातांत तलवार आहे असा. १६. उतरों पाहे=रथांतून उतरण्याचा प्रयत्न करी. (पुढें गीति ३६ पहा). 'पार्षत उपसूं पाहे' असें पाठान्तर. उपसूं पाहे=तलवार (जी त्याच्या हातांत होती) उपसूं पाहे–असा अर्थ. १७. सुग्रीव व वाली हे बंधु एकमेकांच्या प्राणघाताविषयीं तत्पर असत. ते बंधु व प्रस्तुत स्थलीं पार्षतद्रौणी गुरुबंधु. म्हणून ही उपमा. १८. ही गीति रा० पराडकर यांच्या प्रतींत नाहीं. त्या प्रतींत या अध्यायाच्या गीति ४९ च आहेत. १९. अन्वय व अर्थः–गुरुकर (गुरूचे हस्त) कुजनीं (दुष्टमनुष्याचे ठायीं) पवि (वज्र) [व] गर (विष) (वज्राप्रमाणें व विषाप्रमाणें काम करितात) [व] सुजनीं (चांगल्या मनुष्याचे ठायीं) पांटीर, (चंदन) रात्रिकर (चंद्र), [व] वाळा [यांप्रमाणें सुखद होतात.] हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. हें अर्थांतरन्यासाचें उदाहरण होय. कारण या सामान्य सिद्धांतानें गीतीच्या पूर्वार्धाचें समर्थन केलें आहे. २०. चंदन. २१. चंद्र.

खड्ग च्छेदुनि [1]निकरें [2]शरनिकरें पार्षतासि [3]तो तासी. ।
द्रौणि म्हणे, 'करिन असें झाला होतासि कीं न होतासी.' ॥ ३४
द्विज खरतरशरनि[4]करें निकरें करि [5]अरिशरीरतक्षण ही; ।
न मरे पार्षत, न पडे, [6]होय न मोहीं तरी रत क्षण ही. ॥ ३५
टाकी चाप-लता, मग [7]यानाखालें [8]उडी हि तो, विप्र; ।
अहिवरि गरुड तसा द्विज धांवे त्या पार्षतावरि क्षिप्र. ॥ ३६
सिंह जसा द्विरदातें, द्रौणि [9]रथस्था अरीस आकर्षी. ।
इतुक्यांत धांवला [10]तो ज्यातें गाती सदैव [11]नाकर्षी. ॥ ३७
तो भगवान् कृष्ण म्हणे, 'रे रे पार्था ! पहा पहा गा ! तो ।
सिंहें गजसा, पार्षत गुरुपुत्रें क्षिप्र मारिला [12]जातो. ॥ ३८
घेईल पार्षताचे गुरुपुत्र प्राण, हाण [13]बाणगणीं; ।
[14]हूं ऐक, [15]व्यसनार्तत्राण चि सद्धर्म; हें प्रमाण गणीं.' ॥ ३९
[16]भगवद्वचनाकरणीं ज्ञानी [17]ज्ञान हि गणी [18]अपार्थकसें; ।
वदला दास '[19]करिष्ये [20]वचनं [21]तव,' तो [22]करी न पार्थ कसें ? ॥ ४०

---

१. आणीबाणीनें. २. शरसमूहानें. ३. द्रौणि. तासी=झांकी, आच्छादून टाकी. ४. निकर= समुदाय. या गीत्यर्धात 'र'काराची असकृद् आवृत्ति झाली आहे. ५. शत्रूच्या शरीराचें तासणें. ६. तरी क्षणही मोहीं रत न होय=क्षण देखील मूर्च्छित झाला नाहीं. ७. रथाखालीं. ८. उडी हि टाकी—असा अन्वय. ९. रथावर बसलेल्या. १०. हें **पर्यायोक्ती**चें उदाहरण. कृष्ण असें स्पष्ट न सांगतां पर्यायानें त्याचा उल्लेख केलेला असल्यामुळें हा अलंकार. ११. देवर्षी, स्वर्गातील ऋषी. १२. गुरुपुत्रें (गुरुपुत्राकडून) पार्षत क्षिप्र मारिला जातो—हा प्रयोग चिंत्य आहे. १३. बाणाच्या समुदायानें. १४. 'हूं, एक' असें पाठांतर. १५. व्यसनेंकरून दुःखित झालेल्याचें रक्षणच. १६. भगवंताचें वचन न पाळिल्यास ज्ञानी जरी असला, तरी तो आपलें ज्ञान निरर्थक समजतो. ज्ञानापेक्षां भगवद्वचनप्रतिपालन अधिक होय—हा भाव. अकरणीं=न केल्यास. १७. भगवद्विषयक ज्ञान, तत्त्वज्ञान. हा **अर्थांतरन्यास**. पुढील गीत्यर्धाचें समर्थन करण्याकरितां हें वाक्य आहे. १८. अप+अर्थक+सें=ज्यांत अर्थ नाहीं असें, व्यर्थ असें. १९. करितों. या संस्कृत वाक्याचा अर्थः—तुझ्या म्हणण्याप्रमाणें करीन. २०. बोलणें. २१. तुझें. येथें भगवद्गीतेंतील पुढील श्लोकास उद्देशून 'करिष्ये वचनं तव' असें म्हटलें आहेः—नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत । स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥ (अध्याय १८।७३). याचा अर्थः—अच्युता ! तुझ्या प्रसादेंकरून माझा मोह निघून गेला, मी तोच पूर्वीचा अर्जुन,

पार्षततापहराया, जाणों संपूर्ण नाथ रजनीचे,[1] ।
हय,[2] हाकी हा[3] कीर्तिश्रीनीतिनिवास;[4] वासवजनीचे.[5] ॥ ४१
आले प्रभु[6] हें कळतां अश्वत्थामा करी त्वरा विपुला,[7] ।
कालज्ञ[8] मुनि भवाला,[9] नाशायाला तसा झटे रिपुला. ॥ ४२
[10]नक्रें सरोवरीं गज, विप्रें हि तसा विकृष्यमाण[11] रणीं ।
पार्षत रक्षाया, नरनारायण तूर्ण धांवले मरणीं. ॥ ४३
सोडुनि शर गुरुपुत्रा ताडी कौंतेय; ते यशस्विवर[12] ।
शिवरक्तप[13] त्यासि[14] कसे साहति,[15] करणार मेरुला[16] विवरें[17] ? ॥ ४४
[18]पार्थाचा धैर्य न दे रिपुदमनीं त्या तदा शर थिराया;[19] ।

---

अशी मला स्मृति उत्पन्न झाली, माझा संदेह गेला, हा मी उभा राहिलों, तुझ्या आज्ञेप्रमाणें आतां वागतों. २२. ह्याचें कर्म 'भगवद्वचन' असें समजावें.

१. रजनीचे संपूर्ण नाथ=पूर्णचंद्र. संदर्भावरून हें घोड्यांचें विशेषण दिसतें. २. रात्रीचे. ३. कृष्ण. ४. कीर्ति, लक्ष्मी व नीति यांचें आश्रयस्थान (असा कृष्ण). ही गीति रचितांना पंतांच्या मनांत भगवद्गीतेंतील पुढील श्लोक घोळत होता असें दिसतें:—'यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः । तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम' ॥ (अध्याय १८।७८). ५. अर्जुनाचे. अन्वयः—जाणों रजनीचे संपूर्ण नाथ (पूर्ण चंद्र) [असे] (धवल) जे वासवजनीचे हय [ते] हा कीर्तिश्रीनीतिनिवास (कृष्ण) पार्षततापहराया हाकी. अर्जुनाच्या हयांचा रंग पांढरा असल्यामुळें व ते पार्षततापहरण्याच्या कार्मी कारणीभूत झाल्यामुळें त्या हयांवर पूर्णचंद्राचा आरोप केलेला आहे. ६. निग्रहानुग्रहसमर्थ असे कृष्णार्जुन. प्रभु=स्वामी, समर्थ, अविनाशी—असे अर्थ आहेत. ७. पुष्कळ. ८. काळ जाणणारा, आपला मृत्युकाल ज्यास माहीत आहे असा. ९. संसाराला. मुनि मृत्युकालापूर्वीच संसाराचा त्याग करण्याचा जसा यत्न करितो, तसा द्रौणी, कृष्ण येऊन पोहोंचण्यापूर्वींच, पार्षतास मारण्याचा यत्न करूं लागला—असा भाव. १०. येथें प्रख्यात गजेंद्रमोक्षाकडे कविकटाक्ष आहे. अन्वयः—सरोवरीं नक्रें विकृष्यमाण गज रक्षाया, तसा रणीं विप्रें विकृष्यमाण पार्षत मरणीं रक्षाया (मरणसमयीं रक्षण करण्यास) नरनारायण तूर्ण (शीघ्र) धांवले. ११. ओढला जाणारा. १२. यशस्विश्रेष्ठ. १३. शिव+रक्त+प=शंकराचें रक्त प्राशन करणारे असे (शर). अर्जुनानें पाशुपतप्राप्तिसमयीं शिवाशीं युद्ध केलें, त्या प्रसंगास अनुलक्षून अर्जुनाच्या बाणास 'शिवरक्तप' असें म्हटलें आहे. १४. अश्वत्थाम्यास. १५. ते शर त्यासि कसे साहति—असा भाव. १६. धैर्यस्थैर्याविषयीं मेरू प्रख्यात आहे. १७. छिद्र, भोंक, द्वार. १८. अन्वय व अर्थः—पार्थाचा शर तदा (त्या काळीं) त्या (अश्वत्थाम्यास) रिपुदमनीं (धृष्टद्युम्नाचा संहार करण्यांत) थिराया (स्थैर्यानें उभें राहण्यास, आपल्या जागीं ठाम उभें राहाण्यास) धैर्य न दे. १९. स्थिर उभें राहाण्यास.

तेव्हां मज [१]आठवला [२]वाळिवधख्यात दाशरथि राया ! ॥ ४५
[३]द्व्यंगुल हि गुरुसुताच्या [४]अक्षत ठेवी न पार्थ [५]कायास; ।
[६]अशुभावहविधिसा करि [७]सहसा समयीं [८]अपार्थकायास. ॥ ४६
[९]मंत्रहत [१०]ब्रह्मग्रह जेंवि [११]धृत त्यजुनि जाय दूरवर, ।
तैसा पार्षत सोडुनि [१२]जिष्णुशरप्रहत विप्र [१३]शूर-वर. ॥ ४७
द्रौणि स्वरथीं चढला, कढला कोपानळें, धरी धनुला; ।
सोडुनि बहु शर झांकी, घन रविला तेंवि, त्या [१४]पृथाजनुला. ॥ ४८
पळवी सहदेव रथीं वाहुनि त्या सैन्यनायका [१५]श्याला; ।
[१६]मृत्युपुढें [१७]अभिमानें तो ही [१८]खोवील पाय [१९]काशाला ? ॥ ४९
युद्धीं गुरुपुत्रास हि पार्थाचा बाण [२०]मोह दे भारी, ।
म्हणुनि पळविला सूतें; तों खवळे वृष जसा [२१]मदेभारी. ॥ ५०

---

१. या गीतींत **स्मरणा**लंकार आहे. प्रस्तुत **पा**र्थाच्या कृतीवरून **दा**शरथीच्या कृतीची आठवण झाली, असें वर्णन आहे म्हणून **स्मरण** नामक अलंकार. २. **वा**लीच्या वधानें विख्यात असा. प्रस्तुत स्थलीं **पा**र्थास पाहून **रा**माची आठवण होण्याचें कारण असें कीं, **सु**ग्रीव व **वा**ली हे युद्ध करीत असतां, **वा**लीनें **सु**ग्रीवास जर्जर करून सोडिलें होतें. इतक्यांत **रा**मानें शर सोडून **वा**लीस पाडिलें व **सु**ग्रीवास वांचविलें. प्रस्तुत स्थलीं असाच प्रकार घडला म्हणून स्मृतिप्रसंग. ३. द्वि+अंगुळ=दोन अंगुलेंही. ४. क्षतरहित. ५. शरीरास. ६. प्रतिकूल दैवाप्रमाणें. ७. अन्वय व अर्थः-समयीं (ऐन प्रसंगीं; धृष्टद्युम्नास आतां खातरीनें मारणार अशा समयीं) सहसा (पार्थ एकाएकीं येऊन) अशुभावहविधिसा (दुर्दैवाप्रमाणें; दुर्दैव ज्याप्रमाणें केलेल्या सर्व यत्नास एकदम विफल करितें त्याप्रमाणें) अपार्थकायास करि (अश्वत्थाम्याचे सर्व श्रम निरर्थक करी). ८. अप+अर्थक+आयास=ज्या श्रमांत कांहीं अर्थ नाहीं असे, व्यर्थ आयास, निरर्थक झालेले श्रम. ९. मंत्राच्या योगानें पीडा पावलेला. १०. ब्रह्मराक्षस. ११. धृत=धरिलेलें (मनुष्य). 'धृति' असें पाठान्तर. धृति=धैर्य. १२. अर्जुनाच्या बाणानें विद्ध झालेला असा. १३. अर्जुनाच्या बाणांच्या भयंकर माऱ्यामुळें अश्वत्थामा धृष्टद्युम्नास सोडून पळून गेला. तेव्हां अश्वत्थाम्यास 'शूरवर' असें विशेषण नीटसें साजत नाहीं. १४. पृथापुत्राला, अर्जुनाला. १५. मेहुण्याला. १६. त्यास मृत्युप्राय जो अश्वत्थामा त्यापुढें. १७. ताठ्यानें. १८. पाय खोवणें=स्थिर उभें राहणें. १९. कशाकरितां. २०. मूर्च्छा. २१. मद+इभ+अरि= मत्तगजाचा शत्रु (सिंह). येथें नुसतें इभारी (हत्तीचा शत्रु) असें पद असतें, तरी कार्यभाग झाला असता. 'मदेभारी' असें म्हणण्यांत कांहीं स्वारस्य दिसत नाहीं. सामान्य हत्तींचा शत्रु (सिंह) निराळा व मदोन्मत्त हत्तींचा घातकर्ता सिंह निराळा, असा प्रकार मुळींच नाहीं.

## अध्याय सदतिसावा.[१]

पार्थासि[२] पार्थवचनें नेतां संशप्तकांकडे हरि तो, ।
युद्धें दूरुनि दावी,[३] जो जेथें कर्म जें जसें करितो. ॥ १
'पार्था ! तो धर्म पहा; तीं कुरुकटकें तयाकडे जाती; ।
ते पांचाळ नृपातें रक्षाया धांवले कृतख्याती.[४] ॥ २
तो सानुज दुर्योधन राजाप्रति[५] धांवला, जसा रत्ना ।
संपादाया अर्थी[६] धांवे, लोभें करी महायत्ना. ॥ ३
सात्वतभीमांहीं ते रिपु धर्मनृपा[७] प्रहार करणारे ।
रोधियले,[८] जेंवि हरिज्वलनांहीं[९] दैत्य अमृत हरणारे. ॥ ४
जन्हि रोधिले नृपाप्रति गेले चि समूह ते कुरुबळांचे, ।
जैसे वर्षाकाळीं सिंधुंप्रति[१०] ओघ दुर्धर[११] जळांचे. ॥ ५
कौरवबळ काळवदन, सांपडला त्यांत धर्मराज पहा, ।
'रघुराम'[१२] असें म्हण गा ! विजयावह[१३] संकटीं बरा जप हा. ॥ ६
दुर्योधनकर्णकृपद्रौणिशर च्छेदितील पर्वत रे ! ।
यांच्या समरसमुद्रीं शक्र[१४] हि न मनीं धरूनि गर्व तरे. ॥ ७
तो धर्म विमुख[१५] केला कर्णानें; कोण त्यांसि[१६] साहेल? ।

---

१. या अध्यायांत मुळांतील ६० व्या अध्यायांतील कथाभाग आला आहे. २. 'पार्थासि पार्थवचनें' असें न म्हणतां 'पार्थासी तद्वचनें' असें पंतांनीं म्हटलें असतें तर द्विरुक्ति टळली असती. ३. दुरून दाखवून वर्णन करी. ४. केली आहे प्रसिद्धि ज्यांनीं असे, नांवाजलेले. ५. धर्मराजावर. ६. धन इच्छिणारा. ७. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'धर्मनृपापहार' असा पाठ आहे व त्यावर 'धर्मराजाचें हरण' अशी टीप आहे. आमच्या मतें आम्ही दिलेलाच पाठ शुद्ध असावा. 'प्रहार' शब्दांतील 'प्र' ची शाई उडून तें अक्षर 'प' सारखें दिसणें शक्य आहे. ८. अडवून धरले. ९. इंद्र आणि अग्नि यांनीं. येथें समुद्रमंथनकथेवर कविकटाक्ष आहे, असें वाटतें. १०. समुद्राकडे. 'सिंधु'शब्दाचे समुद्र, नदी व नदीविशेष इतके अर्थ होतात. ११. ज्यांस धरून ठेवितां येत नाहीं असे. १२. 'राम राम' असा जप कर–हा भाव. या वेळीं श्रीकृष्णानें अर्जुनाच्या ठिकाणीं उत्साह उत्पन्न करावयास पाहिजे होता. पण तसें न करितां नुसतें 'राम राम' असें म्हणत बस, असें त्यानें सांगणें थोडें चमत्कारीक वाटतें. १३. विजय मिळवून देणारा. १४. इंद्र देखील. १५. पराङ्मुख, तोंड फिरवून पळणारा असा. १६. कर्णास. कर्णाचा मारा कोण सहन करूं शकेल? अर्थात्–कोणी नाहीं–हें उत्तर.

[1]क्रुद्धा राधेयाच्या [2]काळ हि वदनाकडे न पाहेल. ॥ ८
[3]उपवासानीं केवळ धर्माचें मृदु शरीर [4]शुष्क, [5]रसें ।
रहित, [6]प्रतप्त [7]दुःसह आधीनें, [8]ग्रीष्मकाळपुष्करसें. ॥ ९
आहे [9]ब्राह्मबळ बहु, क्षात्रबळ श्रीयुधिष्ठिरीं नाहीं; ।
कर्णासीं गांठि रणीं, मजला भासे बरें नसे कांहीं. ॥ १०
बहु गर्जति कुरुकुंजर; भीम पुरुषसिंह कां [10]मुंका साहे? ।
[11]कौरव मरोत, पांडव वांचोत, शिवा! जगन्निवासा! हे. ॥ ११
ते प्रेषिले वृषें भट कीं, '[12]रिपुनृपजीवितापहारा जा,' ।
गंधर्वास्त्रें केला झांकुनि [13]संजाततप हा [14]राजा. ॥ १२
ते पांचाळ [15]मुरडले, [16]रक्षाया, करुनि युद्ध, रायासी, ।
गज जेंवि [17]यूथपतिला [18]पंकह्रदांतुनि उद्धरायासी. ॥ १३

---

१. क्रुद्धा (रागावलेल्या) राधेयाच्या वदनाकडे काळ हि न पाहेल—असा अन्वय. २. यम देखील. ३. युधिष्ठिर धर्माचे नियम विधियुक्त पाळीत असे म्हणून त्यास पुष्कळ उपवास पडत असत. ४. वाळलेलें. ५. रसें रहित=टवटवीतपणा ज्यांत नाहीं असें, ज्यांत ओलावा नाहीं असें. ६. संतापलेलें, उन्हानें तापलेलें. ७. सोसण्यास कठीण अशा अंतःकरणव्यथेनें. ८. ग्रीष्मऋतूंतील म्हणजे म्लान अशा कमलाप्रमाणें. ९. ब्राह्मणांचा गुणविशेष (ब्रह्मचिंतन). १०. स्वस्थ राहून, मुकाट्यानें. साहे=सहन करील. ११. हे उद्गार कृष्णाचें पांडवांसंबंधीं मातेसारखें प्रेम व्यक्त करितात. १२. शत्रूकडील राजांच्या जीविताचा अपहार करण्यास. १३. उत्पन्न झाला आहे ताप ज्यास असा. १४. युधिष्ठिर. १५. युधिष्ठिराकडे परत फिरले. १६. युद्ध करुनि रायासी रक्षाया—असा अन्वय. १७. गजसमूहाचा जो राजा (गज) त्याला. १८. चिखलाच्या डोहांतून. पंक+ह्रद=चिखल+डोह. प्रस्तुत स्थलीं 'पंकह्रद' शब्दांत ह्र (ह्+र) या संयुक्ताक्षरानें मागील 'क' या अक्षरास गुरुत्व आलें व छंदोभंग झाला, असें वाटण्याचा संभव आहे. कै० वामन दाजी ओक यांसारख्या काव्यशोधनपटु विद्वानासही ही शंका आली, म्हणून याची प्रस्तुत स्थलीं जरा विस्तारानें मीमांसा करितों. उद्योगपर्वांतर्गत १ ल्या अध्यायांतील ५० व्या गीतीच्या 'चित्तांत म्हणे, कैसा केला अरिमीनह्रद अगाध रिता' या पूर्वार्धाच्या 'अरिमीनह्रद' शब्दावर टीप देतांना कै० ओक म्हणतातः—'या सामासिक पदांत 'न'काराला गुरुत्व आलें आहे. कारण त्याच्या पुढें 'ह्र' हें जोडाक्षर आहे. 'सानुस्वारो विसर्गांतो दीर्घो युक्तपरश्च यः' या वृत्तरत्नाकरस्थ नियमानें मागील 'न'वर्णास गुरुत्व येतें व त्यामुळें एक मात्रा अधिक होते. हें अप्रशस्त होय'. [मोरोपंत—उद्योगपर्व—पृ० १२ टी० १० काव्यसंग्रहांतली आवृत्ति पहा.] कै० ओकांच्या मतें प्रस्तुत स्थलींही अप्रशस्त प्रयोग आहे, असें ठरतें. पण आजपर्यंत पंतांचा जो ग्रंथ बाहेर आला आहे, त्यावरून पंत छंदोभंगापवढी चूक करतील असें मुळींच वाटत नाहीं.

हा ! हा ! ध्वज कां न दिसे ? राहों देईल दुष्ट कर्ण कसा ? ।
ध्वज त्यापुढें न वांचे क्षुधितव्याघ्रासमोर तर्णकसा[1]. ॥ १४
सात्यकिशिखंडिपार्षतयमभीमांच्या समक्ष कर्ण कसे ।
सैनिकें[2] पहा पळवितो, व्याघ्र महोक्षांसमक्ष[3] तर्णकसे. ॥ १५
तो भीमावरि गेला, शर वर्षी कर्ण वर्णनीयमहा[4]; ।
अतिदुःसहप्रहार[5] क्रूरपुरुषसिंह[6] वर्णनीं[7] यम हा. ॥ १६

उलट त्यांच्या प्रयोगांवरून त्यांनीं छंदःशास्त्राचा चांगलाच अभ्यास केला होता असें दिसतें. प्रस्तुत प्रयोगही त्यांतलाच एक आहे. या प्रयोगावरून पंतांस छंदःशास्त्रांतील बारीक सारीक नियम-जे ओकांसारख्या विद्वानांसही माहीत नव्हते ते-माहीत होते असें सिद्ध होतें. प्रस्तुत स्थलीं किंवा ओकांनीं टीप दिलेल्या स्थलीं संयुक्ताक्षराच्या मागील अक्षरास गुरुत्व आलें नाहीं, व छंदोभंगही झाला नाहीं. संयुक्ताक्षरांच्या पूर्वाक्षरांस गुरुत्व येतें, हा सामान्य सिद्धांत खरा, पण यास अपवाद आहेत. 'प्र' व 'ह्र' या संयुक्ताक्षरांच्या पूर्व अक्षरांस विकल्पेंकरून गुरुत्व येतें. विकल्पेंकरून म्हणजे वृत्ताच्या सोयीप्रमाणें कधीं गुरुत्व येतें व कधीं येत नाहीं. याविषयीं छंदोमंजरींत असें लिहिलें आहे. "प्रह्रेवेति पुनः पिंगलमुनेर्विकल्पविधायकं सूत्रम् । ततश्च कुमारे (कुमारसंभवे) 'सा मंगलस्नानविशुद्धगात्री गृहीतप्रत्युद्गमनीयवस्त्रा । .........' अत्र प्रशब्दे परे गुरोर्लघुत्वम् । 'प्रासनाभिह्रदमज्जनमाशु प्रस्थितं निवसनग्रहणाय । .........' इति माघे (शिशुपालवधे) ॥ अत्र ह्रशब्दे परे गुरोर्लघुत्वम् । तीव्रप्रयत्नोच्चारणेन लघुत्वमिति कंठाभरणः ।" अर्थ स्पष्ट आहे. छंदःशास्त्रांतील हा विकल्पाचा सूक्ष्म नियम पंतांस पूर्णपणें माहीत होता. कारण त्यांनीं प्रस्तुत स्थलीं ह्रच्या पूर्वाक्षरास गुरुत्व येणार नाहीं असा प्रयोग केला आहे, व पुढें 'गंगेंत गतीच्छु तसे ते रक्तनदह्रदांत रिपु न्हाती' (पुढें गीति २९ वरील टीपांत दिलेला पाठभेद पहा) या ठिकाणीं ह्रच्या मागच्या द्कारास गुरुत्व आणिलें आहे. यापेक्षां पंतांच्या छंदःशास्त्राच्या सूक्ष्म परिचयाची आणखी ती कोणती साक्ष पाहिजे ? मोरोपंत केवळ पुराणिक होता हें विष्णुशास्त्री चिपळूणकरांचें म्हणणें खोटें ठरून तो छंदःसंबंधानें तरी शास्त्री होता, असें सिद्ध होत आहे. प्रस्तुत स्थलीं आणखी एक सूचना करावयाची आहे. ह्रद, ह्रस्व, ह्रास, ह्राद, इत्यादि शब्दांतील प्रथमसंयुक्ताक्षरें हकारप्रथम असून तीं र्‍हद, र्‍हस्व, र्‍हास, र्‍हाद, अशीं हकारद्वितीय लिहिण्याची व उच्चारण्याची चाल पडत आहे, ती बरी नव्हे. प्राकृतभाषेंत संस्कृत शब्दांपासून 'तद्भवशब्द' तयार करितांना हकारप्रथमाक्षरें हकारद्वितीय करावीं असा प्राकृत-व्याकरणाचा नियम आहे. पण वरील शब्द संस्कृतापासून निघालेले 'तद्भव' नसून मूळ संस्कृत शब्दच असल्यामुळें ते संस्कृतांत ज्याप्रमाणें लिहिले जातात त्याचप्रमाणें मराठींत लिहिणें बरें.

१. गोवत्सासारखा. २. सेनेंतील लोक. ३. महा+उक्ष+समक्ष=मोठ्या (बलिष्ठ) बैलांसमोर. ४. ज्याचें तेज वर्णन करण्यास योग्य असा. महः=तेज, उत्साह. ५. ज्याचे प्रहार फार दुःसह आहेत असा. ६. हा कर्ण क्रूर मनुष्यांत अग्रगण्य. ७. याचे प्रहार फार दुःसह व हा अत्यंत क्रूर हें वरचें वर्णन पाहतां हा यमच होय-असा भाव.

ते पांचाळ पळे[1]विले, ते कौरव सिंहनाद करितात, ।
पांडवसृंजयचेदिप्रमुखांचें सर्व धैर्य हरितात. ॥ १७
'मारा सृंजय सारे' ऐसें सांगोनि लाविले मागें ।
कौरवभट; आपण ही ताडितसे तीव्रशरगणें रागें. ॥ १८
वृषवचनें पांचाळांपाठीं लागति वधार्थ खल हे, 'छू' ।
व्याधें म्हणतां चि जसे हरिणामागें [2]श्वसंघ [3]कलहेच्छू. ॥ १९
पार्था ! पहा; पहातो कर्ण [4]कटाक्षें तुला चि [5]कपिकेतो ! ।
चि[6]रपुष्टकामतरु जो या [7]सुक्षेत्रांत केंवि न पिके तो ? ॥ २०
कपिकेतु विलोकुनि वृष फिरला, तुजसीं करील [8]शुद्धरण, ।
[9]धर्महृदयशल्याचें चतुरा ! करिशील तूं हि उद्धर[10]णें. ॥ २१
तुजवरि येणें त्याचें, [11]शैलभाचें जेंवि वन्हिवरि जाणें; ।
[12]ज्याचा तुझ्या शिरीं कर त्याचें माहात्म्य मीं च हरि[13] जाणें. ॥ २२
[14]धर्मोच्छेदीं जैसा [15]पाखंडाला सहाय [16]कलिकाळ, ।

---

१. 'पळाले' असें पाठान्तर. २. श्वानसमुदाय. ३. भांडण करूं इच्छिणारे. ४. नेत्रकटाक्षानें, वांकड्या नजरेनें. ५. कपि (मारुति) ज्याच्या ध्वजाच्या ठायीं आहे अशा (अर्जुना!). ६. चिर+पुष्ट+काम+तरु=फार दिवस+वाढलेली+इच्छा+वृक्ष=फार दिवसांपासून वाढत असलेली कर्णाशीं युद्ध करण्याची अर्जुनाची इच्छा (किंवा अर्जुनाशीं लढण्याची कर्णाची इच्छा) तद्रूपी वृक्ष. 'चिरपुष्टिकामतरु' असें पाठांतर आहे. ७. चांगल्या जमिनींत किंवा या युद्धक्षेत्रांत. जो चिरपुष्टकामतरु तो या सुक्षेत्रांत केंवि न पिके—असा अन्वय. ८. शुद्ध युद्ध, धर्मयुद्ध. ९. धर्माच्या हृदयास बाणाग्राप्रमाणें टोंचणाऱ्या कर्णाचें. १०. उपटून काढणें. कर्ण हा कांट्याप्रमाणें धर्मराजास पीडा देत होता, असें वर्णन ठिकठिकाणीं आढळतें. (अध्याय ८।५; अध्याय ४०।१६ पहा). ११. टोळाचें. १२. ज्या शंकराचा. पाशुपतादि अस्त्रें देऊन शंकरानें अर्जुनावर जी कृपा केली, तिला उद्देशून हें वाक्य आहे. १३. हराचें माहात्म्य हरि व हरीचें माहात्म्य हर हेच जाणतात, या समजुतीचेंच हें वाक्य प्रतिबिंब होय. शिवाचें माहात्म्य कृष्णास माहीत होतें. ह्या विषयासंबंधीं पंतकृत द्रोणपर्व, अध्याय ८ गीति ६४-१२५ पहा. यांत सैंधववधाच्या पूर्वरात्रीं कृष्णार्जुनांचें कैलासीं जाणें वर्णिलें आहे. १४. धर्माचा उच्छेद करण्याचे कामीं. 'धर्मोच्छेदी' (=धर्माचा उच्छेद करणारा) असा पाठभेद. १५. धर्मोच्छेदीं पाखंडाला जसा कलिकाळ सहाय [होय]—असा अन्वय. 'पाषंड' असाही हा शब्द लिहितात. जैन, बौद्ध, इत्यादि अवैदिक धर्माच्या लोकांस हा शब्द लावितात. 'पालनाच्च त्रयीधर्मः पाशब्देन निगद्यते । तं खंडयंति ते तस्मात् पाखंडास्तेन हेतुना ॥'. 'पा' म्हणजे त्रयीधर्माचें (वेदचोदित धर्माचें) पालन; त्याचें खंडन करणारे जे, ते पाखंड. १६. ही उपमा विशेष सार्थ आहे. कारण कुरुपाळ (दुर्योधन) कलीच्या अंशानें जन्मला होता.

कर्णासि तसा चि पहा झाला सानुज[1] सहाय कुरुपाळ[2]. ॥ २३
आपण[3] किरातरूपि[4]प्रभुवरकरुणाकटाक्षसत्पात्र, ।
गुरुधर्माहित[5] वृष, हें[6] स्मर; उरलें कार्य एव्हढें मात्र[7]. ॥ २४
गेला पांचाळांवरि कर्ण, पहा केतु मात्र तो झळके; ।
वैकर्तन[8]शरहतगज दिसति, ग्रीष्मीं जसे गिरी जळके[9]. ॥ २५
पार्षतकेतुसमीप चि कर्णाचा केतु तो प्रकाशतसे; ।
ते पांचाळबळीं शर शिरले, कक्षांत[10] आश्रयाश[11] तसे. ॥ २६
परम[12] प्रिय तुज कथितों, 'आहे सुखरूप भूप[13] हा काळ[14];' ।
धृतराष्ट्रसुतशताचा फिरला खवळोनि तो[15], पहा, काळ. ॥ २७
ते गतगौरव[16] कौरव रौरवपौर[17] वंचकोनि[18] पळतात, ।
तऱ्हि भीमशर न सोडिति, मृग पळतां ही दवांत जळतात. ॥ २८
पांचाल–चमू उठली भीमबळें कौरवांवरि पुन्हां ती. ।
गंगेंत गतीच्छु[19] तसे, ते रक्तनदीह्रदांत[20] रिपु न्हाती. ॥ २९

---

१. धाकट्या भावांसह. २. दुर्योधन. ३. तूं व मी किंवा आपला पक्ष. ४. किरातरूपी शंकराच्या कृपेस पात्र झालों आह्मों असे. अर्थात् धर्माचरण करणारे. ५. गुरु जो धर्मराज त्याचा अहित (शत्रु); किंवा धर्माचा मोठा शत्रु; (पक्षीं) धर्मराजाचा मोठा शत्रु. ६. आपण धर्माचरणानें वागून ईश्वराच्या कृपेस पात्र झालों, व कर्ण तर अधर्मी, तस्मात् आपणास खातरीनें जय प्राप्त होईल; हा आपल्यांतला व त्यांच्यांतला भेद मात्र लक्षांत असूं दे. हें तूं लक्षांत बाळगण्याचेंच काय तें काम बाकी उरलें आहे. तेवढें तुझ्या लक्षांत राहिलें म्हणजे काम झालेंच समज–हा भाव. अर्जुन व कर्ण यांच्या परस्परविरुद्ध क्रियांचा उपन्यास केला आहे, म्हणून येथें **'विरुद्धगुणन्यास'** (Contrast) अलंकार आहे. ७. एवढें कर्णवधाचेंच कार्य आतां शिल्लक राहिलें आहे–असा अर्थ केला तरी चालेल. ८. कर्णाच्या शरांनीं नष्ट झालेले हत्ती. ९. जळके गिरी म्हणजे ज्यांच्यावरील अरण्य जळलें आहे असे. १०. गवतांत. ११. अग्नि. (आश्रयास असणाऱ्या वस्तूंस खाणारा. आश=खाणारा. उदाहरणार्थ–हुताश). १२. तुज परम प्रिय (अत्यंत इष्ट अशी गोष्ट) कथितों. 'भूप सुखरूप आहे'–असा अर्थ. १३. धर्म. १४. हा काळ=ह्या वेळेपर्यंत, आतांपर्यंत. १५. तो धृतराष्ट्राच्या शंभर मुलांचा काळ म्हणजे भीम. १६. गौरवहीन, महत्त्वहीन. १७. ते गतगौरव [व] रौरवपौर (रौरव नरकाचे नागरिक) वचकोनि पळतात–असा अन्वयार्थ. अशीच शब्दयोजना पंतकृत सभापर्व, अध्याय ६ गीति १०० मध्यें आहे. ह्या गीत्यर्धांत **अश्वधाटी यमक** आहे. १८. भिऊन. १९. गति इच्छिणारे; सद्गतीची इच्छा बाळगणारे. २०. रक्ताच्या नदीच्या डोहांत. येथें 'रक्तनदह्रदांत' असाही पाठ आहे. नद=

तो जेंवि वीरभद्रें केला विध्वस्त[1] दक्ष-मख-वाट,[2] ।
भीमें[3] रिपुसंघ तसा, तद्बाणांला पुरे चि न ख-वाट.[4] ॥ ३०
भीमावरि नैषादी[5] जातो उचलूनि भुज सतोमर[6] तो; ।
अन्यासि काळ, भीमा ज्वलनाला शलभ भासतो,[7] मरतो. ॥ ३१
तोडुनि सतोमर भुज द्विरदवराखालता[8] पहा गा![9] तो ।
रिपु लोळवितां, सुरजन भीमभुजा निजजयावहा गातो. ॥ ३२
भासति कुरुभटवररथ[10] दवदहनग्रस्त[11] कुंजे[12] रानीं कीं, ।
कपिहतलंकागृह;[13] ते भीमशर, हरी[14] च कुंजरानीकीं.[15] ॥ ३३
भीमें भस्म चि केले पत्ती,[16] सादी,[17] शतांग[18] संतुरंग,[19] ।
मदमत्तमतंगज ही; झालें हत शत्रुसैन्य चतुरंग.[20] ॥ ३४

---

मोठी नदी. प्रस्तुत पाठांत 'ह्र' या जोडाक्षरामुळें मागच्या द्कारास गुरुत्व आलें आहे, हें लक्षांत ठेऊन वाचकांनीं गीति वाचावी म्हणजे वृत्तभंग होणार नाहीं.

१. उध्वस्त, नाश पावलेला. २. दक्षाचें यज्ञस्थान. वाट=मार्ग, आवार, उद्यान–असे अर्थ आहेत. हा शब्द संस्कृत आहे. ३. भीमें रिपुसंघ तसा (विध्वस्त) केला–असा अन्वय. ४. ख+वाट=आकाशमार्ग. ५. निषाद राजा. निषाद=कोळी, एक आरण्यक जाती. ६. तोमरासह. ७. प्रस्तुत स्थलीं उल्लेख नामक अलंकार झाला आहे. कारण एकच मनुष्य भिन्न जनांस भिन्न तऱ्हेचा भासतो, असें वर्णन केलेलें आहे. ८. गजश्रेष्ठाखालीं. ९. गा! पहा, सतोमर भुज तोडुनि रिपु द्विरदवराखालता लोळवितां, निजजयावहा भीमभुजा सुरजन गातो–असा अन्वय. १०. कौरवसैनिक–श्रेष्ठांचे रथ. ११. अरण्यांतील अग्नीनें चोहोंकडून व्याप्त. १२. लतांचीं जाळीं, झुडुपें. 'कुंज' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आहे. कीं=किंवा. १३. मारुतीनें जाळून टाकलेलीं लंकेंतील घरें. सीतेचा शोध करण्याकरितां जेव्हां मारुति लंकेंत गेला, तेव्हां त्यानें लंका जाळली, या प्रसिद्ध रामायणीय कथेस उद्देशून हें वाक्य आहे. अग्नीनें जळत असलेल्या घराप्रमाणें भीमशर भयंकर होते–हा भाव. १४. सिंहच. कुरुभटवररथ रानीं दवदहनग्रस्त 'कुंज' भासति, कीं (किंवा) कपिहतलंकागृह [भासती]. [ते भीमशर] कुंजरानीकीं हरी च [होत]. 'गृह' शब्द संस्कृतांत जसा नपुंसकलिंगी आहे, तसा तो पुल्लिंगीही आहे. मात्र पुल्लिंगी शब्द नेहमीं अनेकवचनीं योजण्याचा प्रघात आहे. येथील शब्द पुल्लिंगी अनेकवचनीच आहे. १५. हत्तींच्या समूहांत. भीमाच्या पराक्रमामुळें रथी नाहींतसे झाले, रथ रिकामे पडले व हत्ती ठार झाले–असा भाव. १६. पायीं चालणारे शिपाई. १७. सादी शब्दाचा हत्तीवर, घोड्यावर व रथांत बसलेला योद्धा–असा अर्थ होतो. प्रस्तुत स्थलीं 'गजारूढ' या अर्थी हा शब्द वापरलेला दिसतो. १८. रथ. १९. स+तुरंग=घोड्यांसह. २०. गज, अश्व, रथ व पदाती यांनीं युक्त अशा सैन्यास 'चतुरंग' सैन्य म्हणतात.

भीमें एकैक शरें वधिले हाणोनि सप्त सप्त करी[1]; ।
भीमशरव्रात[2] तसा प्रळयार्ककरौघ[3] ही न तप्त करी. ॥ ३५
दवसा[4] तव साध्वग्रज[5] कवळितसे[6] शत्रुगजबळा यवसा[7]; ।
भवसा[8] भीम महाबळ भूतांच्या[9] आजि पावला नवसा[10]. ॥ ३६
अक्षौहिणीत्रयाचें[11] वारण[12] एकें वृकोदरें केलें; ।
खवळे अधिक चि मारुति[13] शात्रवशस्त्रें[14], शिखी[15] जसा तेलें.' ॥ ३७
ऐसा भक्तपराक्रम वर्णी भगवान् स्वयें चि अत्यर्थ[16]. ।
[17]कीं स्वजन मनीं सकरुण, निष्ठुर वरि मात्र साधुगत्यर्थ[18]. ॥ ३८

---

## अध्याय अडतिसावा[19].

संशप्तकबळ भंगुनि पार्थ हि त्या दुष्टबुद्धिकुर्वैरितें[20] ।
होय सहाय महात्मा; मारी कौरवबळें चि उर्वरितें[21]. ॥ १
भीमभयें पळति तयां कर्ण म्हणे, "यश बुडे अमोल, टिका[22]. ।

---

१. गज. २. भीमाचा शरसमूह. ३. प्रलय+अर्क+कर+ओघ=प्रलयकालच्या सूर्यकिरणांचा ओघ. ४. वणव्यासारखा. ५. साधु+अग्रज=सज्जन असा वडील बंधु भीम. ६. आलिंगितसे. ७. तृणाला. 'शत्रुगजबळा' याचें विशेषण. ८. शिवासारखा. ९. यक्षराक्षसपिशाचादिकांच्या. कारण शिव हा भूतनाथ होय. १०. भक्तांच्या नवसाला शंकर पावून त्यांना आनंद देतो, त्याप्रमाणें पराक्रमी भीमानें, मारिलेल्या योद्ध्यांचें मांस वगैरे अर्पण करून, पिशाचांची मोठी इच्छा तृप्त केली—असा अर्थ. ११. तीन अक्षौहिणींचें. १२. निवारण. १३. भीम. मरुत्=वायु. त्याचा मुलगा म्हणून मारुती. १४. शत्रूंच्या शस्त्रांनीं. १५. अग्नि. १६. अतिशय. सारांश, अशा रीतीनें कृष्णानें आपल्या भक्ताचा अद्भुत पराक्रम स्वयें चि (आपण होऊन, स्वतःच्या प्रेरणेनेंच) वर्णिला—असा भाव. १७. स्वजन (आप्त मनुष्य) मनीं (मनामध्यें) सकरुण (दयाळू) असतो, [व] वरि (केवळ वरून) मात्र साधुगत्यर्थ (आपल्या नातेवाईकाचें चांगलें हित व्हावें म्हणून) निष्ठुर [असल्याचें दाखवितो.]—असा भाव. येथें पूर्वार्ध व उत्तरार्ध यांस जोडणारें 'कीं' हें अव्यय आहे. पण ह्या दोन अर्धांचा परस्परसंबंध काय आहे, हें नीटसें लक्षांत येत नाहीं. १८. चांगली गती होण्याकरितां. १९. या अध्यायांत मुळांतील अध्याय ६१,६२ व ६३ व्या अध्यायांतील ३१ श्लोक यांतील कथाभाग आला आहे. २०. दुष्टबुद्धि जे कौरव त्यांच्या शत्रूतें (भीमातें). २१. शेष राहिलेलीं. उर्वरितें (तीन अक्षौहिणी सैन्य मारल्यानंतर शिल्लक राहिलेलीं) कौरवबळें चि मारी—असा अन्वय. येथें 'चि' च्या ठिकाणीं 'हि' हें पद असावयास पाहिजे होतें. पुढें गीति ८ मध्यें असाच प्रकार 'चि' च्या प्रयोगासंबंधानें झाला आहे. २२. धैर्य धरून उभे रहा.

'जंतु[1] अकाळीं[2] न मरे' हा उपदेश न मना गमो लटिका[3]. ॥ २
जन्मापासुनि केलें शोभन[4] तें सर्व हो न मोघ[5]; टिका. ।
समरमखीं[6] जी जाती इतर घड्यांसम[7] न ती गमो घटिका." ॥ ३
ऐसें बोधुनि फिरवी बळ वृष, धांवे, जसा महा मकर ।
अरिकटकाब्धींत[8] शिरे, भी ना; कीं, त्यासि वरद[9] रामकर[10].' ॥ ४
त्यावरि उठले पांडववीर; तई युद्ध जाहलें भारी, ।
पडतां महारथांसीं गांठि म्हणे त्यांसि 'धन्य' जंभारी[11]. ॥ ५
येतां वृकोदरावरि[12] रोधी कर्णासि बळपति[13] शिखंडी; ।
तो[14] कर्णाच्या, कर्ण हि त्याच्या[15], युद्धांत, शरततिशि[16] खंडी. ॥ ६
विरथ विशस्त्र क्षततनु करुनि बळें कर्ण[17] तो पळवि पत्ती[18]; ।
स्वः[19]सुखहेतु परि न त्या सोसे ती[20] एक ही पळ विपत्ती. ॥ ७

---

१. प्राणी. २. ईश्वरनियमित वेळेवांचून. आज जर तुम्हीं मरणार असें तुमच्या नशिबीं लिहिलें असेल, तर तुम्हीं युद्धांत असाल तरी मराल, व नसाल तरी मराल. मग युद्धांतच कां मरूं नये ? आज तुम्हीं मरणार नसाल, तर युद्धांत असूनही मरणार नाहीं. तेव्हां पळण्याचें प्रयोजन काय ?–हा भाव. ३. खोटा. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ४. बरें, हित, चांगलें. आज तुम्हीं युद्धांतून पळून जाल, तर जन्मापासून आजपर्यंत जीं तुम्हीं उत्तम कृत्यें केलींत, तीं सर्व व्यर्थ होतील. ५. व्यर्थ. ६. अन्वयः–समरमखीं (युद्धरूपी यज्ञांत) जी घटिका जाती (जाते) ती इतर घड्यांसम न गमो. त्यांपेक्षां श्रेष्ठ अशी जाणावी–हा भाव. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ७. इतर घटकांसारखी. ८. शत्रुच्या सैन्यरूपी समुद्रांत. ९. वर देणारा. १०. परशुरामाचा हस्त. परशुरामांनीं कर्णाला जसा शाप दिला होता, तसा वरही दिला होता. तो वर असा:–त्वत्सम समर्थ होइल पिउनि हि वारुण सुरा न राजन्य । चित्र करिल कर्णा ! त्वां केलें दारुण सुरा नरा जन्य ॥ (पंतकृत शांतिपर्व, अध्याय २ गीति ५२). ११. जंभ+अरि=जंभासुराचा शत्रु, इंद्र. कौरव व पांडव या पक्षांच्या महारथ्यांची गांठ परस्परांशीं पडली असतां इंद्रानें सुद्धां त्यांचें युद्धकौशल्य पाहून 'धन्य' म्हटलें. इतक्या पराक्रमानें ते उभयतां लढत होते–असा भाव. १२. वृकनामक अग्नि उदरीं आहे ज्याच्या, तो वृकोदर (भीम). १३. उपसेनापती, सैन्यांतील कांहीं भागांचा अधिपती. धृष्टद्युम्न सर्व सैन्याचा अधिपती व शिखंडी इत्यादि त्याच्या हाताखालचे सैन्याधिपती होते. १४. शिखंडी. १५. शिखंडीच्या. १६. शरसमूहाला. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'शरततिस' असा पाठ आहे, पण तो मुद्रणदोष असावा, कारण यमक साधण्याची संधी पंत हातची कधींच जाऊं देत नाहींत. तति=रांग, ओळ, समुदाय. १७. कर्ण (कर्ता) तो पत्ती (तो पादचारी शिखंडी–कर्म) पळवि–असा अन्वय. १८. पादचारी. १९. स्वर्गसुखाला कारणीभूत. (मागें अध्याय ११ गीति १६ वरील टीपा पहा). २०. 'स्वसुखा

दुःशासनें हि केला धृष्टद्युम्न क्षतार्त[1] हतदर्प, ।
जैसा सिंहें गजपति किंवा गरुडें[2] चि दृष्टिविष[3] सर्प. ॥ ८
पांचाळ वीर तेव्हां बहु झटले पार्षताचिया अवनीं[4]; ।
कांपे असकृत्क्षतजस्नाता[5], वृष्टींत[6] धेनुसी, अवनी[7]. ॥ ९
नकुळासीं अद्भुत रण वृषसेन[8] करी; तशांत तत्तातें[9] ।
कर्णें फिरतां, नकुळ त्यजि त्यांतें[10], प्राज्ञ जेंवि मत्तातें[11]. ॥ १०
माद्रेय कौरवांवरि जाय अनादर[12] करूनि कर्णाचा, ।
जैसा भुजंग सोडी[13] लोचनपथ[14] दुःसहा सुपर्णाचा. ॥ ११
सहदेवसूर्यशरकर[15] साहे[16] तें बहु उलूक[17], भंगे तें ।
न बहु; जसें बहु सिकतासेतु[18] जरि क्षण धरील गंगेतें. ॥ १२

---

हेतु' असाही पाठ आहे. ती विपत्ति (पळून जाणें) स्वसुखा हेतु (आपल्या सौख्यास, कर्णाच्या दुःसह बाणांपासून सुटून जाणें हेंच सौख्य, त्यास कारण) परि त्या (शिखंडीला) एक ही पळ न सोसे—असा अन्वयार्थ.

१. क्षतांनीं पीडित. २. गरुडानें देखील. येथें 'चि' चा उपयोग 'हि' च्या स्थानीं केल्यासारखा दिसतो. असाच प्रयोग मागें गीति १ मधील 'कौरवबळें चि' येथें केलेला आहे. ३. ज्याच्या दृष्टींत विष आहे असा. हा सर्प ज्या वस्तूकडे पाहतो ती विषव्याप्त होते, अशी समजूत आहे. ४. संरक्षणाविषयीं. ५. असकृत्+क्षत+ज+स्नाता=पुष्कळ वेळां क्षतापासून वाहणाऱ्या रक्तानें न्हालेली. ६. पावसांत. ७. पृथ्वी. ८. हा कर्णाचा मुलगा. ९. त्याच्या बापानें. त्याचा बाप कर्ण परत फिरून वृषसेनाकडे आला असतां—असा भाव. 'तत्तातें कर्णें फिरतां' हा प्रयोग चिन्त्य आहे. १०. वृषसेनास. ११. उन्मत्त अशा पुरुषास. १२. कर्णाची पर्वा न करितां, त्याच्याकडे लक्ष न देतां. १३. लोचनपथ सोडी=दृष्टीआड होतो. १४. दृष्टिमार्ग. १५. सहदेवरूपी सूर्याचे शररूपी कर. हें समासांतर्गत **परंपरित-रूपक** होय. १६. 'साहे ते' असें पाठान्तर. ते=सहदेवसूर्यशरकर. १७. नामविशेष, (पक्षी) घुबड. उलूक हा शकुनीचा मुलगा. यास कैतव्य असेंही दुसरें नांव आहे. अन्वयः— जसें (ज्याप्रमाणें) सिकतासेतु गंगेतें क्षण (क्षणभर) जरि धरील, [तरी] तें बहु [होय] (महत्त्वाचें होय), [सिकतासेतु] भंगे तें बहु न (महत्त्वाचें नाहीं, कारण वाळूचा बांध न टिकणें, हें साहजिकच आहे). [तसें, वर सांगितल्याप्रमाणें] सहदेवसूर्यशरकर उलूक साहे तें बहु [होय], (पण अखेर तो) भंगे तें न बहु (यांत मोठेंसें कांहीं नाहीं, यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं)—असा स्पष्टार्थ. ह्या पद्यांतील 'जरि' हा शब्द निष्कारण पडलेला आहे, असें वाटतें. १८. वाळूचा सेतु.

सात्यकिसीं भांडे, परि शकुनी च पळे; न जयकथा पिशुंनीं[1]. ।
सिंही[2] नव्हे चि यद्यपि बाळनृपसुसत्कृता[3] तथापि शुनी[4]. ॥ १३
करि दुर्दशा[5] अधर्में[6] धर्माची जी सरे[7] हि शकुनी ती, ।
धर्मानुरक्त[8] सात्यकि भंगार्थ[9] पुढें धजे चि; न कुनीती[10]. ॥ १४
भीमासीं दुर्योधन भांडे, भंगे रणीं. पळायास ।
गज हय रथ हि नसे, परि पायीं च पळे सुनिष्फळायास[11]. ॥ १५
न ग्रामसिंहतेस्तव[12] भग्न हरिसि[13] वा[14] गजासि करिल शुणा[15]; ।
ये नां[16] अमृतरसतुळा[17] म्हणति 'महौषध[18]' असें हि जरि लसुणा[19]. ॥ १६
युद्ध कृपाचार्यासीं करिता झाला बळी युधामन्यु[20], ।
छेदी चाप म्हणुनि ये फार चि तत्काळ त्या बुधीं[21] मन्यु[22]. ॥ १७
छत्रध्वजसूतमथन[23] करिती, बहु ये तदायुधा[24] मन्यु, ।
प्राणत्राण[25] कराया पळता झाला तदा युधामन्यु. ॥ १८

---

१. दुष्टांचे ठायीं. दुष्टाला जय मिळेल, ही गोष्टच बोलावयास नको—असा भाव. कल्पना-सादृश्यः—जय कैंचा साधुजनविरोधानें ? (पुढें अध्याय ४७।२२). २. राजकुमारांनीं प्रेमानें वाढविलेली कुत्री सिंही होऊं शकणार नाहीं. ३. राजकुमारांनीं उत्तम प्रकारें पोसलेली. ४. कुत्री. ५. शकुनीनें पूर्वीं धर्माचा छळ केला होता, ही गोष्ट सात्यकीला आतां आठवून तो शकुनीचा मोड करण्याकरितां त्याच्यावर धांवून गेला, पण कुनीति (कपटी शकुनी) उलट सात्यकीवर चालून गेला नाहीं—असा भाव. पापी मनुष्य भ्याड असतो—हा इत्यर्थ. ६. कपटद्यूतानें धर्माशीं द्यूत खेळणारा शकुनीच होता. त्या प्रसंगास अनुसरून हें वाक्य आहे. (पंतकृत सभापर्व, अध्याय ४ पहा). ७. येथें 'सरे हि शकुनी ती' अशी रचना असल्यामुळें 'सरण' ह्या क्रियेचा कर्ता शकुनी ठरतो. पण अर्थाच्या दृष्टीनें 'सरे' चा कर्ता 'सात्यकी' व 'करि' चा कर्ता 'शकुनी' घेतला पाहिजे. ८. धार्मिक, (पक्षीं) धर्मराजाचा अनुयायी. ९. शत्रुभंगार्थे. १०. दुष्टबुद्धी असा शकुनी न धजे. ११. सु+निष्फल+आयास=अत्यंत निष्फल श्रम ज्याचे झाले आहेत, असा दुर्योधन. १२. 'ग्रामसिंह' हें नांव असल्यामुळें. कुत्र्याचें 'ग्रामसिंह' हें नांव प्रसिद्ध आहे. १३. सिंहास. १४. अथवा. १५. कुत्रा. श्वा—पंत. १६. येईना. १७. अमृतरसाची बरोबरी. १८. रोगशांतीकरितां उपयोगी असें मोठें औषध. महौषध=लसूण. ही सर्व गीति **अप्रस्तुत-प्रशंसे**चें उत्तम उदाहरण आहे. कारण ग्रामसिंह व महौषध या अप्रस्तुत वस्तूंच्या वर्णनानें प्रस्तुत जो दुर्योधन, त्याची योग्यता कमी आहे, असें ध्वनित केलें आहे. १९. लसुणीस. २०. पांचाळवीर. हा स्वतंत्र योद्धा असून धर्माचा चक्ररक्षक होता. २१. शहाण्या कृपाचार्यास. २२. राग. २३. मथन=संहार. २४. तत्+आयुधा=त्याच्या शस्त्रास. २५. प्राणसंरक्षण.

पांचाल्य [1]उत्तमौजा [2]हार्दिक्यें ताडिला उरीं बाणें, ।
त्यातें सारथि पळवी; युक्त चि [3]मोहीं पळोनि जें जाणें. ॥ १९
भीमें कुरुबळ मथितां, दुःशासन-शकुनि [4]नागकटकातें ।
प्रेरिति त्यावरि, जैसे [5]खगनाथपराभवार्थ [6]चटकातें. ॥ २०
भीम वधी [7]परवारण, [8]परवा रणपंडिता तया नाहीं, ।
गजरक्तांच्या [9]सरिता भरिता झाला, न [10]भंगला कांहीं. ॥ २१
वारंवार [11]परिशिले [12]पांडवपंचाननध्वनी कानीं, ।
धैर्य त्यजिलें चि [13]समदमातंगांच्या हि त्या [14]अनीकानीं. ॥ २२
[15]एकाचा हि अभग्न न भीमशरें पाद, दंत, [16]कट, [17]कर [18]वा; ।
करि कौरव[19]नागांचें युद्धीं पावोनि अंत कटक [20]रवा. ॥ २३
वातें घन [21]भग्न जसे भीमें केले [22]महेभ सर्व तसे. ।
अल्प पळाले, क्षितिवरि पडले बहु [23]वज्रभग्न पर्वतसे. ॥ २४

---

१. हा धर्माचा दुसरा चक्ररक्षक. २. कृतवर्म्यानें. ३. मूर्च्छा आली असतां. (मूर्च्छा आली असतां स्वतः पळणें शक्य नाहीं. तेव्हां ‘पळोनि जाणें’ म्हणजे सारथ्याकडून पळविला जाणें–असा अर्थ). ४. हत्तींच्या सैन्यातें. ५. गरुडाचा पराभव करण्याकरितां. ६. चिमण्यातें. ७. शत्रूंचे गज. ८. शत्रुगजाचा वध करितांना तो कोणाचीही परवा बाळगीत नाहीं–धिटाईनें गजांत संचार करीत आहे–हा भाव. ‘परवारण–परवा रण’ हा पंचाक्षरी **छेकानुप्रास.** परवा=पर्वा, भीति. ९. नद्या. १०. भ्मला. ११. (समदमातंगांच्या) अनीकांनीं ऐकिले. १२. भीमरूपी सिंहाचे शब्द. १३. मदोन्मत्त हत्तींच्या. १४. सैन्यांनीं. १५. एकाचा हि (एका हत्तीचाही) पाद, दंत, कट वा (किंवा) कर (यांपैकीं कांहीं ना कांहीं तरी–हा भाव) भीमशरें अभग्न न (भग्नचि); कौरवनागांचें कटक युद्धीं अंत पावोनि रवा(दुःखसूचक शब्दास) करि–असा अन्वय. १६. गंडस्थल. १७. शुंडा. १८. अथवा. १९. नागांचें कटक=हत्तीदळ. घोडदळामध्यें घोडे लढत नाहींत. त्यांच्या वरील स्वार लढतात, पण गजदळाचा प्रकार निराळा दिसतो. हत्ती स्वतःच शत्रुसैन्याचा नाश करितात. हत्तींचे महात फक्त हत्तींना चालविण्याचें काम करितात. ते स्वतः लढत असत, असें दिसत नाहीं. २०. शब्दाला. २१. घन=अभ्र, मेघ. जसे वातें (वावटळीनें) घन (मेघ) भग्न [करावे] तसे भीमें सर्व महेभ [भग्न] केले–असा अन्वय. येथें ‘वातें वन भग्न जसें’ असाही पाठ आहे. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत ‘वातें घन भग्न जसें’ असा पाठ आहे. पण ‘जसें’ च्या ठिकाणीं ‘जसे’ असा शब्द पाहिजे, हें उघडच आहे. २२. महा+इभ=प्रचंड हत्ती. २३. [इंद्राच्या] वज्रानें चूर्ण झालेल्या पर्वतांप्रमाणें.

दुःसह भय भीमाचा [1]कोदंडज्यानिनाद दे; हगती, ।
मुतती, चळती, पळती, गळती, भ्रमले [2]सकंपदेहगती. ॥ २५
भीम गजांतें मर्दी, कल्पांतीं रुद्र जेंवि [3]भूतांतें; ।
भीमाचें यश लाजवि [4]सुरभिक्षीराचिया हि ऊतांतें. ॥ २६
संशप्तकबळ मारुनि केलें पार्थें हि भग्न कुरुसैन्य, ।
आधीं च भीम[5]कर्मा भीम हि दे [6]ज्यांसि [7]उग्रभयदैन्यें. ॥ २७
[8]अहि जेंवि [9]पुच्छभंगें, खवळे कुरुराज फार बळभंगें. ।
धांवे, गांठी, भांडे धर्मासीं; [10]मुखर जेंवि [11]मुनिसंगें. ॥ २८
भांडति निकरें दोघे [12]नृप [13]बंधु, म्हणोनि धांवले आप्त. ।
तों कर्णानें केले भीमादिक शत्रु शरगणीं व्याप्त. ॥ २९
कर्णापुढें न चाले बळ, सर्व हि लोपले [14]शरावरणीं; ।
रक्ताचे [15]ह्रदें भरले; काळाचे काय ते [16]शराव [17]रणीं ! ॥ ३०
सहदेव मात्र कामा आला, करि विक्रम [18]प्रकाम रणीं; ।

---

१. धनुष्याच्या दोरीचा शब्द (टणत्कार). २. सकंप (कांपत आहे) देह जीमध्यें अशी आहे गति ज्यांची, अशीं शरीरें आहेत ज्यांचीं ते; कांपत कांपत चालणारे. ३. प्राणिमात्रांस. ४. कामधेनूच्या दुधाच्या (उतास). कविसमयास अनुसरून यश हें पांढरें वर्णिलें आहे. भीमाचें यश किती पांढरें आहे ? तर कामधेनूच्या दुधापेक्षांही पांढरें—असा भाव. क्षीराचा ऊत= दुधावरचा फेंस. येथें उपमेय उपमानास लाजवितें, म्हणून प्रतीपालंकार. ५. भयंकर कर्म ज्याचें असा. ६. ज्या कुरुसैन्याला. ७. उग्र+भय+दैन्य=तीक्ष्ण, भयंकर+भीति+विपत्ति, हाल. ८. सर्प. ९. शेंपूट तोडिल्यानें. १०. वाचाळ, बडबड्या. बडबड्या मनुष्य ज्याप्रमाणें शांत वृत्तीच्या मौन धारण करणाऱ्या ऋषीशीं भांडतो, त्याप्रमाणें. ही उपमा येथें गैरलागू दिसते. कारण दुर्योधनाच्या हल्ल्याचा प्रतिकार धर्मानें केल्याचें वर्णन पुढच्याच गीतींत आहे. ११. मुनि=मौनी, मौनव्रताचारी तपस्वी. मुनीचें लक्षणः—मौनान्न स मुनिर्भवति न अरण्यवसनान्मुनिः । स्वलक्षणं तु यो वेद स मुनिः श्रेष्ठ उच्यते. ॥ (उद्योगपर्व, अध्याय ४३।६०). येथें मुनि=विद्वान्, सज्जन—असा अर्थ. १२. राजे, इकडचा मुख्य राजा व तिकडचा मुख्य राजा. १३. चुलतबंधु. १४. शर+आवरण=शररूप आच्छादन. सर्व हि (भीमादि सर्व शत्रु) शरावरणीं (बाणांच्या आच्छादनांत) लोपले (दिसतनासे झाले)—असा अन्वय. 'सर्व हि लोपलें शरावरणीं' असा पाठभेद आहे. १५. तलाव. १६. परळ. १७. वरच्या गीतींतील 'रक्ताचे ह्रद भरले' ही असंबंधीं संबंध लावणारी अतिशयोक्ति; आणि या अतिशयोक्तीच्या पायावर 'काय ते शराव' ही उत्प्रेक्षा उभारली गेली आहे. १८. फार, अतिशय.

वारी सुयोधनाला, हरिचें[1] नाम चि जसें यमा मरणीं. ॥ ३१
सहदेवशर नृपाला[2] तन्मित्रा सैन्यनायकाला[3] ही ।
देती दुःसह ताप; क्रूर तयांहूनि[4] काय कालाही[5]? ॥ ३२
प्रियसखतापें[6] तापे कर्ण, ग्रीष्मीं हि तेंवि न रवि; खरी ।
वृद्धीं[7] शक्ति उणी, बहु तरुणीं, कीं तो असंख्य शर विखरी. ॥ ३३
म्हणविति उदार [8]जीवनदानीं, घनरूप कर्णशर ठकिती[9]. ।
समरूप[10] परि परशर[11] क्षुद्र[12] चि; मकरांसमोर शरठ[13] किती? ॥ ३४
गगनीं बाणगणांच्या संघर्षें[14] ज्वलन[15] दुःसह चि पेटे; ।
वधिति शरवृष्टि[16] वन्हि हि, जेंवि व्याघ्री हि तत्सह चि पेटे[17]. ॥ ३५

---

१. हरिचें नाम चि (हरिनामसरणच) जसें मरणीं (मरणसमयीं) यमा वारी (मनुष्यास यमाच्या यातनेपासून सोडवितें)–असा अन्वय. २. सुयोधनाला. ३. कर्णाला. ४. तयांहूनि (त्या शरांहून) कालाही क्रूर काय? अर्थात् नाहीं. कृष्णसर्पापेक्षां शरच क्रूर–हा भाव. ५. काल+अहि=कृष्णसर्प. ६. दुर्योधनदुःखानें. ७. म्हाताऱ्यांचे ठायीं. अन्वयार्थः–कर्ण प्रियसखतापें तापे, तेंवि ग्रीष्मीं हि रवि न [तापे], वृद्धीं शक्ति खरी (खरोखरच) उणी (कमी), तरुणीं [खरी] बहु, कीं (कारण) तो (कर्ण) असंख्य शर विखरी. सारांश, कदाचित् सूर्यकरही मोजतां येतील, परंतु कर्णशर खात्रीनें मोजतां येणार नाहींत–हा भाव. सूर्य कर्णाचा पिता, तस्मात् वृद्ध; कर्ण सूर्याचा मुलगा, तस्मात् तरुण. कर्ण जसा तापला, तसा ग्रीष्मीं सूर्य देखील तापत नाहीं, असें वरच्या गीत्यर्धांत म्हटलें आहे. त्याचें कारण असें कीं, म्हाताऱ्या माणसांस शक्ति कमी असते व तरुणांस अधिक असते. तस्मात् तो तरुण कर्ण आपला वृद्ध बाप जो सूर्य, त्यापेक्षां अधिक तापला–असा इत्यर्थ. **व्यतिरेका**लंकार. ८. (तो कर्ण) प्राणदानीं (घनपक्षीं; जलदानीं. जीवन=प्राण, पाणी). स्वसैनिकांस जीवदान देण्याविषयीं उदार–असा भाव. ९. ठकविती. अन्वयार्थः–[ते] घनरूप (मेघासारखे दिसणारे) कर्णशर जीवनदानीं उदार म्हणविति (प्रौढी मिरविती, बाहेरून उदारपणाचा भाव आणितात) [परंतु अंतीं] ठकिती (ठकविती, फसविती, ठार मारिती). मेघसादृश्यानें ते शर जीवनदान करणारे आहेत असें भासे, परंतु वस्तुतः ते जीवनहरण करणारेच होते–असा भाव. येथें जीवन=प्राण; (पक्षीं) पाणी; दान (दा=खंडणें, तोडणें–ह्या धातूनें साधलेला दान शब्द)=कापणें, (पक्षीं) देणें; असा **श्लेष** साधून शरपर व घनपर अर्थ साधले आहेत. १०. एकसारखे. ११. परशर (शत्रूचे शर) व कर्णशर पाहाण्यास एकसारखेच. १२. तुच्छ, निकृष्ट. १३. सरडा. सागरसंचारी मगरापुढें (मगराप्रमाणें त्याचा आकार असला तरी, कुंपणापर्यंतच ज्याची धांव असा) सरडा काय पराक्रम दाखविणार? मगरापुढें सरड्याची कथा काय?–असा अर्थ. **काव्यार्थापत्ति** अलंकार. १४. संघट्टणानें. १५. अग्नि. १६. शरवृष्टि आणि तीपासून निघालेला अग्नि हे वधिती–असा भावार्थ. कारण व्याघ्रीसहवर्तमान तिचे पेटे (बच्चे) अशी उपमा आहे. १७. व्याघ्रीचीं लहान पिलें.

[1]परमास्त्राच्या तेजें अरिबळ पळवूनि कर्ण त्या [2]पार्थी ।
गांठी, [3]धनशकटांला [4]तस्करवर जेंवि [5]भंगुनी [6]सार्थी. ॥ ३६
कर्णाचे शर सोसी तो [7]सीरधरानुजाश्रयामळधी; ।
[8]पांडव मग बहु खवळे, कल्पांतीं [9]मारुतें जसा जळधी. ॥ ३७
धर्में न एक कर्ण चि, सर्व हि त्याचा [10]सहाय कांपविला. ।
[11]शस्त्रें किति ? मुख्य [12]तपस्तेज चि. भी ना [13]दशास्य कां पविला ?॥ ३८
जिकडे जिकडे [14]क्षेपी [15]अशनीसी [16]क्रोध-दुष्ट दृष्टि रणीं ।
तिकडे भंगे रिपुबळ, [17]पेचककुल जेंवि भानुच्या किरणीं. ॥ ३९
कौरव 'हा ! हा !' म्हणति; प्रतिहत झाले चि [18]शस्त्रवृष्टीनें, ।
[19]दृष्टीनें हि नृपाच्या, जेंवि [20]गरळनयन भुजगदृष्टीनें. ॥ ४०

---

१. मोठ्या (प्रचंड) अस्त्राच्या तेजानें. २. धर्मा. ३. धनानें भरलेल्या गाड्यांना. येथें 'धनशकटाला' असा पाठ आहे, तोच योग्य दिसतो. कारण एकट्या धर्मालाच उद्देशून तें पद योजिलेलें आहे. ४. अट्टल चोर. ५. पळवून. ६. व्यापाऱ्यांस, सौदागरांच्या समुदायास. ७. सीर+धर+अनुज+आश्रय+अमळधी=हलधराच्या धाकट्या बंधूच्या (कृष्णाच्या) आश्रयानें बुद्धि शुद्ध झाली आहे ज्याची, असा धर्म. ८. धर्मराज. ९. वायूच्या योगानें. प्रळयसमयीं समुद्र व वारा हे खवळतात व जगास बुडवितात—अशी समजूत आहे. 'कल्पांतीं मारुतीं जसा जळधी' असें पाठान्तर. १०. साहाय्यास असलेले सैनिक. ११. शस्त्रें किति (शस्त्रांची योग्यता काय ?) तपस्तेज चि मुख्य (तपश्चर्या केल्यानें जें तेज प्राप्त होतें तेंच शस्त्रतेजापेक्षां श्रेष्ठ) [याला पुरावा काय ? तर] दशास्य (दशकंठ, रावण) पविला (वज्राला, अर्थात् वज्रधर इंद्राला) कां भी ना ? (कां भ्याला नाहीं ? रावण वज्राला भ्याला नाहीं, हें कशानें घडलें बरें ?) अर्थात् तपश्चर्येच्या तेजानेंच त्यानें इंद्रालाही जुमानिलें नाहीं—हा भाव. या गीत्यर्धाचा भाव असा, कीं धर्मराज हा तपःशाली व कर्ण हा केवळ शस्त्रज्ञ. तेव्हां कर्णापेक्षां धर्मच अधिक तेजस्वी दिसला. तपोबलापुढें शस्त्रबल हतबल होतें—ह्या सिद्धांताच्या पुष्टीकरणार्थ तपोबलाचें भांडार व शस्त्रबलाचा अभाव अशा दृष्टीनें येथें रावणाचा निर्देश केला आहे. पण रावण शास्त्री होता व शस्त्रीही होता, म्हणून त्याच्या नांवाचा उल्लेख येथें नजरचुकीनें केलेला दिसतो. येथें एकाद्या केवळ तपः-सामर्थ्यवान ऋषीच्या नांवाची योजना समर्पक झाली असती. १२. तपाचें तेज. १३. रावण हा तपश्चर्या करून, ब्रह्मदेवाच्या वरप्रसादानें इंद्रासही जिंकिता झाला—या पौराणिक कथेस उद्देशून हें वाक्य आहे. १४. प्रेषी, सोडी. ह्याचा कर्ता—धर्म. १५. वज्रासारखी. १६. रागामुळें दुष्ट झालेली. 'क्रोधदृष्टि दुष्ट रणीं' असा पाठभेद. १७. घुबडांचा समुदाय. पेचक=घुबड. १८. बाणांच्या वर्षावानें. १९. नृपाच्या दृष्टीनें हि प्रतिहत झाले—असा अन्वय. २०. ज्याच्या डोळ्यांत विष आहे अशा सर्पाच्या दृष्टीनें. 'जैसे चक्षुर्हणाहि दृष्टीनें' असाही पाठ आहे.

शिरले उरीं च तीन व्यांळप्रतिमल्ल भल्ल, वावरुनीं ।
यम[3]मर्नि आले, कीं, ते[4] अलि[5] विष[6]तरुपुष्पपल्लवावरुनीं. ॥ ४१
भल्ल[7]घातविकलमति नृप[8] अक्षम[9] जाहला वदाया[10] हि; ।
धैर्यें बहुप्रयासें निजसूताला म्हणे तदा 'या[11]हि.' ॥ ४२
मागें परते, ठेवुनि चित्तीं कर्णापराध राजा तो; ।
तेव्हां कौरव म्हणती, 'काय पहातां? धरा, धरा, जातो.' ॥ ४३
'घ्या; घ्या; धरा धरा नृप' ऐसें गर्जोनि धांवले च वरी; ।
पांचाळचमू त्यांतें वारी, दंशां[12]सि जसि वनीं चंवरी[13]. ॥ ४४
तेव्हां कर्णें केला पांचाळरथक्षय स्वं[14]शरनिकरें; ।
निकरें[15] हाणी; न दिसे सोडी शर केधवां चि धरुनि करें! ॥ ४५
दुः[16]सहवृषरविशरकरतप्ताखिलभूपवीरवर-पक्षी[17], ।

---

१. सर्पांशीं बरोबरी करणारे. (सर्पासारखे अति तीव्र–असें तात्पर्य). २. कर्णानें सोडिलेले बाण धर्माच्या उरांत घुसले. हे बाण आपल्या प्रखरतेनें सर्पाच्या बरोबरीचे होते. यावर पंत **उत्प्रेक्षा** करितातः—कीं हे बाण यमाच्या हृदयांत कांहीं दिवस राहून (वावरून), अर्थात् त्याच्या आंगचा क्रूरपणा शिकून आले होते; किंवा ते एकाद्या विषारी वृक्षाच्या फुलांवर व पानांवर बसून, अर्थात् त्यांतील रस खाऊन (स्वतः विषारी बनून) आलेले भुंगे होते! ३. यम क्रूर, तेव्हां त्याच्या मनांत वावरलेले म्हणजे यमाच्या क्रूरतेचा संस्कार ज्यांवर पूर्ण झाला आहे असे म्हणजे क्रूर–असा भाव. 'यममर्नि आलें कीं ते' असें पाठान्तर. ४. बाण. पुढील गीतीचा अर्थ लक्षांत घेतां, प्रस्तुत बाण कर्णानें धर्मावर सोडिलेले ठरतात. पण ते कर्णानें सोडिल्याचें विधान मागील कोणत्याही गीतींत नाहीं. यावरून येथील एकादी गीति गळाली असावी, असें वाटतें. ५. भ्रमर. ६. विषवृक्षाच्या फुलांवरून किंवा पानांवरून; विषवृक्षावरून येणारे भ्रमर विष आणितात. तस्मात् प्राणनाशक. तसेच हे भल्ल, म्हणून ही **उत्प्रेक्षा.** ७. भल्लानें (बाणविशेषानें) ताडण केल्यामुळें स्वस्थता नाहीं ज्याच्या मनास असा. ८. राजा **धर्म.** ९. असमर्थ. १०. शब्द उच्चारण्यासही. ११. (येथून) चल. १२. माशांस. १३. चमर-मृगाच्या केंसांची केलेली ती चवरी. १४. आपल्या शरांच्या समुदायानें. १५. मोठ्या जोरानें. **दामयमक.** १६. सहन करण्यास कठीण जे कर्णरूपी सूर्याचे किरणरूप बाण, त्यांहींकरून तापलेले असे जे धर्माकडील सर्व वीरश्रेष्ठ हेच कोणी पक्षी, त्यांतें. १७. हें गीत्यर्ध सर्व एकच समास आहे. पंत दीर्घ समासांचा कधीं कधीं उपयोग करितात. पण इतक्या लांब समासाचीं उदाहरणें पंतांच्या काव्यांत विशेष नाहींत. वृष हा सूर्य, शर हे किरण व धर्माकडील वीरवर हे पक्षी–हें **परंपरितरूपक.**

त्यांतें संश्रिततापापह[1] सुखकर भीमदेवतरु[2] रक्षी. ॥ ४६
सहदेव नकुळ दोघे दों भागीं त्यांत धर्मरथ चाले; ।
भासति जाणों क्षितिवरि[3] पूर्णेंदुसमेत[4] शुक्र गुरु[5] आले ! ॥ ४७
सांभाळिति दों पार्श्वीं दोघेजण कर्णभल्लभिन्नातें[6], ।
ते माद्रेय नृपातें नेती मागें हळू च खिन्नातें. ॥ ४८
तों कर्ण सकळरक्षकभटभंग[7] करूनियां महाबाहु, ।
त्या धर्मावरि धांवे, पूर्णसुधारश्मिवरि[8] जसा राहु[9]. ॥ ४९
वेधी तीं बाणानीं उर त्यांचें[10] कर्ण मित्रहितकामी[11] ।
चित्तीं म्हणे, 'करीन चि वधसम[12] परिभव घडेल तितका मीं.' ॥ ५०
धर्म[13] हि तीं[14] बाणानीं त्या कर्णातें स्तनांतरीं[15] हाणी ।
मर्महत[16] व्याघ्र जसा अविषह्या[17] वेदना मनीं नाणी. ॥ ५१
वेधी कर्णहयांतें तो राजा, आपुल्या हि माम्यातें[18], ।

---

१. आश्रितांचा ताप घालविणारा. २. आश्रय करणाऱ्या प्राण्यास त्याचा ताप निवारण करून, सुख देणें हें कोणताही वृक्ष करूं शकतो. परंतु त्या बिकट प्रसंगीं त्या सैनिकांस भीमाचा आश्रय मिळून त्यांच्यावरील संकट टळल्यामुळें तो त्यांस कल्पतरूच आहे, असें वाटलें. भीम+देवतरु=भीम हाच कल्पवृक्ष, किंवा–भीमदेव+तरु–असा पदच्छेद करावा. भीमाच्या अवर्णनीय पराक्रमामुळें संकटांतून मुक्त झालेल्या सैनिकांनीं त्यास 'भीमदेव' असें म्हणणें योग्यच आहे. ३. भूमीवर. ४. पूर्णचंद्रासहवर्तमान. पूर्णेंदु क्षितीवर (अर्थात् क्षितिजावर) येण्याचे वेळीं शुक्र त्याच्याबरोबर कधींही नसतो. तो सूर्यास्तानंतर पश्चिमेस व सूर्योदयापूर्वी पूर्वेस असतो. हीच चूक 'हा चंद्रमा उगवला गगनप्रदीप । आहेत शुक्र, गुरु, मंगळ ज्या समीप' ह्या पद्यांत झाली आहे. ५. शुक्र व गुरु हे ग्रह. ६. कर्णाच्या बाणांनीं जखमी झालेल्या धर्माला. ७. धर्माचें संरक्षण करणाऱ्या सर्व वीरांची फळी फोडून. ८. पूर्ण चंद्रावर. ९. छायाग्रहविशेष. राहु नांवाचा दैत्यविशेष येऊन चंद्रास ग्रासतो, अशी पौराणिकांची समजूत आहे; व राहु हें पृथ्वीच्या छायेस नांव आहे व चंद्र त्यांत जेव्हां सांपडतो तेव्हां ग्रहण लागतें, अशी ज्योतिर्विदांची समजूत आहे. १०. धर्माचें. ११. आपला मित्र जो दुर्योधन त्याचें हित इच्छिणारा. १२. प्राणघातक. १३. 'वेधी तीं बाणांनीं' असें पाठांतर. १४. तीन. १५. हृदयावर. १६. नाजूक भागावर जखम लागलेला वाघ. (असा चवताळलेला वाघ मनुष्याच्या आंगावर तुटून पडतो, हें प्रसिद्ध आहे). १७. सहन करण्यास अशक्य अशा वेदना. १८. शल्यातें. 'मामातें' या रूपाबद्दल पंत 'माम्यातें' हें रूप पुष्कळ ठिकाणीं वापरतात. (कर्णपर्व–अध्याय ४४ गीति ६ व ८ पहा). 'मामातें' हें शुद्ध रूप पंतांनीं गदापर्व–अध्याय ३ गीति ५ मध्यें योजिलें आहे.

अद्भुत तेज निरखिलें धर्मात्म्याचें नृपोत्तमा[1] ! त्यां तें. ॥ ५२
मर्मक्षतार्त राजव्याघ्राचे तों समर्थ[2] यम[3] पेटे[4] ।
कर्णव्याध[5] विदारिति शरनखरीं[6]; तो[7] दवाग्निसा पेटे. ॥ ५३
जेंवि पिपीलिकं[8] नागांवरि, दुःसह बाण त्यां हि वरि सोडी; ।
राधेय त्यां यमांतें, वृक्षांतें चक्रवातसा[9], झोडी. ॥ ५४
मग कालबाल[10] जे रदनिभ[11] हय त्यांचे हरूनियां प्राण, ।
बाणवरें एकें वृष पाडी त्या नृपतिचें शिरस्त्राण. ॥ ५५
नकुळास हि विरथ करी तो कर्ण, हरि क्षणांत तेजें[12] गति; ।
धर्मविनाशभयें थरथर कांपे त्या रणांत ते[13] जगति[14]. ॥ ५६
नकुळ युधिष्ठिर चढले सहदेवरथीं बहुव्रणितकाय[15], ।
शल्लखचित[16] शल्य[17] तसे शरखचित चि ते; क्षतां गणित[18] काय ? ॥ ५७
मद्रेश[19] विकळ पाहे परमप्रियभक्त कंजनाभाचे[20], ।
जे पटु[21] विश्वाच्या हि, न आपुलिया मात्र, रंजना, भाचे. ॥ ५८
अवलोकितां चि नयनें पावलि[22] जे व्रणितधर्मतनु[23] कंपा, ।
भरती नदींत तैसी, दाटे मद्रपमतीं[24] अनुकंपा[25]. ॥ ५९

---

१. हे धृतराष्ट्रा. २. 'ते समर्थ यम पेटे' असें पाठान्तर. ३. नकुळ व सहदेव. ४. बचे. ५. कर्णरूप पारधी. ६. शररूप नखांनीं. ७. कर्ण. ८. मुंगळे. ९. वावटळीसारखा. १०. ज्यांचीं पुच्छें काळीं आहेत असे (हय). (अश्वतरीचें असेंच वर्णन मागें अध्याय २६ गीति ८ मध्यें आहे). ११. दंतांसारखे शुभ्र. १२. (नकुळाच्या आंगचें) तेज (पराक्रम, प्रभाव) व गति (वेग). १३. ती. 'ही' बद्दल 'हे' व 'ती' बद्दल 'ते' या सर्वनामांचा उपयोग मराठी कवितेंत पुष्कळ आढळतो. १४. पृथ्वी. येथें **'संबंधातिशयोक्ति'** नामक अलंकार आहे. १५. ज्यांना पुष्कळ जखमा झाल्या आहेत असे. (नकुळ व युधिष्ठिर). १६. साळपिसांनीं व्याप्त. १७. साळू, सायाळ. १८. त्यांच्या जखमा मोजतां येत होत्या काय? छेः! त्या अगणित होत्या. १९. अन्वयः– [जे] कंजनाभाचे परमप्रियभक्त [व जे] आपुलिया मात्र रंजना न (फक्त आपल्याच रंजनास नव्हे तर) विश्वाच्या हि रंजना पटु [असे आपले] भाचे (पांडव) मद्रेश (शल्य) विकळ (कळारहित, तेजोहीन) पाहे. रंजन=मन मोहित करणें, उत्तेजन देणें. २०. कमलनाभ कृष्णाचे. २१. कुशल. २२. जे व्रणितधर्मतनु कंपा पावलि [ते] नयनें अवलोकितां चि, नदींत [जैसी] भरती, तैसी मद्रपमतींत अनुकंपा दाटे–असा अन्वय. २३. जखमी झालेलें धर्माचें शरीर. २४. शल्याचे मनांत. २५. दया.

शल्य म्हणे, 'कर्णा ! त्वां भांडावें जिष्णुसीं; वृथा यासीं ।
झगडसि कोपें; आतां [1]चाल पुरे; पडसि कां [2]वृथायासीं ? ॥ ६०
आधीं च रणीं धर्म [3]क्षीणरणोपकरण क्षतशरीर, ।
जेंवि वसंतीं [4]जीवितशेष [5]हतच्छदनवैभव [6]करीर. ॥ ६१
पीडिसि उग्रशरांहीं तूं हि पृथासूनुच्या शरीरासी, ।
सर्वप्राणिभयप्रद [7]दैव [8]दाही जेंवि त्या [9]करीरासी. ॥ ६२
या कर्में [10]उपहासास्पद तूं होसील, शील सांभाळीं; ।
स्वकरें चि [11]अयश-[11]कज्जल राधेया ! लावितोसि कां [12]भाळीं ?' ॥ ६३
ऐसें शल्य वदे, परि कर्ण करी घाबिरे चि [13]असु [14]यांचे. ।
मर्मीं टोंची बाण, [15]स्पर्शे तसे ताविल्या हि न सुयांचे. ॥ ६४
शल्य पुन्हा हि म्हणे, 'गा कर्णा ! तुज [16]धार्तराष्ट्र मानितसे, ।
[17]ज्या [17]अर्थे, आप्तजनीं तुझिया चि गुणांसि नित्य वानितसे, ॥ ६५
[18]तो अर्थ सिद्धिला [19]ने. जिष्णुवधाकारणें वृषा ! चाल; ।

---

१. आतां धर्मावर चाल करून जाणें पुरे, आतां धर्मावर हल्ला करण्यांत अर्थ नाहीं–असा भाव. २. व्यर्थ आयासांत, ज्यांत कांहीं फायदा नाहीं असे श्रम करण्यांत. ३. क्षीण+रण+उपकरण=रणसाहित्य क्षीण झालें आहे, ( नाश पावलें आहे, ज्याची मोडतोड झाली आहे ) ज्याचें असा. ४. जीव मात्र शेष राहिलेला असा. ५. नष्ट झालें आहे पत्रवैभव ज्याचें असा. छदन=पान, पर्ण. ६. नेपत्याचें झाड. प्रस्तुत स्थलीं करीर वृक्षाचें 'हतच्छदनवैभव' मात्र ग्राह्य आहे. त्याच्या आंगच्या कोमलपणाचा विचार करण्याचें कारण नाहीं. 'मेल्या माणसाची मान कापणें' ह्यांत जसें त्या मान कापणाऱ्यास कांहीं महत्त्व नाहीं, तसेंच अगोदरच वठलेल्या करीरास जाळण्यांत अग्नीला कांहीं महत्त्व नाहीं. त्याप्रमाणेंच आधींच क्षीणोपकरण व क्षतशरीर झालेल्या धर्मराजाला त्वां उग्र बाणांनीं पीडा देणें, हें तुला मोठेपणा प्राप्त करून देणारें नाहीं. ह्या तुझ्या अशा कृतीनें तुझा हलकेपणाच दिसेल व तूं उपहासास प्राप्त होशील–असा भावार्थ. ७. वणवा. ८. जाळी. ९. वर वर्णिलेल्या करीरवृक्षास. १०. निंदेस पात्र, युद्धांत दमलेल्या मनुष्याशीं लढला या निंदेस पात्र. ११. अपयश हेंच काजळ. येथें 'स्वकरें अयशः–कज्जल' असा पाठ असता तर अर्थहानि न होतां समासघटित शब्दांची शुद्धता राखतां आली असती. (मागें पृष्ठ १४९ टीप १४ पहा). १२. कपाळीं. १३. प्राण. १४. पृथासुतांचे. १५. ताविल्या (तापविलेल्या) सुयांचे हि स्पर्श तसे [असह्य] न–असा अन्वय. १६. सुयोधन. १७. ज्या उद्देशानें, ज्या कामाकरितां; अर्जुनास मारण्याच्या उद्देशानें–हा भाव. १८. अर्जुनाचा वध करणें हा. १९. दुर्योधनानें तुला धर्मवधाचें काम सांगितलें नसून अर्जुनवधाचें काम

[1]नृप मारुनि काय तुला? न [2]सितेची सुज्ञ काढिती साल. ॥ ६६
[3]प्रावृट्घनसा [4]गाजे पार्थाचा, विष्णुचा हि [5]दर वाजे, ।
लागति उघडति दैत्यांदेवांचे [6]यद्रवें चि दरवाजे. ॥ ६७
हा आला पार्थ पहा; कुरुपतिसैन्यास या [7]समग्रास ।
ग्रासितसे, विश्वाचा प्रळयीं करितो जसा यम ग्रास. ॥ ६८
तो [8]एक उत्तमौजा, वीर युधामन्यु तो [9]दुजा शूर; ।
ते [10]पृष्ठरक्ष दोघे जिष्णुरथातें न सोडिती दूर. ॥ ६९
[11]उत्तररथचक्राचें रक्षण तो सात्यकी पहा करितो, ।
[12]दक्षिणरथचक्रावन करितो [13]द्रोणद्विजातिचा [14]अरि तो. ॥ ७०
सिंहें गजसा भीमें प्राणहरें [15]गांठिला धरावर तो ।
वांचो, चाल, विलोकुनि तुजला, सिंहासि सिंहसा, परतो. ॥ ७१
[16]आम्हांसमक्ष भीमें पाडावा न नृपें, जेंवि तरु वातें, ।

---

सांगितलें आहे. तें काम तूं करशील म्हणून तो तुझी तारीफ सर्वांसमक्ष करीत असतो. तेव्हां तें काम सोडून हें कां करितोस? अर्जुनाकडे चल—हा भाव.

१. धर्मराज. २. 'साखरेची साल काढणें' हें निरर्थक आहे, म्हणून सुज्ञ लोक असलें अनवश्यक काम करीत बसत नाहींत. **लोकोक्ति.** ३. वर्षाकालांतील मेघाप्रमाणें. ४. कर्ता 'दर (शंख)'. गाजणें=मोठ्यानें वाजणें. पार्थाचा दर प्रावृट्घनसा गाजे, विष्णुचा हि [दर] वाजे—असा अन्वय करावा. ५. शंख. 'दर' शब्दाचे शंख, भीति व अल्प—असे अर्थ आहेत. प्रस्तुत स्थलीं देवदत्त व पांचजन्य या पार्थकृष्णांच्या शंखांचा भयंकर ध्वनि. ६. यद्रवें चि (ज्यांच्या भयंकर आवाजानें) दैत्यांदेवांचे (स्वर्ग व पातालांतील असा भाव) दरवाजे (आपोआप) लागति (बंद होतात) [व] उघडति (पुन्हां उघडतात.) ही **अतिशयोक्ति**; कारण असंबंधीं संबंध वर्णिला आहे. स्वर्गांतील दरवाजे बंद होणें किंवा उघडणें, याचा कृष्णार्जुनांच्या शंखांच्या ध्वनींशीं वस्तुतः कांहीं संबंध नाहीं. ७. सर्वांस, संपूर्ण सैन्यास. ८. 'तो ऐक' असें पाठान्तर. त्याच्या शंखाचा ध्वनि ऐक—असा भाव. ९. दुसरा. 'जसा' असें पाठान्तर. जसा तो वीर युधामन्यु शूर [आहे तसाच हा वीर] उत्तमौजा [त्याचा] तो [ध्वनि] ऐक—हा भाव. १०. पाठिराखे, मागच्या भागाचें संरक्षण करणारे. ११. अर्जुनाच्या रथाच्या उत्तर दिशेच्या चक्राचें. १२. दक्षिण दिशेच्या रथचक्राचें संरक्षण. अवन=रक्षण. १३. द्रोण नामक ब्राह्मणाचा. १४. शत्रु (धृष्टद्युम्न). **पर्यायोक्ता**लंकार. १५. गांठिलेला. १६. धर्मास सोडून निघण्याकरितां शल्य कर्णास दोन कारणें सांगतोः-(१) कर्णाचें काम अर्जुनास जिंकणें हें आहे. तेव्हां तें न करितां धर्माच्या मागें लागण्यांत कांहीं अर्थ नाहीं. (२) वरचें कारण कर्णाच्या मनास

जाळील निकटवर्ती[1] प्रज्वलित[2] ज्वलन[3] केंवि न रुवातें[4]? ॥ ७२
काळमुखीं नृप[5] पडला, त्यासि उपेक्षूनि काय करिशील? ।
प्रभु मरतां व्यर्थ चि, जरि सानुजधर्मासु[6] आजि हरिशील. ॥ ७३
वांचेल आजि नृप तरि अत्यद्भुत; हें नवें[7] चि जन्म रणीं; ।
पावावें[8] चि कृतज्ञें, जे प्रभुमित्राप्तबंधु तन्मरणीं[9].' ॥ ७४
परिसोनि शल्यभाषण माघारां अंगराज[10] जों पाहे, ।
तों दुर्योधन खगपतिदृष्टाहिदशेसि[11] पावला आहे. ॥ ७५
कौंतेयातें[12] सोडुनि कर्ण म्हणे, 'मद्रनायका! जळतें[13] ।
गृह आधीं रक्षावें[14]. अयशाहुनि अधिक काय काजळ[15] तें?' ॥ ७६
हाकी हयांसि मद्रप, भद्र[16] परम मानुनि[17], स्वरथ फिरवी; ।
भगणीं[18] अनूरु[19] रविला, कर्णाला तेंवि अरिबळीं शिरवी. ॥ ७७

---

रुचत नाहीं, असें पाहून शल्य (येथून ७४ व्या गीतीपर्यंत) दुसरें कारण सांगतो. तें हें कीं, तुझा राजा जो दुर्योधन त्याला 'भीम हैराण करून सोडीत आहे. तिकडे तुझा राजा मेल्यावर इकडे धर्मास धरण्यानें काय फायदा होणार? म्हणून तिकडे वळ.' १७. दुर्योधन.

१. फार जवळचा. २. अतिशय भडकलेला. ३. अग्नि. ४. कापसाला. ५. दुर्योधन. ६. कनिष्ठ बंधूंसहवर्तमान धर्माचे प्राण. ७. पुनर्जन्म. ८. अन्वय व अर्थ:–जे प्रभुमित्राप्तबंधु (आपला यजमान, मित्र, प्रेमांतला किंवा नातलग) तन्मरणीं (अशा इष्टमित्रांवर प्राणसंकट ओढवलें असतां) कृतज्ञें (उपकाराची आठवण ठेऊन प्रत्युपकार करण्याची ज्याची इच्छा आहे अशा मनुष्यानें) पावावें चि (जाऊन मदत करावी, सहाय्यास जावें). हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ९. त्याच्या मरणकाळीं. १०. कर्ण. ११. गरुडानें पाहिलेल्या सापाच्या स्थितीला (गर्भगळितपणाला). १२. धर्माला. १३. जळत असलेलें, जळणारें. 'जळतें गृह आधीं रक्षावें' हें लोकोक्तीचें अनुकरण. ज्यामुळें सर्वविनाश होईल असल्या संकटाचा प्रतिकार आधीं करावा, मग इतर कामें करावीं–हा याचा भाव. १४. कल्पनासादृश्य:–(१) संदीप्ते भवने तु कूपखननं प्रत्युद्यमः कीदृशः । (भर्तृहरिकृत नीतिशतक, श्लोक ८६); (२) न कूपखननं युक्तं प्रदीप्ते वह्निना गृहे । चिंतनीया हि विपदामादावेव प्रतिक्रिया: ॥ (सुभाषित). १५. यशाचा रंग पांढरा व अपयशाचा रंग काळा–हें वर्णन कविसमयास अनुसरून आहे. १६. कल्याण. १७. हा कर्ण धर्माला सोडून फिरला, हें फार चांगलें झालें, असें समजून. १८. नक्षत्रगणांत. १९. अन्+ऊरु=ज्याला मांड्या नाहींत तो, अरुण (सूर्यसारथी). अरुणाला मांड्यांखालचा शरीराचा भाग नाहीं. या स्थितीच्या कारणाकरितां मोरोपंतकृत आदिपर्व, अध्याय ४ गीति २८–३० पहा.

## अध्याय एकोणचाळिसावा.[1]

जातां कर्ण, पराभवखिन्न क्षतकाय राय[2] 'हाय !' म्हणे, ।
'खावविले[3] चावविले लोहाचे शत्रुनें प्रतप्त[4] चणे.' ॥ १
प्रेक्षकमूर्च्छाप्रद[5] जे न करिति विगतासु[6] घाय ते ज्यातें ।
त्या धीरमुकुटमणिच्या वर्णील कवी[7] हि काय तेजातें ? ॥ २
धर्मच्युति[8] नोहे जरि गेला परतोनि धर्म शिबिरा, हे, ।
ज्याच्या[9] कीर्तिश्रवणें स्वर्गीं होउनि सलज्ज शिबि[10] राहे. ॥ ३
वस्त्रप्रासादीं[11] शुभशयनीं[12] जातां चि भागला[13] पहुडे[14]; ।
तें[15] धर्मदुर्ग[16] खचलें, जाणों उरले चहूंत दोन हुंडे[17]. ॥ ४

---

१. यांत मुळांतील अध्याय ६३ (श्लोक ३२ ते अखेर), ६४ व ६५ यांतील कथाभाग आला आहे. २. राजा युधिष्ठिर. ३. शत्रूनें खूप अपमान केला–असा भाव. येथें 'लोखंडाचे चणे चारणें' या लोकोक्तीचें अनुकरण आहे. 'खडे चारणें,' 'लोखंडाचे चणे खावविणें' ह्या म्हणी अत्यंत अपमान करणें ह्या अर्थी योजितात. ४. फार तापलेले. ५. पाहणाऱ्यांस देखील मूर्च्छा आणणारे. हें 'घाय' या शब्दाचें विशेषण. अन्वयः–जे घाय प्रेक्षकमूर्च्छाप्रद, ते ज्यातें विगतासु (प्राणहीन) न करिति त्या धीरमुकुटमणिच्या (धैर्यशीलांत श्रेष्ठ अशा धर्माच्या) तेजातें कवी हि काय वर्णील ? धर्माच्या आंगावरील घाय इतके भयंकर होते कीं, पाहणाऱ्यासही मूर्च्छा येत असे; पण तशा भयंकर घायानें देखील धर्म मेला नाहीं, तेव्हां त्याचें तेज अद्वितीय होय–हा कवीचा उद्देश. ६. विगत+असु=प्राणविहीन. ७. शहाणा किंवा प्रस्तुत कवि मोरोपंत. ८. क्षत्रियांच्या धर्मापासून पतन. ९. ज्याच्या कीर्तिश्रवणें स्वर्गीं शिबि सलज्ज होउनि राहे [तो] धर्म जरि [युद्धांतून] परतोनि शिबिरा गेला [तरी] हे धर्मच्युति नोहे–असा अन्वय. या गीतींतील उत्तरार्ध धर्माचें विशेषण आहे. तें साभिप्राय आहे. ज्याची कीर्ति शिबीच्या कीर्तीहून ज्यास्त, तो जरी युद्धांतून परतला, तरी त्याला धर्मच्युति प्राप्त होणार नाहीं, असा उत्तरार्धपूर्वार्धाचा संबंध. १०. शिबि चक्रवर्ती. हा सोमकुलोत्पन्न मोठा धार्मिक राजा. दानाविषयीं याची फार प्रख्याति आहे. याचें सत्त्व पाहण्याकरितां आलेल्या ब्रह्मदेवास यानें आपल्या मुलाचें मांस दिलें. एकदां यानें एका कपोताचें व्याधापासून रक्षण करण्याकरितां कपोताच्या वजनाएवढें मांस आपल्या देहांतून देण्याचें कबूल केलें. पण आंगांतून कितीही मांस काढून तराजूंत टाकलें तरी तें कपोताएवढें होईचना. शेवटीं शिबीच तराजूंत बसला ! आत्मत्याग करून परोपकार केलेल्या राजांत याची अग्रगणना आहे. ११. वस्त्रांनीं केलेला प्रासाद, (मंदिर, घर) त्यांत, डेऱ्यांत. मुक्तेश्वरकवीनें आपल्या ग्रंथांत 'तंबू' ह्या शब्दाबद्दल 'वस्त्रगृह' असा शब्द योजिला आहे. १२. चांगल्या पलंगावर. १३. श्रमलेला. १४. निजे. १५. तें=तो धर्मरूपी किल्ला. 'दुर्ग' शब्द संस्कृतांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आहे. १६. 'ते धर्मदुर्ग खचले' असा

अतिनिष्ठुर वैकर्तन [1]निशितशरांहीं यथेष्ट [2]चाचावी, ।
तेंवि न कधीं च उग्रग्रह राहु हि [3]काय इंदुचा [4]चावी. ॥ ५
[5]पल्यंकावरि पडला, पांडुपृथापुत्र पावला [6]पीडा, ।
[7]वैरिविजित [8]विक्षतवपु [9]विमुखत्वें वीरवर [10]वरी [11]व्रीडा. ॥ ६
माद्रेयांसि म्हणे [12]नृप, 'भीमाचे सिंहनाद हे परिसा; ।
शत्रूंसीं भांडतसे बाहुबळें करिकुळांसवें हरिसा. ॥ ७
जा तेथें त्यापासीं, जैसे [13]मारुत सहाय [14]दावातें, ।
भावातें भेटा, जें प्रेम बळ क्रौर्य शौर्य दावा तें.' ॥ ८
धर्माज्ञेनें गेले, भीमासि सहाय जाहले [15]यम ते; ।
[16]श्रम तेजस्वी गणिते, तरि [17]मर्त्यत्वीं [18]अमर्त्य कां गमते ? ॥ ९
द्रौणि पुन्हा पार्थासीं युद्ध करायासि आदरें आला; ।
[19]पथिक क्षुधित ब्राह्मण [20]दातृगृहा जेथ [21]फारदा [22]धाला. ॥ १०
कृष्णातें बाणानीं झांकी आश्चर्य दाखवी मोटें, ।
मर्त्य [23]किति ? अमर्त्यांनीं तेव्हां तोंडांत घातलीं [24]बोटें ! ॥ ११

---

पाठभेद आहे. १७. [नकुळ सहदेवरूपी] बुरूज. भीमार्जुन ह्या वेळीं धर्मांजवळ नसल्यामुळें त्याचा धीर खचला होता. ह्यावर पंतांनीं ही **उत्प्रेक्षा** केली आहे.

१. तीक्ष्ण शरांनीं. २. क्षतें पाडी, जखमा करी. ३. शरीर. ४. उग्रग्रह राहु हि इंदुचा काय (शरीर) तेंवि कधीं च न चावी—असा अन्वय. ५. पलंगावर. 'पर्यंकावरि' असें पाठान्तर. ६. व्यथा, दुःख. ७. शत्रूकडून पराजित. ८. जखमी, घायाळ. ९. युद्धांतून पळून आल्यामुळें. १०. या गीतीच्या पूर्वार्धांत 'प' काराचा **वृत्यनुप्रास** असून, उत्तरार्धांत 'व'काराचा **वृत्यनुप्रास** आहे. 'वीरवर वरी व्रीडा' यांत 'व'काराची व 'र'काराची अशा दोन व्यंजनांची चार वेळां आवृत्ति झाली म्हणून **छेकानुप्रास**. ही गीति शब्दालंकाराचें उत्तम उदाहरण आहे. ११. लज्जा. १२. धर्म. १३. वायु. १४. वणव्यास. १५. नकुळ व सहदेव. १६. श्रम गणिते, म्हणजे मेहनत करण्यास (युद्ध करण्यास) मागें पुढें पाहते तर. १७. मनुष्यपणीं. १८. देव. १९. पांथस्थ. २०. दात्याच्या घरीं. २१. फारदां, पुष्कळदां. २२. तृप्त झाला; क्षुधा व तृष्णा भागवून सुखी झाला. प्रस्तुत गीत्यर्धांत 'जणों' हा शब्दच काय तो कमी, बाकी ही **उत्प्रेक्षा**. २३. **काव्यार्थापत्ति** नामक अलंकार प्रस्तुत गीत्यर्धांत आहे. अमर्त्यच आश्चर्यचकित झाले, तेव्हां मर्त्य चकित झाले असतील यांत काय आश्चर्य ?—हा भाव. २४. तोंडांत बोटें घालणें (आश्चर्यानें चकित होणें) या **लोकोक्ती**चें कवीनें अनुकरण केलें आहे.

जें अस्त्र पार्थ सोडी तें वारी द्रौणि, लेशें [1]आटेना; ।
[2]कोण्हीं तदन्य आहे काळ असें त्या रणांत वाटेना. ॥ १२
तेणें तीं बाणानीं [3]दक्षिणभुज वेधिला [4]अरिकराचा; ।
बहु [5]मानिला प्रताप [6]क्रुद्धें हि धनंजयें [7]अरिकराचा. ॥ १३
पार्थ शरौघें गुरुसुतबळ, मारुत [8]जलदपटलसें, दूर ।
पळवी; [9]तदस्रकणगण गगनिं गमे [10]उधळिला चि सेंदूर ! ॥ १४
भूतांचे [11]संघ म्हणति, '[12]सद्यःस्रुतशोणितापगा वाहो; ।
तें [13]चि करि [14]भूतपतिचा [15]प्रिय; कोणीं तत्प्रताप गावा हो !' ॥ १५
• रथिसारथितुरगशतें वधिलीं, [16]हतशेष पळविले [17]पर ते; ।
एका द्रौणिहुनि दुजा कोण्ही हि न जिष्णुवरि रणीं परते. ॥ १६
द्रौणि [18]पविप्रतिमशरें उर ताडी जिष्णुचें, तऱ्ही उर तें ।
चूर्ण न होय [19]शिवोरःस्पर्शें चि; न लव हि [20]अन्यथा उरतें. ॥ १७
पार्थ च्छेदी द्विजधनु; होय [21]रविकरा हि ज्यामधें न रिघ, ।
करि घन शरपटल असें, तों टाकी क्रुद्ध विप्र तो [22]परिघ. ॥ १८
परिघ [23]अरिघनसमीरें पार्थें [24]पविहतनगापरि च्छिन्न ।

---

१. अर्जुनाच्या शौर्यास भिऊन स्तंभीभूत झाला नाहीं—हा भाव. २. तदन्य (त्याच्या शिवाय इतर) कोणी काळ आहे असें वाटेना. म्हणजे सर्वांस तोच काळ भासला. ३. उजवा भुज. ४. अरि+कर=चक्र+हस्त. चक्रधराचा (कृष्णाचा). ५. वाखाणिला. ६. कृष्णास मारिल्याबद्दल जरी अर्जुनास राग आला, तरी अस्त्रकौशल्याबद्दल त्यानें द्रौणीची तारीफच केली. 'शत्रोरपि गुणा वाच्या दोषा वाच्या गुरोरपि' असें सज्जनांचें ब्रीदच आहे. ७. शत्रूच्या (अश्वत्थाम्याच्या) हस्ताचा. ८. मेघसमूहाप्रमाणें. ९. तत्+अस्र+कण+गण=त्या सैन्याच्या रक्तबिंदूंचा समुदाय. अस्र=रक्त. 'अस्रः कोणे कचे पुंसि क्लीबाश्रुणि च शोणिते' इति मेदिनी. १०. उधळलेला. ही **उत्प्रेक्षा**. ११. समुदाय. १२. सद्यःस्रुत+शोणित+आपगा=तत्कालीं स्रवणाऱ्या (वाहणाऱ्या) रक्ताची नदी. १३. सद्यःस्रुतशोणितापगा वाहेल असें काम. १४. भूतांचा (भूतप्रेतपिशाचादिकांचा) स्वामी जो शंकर त्याचा. 'भूतपतिचा प्रिय' हें अर्जुनाचें विशेषण साभिप्राय आहे. **परिकरा**लंकार. १५. भक्त अर्जुन. १६. जिवंत राहिलेले. १७. शत्रु. १८. वज्रासारख्या बाणानें. १९. शिव+उरस्+स्पर्श=शंकराच्या उरःस्पर्शानें म्हणजे किरातार्जुनीय युद्धानंतर शंकरानें प्रसन्न होऊन अर्जुनास उराशीं धरिल्यामुळें. २०. असें झालें नसतें तर. २१. सूर्यकिरणासही. 'रविकरांहि ज्यांमधें न रिघ' असाही पाठ आहे. रिघ=रीघ, शिरकाव. २२. शस्त्रविशेष. २३. शत्रुरूप मेघाला वाऱ्यासारखा अशा. २४. वज्रानें ताडिलेल्या पर्वताप्रमाणें.

करितां, तो विप्र दिसे [1]त्रिपुरहर [2]क्षोभला [3]परिच्छिन्न. ॥ १९
[4]स्वशरसमूहसमीरें उडउनि [5]रिपुरचितशरजवनिकेला, ।
तेजःप्रकाश विप्रें, जेंवि दवें तृण गिळोनि [6]वनिं, [7]केला. ॥ २०
'रे ! मीं अश्वत्थामा आहें, आलों पहा, [8]सहा बाण.' ।
ऐसें गर्जे, हाणी शर शत [9]त्यां जो प्रभू [10]जगत्प्राण. ॥ २१
मग [11]तीनें शत [11]शरानीं ताडी पार्थासि विप्रसिंह रणीं, ।
तेव्हां जिष्णु क्षोभे जेंवि श्रीरुद्र [12]विश्वसंहरणीं. ॥ २२
मर्मीं गुरुपुत्रातें हाणी, [13]तत्सूतजीवना [14]शोषी, ।
[15]रोषी पार्थ [16]कृपीसुतपरिभवकामें प्रताप बहु [17]पोषी. ॥ २३
तेव्हां [18]अभ्रांतमना तो [19]परमोदार विप्र [20]वाहांतें, ।
प्रबळांतें ही आवरि, [21]वेळा जसि [22]वारिधिप्रवाहांतें. ॥ २४
अश्व हि आवरि, करि शरसंधान हि विप्रसिंह निकरानें, ।
झांकी पार्था, जेंवि [23]क्षेत्रा [24]दुष्काळशैलभनिकरानें. ॥ २५
त्या कर्मातें पाहुनि सर्व म्हणति, '[25]साधु ! साधु ! बापा ! हो ।
संतुष्ट, [26]तुज तुझा सप्रेम [27]स्वर्गस्थ देव बा पाहो.' ॥ २६
त्या समयीं [28]मधुरिपुसख हांसे, क्षिप्र [29]क्षुरप्र-शर सोडी, ।

---

१. त्रिपुरांस जाळतांना कालनेत्र उघडून अत्यंत क्रुद्ध झालेला **शिव**. २. क्षोभलेला. ३. स्पष्ट. ४. आपल्या बाणांच्या समुदायरूपी वायूनें. ५. अर्जुनानें रचिलेल्या शराच्छादनाला. जवनिका=पडदा. ६. 'वनि' असा पाठ रा० पराडकर यांच्या प्रतींत आहे. वनि=वनिं=वनीं (अरण्यांत). ७. विप्रें तेजःप्रकाश केला—असा अन्वय. ८. सहन कर. ९. जो प्रभू जगत्प्राण त्या (त्याला) शत शर हाणी—असा अन्वय. १०. जगाचा प्राण (कृष्ण). ११. तीनशें बाणांनीं. १२. प्रलय-समयीं. १३. त्याच्या (अश्वत्थाम्याच्या) सारथ्याचे प्राण. १४. आकर्षून घेई. १५. रागीट. १६. कृपीचा मुलगा जो अश्वत्थामा, त्याचा पराजय करण्याच्या उद्देशानें. १७. वाढवी. १८. ज्याच्या मनाला कांहीं भ्रांति उत्पन्न झाली नाहीं असा, ज्याचें मन निःशंक आहे असा. १९. परम+उदार=फार सरळ मनाचा, मोठा सज्जन. २०. अश्वांतें. २१. समुद्रकिनारा. २२. समुद्राच्या लाटांस. प्रवाह=ओघ, झरा. २३. शेताला. २४. दुष्काळांतल्या टोळांच्या समूहानें. २५. शाबास. २६. देव [आणि] तुझा स्वर्गस्थ बा (बाप) संतुष्ट [होऊन] तुज पाहो. देव=द्रोण रणांत मेल्यामुळें देव झाला होता, असाही अर्थ होईल. २७. स्वर्गवासी. २८. मधु नामक दैत्याचा शत्रु जो कृष्ण, त्याचा सखा (अर्जुन). 'अर्जुन' असें न म्हणतां

द्रौणीच्या अश्वांचे सर्व हि रश्मि[1] क्षणामधें तोडी. ॥ २७
रश्मि च्छेदुनि दाविति अश्वांला पार्थशरकशा[2] सरणी[3]; ।
सद्गुरुहरिसखजितखळगुरुहरि[4] टिकतील हो ! कशास रणीं ? ॥ २८
असतां विद्या प्रज्ञा धैर्य सुदीर्घायु[5] तूणचाप[6] शुची[7], ।
अश्व पळाले; झाला परिभव; संगति न भद्रदा[8] पशुची[9]. ॥ २९
जय[10]शरसमूहपवनें उन्मथिली कुरुचमू-महामळकी[11]; ।
भट[12]-आमलक विखुरले[13]; होय तयांची[14] मुखप्रभा मळकी. ॥ ३०
मागें पांडवभट-हरि[15], पळति पुढें अरिसमूह-मृगकळप; ।
तैं प्राथिला कुरुवरें रक्षाया कटक[16] कर्ण कुरुबळप[17]. ॥ ३१
प्रकट करी त्या समयीं वैकर्तन भार्गवास्त्रतेजातें[18], ।
दीपासि पतंग तसे, स्वात्मार्पण[19] करिति शत्रु ते[20] ज्यातें. ॥ ३२

---

'मधुरिपुसख' असें म्हणण्याचें कारण कीं, मधूसारख्या दैत्यासही मारणारा जो कृष्ण, त्याचा मित्र, तस्मात् द्रौणीस भिणारा नव्हे. २९. ज्यांच्या अग्राची आकृति घोड्याच्या खुरासारखी केलेली असते असे तीक्ष्ण शर.

१. लगाम वगैरे. २. पार्थाचे शररूप चाबूक. ३. मार्ग (चाल). अर्जुनाच्या बाणांच्या माऱ्यामुळें घोडे पळत सुटले–असा भाव. ४. सद्गुरु+हरि+सख+जित+खळ+गुरु+हरि=सद्गुरु+कृष्ण+मित्र+जिंकिलेला+दुष्ट+अश्वत्थामा+घोडे=सद्गुरु जो कृष्ण, त्याच्या मित्रानें (अर्जुनानें) जिंकिलें आहे ज्यास अशा गुरूचे (गुरुसुताचे) घोडे. किंवा गुरुहरि=मोठे घोडे. 'सद्गुरु हरि' (सद्गुरु जो कृष्ण) व 'गुरुहरि' (गुरूचे घोडे) असे हे वर्ण दोन वेळां दोन अर्थांनीं आल्यामुळें हा **लाटानुप्रास**. 'गुरुहरिसखानें जिंकिलेले गुरुहरि' असें म्हटल्यामुळें **विरोधाभास** झाला. हे शब्द येथें भिन्न अर्थांनीं वापरल्यामुळें खरोखर विरोध नाहीं. ५. बहुत आयुर्दाय. अश्वत्थामा चिरंजीवी (कधींही न मरावयाचा) होता, म्हणून त्यास 'सुदीर्घायु' म्हटलें आहे. ह्या संबंधानें पुढील श्लोक लक्षांत ठेवण्यासारखा आहे:–अश्वत्थामा बलिर्व्यासो हनूमांश्च बिभीषणः । कृपः परशुरामश्च सप्तैते चीरजीविनः ॥. ६. भाते व बाण. ७. विध्युक्त पावित्र्यानें शुद्ध, शस्त्रप्रयोगास आवश्यक अशा परिशुद्धतेनें युक्त असा. ८. कल्याणदायक. ९. अश्वादि पशूंची. हा **अर्थांतरन्यास** सुभाषितरूपही आहे. १०. अर्जुनाच्या शरसमूहाच्या वायूनें. ११. कुरुसैन्यरूप मोठी आंवळी (आंवळ्याचें झाड). १२. योधरूप आंवळे. १३. पसरले. १४. कौरवपक्षीय वीरांची. १५. पांडवपक्षीय योद्धे हेच सिंह. १६. सेना. १७. कौरवसैन्याचा स्वामी किंवा सेनापती. १८. भार्गवरामानें दिलेल्या अस्त्राच्या तेजाला. १९. स्व+आत्मा+अर्पण=आपला+प्राण+अर्पण. २०. ते शत्रु ज्यातें (ज्या भार्गवास्त्रतेजातें) स्वात्मार्पण करिति [त्या] भार्गवास्त्रतेजातें वैकर्तन त्या समयीं प्रकट करी–असा अन्वय.

तत्काळ शत सहस्र प्र[1]युतार्बुदें[2] कोटि अ[3]स्त्रसंभूतें ।
श[4]रवृंदें वीरशिरें हरिति, व[5]हायासि काय शंभूतें ! ॥ ३३
वृष भार्गवास्त्रतेजें करि शत्रुबळीं, जसें हर त्रिपु[6]रीं. ।
युद्ध किती वर्णावें ? तैं रक्तांच्या, भ[7]रे धरित्रि, पु[8]रीं. ॥ ३४
कृष्णातें पार्थातें कर्णह[9]त समस्त वीर बोभां[10]ती; ।
जें[11]व्हि दुर्दशा चि, तव्हि हरि आठवतां, दुर्दशा न, शोभा[12] ती. ॥ ३५
वणवा वनास लागे त्यांत जसे भाजतां गज भ्र[13]मती, ।
न मतीस उपाय सुचे, अ[14]स्त्रानळदग्ध सैनिक श्र[15]मती. ॥ ३६
पार्थ म्हणे, 'श्रीकृष्णा ! भृ[16]गुरामें भार्गवास्त्र जें कथिलें, ।
त्याचा प्रयोग केला कर्णानें; सैन्य आमुचें मथिलें. ॥ ३७
या अस्त्राचें वारण मज तों वाटे अशक्य अत्यंत; ।
केला चि सूतपुत्रें र[17]थिसादिगजाधिरोहपत्त्यंत. ॥ ३८
वारंवार मजकडे पाहतसे कर्ण उग्र अं[18]तकसा; ।
माझ्या हातें याचा युद्धीं होईल आजि अंत कसा ? ॥ ३९
कर्णापुढें पळावें हें तों म[19]रणापरीस फं[20]टकाळ; ।
ठां[21]कावें तरि सं[22]प्रति वाटे मज हा करील गट का[23]ळ. ॥ ४०

---

१. प्रयुत=दहा लक्ष. २. अर्बुद=दहा कोटी. ३. अस्त्रापासून निघालेलीं. ('शरवृंदां'चें विशेषण). ४. शरांचे (बाणांचे) समुदाय. 'वृंद' हा शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी आहे. ५. [जणूं] काय शंभूतें वहायासि. ही उत्प्रेक्षा. शंभू कपालधारी म्हणून उत्प्रेक्षाप्रसंग. ६. त्रिपुरासुराचे ठायीं. ७. 'तैं रक्ताच्या बुडे धरित्रि पुरीं' असाही पाठ आहे. ८. धरित्रि रक्तांच्या पुरीं (पुरानें) भरे (भरून गेली)–असा अन्वय. ९. कर्णाच्या बाणांनीं युद्धांत पडलेले. १०. ओरडून हांका मारती. ११. मनुष्य जरी वाईट स्थितींत असला, तरी तो ईश्वराचें स्मरण करीत असेल, तर ती दुर्दशाच नव्हे, कल्याणप्रद प्रसंगच होय. हें गीत्यर्ध सुभाषित आहे. १२. ती शोभा होय म्हणजे शुभसूचक प्रसंगच होय. १३. पळती, इकडे तिकडे फिरती, भटकती. १४. अस्त्रापासून उत्पन्न झालेल्या अग्नीनें जळणारे. १५. श्रम पावती, त्रस्त होती. १६. परशुरामानें. १७. रथि+सादि+गजाधिरोह+पत्ति+अंत=रथी+घोडेस्वार+हत्तीवर बसणारे+पायदळ+(यांचा) नाश. १८. यमासारखा. १९. मरणापेक्षांही. २०. लाजिरवाणें. २१. समोर उभें रहावें, टिकाव धरावा. २२. प्रस्तुत समयीं, भार्गवास्त्रप्रयोगप्रसंगीं. २३. हा काळ (यमासारखा कर्ण) मज गट करील [असें] वाटे.

अंसतां जीवंत पुरुष जय ही पावे, पराजय हि पावे; ।
मेरतां भंग चि, कैंचा जेय? हे सारे विचार तुज ठावे.' ॥ ४१
कृष्ण म्हणे, 'कर्णानें राजा बहु पीडिला, तया आर्धी, ।
चाल, पहा, आश्वासीं; मेग कर्णातें वधूनि जय साधीं.' ॥ ४२
ऐसें वदोनि कृष्णें हय चालविले नृपाकडे जाया, ।
पार्थ म्हणे प्रभुसि, 'पहा वीरमणींच्या विचित्र सेजा या. ॥ ४३
घोरें नसे, सावध पेळभुग्भुक्त हि धीर भुलविलेसे जे, ।

---

१. 'शीर सलामत तो पगडी पचास' ह्या म्हणीचें स्मरण येथें होतें. २. मरतां भंग चि [पावे]=वीर लढाईत मेला असतां पराजय व्हावयाचा हें निश्चितच आहे. हा पराजय त्या वीराचा नव्हे, तर त्याच्या पक्षाचा, असें समजलें पाहिजे. ३. अर्जुनाच्या म्हणण्याचा भाव असा, कीं मनुष्य जर जिवंत राहिला, तर आज नाहीं तरी उद्यां शत्रूला जिंकून विजय मिळविण्याचा संभव असतो. पण जर तो मेला, तर मरतांना जो त्याचा पराजय झाला तोच शाश्वत होतो व पुढें त्याला जय मिळविण्याची संधी मिळत नाहीं. म्हणून आतां उग्र अशा कर्णापुढें जाऊन मी जर मेलों, तर माझी पराजयाची अपकीर्तीच कायम राहील; पण आतां कर्णास चुकवून प्राणांचें रक्षण केल्यास प्रसंग पाहून आतां नाहीं तर मग तरी, कर्णास मारितां येईल. म्हणून सांप्रत कर्णाशीं युद्ध करण्याचा प्रसंग येऊं देऊं नको. ४. धर्म. ५. आश्वासन दे. ६. तेथून परतल्यानंतर. ७. धर्माकडे. ८. शय्या. 'विचित्र सेजा' म्हणण्याचें कारण या सेजा व्यवहारांतील साधारण सेजांप्रमाणें नव्हत्या, तर चमत्कारीक होत्या. कारण मोठमोठे वीर अस्ताव्यस्त रीतीनें त्या रणांगणांतील वेड्यावांकड्या प्रदेशावर मरून पडले होते, म्हणून रणांगणास 'विचित्र सेजा' असें म्हटलें आहे. या गीतीपासून तों ४७ व्या गीतीपर्यंतचें रणाचें वर्णन पंतांचेंच आहे. यास मुळांत कांहीं आधार नाहीं. ९. (या पडलेल्या वीरांना) घोर नसे, सावध (असतां) पलभुग्भुक्त हि जे भुलविलेसे [ते] धीर भटमणी युद्धश्रान्त [होऊन] अस्वप्नसुखार्थ सेजे पहुडले—असा अन्वय. म्हणजे—ह्या वीरांना कसलीच भीति वाटत नाहीं. शुद्धीवर असतांना मांसभक्षक पशुपक्ष्यांकडून खाल्ले जात असतांही [मद्य वगैरेंच्या] गुंगींत असल्याप्रमाणें स्वस्थ पडून असलेले हे युद्धांत थकलेले शूरवीर अस्वप्न म्हणजे देव त्यांचें सुख (स्वर्गसुख) मिळविण्याकरितां (युद्धांत देहभान विसरून लढत असतां मृत्यु आल्यामुळें) आपल्या शय्येवर (गीति ४३ मध्यें वर्णिलेल्या) पसरले आहेत. ह्या गीतींतील 'घोर'=घोररासन (कोल्हा) असा अर्थ समजून पुढीलप्रमाणें अर्थान्वय कोणी कोणी करितातः—[युद्धांत मेलेल्या वीरांच्या शवांचें मांस खाण्यांत गढून गेल्यामुळें] घोर (कोल्हा) सावध नसे (इतर व्यापाराकडे दृष्टि देत नाहीं); जे धीर भटमणी युद्धश्रांत [ते] पळभुग्भुक्त हि (जरी कोल्हे त्यांचें शरीर खात आहेत तरी) भुलविलेसे (मांत्रिकानें भूल घातल्याप्रमाणें) अस्वप्नसुखार्थ सेजे (शय्येवर) पहुडले (निजले)—असा अर्थान्वय. अस्वप्नसुखार्थ=स्वप्नांतील सौख्याप्रमाणें क्षणिक सौख्याकरितां नव्हे, तर शाश्वत

[1]युद्धश्रांत भटमणी [2]अस्वप्नसुखार्थ [3]पहुडले सेजे. ॥ ४४
हत हय गज नर शतशः, क्षतजनद्या [4]मांसकर्दम हि झाले, ।
चाले यांत हि [5]अविहतगति तव [6]रथ [7]पोटिंचें न जळ हाले. ॥ ४५
[8]समरसरीं फुलले भटपद्म नवे, अप्सरा [9]महामधुपी, ।
[10]स्वर्गोचित वपु [11]अभिनव जें त्याचें [12]कोणती न तें [13]मधु पी? ॥ ४६
[14]हरे ! हरे ! [15]नरवर खरतर [16]शरनिकरीं ओविले पहा शतशा, ।
या [17]माळा [18]क्षितिस जशा, मणि[19]माळा शोभविति [20]कधीं न तशा !' ॥ ४७

---

स्वर्गसौख्याकरितां. साधारण निजणारे स्वप्नसुखार्थ निजतात. पण हे त्या उद्देशानें निजले नव्हते—असा भाव. १०. पळ+भुक्+भुक्त=मांस+खाणारे+खाल्लेले=मांस खाणाऱ्या कोल्ह्यांनीं खाल्लें आहे ज्यांस असे. हें 'धीर' याचें विशेषण. ११. भुलविल्याप्रमाणें, मांत्रिकानें विस्मृतदेह केलें आहे ज्यांस असे.

१. युद्ध करून दमलेले. २. अस्वप्न+सुख+अर्थ=देव+सुख+करितां=देवांस मिळणारें सुख मिळावें म्हणून. ३. निजले. ४. मांसाचा चिखलही. ५. अकुंठितगति. 'चाले त्यांतहि अविहतगति तव रथ' असें पाठान्तर. ६. ही गीति **स्वभावोक्ती**चें उत्तम उदाहरण आहे. ७. 'फार शांतगतीनें' या अर्थी 'पोटांतलें पाणी न हालतां' अशी लोकोक्ति आहे. तिचें अनुकरण म्हणून **लोकोक्ति** अलंकार. ८. रणरूप सरोवरांत. समरसरीं नवे भटपद्म फुलले, अप्सरा (ह्या) महामधुपी [होत], त्यांचें (भटपद्मांचें) जें स्वर्गोचित अभिनव वपु तें मधु कोणती [मधुपी] न पी—असा अन्वय. येथें समरामध्यें उत्साहसंपन्न वीर लढतांना मेले, त्यांस दिव्य देह प्राप्त झाला व तो अप्सरांनीं आवडीनें उचलून नेला. यावर पंतांनीं सुरेख **परंपरितरूपक** केलें आहे. समर, वीर, दिव्यदेह व अप्सरा यांस क्रमानें तलाव, कमळें, मधु (मकरंद) व भ्रमरी असें गणलें आहे. ज्याप्रमाणें तळ्यांत फुललेल्या कमळांतील मध भ्रमरी मोठ्या आवडीनें सेविते, त्याप्रमाणें अप्सरांनीं वीरांस मरणोत्तर प्राप्त झालेले दिव्य देह मोठ्या प्रेमानें उचलून नेले—असा भावार्थ. 'समरसरीं फुललें भटपद्म नवें' असें पाठान्तर. 'पद्म' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आहे. ९. मोठ्या भ्रमरी. १०. स्वर्ग+उचित=स्वर्गी वास करण्यास योग्य असें. ११. नवीन; मेल्यानंतर वीरांस स्वर्गोचित जें दिव्य वपु प्राप्त झालें, त्यास 'अभिनव' वपु म्हटलें आहे. १२. कोणती महामधुपी स्वर्गोचित जें त्याचें अभिनव वपु तें न पी? (पिई, सर्वच पिती—हा भाव). यांत **परंपरितरूपक** सुरेख साधलें आहे. १३. शरीररूप मध. १४. खेदोद्गार. १५. नरश्रेष्ठ, उत्तम भट. १६. बाणांच्या समुदायानें. सुयांनीं फुलांचे हार ओंवितात, पण हे हार बाणांनीं ओंविलेले होते. १७. योद्ध्यांच्या शिरांच्या माळा. १८. पृथ्वीस. १९. रत्नांचे हार. २०. ह्या [नरवरांच्या] माळा क्षितिस (पृथ्वीस) जशा शोभविति, तशा मणिमाळा (रत्नांचे हार) [स्त्रियांस (?)] कधीं न शोभविती—असा अन्वय. नररुंडमाळांमुळें रणांगणाला जशी शोभा येते, तशी स्त्रियांनीं आपणास अनेक अलंकारांनीं भूषविलें तरी त्यांस येत नाहीं—असा भावार्थ.

प्रभुसीं[1] बोलत बोलत, रण देखत, निजनृपासि[2] शोधीत ।
भीमापासीं पावे[3], धैर्यें धर्माधिवेग[4] रोधीत. ॥ ४८
'आर्या[5]! राजा कोठें? बाधे तददर्शनें[6] चि भी[7] मातें.' ।
ऐसें पुसे धनंजय जातां चि महारणांत भीमातें. ॥ ४९
भीम म्हणे, 'ज्या[8] दुःसह[9] शाळींचा[10] मृदु हि कोंब-लेशें[11] तशा ।
धर्माच्या देहाला कर्णशरव्याळ[12] झोंबले शतशा. ॥ ५०
झाला बहु खंडिततनु[13], जैसा शरणागतार्थ[14] शिबिराजा[15]; ।
गेलों[16] फिरोनि, भाग्यें जीवंत असो; पहा, स्वशिबिरा जा.' ॥ ५१
पार्थ म्हणे, 'आर्या! त्वां शीघ्र पहावा नृपाळ तो; जावें. ।
तिमिरलयीं[17] विधुतें[18] रवि[19], तेंवि मज रिपुक्षयीं नियोजावें[20].' ॥ ५२
भीम म्हणे, 'मीं मागें एक हि पद या रणांत नेदीन[21], ।
मज रिपु म्हणतिल 'भ्याला,' अयशें[22] हि मळोनि, काळ[23] ने[24], दीन. ॥ ५३

---

१. कृष्णासीं. २. आपल्या राजास (धर्मास). ३. ह्या गीतींतील सर्व क्रियापदांचा कर्ता अर्जुन आहे. ४. धर्मासंबंधीं म्हणजे धर्म कोठें दिसत नाहीं, त्याचा घात झाला कीं काय, वगैरे विचारांच्या दुःखाचा वेग. ५. भीमा! वडील मंडळीस 'आर्य' ह्या शब्दानें संबोधीत असत. ६. तत्+अदर्शनें=त्या राजाच्या न दिसण्यानें. ७. भीति. ८. ज्या धर्माला. ९. ज्या [धर्मा] शाळींचा मृदु कोंबलेश हि दुःसह [असे]–असा अन्वय. १०. शाळीचा (भाताचा). ११. कोंबाचा थोडाही भाग, किंवा लेश कोंब=लहानसा कोंब. १२. व्याळ=साप. १३. ज्याचें शरीर जागजागीं जखमी झालेलें आहे, असा. १४. शरण आलेल्याचें रक्षण करण्याकरितां. शरण आलेल्या कपोताचें रक्षण करण्याकरितां शिबिराजानें कपोताचा पाठलाग करीत आलेल्या श्येनास आपल्या शरीरांतून मांस कापून दिलेल्या प्रसंगास उद्देशून ही भीमोक्ति आहे. (मागें गीति ३ वरील टीपा पहा). १५. जैसा शिबिराजा शरणागतार्थ [खंडित–तनु झाला, तैसा धर्मराजा] बहु खंडिततनु झाला–असा अन्वय. येथें धर्मराजा खंडिततनु होण्याचें कारण दर्शविणारें पद नाहीं. तें असावयास पाहिजे होतें. १६. धर्म युद्धांतून परत फिरला, तो सुदैवानें जिवंत असो–असा भाव. १७. अंधकारनाशाविषयीं. १८. चंद्राला. (सूर्य अस्तकालीं तमोनाश करण्याच्या कामावर चंद्राची योजना करितो तसें). १९. या उपमेंत अर्जुनानें तमोनाशाविषयीं जसा सूर्य, तसा शत्रुनाशाविषयीं भीम असें ध्वनित करून आपणास चंद्राची उपमा घेऊन आपल्यापेक्षां वडील भाऊ जो भीम, त्यापुढें विनय दाखविला आहे. २०. योजना करावी. २१. न देईन. २२. दीन (दीन मनुष्य, भित्रा मनुष्य) अयशें हि मळोनि (अपकीर्तिप्रद गोष्ट करूनही) काळ ने (वेळ काढतात)–भित्रे

वत्सा! महानुभावा! जा तूं चि, करूं नको चि आग्रह रे ! ।
ने याला; हय हाकीं, वांच सख्या ! वर्षशतक साग्र हरे !' ॥ ५४
पार्थ म्हणे, 'संशप्तकवीरांचें न करितां रणीं दमन, ।
आर्या ! अशक्य दिसतें माझें मनुजेश्वराकडे गमन.' ॥ ५५
भीम म्हणे, 'संशप्तक कौरव मज सर्व पांवले, जा गा ! ।
आहे निकट निज गदा, जगदाद्य दयाळु देव ही जागा.' ॥ ५६
पार्थ म्हणे, 'गोविंदा ! आयकिलें कीं ? समग्र कार्याचा ।
भर घेतला; पहा हो ! अद्भुत बाहुप्रताप आर्याचा.' ॥ ५७
हर्षे असें म्हणे त्या विजयाला देव कृष्ण, 'पथंकरितो ।
युक्त चि हें, हो धन वन परि त्यातें भस्म कृष्णपथ करितो.' ॥ ५८
भगवान् भीमासि म्हणे, 'दुष्कर कांहीं च बा ! नसे तूतें, ।

---

पळून जातात, अपयश स्वीकारतात व कसा तरी काळ कंठितात, पण मी तसा नाहीं-हा भाव. २३. वेळ. २४. नेतो.

१. अर्जुन भीमापेक्षां धाकटा म्हणून हें संबोधन. हा शब्द वात्सल्यद्योतक आहे. २. अत्यंत पराक्रमी. ३. रा० पराडकर यांच्या प्रतींत 'करू नको चि' असा पाठ आहे. ४. ह्या गीतीचें पूर्वार्ध अर्जुनास उद्देशून व उत्तरार्ध कृष्णास उद्देशून आहे. 'वांच सख्या ! वर्षशतक' असा भीमानें कृष्णास दिलेला आशीर्वाद प्रेममूलक समजावा. कारण कृष्ण हा देवच असल्यामुळें त्याला आशीर्वादाची गरज नाहीं. ५. अर्जुनाला. याला धर्मापाशीं ने-हा भाव. ६. शंभर वर्षे. ७. अग्रयुक्त, संपूर्ण. ८. हे कृष्णा. ९. मनुज+ईश्वर=राजा धर्म. १०. सर्व पावले, म्हणजे सर्व माझ्या स्वाधीन झाले. त्या सर्वांस पळून जाऊं न देतां मारण्याची जबाबदारी माझी. त्याकरितां तूं काळजी वाहूं नकोस-हा भाव. ११. जगदाद्य=जगाचें बीज, जगाचें आदिकारण. 'जगदाद्य' हें विशेषण 'निज गदा' ह्या शब्दाशीं मध्ययमक साधण्याकरितां योजिलेलें दिसतें. एरवीं त्याची विशेष आवश्यकता नव्हती. १२. जागृत. देवही जागा आहे म्हणजे त्याची कृपादृष्टी माझ्यावर आहे-हा भाव. ही गीति काव्यलिंगाचें उदाहरण. पूर्वोत्तरार्धांमध्यें कार्यकारणभाव आहे. गदा जवळ आहे व ईश्वर सहाय आहे म्हणून मी कौरवादिकांस जिंकीन-हा भाव. १३. भार. १४. भीमाचा. १५. पतकरितो, स्वीकारितो. पथकरितो हें युक्त चि=भीमानें येवढें मोठें काम आपल्या अंगावर घेतलें हें योग्यच केलें. १६. होवो, असो. १७. दाट अरण्य. हा अर्थांतरन्यास. प्रस्तुत स्थलीं सामान्य सिद्धांताचें विशेष सिद्धांतानें समर्थन केलें आहे. १८. अग्नि. (जो आपला पथ काळा करितो, जो मार्गांतील वस्तूंस जाळीत पुढें जातो तो). १९. कृष्ण.

रक्षो परमेश्वर तुज आमुचिया [1]रणसमुद्रसेतूतें.' ॥ ५९
ऐसें वदोनि हाकी [2]नाकीशध्येयपाद [3]वाहांतें, ।
जाय [4]नृपीं सोडाया [5]निजकरुणामृतरसप्रवाहांतें. ॥ ६०
शिबिरासि शीघ्र जाउनि [6]कृष्ण रथावरुनि उतरले क्षिप्र, ।
गेले हळूहळु नृपापासीं, [8]धनमानमति जसे विप्र. ॥ ६१
नमिले आधीं कृष्णें, मग पार्थें वंद्य पाद [9]रायाचे; ।
धर्में आदरिले [10]ते प्राणांहुनि अधिक [11]आदरायाचे. ॥ ६२
रवि [12]अश्विनीकुमारां, [13]इंद्रोपेंद्रांसि [14]कश्यपमहर्षी, ।
[15]भेटे कृष्णांतें नृप; न दुजा [16]त्यांसम, न [17]त्यां हि सम, [18]हर्षी. ॥ ६३

---

## अध्याय [19]चाळिसावा.

### (धर्मार्जुनसंवाद.)

वाटे धर्मासि असें, कीं मारुनि कर्ण, [20]विजय कळवाया ।
आले [21]नृसिंह [22]दोघे, मनिंचा [23]तद्भयमहेभ पळवाया. ॥ १

---

१. रणरूप समुद्राच्या सेतूतें (पुलास). समुद्रांतून तरून जाण्यास सेतु जसा उपयोगी, तसा तूं आम्हांस युद्धांतून तरून जाण्यास उपयोगी—असा भाव. २. नाकि+ईश+ध्येय+पाद= इंद्रादिक देवांनीं ध्यान करण्यास योग्य पाय ज्याचे तो (कृष्ण). ३. घोड्यांतें. ४. धर्माचे ठायीं. ५. धर्माविषयीं आपल्या मनांत जी करुणा आहे, ती पूर्ण व्यक्त करण्याकरितां. ६. उभय कृष्ण. ७. त्वरेनें. ८. धन आणि मान संपादन करण्याविषयीं ज्यांची मति असे. ९. धर्माचे. १०. कृष्णार्जुन. ११. आदरावयाचे, आदर करण्यास योग्य असे. १२. हे सूर्याचे पुत्र. १३. इंद्र आणि विष्णु यांस. १४. हा देवदानवांचा पिता. अदितीपासून यास इंद्र व उपेंद्र (वामन) हे झाले. १५. कर्ता 'नृप'. १६. धर्मासम. १७. कृष्णार्जुनांसमान. १८. हर्ष पावलेले. १९. पंतांनीं ह्या अध्यायांत संस्कृत महाभारतांतील कर्णपर्वाच्या ६६–६८ ह्या अध्यायांतील कथाभाग आणिला आहे. या तिन्ही अध्यायांत मिळून ९२ श्लोक (कांहीं अनुष्टुप् व कांहीं इतर) आहेत ते पंतांनीं ७७ गीतींत आणिले आहेत, म्हणजे या अध्यायांत पंतांनीं मुळांतलें वर्णन विशेष सोडिलें नाहीं व पदरचेंही विशेष जोडलें नाहीं. २०. कर्णास मारल्याबद्दलची विजयवार्ता. २१. पुरुषश्रेष्ठ किंवा नररूपी सिंह. हा दुसरा अर्थ घेतल्यास पुढील 'तद्भयमहेभ' शब्दासह हें परंपरितरूपक होईल. २२. कृष्णार्जुन. २३. तत्+भय+ महा+इभ=कर्णापासून प्राप्त झालेलें जें भय, तद्रूप प्रचंड गज.

त्यांतें [1]प्रमोदगद्गदवाचेनें गौरवी, [2]नव रचील ।
विधि अमृत तरि [3]तयासम [4]भूपोक्ति म्हणेन, तुच्छ [5]वरचील. ॥ २
"वा कृष्णा ! वा पार्था ! वांचा वत्सर शतोपरि [6]क्षेमी. ।
[7]वधिला कर्ण, बहु बरें. [8]न वदा परि जाणतों [9]परिक्षे मीं. ॥ ३
रामाचा प्रियशिष्य, प्रख्यात प्रबल, उग्र [10]अंतकसा, ।
[11]कुरुपतिशुकपविपंजर, त्याचा केला रणांत अंत कसा ? ॥ ४
[12]सुरतरु [13]अर्थिजनाचा, [14]निजमित्रचकोरचंद्र, [15]अहितांचा ।

---

१. आनंदभरित उच्चवाणीनें. २. विधि (ब्रह्मदेव) [जरी] नव अमृत रचील तरि भूपोक्ति (धर्मराजाचें भाषण) तयासम (त्या नवीन अमृताबरोबर) [होईल, असें मी–कवि–] म्हणेन; वरचील (वरकड, इतर सर्व पदार्थ) तुच्छ (धर्माच्या वचनाशीं तुलना करितां तुच्छ होत). **धर्मा**नें **कृष्णा**र्जुनांस अशा शब्दांनीं गौरविलें, कीं सांप्रतच्या स्वर्गातील अमृतास त्याची योग्यता येत नाहीं. जर ब्रह्मदेव याच्याही पेक्षां स्वादिष्ट असें नवीन अमृत उत्पन्न करील, तर **धर्मा**च्या वचनास त्याची उपमा देतां येईल. बाकी सर्व पदार्थ **धर्मा**च्या वचनाशीं तुलण्यास अयोग्य–हा भाव. ही गीति **संभावना** नामक अलंकाराचें उदाहरण आहे. 'संभावनं यदीत्थं स्यादित्यूहोऽन्यस्य सिद्धये.' असें झालें असतें तर असें होईल, अशी सतर्क कल्पना करणें यास **संभावना** असें म्हणतात. जसें:–जर शेष वक्ता असता, तर तुझ्या गुणांचें **वर्णन** झालें असतें; आत्याबाईला मिशा असत्या, तर तिला काका म्हटलें असतें. हा **संभावना**लंकार प्रस्तुत स्थलीं **व्यतिरेका**लंकारपर्यवसायी आहे. कारण 'धर्मोक्ति अमृतापेक्षां श्रेष्ठ'–असा कवीचा भाव आहे. ३. त्या नवीन अमृताबरोबर. ४. धर्माची प्रमोदगद्गदवाचा. ५. वरकड, इतर सर्व पदार्थ. 'वरचील' हा शब्द लक्षांत घेण्यासारखा आहे. यांत विशेषणाचे दोन प्रत्यय 'चा' व 'ईल' हे एकदम लागले आहेत. वरचा, खालचा, मागचा, पुढचा वगैरे व वरील, खालील, मागील, पुढील वगैरे स्वतंत्र रूपें आढळतात. परंतु येथें वर+चा+ईल=वरचील असें प्रत्ययद्वयघटित रूप केलें आहे. 'वरचील' हा शब्द **पं**तांच्या काव्यांत अन्यत्र योजिलेला आढळतो. (आदिपर्व, अध्याय५।१७१; गदापर्व, अध्याय १।६३; कर्णपर्व, अध्याय १२।१९). ६. खुशाल. ७. **कर्ण** वधिला [हें] बहु बरें [केलें]–असा अन्वय. ८. न वदा परि (ही **कर्ण**-वधाची बातमी जरी तुम्हीं मला सांगितली नाहीं, तरी) मीं परिक्षे जाणतों (त्याची खूण मला पटली. तुमच्या मुखावरील संतोषादि चिन्हांवरून विजय प्राप्त झाल्याची बातमी मला समजली–असा भाव). ९. परीक्षा=पारख, खूण. परिक्षे (परीक्षे=परीक्षेला) जाणतों–हा प्रयोग चिन्त्य आहे. १०. **यमा**प्रमाणें. ११. **दुर्योधन**रूप पोपटाला वज्राच्या पिंजऱ्यासारखा असा (कर्ण). अभेद्य संरक्षणकर्ता–असा भाव. १२. कल्पवृक्ष. १३. याचकांचा. शत्रूचे सद्गुण देखील वर्णन करून **धर्मा**नें आपलें अजातशत्रुत्व दाखविलें आहे. १४. त्याचे मित्र जे **दुर्योधना**दिरूप चकोर त्यांस चंद्र. **परंपरितरूपक** (समासांतर्गत). १५. शत्रूंचा.

यम आम्हां सकळांचा कैकयपांचाळचेदिसहितांचा.[1] ॥ ५
कर्ण कसा हो ! वधिला ? आलां क्षेमी; भले भले कवि[2] हो ! ।
सोमान्वयप्रताप[3] प्रेक्षुनियां दिवससोमसा[4] रवि[5] हो. ॥ ६
सांगों काय ? पहा हें वपु कर्णें तासिलें[6] कसें अ-कृपें; ।
भीष्में न, द्रोणें न, द्रौणीनें न, न नृपें[7], असें न[8] कृपें. ॥ ७
बहु धैर्य धरुनि त्यासीं म्यां केलें शुद्ध युद्ध जरि, तरि तें ।
असम चि तैसें, जैसें समरीं पाचारिलें गजें हरितें ॥ ८
युयुधानादि समस्त हि जिंकुनि करि विरथ मज रणीं कर्ण; ।
झालें[9] जें तच्छ्रवणें[10] माझे चि कढोत, न तुमचे, कर्ण[11]. ॥ ९
युद्धांत वांचलों हा भीमाचा चि प्रभाव; भावानें[12] ।
भावानें[13] युद्धीं वपु भागविलें[14] मत्परस्वभावानें[15]. ॥ १०
मरतों तरि यश होतें; मरणीं[16] धाकें पळे तया पशुची ।

---

१. कैकयपांचाळचेदिसहितांचा आम्हां अहितांचा सकळांचा यम–असा अन्वय. हा उल्लेखालंकार. कारण प्रस्तुत स्थलीं एकाच वस्तूचें (कर्णाचें) निमित्तवशात् अनेकांकडून अनेकप्रकारक ग्रहण वर्णिलेलें आहे. २. श्रेष्ठ हो. ३. सोम+अन्वय+प्रताप=चंद्राचे वंशाचा तेजोविशेष. ४. दिवसाच्या चंद्रासारखा. (तेजोहीन–असा भावार्थ). ५. सूर्याचा मुलगा कर्ण व चंद्रवंशोत्पन्न अर्जुन. अर्जुनानें कर्णास मारिलें. तेव्हां सूर्य निस्तेज होईल–हा भाव. ६. (बाणांनीं) आच्छादिलें. (तक्ष्=आच्छादन करणें). ७. दुर्योधनानें. ८. न तासिलें–असा अन्वय. ९. झालें, घडलें. कर्णाशीं लढतांना मला जें कांहीं घडलें (माझ्यावर जी आपत्ति कोसळली) [त्याविषयीं सविस्तर हकिकत जर मी तुम्हांला सांगितली तर] तें ऐकून तुमचे कान दुःखी न होवोत. माझे कान दुःखी झाले आहेत तेवढे पुरेत–असा अर्थ. पण हा अर्थ वस्तुस्थितीच्या विरुद्ध आहे. कारण धर्माला स्वतःला जें घडलें, तें त्यानें प्रत्यक्षच अनुभविलें होतें तें त्यानें नुसतें ऐकिलें नव्हतें. तेव्हां युद्धांतील वृत्तांताचें श्रवण धर्माला घडण्याचें कारण नाहीं. येथें 'बोले जे' असा पाठ आहे, तो सुसंगत आहे. कारण कर्णाचें भाषण धर्मानें ऐकिलें होतेंच. (मागें अध्याय ३८।४३–४४ पद्य). पण पंतलिखित प्रतींत 'जालें' असा पाठ आहे. तोच आम्ही मुळांत ठेविला आहे. बोले=जे दुःसह शब्द कर्ण मला बोले–असा अर्थ. १०. तत्+श्रवणें=त्याच्या ऐकण्यानें. ११. कान. १२. बंधूनें. दामयमक. १३. भक्तीनें, श्रद्धेनें. १४. शिणविलें. १५. मत्परायण स्वभाव ज्याचा अशा [भीमानें]. माझ्या सेवेंत असणें हाच ज्याचा नैसर्गिक गुण त्यानें–असा भाव. १६. मरणास भिऊन पळून जाणाऱ्या पशूसारखी माझी अवस्था झाली–असा भाव.

गति घडली मज. पापी मीं तापास्पद[१]; सदा[२] अताप[३] शुची[४]. ॥ ११
तें चि वृषीं आलें जें होतें अत्युग्र तेज बा! रामीं[५], ।
न[६] भयें निजलों, वत्सर हा एक, वनांत ते हि बारा मीं ॥ १२
विश्व ब्रह्ममय बुधा[७], कर्णमय मला[८] हि; अब्द तेरा मीं ।
तप्त चि राक्षससा[९]; परि[१०] मेले झाले चि राम[११] ते[१२] रामीं. ॥ १३
शयनासनाशन[१३]–स्थिति[१४]–गति[१५] जें जें कर्म, कर्ण तो यांत[१६] ।
दिसतो; बहु काय वदों? पाहुनि होतों विवर्ण[१७] तोयांत[१८]. ॥ १४
तेणें[१९] केली माझी, अरिची हि न, दुर्दशा, अहा[२०]! बा! हो[२१]. ।
वधिला असा हि दारुण[२२]; धन्य त्रिजगांत तूं महाबाहो! ॥ १५
सांग कसा वधिला त्वां? धरिला संकोच[२३] फार कां? टाकीं, ।

---

१. दुःखास पात्र. २. जो मनुष्य तापरहित (दुःखी नाहीं असा) तो नेहमीं निष्पापी. मी तापास्पद; तस्मात् पापी. जो तापरहित तो पापरहित. तसा मी नव्हे–हा भाव. ३. तापरहित, दुःखहीन. ४. निष्पाप. ५. कर्णाचा जो गुरु परशुराम त्याचे ठायीं. ६. मीं [त्या कर्णाच्या] भयें वनांत ते हि बारा [वर्षें] (अरण्यवासाचीं बारा वर्षें) [व] हा एक वत्सर [अशीं तेरा वर्षें] न निजलों–असा अन्वय. ७. शहाण्या मनुष्यास. ८. मला हि विश्व कर्णमय–असा अन्वय. ९. राक्षससा मीं तेरा अब्द तप्त चि–असा अन्वय. राक्षसांस जसा ध्यानींमनीं रामच दिसत होता, तसा कर्ण मला तेरा वर्षेंपर्यंत जेथें तेथें दिसत होता–हा भाव. 'तैसाचि राक्षसापरि' असा पाठभेद आहे. १०. रामास राक्षस, त्याप्रमाणें मी कर्णास भीत होतों. ते राक्षस रामाच्या हातून मरून रामरूप तरी झाले, पण मी मात्र कर्णाच्या हातून न मरतां तसाच राहिलों आहें. हा **व्यतिरेकालंकार.** ११. रामीं राम झाले=मेले, रामरूपीं विलीन झाले, लया पावले. १२. राक्षस. १३. शयन+आसन+अशन=निद्रा+उपवेशन+भोजन. (झोंपेंत, स्वस्थ बसून असतांना व भोजन करतांना). १४. स्थिरता. १५. चलनवलन. १६. जें जें कर्म [मी करीं] यांत (त्यांत, त्या कर्मांत) तो कर्ण दिसतो–असा अन्वय व अर्थ. प्रस्तुत स्थलीं 'त्यांत' बद्दल यमकाकरितां 'यांत' हें पद योजिलें आहे. १७. भयग्रस्त. १८. पाण्यांत. तोयांत [कर्णा] पाहुनि [मी] विवर्ण होतों–असा अन्वय. निजतां, बसतां, उठतां इत्यादि कोणतेंही कर्म करीत असतांना मला कर्ण दिसतो. यामुळें कोणतेंच काम मला सुचत नाहीं. मनुष्याला जगण्याकरितां निदान पाणी पिणें तरी जरूर आहे. परंतु पाणी पितांना सुद्धां त्यांत मला कर्ण दिसतो व त्यामुळें मी अत्यंत त्रस्त होतों–असा भावार्थ. १९. तेणें (त्या कर्णानें) [जी] माझी दुर्दशा केली [ती दुर्दशा] अरिची हि (शत्रुची देखील) न हो (शत्रुला देखील तशी दुर्दशा प्राप्त होऊं नये.)–असा अन्वय व अर्थ. २०. खेदोद्गार. २१. होवो. २२. भयंकर (कर्ण). २३. कर्णास न मारिल्यामुळें अर्जुन धर्माच्या वचनास 'हुं'कार देत नव्हता म्हणून धर्माचें हें वचन.

वांचविलें उद्धरिला मद्धृदयांतील कर्ण–कांटा कीं. ॥ १६
अस्त्रीं राम चि साक्षात्, शक्र बळीं, यम चि विक्रमीं कर्ण, ।
वधिला कैसा ? वद; त्या वृत्तसुधेनें भरीन मीं कर्ण. ॥ १७
मारील अर्जुनाला जयशाली हा सुयोध नेमानें, ।
या भावें सर्वस्वें पूजियला [11]जो सुयोधनें मानें; ॥ १८
[13]धृतराष्ट्र हि ज्या मानी पुत्र चि, न निजा [14]सु-संग-रहिताला; ।
दे अंगदेशराज्य हि राधेयाला [15]सु-संगर-हिताला; ॥ १९
त्याचें मुकुटालंकृत शिर [16]तत्सुहृदांसमक्ष समरांत, ।
छेदुनि झालासि कसा विजयी ? वृत्रघ्न जेंवि अमरांत. ॥ २०
'[18]अर्जुन दाविल त्याला देइन गज षट्ट गवादि जें इष्ट.' ।
ऐसें म्हणे, रणीं तो केला कीं त्वां शरोत्करें पिष्ट ? ॥ २१
'मीं पार्थ वधीन' म्हणे, [22]दे नित्य सुयोधनासि [23]सुखराशी; ।
वधिलें कीं [24]धर्ममृगव्याधा राधासुतासि [25]मुखराशी ? ॥ २२
'[26]पादौ न धावयिष्ये पार्थे जीवत्यहं कदापी'ति ।

---

१. मला वांचविलें. २. काढिला. ३. मत्+हृदयांतील=माझ्या हृदयांतील. ४. अस्त्रप्रयोगाविषयीं. उल्लेखालंकार. ५. दाशरथीराम किंवा भार्गवराम. हे दोघेही अस्त्रांविषयीं प्रख्यात होते. ६. वृत्तांतरूपी अमृतानें. ७. कान. ८. विजयी, शत्रूस जिंकणारा. ९. चांगला योध, उत्तम वीर (कर्ण). १०. न चुकतां, खातरीनें. ११. कर्ण. १२. अंगराज्यादि देऊन मोठ्या सम्मानानें. १३. अन्वय व अर्थ:–ज्या [कर्णाला] धृतराष्ट्र हि पुत्र चि मानी; [धृतराष्ट्र] सुसंगरहिताला निजा (आपल्या) [पुत्राला] (दुर्योधनाला) [पुत्र] न (मानी). धृतराष्ट्र कर्णास पुत्र मानीत होता; दुर्योधनास पुत्र मानीत नव्हता. कर्णावर दुर्योधनापेक्षांही अधिक प्रीति करीत होता–हा भाव. १४. सु+संग+रहित=साधुसंगतिरहित दुर्योधनाला. १५. सुसंगर+हिताला=समरांगणीं हितकर्त्या (कर्णाला). किंवा सुसंगर (युद्धच) हित आहे ज्याला अशा (कर्णाला). युद्धप्रिय कर्णाला–असा भाव. १६. त्याच्या इष्टबांधवांसमक्ष. १७. वृत्र+घ्न=वृत्रासुराचा वधकर्ता (इंद्र). १८. हें कर्णाचें म्हणणें. (मागें अध्याय २६ गीति ४–२० पहा). १९. गौ+आदि=गाई, बैल वगैरे. २०. शर+उत्कर=शरसमूहानें. उत्कर=रास. २१. पीठ. २२. ह्या गीतींत जो व तो हे दोन्ही शब्द अध्याहृत आहेत. २३. सुखाची रास; पुष्कळ सौख्य. २४. धर्मरूप मृगाचा पारधी जो कर्ण, त्यास. २५. बडबड्याला. २६. पादौ न धावयिष्ये पार्थे जीवति अहं कदापि इति=पार्थ जिवंत आहे तोंपर्यंत मी कदापि पाय धुणार नाहीं अशी.

[1]ज्याची [2]व्रतप्रतिज्ञा दुर्जन मानुनि सुधा सदा पीती. ॥ २३
[3]कृष्णेसि सभेंत [4]म्हणे, 'या दुर्बळ-[5]पतितसत्वहीनांतें, ।
दीनांतें त्यजिसि न कां दृढ[6]दुःखव्यसनजाळमीनांतें ?' ॥ २४

तेव्हां आम्ही गमलों ज्या [7]मदपात्रास [8]दास, दासी [9]ते; ।
ऐकवि वाणी जो, [10]दशमुख जैसा [11]त्रासदा सदा सीते. ॥ २५
'अर्जुन वधिल्यावांचुनि मीं मागें न परतेन' अशि वाचा, ।
जो वदला, वत्सा! त्वां वध [12]केलों कीं तया चि [13]अशिवाचा? ॥ २६
[14]वामाक्षिभुजस्फुरणें [15]संकट कळलें असेल तरि च रणीं, ।
धावोनि कर्ण वधिला; बहु सावध तूं चि [16]आर्यपरिचरणीं. ॥ २७
त्या संकटीं [17]तुझें म्यां सरण, [18]प्रभुचें [19]गजें तसें, केलें, ।

---

१. 'उक्ति मृषा केली कीं, जीस म्हणति खल सुधा सदा पीती' असाही पाठ आहे. २. पादधावन न करण्याच्या व्रतासंबंधाची प्रतिज्ञा. येथें 'वधप्रतिज्ञा' असा पाठ आहे, तो स्वीकारल्यास (वरच्या अर्धातील) ज्याची अर्जुनवधाविषयींची प्रतिज्ञा, दुर्योधनादिक दुर्जन अमृत समजून पीत होते—हा अर्थ. ३. द्रौपदीस. ४. याचा कर्ता 'जो कर्ण'. ५. बलविहीन. दास झाले म्हणून क्षत्रिय—कुलापासून पतित व क्षात्रतेजोविहीन असे तुझे जे पति पांडव त्यांस. ६. अत्यंत दुःख आहे ज्यांत अशा संकटरूपी जाळ्यांतील मासेच अशांस. ७. मदोन्मत्तास. मद+पात्र=गर्वाचें ठिकाण, गर्वाचा राशी. ८. आम्ही दास गमलों [व] ते (द्रौपदी) दासी गमली—असा अन्वय. ९. द्रौपदी. (पंतकृत सभापर्व, अध्याय ६ गीति १५—२२ पहा). १०. रावण. जैसा दशमुख सीते (सीतेला) सदा त्रासदा वाणी ऐकवि [तैसा] जो (कर्ण) [द्रौपदीला त्रासदा वाणी ऐकवि]—असा अन्वय. ११. त्रास देणारी अशी. १२. तया (त्या) अशिवाचा त्वां वध केला चि कीं? (केलास ना?)—असा अन्वय. १३. अशुभप्रद अशा कर्णाचा. १४. डाव्या डोळ्याच्या व भुजेच्या स्फुरणानें. तुझ्या वामाक्षिभुजस्फुरणानें माझ्या-वरचें संकट तुला कळलें व त्या कोपानें कर्णाचा त्वां वध केला—हा भाव. पुरुषांचा दक्षिणाक्षि (उजवा डोळा) स्फुरण पावणें शुभसूचक व वामाक्षि (डावा डोळा) लवणें अशुभसूचक आहे—अशी समजूत आहे, तीस अनुसरून हें भाषण आहे—'अंग—विस्फुरणं नृणां दक्षिणं सर्वकामदम्। तदेव शस्यते सद्भिर्नारीणामप्रदक्षिणम्') (मुहूर्तमाला). १५. माझ्यावर आलेलें संकट, कर्णानें माझी जी दुर्दशा केली तें. १६. वडिलांच्या सेवेविषयीं. १७. हें धर्माचें वाक्य कृष्णास उद्देशून आहे. १८. विष्णूचें. १९. प्रस्तुत स्थलीं भागवतांतील 'गजेंद्रमोक्ष' या कथेकडे कविकटाक्ष आहे. ती कथा अशीः—इंद्रद्युम्न नांवाचा पांड्यदेशाचा राजा अगस्त्यऋषीच्या शापानें गजयोनी पावला. हा गजराज एकदां एका तटाकांत पाणी पिण्याकरितां गेला असतां एका नक्रानें त्याचा पाय धरिला. हत्ती व नक्र यांचें मोठें युद्ध झालें. पण नक्र पाण्यांत असल्या-

बा कृष्णा! भीरुकृत[1] हि सफळ चि, न ध्यान तें वृथा गेलें. ॥ २८

जो सर्वगर्वपर्वत[2], हरि! आम्हां षंढतिल[3] म्हणे, हांसे, ।
कंठांत घातले कीं त्याच्या काळें तुझ्या बळें फांसे[4]? ॥ २९

कुरुगुरु शांतनव[5] प्रभु 'अधिरथ[6]' म्हणे, म्हणोनि जो त्यासीं ।
स्पर्धा करि, हंसासीं बकसा, कीं जेंवि कांच[7] मोत्यासीं. ॥ ३०

मज दुःसह दीर्णहृदयकुंडींचा[8] कोपवह्नि कंपा[9] दे; ।
याचा उपशम[10] वृषवधवृत्तांतजलाविना[11] न संपादे[12]." ॥ ३१

इत्यादि धर्मवाक्यें ऐकोनि म्हणे जय[13], 'प्रभो! परिसा. ।
संशप्तकांसि मारित असतां, दैत्यांसि संगरीं हरिसा; ॥ ३२

तों ये द्रौणि महात्मा[14], मज कृष्णाला हि घाबरें चि करी; ।
मग म्यां तो हि पळविला, सिंहें विक्षत[15] करूनि जेंवि करी[16]. ॥ ३३

द्रौणिपराभवकाळीं म्यां कौरवसैन्य फार आटविलें; ।
दुर्योधनादिकांला 'सर्व हि मेलों' असें चि वाटविलें. ॥ ३४

स्वबलक्षय[17] अवलोकुनि मजवरि ये कर्ण, कोपला[18] भवसा[19]; ।
अस्त्राग्नीनें जाळी असत्कटका[20], जसा शिखी[21] यवसा[22]. ॥ ३५

---

मुळें त्याचाच जोर विशेष झाला. शेवटीं निरुपाय होऊन गजेंद्र विष्णूस शरण गेला व विष्णूनें आपल्या चक्रानें नक्रास मारून याला सोडविलें.

१. भित्र्यानें केलेलेंही. २. सर्व गर्वाचा पर्वत; अत्यंत गर्विष्ठ. ३. नपुंसक. तिळांत जो पोंचट तीळ असतो, त्यास 'षंढतिल' म्हणतात. (पंतकृत सभापर्व, अध्याय ७ गीति ९ पहा). ४. तुझ्या बळें (तुझ्या पराक्रमाच्या योगानें) त्याच्या (कर्णाच्या) कंठांत काळें (यमानें) फांसे (पाश) घातले कीं? (घातले ना?)—असा अन्वय. ५. भीष्म. ६. आपल्यापेक्षां कमी प्रतीच्या योध्याशीं लढणारा. ७. कांचेची हिऱ्याशीं किंवा रत्नाशीं तुलना—असा प्रयोग भाषणांत योजितात. (क्रय–विक्रयवेलायां काचः काचो मणिर्मणिः ।). ८. पेटलेल्या हृदयरूपी कुंडांतील. ९. कंप देणें हें अग्नीचें कार्य नसून थंडीचें आहे. पण राग अनावर झाला म्हणजे रागानें मनुष्य थरथर कांपूं लागतो, हें सर्वांस माहीतच आहे. १०. शांति, तापाची शांति. ११. कर्ण-मरणवृत्तांतरूप उदकावांचून. १२. होई. १३. अर्जुन. १४. गुरुपुत्राविषयीं आदरबुद्धीनें हा शब्द वापरला आहे. १५. विशेष क्षत, फार घायाळ. १६. हत्ती. १७. आपल्या सैन्याचा नाश. १८. कोपलेल्या. १९. शिवासारखा. २०. आपल्या (पांडवांच्या) सैन्याला. २१. अग्नि. २२. तृणाला. यवस=तृण, गवत.

प्रथम तुज द्रौणीनें, मग कर्णें, पीडिलें असें कळलें; ।
बहु पाहतां हि न तव [1]ध्वजचिन्ह रणांगणांत आढळलें. ॥ ३६
[2]त्वद्दर्शनार्थ झालें मन बहु उद्विग्न आमुचें, न [3]टिके; ।
[4]प्रभुकुशलवृत्त न कळे; वाटे, करितों प्रयास कां [5]लटिके ? ॥ ३७
कर्ण हि [6]महास्त्रतेजें दुःसह [7]कल्पार्कसा पहावेना; ।
रुद्रापुढें [8]टिकों ये, परि पळभरि [9]त्यापुढें रहावेना. ॥ ३८
मज कर्ण [10]अशुभदर्शन, [11]पथिका [12]अहि जेंवि सुप्रकट काळा; ।
टाळा ज्यां त्यासि दिला, [13]काळा [14]बुध देति जेंवि [15]फटकाळा. ॥ ३९
आर्या ! आधीं आलों अवलोकाया तुझीं [16]पदांबुरुहें; ।
सर्वां कार्यांमध्यें प्रथम उचित कार्य सेवकां [17]गुरु [18]हें. ॥ ४०
यावरि गांठि [19]पडावी, मारीन चि [20]त्या तशा हि उग्रास. ।
[21]क्षुधित [22]मदीय शरभुजंग मिळतां गिळितील कां न सुग्रास ? ॥ ४१
चाल, रथीं बैस विभो ! ये [23]अभिनववृत्रवध पहायास; ।
[24]गुरु–सन्निधान असतां न लगे [25]तन्मारणीं [26]महायास. ॥ ४२
आजि सपुत्र सबांधव कर्ण न वधितां घडो [27]अधःपतन; ।
जतन करीं [28]पण [29]आशीर्वादें, बुध रक्षिती जसें [30]वतन. ॥ ४३

---

१. झेंड्याची खूण. २. त्वत्+दर्शन+अर्थ=तुझ्या दर्शनास्तव. ३. युद्धांत टिके न, तुला पाहिल्यावांचून युद्धांत रहावेना. ४. राजा कुशल आहे, अशी खातरी न होतां युद्ध करीत राहाणें व्यर्थ होय–हा भाव. ५. खोटे, व्यर्थ, निरुपयोगी. ६. भार्गवास्त्राच्या प्रभावानें. ७. प्रलयकालच्या सूर्याप्रमाणें. ८. टिकों ये=टिकतां येईल, टिकणें शक्य आहे. ९. कर्णापुढें. १०. अपशकुनदर्शक आहे दर्शन ज्याचें असा. ११. वाटसरूस. १२. सर्प. सुप्रकट (स्पष्ट दिसणारा, प्रचंड) काळा अहि–असा अन्वय. १३. यमास. १४. शहाणे, ज्ञानीजन, योगी. योगी मृत्यूस चुकवितात, या समजुतीस उद्देशून हें वाक्य आहे. १५. दांडग्या, दुर्धर. हें 'काळा'चें विशेषण. १६. पादकमलें. १७. मुख्य, महत्वाचें. १८. हें=हें काम, राजा कुशल आहे हें पाहणें. १९. आतां गांठ पडूं दे म्हणजे. २०. कर्णास. २१. भुकेलेले. २२. माझे शररूप सर्प. २३. नवीन वृत्रासुराचा वध. पूर्वी इंद्रानें वृत्राचा वध केला. आतां कर्ण हा नवीन वृत्र आहे त्याचा मी वध करितों. तस्मात् मी इंद्राप्रमाणें शूर आहें, असें अर्जुनानें 'अभिनववृत्र-वध'शब्दानें सुचविलें आहे. २४. गुरूचें सांनिध्य (जवळ असणें). २५. त्या कर्णाला मारण्याविषयीं. २६. महा+आयास=मोठे कष्ट, मोठी दगदग. २७. नरकवास. २८. कर्णास मारीन हा पण (प्रतिज्ञा). २९. आशीर्वादें (तुझ्या आशीर्वादें) पण (कर्णवधाविषयींचा पण) जतून

आर्या ! आज्ञा मज दे, ठेवूं दे स्वपदपंकजीं माथा; ।
न[१] रिपु[२]पिपीलिककटकें[३] भक्षावा भीम[४]भुजग भू[५]नाथा !' ॥ ४४
कर्ण[६] असे[६], हें कळतां, जिष्णुकडे वक्र[७]दृष्टिनें पाहे; ।
क्षतजप्रतिमाक्ष[८] क्षितिनाथ क्षण न क्षमावशीं[९] राहे. ॥ ४५
राजा[१०] म्हणे, "अहा रे ! बापा ! या[११] पाददर्शनाकरितां ।
व्यसनीं भीम त्यजिला, सांपडला[१२] ही उपेक्षिला अरि[१३] तां[१४]. ॥ ४६
व्यसनीं बंधु त्यजिला, वृथा पृथा[१५]कुक्षिमाजि आलासी; ।
राधेयातें पाहुनि, विमुख क्लीबा ! रणांत झालासी. ॥ ४७
'कर्ण वधीन' असा त्वां द्वैतवनीं[१६] मजसमीप पण केला; ।
तो[१७] आजि[१८] आजिमाजि[१९] त्यजितां पुरुषार्थ तव वृथा गेला. ॥ ४८

---

(संरक्षण, सिद्धीला नेणें) करीं; [कोणत्या प्रकारें ? तर] जसें बुध (शहाणे लोक) वतन रक्षिती. ३०. 'वतन'शब्द मूळचा आरबी भाषेंतला. याचा मूळचा अर्थ मनुष्याची जन्मभूमि, राहण्याची कायमची जागा. प्रस्तुत त्याचा पूर्वार्जित माल किंवा वंशपरंपरेनें चालणारा हक्क–असा अर्थ होतो. जसें:–इनाम जमिनीचें वतन, देशमुखीचें वतन—इत्यादि. 'मिरास' शब्दही याच अर्थी वापरतात. अनुरूप गीत्यर्धः—करिति जतन वतन, पतन मत न भल्याला, तथापि तें वरिती । (सभापर्व, अध्याय १।६०).

१. हें द्वितीयार्ध 'मला लौकर जाऊं दे' या अर्धाच्या पहिल्या अर्धाचें कारण होय. म्हणून **काव्यलिंग** अलंकार. २. शत्रुरूप मुंगळ्यांच्या सैन्यानें. पिपीलिका=मुंगळा; पिपीलक=मोठा काळा मुंगळा. ३. शेंकडों मुंगळे व मुंग्या मिळून सर्पास मारितात, हें प्रसिद्ध आहे. म्हणून यां **परंपरितरूपका**चा प्रसंग. ४. **भीम**रूप सर्प. ५. हे पृथ्वीपते धर्मा ! ६. कर्ण जीवंत आहे. ७. कोपदृष्टीनें. ८. क्षतज+प्रतिम+अक्ष=रक्त+सारखे+नेत्र=आरक्त नेत्र झाले आहेत ज्याचे, असा (धर्म). ९. क्षमेच्या स्वाधीन, शांत–असा भाव. प्रस्तुत गीत्यर्धांत '**क्ष**' या अक्षराची पांच वेळां आवृत्ति झाली आहे. म्हणून हा **अनुप्रास**चमत्कार. पण '**क्ष**'काराची आवृत्ति विशेष कर्णप्रिय आहे, असें नाहीं. १०. **धर्म**. ११. 'माझ्या दर्शनाकरितां' असें न म्हणतां 'या पाददर्शनाकरितां' असें म्हणणें औपरोधिक होय. यांत राग व उपहास यांचें मिश्रण आहे. १२. सांपडलेलाही, सांपडला असतांही. व्यसनीं **भीमा**चें रक्षण करणें व **कर्णा**स मारणें हीं दोन्ही कामें पाददर्शनापेक्षां अधिक महत्वाचीं होत–हा **धर्मा**चा भाव. १३. **कर्ण**. १४. त्वां (अर्जुनानें). (मागें पृष्ठ १२२ टीप १३ पहा). १५. **कुंती**च्या उदरीं. अरे रे ! धिक्कार असो तुला, तूं भीमाचा सख्खा भाऊ उगाच झालास–असा भावार्थ. १६. द्वैतवनांत, अर्थात् अरण्यवाससमयीं. १७. **कर्ण**. १८. आजच्या दिवशीं. प्रस्तुत अर्धात '**आजि**–**आजि** मा**जि**–त्य**जि**' अशी एका अक्षराच्या अंतरानें '**जि**'ची चार वेळां आवृत्ति झाली आहे म्हणून **अश्वधाटीयमक**. १९. युद्धांत.

भ्यालासि [1]आधिरथिला, सिंहाला मृग तसा, पळालासी; ।
[2]पंचममासीं च न कां पृथोदरांतूनि तूं गळालासी ? ॥ ४९
जरि म्हणसील, 'असा म्यां कार्याचा घेतला चि न पथकर,' ।
तरि [3]सर्वस्वप्राणाधिकदयितमुकुंदपादशपथ कर. ॥ ५०
पण न करतासि तरि कां शिरतों या संकटांत ? घात कसा ।
[4]केलासि बहु भरवसा देउनि ? हा ! न कळलासि घातकसा. ॥ ५१
विश्वासघात केला, [5]त्यजिलें आणूनि शत्रुभूपांत; ।
त्वां दोर कापिला, कीं आम्हां घालूनि [6]अंधकूपांत. ॥ ५२
होता फार भरवसा तेरा वर्षें तुझा चि[7] कीं अहितें ।
कर्णे छळिलें, त्यातें वधिशील रणीं, [8]शिखी जसा [9]अहितें. ॥ ५३
तें सकळ विफळ झालें, कीं [10]वंध्यद्रुम [11]उपासिला; [12]चुकलों; ।
[13]थुकलों न [14]राज्यरुचिवरि; [15]विषयप्रेमें [16]महासुखा मुकलों. ॥ ५४
जेव्हां [17]शतशृंगनगीं प्रसवलि तुज [18]पांडुची पृथा राणी, ।

---

१. कर्णाला. २. पांचव्या महिन्यांतच. येथें पूर्वीच्या महिन्यांचा उल्लेख न करण्याचें कारण असें दिसतें कीं, पांच महिने पूर्ण होईपर्यंत गर्भाला व्यक्त स्वरूप आलेलें नसतें. ३. सर्वांपेक्षां व प्राणांपेक्षां अधिक असा जो प्रियमित्र कृष्ण, त्याच्या पायांची शपथ. दयित=प्रियमित्र. ४. 'केला बहुत भरंवसा देउनि' असें पाठान्तर. ५. मला सोडिलें. ६. अंधाऱ्या (फार खोल) विहिरींत. ७. 'चि' हें पद कोणत्या शब्दाशीं अन्वित करावें हा प्रश्न आहे. तुझा चि—असा अन्वय केल्यास इतरांचा भरंवसा नव्हता असें सूचित होतें. अर्थात् इतरांनीं मोठी कामगिरी केली, पण तुझ्या हातून कांहींच कामगिरी झाली नाहीं—असा भावार्थ. फार चि—असा अन्वय घेतल्यास पुष्कळ भरंवसा असून त्याला साजेशी कामगिरी तूं केली नाहींस—असा भावार्थ. ह्या गीतीच्या पूर्वींच्या ७।८ गीति पाहिल्यास तेथें 'तुझें वर्तन भरंवशानुरूप झालें नाहीं' असें स्पष्ट दिसून येतें. यावरून 'फार चि' हा अन्वय योग्य दिसतो. ८. मोर. ९. सर्पाला. १०. ज्यास फळें येत नाहींत असा वृक्ष. ११. इष्टसिद्धीकरितां सेवा केली किंवा फळाच्या इच्छेनें झाड वाढविलें. हा **निदर्शनालंकार.** कारण वंध्यद्रुम उपासणें व कर्णवधाकरितां अर्जुनाचा भरंवसा धरणें सारखेंच आहे, असें 'कीं' शब्दानें स्पष्ट होत आहे. १२. तुझ्यावर विश्वास ठेविला ही चूक झाली—असा भाव. १३. थुकलों न=त्याज्य समजलों नाहीं, त्याग केला नाहीं. १४. राज्याकांक्षेवर. रुचि=गोडी, स्पृहा, अत्यासक्ति. १५. ऐहिक सुखाच्या इच्छेनें. १६. मोठ्या सुखास. १७. शतशृंग (शंभर शिखरें आहेत ज्याला) नामक पर्वत. शतशृंग पर्वत हा हिमालयाचें शिखरविशेष व पांडवांचें जन्मस्थान. राज्य सोडून वानप्रस्थ स्वीकारिल्यावर पांडुराजा तेथें स्त्रियांसहवर्तमान राहत होता. (पंतकृत आदिपर्व, अध्याय १८ पहा). १८. पांडूची राणी पृथा—असा अन्वय.

तेव्हां सप्तम दिवसीं झाली उच्चैस्तरां[1] नभोवाणी,[2] ॥ ५५
'देवि पृथे! तव सुत हा सूर[3], इतर सर्व शूर नक्षत्रें[4]; ।
याचा क्षण हि पराभव करिजेल[5] रणीं कदापि न क्षत्रें[6]. ॥ ५६
हा पांडव खांडववनदाहीं[7] जिंकील देवसैन्यांतें[8]; ।
याच्या द्वेषें[9] सर्व[10] हि भूतें वरितील दीर्घदैन्यांतें[11]. ॥ ५७
केकयमद्रकलिंगप्रमुखांचें यश हरील; कुरुनिधन[12] ।
हा चि करिल; जतन[13] करीं, बहु रक्षीं, कृपण जेंवि पुरुनि धन. ॥ ५८
'यासम[14] हा चि धनुर्धर' म्हणतां उपमन्युसुरतरु[15] रुसेना[16]; ।
रण विसरतिल रिपुचमू, जेंवि हरिसमक्ष[17] सुरत[18] रुरुसेना[19]. ॥ ५९
इच्छील तरि समस्तां भूतांतें वश करील हा निखळ[20]; ।

---

१. फार मोठ्यानें. २. आकाशवाणी. ३. सूर्य. ४. नक्षत्राप्रमाणें तेजोहीन. ५. करिजेल हें कर्मणी रूप, '**इजे**' हा आगम, धातु आणि भविष्यकाळाचा '**ल**' प्रत्यय यांजमध्यें येऊन झालें आहे. कवितेंतील वर्तमानकाळच्या रूपाला 'ल'प्रत्यय लाविला असतां भविष्यकाळाचीं रूपें सिद्ध होतात:—'धौम्याभिप्रायहि हा जैं **वरिजेतील** कुरु परेतत्वें। गातील पुढें कुरुगुरु दर्भ धरुनियां करीं परे तत्वें ॥', 'धर्म यश विपुल पावें स्वमुखें **वाखाणिजेल** तुज शक्रें'—**मोरोपंत.** धरिजेल, कीजेल, होइजेल, अशीं रूपें कवितेंत मात्र वारंवार आढळतात. या व अशा अनेक प्रयोगांवरून पंतांनीं संस्कृतांतील प्रयोग मराठी कवितेंत आणण्याचा प्रयत्न केला आहे, असें दिसतें. इतकेंच नव्हे, तर मराठी भाषेला संस्कृत व्याकरणनियमांनीं आळें घालण्याचा त्यांचा रोंख जेथें तेथें दृष्टीस पडतो. ६. क्षत्रियानें. ७. खांडववनदाहाच्या समयीं (पंतकृत आदिपर्व, अध्याय ३७ पहा). ८. 'देवसैन्यातें' असें पाठान्तर. ९. याच्या द्वेषें=याचा द्वेष केल्यानें. १०. जीं जीं भूतें द्वेष करितील तीं सर्व—असा भाव. ११. मोठी विपत्ति. १२. कौरवांचा संहार. १३. यास जतन करीं. १४. **अनन्वया**लंकार. ज्याची उपमा त्यासच दिली म्हणजे हा अलंकार होतो. १५. उपमन्यूचा कल्पवृक्ष जो शिव तो. उपमन्यूची कामना पूर्ण केल्यामुळें शिवास 'उपमन्युसुरतरु' म्हटलें आहे. उपमन्यु हा वसिष्ठकुलोत्पन्न व्याघ्रपाद नामक ऋषीच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ, व धौम्यऋषीचा ज्येष्ठ भ्राता. हा लहानपणीं आईजवळ गाईचें दूध मागूं लागला, पण घरची स्थिति गरीबीची असल्यामुळें यास गाईचें दूध मिळालें नाहीं. त्यावरून यानें ईश्वराराधन करून शिवाकडून क्षीरसागराचें आधिपत्य व आकल्प आयुष्य अशीं संपादन केलीं. याची गणना शैवांत असून, कृष्णानेंही यापासून शैवी दीक्षा घेतली होती. (संस्कृत महाभारत, अनुशासनपर्व, अध्याय १४ पहा). १६. शिव धनुर्धरांत श्रेष्ठ, तेव्हां अर्जुनासम धनुर्धर अर्जुनच असें म्हटल्याने शिवास राग आला पाहिजे. पण अर्जुनाचें धनुर्धारित्व शिवाच्या प्रत्ययास आलेलें असल्यामुळें तो रुसणार नाहीं—हा भाव. १७. सिंहापुढें. १८. क्रीडा. जेंवि हरिसमक्ष रुरुसेना सुरत [विसरे, तेंवि] रिपुचमू रण विसरतिल—असा अन्वय. १९. हरिणांचे कळप. २०. निखालस.

याच्या[1] सख्यें वरितिल सुख बुध, वैरें स्वभद्रहानि[2] खळ. ॥ ६०
कांतिगुणें चंद्रासीं, वेगगुणें हा समान वातासीं, ।
होईल[3] अतुल शौर्यें तुल्य महात्मा जयंततातासीं[4]; ॥ ६१
राज्ञि[5]! क्षमागुणें[6] ही त्वत्सुत तुळितां[7] तुळेल धरणीसीं, ।
स्पर्धा करूं शकेल चि अद्भुततेजःप्रताप[8] तरणीसीं; ॥ ६२
घांसाघांसि[9] न करितां करिल[10] चि लक्ष्मीकरूनि[11] धनदासीं[12]; ।
औदार्यगुणें यातें प्रार्थुनि कवि जोडितील[13] वनदासीं[14]. ॥ ६३
भस्म करिल अहितकटक, जैसा दवदहन[15] निबिडतम[16] कक्ष[17]; ।
ज्ञाते म्हणतिल[18] भुजबळ पाहुनि, हा चक्रपाणि-सम-कक्ष[19].' ॥ ६४
असि वाणी शतशृंगीं झाली, सन्मुनिजनें हि आयकिली; ।

---

१. याच्या सख्यें बुध सुख वरितिल; [याच्या] वैरें खळ स्वभद्रहानि [वरितिल]–असा अन्वय. २. स्वकल्याणाची हानी. ३. अन्वय:–[हा] महात्मा अतुल शौर्यें जयंततातासीं तुल्य होईल. अर्थ:–आपल्या अलोट शौर्यानें हा महात्मा (अर्जुन) इंद्राशीं बरोबरी करील. येथें शौर्याच्या योगानें इंद्राशीं अर्जुनाचें साम्य वर्णिलें आहे. परंतु 'अतुल' हें शौर्याचें विशेषण योजिलें आहे. शौर्य 'अतुल' असल्यानें त्याच शौर्यानें अर्जुन 'बरोबरीचा' असें कसें म्हणतां येईल? सारांश–येथें 'अतुल' व 'तुल्य' हे शब्द परस्परविरुद्ध असल्यामुळें ते एकत्र योजणें युक्त नाहीं. याकरितां 'अतुल' ह्याचा अर्थ 'विपुल' असा घेणें भाग आहे. ४. इंद्राशीं. ५. हे कुंति. ६. क्षमाशीलपणानेंही. ७. कोणीं तुलना केली असतां. ८. ज्याचें तेज (प्रभाव, कांति) व प्रताप (पराक्रम) हीं अद्भुत आहेत, असा (अर्जुन). हा **व्यतिरेक** नामक अलंकार. ९. घांसाघांसि न करितां= घासाघीस न घालितां, ओढाताण न करितां, गळ न घालितां, सहज. १०. हा अर्जुन पुष्कळ संपत्ति मिळवून सहज लीलेनें कुबेराची बरोबरी करील–असा अर्थ. करिल=स्पर्धा करील (गीति ६२ पहा). 'तुळिलचि' असें पाठांतर. ११. लक्ष्मीच्या योगानें, लक्ष्मीसंबंधीं विचार करितां. १२. कुबेराशीं. १३. जोडितील=समान मानतील, समान आहे–असें वर्णन करतील. याच्या औदार्यामुळें शाहाणे लोक याला मेघाचा जोडीदार म्हणतील–असा अर्थ. येथें 'प्रार्थुनि' हें पद रसहानी करणारें दिसतें. कारण येथें कोणीं कोणाची प्रार्थना करण्याचें कांहींच कारण नाहीं. १४. मेघाशीं. १५. वणवा. १६. अतिशय दाट, परस्परांस चिकटून एकजुटीनें असणारा गवताचा पुंज. गवत विरळ असतांना त्यास अग्नि जाळीलच, पण तें 'संधीभूत' असतांही जाळीलच–असा भाव. १७. वाळलेलें अरण्यांतील गवत. १८. 'म्हणती' असें पाठान्तर. १९. विष्णुसदृश आहे योग्यता ज्याची असा. कक्ष=सारखेपणा, साम्य, सादृश्य.

पळतां[1] सत्य कसी ती ? न कळे चुकली[2] असेल काय किली[3] ? ॥ ६५
कर्णभयास्तव पळतां झाली च नभःसरस्वती[4] फोलें[5]; ।
नवल[6] गमे, नर चि न हे, ते देव हि, अनृत बोलती बोल ! ॥ ६६
मुनिवर सदा स्तविति तुज, तद्वचनाचा हि धरुनि विश्वास, ।
न सुयोधनासि लवलों, झालों उपहास्य आजि विश्वास[7]. ॥ ६७
त्वष्ट्यानें[8] रथ रचिला, केतुशिरीं कपिवर, प्रबळ घोडे, ।
गांडीव चाप, भाते अक्षय, उपमेसि[9] सागर हि थोडे, ॥ ६८
अशनीस[10] हि न वळेसी कांचनपट्टावनद्ध[11] खड्गलता, ।
प्रभु सूत[12], असें असतां, काळासीं ही करील रण भलता[13]. ॥ ६९
भीरो[14] ! धीरोचित[15] हें साहित्य[16] असें असोनि, जें पळणें[17] ? ।
मरण[18] रुचे वीराला[19], न रुचे क्षणमात्र अपयशें मळणें. ॥ ७०

---

१. तूं पळून येतां. २. किली चुकली असेल काय ? म्हणजे एकंदर ज्या उद्देशानें नभःसरस्वती बोलली, तो उद्देश बदलला कीं काय ? किंवा ज्या कपाटांतून एकादी वस्तू काढावयाची, त्या कपाटाच्या कुलुपाच्या किल्लीच्या बद्दल चुकून दुसरी किल्ली घेतल्यानें, तिनें भलतेंच कपाट उघडून इष्ट नसलेली अशी एकादी वस्तू हातीं यावयाची त्याप्रमाणें झालें कीं काय ? सारांश–इष्ट वस्तूच्या ऐवजीं चुकून अनिष्ट वस्तू घ्यावी, त्याप्रमाणें येथील भविष्य दुसऱ्या कोणाविषयीं सांगावयाचें असतां आकाशवाणीनें चुकून तें अर्जुनाविषयीं सांगितलें असावें–असें तर झालें नाहीं ना ?–असा स्पष्टार्थ. ३. किल्ली, चावी. ४. आकाशवाणी. ५. व्यर्थ. ६. अन्वयः–हे नर चि न, [तर] ते देव हि अनृत बोल बोलती, [हें] नवल गमे. ७. जगास. ८. देवांच्या सुतारानें. ९. भात्यांस उपमा देण्यास त्यांच्या शरबाहुल्यामुळें समुद्राचें पाणीही कमीच ठरेल. म्हणून समुद्र सुद्धां भात्याचें उपमान होऊं शकत नाहीं–असा भावार्थ. १०. वज्रासही. ११. कांचन+पट्ट+अवनद्ध=जिला सोन्याचें म्यान आहे अशी. सोन्याचें म्यान असलेलें तुझ्या तरवारीचें पातें वज्रासही वळणार नाहीं असें आहे–असा भाव. वज्रास वळणार नाहीं=वज्राशीं स्पर्धा करीत असतां (शत्रुहननाच्या कामांत) वज्रास हार जाणार नाहीं. १२. सारथी. १३. वाटेल तो, कोणीही; येथें–इतर मनुष्य, तुझ्याहून अन्य. ६८ व ६९ वी गीति **समुच्चया**-लंकाराचें उदाहरण आहे. १४. भित्र्या. १५. धीर+उचित=धीरपुरुषास योग्य असें. १६. वर वर्णिलेलें. १७. हें असें साहित्य असोनि जें पळणें [तें] धीरोचित (काय ?) अर्थात् नाहीं–असा भाव. १८. हें गीत्यर्ध उत्तम सुभाषित होय. १९. 'वीराला' असें पाठान्तर. हें गीत्यर्ध पुढील गीतावचनाचें रूपान्तरच होयः–संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते । (अध्याय २–३४). 'न भीतो मरणादस्मि केवलं दूषितं यशः' [मृच्छकटिक] असें मान–धन व्यक्तीचें ब्रीदच असतें.

होतासि सूत जरि तूं, गांडीव गदाधरासि[1] देतासी, ।
कर्णासि मारिता प्रभु, माझ्या करिता चि पूर्ण हेतासी[2]. ॥ ७१
अद्यापि तरि करीं हें, निजसंधासागरांत[3] तरसील. ।
परि[4] न करीं हें, समरीं कर्णासि विलोकितां चि मरशील ! ॥ ७२
शस्त्रास्त्रज्ञ[5] स्वाधिक[6] कटकीं कोणी असेल जो राजा ।
गांडीव त्यासि दे हें, क्लीबा ! हो शीघ्र पाठिमोरा, जा. ॥ ७३
क्लीबकरीं[7] ही असतां बहुत चि केला प्रताप चापानें, ।
अघनाश[8] रामनामें जैसा जपतां हि घोरपापानें[9]. ॥ ७४
भीम चि धीर; तया दे धनु[10], तो कर्णादि शत्रु मारील; ।
व्यसननरकमग्नांतें[11] आम्हांतें तो चि वीर तारील. ॥ ७५
शिरतासि न कुंत्युदरीं[12], किंवा च्यवतासि[13] पांचव्या मासीं, ।
तें चि[14] श्रेय तुज, न[15] हें[16]; वीरांसीं क्रीडणें न रामांसीं[17]. ॥ ७६
विरथ विशस्त्र न होतां, कर्णशर न झोंबतां हि अंत्रांसीं[18], ।
केलें अपयान[19] कसें ? झालासि कसा निमग्न संत्रासीं[20] ?" ॥ ७७

---

१. कृष्णास. शंख, चक्र, गदा व पद्म हीं विष्णूच्या हातांत नेहमीं असतात. गदा ज्याच्या हातीं असेल, त्यास शत्रूंचा नाश करणें सहज आहे, हें 'गदाधर' ह्या शब्दानें ध्वनित केलें आहे. २. माझ्या हेतासी पूर्ण करिता चि–असा अन्वय. हेतासी=हेतूस (कर्ण मारण्याविषयींच्या इच्छेस). ३. आपल्या प्रतिज्ञेच्या समुद्रांत. ४. परि न करीं हें=परंतु हें काम (गांडीव दुसऱ्यास देण्याचें काम) करूं नकोस. धर्मराज म्हणतोः–गांडीव कृष्णाला दे व तूं त्याचा सूत (सारथी) हो, असें मीं म्हटलें खरें; पण तूं तसें करूं नकोस. कारण तूं सूत होऊन कृष्णाबरोबर रणांगणांत गेलास आणि तेथें कर्णाला पाहतांच मेलास तर! ५. शस्त्रास्त्रविद्या जाणणारा. ६. आपल्याहून अधिक. ७. उत्तरगोग्रहणप्रसंगीं बृहन्नडारूप अर्जुनानें जो पराक्रम केला, त्यास उद्देशून हें वाक्य आहे. (पंतकृत विराटपर्व, अध्याय ३ पहा). ८. पापनाश. ९. मोठ्या पातक्यानें. मोठ्या पापी जनानें–हा भाव. १०. गांडीव. ११. दुःखरूप नरकांत जे आम्ही निमग्न, त्यांतें. १२. कुंती+उदर=कुंतीच्या उदरीं. १३. पतन पावतास. १४. पतन पावणेंचि. (जन्माला न येणें किंवा गर्भच्युत होणें) तें चि तुज (क्लीबाला) श्रेय (योग्य) [होय]. (परंतु) वीरांसीं क्रीडणें [किंवा] रामांसीं [क्रीडणें योग्य] न (नाहीं)–असा अन्वय. तूं क्लीब असल्यामुळें ह्या दोन्ही कामांच्या बाबतींत अयोग्य आहेस–असा भावार्थ. १५. अशा रीतीनें पळून येणें. १६. तुज वीरांसीं क्रीडणें [श्रेय]; रामांसीं क्रीडणें [श्रेय] न–असा अन्वय केला तरी चालेल, पण त्यांतील अर्थांत स्वारस्य असावें तितकें नाहीं. अनुरूप गीति–'शय्येवरि न पडाया योग्य रणक्षितिवरीच हा काय.' (विराटपर्व–अध्याय ३ गीति ४४). १७. स्त्रियांबरोबर. १८. आंतड्यांस. १९. पलायन. २०. फार भीतींत.

## अध्याय एकेचाळिसावा.

ऐशीं वचनें [2]वमला धर्म, [3]पयोनिधि जशीं विषें [4]अ-सितें ।
तेव्हां त्यासि वधाया [5]क्षुब्धमना श्वेतवाह घे [6]असितें. ॥ १
झाला क्रुद्ध धनंजय, 'मारीन' म्हणे मनीं, न लेश वदे; ।
तें समजे [7]स्वाश्रितजनतारक, [8]भलतें घडों न, केशव, दे. ॥ २
कृष्ण म्हणे, 'पार्था ! हें काय ? करीं घेतला कशास [9]असी ? ।
[10]योद्धव्य मीं न पाहें; [11]दिसती तव दृष्टि कां नवी च असी ? ॥ ३
ज्यांवरि असि उचलावा, जे [12]तापाचे [13]महाउरग [14]दाते, ।
[15]भीमाची [16]समरसखी [17]त्यांचें फोडित असे उर गदा ते. ॥ ४
बहु दूर [18]युद्धचत्वर, तेथें ते धार्तराष्ट्र बा ! पाहें, ।
आलासि नृप पहाया. हा राजा. शिबिर होय बापा ! [19]हें. ॥ ५
कुशली विलोकिला [20]नृप, हर्षाचा समय; यांत हें काय ? ।
नसतां [21]वध्य कशाला असि ? हा आम्हांपुढें असे [22]राय. ॥ ६
[23]श्वेताश्वा ! तूं [24]कोणावरि करणार प्रहार ? [25]कशाला ।
नग्न करिसि [26]असिला, वद. [27]उपसावा खड्ग शत्रुनाशाला. ॥ ७

---

१. यांत मूळ संस्कृत भारतांतील ६९ व्या अध्यायाच्या पहिल्या ६७ श्लोकांतील कथाभाग आला आहे. म्हणजे पंतांनीं मूळच्यापेक्षां कथाभाग फार वाढविला आहे. २. ओकला. बोलला—हा भाव. धर्माचें भाषण परुष (कठोर) वचनांनीं युक्त असल्यामुळें 'वमला' असा शब्द वापरला आहे. ३. क्षीरसमुद्र. हा **विषम** नामक अलंकार. 'अननुरूपसंसर्गो विषमम्' [रसगंगाधर.] पयोनिधीपासून दुग्ध निघण्याच्या ऐवजीं विष निघालें आहे, हा अनुरूपसंसर्ग नव्हे, म्हणून **विषम**. ४. काळीं. ५. क्रोधाविष्ट. ६. तरवारीला. ७. आपला आश्रय केलेल्या जनांचें रक्षण करणारा. हें केशवाचें विशेषण. ८. धर्मास अपायकारक असें. केशव भलतें घडों न दे—असा अन्वय. ९. खड्ग. १०. युद्ध करण्यासारखें कांहीं, युद्धाचा प्रसंग. ११. दिसते. १२. दुःखाचे. जे तापाचे दाते [तस्मात्] महाउरग—असा अन्वय. १३. मोठे सर्प. १४. देणारे. १५. त्यांचें उर भीमाची समरसखी ते गदा फोडित असे—असा अन्वय. १६. युद्धांतील मैत्रीण ('गदे'चें विशेषण). १७. पहिल्या अर्धांतील 'ज्यांवरि' व 'जे' या शब्दांनीं उद्दिष्ट कौरवांचें. १८. युद्धांगण. १९. हा **निश्चयालंकार**. अर्जुनास भ्रम झाला असें समजून कृष्ण त्याचें निवारण करीत आहे म्हणून हा अलंकार. २०. धर्म. २१. मारण्यास योग्य असा कोणी. २२. धर्म. २३. अर्जुना. २४. 'कवणावरि' असें पाठान्तर. २५. कशाकरितां. २६. तलवारीला. २७. सिद्ध असलेली गोष्टच सांगितल्यामुळें हा **विधि**नामक अलंकार.

भ्रमलासि काय? वेड्या! गुरुसुत केव्हां चि पळविला बा! [1]तां; ।
शिबिरा आर्य पहाया आला [2]आहेसि पांडवा! आतां.' ॥ ८
अर्जुन म्हणे, "मुकुंदा! न भ्रमलों, सावधानचित्त [4]असें; ।
[3]असिधारणप्रयोजन पुससी, तरि तें असे मनांत [4]असें. ॥ ९
जो 'गांडीव [5]शरासन दे [6]अन्याकारणें' म्हणेल मला, ।
[7]मारावा चि, असो तो प्रिय, अप्रिय; सुज्ञ, मूर्ख; दुष्ट, भला. ॥ १०
माझें गुप्त व्रत हें [8]गांडीवप्राप्तिपासुनीं आहे; ।
[9]राजा [10]तसें चि वदला; [11]सत्यच्युतिला न दास हा साहे. ॥ ११
यास्तव मीं धर्मशिरच्छेद करीन, स्वसत्य रक्षीन; ।
संरक्षितां प्रतिज्ञा [12]दुर्गतिदुष्कीर्तिला न [12]लक्षीन. ॥ १२
म्हणती बुध, 'प्रतिज्ञावचन करावें चि जतन.' नर कां [13]तें ।
स्वहित न करितिल? जावें कां हो! [14]पावोनि [14]पतन नरकांतें? ॥ १३
मज तों संमत ऐसें; तुज कैसें यांत वाटतें [15]विहितें? ।
धर्मज्ञा! तूं चि करीं, अंधा दावूनि वाट, तेंवि हित." ॥ १४
'शिव! शिव! हर! हर!' ऐसें बोलोनि प्रभु म्हणे [16]तयासि, '[17]कवी ।
नाहीं उपासिले त्वां, धर्माचें तत्व [18]यद्दया सिकवी. ॥ १५
हें आतां चि समजलें तुज [19]वृद्धोपासना नसे घडली, ।
तरि च तव [20]विचारनयनहीना मति या [21]भ्रमावटीं पडली. ॥ १६
धर्मज्ञ न पुरुष असें करिल, जसें करिसि; [22]जालम-लीला हे. ।

---

१. त्वां. २. आहें. ३. तलवार उपसण्याचें कारण. ४. या प्रकारें. ५. धनुष्य. ६. इतर मनुष्यास. ७. तो मारावा चि–असा अन्वय. ८. गांडीव मिळाल्यापासून. ९. धर्म. १०. मागें अध्याय ४० गीति ७१ आणि ७३ पहा. ११. प्रतिज्ञाभंगाला. १२. दुर्गति (नरकप्राप्ति) व अपकीर्ति यांची पर्वा करणार नाहीं. अनुरूप गीत्यर्थः—रक्षोचित प्रतिज्ञावच, न तसें धन, कलत्र, शिर कविला ॥ (पंतकृत द्रोणपर्व, अध्याय ९ । ७३). १३. तें स्वहित=प्रतिज्ञावचन जतन केल्यानें होणारें स्वहित. १४. प्रतिज्ञेचा भंग करून–असा भाव. १५. योग्य. १६. अर्जुनास. १७. ज्ञाते, साधु. १८. ज्या साधूची दया. १९. वृद्ध+उपासना=वृद्धांची (ज्ञानवृद्धांची) सेवा. २०. सारासार विचाररूपी डोळे नाहींत जिला अशी. ('मती'चें विशेषण). २१. भ्रांतिरूप खांचेंत. अवट=खळगा, कूप. २२. पामरजनाच्या चेष्टा. जालम=गुणदोषाविषयीं विचार न करितां कार्य करणारा. अन्वयः–हे जालमलीला [होय], जसें [तूं] करिसि, असें धर्मज्ञ पुरुष न करिल.

न[1] लघु सुगुण; न गुरु अगुण; तुळसीची सेरि[2] न शाल्मली[3] लाहे. ॥ १७
'सत्य[4] चि धर्म' म्हणसि, 'तत्त्यागीं[5] भीसी हि तूं; परंतु भला[6] ।
पंडित न गमसि, जरि बहु पांडित्य हि करिसि; दिससि बाळ[7] मला. ॥ १८
धर्मविनिश्चय[8] नेणे[9] जो, करि भलतें चि, अधम तो वेड्या ! ।
अविवेकें[10] दृढ बांधिति, तुटति विवेकें दृढ[11] क्रिया-बेड्या. ॥ १९

---

१. सुगुण लघु न; अगुण गुरु न—असा अन्वय. गुणयुक्त पदार्थ लहान दिसला तरी तो हलका नव्हे, त्याचप्रमाणें गुणहीन पदार्थ मोठा असला तरी किंमतीचा होत नाहीं. सुगुण लघु न (गुणवान वस्तु जरी आकारानें लहान असली, तरी ती योग्यतेनें लहान होत नाहीं), [तसेंच] अगुण गुरु न (निर्गुण वस्तु आकारानें मोठी असली तरी ती योग्यतेनें श्रेष्ठ समजली जात नाहीं). ह्या सिद्धांताच्या समर्थनार्थ दृष्टांत—तुळशीची योग्यता सांवरीच्या झाडाला येत नाहीं. कारण तुळशीच्या ठायीं अनेक उपयुक्त गुणधर्म आहेत, तसे ते सांवरीच्या ठायीं नाहींत. येथील तुळस व शाल्मली या पदांनीं प्रस्तुतांतील धर्म व प्रतिज्ञा हीं दर्शविलीं आहेत, असें वाटतें. येथें 'सुगुण'च्या ठिकाणीं 'सगुण' असा पाठ असता, तर 'सगुण' व 'अगुण' अशी जोडी नीट जमली असती. ह्या अर्धाचा अर्थ चांगला समाधानकारक लागला नाहीं. २. बरोबरी. ३. सांवरीचा वृक्ष. प्रस्तुत गीतीशीं **पंतांची** पुढील गीती ताडून पाहाण्यासारखी आहे:—जेथें बळ गुण तो गुरु, शूर बळा मानिती, न कुलशीला. । गुणहीन शाल्मलि वृथा; लघु न म्हणति, भजति साधु तुळशीला. ॥ (आदिपर्व, अध्याय २५।६२). कल्पनासादृश्य:—(१) वडीलधारा नव्हे दीप । धाकुटे पूज्य तुळसी रोप । तैसें श्रेष्ठत्वाचें रूप । ज्ञान विशेष ते ठायीं ॥ (मुक्तेश्वरकृत आदिपर्व, अध्याय ११।१०९); (२) कीं श्रीतुळशीचें रोप जैसें । दृष्टीं पाहातां सान दिसे । परि पवित्रपणें मस्तकीं बसे । विश्ववंद्य विष्णूच्या; ॥ तेंवि वयासि नाहीं चाड । ज्ञान वसे तोचि वाड । वांचोनि बाभळेचें खोड । काय करावें बहुकाळींचें ? ॥ (मुक्तेश्वरकृत शुकरंभासंवाद, ओंव्या ६५—६६). तसेंच ह्या गीतीशीं समानार्थक सुभाषितें:—(१) न हि ज्येष्ठस्य ज्येष्ठत्वं गुणैर्ज्येष्ठत्वमुच्यते । केतकीगुरुपत्रेभ्यो लघुपत्रस्य गौरवम् ॥ (२) नहि जन्मनि श्रेष्ठत्वं गुणैः श्रेष्ठत्वमुच्यते । केतकीवरपत्राणां लघुपत्राणि गौरवम् ॥ ४. सत्यच. (खरें बोलणें व प्रतिज्ञापरिपालन करणें हेंच) धर्म आहे असें म्हणसी. ५. तत्+त्यागीं=त्या धर्माच्या त्यागाविषयीं. ६. चांगला, खरा. ७. मूर्ख. **'बालः** कचे शिशौ मूर्खे ह्रीबेरेऽश्वभगुच्छयोः' इति विश्वः, **'बालो** ना कुंतलेऽश्वस्य गजस्यापि च बालधौ' इति मेदिनी. ८. धर्माचा निर्णय. ९. न जाणणारा. 'नेणें' असा पाठ रा० **पराडकर** यांच्या प्रतींत आहे. १०. कर्में ह्याच कोणी बळकट बेड्या. क्रिया (ह्याच) बेड्या अविवेकें दृढ बांधिति (घट्ट होती.) (मनुष्यास जखडून टाकतात असा भाव;) विवेकें दृढ (खात्रीनें, निश्चित) तुटति—असा अन्वय. विवेकानें वागल्यास कर्मांचा नाश होतो, व विवेकहीन होऊन भलत्यासच धर्म समजून मूर्खपणानें वागल्यानें कर्मांचीं बंधनें न तुटतां तीं घट्ट होतात व मनुष्यास कधींही कर्मविमुक्ति होत नाहीं—असा भाव. ११. अंगीं खिळलेलीं कर्में हीं मुक्तिमार्गाच्या आड येतात

[1]सत्यानृततत्वाचे जे ज्ञाते ते चि [2]सर्वधर्मज्ञ; ।
[3]निजनिश्चय कथिति [4]जया होय जनीं तो चि [5]कर्ममर्मज्ञ. ॥ २०
[6]कार्याकार्याचा तों निश्चय पार्था ! असे महा [7]गूढ; ।
[8]नेणसि. असा चि [9]मोहें जन कार्याकार्यनिश्चयीं मूढ. ॥ २१
गुरुला शरण न जातां, अध्ययनश्रम न भोगितां, शास्त्र ।
[10]कैचें ? [11]कार्याकार्यज्ञाना शास्त्राविना नव्हे पात्र. ॥ २२
तें शास्त्र तुज न ठावें; रक्षाया इच्छितोसि धर्मातें ! ।
[12]कर्मातें करिशि अशा जेणें होतोसि [13]पदें अधर्मातें. ॥ २३
प्राणिवध अधर्म असें न कळे तुज धार्मिका कसें ? न तरे ।
येणें जन. [14]गुरुधर्म [15]प्राण्यवध चि, हें चि आमुचें मत रे ! ॥ २४
[16]अनृत हि वचन वदावें, परि कोणास हि कधीं हि न वधावें; ।

---

म्हणून यांस 'बेड्या' (शृंखला) म्हटलें आहे. हें गीत्यर्ध उत्तम सुभाषित होय, व हें पूर्वार्धातील अर्थाच्या समर्थनपर असल्यामुळें **अर्थांतरन्यास**.

१. सत्य आणि असत्य यांच्या तत्वाचे. तत्व=खरें स्वरूप. २. पूर्ण धर्म जाणणारे. सत्यासत्यविवेचनांत सर्व धर्मांचा समावेश होतो—हा कृष्णाचा भाव. ३. एकाद्या गोष्टीविषयीं विचारपूर्वक निश्चित केलेले आपले सिद्धान्त. निश्चय=कार्याविषयीं दृढ संकल्प—असा अर्थ येथें घ्यावयाचा नाहीं. ४. जया (ज्या मनुष्यास) [वर वर्णिलेले सत्यानृततत्वाचे ज्ञाते] निजनिश्चय कथिति (आपलें ज्ञान पढविती) तो चि (तोच मनुष्य) जनीं कर्ममर्मज्ञ होय—असा अन्वय. सत्यानृततत्व जाणणाऱ्याकडून ज्ञान संपादन केल्याशिवाय कोणीही मनुष्य कर्ममर्मज्ञ होत नाहीं—हा भाव. ५. कर्माची खुबी जाणणारा, हें कर्म करावें व हें कर्म करूं नये याविषयीं बारीक माहिती ज्यास आहे असा. ६. कार्य=करण्यास योग्य तें. अकार्य=करण्यास अयोग्य तें. तों=तर. 'तो' असें पाठान्तर. ७. समजण्यास कठीण, खोल. ८. तो कार्याकार्याचा निश्चय तूं जाणत नाहींस. ९. अज्ञानानें, मूर्खतेनें. तूंच केवळ कार्याकार्यविमूढ आहेस असें नाहीं, तर सर्व ज्ञानरहित जन असेच मूढ असतात—हा कृष्णाचा भाव. तस्मात् **अर्थांतरन्यास.** 'मोहे' असें पाठान्तर. १०. शास्त्र कैचें?=शास्त्र कैसें येई? गुरुबोधाशिवाय शास्त्रज्ञान प्राप्त होत नाहीं—हा भाव. ११. [मनुष्य] शास्त्राविना (शास्त्रज्ञानाविना) कार्याकार्यज्ञाना पात्र नव्हे—असा अन्वय. १२. हें **काव्यलिंग** अलंकाराचें उदाहरण. कारण गीतीचें द्वितीयार्ध व पूर्वार्ध यांत कार्यकारणभाव आहे. तुला शास्त्रज्ञान नसूनही धर्माचें रक्षण करूं पाहतोस, तस्मात् धर्माच्या नांवावर अधर्मकृत्य करितोस—हा भाव. १३. स्थान. १४. श्रेष्ठ धर्म. १५. प्राणि+अवध=प्राणि+अहिंसा. 'अहिंसा परमो धर्मः' हें वचन प्रसिद्ध आहे. १६. ही गीति सुभाषितरूप आहे. पण हींतील नीतीबद्दल मात्र मतभेद असूं शकेल.

सरस[1] अहिंसा, न सुधा; एक हि सेवुनि तिचा चि लव[2] धावें[3]. ॥ २५
ऐसें असतां भ्राता, तो हि स्वज्येष्ठ[4], त्यांत ही राजा, ।
तत्रापि धर्मकोविद[6], बहुमानी ज्यासि[7] शांतनव[8] आजा; ॥ २६
पांडुसमातें[9] त्यांतें[10] धर्मज्ञा ! मारितोसि पामरसा[11]. ।
रोदन[12] करील येणें विसरविला[13] आठवूनि राम[14] रसा[15]. ॥ २७
जो युद्धपराङ्मुख, जो शत्रु नव्हे, जो कृतांजली[16], भ्याला, ।
पळतो, प्रमत्त[17], शरणागत ही जो, न वधिती भले त्याला. ॥ २८
तें सर्व[18] हि कीं या तव गुरुच्या ठायीं; पहा, पहा नीट. ।

---

१. रसयुक्त, स्वादिष्ट, फार रुचिकर. अन्वयः–अहिंसा सरस, सुधा (अमृत) [सरस] न; तिचा चि (अहिंसेचाच) एकहि लव (अणु, बिंदु) सेवुनि धावें (तृप्त व्हावें). अमृतापेक्षां अहिंसाच गोड. भूतदयेचा प्रत्येक प्रसंग मनास फार संतुष्ट करितो–असा भाव. हा **व्यतिरेका**लंकार. २. लव=लेश, कण, अणु. 'पुंसि लवलेशकणाणवः' [अमर]. ३. तृप्त व्हावें. ४. आपल्याहून वडील. ५. त्यांतही. ६. धर्मज्ञ. ७. धर्मास. ८. भीष्म. ९. तुझा पिता जो **पांडु** त्याच्या बरोबरीच्याला. वरची गीति व हें गीत्यर्ध यांत **सार** नामक अलंकार आहे. एकाद्या पदार्थाचे गुण क्रमाक्रमानें वर चढवून शेवटच्या अतिश्रेष्ठ गुणाचें वर्णन शेवटीं केलेलें असलें, म्हणजे हा अलंकार होतो. प्रस्तुत स्थलीं प्रथम भ्रातृत्व, नंतर ज्येष्ठत्व, नंतर नृपत्व, नंतर धर्मकोविदत्व, नंतर शांतनवासारख्या वृद्धानें केलेला बहुमान, व शेवटीं पितृसमत्वरूपी गुणाचें वर्णन केलें आहे, म्हणून **सार**. १०. पांडुसमातें त्यातें=पित्याप्रमाणें पूज्य जो (धर्म) त्यास. 'ज्येष्ठो भ्राता पितुः समः' असें शास्त्रवचन आहे. ११. एकाद्या अप्रबुद्ध नीचाप्रमाणें. पामर=नीच, क्षुद्र, अधम. १२. अन्वय व अर्थः–[**ध**र्मास तूं मारिल्यास] येणें (या **ध**र्मानें किंवा कृत्यानें) [आपल्या न्यायप्रवर्तनानें व सद्गुणांनीं] विसरविला (विसरविलेला) **रा**म (श्री**दा**शरथी**राम**) आठवूनि (हा मेल्यामुळें तो आठवून ) रसा (पृथ्वी) रोदन करील. न्यायाविषयीं **रा**मराज्य प्रसिद्धच आहे. एकपत्नीव्रत इत्यादि सद्गुणांविषयीं **रा**माची ख्याति आहेच. **ध**र्माची या गुणांविषयीं ख्याति होतीच. **रा**मासारखाच **ध**र्म जन्मला, म्हणून **रा**मनिधनाचें दुःख पृथ्वी विसरली होती. आतां **ध**र्मही मेल्यास पृथ्वीला **रा**माची पुनः आठवण होईल व ती रोदन करील–हा भाव. **रा**माची आठवण होण्याचा स्मृतिप्रसंग यांत वर्णिला आहे म्हणून **स्मरणा**लंकार. १३. विसरविलेला. १४. **दा**शरथीराम. या शब्दाचा '**प**रशुराम' असा अर्थ **स**र्वसंग्रहकारांनीं केला आहे. हाच अर्थ घेतल्यास कथासंदर्भ असा जुळवावा:–**प**रशुरामानें आपणास पूज्य अशा आईचा वध केला. तूं आतां पितृतुल्य भावाचा वध करितोस. •म्हणून **प**रशुरामाच्या पूर्वकृतीची आठवण होऊन पृथ्वी रडेल. पण हा अर्थ विशेष ग्राह्य नाहीं. १५. पृथ्वी. १६. हात जोडले आहेत ज्यानें असा. १७. उन्मत्त, ज्याची विचारशक्ति गेली आहे असा. १८. वर वर्णिलेले युद्धपराङ्मुखत्वादि प्रकार. यांपैकीं एकही असल्यास मनुष्य अवध्य होतो. **ध**र्माच्या ठायीं वर वर्णिलेले सर्व प्रकार गुणरूपानें वास करीत होते. तेव्हां तो अवध्यच होय–हा भाव.

वीट न ये पापाचा; मारूं म्हणसी, असा कसा [1]धीट? ॥ २९
ऐसें [2]व्रत जें केलें तें [3]बालपणें चि, न प्रबुद्धपणें ।
[4]शुद्ध पणें [5]लोकद्वय जिंकिति धीर, न अशा अशुद्ध पणें. ॥ ३०
धर्माची गति सूक्ष्मा, केवळ तूं स्थूलदृष्टि [6]मुग्धा ! [7]तें ।
व्रत रक्ष्य ! वध्य हा गुरु ! फुंकिसि तक्र त्यजूनि दुग्धातें ! ॥ ३१
मीं येथें नसतों तरि गुरुला वधितासि कीं ! अहा ! देवा ! ।
न बुडों दिला [9]स्वदास व्यसनीं त्वां चि प्रभो ! महादेवा ! ॥ ३२
धर्मरहस्य तुला मीं देतों, हो [10]भव-गद प्रशांत; [11]नवें ।
न, प्राचीन. [12]रसायनसें जें द्यावें स्वयें चि शांतनवें. ॥ ३३
[13]कीं धर्मज्ञप्रवरें धर्में, कीं पंडितोत्तमें विदुरें; ।
तुज पढवावीं तत्वें धर्माचीं मोह[14]भूमिभृद्भिदुरें. ॥ ३४

१. अविवेकी, बेमुर्वत. २. या अध्यायाच्या दहाव्या गीतींत वर्णिलेलें व्रत. ३. अज्ञानानें, अविचारानें. ४. शुद्ध पण=मागचा पुढचा विचार पाहून शहाणपणानें केलेली प्रतिज्ञा. ५. इह आणि परलोक. ६. मूर्खा. ७. तें (गांडीव दुसऱ्यास दे असें म्हणणाऱ्यास मारण्याचें) व्रत रक्ष्य (रक्षण करण्यास योग्य) [व] हा गुरु (धर्म) वध्य [असें जें तूं समजतोस तें] दुग्धातें त्यजूनि तक्र फुंकिसि. हें तुझें करणें दूध टाकून ताक फुंकणेंच आहे. हीं दोन्ही कामें सारखींच आहेत–असा भाव. तस्मात् **निदर्शना.** ८. तूं आपल्या व्रताचें रक्षण करूं म्हणतोस, व त्याकरितां आपल्या वडील भावाला (धर्माला) मारूं पाहातोस, हें तुझें करणें दूध टाकून ताक फुंकीत बसण्यासारखेंच आहे. सारांश, तू महत्वाच्या गोष्टीला तुच्छ समजून क्षुद्र गोष्टीला महत्व देत आहेस. व्रताचा भंग झाला तरी चालेल, पण धर्माचा वध होणें इष्ट नाहीं. येथें पुढील सुभाषितवचनांतील कल्पना पंतांच्या डोक्यांत घोळत होती असें वाटतें:–(१) क्षीरेण दग्धजिव्हस्तक्रं फूत्कृत्य पामरः पिबति । (२) बालः पायसदग्धो दध्यपि फूत्कृत्य भक्षयति ।. ९. तुझा. (महादेवाचा) दास जो कृष्ण तो. स्वदास=अर्जुन–असाही अर्थ संभवतो. १०. संसाररूप रोग. 'भ्रमगद' असा पाठ आहे. भ्रमगद=भ्रमरूप रोग. ११. जें [धर्मरहस्य मी तुला सांगणार तें] नवें न; प्राचीन [असे]. शांतनवें (वृद्ध भीष्मानें) स्वयें चि [प्राचीन] रसायनसें [तुज] द्यावें. म्हणजे हें धर्मरहस्य औषधासारखें फार जुनें आहे. आजा असल्यामुळें स्वतः भीष्मानेंच हें सर्व तुला शिकवावयाला पाहिजे होतें–असा भाव. १२. रसायन=औषध. येथें यतिभंग झाला आहे. १३. 'कीं धर्मज्ञप्रवरें धर्में संमोहभूमिभृद्भिदुरें। तत्वें धर्माचीं तुज पढवावीं कीं सुपंडितें विदुरें. ॥' असें ह्या गीतीचें पाठान्तर स्वलिखित पोथींत पंतांनीं चालू क्रमांक देऊन लिहिलेलें आहे. म्हणजे ही गीति ३५ वी म्हणून पंतांनीं लिहिली आहे. १४. मोह+भूमिभृत्+भिदुर=मोह+पर्वत+वज्र=मोहरूप पर्वताचें वज्र अशीं (तत्वें).

[1]तुज अथवा त्या आत्याबाईनें कळवळोनि जेंवि हित ।
सांगावें, [2]भावें [2]त्यां कथितों ऐकावयासि जें वि[3]हित. ॥ ३५
[4]जो सत्याचा वक्ता साधु चि तो, यांत संशय चि नाहीं; ।
बहु पूज्य सत्यवादी, त्रिजगीं उपमान त्या नसे कांहीं. ॥ ३६
परि जें कीं [5]सत्य असें केवळ [6]दुर्ज्ञेय दीर्घबाहो ! तें ।
कोठें सत्य चि [7]परमाधर्मफळाकारणें चि बा ! होतें. ॥ ३७
वदतां सत्य अधर्म चि घडतो, वदतां असत्य धर्म घडे; ।
आजन्म सत्यवादी त्या हि [8]सुपुरुषा असा प्रसंग पडे. ॥ ३८
तेव्हां [9]तशा प्रसंगीं शुचि [10]हृत्प्रिय सत्य जरि गळां चि जडे, ।
[11]पर्वीं जैसें [12]दयितारत्न तसें [13]कविसि सोडणें चि पडे. ॥ ३९

---

१. अथवा तुज (अर्जुनास) त्या आत्याबाईनें (कुंतीनें)–असा अन्वय. २. त्या भावानें=मातृप्रेमानें–असा अर्थ. ३. योग्य. ४. जो सत्याचा वक्ता तो चि साधु [होय], यांत संशय चि नाहीं–असा अन्वय. येथून कृष्ण सत्यासत्यमीमांसा करीत आहे. 'सत्य सदा बोलावें' (पुढें गीति ६७ पहा). हा नियम सर्वांस मान्य आहे. पण या नियमास अपवाद मुळींच नाहीं असें एका पक्षाचें मत आहे, व या नियमाला कांहीं अपवाद आहेत, असें दुसऱ्या पक्षाचें म्हणणें आहे. कृष्ण या दुसऱ्या पक्षाचा अनुयायी आहे. कृष्णाच्या म्हणण्याचा सारांश असा:–लोकक्षेम व सत्य यांचा जेव्हां झगडा पडतो, तेव्हां बेलाशक असत्य बोलून लोकक्षेम साधावा. एकादा गांव लुटण्याकरितां दरोडेखोर जात असतील, व त्यांस रस्ता माहीत नसून त्यांनीं आपणास गांवचा रस्ता विचारला, तर त्यांस खोटा रस्ता दाखवून पोलीस ठाण्याकडे पाठवावें व गांवास वांचवावें. सत्याकरितांच सत्य बोलावें, हा रुक्ष सिद्धांत जगांत उपयोगाचा नाहीं. लोकहिताकरितां सत्य बोलावें, हा सिद्धांत ग्राह्य आहे. अशा रीतीनें कृष्ण लोकक्षेमवादी किंवा उपयुक्ततावादी ( Utilitarian ) आहे. या गीतीपासून तों या अध्यायाच्या शेवटपर्यंत कृष्णानें याच सिद्धांताचा अनुवाद केलेला आहे. ५. केवळ सत्य असें जें तें दुर्ज्ञेय [होय]–असा अन्वय. केवळ=निश्चित, निर्लेप. 'परि जें कीं सत्य असे' असा पाठभेद. सत्य असें जें=शुद्ध सत्य ज्यास म्हणावें तें, सत्याचें खरें स्वरूप. ६. जाणण्यास अशक्य. ७. मोठ्या अधर्म (पाप)रूपी फळास कारणीभूत, पापरूपी फळ देणारें. ८. सज्जनास. ९. जेव्हां सत्य बोलल्यानें अधर्म घडतो तेव्हां. १०. आपल्या हृदयास आवडणारें. प्रस्तुत गीतींतलीं 'शुचि' व 'हृत्प्रिय' हीं विशेषणें 'सत्य' व 'दयितारत्न' या दोन्ही शब्दांस लागू आहेत. (सत्यपक्षीं) शुचि=पवित्र किंवा ढळढळीत. (दयितारत्नपक्षीं) शुचि=जिचें अंतःकरण शुद्ध आहे अशी, पतिव्रता. 'हृत्प्रिय' शब्द उभयपक्षीं समानार्थक. ११. अमावास्यादि पर्वदिवशीं. (स्त्रीगमनास वर्ज्य अशा दिवशीं–असा भावार्थ). १२. उत्तम स्त्री. १३. शहाण्या मनुष्यास.

नित्य अशुचि अनृत तरी, समय[1]विशेषीं सुधीसि[2] तें होय ।
धर्मार्थ सेव्य, जैसें पर्वीं च क्षारसिंधुचें[3] तोयें[4]. ॥ ४०
लग्न[5], रति, प्राणक्षय, सर्वस्वविनाश, विप्रकार्य, अशा ।
पांचां[6] ठायीं अनृत हि बोलावें; तें करी न नाश यशा[7]. ॥ ४१
जोडे धर्म बरा[8], तरि अनृत हि बोलोनि धर्म जोडावा; ।
जोडे अधर्म सत्यें तरि सत्याचा हि संग सोडावा. ॥ ४२
सत्यानृततत्त्वज्ञ[9] चि धर्मज्ञ; तदन्य[10] मूढ फार चि तो; ।
धर्मरहस्य[11] न जाणे कर्मभर[12] शिरीं कशास बा ! रचितो? ॥ ४३
जातीनें अधम असो, घातक हि असो, असो महा घोर[13], ।
जो काय[14] कृतप्रज्ञ[15] प्राज्ञमतें पुरुष तो जगीं थोर. ॥ ४४
काय नवल, अंधवधें[16] बहु पुण्यातें बलाक[17] जरि पावे ? ।
आश्चर्य त्यांसि वाटो ज्यांसि कृतप्रज्ञतागुण न ठावे. ॥ ४५
तें ही काय नवल, जो तटिनीच्या[18] संगमीं वसे विप्र, ।
तो धर्मकाम[19] कौशिक मूढ बुडाला अघीं जरि क्षिप्र.' ॥ ४६

---

१. प्रसंगोपात्त. [जरी] अनृत नित्य अशुचि तरी तें समयविशेषी सुधीसि धर्मार्थ (धर्माचें रक्षण व्हावें म्हणून) सेव्य (सेवन करण्यास योग्य) होय–असा अन्वय. २. पंडितास. येथें रा. पराडकर यांच्या प्रतींत 'सुधींसि' असा पाठ आहे व त्यावर 'शाहण्या मनुष्यास' अशी टीप आहे. यावरून मूळपाठ अनुस्वाररहित असावा असें वाटतें. ३. खारट पाण्याच्या समुद्राचें. पर्वकाळीं समुद्रस्नान केलें असतां फार पुण्य लागतें, अशी समजूत आहे. ४. पाणी. ५. 'विवाहकाले रतिसंप्रयोगे सर्वात्यये प्राणधनापहारे । विप्रस्य चार्थे अनृत वदेत पंचानृतान्याहुर पातकानि ॥' ह्या महाभारतांतील श्लोकाचें हें भाषांतर आहे. ६. पांच प्रसंगीं. ठाय=प्रसंग (मूळ अर्थ–स्थान, ठिकाण). ७. कीर्तीचा, पुण्याचा. ८. बरा=चांगला, नीतिनियमांस बाध न येऊं देणारा. ९. सत्यासत्याचें तत्व जाणणाराच. १०. त्याहून अन्य, सत्यानृततत्व न जाणणारा. ११. सत्य इत्यादि धर्माचें तत्व. १२. कर्माचें ओझें. १३. भयंकर. १४. जो काय=जो कोणी. १५. कार्याकार्य जाणणारा. 'कृतप्रज्ञ' हा शब्द मुळांतलाच होय. भगवद्गीतेच्या दुसऱ्या अध्यायांत (श्लोक ५६।५७) कृष्णानें 'स्थितप्रज्ञ' व 'स्थितधी' हे शब्द योजिलेले आहेत. 'कृतप्रज्ञ' हा शब्द प्रस्तुत स्थलीं 'संस्कृतधी' या अर्थी योजिलेला आहे. १६. अंधमृगाच्या वधें. ही कथा ४८ व्या गीतीपासून दिलेली आहे. अहिंसा जरी सर्वमान्य आहे, तरी तिच्यामुळें जेव्हां लोकक्षेमाचा (Greatest good of the greatest number) भंग होतो तेव्हां हिंसाच करावी–असा या गोष्टीचा आशय. १७. नामविशेष. १८. नदीच्या. १९. धार्मिक, धर्मानुसार वर्तन करणारा.

ऐसें केशववाक्य श्रवण करुनि जय म्हणे, 'महाभागा ! ।
देवा ! [1]तद्वृत्त वदा पुरवाया [2]दासकाम हा; [3]भागा.' ॥ ४७
कृष्ण म्हणे, 'प्राचीना शुद्ध कथा ऐक [4]साधु-धीरा ! हे. ।
पूर्वी एक बलाक व्याध वनामाजि [5]साधुधी राहे. ॥ ४८
स्त्रीपुत्रपोषणार्थें मृग मारी, परि करी न बहु हिंसा, ।
कीं व्हावा बहु दुःसह जठरानलताप भलतसा [6]हिंसा ॥ ४९
वृद्ध पिता, माता ही वृद्धा, त्यांतें [7]स्ववृत्तिनें रक्षी; ।
आश्रितजनासि [8]अर्पुनि जें राहे तें चि तो सदा भक्षी. ॥ ५०
कोणाला हि न दूषी, सत्य मधुर हित वदे, न दे ताप, ।
निजधर्मपथ न सोडी, जोडी [8]दाटूनि न स्वयें पाप. ॥ ५१
तो साधु [9]व्याधपती एका दिवसीं वनांत मृग धुंडी; ।
[10]दैवें [11]एक हि न मिळे, जेथ मृगांच्या सदैव बहु [12]झुंडी. ॥ ५२
[13]भ्रमला, श्रमला, '[14]शम लाज मला न [15]मलाब्धिला' म्हणे, हांसे; ।
स्वकुटुंबपोषणार्थ चि धांवे घेऊनि शर, धनू, [16]फांसे. ॥ ५३
फिरतां फिरतां गेला कोणा एका वनीं [17]धनुष्पाणी, ।
तों तेथ पीत होता एक [18]श्वापद विचित्रसा पाणी. ॥ ५४
तो [19]घ्राणचक्षु अंध श्वापद दूरूनि जेथवां [20]पाहे, ।

---

१. तत्+वृत्त=वर दोन गीतींत सांगितलेल्यांची हकीगत. २. भक्ताची इच्छा. ३. श्रम घ्या. ४. साधुश्रेष्ठा ! धीर=बुद्धिवान, पराक्रमी. ५. सात्विक स्वभावाचा. ६. हें 'हिंवसा' याचें अपभ्रष्ट रूप असावें. कीं (कारण, हेतु असा कीं) भलतसा [आणि] बहु दुःसह [असा] जठरानलताप (भुकेमुळें होणारा त्रास) हिंसा (हिंवसा=हिंवाप्रमाणें थंड, शांत) व्हावा–असा अन्वय. किंवा–हिंसा=हिम–सा, बर्फासारखा, अर्थात् थंड. हिम=बर्फ, दंव. ७. पारध करून. वृत्ति=उपजीविकेचें साधन. ८. जाणूनबुजून, मुद्दाम. ९. व्याधश्रेष्ठ. १०. दैवयोगानें, अर्थात् प्रतिकूल दैवामुळें. ११. एकही मृग. १२. समूह, कळप. १३. भटकला, फिरला. १४. मलाब्धिला मला शम [व] लाज न [असें] म्हणे–असा अन्वय. शम=शांति. या गीत्यर्धांत 'म' आणि 'ला' या अक्षरांची एका अक्षराच्या अंतरानें पांच वेळां आवृत्ति झाली आहे. म्हणून हें **अश्वधाटीयमकाचें** उदाहरण. १५. मल+अब्धि=पाप+सागर=पापसागराला. १६. जाळें. १७. धनुष्य आहे हातीं ज्याच्या असा. १८. हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे. १९. नाकच आहे डोळा ज्याचा असा. (वासावरून पदार्थ ओळखणारा). २०. व्याध पाहे–असा अन्वय.

व्याध म्हणे, 'हें अद्भुत कोठूनि [1]अरिष्ट पातलें आहे ! ॥ ५५
ऐसा न पाहिला म्यां, आयकिला ही नसे असा [2]जंतू; ।
[3]हिंसास्वधर्मनिरता मज कैंचा [4]दुष्टमारणीं [5]मंतू ?' ॥ ५६
ऐसें [6]बहुधा चिंतुनि तेणें मर्मीं च हाणिला बाण; ।
[7]प्राण क्षणांत गेले; व्याधासि विमान ये, [8]तुझी आण. ॥ ५७
आलें विमान सुंदर, आले गंधर्व, अप्सरा आल्या, ।
झालें [9]सुकुसुमवर्ष हि, [10]झाले वाद्यध्वनी, स्तुती झाल्या. ॥ ५८
'झालें असें कसें ?' जरि म्हणसी तरि ऐक; [11]भूत तें दुष्ट, ।
[12]पूर्वीं उग्र तप करी, [13]त्यासाठीं होय [14]आत्मभू [15]तुष्ट. ॥ ५९
'वर माग' असें [16]म्हणतां, तें भूत म्हणे, '[17]क्षुधातुरा [18]तर्पीं; ।
देवा ! समस्त [19]भूतें म्यां भक्षावीं असा चि वर अर्पीं.' ॥ ६०
ब्रह्मा म्हणे, 'दिलें जा परि तूं होशील [20]सर्वथा अंध; ।
[21]तुज चक्षु घ्राण असो, कळवील पदार्थ घेउनी गंध. ॥ ६१
तें [22]सर्वभूतनाशीं [23]कृतनिश्चय भूत मारितां, व्याधा ।
[24]भूताभयदान घडे, कीं [25]सर्वांची निवारिली बाधा. ॥ ६२
अंध प्राणी वधितां नीच मृगव्याध [26]लांधला [27]सुगती; ।

---

१. दुश्चिन्ह, अशुभ. येथें अशुभसूचक वेडावांकडा प्राणी—असा अर्थ. २. प्राणी. ३. हिंसा करण्याचा जो आपला धर्म, त्याविषयीं सक्त जो मी, त्यास. ४. दुष्टास मारण्यांत. ५. अपराध. पाप—असा अर्थ येथें समजावा. ६. पुष्कळ प्रकारें. ७. त्या विचित्र श्वापदाचे प्राण. ८. अर्जुनाची. तुझी शपथ; माझें हें म्हणणें खोटें नव्हे—हा कृष्णाच्या म्हणण्याचा भाव. ९. उत्तम फुलांचा वर्षाव. 'वर्ष' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आहे. १०. 'झाले वाद्यध्वनि स्तुतिहि झाल्या' असें पाठान्तर. ११. प्राणी. १२. पूर्वजन्मीं. १३. त्या तपामुळें. १४. ब्रह्मदेव. १५. संतुष्ट. १६. ब्रह्मदेवानें म्हणतां—असा अन्वय. १७. क्षुधिताला. १८. तृप्त कर. १९. प्राणी.. २०. पूर्णपणें. २१. तुज घ्राण (नासिकाच) चक्षु असो. (डोळ्याचें काम नाकच करील—हा भाव); [घ्राण] (नासिका) गंध घेउनी (वास घेऊन) पदार्थ कळवील (हा अमका पदार्थ आहे, हा तमका पदार्थ आहे, असें कळवील). २२. सर्व प्राण्यांचा नाश करण्याविषयीं. २३. केला आहे निश्चय ज्यानें असें. २४. प्राणिमात्रांस अभय दिल्याचें पुण्य. २५. ज्या कर्मानें ज्यास्तींत ज्यास्त लोकांचें ज्यास्तींत ज्यास्त हित होईल, तीच नीति किंवा तेंच पुण्यकर्म होय, या सिद्धांताचा कृष्णानें स्पष्टपणें या गीतींत अनुवाद केला आहे. २६. पावला, प्राप्त करून घेता झाला. 'लागला' असा येथें पाठ आहे, पण तो हस्तदोष असावा. २७. उत्तम आश्रयस्थान, मोक्ष. गति=आश्रयस्थान, अवस्था, कल्याण, दैव—असे अर्थ आहेत.

दुर्ज्ञेय धर्म पार्था ! ज्ञानमदें साधुलोक कां फुगती ? ॥ ६३
हिंसक तरे विचारें, बहु [2]सत्कृत जाहला असा [3]नाकीं; ।
[4]सत्यें विप्र बुडे तें कथिन, परि [5]व्यग्रधी [6]असाना कीं. ॥ ६४
कौशिक विप्र तपस्वी श्रेष्ठ [7]बहुश्रुत असे, वसे [8]उटजीं; ।
जाणे [9]भूतहितान्यज्ञानें, [10]स्वपरांसि करिति [11]हिंपुट जीं. ॥ ६५
ग्रामाबाहेरि, न बहु दूर, नदीसंगमीं असे [12]उटज, ।
जेथें बकुल [13]तमाल [14]न्यग्रोध [15]रसाल [16]शाल्मली [17]कुटज. ॥ ६६
सत्य सदा बोलावें, तप मुख्य; नसे चि या तपा-परतें; ।
ऐसें धरिलें होतें सत्यव्रत कौशिकें [18]अ·पाप-रतें ॥ ६७
सत्यव्रतनिष्ठ असा विप्र असे, तों पहा कसें झालें ! ।
यावें स्वर्गफल जया [19]सत्यव्रततरुसि नरकफल आलें ! ॥ ६८

---

१. ह्या गीत्यर्धाचा अर्थः—साधु (सच्छील) लोक धर्माचें ज्ञान आकलन करण्यास कठीण आहे असें जाणून, ज्ञानाच्या गर्वानें कशाला फुगतील ? अर्थात् साधुलोक गर्वानें फुगणार नाहींत, नम्रच राहातील. किंवा, धर्माचें ज्ञान गहन असल्यामुळें धर्मविषयक आपल्या (अयथार्थ अशा) ज्ञानाच्या गर्वानें साधु (कुलीन, ईश्वरभक्तिपरायण) लोकांनीं फुगून कां जावें ? सारांश, फुगून जाऊं नये—हा इत्यर्थ. २. सन्मानयुक्त. ३. स्वर्गीं. ४. खरें बोलल्यामुळें. ५. उद्विग्न झालें आहे मन ज्याचें असा. 'सत्यें विप्र बुडे' हा विचित्र सिद्धांत ऐकून अर्जुन व्यग्रधी होत आहे, हें पाहून हें कृष्णाचें म्हणणें. ६. असाना=ना असा=असूं नका. किंवा असाना कीं=तुम्ही व्यग्रचित्त तर नाहींना ?—असा अर्थ. असाना हें अनेकवचनी रूप आहे. मागें व पुढें कृष्ण अर्जुनास एकवचनीं संबोधीत आहे. तेव्हां हें अनेकवचन प्रामादिक आहे, असें वाटण्याचा संभव आहे. पण हें आदरार्थी बहुवचन औपरोधिक आहे, असें समजावें. ७. अनेक शास्त्रांतील धर्म ज्यास माहीत आहे असा. ८. पर्णशाळेंत. ९. भूत+हित+अन्य+ज्ञानें=प्राणिमात्राचें हित करणें, याहून इतर (वेगळीं किंवा दुसरीं) जीं ज्ञानें तीं. त्याला सर्व तत्वांचें ज्ञान होतें, पण लोककल्याणाविषयींचें ज्ञान मात्र नव्हतें. 'भूतहितान्य' या विशेषणानें कौशिकाचीं इतर सर्व ज्ञानें व्यर्थ होत, असें कृष्णानें सुचविलें आहे. १०. आपल्याहून अन्य जीं ज्ञानें त्यांस. कृष्णाच्या म्हणण्याचा भाव हा कीं, ज्या शास्त्रज्ञानांत परोपकाराचें माहात्म्य सांगितलेलें नसतें, तें ज्ञान गर्वास कारण होऊन परोपकारादिकांस प्रतिपादणाऱ्या इतर सिद्धांतांस तुच्छ समजतें. ११. तुच्छ, दुःखी, कष्टी. १२. पर्णशाला, आश्रम. १३. मसाल्यांत घालण्याच्या उपयोगाचें सुगंधी पत्र (पान) ज्या झाडाचें असतें, तो (तमालवृक्ष). १४. वट. १५. आम्र. १६. सांवरी. १७. कुडा. १८. अ+पाप+रतें=पुण्यवंतानें. १९. सत्यव्रतरूपी वृक्षास. या गीत्यर्धांत **विषम** नामक अलंकार आहे. 'अननुरूपसंसर्गो **विषमम्**' [रसगंगाधरः]. 'योग्यतारहित अशा दोन पदार्थांचा संसर्ग वर्णिल्यास **विषम** नामक अलंकार होतो.'

तस्करभयें पळाले [1]जे काय [2]धनी, [3]धनीं [3]वनीं क्षिप्र ।
[4]जीवनधन रक्षाया शिरले, जाणे तयांसि तो [5]विप्र. ॥ ६९
मागूनि चोर आले, पुसती सत्यव्रतासि ते लोभी; ।
सांगे धनी [6]वनींचे, कीं बहु सत्य त्यजावया तो [7]भी. ॥ ७०
'[8]वनिं धनिक निकट' [9]कटका [9]दस्यूंच्या कथि, वदे मृषा न मुनी. ।
ते दुष्ट दुष्ट होउनि गेले त्या [10]सत्यशिववृषा नमुनी. ॥ ७१
[11]वंदलों सत्यशिव असें, युक्त चि; परि [12]तो न [13]वृषतुलापात्र; ।
शिववृष [14]विश्वनमस्कृत, त्यातें 'पशु' म्हणति अज्ञजन मात्र. ॥ ७२
धन फार तस्करानीं रानीं संपादिलें वधूनि धनी; ।
दुर्गति पडे [15]मुनिगळां, [16]जसि [17]दयितगळां [18]सतीवधू [19]निधनीं. ॥ ७३
[20]धर्माची [21]अतिसूक्ष्मा गति, [22]सू [23]क्ष्माकुक्षिमाजि तसि आहे; ।

---

१. जे काय=जे कोणी, जितके. २. धनवान्, श्रीमंत. ३. दाट वनांत. ४. जीवन व धन; किंवा जीवनरूपी धन. ५. कौशिक. ६. वनींचे धनी=वनांत लपून राहिलेले धनिक. ७. कीं (कारण) तो (कौशिक) सत्य त्यजावया (खोटें बोलावयास) बहु भी-असा अन्वय. ८. अन्वयः- मुनी दस्यूंच्या कटका 'वनिं निकट (जवळच) धनिक [असती]' [असें] कथि; [मुनी] मृषा (असत्य) न वदे. ९. चोरांच्या टोळीला. १०. सत्यरूप शिवाचा वृष (नंदी) त्यातें. हा कौशिक सत्यरूप शिवाचा नंदीबैल-असा भाव. अर्थज्ञानावांचून यजमानानें शिकविलेल्या शब्दांस प्रत्युत्तरादाखल नंदीबैल डोकें हालवितो. त्याप्रमाणें कोणा एकाकडून सत्याची स्तुति ऐकून त्याचें खरें रहस्य न जाणतां लोकांचा जीव जात असतांही सत्यास चिकटून बसणारा हा कौशिक शुद्ध पशु होय-हा भाव. हा येवढा अर्थ पंतांनीं 'सत्यशिववृष' येवढ्या एका शब्दांत आणिला आहे. ११. मागच्या गीत्यर्धावर कवि (किंवा कृष्ण) कोटी करितात कीं, सत्यावर जो शिवाचा आरोप केला आहे, तो योग्य आहे. पण कौशिकावर जो वृषाचा आरोप केला आहे, तो 'नंदी'शब्दाचा सामान्य भाषेंत जो थट्टेचा अर्थ होतो, त्या अर्थी घेतला पाहिजे. 'शिवाचा नंदी' या अर्थी घेऊं नये. कारण त्या कौशिकाची तितकी योग्यता नाहीं. शिवाचा नंदी जगद्वंद्य आहे. त्याची योग्यता न ओळखणारे मात्र त्याला पशु म्हणतात. १२. सत्यव्रत. १३. नंदीच्या बरोबरीचा. १४. जगानें वंदित. १५. कौशिकाच्या गळ्यांत. येथें तस्करांनीं हत्या करून द्रव्य मिळविलें, व दुर्गति ऋषीच्या कपाळीं आली-ह्या वर्णनांत 'असंगति' नामक अलंकार साधिलेला आहे. १६. या उपमेनें घट्ट चिकटते असें सुचविलें आहे. १७. नवऱ्याच्या गळ्यांत. १८. पतिव्रता स्त्री. १९. (पतीच्या) मरणकाळीं. २०. अन्वयः-[जसि] क्ष्माकुक्षिमाजि सू, तसि धर्माची गति अतिसूक्ष्मा आहे. २१. फार बारीक; सामान्य जनांच्या स्थूलदृष्टीला जी दिसत नाहीं, अशी. २२. सुई. २३. पृथ्वीच्या पोटांत.

लाहे[1] गुरुप्रसादज्ञानांजन[2] जो सुदृष्टि तो पाहे. ॥ ७४
म्हणुनि उपासावे जे शांत सदय तत्वबोधचंचु[3] कवी; ।
ते[4] चि ज्ञानप्रसवीं[5] क्षम[6]; सर्पातें[7] न सर्पकंचुक[8] वी[9]. ॥ ७५
न[10] विचारितां तराया जो घालील स्वयें[11] चि नर कास[12], ।
तो धर्मरत हि तत्व न कळतां जाईल उग्र नरकास[13]. ॥ ७६
सद्धर्मबोध[14] विनता[15] सच्छिष्या, सिद्धरस[16] जसा कथिला, ।
कीं लोहा[17] स्पर्शमणी[18], होय[19] तसा जो[20] गुरूत्तमें कथिला[21]. ॥ ७७
धर्मीं अधर्म हि असे, धर्म अधर्मीं हि; म्हणुनि[22] सत्तर्क[23], ।

---

१. अन्वयः–[जो]गुरुप्रसादज्ञानांजन लाहे (म्हणून) जो सुदृष्टि (झाला) तो [ती अतिसूक्ष्मा गति] पाहे. २. गुरुकृपेनें प्राप्त झालेलें ज्ञानरूपी अंजन (नेत्रांची दृष्टि तीक्ष्ण करणारें काजळ). ३. तत्वज्ञाननिपुण. चंचु=प्रख्यात, प्रवीण, कुशल. ४. तत्वबोधचंचुकवि. ५. ज्ञानाची उत्पत्ति करण्यास; ज्ञानदान देण्यास–असा भाव. ६. समर्थ. ७. कवीचा भाव हा कीं–खरे तत्वज्ञानीच इतरांस ज्ञानदान देण्यास समर्थ आहेत. केवळ तत्वज्ञ म्हणून मिरविणारे ढोंगी लोक उपदेश करण्यास समर्थ नाहींत. कवि यास दृष्टांत देतात, कीं सजीव सर्पच सर्पास जन्म देऊं शकतो. निर्जीव व बाह्यतः सर्पासारखी दिसणारी सर्पाची कांत (मेंग) सर्पास जन्म देऊं शकत नाहीं. हा व्यतिरेक दृष्टांत आहे. ८. सर्पाची कांत (मेंग). ९. प्रसवे. १०. स्वतः विचार न करितां, किंवा तत्वज्ञ लोकांचा उपदेश न घेतां. ११. आपल्याहून श्रेष्ठ अशा जनांच्या सहाय्यावांचून. १२. कास घालणें=सर्व तयारी करून सिद्ध होणें. १३. जो मनुष्य धर्मरत असूनही अविचारी आहे, म्हणजे जो भलतीच गोष्ट करावयास पाहातो, तो 'नरकास जाईल' हें म्हणणें सयुक्तिक वाटत नाहीं. जो अविचारी असेल त्यास इष्टफळ प्राप्त होणार नाहीं, असें म्हणणें सरळ व सयुक्तिक वाटतें. १४. गुरूनें केलेल्या धर्मबोधानें नम्र शिष्यच गुरूची योग्यता पावतो–हा या गीतीचा भाव. १५. नम्रास. १६. पारा. पाऱ्याचा कथिलावर काय परिणाम होतो, हें आम्हांस माहीत नाहीं. हाच दृष्टान्त पंतांनीं अन्यत्र योजिला आहेः—कृष्णाश्रितें करावी चिंता न, जशी रसाश्रितें कथिलें. (भीष्मपर्व, अध्याय ११।४७). १७. लोखंडास. परिसाच्या स्पर्शानें लोखंडाचें सोनें होतें, अशी समजूत आहे. १८. परिस. १९. अन्वयः–गुरूत्तमें विनता सच्छिष्या जो सद्धर्मबोध कथिला [तो त्याला] जसा सिद्धरस कथिला होय, कीं [जसा] स्पर्शमणि लोहा [होय] [तसा होय]. २०. बोध. २१. सांगितला. २२. म्हणूनि म्हणजे वर सांगितल्याप्रमाणें आपल्याला वरकांती जो धर्म भासतो त्यांत छपून अधर्म असतो, व आपणास जो अधर्मासारखा भासतो त्यांत धर्म असतो–अशा रीतीनें ते एकमेकांत गुंतलेले असतात म्हणून. २३. धर्माधर्माचा विभाग करून धर्म कशास म्हणावें व अधर्म कशास म्हणावें हें ठरविण्यास श्रुति (या शब्दानें वेद, शास्त्र, पुराण इत्यादि धर्मशास्त्रें) सत्तर्क (श्रुतीला सोडून न जाणारा

श्रुति अनुमान हि, पार्था ! धर्महृदयपद्मबोधकर[1] अर्क[2]. ॥ ७८
जीवांचा प्रभव[3] जया कर्में तें कर्म धर्म[4] बा ! समज, ।
तो धर्म जी अहिंसा[5]; हें चि कळे तत्व केशवास[6] मज[6]. ॥ ७९
जे हिंसक उग्र, तयां धर्म अहिंसा चि मुख्य[7] कथिलाहे; ।
कोण्ही हि असो प्राणी पुष्कळ कल्याण या चि पथिं लाहे. ॥ ८०
करितो धारण यास्तव 'धर्म' म्हणावें, प्रजांसि जो धरितो[8]; ।
धारणसंयुक्त[9] असा धर्म स्वोपासकांसि उद्धरितो. ॥ ८१
'प्राज्ञस्तोषं[10] जनयेत्, तदेव शिवपूजनं' अशा उक्ती[11] ।
दाखविति, पारदार्यादिक[12] म्हणती धर्म[13], मृत्युला[14] मुक्ती. ॥ ८२

---

तर्क) आणि अनुमान या तीन साधनांच्या साहाय्यानें धर्माचा निर्णय करावा-असा कृष्णाचा आशय दिसतो. केवळ सर्व भिस्त धर्मग्रंथांवर ठेऊन 'चोदनालक्षणार्थो धर्मः' म्हणणाऱ्या पूर्वमीमांसादर्शनसंप्रदायानुयायी जनांचें म्हणणें कृष्णास संमत नाहीं व लोकांचें हिताहित तर्कानें (Reason) ठरवून तदनुसार धर्म ठरविणाऱ्या बौद्धादिकांचें म्हणणें कृष्णास पसंत नाहीं. म्हणून त्यांनीं या दोहोंचा समेट करण्याचा यत्न केला आहे.

१. धर्म+हृदय+पद्म+बोधकर=धर्म+मर्म+कमल+बोध करणारा=धर्माच्या हृदयरूपी पद्माचा विकास करणारा=धर्माचें रहस्य उघड करून दाखविणारा. धर्महृदय=धर्माचें खरें स्वरूप. २. सूर्य. सूर्य पद्माचा विकास करितो, हें प्रख्यात आहे. तस्मात् धर्महृदयावर पद्माचा आरोप केल्यामुळें सत्तर्क, श्रुति व अनुमान यांवर अर्काचा आरोप केला आहे. **परंपरित**रूपक. ३. उत्पत्ति (उत्कर्ष). ४. येथें 'तें धर्मकर्म बा ! समज' असा पाठ असता तर बरें झालें असतें. म्हणजे पूर्वार्धांत धार्मिक कर्माची व्याख्या व उत्तरार्धांत धर्माची व्याख्या-अशा दोन गोष्टींचें स्पष्टीकरण झालें असतें. ५. यांत **एकावली**नामक शृंखलामूल अलंकार आहे. एका पदार्थांत दुसरा, दुसऱ्यांत तिसरा असे पदार्थ एकांत एक ओंवण्यांत आले, म्हणजे हा अलंकार होतो. ६. मी जो केशव, त्या मला. केशव=केशाः प्रशस्ताः संत्यस्य=ज्याचे केश चांगले आहेत तो. येथें 'केशव' असें कृष्णानें आपणास कां म्हटलें ? ह्या शब्दाचें स्वारस्य कळत नाहीं. ७. विशेषेंकरून, प्रामुख्यानें 'अहिंसा परमो धर्मः' ह्या वाक्यावर कविकटाक्ष आहे. ८. पतन व विनाश यांपासून संरक्षण करितो-हा भाव. ९. प्रजापोषण करण्यास समर्थ. १०. प्राज्ञः+तोषं+जनयेत्=शहाणा+संतोष+उत्पन्न करावा. शहाण्यानें सौख्याची वृद्धि करावी-हा भाव. तत्+एव+शिव+पूजनं=तें+च+शंकर+पूजा=वर उपदेश केलेली सौख्याची वृद्धि हीच शिवाची पूजा. **शि**वाची निराळी पूजा नको. जगांतील सौख्य वाढविलें म्हणजे तीच शिवपूजा होय. आतां ही सौख्याची वृद्धि स्वतःची कीं इतर लोकांची ? प्रस्तुत स्थलीं **चार्वाकशाक्ता**दिकांच्या मतांचें दिग्दर्शन असल्यामुळें 'स्वसौख्य' असाच अर्थ घ्यावा. ११. वचनें, स्वसुखवृद्धिपर वचनें. १२. परस्त्रीगमनादिक. १३. त्यांचा धर्म कोणता ? तर परदारगमनादिक. १४. **चार्वाक**-

स्थापिति पाखंड कवी वेदोक्तिविरुद्ध धर्म मोक्ष असे. ।
त्यांसीं बोलों हि नये, त्या दुष्टमतीं न धर्म लेश वसे. ॥ ८३
वेदोक्तीसीं नसतां विरुद्ध जें प्राणिशर्मकर कर्म, ।
त्यातें म्हणतों आम्हीं सांदीपिनिसिंधुजीवनद 'धर्म.' ॥ ८४
'धर्माच्या संदेहीं निर्णायक वेदशब्द ही नाहीं; ।
तेंवी च लौकिकीं ही युक्ति पहातां असे चि ना कांहीं; ॥ ८५
तेथें काय करावें ?' म्हणसी तरि ऐक सांगतों मित्रा ! ।
**धर्माची बहु सूक्ष्मा गति आहे, आणिखी महाचित्रा ! ॥ ८६**
विप्रें चोरी केली, तें कळलें कर्म आपणा साचें; ।
याचा संदेह तया झाला, नेलें समस्त धन ज्यांचें. ॥ ८७
कथितां घात स्तेनीं विप्राचा, न कथितां हि धनिकाचा; ।
तेथें मौन धरावें. हा धर्म म्हणों नको चि मनिं कोचा. ॥ ८८

---

सिद्धांतांत मरणाला मुक्ति ही संज्ञा आहे. त्यांच्या मतें परलोक, आत्मा वगैरे नाहीं. मरणानंतर पंचभौतिक देह त्या त्या भूतांत पुनः जाऊन मिळाल्यामुळें कांहींएक बाकी उरत नाहीं. म्हणून तीच मुक्ति (सुटका) असा त्यांचा सिद्धांत.

१. वेदांस न मानणारे, नास्तिक. वेदोक्तिविरुद्ध [जो] धर्म [तो] मोक्ष असे, [असें] कवी (बुद्धिवान) पाखंड (नास्तिक लोक) स्थापिति (प्रस्थापित करितात)–असा अन्वय. [पाखंड='पा' शब्देन त्रयीधर्मः पा रक्षण इति स्मृतेः । तं खंड्यन्ति ये तर्कैस्ते पाखंडा इति स्मृताः.] (मागें पृष्ठ २९१ टीप १५ पहा). २. बुद्धिकुशल. त्यांचे सिद्धांत त्यांच्या अव्याहत तर्कांचे परिणाम होत, हें दाखविण्याकरितां 'कवी' (शहाणे, बुद्धिशील) हा शब्द वापरला आहे. ३. या गीतींत कृष्णानें आपली धर्माची व्याख्या दिली आहे. वेदोक्तीसीं=वेदवचनाशीं. ४. जीवांस कल्याण-दायक. ५. सांदीपिनि+सिंधु+जीवन+द=सांदीपिनि+समुद्र+पाणी+देणारा=सांदीपिनि हाच कोणी समुद्र त्याचें पाणी शोषून बननेले मेघ. (जलद=वारिद=मेघ). समुद्रापासून मेघास वाफेच्या रूपानें पाण्याचा यथेच्छ पुरवठा होतो, त्याप्रमाणेंच गुरूपासून शिष्यास विपुल ज्ञान प्राप्त होतें. सांदीपिनि हा बलिराम व कृष्ण यांचा अवंति येथील गुरू. ही सर्व गीति पंतांचीच कृति आहे. त्यातें=त्या कर्माला. आम्हीं=सांदीपिनीचे शिष्य. ६. निर्णय करणारा असा. ७. सामान्य जनाच्या युक्तिवादांत. जेथें एकाद्या गोष्टीबद्दल संशय उत्पन्न होऊन तेथें स्पष्ट वेदवचन सांपडत नाहीं, किंवा लोकव्यवहारांतील युक्तिवादाचीही गति जेथें कुंठित होते, तेथें काय करावें ? याबद्दल कृष्णाचें भाषण. ८. अतिविचित्र. ९. ब्राह्मणानें चोरी केली असा संदेह. १०. ज्याचें (ज्या धनिकाचें) समस्त धन नेलें तया याचा (ज्या ब्राह्मणानें चोरी केली त्याचा) संदेह झाला (संशय आला)–असा अन्वय. ११. चोर अशा. १२. कच्चा.

मौनें हि सिद्धि[1] नसतां, स्पष्ट वहाव्या विचारितां आणा[2]; ।
अनृत नव्हे तें[3], सत्य चि; भावोजी[4]! तुम्हि असें मनीं आणा. ॥ ८९
व्रत घेउनि कर्म विहित[5] न करी तो स्वीकृतव्रतफळाला[6] ।
पावेना[7] चि कधीं ही; दांभिक फटकाळ[8] केवळ जळाला[9]. ॥ ९०
मरणीं, विवाहकाळीं, ज्ञातिवधीं[10], मर्मभेदनावसरीं[11], ।
ज्ञात्या[12] मृषोक्ति[13] तारी; न[14] बुडवि वरुणासि भग्ननाव[15] सरीं[16]. ॥ ९१

---

१. मौन धरूनही शेवट न होईल तर. तूं मौन धरल्यामुळें त्यानें चोरी केली, अशी लोकांची शंका दृढ झाल्यास किंवा राजसभेंत बोलावून साक्ष देण्यास सांगितल्यास. २. शपथा. ३. अशा रीतीनें खोटें सांगणें. ह्या मृषासंबंधीं पुढील वचन लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे:- सत्यं न सत्यं खलु यत्र हिंसा । दयान्वितं चानृतमेव सत्यं ॥ हितं नराणां भवतीह येन । तदेव सत्यं न तथान्यथैव. ॥ (देवीभागवत.) ४. 'भावोजी' ह्या शब्दाचा अर्थ दीर किंवा मेहुणा. दुसऱ्या अर्थानें या शब्दाचा उपयोग देशस्थ ब्राह्मण आणि शूद्र हे अद्याप करितात. आपस्तंबसूत्र मानणारे सर्व ब्राह्मण मामाच्या व आतेच्या मुलीशीं विवाह करतात. त्या लोकांत मामा व आते यांचीं मुलें परस्परांचा, शालक (साळा) किंवा भावोजी, व साळी किंवा वहिनी अशा शब्दांनीं उल्लेख करितात. ५. त्या व्रतास योग्य असें. ६. अंगीकृत व्रताच्या फळाला. ७. हा सामान्य सिद्धांत आहे. याचा अपवाद पुढच्या गीतींत. ८. व्यर्थ बडबड करणारा. ९. नाश पावला. १०. कुलाचा नाश होत असतां. ११. एकाद्याच्या दुष्कर्मांची उघडीक होत असेल अशा वेळीं. मर्म=गुप्त दुष्कृत्य. भेद=फोडणें. १२. ज्ञानी पुरुषास. जो उगीच खोटें बोलत नाहीं, तर आवश्यकता पाहून आपत्तिसमयींच दुसऱ्याचें हित करण्याच्या हेतूनें खोटें बोलतो, त्यास-असा भाव. १३. मृषा+उक्ति=मिथ्या+भाषण=खोटें बोलणें. (मागें गीति ४१-४२ पहा). पंतकृत द्रोणपर्व, अध्याय २१ मध्यें अशाच अर्थाचीं वचनें आढळतात:-(१) अनृत बहुमत व्यसनीं (गीति ६७); (२) कवि अनृतेंहि जोडिती धर्मा. (गीति ११९); (३) प्राणात्यय-प्रसंगीं अनृत वदावें सुखें, असें आहे. (गीति १२१). १४. हा **दृष्टांत** फारच सुरेख आहे. मूळचा अर्थ यानें फारच स्पष्ट होत आहे. वरुण हा समुद्र व पाऊस इत्यादिकांचा अधिपति. तो एका नावेंत बसून लहानशा तलावांत विहार करीत असतां ती नाव फुटली तर तो त्यांत बुडेल काय? अर्थात् नाहीं. त्याचप्रमाणें 'ज्ञाता' मनुष्य सर्व धर्माधर्मांचें मर्म जाणणारा व धर्माप्रमाणें चालणारा असून नेहमीं सत्य बोलतो, पण आपत्प्रसंगीं केवळ दुसऱ्याचें कल्याण व्हावें म्हणून खोटें बोलतो, त्यामुळें तो बुडत नाहीं-असा भाव. ह्या गीतींत 'तारी' व 'न बुडवी' हे साधारण धर्म एकाच अर्थाचे असून ते भिन्न शब्दांनीं निरनिराळ्या म्हणजे विधि-निषेधरूप वाक्यांत घातले आहेत, म्हणून येथें वैधर्म्येंकरून **प्रतिवस्तूपमा** अलंकार झाला आहे. १५. फुटकी नौका. १६. सरोवरांत. सरस्=तळें, उदक.

जो रानीं चोरानीं धरिला '[1]तेणें घडावया [2]मुक्ती, ।
लेश विचार न करितां बोलाव्या तेथ शत [3]मृषा उक्ती. ॥ ९२
असतां शक्य न द्यावें धन चोरांला, मृषा हि बोलावें; ।
राहे धन, पुण्य घडे अनृतें, तरि कां सुखें न डोलावें ? ॥ ९३
अनृतें वांचत असतां अनृत न बोलेल, वित्त [4]चोरांसी ।
देईल [5]त्यांसि तें धन शापील; पहा पुसोनि थोरांसी. ॥ ९४
तस्मात् [6]धर्मार्थ अनृत वदतां सत्यव्रता नसे हानी; ।
ऐसा चि विचार मनीं धरिला सद्धर्म[7]सद्रसेहानीं. ॥ ९५
हें धर्माचें लक्षण, न [8]अतिक्रमितां चि [9]धर्ममर्यादे ।
कथिलें म्यां [10]सुहृदें तुज; यांसि स्थळ हृदय मित्रवर्या ! दे[11]. ॥ ९६
तत्व यथामति कथिलें धर्माचें म्यां तुला [12]अतापार्थ, ।
कीं, मज वाटे, पावो कीर्ति [13]सुधर्मज्ञसंमता पार्थ. ॥ ९७
हें सर्व ऐकिलें कीं ? इकडे मज [14]मातुलात्मजासि पहा; ।
बोल [15]विशंकें स्वमुखें जरि तुज वाटेल वध्यसा [16]नृप [17]हा.' ॥ ९८

---

## अध्याय [17]बेचाळिसावा.

### ( अर्जुनकृत धर्मनिंदा व स्वस्तुति. )

अर्जुन म्हणे, '[18]विशुद्धज्ञानघना ! गुरुवरा ! हितकरा ! [19]यां ।

---

१. 'त्याची' असा पाठ आहे. त्याचा स्वीकार केल्यास सरळ अर्थ लागतो. तेणें=त्यानें. २. (आपली) सुटका. ३. खोट्या. ४. रा० पराडकर यांच्या प्रतींत 'चोरासी' असा पाठ आहे. ५. धन चोरांस देणाऱ्यास. ६. धर्माकरितां, धर्माचें (लोकक्षेमरूपी धर्माचें) रक्षण करण्याकरितां. ७. सत्+धर्म+सत्+रस+ईह=सद्धर्मरूप सद्रसाची (अमृताची) इच्छा करणारांनीं. ८. उलंघितांच. ९. धर्माची मर्यादा न उल्लंघितां, म्हणजे अधर्माच्या परिघांत न शिरतां. १०. मित्रानें; किंवा-प्रेमळ अंतःकरणानें. ११. सदोदित मनांत वागीव. १२. अ+ताप+अर्थ=दुःख न व्हावें म्हणून, सुख होण्याकरितां. १३. उत्तमधर्म जाणणाऱ्यांस संमत अशी. १४. मामाच्या मुलास. आजोळचें नातें ज्यास्त प्रेमळ असतें, म्हणून हें पद या स्थळीं सहेतुक आहे. वसुदेव हा पांडवांचा मामा म्हणजे कुंतीचा भाऊ होय. १५. निःशंक. १६. धर्म. १७. अध्याय ६९ श्लोक ६८-८८; व अध्याय ७० श्लोक १-४१ हा मुळांतील कथाभाग यांत आला आहे. १८. विशुद्ध+ज्ञान+घना=संशयानें रहित (निसंदिग्ध) असें ज्ञान हेंच कोणी पाणी त्यास घना (मेघा) प्रमाणें (वर्षाव करणारा), अर्थात् भक्तास यथेच्छ ज्ञान देणारा. १९. प्रस्तुतच्या.

ऐशा [1]व्यसनसहस्रीं तूं [2]चि क्षेम आमुचें हित कराया. ॥ १
जैसा [3]हा ऐसा चि [4]स्वाश्रितजन तार. कोप दे [5]शमळ ।
हें जाणत भुललों, परि नुरवि तुझा [6]तारकोपदेश [7]मळ. ॥ २
[8]भवदुपदेश [9]सदंजन ल्याली मति, सर्व [10]मोहपडळमळ ।
गेला चि, [11]पद्महस्ता! विवेकदृष्टींत लेश [12]न डळमळ. ॥ ३
[13]आर्याचें चि न केवळ, माझें हि न, धर्मसेतुचें हि तसें ।
रक्षण केलें बा! त्वां; तुजविण कोण्ही नसे दुजें [14]हितसें. ॥ ४
[15]हें व्रत म्यां चि न केलें, भीमें हि असें चि कीं, 'म्हणेल [16]मला ।
'तुवरक[17]' असें जो तो जन मारावा; असो [18]असाधु, भला.' ॥ ५
तूं माता, तूं चि पिता, [19]दाविशि लाविशि [20]हिता पंथा नीचा. ।
तव उपदेश [21]चि [22]निवंवी, दे [23]रस, पीतां हि, [24]तोष, [25]थानींचा. ॥ ६

---

१. अनेक संकटांच्या मिठींत. २. समर्थ. ३. धर्म. ४. तुझा आश्रय करणारा जो मी, त्या मला. ५. पाप. भगवद्गीतेमध्यें 'क्रोधाद्भवति संमोहः' (अध्याय २।६३) म्हणजे—क्रोधापासून संमोह होतो, म्हणजे कार्य व अकार्य यांचा भेद समजेनासा होतो—असें म्हटलें आहे. ६. तारक असा उपदेश. ७. अज्ञानरूप मळ. ८. भवत्+उपदेश=आपला उपदेश. ९. सत्+अंजन=उत्तम अंजन (दृष्टि निर्मळ करणारी वस्तु). १०. मोहरूप आच्छादनाचा मळ. ११. पद्मा (कमळा)-सारखा मृदु आहे हस्त ज्याचा अशा (कृष्णा). डोळ्यांत अंजन (काजळ) घालणाऱ्याचा हात हलका असला पाहिजे, तो आहे ज्याचा अशा. पद्महस्त ह्या पदावर श्लेष आहे. पद्महस्त=ज्याचे हात नाजुक आहेत असा, (पक्षीं) हातांत कमळ धारण करणारा. पद्महस्त हें विशेषण साभिप्राय असल्यामुळें येथें **परिकरालंकार** आहे. १२. डळमळ न=निश्चल आहे. माझा विवेक जागृत झाला व आतां माझ्या मनांत कांहीं संशय राहिला नाहीं. तुझा उपदेश पूर्णपणें बिंबला—हा भाव. १३. अन्वयः—त्वां [आज] केवळ आर्याचें चि (धर्माचेंच) [रक्षण] केलें [असें] न; [व केवळ] माझें हि [रक्षण केलें असें] न; [तर] तसें धर्मसेतुचें हि (सद्धर्माच्या सेतूचा जो आज भंग होत होता त्याचेंही) रक्षण केलें. १४. हित+असें=हितकर+असलेलें=हित करणारें. १५. हें=अशा प्रकारचें, मागचा पुढचा विचार न करितां अंगीकारिलेलें. व्रत=प्रतिज्ञारूपी व्रत. १६. भीमाला. १७. नपुंसक. १८. दुर्जन (किंवा) सज्जन. १९. नीचा [ही] हिता पथा दाविशि [व त्यास हिता पथा] लाविशि—असा अन्वय. नीचाला देखील तूं हितकर मार्ग दाखवितोस व त्याला त्या मार्गाला लावितोस—असा अर्थ. येथें 'ही' हें पद अध्याहृत आहे. २०. कल्याणाच्या मार्गाला. २१. 'चि' या पदानें इतर पदार्थ निववविण्यास असमर्थ आहेत, असें सुचविलें आहे. २२. शांत करी, समाधान देई. २३. थानींचा रस म्हणजे आईचें दूध. 'मातेचें सर्व रसवर स्तन्य' [पुढें

गति तूं चि आमुची बा ! आश्रय आम्हांसि तूं चि [1]मावासा ! ।
महिमा तुझा नव्हे गा ! या [2]ब्रह्मांडोदरांत [3]मावासा. ॥ ७
तूं आद्य गुरु सम[4]स्तां धर्मज्ञांचा, तुझें चि मत [5]मानें; ।
बा ! [6]भवदुपदेश, तसा [7]दशशतकर ही लयासि न [8]तमा ने. ॥ ८
[9]राजा [10]अवध्य कळलें, [11]धर्माधर्मांबुदुग्धहंसा ! रे ! ।
[12]संसारेभमृगपते ! संशय उरला नसे चि [13]कंसारे ! ॥ ९
[14]वध हि न घडे, [15]प्रतिज्ञारक्षण ही होय, वद असें कांहीं; ।
देवा[16] ! न म्हणावें तव भक्ता '[17]भग्नप्रतिज्ञ' लोकांहीं. ॥ १०
[18]तापें [19]उलतां, सकरुण दीनासि म्हणेल कोण 'न उलं[20]' गडी ? ।

---

अध्याय ४५ गीति १५ पद्य] २४. सर्व रसांत श्रेष्ठ जें आईचें दूध, तेंही पितां (एक वेळ) ताप देईल, पण तुझ्या उपदेशानें नेहमींच समाधान होतें–हा भाव. २५. स्तनाचा, स्तनांतील. थानींचा रस पीतां हि ताप दे–असा अन्वय.

१. हे लक्ष्मीनिवासा. २. ब्रह्मांडाच्या पोटीं. ३. मावण्यासारखा. ४. 'तूं आद्य गुरु समस्तां धर्मज्ञांला तुझेंचि मत मानें' असाही पाठ आहे. ५. रुचे, पसंत पडतें. ६. भवदुपदेश (तुझा उपदेश) [जसा] [तमा] (अज्ञानरूपी अंधकारास) लयासि [ने], तसा दशशतकर ही [तमा] (अंधकारास) [लयासि] न ने–असा अन्वय. ७. सहस्रकर सूर्यही. ८. येथें 'तम' शब्दावर **श्लेष** आहे. अंधकारास; (पक्षीं) अज्ञानास. ९. राजा=राजा ह्या नात्यानें, धर्म हा राजा आहे म्हणून. १०. ज्यास मारूं नये असा. ११. धर्म+अधर्म+अंबु+दुग्ध+हंसा=धर्म व अधर्मरूपी दूध व पाणी हीं वेगवेगळी करणाऱ्या हंसा ! हंसाला दूध आणि पाणी यांच्या मिश्रणांतून दूध वेगळें काढून पितां येतें–असा कविसंकेत आहे. प्रस्तुत स्थलीं 'धर्माधर्मदुग्धांबुहंसा' असा समास पाहिजे होता. कारण समासांतर्गतरूपकानें धर्माधर्मावर अनुक्रमें दुग्धाचा व अंबूचा आरोप केला पाहिजे. पण समासांतल्या शब्दानुक्रमास धरून धर्मावर अंबूचा व अधर्मावर दुग्धाचा आरोप आहे, असें दिसतें. छंदोभंगाच्या भीतीनें पंतांनीं हा सदोष शब्दक्रम ठेविला आहे, तथापि त्यांच्या मनांतील आशय स्पष्ट असल्यामुळें शब्दव्युत्क्रम करून अर्थ करण्यास हरकत नाहीं. १२. संसार+इभ+मृगपते=संसाररूप हत्तीच्या सिंहा ! संसारदुःखापासून मुक्त करणारा–असा भाव. १३. कंस+अरि=कंसशत्रो ! (कृष्णा !) १४. धर्मराजाचा वध. १५. 'गांडीव दुसऱ्याला दे, असें म्हणणाऱ्यास मारीन,' ही माझी प्रतिज्ञा. १६. उत्तरार्ध पूर्वार्धाचें कारण आहे, म्हणून **काव्यलिंग.** १७. ज्याच्या प्रतिज्ञेचा भंग झाला आहे असा. १८. पश्चात्तापानें; किंवा चिंतेनें. १९. तप्त होतां, उद्विग्न होतां. अन्वयः–[एकादा मनुष्य] तापें उलतां (पश्चात्तापानें दग्ध होत असतां) [त्याचा] कोण (कोणता) सकरुण (दयाळू, कळकळ बाळगणारा) गडी (मित्र) [त्या] दीनासि (त्या बिचाऱ्याला) 'न उल' (उलूं नको, पश्चात्तापानें दग्ध होऊन शुद्ध होऊं नको) [असें] म्हणेल

[1]संकटपाशनिबद्धप्राणिगणाला [2]त्वदन्य न [3]उलगडी.' ॥ ११
'[4]नृप वध्य नव्हे. [5]आतां, 'रक्षीं' म्हणसी जरि 'प्रतिज्ञा [6]ती,' ।
तरि ऐक; [7]वतन बुडतां न उपेक्षिति बा ! अरिप्रति [8]ज्ञाती. ॥ १२
मग तूं [9]तों '[10]कृष्णाचा प्रियसख,' सर्वस्व; जें तुला [11]जड तें ।
मजला चि, सख्या ! जैसें मातेस चि दुःख, [12]जें मुला जडतें. ॥ १३
हो [13]आमुची प्रतिज्ञा [14]मिथ्या, परि बा ! [15]तुझी न हो कांहीं, ।
[16]तें आमुचें चि यश, तुज वर्णावें '[17]सत्यसंध' लोकांहीं. ॥ १४
जीवंत [18]तों असावा धर्म, [19]वधावा न हाणतां [20]असिला, ।

---

[बरें] ? अर्थात्—पश्चात्तापानें दग्ध होऊन शुद्ध हो, असेंच कोणीही मित्र म्हणेल—असा भाव. ह्या गीत्यर्धांत 'म्हणेल' च्या ऐवजीं 'म्हणे न' असा पाठ असता तर तो उद्दिष्ट अर्थास परिपोषक झाला असता. २०. उलणें=फुटणें, दुभंग होणें.

१. संकटरूप बंधनानें बांधलेल्या प्राण्यांस. २. त्वत्+अन्य=तुझ्याहून दुसरा. ३. विमुक्त करी, सोडवी. ४. येथून कृष्णाच्या उत्तरास प्रारंभ होत आहे. 'कृष्ण म्हणे' वगैरे शब्दांनीं नेहमींप्रमाणें भाषणारंभ न करितां पुढें गीति २५ मध्यें शेवट मात्र 'ऐसें श्रीकृष्णाचें' इत्यादि शब्दांनीं केला आहे. ५. तेव्हां, जर. ६. अध्याय ४१ गीति १० यांत वर्णिलेली प्रतिज्ञा. ७. पूर्वार्जित वतनाचा जर परका मनुष्य अपहार करील, तर सर्व दायाद एक होतात व तें वतन दुसऱ्याच्या ताब्यांत जाऊं देत नाहींत. त्याचप्रमाणें आजपर्यंत सत्यप्रतिज्ञ म्हणून तूं जी कीर्ति मिळविली आहेस, ती घालविणें योग्य नाहीं—हा कृष्णाचा भाव. ८. दायाद; एका कुळांत उत्पन्न झालेले. ९. 'तों'=तर. या शब्दानें वरच्या गीतींतले 'ज्ञाती' (म्हणजे ज्यांच्यांत परस्पर वैर असतें) ते देखील वतनाकरितां एक होतात आणि तूं तर माझा प्रिय मित्र आहेस, असा भाव सुचविला आहे. १०. 'अर्जुन कृष्णाचा प्राणमित्र आहे,' या लोकोक्तीचा अनुवाद करण्याकरितां कृष्णानें स्वनामोच्चारण केलें आहे. तूं कृष्णाचा प्रियसख आहेस इतकेंच नाहीं, तर तूं त्याचें सर्वस्व आहेस—असा भाव. ११. जड=अवघड. 'पडतां जड भारी, दासें आठवावा हरी' ही तुकारामोक्ति प्रसिद्धच आहे. १२. दुःख. १३. माझी. १४. भीष्मावर चक्र धरून धांवून जाऊन कृष्णानें भक्ताकरितां आपली प्रतिज्ञा मोडली; त्या प्रसंगास उद्देशून हें वाक्य आहे. १५. तुझी प्रतिज्ञा. १६. 'सत्यसंध' [असें] लोकांहीं तुज वर्णावें (असें तुझें वर्णन केल्यास) तें आमुचें चि यश—असा अन्वय. सत्यप्रतिज्ञ म्हणून तुझी कीर्ति झाल्यास ती माझीच कीर्ति—हा भाव. १७. सत्यप्रतिज्ञ. कृष्णाचें भक्तवात्सल्य दाखविण्याकरितां पंतांनीं मुळांत नसतांही १३ व १४ या गीति रचिल्या आहेत. १८. तर. १९. पूर्ववाक्य व परवाक्य हीं परस्परविरोधी दिसतात, म्हणून **विरोधाभास**. २०. खड्गाला. 'असिला न हाणतां=असि न हाणतां' हा प्रयोग लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

युक्ति असे, घे; तूं मम सर्वस्वा पात्र, मग न कां असिला ? ॥ १५
जरि मान्य[२] मान पावे तरि तो जीवंत जीवलोकांत; ।
तो[३] मानभंग होतां जीवन्मृत[४], बुडति आप्त[५] शोकांत. ॥ १६
भीमादि तुम्हीं आते सर्व हि संमानितां सदा राया[६]; ।
भजतां विशुद्धभावें पांडुपृथाबुद्धिनें[७] सदारा[८] यां[९]. ॥ १७
मान्यातें 'तूं'[१०] म्हणतां, करितां अवमान, होय[११] वध; मानीं. ।
गुरुनिंदा[१२] लेश[१३] करीं, करिजे[१४] ते सर्वदा हि अधमानीं. ॥ १८
ज्ञानवयोवृद्ध[१५], मुनीश्वर, शूर हि मानिती[१६] अशा शुचितें[१७], ।
त्वां आजि ऐकवावीं वचनें जीं खळजनाननीं[१८] उचितें. ॥ १९
अपमानें गुरुचा वध होतो शस्त्राविणें चि 'तुं'कारें[१९]; ।
हें चि अथर्वांगिरसी[२०] श्रुति सांगे मान्यघात[२१] 'हुं'कारें[२२]. ॥ २०
अपमान तुवां करितां स्ववध चि केला असें गमेल नृपा; ।
मग पदनमनीं[२३] न मनीं कोप प्रभु धरिल, करिल फार कृपा. ॥ २१
अनृतापासूनि[२४] असा स्वगुरुवधापासुनी हि हो मुक्त, ।

---

१. युक्ति असे, [ती तूं] घे. तूं मम (माझ्या) सर्वस्वा पात्र, मग असिला (अशा युक्तीला) कां [पात्र] न ?—असा अन्वय. २. सन्माननीय असा कोणताही मनुष्य. ३. तो मानवंत. ४. जीवंत असूनही मेल्यासारखा. ५. इष्टमित्र व बांधव. ६. धर्माला. ७. पांडु आणि कुंती यांच्या ठायीं असलेल्या भावनेनें, अर्थात् पितृमातृभावानें, मोठ्या आदरबुद्धीनें. ८. स्त्रीसहित अशा. ९. धर्माला. १०. 'तुम्हीं' किंवा 'आपण' या सन्मानसूचक शब्दांनीं उल्लेख न करितां 'तूं' या एकवचनी शब्दानें उल्लेख केल्यास. ११. (त्या मान्याचा) वध होय, (असें तूं) मानीं (समज). १२. वडील भावाची निंदा. १३. थोडीशी, थोडा वेळ. १४. ते (ती) अधमानीं सर्वदा हि करिजे (करावी). [पण तूं अधम नसल्यामुळें थोडीशीच कर]—असा भाव. 'करिजेते' असें पाठान्तर. करिजेते=केली जाते. १५. ज्ञान आणि वय यांहींकरून वृद्ध (मोठे) असे. १६. सन्मानिती, गौरविती. १७. पवित्र असा जो धर्म, त्यातें. १८. दुष्टांच्या तोंडांत. १९. 'तूं' या वर्णानें. २०. अथर्वांगिरसी नांवाची श्रुति. २१. माननीय अशा जनांचा घात. २२. 'हुं' या वर्णानें. गुरूशीं जो हंबेतुंबे करून त्याचा उपमर्द करितो, तो स्मशानांत वृक्ष होतो आणि त्यावर कंक व गृध्र हे पक्षी असतात, अशी समजूत आहे. 'गुरुं हुंकृत्य तुंकृत्य विप्रं जित्वा च वादतः । स्मशाने जायते वृक्षः कंकगृध्रोपसेवितः ॥'. गुरुजनाविषयीं अर्जुनाची किती आदरबुद्धि होती हें भगवद्गीता, अध्याय २ श्लोक ४।५ यांतील त्याच्या उद्गारांवरून स्पष्ट दिसून येतें. २३. पायीं नमस्कार केल्यानें. मग पदनमनीं प्रभु मनीं कोप न धरिल—असा अन्वय. २४. प्रतिज्ञाभंगरूप खोट्यापासून.

या [1]धर्मसंकटीं तों आम्हाला हें चि भासतें युक्त. ॥ २२
देईल सकृप नृपवर तुज आशीर्वाद पाद धरितां ची; ।
करिल क्षमा क्षमाधव; [3]निवर्ते सुजनमन नमन करितां ची. ॥ २३
[4]हें तों अत्यावश्यक कार्य [5]स्वार्यप्रसाद घे आधीं; ।
मग [6]सगण कर्ण मारुनि निर्मल यश [7]शस्त्रिभूषणा! साधीं.' ॥ २४
[8]ऐसें श्रीकृष्णाचें भाषण ऐकूनि विजय [9]उत्साहे, ।
[10]खेद हि पावे; परि करि तो धर्माची विशंक कुत्सा [11]हे. ॥ २५
जिष्णु म्हणे धर्मातें, 'राया! करिसी [12]वृथा चि [13]कुत्सा; [14]हें ।
[15]तरि शोभतें तुज जरी टिकतासि रणांगणांत उत्साहें. ॥ २६
त्यजुनि रण तुज न टिकवे दूर क्रोशावरी हि [16]तो मातें ।
निंदिसि, [17]उच्चपदस्थित [18]शिवशिरधत्तूर जेंवि [19]सोमातें! ॥ २७

---

१. धर्मसंरक्षणाच्या (धर्माप्रमाणें वागण्याचे वेळीं उत्पन्न झालेल्या) संकटसमयीं. २. भूपति. क्षमा=पृथ्वी. ३. शांत होतें. हें वाक्य सुभाषितरूप आहे. ४. धर्मास नमस्कार करून आशीर्वाद घेणें. ५. स्व+आर्य+प्रसाद=आपला जो वडील भाऊ, त्याचा आशीर्वाद. ६. परिवारासह. ७. शस्त्रें धारण करणाऱ्यांचें भूषणच अशा. अर्जुनाची समजूत घालण्याचे प्रसंगीं असलें उत्तेजनपर पद घालण्यांत फार धोरण आहे. ८. ही गीति रा० पराडकर यांच्या प्रतींत नाहीं. ९. उत्साह पावे. धर्मास मारण्याचें टळलें म्हणून संतोष पावे. हें क्रियापदाचें रूप लक्षांत घेण्यासारखें आहे. १०. धर्माची निंदा करावी लागणार म्हणून चिंता पावे–हा भाव. ११. हे कुत्सा=ही पुढील निंदा. १२. कारण नसतां. १३. माझी निंदा. १४. अशा प्रकारें कुत्सा करणें. १५. अन्वयः–जरी रणांगणांत उत्साहें टिकतासि तरि तुज हें शोभतें (शोभलें असतें). १६. अशा प्रकारचा. १७. उच्च+पद+स्थित=उंच पदावर बसलेला असा. हें 'धत्तूरा'चें विशेषण. ज्याप्रमाणें चंद्रास मस्तकावर धारण करणाऱ्या शंकराच्या मस्तकावर वाहिलेलें धोतऱ्याचें फूल, चंद्राच्याही वर राहात असल्यामुळें, त्यानें स्वतःच्या अंगीं सुवासादि गुण नसतांही, केवळ 'उच्चपदस्थित' असल्यामुळें, चंद्राचा उपहास करावा, त्याप्रमाणें तूं (धर्म) स्वतः पराक्रमी नसतां, केवळ वडील भाऊ आहेस म्हणून, माझी निंदा करितोस!–असा स्पष्टार्थ. १८. महादेवाच्या (लिंगाच्या) डोक्यावर वाहिलेलें धत्तूर नामक पुष्प. धत्तूरपुष्प शंकराला फार आवडतें–अशी समजूत आहे. 'महेशस्त्वां धत्ते शिरसि' इत्यादि सुभाषित प्रसिद्धच आहे. १९. चंद्राला. ही गीति लिहितांना पंतांच्या मनांत पुढील सुभाषितांतील कल्पना घोळत होती, असें वाटतें:–असज्जनः सज्जनसङ्गिसङ्गात्करोति दुःसाध्यमपीह साध्यम् । पुष्पाश्रयाच्छम्भुशिरोधिरूढा पिपीलिका चुम्बति चन्द्रबिम्बम्.॥ ह्याचा अर्थः–असज्जन पुरुष सज्जनांच्या संगतीनें ह्या लोकीं जें कष्टानें

निंदो तो मज, मर्दी जो शतशः संगरीं गज, गदीश[1], ।
जैसा कल्पांतींचा रुद्र महात्मा अभंग जगदीश. ॥ २८
युद्धीं जो [2]उत्साही, [3]साहित्या ही रथादिका न गणी; ।
[4]गजयूथीं सिंह तसा [5]शिरतो स्वबळें [6]भटप्रधानगणीं. ॥ २९
[7]जों बहुबळ रिपु पाहे तों हर्षे फार भीम, शर भाते ।
विसरे, भुजीं च कवळी. जिंकिति [8]अरिहरि न [9]भीमशरभा ते. ॥ ३०
[10]तो [11]त्वदधिक मदधिक मज निंदो, तूं निंदिसी बळें [12]कवणें ? ।
[13]गुड निंदिजे तदधिकें [14]खंडें, परि कोणत्या गुणें [15]लवणें ? ॥ ३१
जो [16]गांधारीसुतशतघातख्यातव्रत [17]स्वतःक्षम [10]तो ।
निंदो मज, [18]निजधर्मी [19]त्वदधिक [20]शिक्षाक्रियादिकें गमतो. ॥ ३२
[21]खलबलजलधिप्रति मीं [22]वडवानळ, [10]तो [23]अगस्त्य, तूं [24][25]वटेसा, ।

---

सुद्धां मिळणार नाहीं, तें सहज मिळवितो. ह्यास दृष्टान्त असा कीं, मुंगी ही फुलाच्या आश्रयानें शंकराच्या मस्तकावर आरूढ होऊन चंद्रबिंबाचें चुंबन घेते.

१. गदी+ईश=गदायुद्धांत प्रवीण+स्वामी (श्रेष्ठ)=गदाधरश्रेष्ठ असा **भीम**. २. उत्साह आहे ज्यास असा (भीम). ३. रथादिका साहित्या ही न गणी–असा अन्वय. ४. गजसमूहांत. ५. कर्ता अध्याहृत '**भीम**.' ६. प्रमुख वीरांच्या समुदायांत. ७. विशेष बलवान् शत्रु पाहिल्याबरोबर अत्यानंदानें **भीम** बाण व भाते विसरून आपल्या भुजानेंच त्यास घट्ट मिठी मारीत असे–हा या गीतीच्या प्रथम चरणत्रयाचा भाव. ८. शत्रुरूपी सिंह. ९. **भीम**रूप शरभाला. शरभ हा सिंहापेक्षांही फार भयंकर श्वापद आहे, अशी समजूत आहे. पण हा प्राणी केवळ काल्पनिक दिसतो. ते अरिहरि भीमशरभा न जिंकिति–असा अन्वय. १०. भीम. ११. त्वद्+अधिक= तुझ्याहून अधिक. १२. कवणें बळें=कोणत्या बळानें? तुझ्यांत काय सामर्थ्य आहे म्हणून? १३. गूळ. 'गुडौ गोलेक्षुविकृती स्नुही गुडिकयोर्गुडः' इति रुद्रः । तदधिकें खंडें गुड निंदिजे परि कोणत्या गुणें लवणें (मिठानें) [गुड निंदिजे]–असा अन्वय. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. अलंकार **प्रतिवस्तूपमा**. साधारणतः प्रतिवस्तूपमेंत पूर्वोत्तरवाक्यवर्णित धर्मांत वस्तुप्रतिवस्तु-भाव असतो. पण कित्येक प्रसंगीं पूर्वीचाच धर्मवाचक शब्द पुनः वापरलेला असतो, त्याचें हें उदाहरण आहे. १४. खडीसाखरेनें. १५. मिठानें. १६. **गां**धारीचे शंभर पुत्र मारण्याविषयीं प्रख्यात आहे ज्याचें व्रत असा. १७. दुसऱ्याच्या मदतीशिवाय समर्थ. १८. आपल्या धर्मांत, क्षत्रियधर्म पाळण्यांत. १९. तुझ्यापेक्षां श्रेष्ठ. २०. शत्रुशिक्षारूपी प्रत्यक्ष कर्मादिकांनीं. किंवा शिक्षण व पराक्रम इत्यादिकांनीं. २१. दुष्टसैन्यरूप समुद्रास. २२. पाणी दहन करणारा अग्नि. २३. अगस्त्यानें ज्याप्रमाणें समुद्र पिऊन टाकिला, त्याप्रमाणें भीम सर्व शत्रूंना एकदम नाश

भट साचा[1] नससि, दिससि[2] भटसा, चाळविसि या[3] जना नटसा[4]. ॥ ३३
गज आजि आठ शत ज्या वीरें घटिकेंत मारिले, जरि तो ।
निष्ठुर बोलेल तरी बोलो, विक्रम तसा[5] चि तो[6] करितो. ॥ ३४
जो[7] भुजबळसंपन्न[8] क्षत्रिय तो चि, प्रसिद्ध हें लोकीं; ।
वाग्बळ[9] तो चि ब्राह्मण; तूं वाग्बळ, वेद सर्वदा[10] घोकीं. ॥ ३५
ब्राह्मण[11] मृदु, तूं निष्ठुर, निंदिसि मज, तूं चि निंद्य, मीं न, जनीं. ।
सर्वस्वें भजतों परि नाहीं सुख पावलों तुझ्या भजनीं. ॥ ३६
वेचुनि[12] धन[13] सुतरत्न[14] हि, जीवित संकल्पिलें[15] तुझ्या काजीं, ।
तदपि वदसि असिं वचनें, न वदावीं शत्रुला, न रंकां[16] जीं[17]. ॥ ३७
कृष्णातल्पीं[18] बैसुनि अवमानिसि मज महारथघ्नातें[19] ।

---

करून टाकितो–हा भाव. २४. धर्म. २५. समुद्र खवळला म्हणजे त्यापुढें [समुद्राच्या किनाऱ्यावरील] वटवृक्षाचें कांहीं चालत नाहीं अशा वडासारखा. किंवा–प्रलयकालीन समुद्राच्या लाटांचे दुःसह आघात बसत असतांही नष्ट न होणाऱ्या (पण त्याचा कांहीं प्रतिकारही न करणाऱ्या) अक्षय्यवटासारखा.

१. खरा. २. फक्त वरकांती दिससी–हा भाव. ३. या सैन्यादिकांस. ४. नटव्यासारखा, सूत्रधारासारखा. स्वतः कांहींएक कर्तबगारी न करतां या सर्व सैन्यावर हुकूम चालवून त्यांच्या हातून मात्र काम करवितोस–हा भाव. ५. त्या बोलण्यास शोभेल अशा प्रकारचा (विक्रम). ६. भीम. ७. जो भुजबळसंपन्न तो चि क्षत्रिय, हें लोकीं प्रसिद्ध–असा अन्वय. ८. भुजबळानें युक्त. अनुरूप गीत्यर्धः–शूर भुजांनीं क्षत्रिय, शब्दांनीं विप्र, पार्थ चापानें. । (पंतकृत द्रोणपर्व, अध्याय १७।३७). ९. वाक्पांडित्य करणारा. १०. कल्पनासादृश्यः–'स्वाध्याय तुझें बळ, तूं ब्राह्मण, कैंचें असह्य तेज तुला ? ।' (पंतकृत आदिपर्व–अध्याय ३४।१४). ह्यासंबंधीं भवभूतीनें आपल्या उत्तररामचरित्र नाटकांत असें म्हटलें आहेः–सिद्धं ह्येतद्वाचि वीर्यं द्विजानां । बाह्वोर्वीर्यं यत्तु तत्क्षत्रियाणाम्. ॥ (अंक ५।३२) ह्याचें रूपान्तरः–वाणीमध्यें वीर्य आहे द्विजांचें । बाहूंमध्यें राहतें क्षत्रियांचें. ॥ (कै० परशुरामपंत तात्या गोडबोले). ११. वर तुला ब्राह्मण म्हटलें आहे तेंही योग्य नाहीं. कारण ब्राह्मण मृदु वचनें बोलतो, आणि तूं तर निष्ठुर वचनें बोलतास–हा पार्थाचा भाव. १२. खर्चुनि. १३. दिग्विजयानें संपादिलेलें धन. १४. पुत्ररत्न अभिमन्यु. १५. सोडण्याविषयीं संकल्प केला. १६. क्षुद्राला, भिकाऱ्यास. १७. वचनें. १८. द्रौपदीच्या पलंगावर. प्रस्तुत स्थलीं 'कृष्णातल्पीं' हा साभिप्राय शब्द आहे. मत्स्ययंत्रांतून शरसंधान करून अर्जुनानेंच कृष्णा (द्रौपदी) मिळविली होती (पंतकृत आदिपर्व, अध्याय ३५ पहा). तेव्हां ही द्रौपदी माझ्या शौर्यानेंच मिळाली असतां तिच्याच पलंगावर बसून माझी निंदा करणें अयोग्य–हा भाव. १९. मोठ्या वीरांचा नाश करणारास.

[1]जें काय स्वहितकरीं निष्ठुरपण साजतें कृतघ्नातें. ॥ ३८

यद्यपि कथिला स्वमुखें स्ववधोपाय हि तुला, तथापि तया[2] ।

वधिता काय[3] शिखंडी, धृतराष्ट्राच्या[4] महारथा पितया? ॥ ३९

पांचाळ[5] रक्षिला म्यां, वधिला म्यां तो[6] हि; काय कापूस ।

मांडेल ज्वलनासीं[7]? हें त्या चि सुसाधुनायका[8] पूंस[9]. ॥ ४०

तुज राज्य काय होय द्यूतरता[10]? नैकसी[11] च हितवाचा, ।

स्वाश्रयसह[12] नरकांत चि बुडतो स्त्रीबंधुवर्ग कितवांचा[13]. ॥ ४१

सहदेव द्यूताचे दोष वदे, तुज न सोडवे[14], गा! तां ।

केला घात, न शंकसि आम्हांवरि आजि गोडवे[15] गातां. ॥ ४२

रिपुबल[16]जलनिधिमाजि हि कोण्ही तरि जन तरेल अक्षत[17] रे! ।

श्रुत[18] जरि असेल तरि वद, कोण्ही[19] द्यूतीं धरूनि अक्ष[20] तरे[21]? ॥ ४३

---

१. जें काय स्वहितकरीं (आपलें हित करणाऱ्यावर) निष्ठुरपण [तें] कृतघ्नातें साजतें–असा अन्वय. हितकर्त्यांशीं निष्ठुरपणानें वागणें, जो कृतघ्न आहे त्यालाच शोभतें–असा भाव. २. तया महारथा धृतराष्ट्राच्या पितया (**भी**ष्मा) असा–अन्वय. ३. माझ्या सहायावांचून वधूं शकला नसता–हा भाव. ४. भीष्म धृतराष्ट्राचा चुलता. 'पितृ'शब्द बापाच्या भावांसही लावितात. ५. शिखंडी. **पां**चाल देशाचा, म्हणून हें नांव. ६. **भी**ष्म. ह्या गीतीशीं **पं**तांच्या आदिपर्वांतील अध्याय ३० गीति १२ ही ताडून पाहण्यासारखी आहे. ७. विस्तवाशीं. **प्रतिवस्तूपमा.** ८. उत्तम साधुजनांत श्रेष्ठ जो **भी**ष्म, त्यास. ९. विचार. भीष्म अद्याप शरपंजरीं पडलेला असल्यामुळें त्याला विचारणें शक्य होतें. १०. जुवेबाज अशा. ११. न+ऐकसी=नैकसी. येथें 'न' ह्या शब्दांतील 'अ'ला परसवर्ण आदेश झाला आहे. नसणें, नुघडी, नुरणें, नुमजे अशीं उदाहरणें वारंवार आढळतात. १२. स्व+आश्रय+सह=आपला आश्रयभूत जो (आश्रयदाता, पोशिंदा) त्यासह. हें गीत्यर्ध उत्तम सुभाषित आहे. 'स्वाश्रितसह' असें पाठान्तर. स्वाश्रितसह= आपल्या आश्रयास असलेल्या सर्व जनांसह. १३. जुगाऱ्याचा. १४. द्यूत न सोडवे. १५. गोडवे= अत्यंत प्रिय माणसांच्या गोड कथा. गोडवे=गोडसे. जसें कडवें–कडूसें, कडूसर. हा शब्द येथें उपरोधक आहे. 'गोडवे' या शब्दाचा प्रयोग 'गोपीगोडवे' या आपल्या प्रख्यात काव्यांत **पं**तांनीं केला आहे. अर्जुनाच्या म्हणण्याचा भाव हा कीं, अपराध तर तुझे; आणि निःशंकपणें आम्हांला मात्र निष्ठुर वाक्यें बोलतोस. १६. शत्रुसैन्यरूपी समुद्रांतून. एकाद्या प्रसंगीं शत्रूंनीं ज्याला गराडा घातला आहे, असा एकादा वीर त्यांतून सुरक्षित बाहेर पडेल–असा भाव. १७. जखम न होतां. १८. ऐकिलेलें. १९. कोणीही मनुष्य. २०. फांसे. २१. पार पडे. सर्वस्व नाश पावल्याशिवाय बाहेर आला? अक्ष हातीं घेऊन जुवेबाज बनलेला कोणताही मनुष्य धनकीर्त्यादिकांस गमाविल्यावांचून राहिला आहे, असें तुला ऐकून माहीत असेल तर सांग. असा कोणीही नाहीं–हा भाव.

शिवलासि जेधवां त्या अक्षांला [१]कुरुसभेंत तूं [२]पूज्य, ।
असत्सुखासि पडलें तेव्हांपासूनि आजवरि [३]पूज्य. ॥ ४४
दोहीं पक्षीं व्हाया वीरक्षय [४]हेतुं हे तुझे [५]पाय, ।
बा ! [६]यज्ञ भला केला; [७]गावें माहात्म्य हें तुझें काय ! ॥ ४५
[८]मेले नृप नृपनंदन, झाल्या विधवा [९]वरस्त्रिया कोटि, ।
[१०]खोटी धरितासि न मति तरि होती हानि कां असी मोटी ? ॥ ४६
करि [११]कुशलक्षयदक्षां अक्षां जो स्पर्श, तो चि हा [१२]कर कीं? ।
येणें चि राज्य बुडवुनि आम्हां [१३]स्ववशांसि लोटिलें [१४]नरकीं. ॥ ४७
[१५]शब्दप्रतोद टोंचिसि, खोंचिसि, पडतात काळजासि [१६]घरे; ।
खदिरांगारस्पर्शें बहु कठिन हि लोह तापतां [१७]विधरे. ॥ ४८
आम्हां हतभाग्यांला एक दिलें दुःख; हें चि बहु; देवा ! ।
भोगूं द्या तें आम्हीं; द्यावें न दुजें; दया करा, [१८]ठेवीं.' ॥ ४९
ऐसी गुरुनिंदा करि; परि धरि हरिसख असह्य अनुताप. ।

---

१. दुर्योधनाच्या सभेंत. २. इतरांनीं पूजिण्यास योग्य. ३. शून्य. अशीच कोटी मुक्तेश्वर-कवीच्या सभापर्वांत आढळते:—धर्म तो सर्वगुणीं पूज्य । म्हणोनि लोकपूज्यातें पूज्य । दुःखशोकां पाडिलें पूज्य । म्हणोनि लोकांतें पूज्य तो. ॥ (अध्याय ९।२०). ४. कारण. ५. पूज्यता व्यक्त करण्याकरितां वडील मंडळीस संबोधितांना 'पद' किंवा 'पाय' या पदाचा उपयोग करितात. पण प्रस्तुत स्थलीं निंदा असल्यामुळें हा शब्द 'आपले पांढरे पाय' किंवा 'आपलाच पायगुण' अशा अर्थानें योजलेला आहे. ६. रणयज्ञ. ७. हें तुझें माहात्म्य काय गावें (किती गावें ?)—फार गावें—असा अर्थ दिसतो, पण मुळींच गाऊं नये—हा भाव. म्हणून हा **व्याजस्तुति** नामक अलंकार. वर दिसणाऱ्या स्तुतीचें निंदापर किंवा निंदेचें स्तुतिपर पर्यवसान झालेलें असलें, म्हणजे हा अलंकार होतो. ८.'मेले नृप नृपनंदन, झाल्या विधवा वरस्त्रिया, खोटी । धरितासि न मति जरि, तरि होती ही हानि कां असी मोटी ? ॥' असाही पाठ आहे. ९. श्रेष्ठ अशा स्त्रिया. १०. खोटी मति=वेडेपणाचा विचार, आपली हानी करणारा विचार. ११. कल्याणाचा नाश करण्यांत दक्ष अशा. १२. धर्माचा हात. तो हा चि कर कीं ?—असा अन्वय. १३. तुझ्या स्वाधीन असणाऱ्यांस, तुझ्या आज्ञेंत वागणाऱ्यांस. १४. पारतंत्र्यरूपी नरकांत. १५. शब्दरूप चाबकाणी, पराणी. ही पराणी गाडीचे बैल हांकण्याकरितां लहान काठीच्या शेवटीं लोखंडाचें तीक्ष्ण टोंक खुपसून केलेली असते. १६. छिद्रें, भोकें. १७. वितळून जातें. १८. तें दुसरें दुःख आपल्याच जवळ ठेवा; कृपा करून त्याचा आमच्यावर प्रयोग करूं नका—हा भाव. 'दयाकरा ! ठेवा' असें पाठान्तर.

तापप्रद होईल चि घडतां [१]भगवज्जनास ही पाप. ॥ ५०
[२]भगवदनुमतें केली, संकट जाणोनि धर्म रक्षाया; ।
तदपि बहु व्याकुळ करि गुरुनिंदा [३]स्वगुरुदास्यदक्षा [४]यां. ॥ ५१
पुनरपि [५]कपिकेतन घे असि त्यासि तदा [६]गदाग्रज विचारी; ।
'कां गा! खड्ग उपसिला? मज भाससि तूं [७]तसा चि अविचारी.' ॥ ५२
[८]फाल्गुन म्हणे, 'प्रभो! मीं गुरुनिंदक; मज न दे चि सुख काय; ।
करितों स्ववध स्वकरें. दावावें म्यां जनांत मुख [९]काय?' ॥ ५३
देव म्हणे, 'रे! सुज्ञा! गुरुची [१०]निंदां करूनि [११]दुःख असें; ।
हत्या केली असती तरि मग करितासि, सांग, [१२]काय कसें? ॥ ५४
यास्तव म्हणतों नाहीं तुज [१३]वृद्धांची उपासना घडली; ।
धर्म न जाणसि कांहीं; [१४]भ्रांति तुझ्या बुद्धिच्या गळां पडली. ॥ ५५
काय म्हणावें वेड्या! तुजला, करितोसि [१५]आत्मघात कसा? ।
पातक सामान्य न [१६]हें; निंद्य नसे [१७]अन्य [१८]आत्मघातकसा. ॥ ५६
जातासि घोर नरकीं भ्रातृवधें रक्षितां हि त्या [१९]सत्या. ।
[२०]अत्याकुल घोरतरीं नरकीं तुज [२१]करिल हे तुझी हत्या. ॥ ५७

---

१. भागवतांसही; भगवंताचे जन ते भगवज्जन. २. कृष्णाच्या आज्ञेनें. ३. आपल्या गुरूची (वडील माणसांची) सेवा करण्याविषयीं तत्पर अशा. ४. अर्जुनास. ५. वानरध्वज, अर्जुन. ६. कृष्ण. गद+अग्रज=गदाचा वडील भाऊ (कृष्ण). गद नांवाचा कृष्णाचा लहान भाऊ होता. ७. पहिल्याप्रमाणेंच, जशाचा तसाच. म्हणजे माझा इतका उपदेश केवळ अरण्यरुदित ठरला व तुझा कोप शमला नाहीं—हा भाव. ८. अर्जुन. अर्जुनाला निरनिराळीं दहा नांवें होतीं:— अर्जुन, फाल्गुन आणि जिष्णु। किरीटी, पांचवें श्वेतवाहनु। बीभत्सु, विजयी आठवें कृष्णु। सव्यसाची, धनंजय. ॥ (मुक्तेश्वरकृत विराटपर्व, अध्याय ६।७५). येथें फाल्गुन ह्या नांवाचा उल्लेख सहेतुक केलेला दिसतो. कारण अर्जुनानें 'शिमगा'च मांडलेला आहे. **परिकरांकुरा-लंकार**. फाल्गुन=फाल्गुनमास, शिमग्याची पौर्णिमा. ९. दावूं नये—हा भाव. १०. फक्त निंदा केल्यानेंच. ११. असें दुःख [प्राप्त झालें]—असा अन्वय. १२. काय करितासि [व] कसें करितासि सांग—असा अन्वय. १३. ज्ञानवृद्धांची (म्हाताऱ्यांची नव्हे) सेवा (मागें अध्याय ४१ गीति १५ व १६ पहा). तसेंच भगवद्गीता, अध्याय ४ श्लोक ३४ पहा. १४. धर्माविषयींची भ्रांति. धर्मास अधर्म व अधर्मास धर्म भासविणारी भ्रांति—हा भाव. १५. आत्महत्या. १६. आत्मघात करणें. १७. कोणताही इतर मनुष्य. १८. आत्मघात करणाऱ्यासारखा. १९. प्रतिज्ञारूपी सत्यास. २०. अति+आकुल=फार व्याकुळ. २१. तुझी हे हत्या (आत्मघात) घोरतरीं (भ्रातृवधामुळें प्राप्त होणाऱ्या नरकापेक्षां जास्त भयंकर अशा) नरकीं तुज अत्याकुल करिल—असा अन्वय.

[1]केलें गुरु गुरुनिंदापातक म्हणवूनि आत्मघात कवी ।
कोण करिल? तें प्रायश्चित्त कसें, जें अनंत[3] पातक वी ? ॥ ५८
आम्हां इष्टां मित्रां धर्मादिसहोदरांसि शोकांत ।
घालूं पाहसि मागुति[4] आत्मवधें; हें अयुक्त[5] लोकांत. ॥ ५९
स्ववध करावा चि असा आग्रह जरि कीं असेल चित्ताचा, ।
आम्हां तों[6] मान्य नसे, कृपणांसि जसा विनाश वित्ताचा[7]. ॥ ६०
आतां असें तरि करीं, न चुके जन चालतां पथें[8] बा ! गा ! ।
स्वगुणोदधिच्या[9] स्वमुखें एका, टाकूनि ताप, थेंबा गा. ॥ ६१
परनिंदेनें परवध, आत्मस्तवनें हि आत्मवध होतो. ।
हो[10] तोष[11] या वधें; तो सर्वांचा वध, न आत्मवध हो! तो. ॥ ६२

---

१. अन्वयः–गुरु गुरुनिंदापातक केलें म्हणवूनि (म्हणून) कोण कवी (शहाणा) आत्मघात करिल ? (कोणीही करणार नाहीं–हा भाव.) [कारण] जें अनंत पातक वी (उत्पन्न करी) तें (आत्मघातरूपी) प्रायश्चित्त कसें ? (अर्थात् त्यास प्रायश्चित्त म्हणतां येणार नाहीं. कारण प्रायश्चित्तानें पातकाचा नाश झाला पाहिजे, पण आत्मघातानें अनंत पातकांची वृद्धि होते–हा भाव.) हा **अनुमान** नामक अलंकार. एकाद्या सिद्धांताचें समर्थन बुद्धिवादानें केलेलें असलें, व त्यांत कविप्रतिभा दिसत असली, तर हा अलंकार होतो. प्रस्तुत स्थलीं 'ज्यांत पातकांचा नाश, तें प्रायश्चित्त; आत्मघातांत पातकाचा नाश नाहीं, म्हणून हें प्रायश्चित्त नव्हे'–असा बुद्धिवाद आहे. २. मोठें. ३. अपार. ४. मागून, तुझ्या मरणानंतर. ५. अयोग्य. ६. आम्हाला तर हा प्रकार पसंत नाहीं. 'आम्हा तो मान्य नसे' असें पाठांतर. ७. द्रव्याचा. ८. रस्त्यानें. आजूबाजूनें न चालतां व इकडे तिकडे न पाहतां थेट रस्त्याच्या मध्यभागीं चालत जाणारा मनुष्य रस्ता चुकून भलत्याच दिशेला जाणार नाहीं; म्हणून मी दाखवितों त्या धर्माच्या रस्त्यानें चाल; म्हणजे तुझें कल्याण होईल–हा भाव. पथें=योग्य मार्गानें, धर्मनीतीस अनुसरून. ९. अन्वयः–ताप टाकूनि (आत्मस्तुति करावी लागत आहे याबद्दलचा विषाद टाकून) स्वगुणोदधिच्या (आपल्या सद्गुणांच्या समुद्रापैकीं) एका थेंबा गा (गायन कर; वर्णन कर). म्हणजे–आत्मस्तुति कर–असा अर्थ. १०. अन्वयः–या वधें (आत्मस्तुतिरूपी वधानें) [तुझा] तोष हो (होवो) हो ! (हे अर्जुना !) तो (वर निंदिलेली आत्महत्या) सर्वांचा वध [होय] [कारण तूं आत्महत्या केलीस तर त्या दुःखामुळें किंवा आपला मुख्य योद्धा नाहींसा झाल्यानें शत्रूकडून आपण सर्वच नष्ट होऊं]. [तस्मात्] तो (केवळ) आत्मवध (तुझा एकट्याचाच नाश) न. आत्मवध करणें तर अवश्य आहे, पण तो आत्मस्तु... त्या रूपानें केल्यास सर्वांना संतोष होईल. उलट आपल्या देहाचा प्रत्यक्ष अंत करून 'आत्मवध' केल्यास त्यामुळें, केवळ आपला स्वतःचाच नाश नसून, सर्वांचाच नाश होईल–असा भाव. 'तों सर्वांचा वध' असें पाठान्तर. ११. येथें **द्वामयमक** आहे.

[1]फाल्गुन म्हणे, '[2]तथास्तु;' प्रभुच्या वचनें स्वयें स्वगुण वर्णी, ।
लाजत होता पूर्वी जो निजगुणगीत ऐकतां कर्णी. ॥ ६३
[3]ज्यांसि महेश सुदुर्लभ पददर्शन, यश हि, करुनि [4]आहव, दे, ।
तो साधु सज्य कार्मुक धरुनि असे स्वगुण [5]शुभ्रवाह वदे. ॥ ६४
'राया ! [6]एक धनुर्धर मीं कीं तो [7]सद्यशःपद [8]पिनाकी. ।
गाती मज हि प्रेमें [9]प्रभुचे [10]बंदी, [11]जेन्ही तदपि नाकी. ॥ ६५
मीं असतां उघडावा तिसरा [12]देवें क्षयार्थ कां [13]डोळा ? ।
मत्सम अन्य धनुर्धर नाहीं लोकत्रयांत, [14]धांडोळा. ॥ ६६
हा वीर असा आहे, जरि आज्ञा देव तो करिल याला, ।
राया ! घडी न भरतां नेयील [15]चराचरा तरि लयाला. ॥ ६७
केला दिग्विजय, बळें नृपजन चि न [16]धनद ही [17]करद केला; ।
म्यां राजसूय [18]मखपति अतिदुष्कर तदपि सिद्धिला नेला. ॥ ६८
माज्या तेजें चि [19]मयें येउनि रचिली महीवरि [20]सभा, जी ।

---

१. येथें 'अर्जुन' असें न म्हणतां पंतांनीं 'फाल्गुन' ह्याच नांवाची पुन्हा योजना केली आहे. (मागें गीति ५३ पहा). २. तथा+अस्तु=तसें असो. ३. अन्वयः—महेश (शिव) [ज्याशीं] आहव (युद्ध) करूनि ज्यासि सुदुर्लभ पददर्शन [व] यश हि दे. 'सुदुर्लभ' हें देहलीदीपकन्यायानें पददर्शन व यश ह्या दोहोंचेंही विशेषण समजावें. ४. युद्ध. ५. अर्जुन. अर्जुनाच्या रथाच्या घोड्यांचा रंग पांढरा असल्यामुळें त्यास श्वेतवाहन हें नांव होतें. ६. मी एक धनुर्धर किंवा एक पिनाकी; तिसरा कोणीही नाहीं—हा भाव. एक=अद्वितीय. ७. सत्+यशः+पद=सत्कीर्तीचें स्थानच असा. ८. शिव. ९. शिवाचे. १०. भाट. ११. जेन्ही नाकी (स्वर्गांत राहणारे) तदपि (तरि). शंकराचे दूत स्वर्गांत राहणारे असल्यामुळें भूतलावरील जनांस कमी योग्यतेचे समजतात व त्यांची कधींही स्तुति करावयाचे नाहींत. परंतु माझी योग्यता त्यांच्याहीपेक्षां अधिक म्हणून ते माझी प्रशंसा करतात. १२. शिवानें. १३. तिसऱ्या डोळ्यानें शिव जगाचा नाश करितो, हें प्रख्यात आहे. १४. हुडकून पहा, शोधा. किंवा 'धांडोळा' हें नाम घेतल्यास [असा] लोकत्रयांत धांडोळा (डांगोरा, डंका, प्रसिद्धि) [आहे]. १५. जंगमस्थावराला. १६. कुबेरही. १७. करभार देणारा. १८. श्रेष्ठ यज्ञ. (पंतकृत सभापर्व—अध्याय २ पहा). १९. मयासुर. हा दानवांचा कारागीर. खांडववनदहनप्रसंगीं अर्जुनानें मयासुराचें रक्षण केलें होतें. त्या ऋणांतून मुक्त होण्याकरितां त्यानें पांडवांस एक सभागृह बांधून दिलें. (पंतकृत आदिपर्व—अध्याय ३७ पहा). तेजें=पराक्रमानें. २०. सभागृह. ह्या सभागृहाचें वर्णन पंतकृत सभापर्व, अध्याय १ मध्यें आहे. अन्य लोकांत इंद्रसभा, ब्रह्मसभा इत्यादि अवर्णनीय सभा होत्या, पण माझ्या तेजानें मयासुरानें पृथ्वीवरही अलौकिक सभा तयार केली—असा भाव.

खळदृष्टिसि, [१]घूकांच्या दृष्टिसि [२]भानुप्रभेपरिस, [३]भाजी. ॥ ६९
[४]मीं चापबाणपाणि स्वरथीं समरांत जेंवि [५]शंकरसा; ।
माझ्या भुजाश्रयें तुज राया ! धर्मा ! भजे [६]विशंक [७]रसा. ॥ ७०
[८]जे पूर्वदक्षिणोत्तरपश्चिमदेशीय वीर भूप हि म्यां ।
वधिले, संशप्तक ही; त्रिजगीं माझ्या नसे [९]तुळा महिम्या. ॥ ७१
संशप्तक थोडेसे असति, न धरितील ते हि पाप [१०]तंग, ।
अन्वर्थ मीं [११]धनंजय, जे माजे शत्रु ते नृपा ! [१२]पतंग. ॥ ७२
आल्या होत्या प्रबळा अकरा अक्षौहिणी स्वरिपु[१३]सेनों; ।
अर्ध्या म्यां चि विमथिल्या; तन्हि हा नृप मज पहा [१४]हरि ! पु[१५]सेनों. ॥ ७३
[१६]अकरा हि मारितों मीं, किमपि अशक्य न [१७]मदाशुगप्रकरा; ।
स्वकरा आवरिलें म्यां [१८]भीमादियशोर्थ, हें [१९]मृषा न [२०]करा. ॥ ७४
[२१]भीतांसि अभय देतों, अस्त्रज्ञांतें चि मारितों अस्त्रें; ।
देतों मान स्वजना; [२२]नोतरि करितीं च भस्म हीं शस्त्रें. ॥ ७५
रथ आण, चाल कृष्णा ! होवूं [२३]कर्णार्णवांत [२४]नव नौका, ।

---

१. घुबडांच्या. २. सूर्याच्या प्रकाशापेक्षां (अधिक). ३. भाजून टाकी, संताप उत्पन्न करी. ४. समरांत मीं चापबाणपाणि [होऊन] स्वरथीं [विराजमान होतांच] जेंवि शंकरसा [शोभतों]—असा अन्वय. मी एकदां हातांत धनुष्यबाण घेऊन रथांत बसलों, म्हणजे मी शंकराप्रमाणें महापराक्रमी वाटतों—असा भाव. ५. जेंवि शंकरसा=जसा शंकर तसा. ह्या गीत्यर्धांत अर्थासाठीं बरीच ओढाताण करावी लागते. ६. कोणत्याही प्रकारची शंका न धरितां; इतर राजांची भीति टाकून. ७. पृथ्वी. ८. जे पूर्व...देशीय हि वीर [व] भूप [ते] म्यां वधिले—असा अन्वय. पृथ्वीच्या पाठीवरील सर्व देशांतील वीर व राजे यांस मी जिंकून ठार मारिलें—असा भाव. ९. तुलना, बरोबरी. प्रस्तुत स्थलीं उपमेचा सर्वथैव निषेध केला आहे, म्हणून असम नामक अलंकार. १०. टिकाव. पाप=पापी. ११. धनंजय (अग्नि) म्हणून जें माझें नांव आहे, तें यथार्थ होय—असा भाव. १२. पतंग (क्षुद्रजंतु). १३. आमचे शत्रु जे कौरव त्यांचें सैन्य. १४. प्रभुप्रति बक्तिपंत. अर्जुन कृष्णास उद्देशून म्हणतो. १५. विचारीना, पर्वा करीना, योग्यता ओळखेना. १६. या गीतीच्या दोन्ही अर्धांच्या प्रारंभीं व शेवटीं असलेला 'अकरा–प्रकरा–स्वकरा–न करा' हा प्रास व यमकचमत्कार श्रवणीय आहे. १७. मत्+आशुगप्रकरा=माझ्या बाणसमूहाला. प्रकर=समुदाय. १८. भीमादिकांचें नांव होण्याकरितां. १९. खोटें. २०. खोटें करूं नका, म्हणजे खोटें समजूं नका. हा प्रयोग लक्षांत ठेवण्यासारखा आहे. २१. भ्यालेल्यास. २२. वरच्या तीन चरणांत वर्णिलेल्या शूरधर्माचें पालन केलें नसतें तर. २३. कर्णरूपी समुद्रांत. २४. नूतन=नवीन, धड, मजबूत. नौका=नाव. युद्धांत तरून जाऊं—हा भाव.

हो [1]हस्तिनापुरौका धर्म, पुन्हा हो कदापि न [2]वनौका. ॥ ७६
या धर्माच्या तेरा वर्षें हृदयीं सदैव [3]जें [4]सलतें, ।
चाल सख्या ! काढूं दे, मजवांचुनि कोण काढितो [5]सल तें? ॥ ७७
[6]वरि जें [7]कद्रू गिळितां गरुडें निजपुत्र साप, [8]राधा, 'तें ।
दुःख' म्हणो 'सह्य;' नृपा ! वधितों त्या आजि [9]सापराधातें. ॥ ७८
[10]काढीन रिपु न वधितां [11]कवच न, न वचन मृषा, वृषा मथितों; ।
धर्मा ! [12]घर्मार्तशिखीप्रति [13]घनसा तुज सुखार्थ मीं कथितों.' ॥ ७९
ऐसें वदोनि वंदी, धर्मासि म्हणे, 'क्षमा करा देवा ! ।
ठेवा [14]दुरुक्ति न मनीं, मज आज्ञा द्या करावया सेवा. ॥ ८०
मीं [15]ऐसें कां वदलों, हें ही समयांतरीं कळेल, नृपा ! ।
या दासावरि देवा ! तव चरणाची असो सदैव कृपा. ॥ ८१

---

१. हस्तिनापुर+ओकस्=पुरविशेष+घर=हस्तिनापुरीं गृह आहे ज्याचें असा, हस्तिनापुर-निवासी. हस्तिनापुराचा राजा–हा भाव. २. वन+ओकस्=अरण्य+गृह=अरण्यांत आहे गृह ज्याचें=वनवासी. हेंच यमक पंतकृत सभापर्व, अध्याय ७।३६ व आदिपर्व, अध्याय ३३।३५ मध्यें आहे. ३. जें=कर्णरूपी सल. ४. खुपतें. ५. बाणादिकांचा अग्रभाग (टोंक). ६. अन्वयः– गरुडें निजपुत्र साप गिळितां कद्रू जें [दुःख] (पुत्रशोक–असा भाव) वरि (अनुभवी) तें दुःख राधा सह्य (सोसण्यास शक्य) [आहे असें] म्हणो. [कारण] आजि [मी] त्या सापराधातें (कर्णातें) वधितों. कद्रूच्या दुःखापेक्षांही राधेला तीव्रतर असह्य दुःख होईल, असें स्पष्ट न सांगतां वळसा घेऊन सांगितल्यामुळें **पर्यायोक्ति** आणि या पर्यायोक्तींत व 'वधितों त्या आजि सापराधातें' या वाक्यांत कार्यकारणसंबंध आहे म्हणून **काव्यलिंग.** ७. सर्पमाता. (कद्रूचें दुःख सह्य व स्वतःचें असह्य–असा अर्थ). ८. कर्णमाता. ९. स+अपराध=अपराधयुक्तास, (कर्णास). कर्णाच्या अपराधांचा पाढा कृष्णानें पुढें अध्याय ४९ गीति १–१० मध्यें वाचिला आहे. तो जिज्ञासु वाचकांनीं पहावा. १०. 'काढीन रिपु न वधितां कवच, न वचन मृषा' असा रा० पराडकर यांच्या प्रतींत पाठ आहे, पण तो मुद्रणदोष असावा. कारण अर्थानुरोधानें आम्ही स्वीकारिलेलाच पाठ इष्ट आहे. शिवाय रा० पराडकर यांच्या पाठांत एक मात्रा कमी पडते. ११. रिपु न वधितां, कवच न काढीन–असा अन्वय. शत्रूला मारीन तेव्हांच कवच काढीन–असा भाव. १२. उष्णतेनें (उन्हानें) पीडित अशा मयूराप्रत. धर्मा ! घर्मार्तशिखीप्रति घनसा (उष्णतेनें पीडिलेल्या मोराला जसा मेघ तसा) तुज मीं [हें] सुखार्थ (सुख व्हावें म्हणून) कथितों–असा अन्वय. १३. मेघाप्रमाणें. १४. निंद्य भाषणें. १५. ऐसें वदणें म्हणजे धर्माची निंदा व आत्मस्तुति करणें.

राया ! तव प्रियार्थ चि मम जीवित, सत्य हें तुला वाटो, ।
तुझिया अजातशत्रो ! एक हि लव[1] न क्षमाब्धिचा[2] आटो. ॥ ८२
सत्वर मरेल कर्ण, प्रभुच्या[3] क्षोभें चि आजि आजींत[4]; ।
तव तेज चि जयद[5] असे मद्भुजरथचापतूणवाजींत[6]. ॥ ८३
आज्ञा दे मज जाया, अहिता[7] राधासुतासि माराया, ।
समरापासुनि[8] भीमा मुक्त कराया, गुरूत्तमा ! राया !' ॥ ८४

---

## अध्याय त्रेचाळिसावा.

जय[11] विनवी, पाय धरी, मागे आज्ञा, अशांत[12] तो धर्म ।
शयनावरूनि उठला; ये त्याच्या कोप मनिं, मुखीं घर्म[13]. ॥ १
धर्म म्हणे, 'म्यां उग्रव्यसनांत तुम्हांसि बुडविलें बापा ! ।
हें शिर खड्गें खंडीं, दंडीं मजला कुलांतका[14] पापा. ॥ २
मीं[15] पाप, व्यसनी मीं, मूढ, कठिन, भ्याड, आळसी, खोटा, ।
मोटा घातक मीं, मज मारीं, स्वहितीं करूं नको तोटा. ॥ ३
जातों वनवासा मीं, तुमची पीडा समस्त वारो[16] गा ! ।
स्वस्थ सुखी हो बापा ! जावूं दे या सुदुःसहा[17] रोगा. ॥ ४
मीं राज्यानर्ह[18], कुधी[19], क्लीब[20], विचार न कळे बरा ज्यासी[21]; ।
भीम महात्मा राजा राज्य करू, योग्य तो चि राज्यासी. ॥ ५

---

१. लेश. २. क्षमारूपी समुद्राचा. ३. तुझ्या (धर्माच्या). ४. युद्धांत. ५. माझ्या भुजरथादिकांपेक्षां तव तेजच जय मिळविण्यास अधिक कारणीभूत होईल—हा भाव. ६. माझे भुज, रथ, धनु, भाता आणि घोडे यांत. ७. शत्रूस. ८. युद्धापासून. ९. आतांपर्यंत माझ्या साह्यावांचून एकटाच कौरवसैन्याशीं लढून दमलेल्या भीमास युद्धश्रमापासून सोडविण्यास. १०. अध्याय ७० श्लोक ४२—५९ आणि अध्याय ७१—७६ इतका मुळांतील कथाभाग या अध्यायांत आला आहे. ११. अर्जुन. १२. इतक्यांत, किंवा—अशान्त=ज्याचें मन स्वस्थ नाहीं असा. १३. घाम. १४. कुलनाशक जो मी, त्याला. १५. अर्जुनानें मागें धर्माची जी निंदा केली, त्या वाक्यांस उद्देशून हीं उद्वेगजनक वाक्यें आहेत. पाप=पापी. १६. निवारो, दूर होवो. किंवा—वारो=नाश पावो. १७. सोसण्यास अत्यंत कठीण असा, जणूं काय रोगच, त्याला (धर्माला). १८. राज्य+अनर्ह=राज्यास अयोग्य. १९. दुष्टबुद्धि. २०. क्लीब राज्यानर्ह होतो, हें प्रसिद्धच आहे. २१. ज्यासी बरा विचार न कळे [दुष्ट विचारच कळे असा] मीं [आहें]—असा अन्वय.

मज पाहतां असुख तुज व्हावें कीं म्हणुनि हा नसो.[1] सवती[2] ।
जैशा परुषोक्ति[3] तशा या मच्छ्रुतिला[4] तुझ्या न सोसवती. ॥ ६
तुज हा कितव,[5] न हित, वनवासोचित[6] होय जो यशा नाशी; ।
जावा वनासि तरि तो जन, जाईना जरि[7] स्मशानासी.' ॥ ७
इत्यादि धर्म वदला, उठला जाया वना तप कराया; ।
जें पद[8] जना अमृत, तें विष चि, न केवळ गमे सपक[9] रांया.[10] ॥ ८
ज्याचे[11] पाय धराया, त्यागुनि सर्वस्व, होति संन्यासी,[12] ।
राज्य त्यजितां तो हरि धरि पाय,[13] असें न भाग्य अन्यासी. ॥ ९
शयनावरूनि राजा धर्म उसळला सुवृत्त[14] कंदुकसा,[15] ।
त्याच्या चरणीं जडला हरि करिपतिच्या[16] प्रगाढ[17] अंदुकसा.[18] ॥ १०
चरणीं घालून मिठी विनवी प्रभु, जेंवि पुत्र बापातें; ।
प्रेमें आकर्णावें, वर्णावें यश,[19] हरील पापातें. ॥ ११

---

१. तुझ्यापुढें नसो. २. सपत्नीजन. सवती जैशा [एकमेकींस] न सोसवती तशा या तुझ्या परुषोक्ति मच्छ्रुतिला [न सोसवती]–असा अन्वय. ३. कठोर वचनें, वाग्बाण. ४. माझ्या कानाला. ५. जुगारी. ६. वनांतच वास करण्यास उचित. ७. तो जन जरि स्मशानासी जाईना (मरेना) [स्मशानास जाणें हा उत्तम पक्ष; पण जर स्मशानास गेला नाहीं तर निदान तो] वनासि तरि जावा–असा अन्वयार्थ. ८. राज्यपद. ९. अरुचिक. (अमृततुल्य राज्यपद केवळ सपकच न गमे, विषच गमे–असा अर्थ). १०. धर्मास. ११. ज्या श्रीहरीचे. १२. संन्यासी. यमकांतील अक्षरांत सादृश्य दिसावें, म्हणून पंतांनीं 'संन्यासी' शब्दांतील 'स' वरील अनुस्वार गाळला आहे. १३. कृष्णानें धर्माचे पाय धरिले–हा सांगण्याचा भाव. तो पंत चमत्कारिक रीतीनें सांगतात. सर्व जन राज्यादिकांचा त्याग करून कृष्णाचे पाय धरितात, पण कृष्ण हा राज्यादिक सोडूं नकोस म्हणून धर्माचे पाय धरितो. तेव्हां कृष्णाची कृति विलक्षण आहे व धर्माचें भाग्य असामान्य–हा भाव. हा **विषम** अलंकार. कारण सर्व त्यागास कारण असा हरि तद्विरुद्ध कार्य करीत आहे, असें वर्णन आहे. प्रस्तुत स्थलीं **उदात्त** नामक अलंकारही आहे. जेथें महायशाचें अथवा अत्यंत विपुल अशा संपत्तीचें वर्णन केलेलें असतें, तेथें हा अलंकार होतो. येथें धर्माच्या अत्यंत भाग्याचें वर्णन आहे. सर्व जग कृष्णाचे पाय धरितें व कृष्ण धर्माचे पाय धरितो–असा हा कल्पनातीत प्रसंग आहे. १४. गरगरीत वाटोळा. या शब्दावर श्लेष आहे. सुवृत्त=वाटोळा, (पक्षीं) सुशील, सदाचारी. असाच श्लेष पंतांनीं आदिपर्व, अध्याय १७।४१ व सन्मणिमाला–गीति ४ यांत साधिला आहे. १५. चेंडूसारखा. १६. गजपतीच्या. १७. फार बळकट, फार घट्ट. १८. सांखळदंडासारखा. १९. [हरीचें] यश प्रेमें वर्णावें [व] आकर्णावें–असा अन्वय.

'राया ! क्षमा करूनि श्रवण करीं सत्य सांगतों बा ! गा ! ।
रागा न धरीं चित्तीं, जागा[1] तूं शांतिचा महाभागा ! ॥ १२
असि जिष्णुची प्रतिज्ञा, 'जो दे गांडीवचाप अन्यातें, ।
ऐसें म्हणेल त्यातें मारावें.' बोलिलासि धन्या ! तें[2]. ॥ १३
हा सत्यसंध[3] संधा[4] रक्षाया बोलिला असें[5], न मर्दे[5], ।
माझ्या मतें चि केला बा ! तव अवमान या खळश्रमर्दें[6]. ॥ १४
जो अवमान गुरूंचा तो चि वध, असें मजप्रति ज्ञाते ।
सांदीपिनि[7] गुरु वदले, तें करउनि रक्षिली प्रतिज्ञा ते. ॥ १५
या पार्थें चि न, म्यां ही केला हा तव अतिक्रम[8] व्यक्त, ।
देवा ! क्षमा करावी; आम्हीं चुकलों तऱ्ही तुझे भक्त. ॥ १६
दे अभयदान आम्हां दोघां शरणागतां, नतां; वद या ।
मातुळपुत्रा[10], 'मा[9] भैर्वत्स[11] !' असें मागतों तुला सदया. ॥ १७
वांच्छिसि[12] तें चि घडेल चि; कीं[13], तूं गुरुविप्रभक्त, भूपा ! हें ।
न मृषा; राधेयाचें आजि प्राशील रक्त भू, पाहें. ॥ १८
तूं ज्याचा वध वांच्छिसि त्याचें राहील काय जीवित तें ? ।
अवितथसंकल्पा[14][15] तव न यशें त्रिजगांत काय जी ! वितर्तें[16] ?' ॥ १९
ऐसें सांत्वन करि हरि, हरि[17], हरि[18] ! हरि[18] ! धरुनि पद, भंजकमोहा[19]; ।

---

१. शांतिचा जागा=शांतीचें निवासस्थान. 'जागा' हा शब्द क्वचित् पुल्लिंगी वापरलेला आढळतो. (पुढें गीति ४९ पहा; तसेंच वनपर्व, अध्याय ४।१६७ व द्रोणपर्व, अध्याय ५।१ पहा). २. गांडीव अन्यासि दे असें. ३. सत्यप्रतिज्ञ. ४. प्रतिज्ञा. ५. गर्वानें किंवा उन्मत्तपणानें नव्हे. ६. खळांस दुःख देणाऱ्यानें. हें अर्जुनाचें विशेषण. अर्जुन हा दुष्टांस दुःख देणारा आहे, तुझ्यासारख्या सज्जनांस दुःख द्यावें, असा त्याचा हेतु नव्हता. परंतु माझ्या अनुमतीनें निरुपायास्तव त्यास असें करावें लागलें—असा भावार्थ. ७. नामविशेष (कृष्णगुरु). ८. अवमान. ९. मला. १०. मातुल (मामा जो वसुदेव) त्याच्या मुलाला, मामेभावाला. ११. मा भैः वत्स=वत्सा ! भिऊं नको. १२. [जें] वांच्छिसि तें चि घडेल—असा अन्वय. येथील एक 'चि' हें पद पादपूरणार्थक आहे, असें समजावें. १३. कारण. १४. अन्वयः—जी ! (अहो !) [तूं] अवितथसंकल्पा [अशीं] तव यशें त्रिजगांत वितर्तें न काय ? (अर्थात् त्रिजगांत पसरलेलीं आहेत). १५. सत्यसंकल्पा. १६. विस्तार पावलेलीं अशीं. १७. नाशी. १८. आश्चर्योद्गार. हरि भक्ताच्या हिताकरितां भक्ताचेच पाय धरितो, हा आश्चर्यकारक प्रसंग येथें वर्णिलेला आहे. हे प्रेमोद्गार आहेत, असें समजावयासही हरकत नाहीं. १९. भक्ताच्या अज्ञानास.

प्रभुच्या मनीं असें कीं लोकीं निजभक्त दीन न गमो हा. ॥ २०
प्रभुनें सांत्वन केलें, हरिलें सामामृतांशुनें[2] तम[3] तें, ।
गमतें बहु सुख हरिच्या या चरितें सर्वशांतदांतमतें[4]. ॥ २१
धर्म प्रसन्नचित्तें उठउनि[5] भेटे प्रभूसि[6], कर जोडी, ।
विनवि, विनयरुचि[7] त्याची वाणी दे तसि सुधा न दे गोडी. ॥ २२
'वदतोसि सत्य देवा ! मदतिक्रमकारण[8] प्रभो ! कळलें, ।
मळलें[9] होतें मन, परि केलें त्वां शुद्ध, तुजकडे वळलें[10]. ॥ २३
देवा ! हे[11] वाहे वागमृतनदी[12] ज्यावरूनि तो कां गा ! ।
न निवेल[13] ? दीनबंधो ! निववि[14] ज्योत्स्ना[15] हि लागतां आंगा. ॥ २४
सांपडलों होतों कीं कोपा, जैसा धनी[16] वनीं मांगा[17]; ।
या व्यसनीं रक्षीसा[18] कोण दुजा आस ? कृष्णजी ! सांगा. ॥ २५
व्यसनसमुद्रीं आम्हां उत्तारक[19] सेतु हे तुझे पाय;' ।
आम्हीं सनाथ कृष्णा ! तुंजकरितां[20]; फार मीं वदों काय ? ॥ २६
जननीजनकशताधिक वत्सल[21] तूं चि; न अगाध अर्णव[22] तो, ।

---

१. धर्मे. २. साम+अमृतांशु=प्रियभाषणरूप चंद्रानें. ३. अंधकार, अज्ञान. ४. शांत व दांत (इंद्रियनिग्रह करण्यास समर्थ असे) अशा सर्व जनांच्या मतानें. ५. 'उठउनि' हें रूप प्रयोजक असल्यामुळें तें 'उठवुनि' असें लिहिलें पाहिजे. पण पंत लिहिण्याच्या भरांत 'उ' व 'वु' यांत विशेष भेद मानीत नाहींत. मागें गीति १५ मध्यें पंतांनीं 'करवुनि' च्या ऐवजीं 'करउनि' असेंच लिहिलें आहे. येथें 'ऊठुनि' असा पाठ आहे, तोच अर्थास पोषक आहे. ६. कृष्णास. ७. त्याची (धर्माची) विनयरुचि (विनयानें रुचिकर अशी; विनयानें पूर्ण अशी—असा भाव) वाणी [जशी] गोडी दे तसि [गोडी] सुधा (अमृत) न दे—असा अन्वय. ८. मत्+अतिक्रम+कारण=माझ्या उल्लंघनाचें कारण, अर्जुनानें माझी जी निंदा केली तिचें कारण. ९. मनांत किंतू उत्पन्न झाला होता. १०. मन वळलें. ११. ही तुझी. १२. वाक्+अमृत+नदी=भाषणरूप अमृताची नदी. १३. शांत होईल. १४. ज्योत्स्ना हि निववि तेव्हां तव वागमृतनदी कां न निववील ?—हा **काव्यार्थापत्ति** नामक अलंकार. १५. चंद्रिका, चंद्रकांति. ज्योत्स्ना केवळ स्पर्शानें सुद्धां मनुष्याचा ताप दूर करिते, मग ही अमृताची नदी ज्याच्या आंगावरून जाईल, त्याचा ताप (अर्थात् मनस्ताप) कसा बरें दूर करणार नाहीं ?—असा भावार्थ. १६. श्रीमंत (द्रव्यसंपन्न). १७. जातिविशेष (द्रव्य लुटणाऱ्याला). १८. रक्षण करणारा असा. १९. उतरून जाण्याविषयीं सेतु (पूल). २०. तुझ्यामुळें, तूं आहेस म्हणून. २१. मायाळु. २२. समुद्र. तो अर्णव अगाध न; तुझा महिमा चि अगाध—असा अन्वय.

महिमा चि अगाध तुझा; चतुरा! [1]चतुरानना न वर्णवतो. ॥ २७
आम्हां [2]तुच्छां केलें त्वां पूज्य अगा! प्रभो! दयाळो! हें।
जाणे जग. वर्णावी [3]स्पर्शमणीची किती दया लोहें?' ॥ २८
नृप [4]समजतां, म्हणे हरि 'पार्था! ये, बंधुला करीं नमन;।
याचें प्रसन्न मजवरि झालें, तुजवरि तसें करीन मन. ॥ २९
इतुका संताप तुला झाला, जरि 'तूं' [5]म्हणोनि [6]अनघातें;।
कसि गति होती बापा! या [7]पार्थिववृंदवंद्यजनघातें? ॥ ३०
झाली कृपा नृपाची, ये, पाय धरीं, हरीं [8]अघा, बरवी।
हे युक्ति; [9]कृतावज्ञा पापा [10]गुरुपदनता न घाबरवी.' ॥ ३१
प्रभुवरवचनें अर्जुन गुरुचरणांवरि शिरःकमल वाहे,।
जळ वाहे नेत्रांचें; [11]कच म्हणति जळां रजां, 'न मळवा [12]हे.' ॥ ३२
'मीं [13]धर्मकामकातर जें वदलों तें [14]क्षमास्पदा! साहें.।
आहे [15]अदेय अन्या, तदपि [16]वदान्या! दिजे स्वदासा [17]हें.' ॥ ३३

---

१. ब्रह्मयास. तुझा महिमा ज्याला चार तोंडें आहेत असा ब्रह्मदेव देखील वर्णन करूं शकत नाहीं, मग ज्या मला एकच तोंड आहे, तो कसा वर्णूं शकेल?—असा भाव. येथें 'चतुरानन' ह्या विशेष्याचा उपयोग साभिप्राय आहे, म्हणून **परिकरांकुरा**लंकार. २. तुच्छां आम्हां त्वां पूज्य केलें—असा अन्वय. ३. परिसाची. ४. समजुतीला आल्यावर; समजूत पटल्यावर, कोप टाकून प्रसन्नचित्त झाल्यावर. ५. 'तूं' असें म्हटल्यामुळें. 'तुम्ही' असें बहुमानार्थक न म्हणतां 'तूं' असें म्हटल्यानें, निंदा केल्यानें—असा भाव. ६. दोषरहित अशा धर्मातें. ७. पार्थिव+वृंद+वंद्य+जन+घातें=राजसमूहांनीं वंद्य अशा धर्माच्या घातानें (वधानें). ८. निंदेनें प्राप्त झालेलें पाप नाहींसें करून टाक. 'हरी अघा' असें पाठांतर. ९. केलेली अवज्ञा (अपमान). पापा गुरुपदनता कृतावज्ञा न घाबरवी—असा अन्वय. १०. गुरुपदीं जो नम्र, त्यास. ११. केश. १२. धर्माचे पाय. अन्वयार्थः—(अर्जुनाच्या) नेत्रांचें जळ वाहे, [व तें धर्माच्या पायांवर पडे. पण अर्जुनाचे धर्मपदांवर रुळणारे) कच (धर्माच्या पायांवरील) जळां (अर्जुनाच्या अश्रुकणांस) [व] रजां (धर्माच्या पायांच्या धूलिकणांना) म्हणति, 'हे (पाय) न मळवा-' अर्जुनाच्या केशांनीं धर्माच्या पायांवरील अश्रुबिंदु व रजःकण झाडले गेले—हा भाव. धर्माच्या पायांवरील धुरळ्यावर अर्जुनाचे अश्रुबिंदु पडून ते पाय मलीन झाले होते, परंतु अर्जुन त्यांवर इतका लोळला, कीं त्या केशांनीं ते अगदीं निर्मळ झाले. १३. धर्माच्या इच्छेविषयीं अधीर; चंचल. प्रतिज्ञाभंग करूं नये, या धर्माचें प्रतिपालन करण्याविषयीं अधीर असा. कातर=भित्रा, व्यग्रचित्त. १४. क्षमा+आस्पद=क्षमास्थाना! १५. न देण्याजोगें. १६. दानशूरा. १७. मी मागतों तें; अशा प्रकारची क्षमा.

ऐसें वदे धनंजय, पायीं घाली मिठी, [1]बुठे, विनवी, ।
धर्म द्रवे दयेनें, शुद्धमनीं [2]अक्षमा न ठेवि [3]नवी. ॥ ३४
प्रेमें किरीटिकंठीं घालूनि मिठी रडे [4]नरेश तदा; ।
पुशिलें पुनः पुन्हां तरि अश्रुजळें [5]नयनयुग भरे शतदा. ॥ ३५
मग धर्म म्हणे, 'वत्सा ! पीडा दे पक्षि[6]राज भुजगां जी, ।
ती स्वल्पा वाटे मज, कर्णाचा [7]फार आज भुज गांजी. ॥ ३६
मरण रणीं तें भाग्य चि. मज [8]कैंचें ? अमित जन्म जे [9]तपले, ।
ते सुकृती पात्र [10]तथां, गुरुवेदाज्ञेसि जे सदा जपले. ॥ ३७
मीं काय दुर्द[11]शा तुज सांगों ? त्वां ऐकिली असेल चि ती, ।
झाली प्राप्त मला; कीं घडली नाहीं [12]महेश्वरापचिती. ॥ ३८
जरि तूं आज हि कर्णप्राण न घेसील, तरि निजप्राण ।
सोडीन. जीवितीं या गोडी न; प्रियतमा! तुझी आण. ॥ ३९
बंधु[13]मनोरथपादप सफल करावा तुवां वसं[14]तानें; ।
[15]व्यसननिमग्नोद्धारें न्यावें ख्यातीस नांव सं[16]तानें.' ॥ ४०
अर्जुन म्हणे, 'प्रभो ! मीं कर्णातें आजि निश्चयें मथितों; ।
भीमाच्या तुझिया ही पायांचा [17]शपथ सत्य हें कथितों. ॥ ४१

---

१. न उठे. २. राग. (निरंतर जो शांत, तो नव्या आलेल्या कोपा मनीं न ठेवी—असा भावार्थ). ३. नवीन. ('अक्षमे'चें विशेषण). नवी म्हणजे आजपर्यंत माहीत नसलेली. धर्माला नेहमीं क्षमाच माहीत. म्हणून आज जी थोडी अक्षमा आली ती त्याला नवीच होती. पण धर्म हा नेहमींच क्षमाशील असल्यामुळें त्याच्या अंतःकरणांत ही नवी (परकी, अनोळखी) अक्षमा कशी टिकणार? अर्थात् ती टिकली नाहीं—हा भाव. ४. नर+ईश=धर्म. ५. दोन्ही डोळे. ६. गरुड. ७. पक्षिराज भुजगां गांजतो त्यापेक्षां कर्णानें आपल्या पराक्रमानें मला ज्यास्त जर्जर केलें—हा भाव. भुज=बाहु, दोर्दंड अर्थात्—बाहुबळ, पराक्रम. ८. कैसें. माझ्यासारख्या पुण्यरहिताला कैसें प्राप्त होईल? प्राप्त होणार नाहीं—हा भाव. ९. तपश्चर्या करिते झाले. १०. अन्वयः—जे अमित जन्म तपले [व] जे गुरुवेदाज्ञेसि सदा जपले ते सुकृती तया (रणीं मरण्यास) पात्र (योग्य) [होत]. ११. मला कर्णाच्या हातून प्राप्त झालेली दुर्दशा. १२. महेश्वर+अपचिती=शिवपूजा. १३. बंधूचा मनोरथरूप वृक्ष. १४. हें **परंपरितरूपक.** पादप सफळ (फळांनीं भरलेला) होण्याची वेळ म्हणजे वसंतऋतु, म्हणून अर्जुनावर वसंताचा आरोप. १५. संकटांत पडलेल्याचा उद्धार करून. १६. सज्जनानें. १७. 'शपथ' शब्द मराठींत स्त्रीलिंगी वापरतात. पण संस्कृतांत तो पुल्लिंगी आहे. त्यास अनुसरून पंतांनीं 'पायांचा शपथ' असा प्रयोग केला आहे.

शपथ यमांचा[1] करितों[2], गांडीवाचा हि, मारितों अरिला, ।
कीं मीं मरतों आजि; प्रभुजी! संकल्प[3] हा मनें वरिला. ॥ ४२
कृष्णा! हा पण आपण सिद्ध करावा; जयद्रथवध[4] रणीं ।
तेंवि घडो कर्णाचा; तव कीर्ति[5], तव प्रताप, तव धरणी.' ॥ ४३
कृष्ण म्हणे, 'कर्ण वधीं, विजया! तूं श्रीपुरारिचा[6] भक्त, ।
व्यक्तप्रतापकीर्ति[7] त्रिजगीं आहेसि तद्वरें[8] शक्त[9]. ॥ ४४
त्वां राधेय वधावा, व्हावा जय तुज, सख्या! असा कांम[10] ।
माझा सदैव आहे; चिंतितसें हें चि आठ ही याम[11]. ॥ ४५
हे काळजी तुला चि न, हा शौरि[12] हि नित्य काळजी वाहे; ।
शिवभक्तिनें[13] न बाधे; नाहीं तरि होय काळ[14] जीवा हे[15].' ॥ ४६
ऐसें वदोनि केशव धर्मासि म्हणे, 'नृपा! कृपापात्रा! ।
विजयाला दे आज्ञा, आशीर्वाक्कवच[16] लेववीं गात्रा[17].' ॥ ४७
धर्म म्हणे, 'ये बा! ये आलिंगन दे, विशंक हो वीरा! ।
जें हित[18] वक्तव्य[19] बरें तें चि प्रिय बोलिलासि तूं धीरा! ॥ ४८
न दिला म्यां हि, त्वां ही द्यावा न मनीं दुरुक्तिला[20] जागा, ।

---

१. नकुळसहदेवांचा. २. 'कथितों' असें पाठांतर. ३. दृढनिश्चय. ४. पंतकृत द्रोणपर्व, अध्याय १४ पहा. ५. जयद्रथास मारिल्याची व पुढें कर्णास मारिल्याची जी कीर्ति व जी प्रतापाची ख्याती होईल ती सर्व तुझीच; माझी नव्हे. ही धरणी (धार्तराष्ट्रांस जिंकल्यानंतर मिळणारी पृथ्वी) तुझी. आम्हीं केवळ निमित्तमात्र आहोंत—हा भाव. ६. त्रिपुरांचा शत्रु जो शिव त्याचा. ७. ज्याच्या प्रतापाची कीर्ति सर्वश्रुत आहे असा. ८. त्या शंकराच्या वरानें. ९. शत्रुनाशाचे कामीं समर्थ. १०. इच्छा. ११. अष्टौप्रहर. १२. मी कृष्ण देखील. १३. 'शिवभक्त म्हणोनि नसो' असाही पाठ आहे. १४. अन्वयार्थः—हे (ही काळजी) शिवभक्तिनें (शिवाच्या भक्तीमुळें, मी शिवभक्त आहें म्हणून) न बाधे; नाहीं तरि (मला शिवभक्तीचें साहाय्य नसतें तर) [हे काळजी] जीवा (माझ्या जीवाला) काळ (यम, मृत्यु) होय. नरनारायण शैवाग्रगण्य होत, हें वाचकांनीं लक्षांत ठेवावें. शिवभक्तिनें न बाधे=तूं (अर्जुन) शिवाचा भक्त असल्यामुळें ही काळजी तुला बाधत नाहीं—असा अर्थ केला तरी चालेल. १५. ही काळजी. 'चिन्तासमं नास्ति शरीरशोषणम्' हें सुभाषितवचन प्रसिद्धच आहे. १६. आशीः+वाक्+कवच=आशीर्वादरूप कवच. १७. शरीराला. १८. तूं माझी निंदा व आत्मस्तुति केलीस, त्यांत सत्य व हितप्रद अशींच वाक्यें आहेत व म्हणून मी तीं वाक्यें प्रियच समजतों—हा भाव. १९. बोलावयास योग्य. २०. निंदेला.

जा गायनजनधनयश जोडीं,[1] तूं व्यसनसेतु[2] माजा गा !' ॥ ४९
गुरुचरणीं पार्थ जडे, जैसी मधुशर्करारसीं[3] मुंगी. ।
त्याच्या शिरःसरोजीं, त्यातें भेटोनि,[4] भूप तो हुंगी.[5] ॥ ५०
प्राज्याशीर्वादांहीं[6] गौरव पौरवकुलेश[7] करि त्याचा,[8] ।
मतिताप[9] हरी, दावी गुण मेघाचा धरार्तिहरित्याचा.[10] ॥ ५१
जिष्णु म्हणे, 'जसि मंगलहेतु[11] त्रिपुरारिच्या शिरीं गंगा, ।
हे भवदाशीर्देवी[12] माझ्या हि शिरीं तशी च अव्यंगा.[13] ॥ ५२
जेणें तुझा पराभव केला त्याचा कधीं न वध राहे;[14] ।
मारीन आजि अरिला; प्राशिल तच्छोणितासव[15] धरा[16] हे. ॥ ५३
कर्णातें मारीन प्रभुजी ! सत्यें तुझ्या पदा शिवतों; ।
मीं दुर्बळ चि, परि प्रभु भजदभिमानी[17] असे सदाशिव तों.' ॥ ५४
नृपति म्हणे, 'विजयी हो; जा, कर्णातें वधूनि ये तूर्ण;[18] ।
यां श्रीहरिप्रसादें दासांचा[19] आजि काम हो पूर्ण.' ॥ ५५
गुरुचा निरोप घेउनि, जिष्णु म्हणे, 'कृष्णजी ! उठा, चाला; ।
आणा सज्ज करुनि रथ, जोडूं सयश वधूनि नीचाला.' ॥ ५६
तेव्हां कृष्णाज्ञेनें दारुक[20] रथ सज्ज करुनियां आणी; ।

---

१. शौर्यानें शत्रुनाश करून तद्वर्णनपर गीत गाणाऱ्या गायकांचें जें धन ( म्हणजे तुझ्या कीर्तिरूप गीतांचा भरणा ) तें विपुल करून टाक. गायन=गायक, गाणारा. २. संकटांतून तारणारा. ३. मधाच्या व साखरेच्या रसांत. (गुळाला मुंगळा चिकटतो तसा). ४. आलिंगन देऊन. ५. शिरःसरोजीं हुंगी=मूर्धाभिघ्राण करी. मूर्धाभिघ्राण हें प्रेमाचें चिन्ह असे, असें पुराणादिक ग्रंथांवरून दिसतें. 'आलिंगुनि, कुरवाळुनि, हुंगुनि शिर, पुसुनि लोचनें पदरें.'–सीतारामायण. ६. पुष्कळ आशीर्वादांनीं. ७. धर्म. ८. अर्जुनाचा. ९. मनस्ताप, संताप. १०. धरा+आर्ति+हरित्याचा=पृथ्वीची पीडा दूर करणाऱ्या मेघाचा. ११. मंगलाचें कारण, कल्याणाला कारणीभूत. १२. भवत्+आशीः+देवी=आपला आशीर्वादरूप देवी. १३. अवयवांनीं संपूर्ण अशी, जिच्या सामर्थ्यांत किमपिही उणें नाहीं अशी, पूर्ण सामर्थ्यवती. १४. वध न राहे=वध झाल्यावांचून राहात नाहीं. १५. त्याचें रक्तरूप मद्य. १६. पृथ्वी. १७. भजत्+अभिमानी=भक्तांचा अभिमानी. ह्या गीत्यर्धांतील 'सदाशिव' ह्या समस्त पदाचे ठिकाणीं 'सदा शिव' अशीं व्यस्त पदें करावयास हरकत नाहीं. अन्वयः–मीं (अर्जुन) दुर्बळ चि [आहें] परि प्रभु शिव तों (तर) सदा (सतत, नित्य) भजदभिमानी असे (आहे, जागृत आहे, साह्याय्य करण्यास तत्पर आहे). १८. लवकर. १९. या दासांचा=आमचा, पांडवांचा. २०. कृष्णाचा सारथी.

त्यावरि चढले दोघे [1]यदुकुरुवर [2]चक्रसद्धनुष्पाणी. ॥ ५७
कर्णवधाचा केला [3]पण, [4]पण चिंता करी विजय [5]वाटे; ।
सर्वांगीं घर्म सुटे, [6]वर्म फुटे, [7]मतिस फार भय वाटे. ॥ ५८
तें जाणे [8]हृत्साक्षी, [9]जो करितां चिंतना भवा खाणी, ।
तो, धैर्योत्साहार्थ [10]स्वपदरता [11]पद्मनाभ वाखाणी. ॥ ५९
वर्णी ज्या ज्या दावी पूर्वी लीला रणांत [12]वासवि त्या, ।
तेव्हां [13]सुहृत्प्रताप प्रभु तो [14]प्रतिभट करी नवा [15]सवित्या. ॥ ६०
हरिलें भय, दिधलें बळ, वाढविलें तेज जिष्णुचें [16]हरिनें; ।
[17]भग्नोत्साह न व्हावें म्हणउनि मन बोधिलें [18]परोपरिनें. ॥ ६१
होतां भगवदनुग्रह कर्णवधीं [19]कायवाङ्मनें [20]सजला; ।
प्रभुसि म्हणे, '[21]भवदंघ्रिस्वस्तरु देयील जय रणीं मजला.' ॥ ६२
जाती नरनारायण; तों युद्धीं भीमसेन रणदक्ष ।
बोले असें विशोका निजसारथिला, वधूनि रिपु लक्ष. ॥ ६३
'धृतराष्ट्रसुतबलाप्रति रथ ने, त्यांचें करीन मीं [22]कंदन; ।

---

१. यदुवर+कुरुवर=कृष्णार्जुन. २. चक्रपाणी=कृष्ण व सद्धनुष्पाणी (गांडीवपाणी)=अर्जुन. सत्+धनुः=चांगलें धनुष्य (गांडीव). ३. प्रतिज्ञा. ४. परंतु. ५. मार्गी. ६. कवच. एकाद्याच्या अंगांत वीरश्रीचा संचार झाला असतां छाती फुगल्यामुळें कवच फुटून जाणें संभवनीय आहे. परंतु येथें तसा प्रकार वर्णिलेला नाहीं. तेव्हां चिलखत फुटणें संभवनीय दिसत नाहीं. म्हणून शंका अशी येते कीं, मूळपाठ 'घर्म फुटे, चर्म सुटे' असा असावा. भ्यालेल्या मनुष्याच्या आंगास घाम सुटणें व त्याच्या हातांतून चर्म (ढाल) गळून पडणें, साहजिक आहे. ७. मनाला. ८. हृदयांतील गोष्ट जाणणारा. ९. चिंतना करितां (चिंतन केल्यास, भगवन्नामाचें स्मरण केल्यास), जो (पद्मनाभ) भवा (त्या भक्ताच्या ऐहिक बंधनास) खाणी (खणून टाकी; निवारण करी), तो पद्मनाभ स्वपदरता धैर्योत्साहार्थ (धैर्य व उत्साह हीं उत्पन्न व्हावीं म्हणून) वाखाणी—असा अन्वयार्थ. १०. स्वपदीं जो लीन त्या अर्जुनास. ११. कमलनाभ (कृष्ण). १२. इंद्रपुत्र, अर्जुन. १३. मित्राचा प्रताप. १४. तेव्हां तो प्रभु (कृष्ण) सुहृत्प्रताप (आपला मित्र जो अर्जुन त्याचा प्रताप) सवित्या (सूर्याला) नवा प्रतिभट (प्रतिस्पर्धी वीर, बरोबरीचा वीर) करी; अर्जुनाचा प्रताप व सूर्याचा ताप बरोबर आहेत, असें वर्णन करी—हा भाव. १५. सूर्यास. १६. **कारकदीपक** अलंकार. जेथें अनेक क्रियापदांचा एका कर्त्याशीं संबंध (अन्वय) असतो व वर्णन हृदयंगम असतें, तेथें हा अलंकार होतो. १७. धैर्यहीन. १८. अनेक प्रकारांनीं. १९. काया-वाचा-मनेंकरून. २०. सज्ज झाला. यास कर्ता 'जिष्णु' अध्याहृत.. २१. भवत्+अंघ्रि+स्वः+तरु=तुमचे चरणरूपी कल्पवृक्ष. २२. संहार, कत्तल.

मद न उरवीन त्यांचा, दावीन तयांसि मृत्युचें सदन.' ॥ ६४
दावी विशोक ती गति[2], ठावी युद्धांत मातलीला[3] जे, ।
सह्यनदी[4] ही जीतें[5] प्रावृट्काळीं हि मातली[6] लाजे. ॥ ६५
भीमरथातें वेढिति पंति[7] अतिखळ[8] धार्तराष्ट्रकटकाचे; ।
झाले, परि हरिवरि[10] करिवर[11] जातां जेंवि, तेंवि भेट[12] कोंचे[13]. ॥ ६६
आधीं शिरें अरींचीं, मग[14] शस्त्रें, अर्जुनाग्रज[15] च्छेदी; ।
छिन्न[16]भटांहीं रणभू[17], दर्भांहीं जेंवि झांकिली वेदी[18]. ॥ ६७
वेष्टुनि गुडभ्रमानें[19] अंगारातें[20] पिपीलिक[21] जळाले; ।
उरले[22] ते मग त्यातें सोडुनि बहु दूर तेथुनि पळाले. ॥ ६८

---

१. गृह. २. फार शीघ्र गति–हा सांगण्याचा भाव. ह्या गीतींत भीमाच्या रथाच्या वेगाचें वर्णन आहे. येथें मातलीचा संबंध आणून सारथ्याचें चातुर्य व सह्यनदीच्या उपमेनें गतीचा वेगातिशय दर्शविला आहे. ३. इंद्रसारथ्यास. मातली हा इंद्राचा सारथी. ह्याच्या सारथ्यकर्मकुशलतेचा मासला पहावयाचा असल्यास जिज्ञासु वाचकांनीं कालिदासकृत अभिज्ञानशाकुंतल नाटकाचा सातवा अंक पाहावा. ४. सह्याद्रि पर्वतांतून उगम पावणारी नदी (मोठ्या खळाळ्याची नदी–असा भावार्थ). ५. ज्या गतीला. ६. अन्वयार्थः–जीतें (भीमाचा सारथी विशोक यानें रथास दिलेल्या गतीतें) [पाहुनि] प्रावृट्काळीं हि (पावसाळ्यांतही) मातली (पूर्ण प्रवाहानें माजलेली) सह्यनदी ही (सह्याद्रींतून निघालेली नदीही) लाजे (आपल्या वेगापेक्षां रथवेग अधिक म्हणून लाजते). ७. सेनाधिपति. सैन्याच्या प्रत्येक तुकडीला निरनिराळा सेनापति असे, म्हणून 'पति' हा शब्द अनेकवचनी वापरला आहे. ८. अत्यंत दुष्ट. ९. दुर्योधनाच्या सैन्याचे. १०. सिंहावर. ११. करींद्र, मोठा हत्ती. १२. योद्धे. १३. कच्चे, शौर्यविहीन, बलहीन. काचे (मंदोत्साह) झाले–असा अन्वय. १४. भीम आधीं शत्रूंचीं शिरें व नंतर त्यांनीं सोडलेलीं शस्त्रें छेदी. म्हणजे शत्रूनें सोडलेले बाण येऊन लागण्यापूर्वींच भीम शत्रूचीं शिरें तोडून नंतर त्यांचीं आपणाकडे येणारीं शस्त्रें तोडी. सारांश–बाण सोडण्यांत भीम इतका चपळ होता कीं शत्रूंनीं सोडिलेलीं शस्त्रें आपणाजवळ येऊन पोंचण्यापूर्वींच, तो आपल्या बाणांनीं त्यांचीं मस्तकें छाटी व नंतर आपल्या बचावासाठीं त्यांनीं (शत्रूंनीं) पूर्वींच सोडिलेलीं शस्त्रें तोडी. १५. अर्जुन+अग्रज=भीम. १६. जखमी झालेल्या वीरांनीं. १७. रणभूमी. १८. यज्ञभूमी. १९. गूळ आहे या खोट्या समजुतीनें. २०. अग्नीतें. २१. मुंगळे. हा ललितनामक अलंकार. सैनिक आपणास जाळणाऱ्या भीमावर जाऊन कांहीं नाश पावले, व कांहीं पळाले, हा प्रकृत व्यवहार वर्णावयाचा आहे. पण त्याचा उल्लेख न करितां त्याचे ठायीं पिपीलिकसंबंधी अप्रकृत व्यवहारसंबंध वर्णिला आहे, म्हणून ललित. प्रकृत व्यवहाराचा उल्लेख करून हा अप्रकृत व्यवहार वर्णिला असता, तर निदर्शना नामक अलंकार झाला असता. २२. जळल्यानंतर जे शिल्लक राहिले ते (मुंगळे).

भीम म्हणे सूतातें, ‘ऐक विशोका! न चित्त मी मरणा; ।
सोडीना चि कधीं ही हा निर्मलकीर्तिवित्त[1] भीम रणा. ॥ ६९
[2]धर्मप्रवृत्ति न कळे म्हणउनि मन फार होतसे कष्टी; ।
[3]अंधाचें पुष्कळ ही निष्फळ बळ होय सांडतां [4]यष्टी. ॥ ७०
पार्थ हि अद्यापि न ये; [5]प्रायः [6]स्वस्थ चि नसेल [7]राजवर; ।
[8]व्यर्थ चि गेलें यश जें मेळविलें श्रम करूनि आजवर. ॥ ७१
जीवंत असति ते[9] कीं नसति कळेना. अहा! महाकष्ट! ।
झालों [10]नृपाधिनें मीं व्याकुळ, जैसा [11]महाहिनें [12]दष्ट. ॥ ७२
आम्हीं जन्मापासुनि बहु दुःख चि भोगिलें न सुख लेश, ।
जपतो हरावया हा दुर्योधन आमुचे [13]असु [14]खलेश. ॥ ७३
हो [15]कांहींतरि. आधीं करितों मीं आजि ओस [16]खळगेहें, ।
वाटे खलबल, [17]सुपथीं कांटे, धोंडे चि, खोल खळगे हें[18]. ॥ ७४
सांग विशोका! माजीं शस्त्रें उरलीं किती? पहा नीट, ।
घीट असें मीं युद्धीं, रगडीन पदें[19] चि रिपु जसे कीट[20]. ॥ ७५
सांगे विशोक, ‘[21]षडयुत [22]मार्गण आहेत, पाहिली [23]खूण; ।
[24]अयुत [25]क्षुरप्र [26]भल्ल हि, भरले आहेत हे[27] तुझे [27]तूंण. ॥ ७६

---

१. निर्मळ कीर्ति हेंच आहे ज्याचें धन, असा. २. धर्मराजाकडील वार्ता. ३. **दृष्टांत.** येथें धर्म हा आंधळा, व भीम हा त्याची काठी–असें समजावयाचें. कारण भीम हा धर्मराजाजवळ नसल्यामुळें, आंधळ्याची काठी सांडल्यामुळें त्याची जशी स्थिति होते, तशीच या प्रसंगीं धर्मराजाची स्थिति झाली होती. ४. काठी. ५. बहुतकरून ६. क्षेम, सुखरूप. ७. **धर्म.** ८. राजा **धर्मा**ला जर कांहीं अपाय झाला असेल, तर–असा भाव. ९. **धर्मा**र्जुन. १०. राजा जो **धर्म**, त्यास प्राप्त झालेल्या क्लेशामुळें; धर्मविषयक काळजीमुळें. ११. मोठ्या सर्पानें. १२. दंश झालेला. (ज्यास सर्प चावला आहे, तो जसा व्याकुळ होतो तसा). १३. प्राण. १४. खल+ईश=दुष्टस्वामी, मोठा दुष्ट. १५. **धर्म** जिवंत असो किंवा नसो. १६. दुष्टांचीं घरें. दुष्टांचा नाश करितों–असा भाव. १७. चांगल्या रस्त्यांतील. १८. हें खलबल (दुष्ट कौरवांचें सैन्य) सुपथीं कांटे, धोंडे [व] खोल खळगे चि [होत]–असा अन्वय. खळबळ हें कांटे, धोंडे व खळगेच होत, असें वाटे–असा अर्थ केला तरी हरकत नाहीं. १९. पायानेंच. २०. किडे. २१. षट्+अयुत=साठ हजार. अयुत=दहा हजार. २२. बाण. २३. चिन्ह, निशाणी. २४. दहा हजार. २५. बाणविशेष, खुरप्र. (याच्या अग्राची आकृति घोड्याच्या खुरासारखी केलेली असते). २६. भाल्याच्या आकृतीचा बाण. २७. रथांत शिल्लक असलेले भाते.

नाराच[1] सहस्र-युग[2], प्रदर[3] सहस्रत्रय[4] प्रभो ! आहे; ।
तोमर[5], मुद्गर[6], शक्ति[7], प्रास[8] हि आहेत पुष्कळ चि बा ! हे. ॥ ७७
असुरबळीं काळीसी जी दावी खळबळीं प्रताप गदा ।
आहे[9], अहितगणा जसि हरिकीर्तिसुधा[10] समस्तपापगदा[11]. ॥ ७८
तुझे सर्वप्रहरणजातशिरींचे[12] अनर्घ्य[13] बाहु-मणी, ।
विजयी सदा असावे; देतिल हे अशनिला[14] हि बा ! हुमणी[15]. ॥ ७९
शस्त्रें सरलीं ऐसें चित्तीं आणूं नको प्रभो ! भांडें; ।
करिशिल निर्जीवनें[16] खलबल भंगुनि, जेंवि मातिचें भांडें.' ॥ ८०
भीम म्हणे, 'तरि करितों सोडुनि शर खलजनीं चमत्कृतिला[17]; ।
गातील देव सत्कवि; 'अतुला[18]' न म्हणोत नीच मत्कृतिला[19]. ॥ ८१
मीं सर्वांतें कीं मज सर्व द्वेषी[20] रणांत मथितील; ।
आबालवृद्ध[21] माझें सद्यश सप्रेम नित्य कथितील. ॥ ८२
स्वस्थ असावा राजा, यावा जय सयदुनायक[22], विशोका ! ।
हरिदर्शनें[23] पशु हि सुखमय, मग न त्यजिल काय कवि शोका? ॥ ८३

---

१. लोखंडी बाण. २. युग=चार ही संख्या दर्शविणारी संज्ञा. युग=युग्म, जोडी–असाही अर्थ आहे. ३. शरीराचें विदारण करणारा बाण. ४. तीन हजार. ५. गुरगुज, (हा घुसळण्याच्या रवीसारखा असतो). ६. मुद्गल. ७. शस्त्रविशेष, ज्यास सैती किंवा भली म्हणतात, ती. ८. भाला. ९. असुरबळीं काळीसी (काली देवीसारखी) [किंवा] समस्तपापगदा जसि हरिकीर्तिसुधा [तसी] जी गदा खळबळीं अहितगणा (शत्रुसमुदायाला) प्रताप दावी, [ती] आहे–असा अन्वय. वरील गीतींत सांगितलेलीं शस्त्रें आपणाजवळ आहेत, पण तीं संपलीं तरी आपली प्रभावशाली गदा आपल्याजवळ आहेच–असा भाव. आहे=विद्यमान आहे, धड आहे. १०. हरिनाम-स्मरणरूपी अमृत. ११. समस्त+पाप+गदा=सर्वपापरूप रोगास. १२. सर्व शस्त्रसमुदायांत श्रेष्ठ असे. 'बाहुमणी' या शब्दाचें विशेषण. या सर्व शस्त्रांपेक्षां तुझे असामान्य बाहूच शिरोभूत (श्रेष्ठ) होत–हा भाव. १३. अमूल्य. १४. वज्रालाही. १५. टक्कर. १६. येथें जीवन ह्या शब्दावर श्लेष आहे. (१) जीवनशक्तिरहित, उत्साहरहित, निस्तेज; (२) जलरहित. १७. चमत्काराला. १८. अनुपमा. 'मत्कृतिला' याचें विशेषण. १९. माझ्या कृत्यास. अनुरूप गीतिः–आर्येला मानियलें बहु, पाहुनि सज्जनीं चमत्कृतिला । खळचि न मानिति जैसे, बहु दूषणसज्ज नीच मत्कृतिला. ॥ (सभापर्व, अध्याय ५।११५). २०. वैरी. २१. बालांपासून तों वृद्धांपर्यंत सर्व. येथें 'जन' हा शब्द अध्याहृत घेतला पाहिजे. २२. कृष्णासह. २३. धर्म स्वस्थ असला पाहिजे व अर्जुन कृष्णासह परत आला पाहिजे. कारण काय, तर कृष्णाच्या दर्शनानें पशूही

सूता ! [1]भूताधिपशरभग्न जसे त्रिपुरदैत्य [2]सहसा रे ! ।
कां झाले हे कौरव भग्न ? पहा पळति वीर[3]सह सारे. ॥ ८४
जाणों, अर्जुन आला; हीं शरजाळें [4]तदन्य न रचील. ।
धन्वी एक हर, दुजा जिष्णु, धनुर्धर उगे चि [6]वरचील. ॥ ८५
येतां सिंह मृगांचें यूथ तसें शत्रुबळ विशोका ! हें ।
झालें भग्न, भयार्त, भ्रमलें सर्वत्र; तूं हि बा ! पाहें'. ॥ ८६
त्यासि विशोक म्हणे, '[7]यद्भुजबळनिधिला नसे [8]अवधि, राहे ।
अहित न यद्दृष्टिपुढें, [9]तद्धनुरव ऐक गा [10]अबधिरा ! [11]हे. ॥ ८७
झालासि बधिर ? कां हे गांडीवाचे न नाद आयिकसी ? ।
आला सार्जुन यादवनाथ. [12]उपेक्षील बाळ [13]आयि कसी ? ॥ ८८
दिसतो कपि ध्वजाग्रीं, [14]जो [15]तृणसम शत्रुसैनिकां गणितो, ।
[16]भवदनुजकिरीटींचा [17]दिनमणिसम झळकतो महामणि तो. ॥ ८९
प्रभुच्या दक्षिणपार्श्वीं [18]प्रलयतरणिमंडलाभ तें चक्र, ।
ज्या श्री[19]सुदर्शनातें स्तवितो जोडूनि कर सदा [20]शक्र. ॥ ९०
[21]प्रभुवक्षस्थलवल्लभ कौस्तुभमणि झळकतो पहा गा ! तो, ।
सज्जन, [22]कलंकितपना [23]त्यजुनि, सदा [24]ज्यां [25]सुखावहा गातो. ॥ ९१

---

सुख पावतात. तेव्हां शहाणा जो धर्म, तो कृष्णदर्शन होतांच सुखी कसा होणार नाहीं ? यांत कैमुतिकन्यायाचा **काव्यार्थापत्ति** नामक अलंकार आहे. मग [तो] कवि शोका न त्यजिल काय ? (आपल्या दुःखाचा त्याग नाहीं का करणार ?)–असा अन्वय.

१. शंकराच्या बाणांनीं पराभूत झालेले असे. २. एकाएकीं, अकस्मात्. ३. तत्पक्षीय वीरांसह. ४. अर्जुनाहून वेगळा. ५. नामधारी, खोटे. ६. वरकड. मागें पृष्ठ ३१९ टीप ५ पहा. ७. ज्याच्या बाहुबलरूपी समुद्राला. ८. स्थलमर्यादा. ९. तत्+धनु+रव=त्या अर्जुनाच्या धनुष्याचे शब्द. १०. ज्याचे कान धड आहेत अशा, जो बहिरा नाहीं अशा (भीमा !). साभिप्राय विशेषण. ११. हे तद्धनुरव. १२. हयगय करील, टाकील. **अर्थांतरन्यास.** १३. आई, माता. १४. अर्जुन. १५. महामणि दिनमणिसम, व शत्रुसैनिक तृणसम. १६. भवत्+अनुज+किरीट=तुझा बंधु जो अर्जुन त्याच्या मुगुटांतील. १७. सूर्यासारखा. १८. प्रलयकालच्या सूर्यमंडलासम प्रभा ज्याची, असें. १९. कृष्णाच्या चक्राचें नांव. २०. इंद्र. इंद्र स्तवितो असें म्हणण्याचें कारण असें कीं, इंद्राकरितां विष्णूनें अनेक दैत्यांचा संहार केला होता. २१. कृष्णाच्या उरोभागाला प्रिय वाटणारा. वल्लभ=प्रिय, प्रेम करणारा. २२. चंद्रसूर्यांस. २३. चंद्रसूर्यांस स्तवण्याचें सोडून त्या कौस्तुभमण्यास सज्जन गातो, म्हणजे चंद्रसूर्यांपेक्षां

तो पांचजन्य[1] दरवर[2] हरिपार्श्वीं शुद्ध सद्यशःपुंज[3]; ।
तो देवदत्त[4] दिसतो जो विजयश्रीविलाससत्कुंज[5]. ॥ ९२
गज सप्तशत, चतुःशत रथ, पत्ति तुरंग अमित भवद्[6]नुजें ।
मथिले; सुयोधनें[7] जय जिंकावा तरि, न काय भव[8] दनुजें[9] ?' ॥ ९३
मारुति[10] म्हणे, 'विशोका ! प्रियकथनें[11] पावलों सुविश्राम[12]; ।
म्यां तुज दिधले विंशति[13] रथ, शत दासी, चतुर्दश ग्राम.' ॥ ९४

---

## अध्याय चव्वेचाळिसावा[14].

अर्जुन हरिला सांगे, 'भीमापाशीं च शीघ्र रथ ने हा.' ।
कृष्ण म्हणे, 'बा ! नेतों. हो पूर्ण तुझी अरातिमथनेहा[15].' ॥ १
रथ चालवी यदूत्तम जाया भीमाकडे, तया काळीं, ।
पार्थें बहु भट वधिले, होता स्वर्भोग[16] ज्यांचिया[17] भाळीं. ॥ २
दूरुनि अनुजपराक्रम पाहे भीम, प्रसन्न होय महा; ।
आपण हि कटक मर्दी; तैं म्हणती लोक, 'काय हो ! यम हा !'॥ ३
गज दश सहस्र, शत रथ, हय पंच सहस्र, युद्धभूमिगतें[18] ।
भीमें हर्षें[19] वधिले; नरवीर हि दोन लक्ष दोन शतें. ॥ ४

---

हा मणि अधिक तेजोयुत आहे–हा भाव. २४. कौस्तुभमण्यास. २५. सुखदात्यास. कौस्तुभमणि हा चंद्राप्रमाणें डागळलेला नाहीं, किंवा सूर्यासारखा तापदायकही नाहीं, तर आणखी सुखदायक आहे, असें वर्णन असल्यामुळें येथें **व्यतिरेका**लंकार साधला आहे.

१. पांचजन्य नामक कृष्णाचा उत्तम शंख. २. कृष्णाच्या बगलेंत. ३. सत्+यशः+पुंज= सुयशाचा ठेवा. ४. हा अर्जुनाचा शंख. ५. विजयलक्ष्मीचें विलास करण्याचें उत्तम लतागृहच, असा. अर्थात्–विजयश्री सहज साध्य करणारा. ६. तुमच्या धाकट्या भावानें. ७. [जरि] सुयोधनें जय जिंकावा, तरि दनुजें भव न [जिंकावा काय ] ?–असा अन्वय. अर्जुनास सुयोधन जिंकील तर शिवास दैत्य जिंकील–हा भाव. ८. शिव. ९. दैत्यानें. १०. भीमसेन. ११. मला संतोष होईल अशी खबर सांगितल्यानें. १२. चांगली मनःशांति. १३. ही आनंदाची बातमी सांगितल्याबद्दल वीस रथ, शंभर दासी आणि चौदा गांवें हीं बक्षीस दिलीं. १४. अध्याय ७७–८१ व अध्याय ८२ श्लोक १–२९ इतका मुळांतील कथाभाग यांत आला आहे. १५. अराति+मथन+ईहा=शत्रु मारण्याची इच्छा. १६. स्वर्गभोग. १७. ज्यांचिया (ज्या वीरांच्या) भाळीं (कपाळीं) स्वर्भोग होता [असे] बहु भट तया काळीं पार्थें वधिले–असा अन्वय. १८. समरांगणांत असलेल्या (भीमा)नें. १९. उत्साहानें.

समरांगणांत भीमें रक्तनदी [1]परमदुस्तरा भरिली; ।
त्या हि [2]महाभीमेनें [3]जीवन्मृतवीरवरचमू [4]हरिली. ॥ ५
दुर्योधन [5]माम्याला सांगे, 'त्वां भीमसेन वारावा.' ।
वांच्छी [6]पटहध्वानें [7]लोपाया [8]प्रलयघननवारावा. ॥ ६
बहु भांडे परि पडला भीमशरें [9]पसरुनीं [10]भुजा शकुनी, ।
गरुडापुढें न हंस हि [11]गुण मिरवी; मग [12]कसा दुजा शकुनी? ॥ ७
जाला तो शकुनि करुनि रण पात्र जसा वृथा श्रमा, [13]म्यां तें ।
कथुनि [14]तसें व्हावें कां? [15]नृप पळवी मूर्च्छिता स्व माम्यातें. ॥ ८
दुर्योधन भीमभयें झाला, सोडूनियां मदा, [16]विमुख; ।
तैं [17]तच्चमू हि [18]पार्थां, सूर्याला रात्रिसी, न दावि मुख. ॥ ९
त्या समयीं [19]अपराण्हीं कर्ण क्षोभे वनीं [20]दवानळसा; ।
[21]तेव्हां भीम हि पावे कलिच्या क्षोभें पराभवा [22]नळसा. ॥ १०
कर्णशर क्षोभविती धर्मबळा, जेंवि सागरा मकर, ।
सुर, मुनि म्हणती, 'धन्य! [23]छात्रीं बहु [24]सानुराग [25]रामकर.' ॥ ११
तेव्हां सर्व हि [26]म्हणती, 'सूर्य महावीर कर्ण, नक्षत्रें ।
इतर भट.' असें केलें त्याचें सर्वत्र वर्णन [27]क्षत्रें. ॥ १२

१. तरण्यास कठीण अशी. २. मोठ्या भयंकर नदीनें. ३. जिवंत असून मृतवत् असलेल्या वीरांची सेना. ४. पराभूत केली. ५. शकुनीला. ६. दुंदुभीच्या शब्दानें. ७. अलंकार–**असंभव**. ८. प्रलय+घन+नव+आराव=प्रलयमेघाच्या नवीन ध्वनीस. ९. अस्ताव्यस्त, हात-पाय सांवरण्याचेंही सामर्थ्य उरलें नाहीं, इतका हतवीर्य होऊन. १०. स्वतःच्या ठायीं असलेल्या वेगाचें आधिक्य. ११. **काव्यार्थापत्ति**. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १२. पक्षी. १३. हें धृतराष्ट्रास कथा सांगणाऱ्या संजयाचें म्हणणें. १४. वृथा श्रमी. १५. दुर्योधन. १६. रणांतून पलायित. १७. त्याचें (दुर्योधनाचें) सैन्य देखील. १८. पृथेचा पुत्र जो भीम, त्याला. १९. अपराण्ह=मध्यान्ह व सायान्ह ह्यांमधला काळ. २०. वणव्याप्रमाणें. दव म्हणजेच वणवा, अरण्याग्नि; तेव्हां येथील 'अनळ' हा शब्द आगांतुकच होय. २१. तेव्हां कलिच्या क्षोभें नळसा (नळ जसा कलीच्या प्रतापानें पराभव पावला तसा) भीम हि [कर्णाच्या क्षोभें] पराभव पावला. २२. नळराजासारखा (पंतकृत वनपर्व, अध्याय ४ पहा). २३. शिष्याचे ठायीं. २४. स+अनुराग=प्रीतियुक्त. २५. परशुरामाचा [वरद] हस्त. परशुराम हा कर्णाचा गुरु. (मागें अध्याय २२ पहा). २६. महावीर कर्ण [हा] सूर्य [होय. व] इतर भट (योद्धे) [हे] नक्षत्रें (नक्षत्रांप्रमाणें तेजोहीन, अर्थात् पराक्रमहीन) [होत]–असा भाव. २७. क्षत्रियांनीं.

भीमादिकां न आटे[1], कर्ण करी कटककदन कोपानें, ।
सिंहें गोधन मथितां, काय करावें झटोनि[2] गोपानें[3] ? ॥ १३
इतुक्यांत जिष्णु कुरुबलमथन करुनि, वाहवूनि रक्तनद्या ।
येतां, म्हणे, 'मुकुंदा[4] ! वृषकालकरीं[5] स्व[6] भीम भक्त न द्या. ॥ १४
तो कर्णकेतु दिसतो, ते भीमप्रभृति करिति रण त्यासीं, ।
चर्चा[7] करिति जसे बहु एकासीं वेद-पाठ[8] म्हणत्यासीं. ॥ १५
ते पांचाळ पळाले, त्यांमागें धार्तराष्ट्रनृप[9] आहे; ।
तच्छुभ्रच्छत्र[10] पहा, जें पूर्णसुधाकरोपमा[11] लाहे[12]. ॥ १६
मधुकोशाला[13] सरघा[14], कृतवर्मा द्रौणि कृप तसे राया[15] ।
रक्षिति, पहा मुकुंदा ! मोटी यांची सुयोधनीं माया[16]. ॥ १७
जो सारथि[17], सुखधामा[18] ! तुजसम[19] शूर हि नवांबुदश्यामा[20] ! ।
आला अरिच्या[21] कामा[22] तो राजा शल्य आमुचा मामा. ॥ १८
ने रथ तेथें जेथें कर्ण करितसे मदीयबलदमना; ।

---

१. आटे=आटोपे—हा शब्द पंतांनीं द्रोणपर्व, अध्याय ३ गीति ५० मध्यें योजिला आहे. २. झटोनि काय करावें ? म्हणजे झटूनही उपयोग नाहीं—हा भाव. ३. गुराख्यानें. ४. 'मुकुंद'-शब्द प्रस्तुत स्थलीं साभिप्राय आहे. मुक्त करणारा तो मुकुंद; प्रस्तुत स्थलीं भीमास मुक्त करावयाचें आहे. परिकरांकुरालंकार. ५. कर्णरूपी काळाच्या हातांत. ६. आपला भक्त भीम. ७. चर्चा=पुनरावृत्ति, वादविवाद. वेदपाठ म्हणणाऱ्याची परीक्षा घेण्याच्या उद्देशानें जसे निरनिराळे पंडित त्यास जटा, घन, उदात्त, अनुदात्त, शाखाभेदांचीं पाठांतरें, इत्यादिकांविषयीं अनेक प्रश्न विचारून त्रास देतात, व तो खरा जाणता असल्यास त्या सर्वांस सदुत्तरें देऊन संतुष्ट करितो, त्याप्रमाणें कर्ण सर्वांशीं युद्ध करीत आहे—हा भाव. पेशव्यांच्या दरबारीं विद्वानांस दक्षिणा देण्याकरितां श्रावणांत परीक्षा होत असे. त्या समयीं विद्वानांची जी कठीण परीक्षा होत असे, त्यासारख्या स्वतः पाहिलेल्या प्रसंगावरूनच पंतांस हें सादृश्य सुचलें असावें. ८. वेदपाठ=वेदाचें पठण (वाचन) किंवा—वेद पाठ (तोंडपाठ) म्हणणें. 'वेद पाठ—म्हणत्यासीं' असा पाठ स्वीकारिला, तरी अर्थहानी होत नाहीं. ९. दुर्योधन. १०. त्याचें पांढरें छत्र. ११. पौर्णिमेच्या चंद्राची उपमा. १२. लाभे, प्राप्त होई. दुर्योधनाचें च्छत्र अत्यंत शुभ्र होतें—असा अर्थ. १३. मधाच्या पोळ्याला. १४. मधमाशा. १५. दुर्योधनाला. १६. प्रेम. १७. सारथ्यकर्मांत कुशल असा. १८. सुखाचें आश्रयस्थान. १९. तुजसम जो सारथि, तुजसम जो सुखधामा, तुजसम जो शूर व तुजसम जो नवांबुदश्यामा—असा अन्वय केला, तरी तो अर्थास परिपोषकच आहे. २०. नूतन मेघाप्रमाणें श्यामवर्ण अशा कृष्णा ! २१. कर्णाच्या. २२. कामा आला=उपयोगीं पडला.

सरत असेल वृषदहनदग्धांच्या[1] कृष्णमित्रजलद[2] मना.' ॥ १९
हरि[3] हर्षें हरि[4] हांकी; तैं[5] हरिणाचा चि न हरिती सर्व ।
ते, ऐसे जवन[6] लव न पवनकुमारीं[7] हि उरविती गर्व. ॥ २०
शल्य कपिध्वज[8] पाहुनि कर्णासि म्हणे, 'पहा महाबाहो ! ।
आला अर्जुन, सावध आतां युद्धार्थ शीघ्र तूं बा ! हो[9]. ॥ २१
येतो कसा पहा रथ; पंथ[10] सेना सोडित्ये पहा त्यातें, ।
सिकतांची[11] भित्ति[12] जसी पूरातें निजपथें वहात्यातें[13]. ॥ २२
त्वां धर्मभंग[14] केला, भीम हि बहु पीडिला असें कळलें[15]; ।
त्यांचा[16] कैवारी जय[17] आला यद्यश कधीं नसे मळलें[18]. ॥ २३
रक्षक पृष्ठीं[19] पार्श्वीं[20] नाहींत, पहा, अहा ! महाभागा ! ।
भाग्यें एकाकी[21] जय सांपडला साधिं आपुल्या भागा[22]. ॥ २४
तूं चि समर्थ जयाला[17] वाराया, सागरा जसी वेळा[23], ।

---

१. कर्णरूप अग्नीनें दग्ध झालेल्या माझ्या सैनिकांच्या (मना). २. अर्जुनरूप मेघ. ३. या गीत्यर्धांत हकाराची सहा वेळां आवृत्ति झाली आहे. ४. घोडे. ५. तैं ते (हरि) हरिणाचा चि (फक्त हरिणाचाच) सर्व गर्व हरिती [असें] न; [तर] ते ऐसे जवन [कीं] पवनकुमारीं हि लव गर्व न उरविती—असा अन्वय. ६. वेगवान्, चपल. ७. मारुतीचे ठायीं देखील. ८. (अर्जुनाच्या रथावरील) कपियुक्त ध्वज (पताका). ९. तूं युद्धार्थ शीघ्र सावध हो—असा अन्वय. १०. मार्ग. ११. वाळवेची. 'सिकता' ह्या शब्दाचा संस्कृतांत अनेकवचनी प्रयोग होतो. १२. भिंत. 'भित्तिः प्रदेशे कुड्ये च' इति विश्वः. १३. निजपथें वहात्यातें पूरातें=आपल्या (सिकतांच्या भिंतीच्या)कडे वहात येणाऱ्या प्रवाहास. जसा वाळूचा बांध पाणी अडवूं शकत नाहीं, त्याप्रमाणें [कौरवांचें] सैन्य अर्जुनास अडवूं शकत नाहीं—असा भाव. १४. धर्मराजाचा पराभव. १५. अर्जुनास कळलें—असा भाव. १६. 'त्याचा' असें पाठांतर. १७. अर्जुन. जय (अर्जुन) आला नाहीं, तर प्रत्यक्ष जय (विजय) च आला—असा ध्वनितार्थ. १८. अर्जुनाचा युद्धांत कधींही पराभव झाला नाहीं, या गोष्टीस उद्देशून हें वाक्य आहे. या गीत्यर्धांत 'जय' हा जो अर्जुनपर्यायी शब्द वापरला आहे, तो साभिप्राय आहे. म्हणून येथें **परिकरांकुरालंकार.** १९. मागें. २०. बाजूस. २१. एकटा, बरोबर दुसरा कोणी नाहीं असा. २२. कार्यभाग. किंवा—भाग=वांटा, नेमून दिलेलें काम. अर्जुनास मारण्याचें तुझ्यावर सोंपविलेलें काम साधून घे—हा भाव. २३. सीमा, मर्यादा, समुद्राचा किनारा. 'वेला स्यात्तीरनीरयोः' इति विश्वः; 'वेला काले च सीमायामब्धेः कूलविकारयोः । आक्लिष्टमरणे रोगे ईश्वरस्य च भोजने. ॥' इति मेदिनी.

हाकूं हय ? दे आज्ञा; [1]जयकामा ! दुर्लभा असी [2]वेळा. ॥ २५
[3]गंधद्विपदृष्टिपुढें [4]समदगजघटा जसी कधीं न टिके, ।
जिष्णुपुढें तसि सेना [5]वेंध पावे; वीर येथ कां [6]लटिके ? ॥ २६
[7]दिग्विजयीं होतें जें, तें चि असो धैर्य जें [8]असामान्य; ।
[9]हा जिष्णु जसा [10]लोकीं, अन्य धनुर्धर नसे असा मान्य.' ॥ २७
कर्ण म्हणे, 'सत्य वदसि, "धैर्याची धरुनि घट्ट कास रहा." ।
वदलासि यथार्थ नृपा ! मज झाला प्राप्त धन्य [11]वासर हा. ॥ २८
जो [12]एकवीर, [13]सद्गुणरत्नाकर, शंभुमान्य, हरिसख, या ।
पार्थासीं [14]द्वैरथ; हें वर्णूं निज भाग्य कोठवरि सखया ! ॥ २९
जो केला सर्वस्वा पाशुपतास्त्रासि पात्र [15]ईशानें, ।
वरिलें ज्याचें सारथिपण हि हरीनें [16]जगत्त्रयेशानें. ॥ ३०
ज्याला दिलीं निजास्त्रें [17]शक्रादि समस्त लोकपाळानीं, ।
तो [18]सत्कीर्तिगतिप्रद भेटविला आमुच्या [19]कपाळानीं. ॥ ३१
शल्या ! [20]पुराण ऋषि नरनारायण जाणति [21]प्रभूत [22]नय; ।

---

१. जयाची इच्छा करणाऱ्या (कर्णा !). किंवा–'जयकामा' हें पद चतुर्थ्यन्त घेऊन, जयकामा (जयाची इच्छा करणाऱ्या पुरुषास) असी वेळा दुर्लभा [होय]–असा अन्वय करावा. २. समय. ३. मदोन्मत्त हत्तींच्या दृष्टीपुढें. ४. गर्वयुक्त हत्तींचा समूह. ५. 'वध पावति वीर' असें पाठांतर. ६. [हे] लटिके (खोटे, नांवाचे) वीर येथ (या युद्धांत) कां (कशाला)–या खोट्या वीरांचें अर्जुनापुढें कांहीं चालत नाहीं, तस्मात् त्यांचा युद्धांत कांहीं एक उपयोग नाहीं–हा भाव. ७. कर्णानें अंगादि देशांवर चाल करून मोठ्या शौर्यानें दिग्विजय साधिला–ह्या कथानकास उद्देशून हें वाक्य आहे. तेंचि धैर्य असो=(कर्णा !) तेंच तुझें धैर्य आतां तुझ्या ठिकाणीं विद्यमान असो (टिकून राहो)–असा भाव. ८. अद्वितीय, असाधारण. ९. उत्तरार्ध पूर्वार्धाचें कारण आहे, म्हणून **काव्यलिंग.** १०. ह्या लोकीं, पृथ्वीवर. ११. दिवस. १२. ज्याच्या बरोबरीचा दुसरा वीर नाहीं, असा. १३. सुगुणांचा समुद्र. किंवा–सद्गुणरूपी रत्नांचा आकर (खाण) च असा. १४. दोघां रथ्यांचें युद्ध, द्वंद्वयुद्ध. १५. शिवानें. १६. जगत्त्रय+ईश=स्वर्ग, मर्त्य व पाताळ या तिन्ही जगांचा स्वामी जो कृष्ण, त्यानें. १७. इंद्रादिक अन्य दिक्पालकांनीं. १८. सत्कीर्ति व सद्गति देणारा. (अर्जुनाचें विशेषण.) माझ्या मोठ्या भाग्यानें माझी अर्जुनाशीं गांठ पडली आहे. तो अर्जुन असा कीं, ज्याला मी मारिल्यास, तो मोठा पराक्रमी असल्यामुळें, माझा मोठा लौकिक होईल व ज्यानें मला मारिल्यास मला उत्तम लोक मिळेल–हा भाव. १९. नशीबानें, सुदैवानें. 'कपाळ' ह्याचा दुर्दैव, प्रतिकूल विधि–असा अर्थ आहे, परंतु येथें

सुरकार्यार्थे[1] कुरुयदुनाथांचे[2] जाहले प्रभू तनय. ॥ ३२
मीं शुद्ध युद्ध यांसीं निर्भयचित्तें[3] करीन; काम रणीं ।
होतो पूर्ण; पहावा धर्मज्ञजनें हि दोष का मरणीं ? ॥ ३३
ते ही[4] नरनारायण म्हणतिल 'वीरोऽयमेव कौ'[5] शल्या ! ।
श्रीमद्गुरुप्रसादें दावीन अशा सुयुद्धकौशल्या. ॥ ३४
भीष्मद्रोणचरित्राहुनि कोणाचें चरित्र सन्महित[6] ? ।
परि तें हि विसरवीन स्वचरित्रें मीं करीन जन्महित[7]. ॥ ३५
मीं घाबरे करीन चि कृष्ण[8]; जऱ्ही त्यांसि देवसेनानीं[9] ।
होऊनि युक्त, होइल युद्धांत सहाय देवसेनानी[10].' ॥ ३६
ऐसें वदोनि सांगे नृपकृपकृतवर्मगुरुसुतांसि असें:— ।
'जिष्णु तुम्हीं पीडावा, मीं तुमच्या रक्षणीं समर्थ असें[11]. ॥ ३७
वर्षा अस्त्रें शस्त्रें, विकळ करा शत्रुला, उठा वेष्टा; ।
गर्तां[12]प्रति गजसा, मजप्रति रिपु आणा; करूं नृदेवेष्टा[13].' ॥ ३८
कर्णोक्तें ते जेव्हां शर वर्षति; म्हणति लोक 'नरें[14] मेला.' ।
सुरें[15]-भीरू म्हणति, 'शिवे[16] ! पतिशोक[17] शिवो कदापि न रमेला[18].' ॥ ३९

---

सुदैव, अनुकूल विधि—असा अर्थ केला पाहिजे. आमुच्या=आपल्या सर्व कौरवपक्षांतील योद्ध्यांच्या. २०. फार प्राचीन काळापासून प्रख्यात असे. २१. पुष्कळ. २२. नीति, न्यायमार्ग.

१. कल्यंशसंभूत दुर्योधनादि दुष्टांचा संहार करून सुरकार्य साधण्याकरितां. २. नर (अर्जुन) हा कुरुनाथाचा (कुरुकुलोत्पन्न पंडूचा) व नारायण हा यदुनाथाचा (वसुदेवाचा) तनय झाला—असा भाव. हा यथासंख्य अलंकार. कारण येथें अनुक्रमानें नरनारायण शब्दांचा कुरु व यदु शब्दांशीं संबंध आहे. ३. शत्रूचें कर्णानें केलेलें गीति २९–३२ यांतील वर्णन व पुढचीं त्याचीं धैर्याचीं वाक्यें वीररसाचीं उत्तम उदाहरणें होत. ४. 'देही' असें पाठांतर. देही=मानवरूप धारण करणारे. ५. कौ (पृथिव्यां) अयं एव वीरः=पृथ्वीवर हाच एक वीर [आहे]—असें. ६. सज्जनांनीं गौरव करण्यास योग्य. ७. जन्मसाफल्य, जन्माचें सार्थक्य. ८. दोघे कृष्ण, कृष्ण व अर्जुन. ९. देवांच्या सेनांनीं युक्त. १०. देवांचा सेनापति, कार्तिकस्वामी. ११. आहें. १२. खळग्यापाशीं. कल्पनासादृश्यः—'दे धरूनि गजवरा खळगा.' (पंतकृत सभापर्व, अध्याय ४।६). १३. नृ+देव+इष्ट=राजाचें प्रिय. १४. अर्जुन. १५. देवस्त्रिया, देवांगना. १६. हे पार्वति ! १७. नारायण (कृष्ण) मरण पावल्यास होणारा शोक. वैधव्यदुःख किती दुःखदायक व असह्य असतें, हें ह्या उद्गारावरून दिसून येतें. १८. लक्ष्मीला.

त्या कौरववीरांतें भंगुनि भीमासि भेटला जिष्णु, ।
जैसा करुनि पराभव दैत्यांचा देव[1]नायका [2]विष्णु. ॥ ४०
'आहे स्वस्थ [3]नृप' असें जातां चि सुवृत्त जेघवां सांगे, ।
भीम [4]म्हणे, '[5]राधे ! हा [6]स्वपराहितहेतु पाळिला कां गे !' ॥ ४१
भीमें आज्ञा देतां कर्णावरि जिष्णु जाय, तो नयनीं ।
पाहोनि वेष्टिला [7]दश दुःशासनवीरबंधुनीं [8]अयनीं. ॥ ४२
[9]त्यजिले [10]गुरुभाग म्हणुनि, पडले चि गळां [11]मृतीच्छु कीं अरि ते ।
वधिले पार्थें, सुज्ञें [12]अर्थीजन दवडिले कधीं न रिते. ॥ ४३
मग [13]नवतिसंख्य आले संशप्तकवीर त्यांस ही [14]निवटी, ।
[15]विद्युद्द्युति [16]रवितेजीं लोपे; मिरवील गुण कसी दिवटी ? ॥ ४४
जातां कर्णाप्रति कुरुभटगण रोधी पथांत [17]धवलाश्वा, ।
[18]पावे नाश न कां, जो झोंबे [19]हरिच्या [20]सुमुक्तकवला [21]श्वा ? ॥ ४५

---

१. इंद्राला. २. ही उपमा योग्य आहे. कारण उपेंद्र (**विष्णु**) हा इंद्राचा धाकटा बंधु व **अर्जुन**ही **भीमा**पेक्षां लहान. ३. धर्मराज. ४. **धर्म** स्वस्थ (कुशल, क्षेम) आहे हें ऐकल्याबरोबर धैर्य येऊन, आतां **कर्ण** हटकून मरतो, असें **भीमा**स वाटलें व एकदम त्याच्या मुखांतून पुढील उद्गार निघाला—हा भाव. ५. हे **कर्ण**माते ! ही **परोक्षजनसंबोधनोक्ति** आहे. वर्णनीय विषय एक असून विचाराचे ओघानें अथवा मुद्दाम मध्येंच त्या विषयापासून क्षणभर वळून दुसऱ्या एकाद्या जवळ नसलेल्या व्यक्तीस संबोधून भाषण जेथें केलेलें असतें, तेथें हा अलंकार होतो. ६. स्व+पर+अहित+हेतु=आपल्या व दुसऱ्याच्या नाशास कारण असा. ७. **दुः**शासनाच्या वीरश्रीयुत अशा दहा भावांनीं. ८. मार्गांत. ९. **दुर्योधनदुः**शासनादिक शंभर पुत्रांस मारण्याचें काम **भीमा**नें पतकरिलें असल्यामुळें त्या दहा **कौरव**कुमारांस टाळून **अर्जुन** पुढें चालला, पण ते पुनः आडवे आल्यामुळें त्यांस मारावें लागलें—असा एकंदर गीतीचा अर्थ. १०. वडील भावाचा (**भीमा**चा) वांटा. ११. मरण्याची इच्छा करणारे. ते अरि गळां चि पडले, कीं (कारण) [ते] मृतीच्छु [होते]—असा अन्वय. 'मृतीच्छु जे अरि ते' असें पाठांतर. १२. याचक. हें वाक्य **अर्जुना**विषयींचें नसून सामान्य सिद्धांत आहे, असें समजल्यास हा **अर्थांतरन्यास**. १३. नव्वद. १४. ठार मारी. १५. विद्युत्+द्युति=विजेची प्रभा. १६. सूर्याच्या तेजांत विद्युत्प्रकाशाचाही लोप होतो, मग दिवटीच्या प्रकाशाचा लोप होईल यांत काय आश्चर्य ?—हा भाव. अलंकार—**काव्यार्थापत्ति**युक्त **दृष्टांत**. १७. **पार्था**ला. १८. जो श्वा हरिच्या सुमुक्तकवला झोंबे तो नाश कां न पावे ? पावे चि—हा भाव. १९. सिंहाच्या. २०. उत्तम मुक्ताफलरूपी ग्रासाला. हत्तीच्या गंडस्थळाचें विदारण करून सिंह त्यांतील मुक्ताफलें भक्षण करितो, असें वर्णन करण्याचा कविसंप्रदाय आहे. अलंकार—**प्रश्ना**लंकारयुत **दृष्टांत**. २१. कुत्रा.

झाला मग्न [1]अनुजरथ खलबलजलधींत भीम तें पाहे, ।
धांवे [2]गदासहाय त्वरित, न तें [3]व्यसन बंधुचें साहे. ॥ ४६
मारी अयुत गज रणीं, [4]काळीसी ती करी गदा [5]केली; ।
रणभूमि [6]दुष्प्रचारा [7]भीमसखीनें क्षणें तदा केली. ॥ ४७
पायानीं च अरींतें, अपकार मनांत आठवी, रगडी; ।
[8]समशील तो गदेचा, रिपुला दावी न पाठ, वीर गडी. ॥ ४८
खलबल मथितां शोभे तो भीम [9]पयोनिधींत [10]मंदरसा; ।
चित्तीं म्हणे, 'पहातो भोगाया [11]अंधपुत्र मंद [12]रसा !' ॥ ४९
रिपुकटकांत वृकोदर, जैसा [13]क्षुब्धार्णवीं न भी [14]मकर; ।
उरवील [15]चंडकरकर [16]जीवन कांहीं तरी, न भीमकर. ॥ ५०
चढला रथीं वृकोदर [17]रिपुकटकांचा करूनि घात रणीं; ।
जिष्णु अरुण, त्यामागें भासे लोकांसि भीम हा [18]तरणी. ॥ ५१
[19]झाले, जयशर रिपुभटमर्मीं घाया [20]चिरभ्रमा, रुतते; ।
[21]कौरवसैनिक भीमार्जुन तेव्हां गमति [22]अभ्र [23]मारुत ते. ॥ ५२
भानुपुढें [24]निबिडें ही [24]तिमिरें क्षणभरि हि काय हो ! [25]टिकणें ? ।

---

१. धाकटा भाऊ जो अर्जुन, त्याचा रथ. २. गदा आहे ज्याच्या साहाय्यास असा. गदा घेऊन—असा भाव. ३. संकट. ४. कालीदेवीसारखी. काली ही शुंभनिशुंभ, चंडमुंड इत्यादि राक्षसांस मारणारी देवी. ही सिंहारूढ होऊन युद्ध करी—असें वर्णन आहे. ५. क्रीडा. मागें अध्याय ४३ गीति ७८ पहा. ६. (सैनिक व हत्ती, घोडे इत्यादिकांचीं असंख्य प्रेतें पडलेलीं असल्यामुळें) संचार करण्यास अशक्य अशी. ७. भीमाची सखी जी गदा, तिनें. ८. (गदेशीं) समान आहे शील (स्वभाव) ज्याचें असा. ९. समुद्रांत. १०. समुद्रमंथनप्रसंगीं देवांनीं मंदरपर्वताचा मंथनदंड केला होता—त्या कथानकाकडे कविकटाक्ष आहे. ११. मंद (मूर्ख) अंधपुत्र (दुर्योधन) रसा भोगाया पहातो—असा अन्वय. १२. पृथ्वी. १३. खवळलेल्या समुद्रांत. १४. मगर. १५. सूर्याचा किरण. चंडकरकर (सूर्यकिरण) जीवन (पाणी) कांहीं तरी (थोडेंसें तरी) उरवील (शिल्लक ठेवील) [पण] भीमकर जीवन (प्राण) कांहीं तरी (थोडें सुद्धां) न (उरवील)—असा अन्वय. १६. उदक, (पक्षीं) प्राण. श्लेष. १७. 'रिपुकटकाचा' असें पाठांतर. १८. सूर्य. १९. चिरभ्रमा घाया जयशर (अर्जुनबाण) रिपुभटमर्मीं रुतते झाले—असा अन्वय. २०. महामोहास. भ्रम=मन अस्थिर होणें. २१. तेव्हां ते कौरवसैनिक व भीमार्जुन [अनुक्रमें] अभ्र [व] मारुत गमति—असा अन्वय. यथासंख्य. २२. मेघ. २३. वायु. २४. अगदीं दाट

एकें चि [1]पावकाच्या, जळतात चि [2]तूलराशिकोटि, [3]कणें. ॥ ५३
[4]मृत्युत्रस्त प्राणी आश्रय करितात [6]अभयदा [6]धर्मा, ।
तैसे जे भट कर्णा [7]अवलंबिति ते चि पावती [8]शर्मा. ॥ ५४
कर्णें पार्थसहाय [9]प्रोद्भट पांचाळवीर उडवीले; ।
वायूनें [10]वारिदसे, [11]गमति गजें काय [12]पद्मं तुडवीले ! ॥ ५५
चाप शतानीकाचें सुतसोमाचें हि खंडिलें कर्णें; ।
तैसीं [13]पांचाळबळें, [14]प्रभंजनें जेंवि उडविलीं [15]पर्णें. ॥ ५६
कैकेयसुत विशोक हि वधिला [16]स्वसुतप्रसेनवधकामी; ।
कैकेय भूमिपति ही मथिला कर्णें क्षणांत संग्रामीं. ॥ ५७
वधिला [17]प्रसेन तेणें, ज्याशि शिनीचा तनूज सत्यक [18]वी; ।
[19]त्या सात्यकिनें, तैं सुर म्हणती, 'हा [20]जिष्णुशिष्य सत्य [21]कवी.' ॥ ५८
कर्ण म्हणे सात्यकिला, 'मेलासि अहा ! [22]पहा, महाशर हा ।
हरि तुज कलभा, [23]शलभा [24]बलभाप्राणांतकरहुताश, [25]रहो. ॥ ५९

---

अंधकारानें. २५. टिकाव धरणें. सूर्यापुढें अंधकाराला—मग तो कितीही दाट असला तरी—टिकाव धरितां येईल काय ? अर्थात्—नाहीं, हें उत्तर. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे.

१. पावकाच्या (अग्नीच्या) एके चि कणें—असा अन्वय. २. कापसाच्या राशींच्या कोटी. ३. ठिणगीनें, फुणगीनें. या गीतीचीं दोन्ही अर्धें **अप्रस्तुतप्रशंसे**चीं उदाहरणें होत. ४. मृत्यूमुळें भ्यालेले. 'मृत्युग्रस्त' असें पाठांतर. ५. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ६. अभय देणाऱ्या, पाठीशीं घालणाऱ्या धर्माचा. धर्माचा आश्रय करण्याचें कारणः—धर्मेण हन्यते व्याधिर्हन्यन्ते वै तथा ग्रहाः । धर्मेण हन्यते शत्रुर्यतो धर्मस्ततो जयः ॥. ७. अवलंबून राहातात, आश्रयाला राहातात. ८. शर्म=सौख्य, क्षेम. ९. पराक्रमी. १०. मेघाप्रमाणें. ११. **उत्प्रेक्षा.** १२. कमळें 'पद्म' हा शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी असून पुल्लिंगीही आहे. १३. कर्णें पांचाळबळें उडविलीं—असा अन्वय. १४. मोठ्या वाऱ्यानें. १५. पानें. १६. आपला (कर्णाचा) मुलगा जो प्रसेन, त्यास मारूं इच्छिणारा. (विशोकाचें विशेषण). १७. कर्णाचा मुलगा. अन्वयः—ज्याशि (ज्याला) शिनीचा तनूज (मुलगा) सत्यक वी (उत्पन्न करी) तेणें (त्यानें) [अर्थात् त्या सात्यकीनें] प्रसेन वधिला. शिनीचा नातू व सत्यकाचा मुलगा जो सात्यकी, त्यानें (कर्णाचा मुलगा) प्रसेन यास मारिलें—हा भाव. १८. प्रसवे. १९. 'त्या सात्यकिनें तैं सुर म्हणती' असा पाठभेद. २०. अर्जुनाचा शिष्य. २१. शाहाणा, युद्ध करण्यांत पटाईत. २२. पहा, हा महाशर तुज कलभा (हत्तीच्या बच्चासारखा जो तूं त्या तुला) हरि (सिंह) [होय]. [किंवा तुज] शलभा बळभाप्राणांतकरहुताश [आहे]. २३. शलभ=टोळ. २४. बळ+

सोडी कर्ण शरातें[1] युयुधानवधा[2] नव खरुनिभातें[3]; ।
त्यासि शिखंडी खंडी; यश[4] विधुला लाजवी हरुनि भा[5] तें. ॥ ६०
खंडी कर्ण शिखंडीध्वजधनु, हाणी उरांत सायक सा[6], ।
धृष्टद्युम्नसुतातें मारी भासे परेतनायकसा[7]. ॥ ६१
क्रौंचासि[8] शक्तिनें गुह[9], कर्ण विदारी तसा चि सुतसोमा; ।
भासे तो राहु करिल मुखशिखिकुंडांत[10] त्या चि हुत सोमा[11]. ॥ ६२
कृष्ण म्हणे, 'रे पार्था ! कर्ण अपांचाळ[12] लोक करितो कीं; ।
हरि[13] शिरतां आयु पळ हि न टिके करियूथपीं, न करितोकीं[14].' ॥ ६३
पार्थ म्हणे, 'हरि[15] ! हरि ! हरि[16] ! हरि[17] हरिदश्वाश्वसे[18] न पळवीसी, ।
मज दुःसह रिपुकृतनिजजनपरिभवताप[19] मात्र कळवीसी. ॥ ६४
तिकडे नररथ कृष्णें चालविला जेंवि भानुचा अरुणें, ।
रुद्रानुकरण[20] जिकडे कर्णें[21] आरंभिलें सुनिष्करुणें[22]. ॥ ६५

---

भा+प्राण+अंतकर+हुताश=बल, तेज व प्राण यांचा नाश करणारा अग्नि. २५. थांब. उभा मात्र रहा, कीं मेलासच. आतां पळून जाऊं नकोस. हा **ललित**नामक अलंकार.

१. नव शर=नवीन बाण, अर्थात् ज्यास नुकतीच धार लाविलेली आहे असे. २. **सात्य**कीच्या वधाला. ३. वज्रतुल्यातें; खरु=वज्र–**पंत.** तो नवीन बाण वज्रासारखा प्रखर होता–असा भाव. ४. तें यश (**कर्ण**शरांचें खंडण केल्यामुळें **शि**खंडीला प्राप्त झालेलें यश) [इतकें पांढरें होतें कीं, विधुची] भा (प्रभा, तेज) हरुनि विधुला लाजवी–असा अन्वय. चंद्रापेक्षांही तें यश शुभ्र होतें–हा भाव. यशाचा रंग पांढरा आहे, असें वर्णन करणें कविसंप्रदायास अनुसरून आहे. अलंकार **अतिशयोक्ति.** ५. तेज. ६. सहा. ७. प्रेतनायक असा, यमासारखा. ८. पर्वतविशेष, त्यास. हा हिमालयास मेनेपासून झालेला पुत्र होय. हा भारत वर्षाच्या उत्तरभागांत आहे. ९. स्वामी **का**र्तिक. १०. मुख+शिखि+कुंडांत=मुखरूपी अग्निकुंडांत. अन्वयः–तो (**कर्ण**) राहु त्या चि (**सु**तसोमरूपी) सोमा (**चं**द्राला) मुखशिखिकुंडांत हुत करिल [असें] भासे. **उत्प्रेक्षा.** ११. चंद्रास. १२. **पां**चालरहित. १३. हरि (सिंह) [हत्तींच्या कळपांत] शिरतां करियूथपीं (हत्तीच्या कळपाचा जो मुख्य त्याच्या ठिकाणीं) पळ हि (पळभर देखील) आयु (आयुष्य) न टिके; [तसेंच] करितोकीं (हत्तीच्या छाव्यांच्या ठिकाणीं) [हि] न [टिके]–असा अन्वय. सारांश–सिंह लहानमोठ्या सर्वच हत्तींचा फडशा पाडतो, त्याप्रमाणेंच कर्ण सर्व पांचाल ठार मारितो कीं काय, असें वाटतें. १४. लहान हत्तींच्या ठायीं. **दृष्टांत.** १५. खेदोद्गार. १६. हे हरि! १७. घोडे. १८. हरित्+अश्व+अश्व+से=सूर्याच्या अश्वाप्रमाणें. (शीघ्र–असा भाव.) हरिदश्व=सूर्य. १९. शत्रूनें केलेल्या आपल्या सैन्याच्या पराभवामुळें उत्पन्न होणारें दुःख. २०. रुद्राचें अनुकरण,

## अध्याय पंचेचाळिसावा.[१]

तेव्हां कर्णामागें दुःशासन, भीम अर्जुनामागें, ।
संरक्षणासि होते; ते अन्योन्यासि देखती रागें. ॥ १
धांवति अन्योन्यावरि ते दोघे आठवूनि अपकार[२], ।
जाणों ते[३] मदमत्त[४] क्रोधोद्धुर[५] दंपतीच अ'प'कार[६]. ॥ २
जें वैरशल्य[७] दुःसह हृदयांत, करावया तदुद्धरण[८], ।
अत्यद्भुतबळ[९] अरि ते करिते झाले हठें[१०] विशुद्ध[११] रण. ॥ ३
दुःशासनशर[१२] मर्मीं लागे नागेशसा[१३] असुख[१४] रचिता[१५], ।
मूर्च्छित करि भीमातें, इतरांचे[१६] तों पळें[१७] असु[१८] खरचिता[१९]. ॥ ४
सावध होउनि भीम, क्षिप्रं महाशक्ति शत्रुवरि सोडी; ।
तीस हि तो दुःशासन दश बाणांहीं पराक्रमें तोडी. ॥ ५
तेव्हां गदाप्रहारें भीम ललाटीं स्वशत्रुला ताडी, ।

---

प्रलयकालीं रुद्रानें केलेल्या कृतीप्रमाणें कृति. २१. अत्यंत क्रूर अशा कर्णानें. कधीं कधीं 'सु' हें विशेषण एकाद्या वस्तूचें आधिक्य दर्शवितें. (उदाहरण–सुदीन जन मी–केकावली, श्लोक २९).

१. यांत मुळांतील अध्याय ८२ श्लोक १४ पासून अध्याय ८६ च्या अखेरपर्यंतचा कथाभाग आला आहे. २. अपराध. ३. भीम व दुःशासन. ४. गर्वानें अंध झालेले; (पक्षीं) गंडस्थळांतून वहाणाऱ्या स्रवानें वेडावलेले, अर्थात् पूर्ण मस्तींत आलेले. येथें 'मद' ह्या शब्दावर **श्लेष** आहे. ५. रागानें खवळलेले. (उत्+धुरा=धुरेपासून सुटलेले. धुर=धुरा, जोखड, जूं). 'क्रोधोद्धत' असा पाठभेद. ६. अपकार दंपतीच='प'काररहित म्हणजे ज्यांतील 'प' हा वर्ण वर्ज्य करावयाचा आहे असे; (हें 'दंपती' ह्याचें विशेषण). तेव्हां 'प'काररहित 'दंपती' म्हणजे दंती=हत्ती. अशाच प्रकारची 'दंती' शब्दावर केलेली कोटी पुढील सुभाषितांत आढळते:–अधुना मधुकरपतिना गिलितोप्यपकारदंपती येन। त्रातः स पालयेत्त्वां विकाररहितो विनायको लक्ष्म्याः ॥. ह्या गीतींत **उत्प्रेक्षालंकार** आहे. येथें दुःशासन व भीम ह्या दोन वीरांवर कांहीं वस्तूंची (अर्थात् हत्तींची) संभावना केलेली आहे, म्हणून ही **वस्तूत्प्रेक्षा** होय. ७. द्वेषरूप सल, खुपणारा पदार्थ. ८. तत्+उद्धरण=तें काढण्यास. ९. अतिशय अलौकिक आहे सामर्थ्य ज्यांचें असे. १०. हट्टानें, आग्रहानें. ११. धर्मास अनुसरून असलेलें असें. १२. तो दुःशासनाचा बाण भीमाला लागला, तेव्हां तो भीम (अर्थात् बलाढ्य योद्धा) म्हणूनच फक्त मूर्च्छित झाला, इतर कोणाला तो बाण लागला असता, तर तो ठारच झाला असता–असा भाव. १३. सर्पराज शेषाप्रमाणें. १४. अहित, त्रास. १५. करणारा. हें 'दुःशासनशर' ह्याचें विशेषण. १६. 'इतरांचे तो पळें' असें पाठान्तर. १७. क्षणांत. १८. [त्यानें] प्राण हरण केले असते. १९. झटपट, सत्वर.

क्षितिवरि[१], हरिवज्राहत[२] गिरिशिखर जसें, तसें तया पाडी. ॥ ६
पत्नीचा[३] केशग्रह[४]समय सरला; निजप्रतिज्ञा ते[५], ।
आठवि; म्हणे, 'म्हणोत न मिथ्यावादी[६] मजप्रति ज्ञाते.' ॥ ७
वृषनृपकृपकृतवर्मद्रोणसुतांतें म्हणे, 'अहो ! परिसा; ।
दुःशासनासि वधितों मीं भीम, गजासि घोपँना[७] हरिसा[८]. ॥ ८
शक्ति असेल तरि तुम्हीं रक्षा, मीं आपुली प्रतिज्ञा ती ।
संरक्षितों, कराया स्वर्गीं संतृप्त[९] संप्रति[१०] ज्ञाती[११].' ॥ ९
ऐसें गर्जोनि उडी टाकी स्वरथावरूनि कलितासि[१२], ।
तो भीम भीमकर्मा[१३] गांठी त्यां रिपुसि[१४] भूमिगलितासी[१५]. ॥ १०
गरुड जसा गगनांतुनि वेगें उतरोनि पन्नगा[१६] झडपी[१७], ।
तैसा भीम बळानें दुःशासनकंठ अंघ्रिनें[१८] दडपी. ॥ ११
भीम विदारी[१९] खड्गें सहज[२०] परम कठिण शत्रुचें उर तें, ।
वाटे पविपातीं[२१] ही, त्यां साध्वीला न गांजितां[२२], उरतें[२३]. ॥ १२
अशनिहत[२४]शिलातल जल, रक्त तसें खड्गभग्न तें उर वी, ।

---

१. भूमीवर. २. इंद्राच्या वज्राचा तडाखा लागलेलें. ३. द्रौपदीचा. ४. वेणी धरून सभेंत आणिल्याचा प्रसंग. (पंतकृत सभापर्व, अध्याय ५ पहा). ५. ते(=ती, प्रसिद्ध) स्वतःची (दुःशासनाच्या रक्तपानाबद्दलची) प्रतिज्ञा. ६. खोटें बोलणारा. ७. तहानेलेला. ८. सिंहासारखा. तहानेलेला सिंह हत्तीस मारितो, त्याप्रमाणें मी दुःशासनास मारितों. कारण सिंहाला हत्तीच्या रक्ताचें प्राशन करावयाचें असतें व मलाही दुःशासनाच्या रक्ताचें पान करावयाचें आहे—असा इत्यर्थ. ९. संतुष्ट. १०. हल्लीं, प्रस्तुत प्रसंगीं. ११. जातभाई. १२. कलित+असि=घेतलेली आहे तरवार ज्यानें असा. १३. भयंकर आहे कृति ज्याची असा. १४. दुःशासनास. १५. भूमीवर पडलेल्यास. १६. सर्पास. १७. झांप टाकून धरतो. १८. पायानें. ह्या गीतींत **पूर्णोपमा** आहे. १९. फाडता झाला. २०. अनायासें, कांहीं एक त्रास न पडतां. २१. वज्रपात झाला असता तरी सुद्धां. २२. द्रौपदीला गांजिलें नसतें तर. २३. टिकलें असतें. इतकें तें बळकट होतें—असा भाव. २४. अन्वयार्थः—अशनिहत (वीज ज्यावर पडली आहे असें) शिलातल (जसें) जल (वी). तसें तें खड्गभग्न (तरवारीनें विदारिलेलें) उर [दुःशासनाचें वक्षस्थळ] रक्त वी. विणें=बाहेर टाकणें; अर्थात् वक्षःस्थळांतून रक्तस्राव होऊं लागला. ही **उपमा** फारच योग्य आहे.

तृषित घटोत्कचतात प्राशी [1]शोणित, [2]न लेश ही उरवी. ॥ १३
मग [3]कंठनाळ चरचर तो, सत्य करावया [4]बिरुद, कापी, ।
देउनि मिटक्या मटमट, घटघट त्या [5]स्वाहितासृगुदका [6]पी. ॥ १४
‘[7]मथित दधि, दुग्ध, घृत, मधु, [8]माध्वीक, [9]सुधारसादि जे अन्य, ।
जें [10]दिव्यसरित्सलिल हि, मातेचें [11]सर्वरसवर [12]स्तन्य, ॥ १५
जे जे लोकीं असती रस ती त्यांची न [13]माधुरी थोडी, ।
परि अरिच्या रक्तरसीं मज बहु त्याहूनि लागली गोडी.’ ॥ १६
ऐसें वदोनि [14]ओष्ठप्रांत जिभेनें पुनःपुन्हां चाटी, ।
[15]अवलंबी अत्युग्रा भीम [16]अतृप्तद्विपारिची [17]धाटी. ॥ १७
रिपु शूर दूर तेथुनि तें दारुण कर्म पाहतां पळती, ।
[18]किति पडती, किति दडती, कितिएकांचीं [19]धृतायुधें गळती ! ॥ १८

---

१. रक्त. गीति १३–२० यांत **भयानकरस** आहे. किंवा **बीभत्स** व **भयानक** ह्या दोन अविरोधी रसांचें मिश्रण आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. २. शिल्लक ठेविलें नाहीं. येथें **परिकरांकुर** अलंकार आहे. कारण ‘घटोत्कचतात’ हें विशेष्य साभिप्राय आहे. भीमानें राक्षसासारखें अघोर कृत्य केलें, म्हणून त्याचा घटोत्कचराक्षसाचा ‘बाप’ असा उल्लेख केला आहे. ३. गळ्याची नळी; नरडी. ४. ब्रीद, प्रतिज्ञा. ५. स्व+अहित+असृक्+उदका=आपल्या शत्रूच्या रक्तरूप जलातें. ६. प्राशन करी. वास्तविक हें रक्त भीम प्याला नसून त्याची पत्नी हिडिंबा राक्षसी प्याली होती. पूर्वी केलेल्या प्रतिज्ञेप्रमाणें वागलें पाहिजे, म्हणून फक्त ओठांना रक्त बरबटून रक्त प्याल्याप्रमाणें त्यानें दुर्योधनादिकांना भासविलें. हा खुलासा पुढें भीमानें गांधारीबरोबर बोलतांना केला आहे. (पंतकृत स्त्रीपर्व–अध्याय ३ गीति ३५–४२ पहा.) येथें **स्वभावोक्ति** अलंकार आहे. वरील गीतींत ‘घटोत्कचतात’ असा शब्द आहे, व घटोत्कच राक्षसीचा मुलगा होता, तेव्हां ह्या गीतींत वर्णिलेली कृति राक्षसानुरूप आहे असें ध्वनित केलें आहे. व तें वर्णन ‘चरचर’ ‘मटमट’ ‘घटघट’ ह्या अनुकरणवाचक क्रियाविशेषणांनीं फारच चटकदार झालें आहे. ७. घुसळलेलें दहीं, अर्थात् मठ्ठा. ८. मद्य. ९. सुधारस+आदि=अमृतप्रमुख. १०. दिव्य+सरित्+सलिल=भागीरथीचें उदक. ११. सर्व पेयांमध्यें श्रेष्ठ. १२. अंगावरचें दूध. १३. रुचि. ‘त्यांची तों न माधुरी थोडी’ असा पाठभेद. १४. ओठांच्या जवळचा भाग. १५. स्वीकारी. १६. अतृप्त+द्विपारिची=अर्धपोटी सिंहाची. (द्विप+अरि=हत्ती+शत्रु=सिंह). १७. रीत, मार्ग. ह्या गीतीच्या पूर्वार्धांत **स्वभावोक्ति** अलंकार आहे. १८. ह्या गीत्यर्धांत **समुच्चयालंकार** आहे. १९. धारण केलेलीं आयुधें.

जाणों[1] त्या अत्युग्रा मूर्तश्रीनारसिंहमंत्रासे[2], ।
पाहोनि पावले ते रिपुभटभूपाळभूत[3] संत्रास[4]. ॥ १९
म्हणति, 'मनुष्य[5] नव्हे हा, राक्षस कीं काळ हा खवळला हो ! ।
कीं आमुची कराया, मूर्त[6] प्रळयाग्नि, राख, वळला, हो !' ॥ २०
त्या समयीं युयुधानें कर्णाचा बंधु चित्रसेन रणीं ।
वधिला[7] कर्णसमक्ष चि; कोण्ही ही धांवले न तन्मरणीं[8]. ॥ २१
भीम पुन्हां दुःशासनरक्तें अंजलि भरोनियां डोले; ।
मिटक्या देउनि, पाहुनि कर्णसुयोधनमुखांकडे[9], बोलेः—॥ २२
'पीतों हें रक्त तुझें; हांसत[10] होतासि मज, जसा भणगा, ।
दुःशासना ! तसा तूं पुनरपि 'गौगौंः'[11] स्व आननें म्हण गा ! ॥ २३
आम्हांसि म्हणत होते जे 'गौगौंः' क्षुद्रबुद्धि[12] नाचोनी[13], ।

---

१. येथें 'जाणों' ह्या शब्दावरून **उत्प्रेक्षा** होते; व 'त्या अत्युग्रा=भीमा' ह्यावर 'नारसिंहमंत्रा'चा आरोप केला असून 'रिपुभटभूपाळ' ह्यावर 'भूता'चा आरोप केला आहे, यामुळे **परंपरितरूपक.** २. मूर्तिमंत नारसिंहमंत्रच अशा (भीमास). नारसिंहाचें स्मरण केलें असतां पिशाचें भिऊन पळतात, अशी समजूत आहे. गाणगापूर, नरसोबाची वाडी व कवठें (बिऱ्हाड सिद्धाचें) ह्या तीन क्षेत्रीं पिशाचें गति घेतात, व नृसिंहमंत्राचा जप करणाऱ्यास भूतांपासून पीडा होत नाहीं, अशी पंतांची समजूत होती. (वनपर्व, अध्याय १२।६३; भीष्मपर्व–अध्याय ५।१५; द्रोणपर्व, अध्याय ९।२० पहा). ३. शत्रुपक्षीय (कौरवांकडील) योद्धे व राजे हींच भूतें. ४. भीति. ५. येथें **अपह्नुति** अलंकार आहे. कारण भीम हा मनुष्य असून, मनुष्य नव्हे, काळ आहे, असें म्हटलें आहे. ६. मूर्तिमान्. ७. येथें **विशेषोक्ति** अलंकार आहे. कारण कर्णबंधु चित्रसेन, ह्याचें हनन सेनानायक जो कर्ण त्याचे समक्ष झालें, असें असून म्हणजे, कारण घडलें असतांही 'धावणें'रूपी कार्य घडलें नाहीं. ८. त्याच्या मरणाच्या वेळीं (त्यास वांचविण्याकरितां–असा भाव). ९. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'कर्णसुयोधनमुखाकडे' असा अनुस्वार रहित शब्द आहे. १०. अन्वयः–जसा भणगा (भिकाऱ्यास) [तसा] मज हांसत होतासि. एखाद्या भिकाऱ्याला पाहून त्याला हिणविण्यासाठीं जसें कोणी हंसावें, तसें तूं मला हंसत होतास–असा भाव. ११. गाय रे गाय !, गरीब रे गरीब !. 'गौगौंः [असें] पुनरपि स्व आननें म्हण'–असा अन्वय. "पूर्वी तूं आम्हास 'गाय रे गाय !' असें उपहासपूर्वक म्हणत होतास, (सभापर्व, अध्याय ७।१३) तसें आतां पुनः म्हण पाहूं !"– असा भावार्थ. (पुढें गदापर्वांत दुर्योधनाबद्दलही भीमानें हेच शब्द उच्चारले आहेत):– 'जो गौगौंः पंढतिला' इत्याद्युपहास करुनियां हांसे। तो हा दुर्जन, याच्या पडले कंठांत मृत्युचे फांसे. ॥ (पंतकृत गदापर्व–अध्याय ४ गीति १०.) १२. दुष्टमति, नीच. १३. शेफारून जाऊन.

म्हणतों त्यांतें 'गौर्गौः' स्वभुजबळें संकटांत [1]वांचोनी. ॥ २४

मज काळकूटदूषित भोजन दिधलें [3]प्रमाणकोटींत; ।

मर्मीं सर्प डसविले; [4]काळाच्या घातलें चि [5]ओटींत. ॥ २५

आधीं निमग्न केलें ऐसें अतिदुस्तर [6]प्रमोहांत, ।

बांधोनि बुडविलें मग मज सरितेच्या [7]गंभीर डोहांत; ॥ २६

[8]जतुगृहदाह, द्यूतीं [9]श्रीस्त्रीवस्त्रापहार, [10]वनवसती, ।

दुःखें [11]विराटभवनीं जीं बहु कोणीं हि भोगिलीं नसती. ॥ २७

कर्णशकुनिदुर्योधनधृतराष्ट्रांच्या [12]कुमंत्रितें दैन्य, ।

बहु दुःख भोगिलें; हें [13]शस्त्रास्त्राग्नींत होमिलें सैन्य. ॥ २८

[14]काय करूं ? काळानें अभय दिलें, घेतलासि तूं पदरीं, ।

---

१. लाक्षागृह, विषान्न, इत्यादि कौरवरचित संकटांतून. २. येथें **पं**तलिखित प्रतींत 'वांचोनि' असा शब्द आहे. ३. प्रमाणकोटी=भागीरथीच्या तीरावरील तीर्थ. विषान्न चारून व तेथील सर्पांनीं दंश करावा व त्यायोगें ह्या मरावा म्हणून, या तीर्थांत कौरवांनीं भीमास बुडविलें, परंतु त्या सर्पदंशानें ह्यानें खाल्लेल्या विषाचा परिणाम नष्ट होऊन, पुढें तो पाताळांत गेला–इत्यादि कथा **पं**तांच्या आदिपर्वांत आहे (अध्याय २१ पहा). ४. मृत्यूच्या स्वाधीन केलेंच. ५. सार्थान्वयः–ऐसें (ह्याप्रमाणें) आधीं (प्रथमतः) अतिदुस्तर (तरून जाण्यास कठीण अशा) प्रमोहांत (पेंचांत, संकटांत) निमग्न केलें (पूर्णपणें पाडिलें). ह्या गीत्यर्धांत योजिलेल्या 'आधीं' ह्या शब्दावरून 'अतिदुस्तर प्रमोह' ह्याचा 'विषान्नामुळें येणारी गुंगी हेंच संकट' असा अर्थ केला पाहिजे. कारण उत्तरार्धांत 'सरितेच्या गभीर डोहांत बुडविलें' असें म्हटलें आहे. म्हणजे अर्थात् 'प्रमाणकोटी' तीर्थांत टाकून दिलें. प्रथमतः विष चारून भीमसेनास गुंगी आणिली व त्यामुळें त्यास बद्ध करतां आलें, ही गोष्ट 'मग' ह्या पदानें व्यक्त होते. कारण भीमसेन शुद्धीवर असता, तर त्यास बांधणें शक्य नव्हतें. ६. प्रमोह=मूर्च्छा, भुलवण, गुंगी. ७. खोल. ८. लाक्षागृहदहन. (**पं**तकृत आदिपर्व, अध्याय २९ पहा). ९. श्री+स्त्रीवस्त्र+अपहार=संपत्ती व द्रौपदीवस्त्र ह्यांचा अपहार [हिसकावणें]. १०. वनवास. ११. विराटराजाच्या वाड्यांत (अर्थात् पांडव अज्ञातवासांत होते तेव्हां). १२. दुष्ट सल्ल्यामुळें. १३. त्या दुष्ट सल्ल्यामुळेंच एवढ्या मोठ्या सैन्याची आहुती रणयज्ञांत पडली–हा भाव. १४. अन्वयः–काय करूं ? [कांहीं उपाय चालत नाहीं; नाइलाज आहे] काळानें (तुज) अभय दिलें व (त्यानेंच) तूं पदरीं घेतलासि; कुलक्षयमूला दुःशासना ! तुज दरीं (भयसमयीं) दुजा (दुसरा) रक्षिता न. भावार्थः–तुला काळानेंच आपला म्हटलें, म्हणजे तूं मरण पावलास, तेव्हां माझा उपाय नाहीं. नाहींपेक्षां माझ्या तडाख्यांतून कोणीही तुझी सुटका करूं शकला नसता. येथें **पर्यायोक्त** अलंकार आहे. हें भाषण दुःशासनास पकडां मारून तृप्त न झालेल्या भीमाचें असून तें त्याचा उत्कट कोप प्रकट करीत आहे. 'तुझा अनेक वेळां जीव घेतला पाहिजे. पण तूं आतां पुनः उठत नाहींस तेव्हां इलाज नाहीं'–असा भाव.

दुःशासना ! कुलक्षयमूळा[1] ! तुज रक्षिता दुजा न दरीं.[2][3]' ॥ २९
ऐसें बोलत हांसत शत्रुरुधिरदिग्धपाणिमुख[4] विकट[5], ।
प्रकट[6] महाभैरवसा[7] नाचत गेला जयाच्युतां-निकट[8]. ॥ ३०
कृष्णांसि[9] म्हणे, 'केला दुःशासन वधुनि सत्य आज पण[10], ।
दुर्योधना हि मारुनि देइन धर्मासि राजराजपण[11].' ॥ ३१
निजबंधुवधामर्षे[12] आले धृतराष्ट्रनृपकुमार दहा, ।
त्यांचे हि प्राण हरी भीम, महाकाळभोगिचा[13] रद[14] हा. ॥ ३२
भीमा[15] भी मानस बहु कर्णाचें; शल्य इंगितें[16] जाणे; ।
करि उचित बोध समयीं[17]; तो राधासूनुच्या मनीं बाणे[18]. ॥ ३३
कर्णात्मज वृषसेन क्रोधें भीमाभिमुख[19] तदा धांवे, ।
तों त्यावरि नकुळ उठे, भरले[20] दोघे हि संगरीं हांवे. ॥ ३४
विरथ[21] विशस्त्र[22] पदाती[23] वृषसेनें नकुळ पळविला मागें; ।
गेला भीमरथाप्रति, तें पाहुनि जिष्णु धांवला रागें. ॥ ३५
रक्षाया वृषसेना कर्णादि समस्त धांवले बळप[24], ।
ते पिटिले[25] त्या पार्थें; स्वपशूंचे जेंवि बल्लवें[26] कळप. ॥ ३६

---

१. (आपल्या) कुळाच्या नाशास कारणीभूत अशा (दुःशासना !) २. 'त्राता दुजा तुला न दरी' असा अन्य पाठ. ३. भयाच्या प्रसंगीं. ४. शत्रु+रुधिर+दिग्ध+पाणि+मुख=शत्रूच्या (दुःशासनाच्या) रक्तानें भरलेले (माखलेले) आहेत हात व तोंड ज्याचें असा. ५. भयंकर. ६. प्रत्यक्ष. ७. रुद्राप्रमाणें. ८. कृष्णार्जुनांच्या समीप. ९. कृष्णार्जुनांस. १०. प्रतिज्ञा. ११. सार्वभौमत्व. 'राज्य राजपण' असें पाठान्तर. १२. निज+बंधु+वध+अमर्ष=आपल्या भावाच्या वधामुळें उत्पन्न झालेल्या रागानें. १३. अत्यंत घातक जो भोगी (सर्प), त्याचा; मोठ्या काळसर्पाचा. १४. दांत. १५. अन्वयः-कर्णाचें मानस भीमा बहु भी. १६. इंगित= मनांतील भाव दुसऱ्यास कळावयाची खूण (कंप, तोंडावरील विकार इत्यादि बाह्य चिन्हें). पुढील सुभाषित पहाः-आकारैरिङ्गितैर्गत्या चेष्टया भाषितेन च । नेत्रवक्त्रविकारैश्च गृह्यतेऽन्तर्गतं मनः. ॥ तसेंच 'अकारेणैव चतुरास्तर्कयन्ति परेङ्गितम्' हें वचनही प्रसिद्धच आहे. 'आकारें चि परेंगित कळतें' असें पंतांनीं देखील म्हटलें आहे (आदिपर्व, अध्याय ३०।४९ व वनपर्व, अध्याय ३।१२ पहा). १७. योग्य प्रसंगीं, वेळेवर. १८. पटला. १९. भीमाच्या समोर, अंगावर. २०. दोघेही संगरीं हांवे भरले, म्हणजे युद्धाचे कामीं दोघे-अर्थात् वृषसेन व नकुळ-हट्टास पेटले. 'भरीं भरणें' हा प्रयोगही अशाच अर्थी आहे. २१. भग्नरथ. २२. भग्नायुध. २३. पायउतार. २४. बळ+प=सेनापति. २५. पळवून लावले, पिटाळले. २६. गुराख्यानें.

पिटिले व्याघ्रें वृषसे[1] वृषसेनें शत्रुवीर दर्पानें, ।
परि जय टिकला[2]; टिकला[3] खगमांचा[4] जिंकिला न सर्पानें. ॥ ३७
भ्याले एका पार्थावांचुनि ते सर्व वीर वृषसेना, ।
एक हरवृष[5] चि निर्भय, धरिल हरिपुढें[6] न धीर वृषसेना[7]. ॥ ३८
वृषसेन अर्जुनास प्रभुस हि मर्मी च तीव्रशर अर्पी[8]; ।
क्षोभे फार धनंजय, जेंवि धनंजय[9] समर्पितां सर्पी[10]. ॥ ३९
अच्युतसारथि[11] कोपें कर्णासि म्हणे, 'वृषा ! खरें कथितों; ।
रक्षीं असेल बळ तरि, मीं वृषसेनासि हा पहा मथितों[12]. ॥ ४०
अभिमन्यु तुम्हीं वधिला, मीं नसतां[13], आदरूनि[14] अ-नयातें[15]; ।
धर्में[16] वधितों; हो तूं रक्षाया सावध स्वतनयातें. ॥ ४१
जोडीन कीर्ति ससुता तुज मारुनि आजि[17] आजिमाजि[18] भली, ।
तुजवरि तुझी च फिरली साधुच्छलका[19] नराधमा ! जिभली[20]. ॥ ४२
तुज मारूनि मळवितों तव मित्रांचा[21] मुखेंदु रुदितानें; ।
जो असद्धृदयाब्जें[22] करि बहु संकोचितें दुरुदितानें[23]. ॥ ४३

---

१. बैलाप्रमाणें. २. अर्जुनानें टिकाव धरला. ३. श्रेष्ठ. हा शब्द 'तिलक' ह्या संस्कृत शब्दाचें अपभ्रष्टरूप आहे. ४. पक्ष्यांचा. पक्षांचा राजा, अर्थात् गरुड. ५. नंदी. ६. सिंहापुढें. ७. बैलांचा समुदाय. ह्या गीतींत **दृष्टांता**लंकार आहे. पूर्वार्धांतील 'पार्थ, वीर, वृषसेन' व उत्तरार्धांतील 'हरवृषभ, वृषसेना, हरि' यांत **बिंबप्रतिबिंबभाव** आहे. ८. देता झाला; अर्थात् मारले—असा भाव. ९. अग्नि. १०. तूप. ११. अच्युत (श्रीकृष्ण) आहे सारथि ज्याचा, तो (अर्जुन). १२. मारितों. १३. मी तेथें हजर नव्हतों अशा वेळीं. 'मी नसतां' ह्या शब्दांची योजना मोठी मार्मिक आहे. मी तेथें नव्हतों म्हणून तुम्हाला असा अधर्म करण्याची संधी सांपडली व अभिमन्यूचा वध करितां आला—असा भाव. १४. अवलंबुनि, स्वीकारून. १५. अन्यायातें. तुम्ही अभिमन्यूचा वध अधर्मानें केला—असा भाव (पंतकृत द्रोणपर्व, अध्याय ३ पहा). १६. धर्माचरण न सोडतां, धर्मयुद्ध करून. १७. आज. १८. युद्धामध्यें. १९. साधूंच्या छळ करणाऱ्या. २०. जीभ. तुजवरि तुझी च जिभली फिरली=तूं जें दुसऱ्यास बोललास, तेंच तुला प्राप्त झालें. हा **लोकोक्ति** अलंकार आहे. २१. स्नेही (दुर्योधन). २२. आमचीं हृदयरूपी कमळें. २३. दुष्ट भाषणानें. 'मित्र' व 'दुरुदित' ह्या शब्दांवर **श्लेष** आहे. मित्र=(१) स्नेही, (२) सूर्य. दुरुदित=(१) दुष्ट बोलणें, (२) वाईट उदय, मेघाच्छादित सूर्योदय. (दुर्दिन—ह्या शब्दांतही 'दुः' ह्या उपसर्गाचा हाच अर्थ आहे.) वरील श्लेषामुळें 'असद्धृदयाब्जें' हें **रूपक** मात्र फारच खुलतें, प्रथम पादांतील 'मुखेन्दु' हें रूपक मात्र वरील श्लेषाशीं व रूपकाशीं

मेल्यावरि मित्रातें दुर्मंत्रें धीर काय मग देसी ? ।
[1]आर्यांच्या, [2]लव हि नको [3]दुर्योधनमर्दनीं श्रम, [1]गदेसी.' ॥ ४४
ऐसें वदोनि दश शर हाणुनि वृषसेन खोचिला[4] मर्मीं, ।
[5]वल्मीकीं सर्प तसे शिरले ते बाण शत्रुच्या [6]वर्मीं. ॥ ४५
मग च्यार बाण सोडुनि सत्वर तो [7]त्रिजगदेककोदंडी, ।
वृषसेनाचें कार्मुक, भुजयुग, शिर पळ न लागतां [8]खंडी. ॥ ४६
[9]स्वापत्यवधक्रुद्ध व्याघ्र व्याधा वधावया धांवे; ।
कर्ण तसा पार्थावरि; [10]मनिं दोघांच्या स्वकाम साधावे. ॥ ४७
कृष्ण म्हणे, 'पार्था ! हा आला क्रोधांध कर्ण [11]अंतकसा, ।
[12]मृत्युंजयवरपात्रा ! तूं याचा न करिशील अंत कसा ? ॥ ४८
पांचाळभट पळाले सर्व जसे [13]मृग [14]मृगेश्वरागमनीं, ।
पुत्रवधास्तव धरिला कर्णानें आजि फार राग मनीं. ॥ ४९
याच्या शरासि साहे ऐसा त्रिजगांत तूं चि एक रणीं, ।
वीर [15]उदंड असति; परि त्यांला पार्था ! तुझी न ये [16]करणी. ॥ ५०

---

असंबद्ध आहे. तें केवळ दुर्योधनाचा उत्साह व उमेद हींच दर्शविण्याकरितां योजिलें आहे, असें दिसतें. शिवाय त्यांत यमक साधण्याचा हेतूही आहेच. उत्तरार्धांत **रूपका**लंकार आहे.

१. भीमाच्या गदेला. भीम हा वडील भाऊ असल्यामुळें त्यास 'आर्य' असें म्हटलें आहे. २. यत्किंचितही. ३. दुर्योधनहननीं. दुर्योधन व भीम हे उभयतां गदायुद्धांत फार निपुण होते, हें सर्वश्रुत आहेच. ४. टोंचला गेला, जखमी झाला. ५. वारुळांत. ६. चिलखतांत. ७. त्रि+जगत्+एक+कोदंडी=जगत्रयामधील अद्वितीय धनुर्धारी; अर्जुन. ८. छेदिता झाला. ९. स्व+अपत्य+वध+क्रुद्ध=आपल्या बालकाच्या वधानें संतप्त झालेला. १०. स्वकाम साधावे [असें] दोघांच्या मनिं [असे]. आपआपले हेतु तृप्त करावे असें **कर्ण** व **अर्जुन** ह्या दोघांच्याही मनांत असे. ह्या ठिकाणीं 'दोघांच्या' ह्या पदाचा अर्थ **'कर्ण** व **पार्थ'**, तसेंच 'क्रुद्धव्याघ्र व व्याध' असा घ्यावा. ११. कृतांताप्रमाणें. १२. मृत्युंजय+वर+पात्र=मृत्यूला जिंकणारा शंकर, त्याचा वर ज्यास मिळाला आहे असा. हें विशेषणात्मक संबोधन साभिप्राय आहे व त्यावरूनच पुढली उक्ति सार्थ होते, तेव्हां हा **परिकरा**लंकार असून शिवाय येथें **प्रश्ना**लंकारही आहे. १३. हरिण, हरिणादि श्वापदें. 'मृग' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे. 'मृगः पशौ कुरङ्गे च' इति मेदिनी. १४. सिंह येण्याबरोबर. १५. 'उद्दंड=उंच आहे दांडा ज्याचा तें, म्हणजे उंच छत्री वगैरे. यावरून उदंड म्हणजे पुष्कळ असा अर्थ झाला. (बापट-व्युत्पत्ति-प्रदीप). १६. करामत.

कर्णातें जिंकाया तूं शक्त[1], तव प्रताप मीं जाणें; ।
जाला प्रसन्न तुज तो जो[2] जाळी त्रिपुर एकलें[3] बाणें. ॥ ५१
शक्त सुर असुर मुनि हि न ज्याचीं देखावया पदें शुद्धें, ।
तो भीम[4] भर्ग[5] भगवान् भूतप[6] आराधिला तुवां युद्धें[7], ॥ ५२
मारीं हरप्रसादें कर्णा, वृत्रा[8] जसा सुनासीर[9], ।
राधेसह[10] ताडूत व्याकुळचित्ता तिच्या सुना सीर[11].' ॥ ५३
पार्थ म्हणे, 'कृष्णा ! मज जय घडतो आजि निश्चय चि हा कीं, ।
बा ! सर्वलोकगुरु तूं आहेसि बहुप्रसन्न; हयें[12] हाकीं. ॥ ५४
आजि पहासील सख्या ! मच्छरशकलीकृतांगकर्णातें[13] ।
तदसृक्कणसिक्तातें[14], आकाशातें हि शोणवर्णातें[15]. ॥ ५५
मीं त्याचें कीं माझें तो आजि करील निश्चयें हनन, ।
मन न व्यग्र[16] तुझें हो[17], रणिं जयमरणार्थ[18] आमुचें जनन[19]. ॥ ५६
ऐसा निश्चय केला आहे, बा ! भक्तकामकल्पतरो[20] ! ।
सिंधूसि[21] जड तसा या कर्णाला हा हि अश्मकल्प तरो.' ॥ ५७

---

१. समर्थ. २. मयासुरानें रचिलेल्या तीन पुरांचा एका बाणानें नाश करणारा शिव. (मागें पृष्ठ १५६ टीप ६ पहा). हें **पर्यायोक्त.** ३. एकाच बाणानें. 'एकलें' हें तृतीयान्तरूप चिन्त्य आहे. ४. भयंकर. ५. शिव. ६. भूतपति. ७. ह्या गीतींत पाशुपतास्त्रप्राप्ती अनुसंधेय आहे. ८. वृत्रासुरनामक असुर. ९. इंद्र. १०. अन्वयः–राधेसह (कर्णमातेसह) व्याकुळचित्ता (शोकार्ता) तिच्या (राधेच्या) सुना सीर (मस्तक) ताडूत (ताडण करोत; पिटोत). ११. शिर, मस्तक. १२. घोडे. १३. मत्+शर+शकली+कृत+अंग=माझ्या बाणानें छिन्नभिन्न झालेलें आहे शरीर ज्याचें, अशा कर्णातें. १४. तत्+असृक्+कण+सिक्तातें=त्याच्या रक्ताच्या शिंतोड्यानें भरलेलें. १५. लाल रंग आहे ज्याचा, अशातें. अन्वयः–[हे] सख्या ! आजि [तूं] मच्छरशकलीकृतांग–कर्णातें तदसृक्कणसिक्तातें [व] आकाशातें हि शोणवर्णातें पहासील. अर्थः– आज माझ्या बाणानें ज्याच्या शरीराचे तुकडे उडाले आहेत, अशा कर्णाला स्वतःच्याच रक्तानें न्हालेला व आकाश संध्यारागानें रंगलेलें पाहाशील. सारांश–संध्याकाळच्या सुमारास कर्णाला मी आज खात्रीनें मारीन–असा भाव. १६. चिंताकुल. १७. होवो. ही सूचना अर्जुनानें खुद्द कृष्णास केली आहे. यावरून त्याची अत्यंत जयोत्सुकता व्यक्त होते. १८. जय किंवा मरण यांकरितां. १९. जन्म. २०. भक्तांच्या इच्छा पूर्ण करणाऱ्या कल्पतरो ! कल्पतरु स्वाश्रितांच्या कामना पूर्ण करितो, ही गोष्ट सुप्रसिद्ध आहेच. २१. अन्वयः–(जसा) जड (पाषाण)

श्रवण करुनि विजयवचन यदुपति अतिचपळ तुरगवर हाकी; ।
[1]नाकी प्रमुदित निरखिति अतुळ समरकुतुक सहविधि–पिनाकी.[2] ॥ ५८

---

## अध्याय शेचाळिसावा.[3]

जिष्णुसि हरि ने [4]धर्मस्वांतींचें उद्धरावया [5]शल्य, ।
कर्णरथास हि आणी सत्वर समरांगणांत तो [6]शल्य. ॥ १
कर्णामागें [7]ठाके दुर्योधन [8]सबळ [9]कठिन जाणोनीं. ।
पार्थामागें चाले प्रबळ वृकोदर हि सैन्य आणोनीं. ॥ २
दोहींकडे हि भेरीप्रमुखें[10] वाद्यें उदंड वाजविती, ।
[11]गाजविती ब्रह्मांड, [12]स्वध्वानें [13]वारिदांसि लाजविती. ॥ ३
उत्साह, तेज, विद्या, शिक्षा[14], बळ, धैर्य, शौर्य दोघांचें, ।
[15]तुल्य चि, [16]ज्यापरि गंगायमुनांच्या पावनत्व ओघांचें. ॥ ४

---

सिंधूसि, तसा हा हि अश्मकल्प (पाषाणप्राय मी) या कर्णाला तरो (तरून जावो, सरशी करो). रामावतारीं दगड जसे समुद्रावर तरले, त्याप्रमाणें मीही कर्णरूपी समुद्रावरून तरून जावों. कर्णावर माझी सरशी होवो–असा भावार्थ. येथें समुद्रावर तरणाऱ्या दगडांचा उल्लेख करून अर्जुनानें स्वतःची नम्रता व कृष्णाबद्दल पूज्यभाव व्यक्त केला आहे.

१. 'नाकीं' असें पाठान्तर. २. अन्वयः–सहविधिपिनाकी (ब्रह्मदेव व शंकर यांसह) नाकी (देव) प्रमुदित [होऊनि] (आनंदभरित होऊन) अतुळ समरकुतुक (युद्धाची मौज) निरखिति (पाहते झाले). ३. यांत मुळांतील अध्याय ८७ व ८८ मधील कथाभाग आला आहे. ४. धर्माच्या अंतःकरणांतील. 'धर्मस्वामीचें' असें पाठान्तर. ५. हृद्रोगरूप कांटा. मागें **कर्णानें धर्मास** जर्जर करून समरभूमीवरून पळवून दिलेलें वाचकांस स्मरत असेलच. (मागें अध्याय ३९ पहा). येथें **लोकोक्ति** अलंकार. ६. कर्णसारथी मद्रराज. ७. उभा राहाता झाला. ८. ससैन्य. ९. कठीण प्रसंग. १०. नगारे आदिकरून. ११. दणाणून सोडतात. १२. स्व+ध्वानें=आपल्या गर्जनेनें. ध्वान=शब्द. १३. मेघांस. येथें **व्यतिरेक** अलंकार आहे. १४. (शस्त्रास्त्रांचा) अभ्यास. १५. सारखेंच; बरोबरीचें. १६. सार्थान्वयः–**गंगायमुनांच्या** ओघांचें (प्रवाहांचें) पावनत्व (पुण्यशीलत्व, शुचिता) ज्यापरि (ज्याप्रमाणें) तुल्य चि. ही **उपमा** हृदयंगम आहे. **यमुना गंगेस** मिळाल्यावर मग तिचा महिमा राहात नाहीं; परंतु संगमापूर्वी दोनही नद्यांचा महिमा बरोबरीचा असतो. त्याचप्रमाणें समरांगणीं येऊन भिडेपर्यंत **कर्णार्जुनांच्या** अंगच्या गुणांची बरोबरी होती, परंतु जशी **यमुना** संगमानंतर लोपते, तद्वत् सामना सुरू झाल्यावर **कर्ण** अर्जुनापुढें लोपला; अर्थात् अखेरीस **पार्थास** विजयश्री प्राप्त होणार च–असा ध्वनि.

सर्प, श्येन[१], वृष, द्विप हरिसे ते वीर संगरा[२] आले; ।
दोघे[३] ही जयशाली[४] धर्मज्ञ[५] कृती[६] न मृत्युला भ्याले. ॥ ५
दोघांत जो पहावा तो चि जयश्रीमना, गमे, रुचतो[७]; ।
अद्भुत[८]महत्वशोभास्थैर्यादिगुणैकपात्र मेरु च तो. ॥ ६
सुर[९], सिद्ध[१०], साध्य, विद्याधर, मुनि, गंधर्व होति जिष्णुकडे[११] ।
अभिमान[१२] आधिरथिचा[१३] शुक्र[१४]दनुजदितिजराक्षसांसि पडे. ॥ ७
इंद्र म्हणे, 'कर्णवधें हो[१५] पार्थ स्तोत्रपात्र[१६] अमरांत[१७].' ।
सूर्य म्हणे, 'पार्थवधें संपादू[१८] विजय कर्ण समरांत.' ॥ ८
शक्र म्हणे, 'विजयातें विजय चि पावेल निश्चयें आजि[१९].' ।
भानु म्हणे, 'जय कर्ण चि साधील, बळें[२०] करूनियां आजि[२१].' ॥ ९
ऐसे[२२] विवाद करिती, मग, ते ज्ञानाचिया महानिधितें, ।
'होईल कोण विजयी दोघांत ?' असें विचारिती विधितें. ॥ १०

---

१. बहिरीससाणा. साप, ससाणा, बैल, हत्ती व सिंह ह्या सर्व श्वापदांस झुंज फार आवडतें. २. युद्धाला. ३. कर्ण व अर्जुन. ४. विजयी होण्यास पात्र. ५. कर्तव्य जाणणारे, अर्थात् क्षात्रधर्म जाणणारे. ६. धन्य. ह्या गीतींत **काव्यलिंगा**लंकार आहे. ७. अन्वयः-जयश्रीमना रुचतो=जय आणि लक्ष्मी ह्यांस दोघेही सारखेच पात्र आहेत. येथें 'गमे' ह्या पदानें **उत्प्रेक्षा** व उत्तरार्धांत **रूपक** असून सर्व गीति **काव्यलिंगा**चें उदाहरण आहे. ८. अपूर्व महत्व, शोभा व स्थैर्य हे गुण मेरू व हें वीरद्वय यांत वसत होते. महत्व=आकाराचा मोठेपणा; (पक्षीं) मान्यता. शोभा=सृष्टिसौंदर्य; (पक्षीं) वीरश्रीची शोभा. स्थैर्य=जाग्यावरून न हालणें; (पक्षीं) मानसिक धीमेपणा किंवा धैर्य. ९. देव. १०. देवतुल्य कोटींतील अतिशुद्ध प्राणी. ११. जिष्णुकडे होति=अर्जुनाचे पक्षपाती झाले. म्हणजे अर्थात् अर्जुनास यश येवो असें त्यांस वाटूं लागलें-असा भाव. १२. अभिमान पडे=[शुक्रादि असत्रक्षाभिमान्यांना] कर्णास जय मिळो, असें वाटलें. १३. कर्णाचा. अधिरथ नामक सूतास कर्ण हा नदींत सांपडला व त्यानेंच कर्णाचें पालनपोषण केलें. (पंतकृत आदिपर्व, अध्याय १६ पहा). १४. असुरगुरु (शुक्र), दानव, दैत्य आणि राक्षस यांस. १५. होवो. १६. स्तुतीला योग्य. १७. देवांत. १८. मिळवो. कर्ण हा सूर्यपुत्र होता, म्हणून त्याच्या हिताविषयीं सूर्यास काळजी वाटणें साहाजिकच होतें. १९. आज. २०. नेटानें, निकरानें. २१. युद्ध. २२. अन्वयः-ते ऐसे विवाद (वाटाघाट) करिती; मग ज्ञानाचिया महानिधितें (ज्ञानाच्या प्रचंड सांठ्यास, अर्थात् महाज्ञान्यास) [म्हणजे] विधितें (ब्रह्मदेवातें) 'दोघांत विजयी कोण होईल ?' असें विचारिती.

[1]ब्रह्मा शक्रासि म्हणे, 'पावेल जयासि विजय, वरदानें ।
ईशानें गौरविला जो निजपदभक्त विजय-वर-दानें. ॥ ११

ज्यासि हर वरद, हरि करि ज्याचें सारथ्य [2]आदरें [3]आंगें, ।
[4]अन्यांचें तेज किती ? काळाचें तेज त्यापुढें [5]पांगें. ॥ १२
[6]हरिहरपदप्रसादा जो पात्र, जया हि तो चि पात्र सदा; ।
या देवांच्या दासा रक्षिति नित्य त्रिशूळ, चक्र, गदा. ॥ १३
[7]शक्रा ! चक्रायुध हा नारायण, पार्थ नर; उभा राहे ।
यांच्या पुढें न काळ हि; हरितिल सर्वा हि भूमिभारा हे. ॥ १४
[8]कर्ण हि समर्थ, परि हा [9]दानवपक्षीं असे; खणोनि नया ।
जय कैंचा ? मरण रणीं पावेल, अधोगती, म्हणोनि, न या. ॥ १५

---

१. सार्थान्वयः—ब्रह्मा शक्रासि (इंद्रासी) म्हणे 'वरदानें (वर देणाऱ्यानें) ईशानें (महादेवानें) जो निजपदभक्त (आपल्या पायांची सेवा केली आहे ज्यानें असा, अर्थात् आपला भक्त) विजय-वरदानें (विजयशाली वर देऊन, ज्या योगें यशःप्राप्ती खास होईल अशा प्रकारचा वर देऊन) गौरविला (आदरिला, संमानिला) [तो] विजय (अर्जुन) जयासि पावेल (यशस्वी होईल). या गीतींत पाशुपतास्त्रप्राप्ती अनुसंधेय आहे. (पंतकृत वनपर्व, अध्याय ३ पहा). २. मनोभावानें, कळकळीनें. ३. जातीनें, स्वतः. ४. 'अन्याचें' असें पाठान्तर. ५. पांगळें, फिकें. हा **काव्यार्थापत्ति**नामक अलंकार. ६. सार्थान्वयः—जो हरिहरपदप्रसादा (विष्णु व शिव यांच्या पायांच्या कृपेस) पात्र (योग्य) तो चि सदा जया हि (विजयास सुद्धां) पात्र; देवांच्या (हरिहरांच्या) या दासा (अर्जुनास) त्रिशूळ, चक्र, [आणि] गदा (हीं आयुधें शंकर व विष्णु यांचीं आहेत) नित्य रक्षिति (संरक्षण करतात). ७. अन्वयः—शक्रा ! (इंद्रा !) हा चक्रायुध (सुदर्शन धारण करणारा) नारायण; [व] पार्थ नर; यांच्या पुढें काळ हि न उभा राहे; हे सर्वा हि भूमिभारा हरितिल. भूमीस भार झाला म्हणजे ईश्वर अवतार घेऊन तो भार नाहींसा करतो अशी समजूत आहे, त्या समजुतीस अनुरूपच ही उक्ति असून कृष्ण व पार्थ हे युगांतरांतील नारायण व नर होत असें सांगितलें आहे; व त्यायोगें यशाबद्दल विचार करण्याचें कारण नसून जयश्री अर्जुनासच प्राप्त होणार असें ध्वनित केलें आहे. 'परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृतां । धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे. ॥ (अध्याय ४।८) हें **गीता**-वचन प्रसिद्धच आहे. ८. सार्थान्वयः—हा कर्ण हि समर्थ, परि दानवपक्षीं (दानवांकडे—दुष्टांकडे याचा ओढा) असे. नया (सन्मार्ग, धर्म) खणोनि (खणून, नाहींसा करून) जय कैंचा ? (जयप्राप्ती कोठून होणार ? अर्थात् होणार नाहीं—असा भाव). [पण हा] रणीं मरण पावेल म्हणोनि या (याला) अधोगती न (याचा अधःपात होणार नाहीं). ९. 'दानवपक्षी' असें पाठान्तर. पक्ष=पक्षपाती, बाजूचा.

[1]भीष्माच्या लोकातें पावो कीं कर्ण नाकलोकातें, ।
गातील कीर्ति सज्जन, सूर्या ! करिशी कशास शोकातें?' ॥ १६
ऐसें कौतुक झालें गगनीं, मग नीरदांस चातकसे, ।
पाहति [2]कृष्णांसि अमर, कीं, करिति प्रबळशत्रुघात कसे. ॥ १७
युद्धारंभीं पार्थध्वजशिखरनिवासि भीम[3]काय [4]कपी, ।
[5]पी कर्णध्वजतेजा, [6]शिखितेजा जेंवि [7]दिवसनायक पी. ॥ १८
गर्जे, उडे ध्वजाग्रावरुनि, करि त्रस्त सर्व लोक [8]बळी; ।
[9]कर्णध्वजगजकक्षाभुजगीतें काय गरुड, तो कवळी ! ॥ १९
[10]हरि [11]नयनसायकांहीं ताडी शल्यासि, तो हि त्या हरितें, ।
[12]जरि तें निरीक्षण चि, त्या मद्रपधैर्यासि जाहलें हरितें. ॥ २०
[13]विंधिति नयनशरांहीं[14] ते[15] हि [16]रिपुप्राणमीनदाश रथी[15], ।
[17]तेथें वृषासि जिंकी पार्थ, जसा रावणासि दाशरथी. ॥ २१
कर्ण म्हणे, 'शल्या ! जरि मजला मारील आजि पार्थ, कसें ।

---

१. शिवलोकातें. भीष्म=महादेव. कर्ण भीष्माच्या लोकातें पावो, कीं (किंवा) नाकलोकातें पावो–असा अन्वय. सूर्या ! तुझा पुत्र कर्ण हा फार मोठा योद्धा आहे. तो आज युद्धांत पडून शिवलोकीं जावो, कीं इंद्रलोकीं जावो. लोक त्याची कीर्तीच गातील. तेव्हां तूं *शोक कां करितोस ?–असा भावार्थ. ह्या गीतींत महायोद्धे रणांत पडले असतां ते शिवलोकीं जातात, व शिव त्यांच्या रुंडमाळा मोठ्या आदरानें गळ्यांत घालितो; किंवा ते मृतवीर इंद्रलोकीं जातात व तेथें अप्सरा त्यांस वरितात;* ह्या समजुतींस अनुलक्षून हें वर्णन आहे. २. कृष्णार्जुनांस. ३. उग्र आहे देह ज्याचा, असा. ४. वानर, मारुती. ५. कर्णध्वजाला दिपवून टाकी. ६. अग्नितेजास. ७. सूर्य. ८. बलवान् असा मारुती. ९. कर्णाच्या ध्वजावरील हत्तीची सांखळी, हीच कोणी नागीण, तिला. येथें **उत्प्रेक्षा** व **रूपक** यांचा संकर आहे. १०. श्रीकृष्ण. ११. नेत्रबाणांनीं. १२. *अन्वयः–जरि तें निरीक्षण चि (केवळ पाहणें) [होतें]* (तरी) त्या मद्रपधैर्यासि (शल्याच्या धैर्यास) हरितें (हरण करितें) जाहलें. श्रीकृष्णांनीं जरी नुसतें शल्याकडे पाहिलें, तरी त्यामुळें त्याचें धैर्य गळालें–असा भाव. १३. भोंसकती. १४. येथें पंतलिखित प्रतींत 'नयनशराहीं' व पुढें गीति २१ मध्यें 'तीव्र शराहीं' असे, म्हणजे तृतीया विभक्तीच्या 'हीं' ह्या प्रत्ययाच्या पूर्वींच्या अक्षरावर अनुस्वार न देतां लिहिलेले, शब्द आहेत. ह्या पर्वाच्या पुढील भागांत अशीं निरनुस्वार रूपें कित्येक ठिकाणीं आढळतात. १५. कर्ण व अर्जुन. १६. रिपु+प्राण+मीन+दाश=शत्रूचे प्राण हेच मत्स्य, त्यांचा (घात करणारे) धीवर. १७. त्या नयनशरताडनकर्मांत.

करिशील? सांग, ऐकों[1] मैत्रीचें ज्यांत होय सार्थकसें.' ॥ २२
शल्य म्हणे, 'कर्णा! तें न घडो; दैवें घडेल ही जरि तें, ।
तरि मीं त्वदर्थ युद्धीं मारीन रणांत जिष्णुतें हरितें.' ॥ २३
पार्थ हि हरिस म्हणे, 'जरि अरि[2] मज मारील, काय करिशील? ।
न पुसावें परि पुसतों, कीं तूं संशय समस्त हरिशील.' ॥ २४
ऐकोनि[3] कृष्ण 'शिव! शिव!' ऐसें आधीं म्हणोनि मग हांसे, ।
कीं, कर्ण काय? न बळी काळाचे हि स्वसेवकीं फांसे. ॥ २५
'शुष्क[4] उदधि, शीत अनल, जन्हि होईल प्रभाकरा पात, ।
तन्हि या कर्णापासुनि नाहीं होणार बा! तुझा घात. ॥ २६
जरि[5] विपरीत चि होइल, तें हि स्मरहरवरप्रदान मृषा, ।
तरि मीं निजभुजतेजें भस्म करिन मद्रपतिसमेत वृषा.' ॥ २७
पार्थ म्हणे, 'विश्वेशा! वांचविला त्वां तसा[6] इभ[7] स्मरणीं[8], ।
तूं तो[9] सारथि; मग कां न करीन स्वरिपु आजि भस्म रणीं? ॥ २८
मर्त्यपतिप्रीति[10] वृषीं, अमरगुरुप्रीति नित्य या दासीं; ।

१. अन्वयः—ज्यांत मैत्रीचें सार्थकसें होय, [तें] सांग; ऐकों (ऐकूं दे). मी गतप्राण झाल्यावर आपल्या मैत्रीचें ज्या योगें सार्थक होईल, असें तूं काय करशील? तें मला ऐकूं दे—असा भाव. २. शत्रु, कर्ण. ३. अन्वयः—कीं (हंसण्याचें कारण) स्वसेवकीं (आपल्या भक्तांच्या विषयीं पाहिलें तर) काळाचे (यमाचे) हि फांसे (पाश) बळी न; (मग) कर्ण काय? (कर्णाची गोष्ट कशाला?). **काव्यार्थापत्ति** अलंकार. ४. सार्थान्वयः—जन्हि उदधि (समुद्र) शुष्क (कोरडा) होईल, अनल (अग्नि) शीत (थंड) [होईल], व प्रभाकरा पात [होईल] (सूर्यनारायण खालीं पडेल), तन्हि या कर्णापासुनि बा! तुझा घात होणार नाहीं. येथें **मिथ्याध्यवसति**-नामक अलंकार आहे. ५. सार्थान्वयः—जरि विपरीत चि (उलटेंच, अर्थात् कर्णहस्तें वध) होईल [व] तें हि स्मरहरवरप्रदान (स्मरहर+वर+प्रदान=शंकराचे वराची देणगी) मृषा (खोटें) [होईल]; तरि मीं निजभुजतेजें (स्वतःच्या बाहुप्रतापानें) मद्रपतिसमेत (मद्रराज जो कर्णसारथी शल्य त्यासह) वृषा (कर्णातें) भस्म करिन. ६. सर्वविश्रुतपणें, अर्थात् कशा रीतीनें रक्षण केले, तो प्रकार प्रसिद्धच आहे. ७. गजेंद्रमोक्षाची कथा येथें अनुसंधेय आहे. ८. धांवा केला असतां. ९. अन्वयः—तो (अशा प्रकारचा, भक्तांचें संकटकाळीं रक्षण करणारा) तूं सारथि; मग, आजि रणीं स्वरिपु भस्म कां न करीन? अर्थात् करीनच करीन—असा भाव. येथें **प्रश्नालंकार** आहे. १०. सार्थान्वयः—वृषीं (कर्णाचे ठायीं) मर्त्यपतिप्रीति (नृपति जो दुर्योधन त्याचें प्रेम), [व] या दासीं (माझे ठायीं) नित्य अमरगुरुप्रीति (देवश्रेष्ठाची—कृष्णाची प्रीति) [असे]. पल्लव-

कसि सरि करील पल्वलजलजंतु सुधासमुद्रयादासीं ?' ॥ २९
ऐसा निश्चय केला पार्थें, कर्णें हि मांडिलें[1] समर, ।
कौतुक[2] पाहति कौरवपांडवपक्षस्थ आणिखी अमर. ॥ ३०
पार्थाकडील कटकें कर्णें, कर्णाकडील त्या पार्थें, ।
[3]केलीं तीव्रशरांहीं भग्नें, मग्नें भयीं, हतस्वार्थें. ॥ ३१
कृप, कृतवर्मा, द्रौणी, दुर्योधन, शकुनि हे महासर्प, ।
धांवति निजबळ मथितां; परि हरि[4] तो पार्थगरुड तद्दर्प[5]. ॥ ३२
शक[6], यवन, तुषार हि बहु वधिले येतां चि त्या सिताश्वानें, ।
गज हि हरिपुढें न जगति, रक्षितिल कसीं स्वजीविता श्वानें[7] ? ॥ ३३
पुत्रें[8] खळबळ मथितां पावे पाहोनि शक्र मुद्राशी[9], ।
सरलें[10] क्षयसमयींचें तांडव पांडवरणांत रुद्राशी. ॥ ३४
सुर 'साधु ! साधु !' म्हणती, वरि करिती पुष्पवृष्टि हर्षानें, ।
स्तविती[11] मुनि सुनिपुण जे प्रमुदित सज्जन जयप्रकर्षानें. ॥ ३५
त्यां[12] विजयविजयसमयीं दुर्योधनभूप कर्ण हे मात्र, ।

---

जलजंतु (डबक्यांतील क्षुद्र प्राणी) सुधासमुद्रयादासीं (क्षीरसमुद्रांतील प्राण्यांशीं) सरि (बरोबरी) कसि करील ? अर्थात् करणार नाहीं–असा भाव. **दृष्टांतालंकार.**

१. युद्ध सुरू केलें. २. चमत्कार, मौज. ३. अन्वयः–तीं हतस्वार्थें (नष्ट झालें आहे स्वहित ज्यांचें अशीं) [कटकें] तीव्रशरांहीं [आधीं] भग्नें [व मग] भयीं (भीतीमध्यें) मग्नें केलीं (बुडविलीं). त्यांस अत्यंत भीति वाटली–असा भाव. ४. हरण करिता झाला. ५. त्यांचा गर्व, किंवा अभिमान. येथें **रूपकालंकार** आहे. ६. हे म्लेच्छ जातिविशेष आहेत. ७. हरिपुढें (सिंहापुढें) गज हि (हत्ती देखील) न जगति, [तेव्हां हरिपुढें] स्वजीविता श्वानें (कुत्रीं) कसीं रक्षितिल ?–असा अन्वय. येथें **काव्यार्थापत्ति** अलंकार आहे. ८. सार्थान्वयः–पुत्रें (अर्जुनाकडून) खळबळ (शत्रुसैन्य) मथितां (घुसळलें जात असतां) [तें] पाहोनि शक्र (इंद्र) मुद्राशी (आनंदाचा ढीग, अर्थात् अत्यानंद) पावे (आनंदित झाला) व रुद्राशी (शंकरास) पांडवरणांत क्षयसमयींचें (प्रलयकालींचें) तांडव (नृत्य) सरलें. ९. मुद्+राशी=आनंदाचा ढीग, अत्यानंद. १०. हा **स्मरणालंकार.** ११. अन्वयः–जे मुनि सुनिपुण [व] सज्जन [ते] जयप्रकर्षानें (अर्जुनाच्या सरशीमुळें) प्रमुदित [होऊनि त्यातें] स्तविती. १२. सार्थान्वयः–त्या विजयविजयसमयीं (अर्जुनाच्या जयप्रसंगीं) मानी (अभिमानी) दुर्योधनभूप[व] कर्ण हे मात्र ज्ञानीश्वरसे (ज्ञानिश्रेष्ठाप्रमाणें) विस्मय-व्यथा-पात्र न झाले चि. अर्जुनाचा जेव्हां जय झाला, तेव्हां राजा दुर्योधन व कर्ण यांस आश्चर्यही वाटलें नाहीं, व दुःखही वाटलें नाहीं. कारण ते उभयतांही मानी होते.

मानी, ज्ञानीश्वरसे झाले चि न विस्मयव्यथापात्र. ॥ ३६
त्या काळीं द्रौणि[१] म्हणे, 'राया ! दुर्योधना ! पुरे झगडा[२], ।
हें[३] कर्म तसें, स्वशिरें फोडाया हाणणें जसें दगडा. ॥ ३७
जो ब्रह्मसम महात्मा, झाली गति[४] काय त्या तुझ्या गुरुची[५] ? ।
कुरुची[६] श्रीसंतति कां भस्म करिसि ? सुरुचि[७] ही न; हे कु-रुची. ॥ ३८
हो[८], आझुनि तरि टाकुनि हे काम, क्रोध, लोभ, शांत; नवा[९] ।
कां शोक ताप जोडिसि ? झाली गति काय त्या हि शांतनवा[१०] ? ॥ ३९
मीं कृपमामा दोघे जिष्णुपुढें वांचलों न बाहुबळें; ।
शोकं[११] कपाळीं नसता, असता जरि मृत्यु, मारिता चि पळें. ॥ ४०
जिष्णु वळेल मदुक्तें, कृष्णा न रुचे विरोध[१२] हा नियम[१३], ।
धर्म सदय, भीम तया वश[१४], करितिल न गुरुवचनहानि[१५] यम[१६]. ॥४१

---

ज्ञानवानास कशाचेंही आश्चर्य किंवा दुःख होत नाहीं. कारण 'सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ' (भगवद्गीता, अध्याय २।३८) अशी त्यांची वृत्ति असते.

१. द्रोणपुत्र (अश्वत्थामा). २. युद्ध. ३. अन्वयः–[दगडा] फोडाया (फोडावयास) जसें स्वशिरें (आपलीं डोकीं) दगडा हाणणें (दगडावर आपटावीं), तसें हें कर्म [असे.] ह्या झगड्यांत स्वतःचाच नाश होत आहे, ह्यासाठीं अशा प्रकारचें युद्ध चालू ठेवण्यांत अर्थ काय? तें बंद करणें बरें–असा अश्वत्थाम्याच्या बोलण्याचा भाव. ४. अवस्था. ५. द्रोणाचार्यांची. (पंतकृत द्रोणपर्व, अध्याय २१ पद्य). ६. अन्वयः–कुरुची (कौरवांची) श्रीसंतति (संपत्ति आणि संतति) कां भस्म करिसि? ७. [ही] (तूं पतकरलेली) सुरुचि (चांगल्या गोष्टीची आवड) न; [तर] हे कुरुची [होय]. ८. शांत (स्वस्थ) हो. ९. जास्त. पूर्वी आपणास अनुभवावे लागलेले शोकाचे प्रसंग पुरेसे झाले नाहींत काय? १०. शंतनुपुत्र जो भीष्म त्यास. ११. अन्वयः–कपाळीं जरि शोक नसता, मृत्यु असता, [तर] पळें (क्षणांत) [तो आम्हां] मारिता चि. आम्हीं दोघे वांचलों, हें आमच्या पराक्रमाचें फळ नव्हे. तर आमच्या कपाळीं शोक असून मृत्यु नव्हता, म्हणूनच आम्ही वांचलों. नाहींपेक्षां अर्जुनानें केव्हांच आम्हांस वधिलें असतें–असा भाव. अर्थसादृश्यः–उत्तररामचरित्र अंक १ श्लोक ४७–'दुःखसंवेदनायैव रामे चैतन्यमाहितम्'. ह्याचें रूपांतरः–'भोगावयास दुःखें देवें चैतन्य ठेविलें रामीं.' १२. वैरभाव. १३. खास गोष्ट. युद्धापूर्वी श्रीकृष्ण शिष्टाई करावयास गेले होते, त्यास अनुलक्षून हें म्हणणें आहे. (पंतकृत उद्योगपर्व, अध्याय ८ व ९ पद्य). १४. तया वश=त्याच्या अंकित आहे. १५. गुरु+वचन+हानि=वडिलांच्या भाषणाचा अवमान. अर्थात् ते वडिलांचें भाषण खालीं पडूं देणार नाहींत, मोडणार नाहींत. १६. नकुळ व सहदेव. यम=जुळे भाऊ.

राज्यार्थ धर्म पावो, प्रजा हि सुख, सफळ काम हा बा ! हो, ।
तातादि आप्त शोकीं घालिसि दाटूनि कां? महाबाहो ! ॥ ४२
आतांच्या भीमार्जुनकर्मा लाजेल काळवासव-धी, ।
आहे कोण असा प्रभु, जो या कृष्णानुजाधवास वधी? ॥ ४३
ऐकेल वचन माझें, आवरिल द्वेषिकाळ हात रणीं, ।
तापद वैरग्रीष्मीं, प्रेमहिमर्तूंत सुखद हा तरणी. ॥ ४४
मित्रं सहज एक, दुजें सामें, दानें करूनि मित्र तिजें, ।
चवथें हि तें प्रतापें मित्र मिळे, सांगताति सन्मति, जें. ॥ ४५

---

१. पूर्ण होवो. २. धृतराष्ट्रादि. ३. बळेच, बुद्धिपूर्वक. ४. यमधर्म व इंद्र ह्यांची मति. यमाच्या आंगचें क्रौर्य व इंद्राच्या आंगचे शौर्यधैर्यादि गुण प्रसिद्ध आहेत. पण त्या बाबतींत अनुक्रमें भीम व अर्जुन यांनीं यम व इंद्र यांच्यावर ताण केली–असा भाव. ५. सामर्थ्यवान्. ६. कृष्णाची धाकटी बहीण जी सुभद्रा, तिचा नवरा जो अर्जुन, त्यास. आपल्या भगिनीच्या पतीच्या रक्षणार्थ कृष्ण शक्य तो प्रयत्न करील–असा गर्भितार्थ. 'कृष्णानुजाधव' या विशेषणाची योजना सहेतुक केलेली आहे. येथें '**परिकरालंकार.**' ७. आटोपील. ८. शत्रूचा अंतक अर्जुन. ९. सार्थान्वयः–हा तरणी (अर्जुनरूप सूर्य) वैरग्रीष्मीं (द्वेषरूप ग्रीष्मऋतूंत) तापद (त्रास देणारा) [व] प्रेमहिमर्तूंत (प्रेमरूपी हिंवाळ्यांत) सुखद (सुख देणारा) [असे]. ज्येष्ठ व आषाढ ह्या महिन्यांत सूर्यकिरण फार कडक असल्यानें दुःसह असतात, पण तेच मार्गशीर्ष व पौष ह्या महिन्यांत थंडी असल्यानें फार गोड लागतात, ही सर्वत्र प्रतीति आहेच. हें **रूपक** फारच नामी साधलें आहे. ह्यावरून अर्जुन हा, त्याशीं वैर केलें तर त्रास देणारा, व स्नेह केल्यास सुख देणारा आहे–असा भाव. १०. ह्या गीतींत 'मित्र' शब्द नपुंसकलिंगी योजिला आहे, व संस्कृतांत तो नपुंसकलिंगीच आहे. सार्थान्वयः–[जें] सहज [मिळे तें] एक मित्र, [जें] सामें [मिळे तें] दुजें (दुसरें); [जें] दानें करूनि [मिळे तें] तिजें (तिसरें) मित्र; जें प्रतापें मिळे तें चवथें मित्र हि [असें] सन्मति सांगताति. मित्र मिळण्याचे चार प्रकारः–पहिली सहज मैत्री. उदाहरणार्थः–चंद्र व चकोर अथवा कमल व सूर्य ह्यांची मैत्री. [भवभूतिकृत उत्तररामचरित्र, अंक ६ श्लोक १२ 'व्यतिषजति पदार्थानान्तरः कोऽपि हेतुर्न खलु बहिरुपाधीन्प्रीतयः संश्रयन्ते। विकसति हि पतङ्गस्योदये पुण्डरीकं द्रवति च हिमरश्मावुद्गते चन्द्रकान्तः ॥.' ह्या पद्याचें कै० परशुरामपंत तात्या गोडबोले यांनीं केलेलें रूपांतरः–पदार्थांच्या योगाप्रति किमपि अभ्यंतरिं वसे। निमित्त प्रीतीला उघड उपधी कारण नसे ॥ प्रकाशीं भानूच्या कमल उमले वासहि सुटे । विधूच्या पाषाणा उदयिं विधुच्या पाझर फुटे ॥] दुसरा प्रकार म्हणजे गोडीगुलाबीनें जोडलेली मैत्री; तिसरा प्रकार म्हणजे नजरनजराणा देऊन संपादिलेली मैत्री; व चवथा प्रकार म्हणजे कोणाही मनुष्याच्या अंगचा प्रताप (तेजस्विता) पाहून त्याच्या मैत्रीचा लाभ व्हावा अशी इच्छा होऊन जी मैत्री जोडिली जाते ती. मग ती तेजस्विता बुद्धिप्रभावदर्शक असो, किंवा शरीरसामर्थ्यशौर्यादि दर्शक असो. ११. दानें करूनि=देणग्या देऊन, किंवा दानें-करूनि=दानांच्या बळावर.

तें सर्व पांडवांचा[1] ठाईं[2] आहे चि, गा! नृपा! पेरिसें, ।
करिजे[3], घणीं स्वमाथां पडतां भंगार्थ ही, कृपा परिसें. ॥ ४६
वंदीं धर्मा गुरुतें, सोडुनि चाप क्षुरप्र[4], सन्नमनें; ।
जय[5] सुख हि तसें न इहीं, स्तविति हि न तुला सुर प्रसन्नमनें. ॥ ४७
ज्याचा[6] चिंतील क्षण संतापें धर्मराज नाश मनें, ।
केलें चि निश्चयें निजपाशांहीं बद्ध त्या जना शमनें. ॥ ४८
कटु[7] परि हितकर औषध जो रुग्ण हितेच्छु, तो कवि, प्राशी, ।
मद्वचन तसें, सेवीं; घेतां नाशी च शोक विप्राशीः. ॥ ४९
न[8] सुखद दुराग्रह, सखा हा सर्वानर्थगेह[9] ठक, राया! ।

---

१. पांडवांच्या. २. ऐक. ३. अन्वयः—स्वमाथां (आपल्या म्हणजे परिसाच्या मस्तकावर) भंगार्थ (तुकडे व्हावेत म्हणून) पडतां ही (पडत असतांही) घणीं (घणावर) परिसें कृपा करिजे. परिसास फोडण्याकरितां जरी घण मारिला, तरी परिसानें आपला धर्म सोडूं नये. लोखंडास परिसाचा स्पर्श झाल्यास त्याचें तो सोनें बनवितो, ही गोष्ट प्रसिद्धच आहे. तेव्हां हें थोरपण परिसानें न सोडतां त्याजवर कृपा करून, त्याचें, अर्थात् त्या घणाचें, सोनें करावें हेंच योग्य होय. ह्या गीतींतील दृष्टांत फारच नामी आहे. ४. घोड्याच्या नालाच्या आकाराचा तीक्ष्ण बाण. ५. अन्वयः—इहीं (ह्या धनुष्यबाणांच्या योगें) [तुला] जय न, तसें सुख हि [न]. सुर तुला प्रसन्नमनें न स्तविति हि. ह्या धनुष्यबाणांनीं ह्मणजे अर्थात् युद्ध करून तुला जयप्राप्ती नाहीं व सुखप्राप्तीही नाहीं. बरें, देव तरी तुला वाखाणितात का? तेंही नाहीं. तेव्हां तूं धर्मराजाशीं साम करावास हेंच उचित आहे—असा अश्वत्थाम्याच्या भाषणाचा भाव. ६. अन्वयः—संतापें ज्याचा नाश धर्मराज मनें (मनांतल्या मनांत) क्षण (क्षणभर) चिंतील, त्या जना शमनें (यमानें) निजपाशांहीं निश्चयें बद्ध केलें चि. धर्मराज एकाद्याचा नाश व्हावा, असें मनांतल्या मनांत केवळ क्षणभर जरी चिंतील, तरी त्याबरोबर यमधर्माचा पाश त्याजवर पडून तो गतप्राण झालाच असें समजावें. तेव्हां जर तूं त्या धर्मराजाचा नाश व्हावा म्हणून उघड विरोध मांडिलास, तर त्या कामांत यश कोठून येणार?—असा भाव. 'जो जो चिंतील क्षण संतापें धर्मराज नाश मनें' असा पाठभेद आहे. ७. अन्वयः—जो हितेच्छु (आपलें कल्याण व्हावें अशी ज्यास इच्छा आहे असा) रुग्ण (रोगी) कटु परि हितकर औषध प्राशी (पितो) तो कवि (शहाणा); मद्वचन तसें (अर्थात्, कटु परि हितकर); [तें] सेवीं (मान्य कर; त्याचा स्वीकार कर); विप्राशीः (ब्राह्मणाचा आशीर्वाद) घेतां शोक नाशी च. ह्या गीतींतील चतुर्थचरण सुभाषित आहे. ८. अन्वयः—दुराग्रह सुखद (सुख देणारा) न; राया! हा सर्वानर्थगेह (सर्व+अनर्थ+गेह=सर्व संकटांचें माहेर असा) ठक (वंचक) (तुज) सखा (स्नेही) [व] आम्हाहूनि (आमच्यापेक्षां) प्रिय गमे (वाटे). [परि] हा हठ (दुराग्रह) घात (नाश) कराया (करावयास) न चुकेल चि. ह्या युद्ध करण्याच्या दुराग्रहानें तुझा नाश खास होईल—असा भाव. ९. सर्व अनर्थांचें घरच.

प्रिय अम्हाहूनि गमें; न चुकेल चि घात हा हठ कराया. ॥ ५०
[1]ज्या, ऐसें कळलें, कीं हितशत्रु कृतघ्नराज हठ, कविला. ।
तो एक महाठक या क्षुद्रें संसृति[2]पथांत न ठकविला. ॥ ५१
हातींचें स्वहित हठें जातें मग चित्त फार हळहळतें, ।
मति-[3]वसुमती-विदारक फार कठिन दुःसह व्यसन[4]-हळ तें[5]. ॥ ५२
[6]हतशेषीं सकरुण हो, अलि नलिनीं सक्त तेंवि मन सामीं. ।
[7]अंतरिं शिरोनि [8]वारिन कर्णासि, [9]तपातपासि घनसा, मीं.' ॥ ५३
[10]सुश्राव्य, सेव्य, भव्य, [11]व्यसनौषध गुरुसुतोक्त नृप परिसे, ।
परि सेविना गतायु; स्वहितकर हि शब्द मानिले अरिसे. ॥ ५४
मग गुरुपुत्रासि म्हणे, 'वदलासि सख्या! तसें चि तें [12]सोचें, ।

---

१. अन्वयः—ज्या कविला (शहाण्या मनुष्यास) ऐसें कळलें (उमजलें) कीं हठ (दुराग्रह) हितशत्रु (हितनाशक) व कृतघ्नराज (केलेल्या चांगुलपणावर विरजण पाडण्यांत श्रेष्ठ) [असे], तो एक महाठक (पक्का वस्ताद), [व तो] या क्षुद्रें (ह्या दुराग्रहरूप वंचकानें) संसृतिपथांत (जगिक व्यवहारांत, संसारमार्गांत) न ठकविला. शहाणे लोक दुराग्रह अहितकर असें जाणून असतात व त्यामुळें त्यांची संसारयात्रा अबाधित शेवटास जाते—असा भाव. २. संसाराच्या मार्गांत, व्यवहारांत. ३. बुद्धिरूप पृथ्वीचा भेद करणारें, अर्थात् फोडणारें. हें 'हळ' ह्याचें विशेषण. पृथ्वीला 'सर्वसहा' असें नांव आहे. म्हणजे अर्थात् ती सर्व सहन करिते. पण हें 'हळ' अशा पृथ्वीलाही फोडणारें आहे. हें रूपक फारच चांगलें आहे. ज्या मतीचा कधींही भ्रंश होणार नाहीं, अशा बुद्धीचा देखील भ्रंश होतो, म्हणजे शहाणे लोकही ह्यामुळें चळतात—असा भावार्थ. ४. दुराग्रहरूपी नांगर. 'व्यसन' ह्या शब्दाचा अर्थ 'व्यर्थ (निष्फळ) यत्न' असा आहे. जो आग्रह फलद्रूप होत नाहीं, तोच दुराग्रह म्हणजे 'हट्ट' होय. ५. अन्वयः—तें (स्वहिताचा नाश झाल्यामुळें वाटणारें दुःख) मतिवसुमतीविदारक व्यसनहळ फार कठिन [व] दुःसह [होय]. ६. अन्वयः—हतशेषीं (मेलेल्यांच्या मागें उरलेल्यांच्या ठायीं) [तुझें] मन सकरुण [हो, आणि जेंवि] अलि (भ्रमर) नलिनीं (कमलाचे ठायीं) तेंवि [तें] सामीं (सख्य करण्याविषयीं) सक्त (लीन, गढलेलें) हो (होवो). ७. पोटांत शिरून, गोड बोलून. ८. दूर करीन. ९. तप+आतपासि=सूर्यापासून होणाऱ्या तापास. १०. अन्वयः—सुश्राव्य (कर्णमधुर), सेव्य (घेण्याजोगें), भव्य (हितकर), व्यसनौषध (संकटमुक्तीस रामबाण लागू पडणारें) गुरुसुतोक्त (अश्वत्थाम्याचें भाषण) नृप (दुर्योधन) परिसे, परि (परंतु) [तो] गतायु (ज्याचीं शभर वर्षें भरलीं आहेत असा, अर्थात् आसन्नमृत्यु नृप) सेविना (ग्राह्य करीना, घेईना); [त्यानें] स्वहितकर हि शब्द अरिसे (शत्रूप्रमाणें) मानिले. ११. संकटावरील औषधच असें. १२. खरें.

[1]हें अतिशुचि, हित दुर्लभ मित्र सुरभिदुग्धसिंधुफेंसाचें. ॥ ५५
ऐकावें त्वां [2]सकृपें मीं [3]स्वगुरुसुता सख्यासि विनवीन; ।
पिउनि [4]मदनुजास्र [5]अरि क्षत करि हृदयांत आज हि नवीन. ॥ ५६
'मारुनि दुर्योधन, शिर उडविन मीं [6]कंदुकासम पदानें, ।
[7]भीमासि कुरुक्षेत्रीं श्रेयस्कर कर्म हें, न तप दानें.' ॥ ५७
[8]वदला असें वृकोदर, वृक जैसा वधुनि कातराक्ष ससा, ।
प्याला रक्त घटघटां करुनि मदनुजात-घात राक्षससा. ॥ ५८
मन्नाशार्थ [9]करिति ते, करितों [10]तन्नाशकाम नवसा मीं; ।
[12]शम कैंचा? गुरुपुत्रा! कैसें [13]होईल शील नव सामीं? ॥ ५९

---

१. अन्वयः—सुरभिदुग्धसिंधुफेंसाचें (कामधेनूच्या दुधाच्या समुद्राच्या फेंसाचें) मित्र [च असें] हें (भाषण) अतिशुचि (फार स्वच्छ किंवा फार शुद्ध), हित (कल्याणकारक) [व] दुर्लभ (मिळण्यास कठीण) [आहे]. हें भाषण अतिशुचि, हित व दुर्लभ ह्या गुणांमुळें सुरभिदुग्धसिंधु-फेंसाशीं समानशील आहे, म्हणून त्याचें मित्र. 'फेंस' शब्द शुद्ध मराठी असल्यामुळें हा समास चिंत्य आहे. यशाचा रंग शुभ्र असतो, असा कविसंकेत आहे. त्यास अनुसरून पंतांनीं यशाचें आत्यंतिक निर्मलत्व दर्शविण्यासाठीं हाच दृष्टांत ठिकठिकाणीं योजिला आहे. (मागें अध्याय ३८।२६ व आदिपर्व, अध्याय १३।२९ व १८।८१ पहा). २. कृपाळू होऊन. हें 'त्वां' ह्याचें विशेषण. ३. प्रार्थना करून सांगेन. 'स्वगुरुसुत' ह्या शब्दाचा उपयोग सहेतुक केलेला असल्यामुळें येथें **परिकर** अलंकार आहे. ४. मत्+अनुज+अस्र=माझ्या धाकट्या भावाचें रक्त. ५. भीम. येथें **लोकोक्ति** अलंकार होईल. **पर्यायोक्त**ही होईल. क्षत=व्रण, जखम. क्षत करि=नवा अपराध केला. तसेंच रुधिर भावाचें, व क्षत ह्याच्या अंतःकरणास, ह्यावरून **असंगति** अलंकाराची छायाही येथें भासते. ६. चेंडूप्रमाणें. मागें अध्याय ४५ गीति ११ पहा. पण तेथें पंतांनीं भीमाच्या भाषणांत दुर्योधनासंबंधीं असे धिक्कारयुक्त शब्द योजिले नाहींत. ७. अन्वयः—कुरुक्षेत्रीं (या क्षेत्रांतील रणभूमीवर) भीमासि हें कर्म (दुर्योधनाचा वध) श्रेयस्कर (सुखदायक, फायदेशीर) [आहे]. तप [व] दानें [श्रेयस्कर] न. ८. अन्वयः—असें वृकोदर (भीम) वदला; कातराक्ष (भयचकित झाले आहेत नेत्र ज्याचे असा) ससा वधुनि जैसा वृक (लांडगा) [तैसा] मदनुजातघात (मत्+अनुजात+घात=माझ्या धाकट्या भावाचा नाश करणारा) राक्षससा (राक्षसाप्रमाणें) [त्याचें] रक्त घटघटां प्याला. ९. माझ्या धाकट्या भावाचा घात. जात=उत्पन्न झालेला, संतान, संतति. १०. नवस करिती—असा भाव. ११. त्यांच्या नाशाची इच्छा आहे ज्यास, असा मी. १२. शांति, मनास आळा घालणें. १३. सामीं नव शील कैसें होईल—असा अन्वय. सख्य करावें असें वाटण्याजोगा नवा स्वभाव कोठून येईल?—असा भाव. स्वभाव दुस्त्यज—पंत.

स्वर्गीं [1]स्वसमागमकर वैर बरें; [2]ने हरि शोक साम हि तें, ।
जो जीस्तव सर्वस्व हि [3]वेची सोडील तो कसा [4]महितें ? ॥ ६०
पार्थाच्या कर्णाच्या, [5]सुतशोकदवार्दितें, मनां, [6]देहें, ।
न रुचति; [7]तयांत [8]सामप्रेम क्षणमात्र ही न [9]नांदे हें. ॥ ६१
[10]न चले चि यथागति वृककुळबिलगर्भीं जसा अवि-श्वास, ।
मद्वचनीं पार्थाचा होइल विश्वास तो [11]अविश्वास. ॥ ६२
म्हणसि, '[12]हतशेषवीरस्त्रीगीतस्वीयकीर्ति सामीं प्या;' ।
[13]अन्यत्र रणमखाहुनि न वरीन क्षण [14]गुरुघ्नसामीप्यां. ॥ ६३
[15]शुचिमति यति अतियत्नें जें जोडिति, सहज वीर युद्धीं तें, ।

---

१. आपल्या माणसांची भेट करून देणारें. २. तें साम हि (तूं जो संधि करावा म्हणतोस, तो केला तरीही) शोक (स्वकीयांविषयींचा) न हरि. अर्थात् त्या योगें स्वकीयांबद्दल होणारा शोक नाहींसा होणार नाहीं. तेव्हां साम करण्यांत अर्थ नाहीं—हा मथितार्थ. ३. खर्च करी. ४. पृथ्वीतें. ५. पुत्रशोक हाच दावानल, त्यानें पोळलेलीं. ६. 'देह' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगीही आहे. येथें पंतांनीं तो नपुंसकलिंगींच योजिला आहे.' देहें' हा 'रुचति' ह्या क्रियापदाचा कर्ता असून 'मना'='मनाला' ही चतुर्थी आहे. 'पार्थाच्या [व] कर्णाच्या' ह्या षष्ठीचा संबंध 'मनां'कडे. ७. त्यांच्या देहांमध्यें. पार्थाच्या [व] कर्णाच्या मनां सुतशोक-दवार्दितें देहें न रुचति, [व] तयांत (त्यांच्या ठिकाणीं) हें सामप्रेम क्षणमात्र ही न नांदे—असा अन्वय. पार्थ व कर्ण या दोघांसही पुत्रशोकाचा धक्का बसलेला असल्यामुळें त्यांना त्यांचा जीवच नकोसा झाला होता, म्हणून दोघांनाही साम करण्याची मुळींच इच्छा नव्हती—असा भाव. ८. संधीची आवड. ९. वसत नाहीं, राहत नाहीं. १०. अन्वयः—वृककुळबिलगर्भीं (लांडग्याच्या गुहेमध्यें) अविश्वास (मेंढ्यांचा श्वासोच्छ्वास) जसा यथागति (नित्याचा, नेहमींच्या प्रमाणाचा) न चले चि (चालत नाहीं, अर्थात् अयथागति होतो), [तसा] मद्वचनीं पार्थाचा विश्वास तो अविश्वास होइल. येथें **प्रतिवस्तूपमा** अलंकार आहे. ११. येथे **विरोधाभास** नामक अलंकार आहे. १२. न मरतां उरलेल्या योद्ध्यांच्या बायकांनीं गाइलेली आपली कीर्ति. कीर्ति गाण्याचें कारण युद्ध बंद झाल्यामुळें पति युद्धांत मारले गेल्यामुळें येणारें आपलें वैधव्य टळलें हें होय. १३. अन्वयः—रणमखाहुनि अन्यत्र (युद्धावांचून इतर ठिकाणीं) गुरुघ्नसामीप्या (गुरूला मारणाऱ्याच्या सांनिध्यास, अर्थात् पांडवांजवळ जाणें) क्षण (क्षणभरसुद्धां) न वरीन (स्वीकारीन). अश्वत्थाम्याची सूचना खोडून काढतांना 'गुरुघ्न' ह्या पदानें त्याच्या बापाच्या मृत्यूची आठवण दुर्योधनानें ह्या वेळीं फारच खुबीनें करून दिली आहे. १४. द्रोणाचार्यांचा घात करणारा जो धृष्टद्युम्न, त्याच्या सान्निध्याला. १५. अन्वयः—शुचिमति यति (शुद्धांतःकरणाचे योगी) जें अतियत्नें जोडिति (संपादिति), तें युद्धीं वीर सहज [जोडिती].

रणमखजशुद्धि[1] लाजवि यज्ञव्रततीर्थदानशुद्धीतें. ॥ ६४
पावे[2] भव्य, रणमखीं जो शत्रुजना न पाठि दे, वांचे; ।
वीर मरे जो त्यास हि सत्कारिति सर्व नाथ देवांचे. ॥ ६५
अघहर[3] शुभकर तीर्थ, श्रुति, आम्हां क्षत्रियांसि, युद्ध, वदे; ।
गुरुपुत्रा[4]! अनुमोदन द्यावें; मज हें चि कर्म[5] उद्भव[6] दे.' ॥ ६६
प्रार्थुनि गुरुपुत्रातें प्रेरी निजसैनिकांसि जिष्णुवरी, ।
ज्याचें सारथिपण रणयज्ञांत त्रिभुवनेश विष्णु वरी[7]. ॥ ६७
अन्योन्यावरि धांवति कर्णार्जुन पाकपाकशासनसे[8], ।
प्रेक्षक म्हणती, 'जोडा[9] यांस, तसा यांचिया यशास, नसे.' ॥ ६८
सोमक[10] म्हणती, 'जिष्णो! तोडावी क्षिप्र कंधरा[11] याची[12], ।
इच्छा निष्कंटकनिजसुतराज्याची हि अंधरायाची[13].' ॥ ६९
कौरव म्हणती, 'कर्णा! मारुनियां अर्जुना शरण्यातें[14], ।
हृतराज्याश[15] युधिष्ठिर धाडावा त्वां पुन्हां अरण्यातें.' ॥ ७०

---

१. रणयज्ञापासून उत्पन्न होणारी पवित्रता. यज्ञ करून, व्रतें आचरून, तीर्थें हिंडून व दानें देऊन जें पुण्य गांठी पडतें, त्यापेक्षां जास्त पुण्य युद्धांत मेल्यानें प्राप्त होतें–असा भाव. २. अन्वयः–जो [वीर] रणमखीं (युद्धांत) शत्रुजना पाठि न दे (पाठ दाखवीत नाहीं, अर्थात् ज्याचा जय होतो) [व] वांचे (जिवंत राहतो), [तो] भव्य (कल्याण) पावे. [परंतु] जो वीर [पाठी न देता] मरे, त्यास हि देवांचे सर्व नाथ (मुख्य देव) सत्कारिति (आदर करितात). ही गीति म्हणजे भगवद्गीता, अध्याय २ श्लोक ३७ यांतील कल्पनेचेंच प्रतिबिंब होय. ३. अन्वयः–आम्हां क्षत्रियांसि युद्ध अघहर (पापाचें हरण करणारें) [व] शुभकर (कल्याणप्रद) तीर्थ [होय, असें] श्रुति (वेद) वदे (सांगते). ४. गीति ५५ ते ६६ मधील दुर्योधनाच्या भाषणांत योजिलेला 'गुरुपुत्र' हा शब्द मोठा औचित्यपूर्ण आहे. दुर्योधनानें अश्वत्थाम्याला 'मित्रा!' असें न म्हणतां 'गुरुपुत्रा!' असें म्हणून त्याचा मोठा गौरव केला आहे, व अशा रीतीनें मोठ्या धूर्तपणानें त्यास वश करून घेतलें आहे. ५. युद्ध करणें. ६. आनंद. ७. अंगीकारी, पतकरी. ८. इंद्रानें मारिलेला पाक-नामक दैत्य व इंद्र. येथें कर्णाची तुलना पाकासुराशीं करून तो वध्य आहे, असें ध्वनित केलें आहे. येथें यथासंख्य अलंकार आहे. यांसारखे. ९. उपमा. यांस जोडा नसे, तसा यांचिया यशास [नसे]–असा अन्वय. यांचा पराक्रम अद्वितीय व कीर्ति अवर्णनीय–असा भाव. १०. पांडवपक्षीय राजसमुदाय. ११. मान. १२. कर्णाची. १३. धृतराष्ट्राची. 'कंधरा' आणि 'इच्छा' हीं 'तोडावी' याचीं कर्में, येथें सहोक्ति गर्भित आहे. १४. [धर्माचा] पाठिंबा; आश्रयदाता, त्याला. १५. हृत+राज्य+आश=हिसकावून घेतली आहे, अर्थात् नाहींशी करून टाकिली आहे राज्याची आशा ज्याची, असा तो.

## अध्याय सत्तेचाळिसावा.

तोडी दश बाणांहीं राधेय प्रथम त्या, वृथा ज्यातें ।
पाहुनि गेलीं सुररिपुशस्त्रास्त्रें संगरीं, पृथाज्यातें. ॥ १
पार्थ हि दश विशिखांहीं ताडुनि कर्णासि हांसला गा ! या. ।
गिलितगजाजगरगळां पाहे शशमांसघांस लागाया. ॥ २
वर्षति अन्योन्यावरि कर्णार्जुन ते घनावरी घनसे, ।
पुरुहूतदूतवातद्युमणिकरां शरगृहांत रीघ नसे. ॥ ३
जेंवि दिनांतीं पक्षी व्यापिति वृक्षास रचितनीडास, ।
तेंवि तयांतें ते शर; भासति अहि घेति धावुनीं डास. ॥ ४

---

१. ह्यांत मूळ अध्याय ८९ व अध्याय ९० यांतील ४३ श्लोक इतका कथाभाग आला आहे. २. सार्थान्वयः—ज्यातें पृथाज्यातें (कुंतिपुत्र अर्जुनातें) पाहुनि सुररिपुशस्त्रास्त्रें (देवशत्रु जे दानव त्यांचीं शस्त्रें व अस्त्रें) संगरीं (युद्धामध्यें) वृथा गेलीं (वायां गेलीं, अर्थात् निष्फळ झालीं), त्या (अर्जुनास) राधेय (कर्ण) प्रथम दश बाणांहीं (दहा बाणांनीं) ताडी (प्रहार करिता झाला). ३. ही उक्ति संजयाची आहे. संजय धृतराष्ट्रास युद्धवृत्त कथन करीत आहे. सार्थान्वयः—गा ! (धृतराष्ट्रा !) या कर्णासि (ज्या कर्णानें वरील गीतींत वर्णिल्याप्रमाणें दहा बाणांचा प्रहार अर्जुनावर केला होता, त्यास) पार्थ हि दश विशिखांहीं (बाणांनीं) ताडुनि हांसला. गिलितगजाजगरगळां (गिळिलेला आहे हत्ती ज्यानें, अशा अजगराचे गळ्यास) शशमांसघांस (सशाच्या मांसाचा घांस) लागाया पाहे (लागण्याच्या विचारांत आहे). अर्थात् ही गोष्ट अगदींच असंभाव्य. कारण ज्या अजगरानें हत्तीसारखें प्रचंड जनावर गट्ट केलें, त्याच्या गळ्यांत सशाच्या मांसाचा घांस कसा अडकेल ? अर्थात् नाहीं—असा भाव. अर्जुनाच्या बाणांचा कर्णावर कांहींच परिणाम झाला नाहीं—हा इत्यर्थ. येथें **अप्रस्तुतप्रशंसा** अलंकार आहे. ४. वृष्टि करितात (अर्थात् बाणांची). ५. पुरुहूत+दूत+वात+द्युमणि+करां (=इंद्राचा जासूद जो वारा, तो व सूर्याचे किरण ह्या दोघांतें) शरगृहांत रीघ नसे. म्हणजे कर्ण व अर्जुन ह्या उभयतांनीं परस्परांवर बाण सोडून जें बाणांचें छत करून सोडलें, त्यांतून सूर्यकिरणांचा व वायूचाही शिरकाव भूमितलावर होईना. कर्णार्जुन शरसंधानानें पूर्णपणें व्याप्त झाले होते. तेव्हां तें शरपटल दूर करून आपल्या मुलांसंबधीं कांहीं बातमी काढावी, म्हणून सूर्यानें आपले कर(=हस्त, किंवा किरण) पुढें केले, व इंद्रानें वायुरूप दूत त्या कामगिरीवर धाडिला. परंतु त्या दोघांचाही शिरकाव शरांच्या त्या दाट आवरणांत झाला नाहीं—असा भाव. **संबंधातिशयोक्ति** अलंकार. ६. केलेलें आहे घरटें ज्यावर, अशा वृक्षास. ही **उपमा** चांगली आहे. ७. अन्वयः—[जणुं] अहि (सर्प) धावुनीं डास (चावा) घेति [असे] ते शर भासति. ही **उत्प्रेक्षा** मजेदार आहे.

कर्णें निष्फळ करितां यतिनें ललनाकटाक्षसे बाण, ।
आग्नेय अस्त्र योजी पार्थ तयाचे हरावया प्राण. ॥ ५
दावानळें जसें वन, अग्न्यस्त्रें सर्व सैन्य होरपळे, ।
जो तो भट माघारा पाहुनि अस्त्रप्रताप घोर पळे. ॥ ६
जाणों न दग्धुकाम, प्रेमें तेजस्विगुरुसुतास रणीं ।
आलिंगी अग्नि, सदा दे कर ज्या तम हरावया तरणी. ॥ ७
मेघीं झाल्या अंकापासुनि पतनें परिभ्रमें रुसल्या, ।

---

१. अन्वयः—यतिनें (योग्यानें) ललनाकटाक्षसे (तरुण विलासवती स्त्रीच्या नेत्रकटाक्षांप्रमाणें) कर्णें बाण निष्फळ करितां (केले असतां), तयाचे (कर्णाचे) प्राण हरावया पार्थ आग्नेय अस्त्र योजी. ज्याप्रमाणें शुकासारख्या तपोधनांवर तरुणींच्या नेत्रकटाक्षांचा कांहींच परिणाम होत नाहीं, त्याप्रमाणें अर्जुनानें कर्णावर सोडिलेले बाण निष्फळ ठरले—असा भाव. २. भाजून निघे. ३. योद्धा. ४. अग्न्यस्त्राचा प्रभाव, तडाखा. ५. भयंकर. ६. सार्थान्वयः—तम हरावया (अंधकाराचा नाश करण्याकरितां) तरणी (सूर्य) ज्या (अग्नीला) सदा कर (तेजःकिरण) दे, [तो] अग्नि दग्धुकाम न (जाळण्याची इच्छा करणारा नव्हता). [तर तो] जाणों (जणूं काय) तेजस्वि-गुरुसुतास (तेजस्व्यांमध्यें श्रेष्ठ जो सूर्य, त्याच्या पुत्रातें, कर्णातें) रणीं (युद्धाचे वेळीं) प्रेमें आलिंगी (आलिंगन देता झाला). येथें **काव्यलिंग** आणि **उत्प्रेक्षा** हे अलंकार. कृतज्ञतेमुळें आपली ज्वलनप्रवृत्ति अग्नीनें एके बाजूस ठेविली. कारण **कर्ण** हा आपल्या उपकारकर्त्या **सूर्या**चा पुत्र होता, आणि प्रेमातिशयामुळें त्या **कर्णा**स अग्नीनें जणूं कवटाळिलें. ह्या ठिकाणीं अग्न्यस्त्राचा प्रभाव **कर्णा**वर फारसा झाला नाहीं. ही गोष्ट मोठ्या अर्थगांभीर्यानें **पंतां**नीं दर्शविली आहे. अग्नीमध्यें असणारें तेज सवितृदत्त आहे. हें तेज सूर्य दररोज अस्तास जाण्याच्या वेळीं अग्नीस देतो—अशी समजूत आहे. (रघुवंश सर्ग ४ श्लोक १ पहा. 'दिनान्ते निहितं तेजः सवित्रेव हुताशनः.') ७. येथें 'कर' शब्दावर **श्लेष** आहे. कर=किरण, (पक्षीं) हात. कर दे= हात देई, साहाय्य करी. ८. सार्थान्वयः—अंकापासुनि पतनें (मांडीवरून दूर झाल्यामुळें) [व] परिभ्रमें (भटकावयास लागल्यामुळें) मेघीं (मेघाचे ठायीं) रुसल्या झाल्या (रुष्ट झालेल्या, रुसलेल्या) चपला चि (विद्युल्लताच अशा) त्या (अग्निज्वाला) अनुरूपोदारा (आपल्यास योग्य व उदार अशा) धैर्यमेरुस (धैर्याचा मेरुपर्वत त्यास, अपार धैर्यवानास, अर्थात् कर्णास) आलिंगिति. ह्या गीतींतील **रूपक** फारच बहारीचें आहे. मेघ हा बाप, मेरु हा पति, चपला ही कन्या, अशी कल्पना करून हें वर्णन केलेलें आहे. अंकापासुनि पतनें, म्हणजे अर्थात् उपवर झाल्या-मुळें बापानें मांडीवर न घेतल्यामुळें, परिभ्रमणें म्हणजे योग्य पति मिळावा म्हणून भटकण्यानें, धैर्यमेरु अर्थात् जो आपणास कधींही सोडणार नाहीं असा, अनुरूपोदार म्हणजे योग्य व थोर; (पक्षीं, तेजस्वी म्हणून योग्य व उदार, अर्थात् आपल्या पत्नीच्या सर्व हौशी पुरविण्यास तत्पर असा). आलिंगिती=वरित्या झाल्या; पक्षीं, व्यापून टाकित्या झाल्या. हें **श्लेषगर्भ** **रूपक** आहे.

आलिंगिति अनुरूपोदारा चपला चि धैर्यमेरुस त्या. ॥ ८
साक्षात् प्रलयज्वलनज्वालाहीं[1] कवळिला चि नग मेरू, ।
ऐसा कर्ण गमे, मग अन्य जन तयांत काय न गमे रू? ॥ ९
कर्ण महात्मा शमवी[2] योजुनि वरुणास्त्र आश्रयाशास्त्र,[3] ।
संपादिलें[4] श्रमें जें व्यसनीं देतें चि आश्रया शास्त्र. ॥ १०
जो[5] जन या संसारीं दुःसहतापत्रयें जळे, शास्त्रें ।
अध्यात्में गुरुलब्धें जेंवि निवे, कर्ण त्या जळेशास्त्रें. ॥ ११

मेघ हे विजांचे पति अशी कल्पना करून पुढीलप्रमाणें अर्थ करावयास हरकत नाहीं:–मेघांच्या मांडीवरून खालीं घसरल्यामुळें व त्यांच्या [वायुनिर्मित] परिभ्रमणामुळें त्यांच्यावर रुसलेल्या विजा (ह्या देखील जात्या चपला–चंचलाच असल्यामुळें) धीर (स्थैर्याविषयीं प्रसिद्ध), आपल्या अंगकांतीशीं जुळणाऱ्या व अत्यंत उदार अशा त्या मेरुपर्वतास आलिंगित्या झाल्या. येथें अस्थिर प्रकृतीचे पति जे मेघ, त्यांना त्यांच्या स्त्रिया ज्या विजा, त्या कंटाळल्या व म्हणून त्या अढळ अशा मेरुपर्वताला आलिंगन देत आहेत, असें वर्णिलें आहे. मेरुपर्वत सोन्याचा असल्यामुळें त्याची कांति विजांप्रमाणेंच पिंवळी असून, तो औदार्य व स्थैर्य यांविषयीं प्रसिद्ध आहे. येथें 'चपला' शब्दावर **श्लेष** आहे. चपला=(१) विजा, (२) चंचल बुद्धीच्या स्त्रिया. ज्या स्त्रिया स्थिर बुद्धीच्या असतील, त्या चंचल पतीलाही न सोडतां, त्याच्याजवळच अढळ पातिव्रत्यानें राहातात, असें ह्या गीतींत ध्वनित केलें आहे. ह्या गीतीचा इत्यर्थ:–अग्न्यस्त्राच्या ज्वाळांनीं न डगमगणारा वीर जो कर्ण, त्याचा देह त्यांनीं व्याप्त केला.

१. अन्वय:–प्रलयज्वलनज्वालाहीं (प्रलयकालीन अग्नीच्या ज्वालांनीं) साक्षात् (प्रत्यक्ष) मेरू नग (पर्वत) कवळिला चि (व्याप्त केलाच); ऐसा तयांत (अर्जुनानें सोडिलेल्या अग्न्यस्त्राच्या ज्वालांत) कर्ण गमे (भासला), मग अन्य जन (इतर लोक) काय रू (कापूस) न गमे ?–अर्थात् गमे. कर्णासारख्या असामान्य वीराची स्थिति त्या अग्न्यस्त्रामुळें अशी झाली, मग सामान्य जन त्या अस्त्राच्या ज्वालांमध्यें कापसाप्रमाणें निःसंशय भुरभुर जळून जातील, असें वाटणार नाहीं काय? हा **प्रश्नालंकार.** २. शांत करी. ३. आश्रयाश+अस्त्र=अग्न्यस्त्र. ४. अन्वय:–श्रमें जें शास्त्र संपादिलें, [तें] व्यसनीं आश्रया देतें चि (थारा देतें; उपयोगीं पडतें). हा **अर्थान्तरन्यासा**लंकार. हें अर्ध सुभाषितरूप आहे. ५. अन्वय:–या संसारीं (इहलोकीं) जो जन दुःसहतापत्रयें (दुर्निवार अशा तीन प्रकारच्या म्हणजे १. आधिभौतिक, २. आधिदैविक व ३. आध्यात्मिक ह्या तीन तापांनीं) जळे (भाजतो, होरपळतो) [तो] गुरुलब्धें अध्यात्में शास्त्रें (गुरूनें उपदेशिलेल्या आत्मविद्येच्या प्रभावानें) जेंवि निवे (समाधान पावतो), [तेंवि] कर्ण त्या (अर्थात् स्वतः योजिलेल्या) जळेशास्त्रें (जळ+ईश+अस्त्रें=वरुणास्त्रानें) [निवे]. संसारांत त्रास झाला असतां वेदान्तशास्त्रानें समाधान प्राप्त होतें, हें बहुश्रुत वाचकांस जास्त उलगडून सांगण्याची जरूर नाहीं. गुरुमुखाशिवाय मात्र विद्या प्राप्त होणें शक्य नाहीं, हेंही पण पंतांनीं येथें मोठ्या खुबीनें सांगितलें आहे.

पूर्वीं[1] जसि कृष्णावरि शक्रें, तसि जिष्णुवरि महावृष्टि, ।
कुपितें कर्णें केली,[2] कल्पांतीं जेंवि घाबरी सृष्टि. ॥ १२
गगन व्यापुनि गर्जति घनघन[3] निर्मिति घना[4] चि आंधारा, ।
[5]देति न कंपा शंपा, परि देती धीरनायकां धारा. ॥ १३
चोळुनि कर कोपानें भीम म्हणे, 'अर्जुना ! अहाहा ! रे ! ।
[6]व्यर्थ म्हणत होतों मीं कीं मदनुज संगरीं न हा हारे ! ॥ १४
कर्ण तुझ्या अस्त्रांतें, सर्पांतें जेंवि गरुड, खंडितसे, ।
रिपुशर विजयीं[7] गमती, द्वैतीं[8] अद्वैतवादि पंडितसे.' ॥ १५
[9]कृष्ण म्हणे, 'शंभूसीं ज्या धैर्यें भांडलासि तें विजया ! ।
झालें काय ? न जोडिसि कां कर्णासीं भिडोनि तेंवि जया ? ॥ १६
मारुनि कर्णातें दे धर्मासि धरा,[10] तुझा चि हो[11] वांटा; ।
[12]त्वां चि सुहृद्धृदयींचा काढावा कुशलसत्तमें कांटा.' ॥ १७

---

१. भागवत, दशमस्कंध अध्याय २८ येथें हा कथाभाग वर्णिला आहे. (मागें पृष्ठ ९९ टीप १६ पहा). २. अन्वयः-[व] जेंवि कल्पांतीं (प्रलयकालीं) [तेंवि आतां] सृष्टि (अखिल जगती) घाबरी (केली). सर्व जग हालवून सोडलें-असा भाव. ३. निबिड मेघ. ४. दाट. ५. अन्वयः-धीरनायकां (सुधीर योद्धयांस) शंपा (विजा) कंपा न देति, परि धारा (जलधारा, पक्षीं शरधारा) [कंपा] देती. **विरोधाभास.** सामान्यतः माणसें विजेमुळें घाबरून जातात, व पर्जन्यधारेचें त्यांस कांहींच वाटत नाहीं. विजांनीं ज्यांस घाबरविलें नाहीं, ते महायोद्धे होते, पण ते धारांस भ्याले; हा विरोध. धारा=शरधारा असा अर्थ असल्यामुळें हा विरोध नाहींसा होतो. ६. अन्वयः-हा मदनुज (माझा पाठचा भाऊ, अर्जुन) संगरीं न हारे (पराभव पावत नाहीं) [असें] मीं व्यर्थ म्हणत होतों कीं. ७. अर्जुनाच्या ठिकाणीं. 'विजयी' असा पाठ पंतलिखित प्रतींत आहे, पण 'विजयीं' असाच मूळपाठ असावा. कारण, तोच अर्थास अनुकूल आहे. ८. अद्वैतवादी पंडित द्वैतवाद्यांवर जसा जय मिळवितात, तसे. ९. अन्वयः-कृष्ण म्हणे, '**वि**जया ! (अर्जुना !) ज्या धैर्यें शंभूसीं भांडलासि (युद्ध केलेंस) तें (धैर्य) काय झालें ? कर्णासीं भिडोनि (लगटीचा सामना करून) तेंवि (त्याप्रमाणें अर्थात् शंभूबरोबरच्या) जया (यशास) कां न जोडिसि ? (यश कां मिळवीत नाहींस ?). किरातरूपी शंकराशी अर्जुनाचें जें युद्ध झालें, त्यास उद्देशून हें भाषण आहे. (पंतकृत वनपर्व, अध्याय ३ पहा). १०. पृथ्वी. ११. **कर्ण. कर्ण** तुझ्याच हातून मरावयाचा आहे-असा भाव. १२. अन्वयः-कुशलसत्तमें (निपुणश्रेष्ठानें) त्वां चि सुहृद्धृदयींचा कांटा काढावा. तूंच मित्रांच्या अंतर्यामांत सलणारें दुःख दूर करावेंस. हा **लोकोक्ति** अलंकार.

भीमाच्युतोपदेशें आला अरिचा उदंड राग मना, ।
सरला नारायणसख नर [1]आत्मधराभरापहागमना. ॥ १८
योजी ब्रह्मास्त्रातें[2] तों खंडी[3] कर्ण त्यासि; तें भीमा ।
[4]स्वशिरःखंडन भासे, लंघी [5]तत्क्षोभवारिधी सीमा. ॥ १९
कर चोळुनि भीम म्हणे, 'रे जिष्णो! [6]रिपुपयोदवायो! जीं ।
जाणसि अस्त्रें त्यांतुनि [7]भलतें अरिच्या [8]पराभवा योजीं.' ॥ २०
भीमाज्ञेनें योजी सत्वर शस्त्रासि तो किरीटि कवी, ।
[9]अक्षत दंष्ट्रा असतां कंदासि न कोपला किरी टिकवी. ॥ २१
[10]अमिताशुग [11]अस्त्रबळें सोडुनियां [12]कर्णरथतिरोधानें, ।
कौरवबळासि भंगी; [13]जय कैंचा साधुजनविरोधानें? ॥ २२
कर्ण हि तैसें चि करी, सोडी बहु बाण, जेंवि घन तोया, ।
भीमार्जुनकृष्णांतें ताडी, [14]मानी कृतांत जन तों या. ॥ २३
भीमाच्युतांसि [15]सक्षत पाहुनि बहु जिष्णु तापला. काय ।

१. नारायणसख [जो] नर (अर्जुन) [तो] आत्मधराभरापहागमना (आत्म+धरा+भर+अपह+आगमना=पृथ्वीचा भार दूर करण्याकरितां झालेला आपला जो अवतार, त्यातें) सरल, (त्याचें त्याला सरण झालें). युगायुगांचे ठिकाणीं जेव्हां पृथ्वी त्रस्त होते, तेव्हां परमेश्वर अवतार घेतो व पीडा दूर करतो, त्याप्रमाणें द्वापारयुगामध्यें नर व नारायण हे अवतार झाले, व तेच पुनश्च अर्जुन व श्रीकृष्ण झाले, ही कथा अनुसंधेय आहे. (भगवद्गीता अध्याय ४ श्लोक ८ पहा. 'धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे'). २. ब्रह्मास्त्रास. ३. अस्त्रखंडन. ४. स्वतःचा शिरच्छेदच. ५. त्याच्या क्षोभरूप समुद्रानें मर्यादा सोडिली. अर्थात् तो अत्यंत क्रुद्ध झाला. **रूपका**लंकार. ६. शत्रुरूप मेघास वायूसारख्या! ७. वाटेल तें, कोणतेंही. ८. पराभवार्थ. ९. अन्वयः—अक्षत (शाबूद) दंष्ट्रा (सुळे दांत) असतां कोपला (कोपलेला) किरी (रानडुकर) कंदासि (झाडांच्या कांद्यांना) न टिकवी (राहूं देत नाहीं). **दृष्टांत.** १०. अमित+आशुग=पुष्कळ व सत्वर जाणारीं. ११. अस्त्रांच्या बळानें, अस्त्रानें अभिमंत्रित केलेले असे अनेक बाण सोडून. निरनिराळ्या अस्त्रांच्या मंत्रांचे प्रयोग बाणांवर केले, म्हणजे ते बाण अधिक प्रभावी होऊन, त्या त्या अस्त्रांचें बळ त्यांच्यांत येतें, अशी समजूत आहे. (पुढें अध्याय ४८।३० व ५४; अध्याय ४९।४६ पहा.) १२. कर्णाच्या रथाच्या आच्छादनानें, अर्थात् कर्णरथ झांकून टाकून. तिरोधान=आच्छादन करण्याचें साधन, झांकण. १३. हा भाग सुभाषितरूप आहे. १४. अन्वयः—तों (ह्याप्रमाणें बाणांनीं कृष्ण, भीम व अर्जुन यांचें ताडन करतांच) जन (लोक; प्रेक्षक व इतर वीरसमूह) या (कर्णास) कृतांत (यम) मानी. अर्थात् लोकांस हा **कर्ण** यमासारखा भासला—असा भाव. 'तो या' असा पाठभेद. १५. जखम झालेले.

[1]गुरुहुनि सख्याहुनि प्रिय सुजना? तैसा न आपला काय. ॥ २४
एके चि शरें केतु[2] च्छेदुनि, शल्यासि पीडुनी चहुंनीं,[3] ।
विंधुनि[4] वृषासि तिहिनीं,[5] वधिला नृपसुत[6] सभापती बहुनीं. ॥ २५
सत्तावीस शर पुन्हां मारुनि वैकर्तनासि,[7] च्यार शतें ।
वधिलीं मत्तगजांचीं; रिपुनीं ही वर्णिलें तदा यश तें. ॥ २६
मथिले सहस्र सादी,[8] आठ सहस्र प्रदान[9] कवि पंत्ति,[10] ।
पार्थें वधिले, होऊं दिधली मरणांत लेश न विपत्ति.[11] ॥ २७
कर्ण हि मर्दी पांडवपांचाळबळें; रणीं[12] दिशा भुललीं, ।
तीं मृतशेषें दिसलीं पळसांचीं काननें जसीं फुललीं. ॥ २८
तों मंत्रौषधिवीर्यें[13] होऊनि विशल्य[14] धर्म राजमणी[15] ।
आला, गगनीं जैसा पूर्ण शरत्पर्वरात्रिनाथ,[16] रणीं. ॥ २९
धर्म स्वजनांच्या दे मोरांच्या हर्ष जेंवि जलद मना, ।
करिती पांचाळयुवे उत्साहें वृषसहायबलदमना.[17] ॥ ३०

---

१. पूर्वार्धातील 'काय'शब्दासह उत्तरार्धान्वयार्थः–गुरुहुनि [व] सख्याहुनि सुजना [अधिक] प्रिय [असें] काय [आहे]? तैसा (गुरु व सखा यांसारखा) आपला (स्वतःचा) काय (देह) [ही] न. येथें गुरु=वडील, भीम; व सखा=कृष्ण–असा अर्थ. २. ध्वज. ३. चार बाणांनीं. ४. जखमा करून. ५. तीन बाणांनीं. ६. दुर्योधन राजाचा पुत्र. ७. कर्णाला. ८. घोडेस्वार. ९. उच्छेद करण्यांत पटाईत. (प्रदान=दान करणें, देणें). 'प्रधान कवि' असें पाठांतर. प्रधान=मुख्य, शेलके. १०. पायदळ. ११. क्लेश. मरणसमयीं त्यांस तिळमात्रही यातना होऊं दिल्या नाहींत. अर्थात् एक घाव दोन तुकडे अशा रीतीनें मारले–असा भाव. १२. सार्थान्वयः–रणीं दिशा भुललीं (ज्यांना रणांगणांत कोठें जावें हें कळेना अशीं) तीं मृतशेषें (जिवंत राहिलेलीं सैन्यें) जसीं पळसांचीं काननें फुललीं [तशीं] दिसलीं. **उत्प्रेक्षा.** पळसाचीं फुलें लालभडक असतात, व ह्या सैनिकांस कर्णहस्तें अत्यंत जखमा होऊन ते रक्तानें न्हाले होते, तेव्हां ह्या सक्षत वीरांमुळें तें ठिकाण जणूं काय फुललेल्या पळसांच्या झाडांनींच व्याप्त आहे, असें भासलें. १३. मंत्र व वनस्पति ह्यांच्या प्रभावानें. विशल्य होण्याकरितां मंत्राचा उपयोग होत असे. निवडुंगाचे कांटे अंगांत पुष्कळसे शिरले असतां लोणी मंत्रून देतात व तें लोणी लाविल्यानें कांटे निघतात. हा समज अद्यापिही साताराप्रांतीं दृष्टीस पडतो. १४. निघालेले आहेत शरीरांतील बाण ज्याच्या, असा. १५. राजश्रेष्ठ. १६. शरत्+पर्व+रात्रिनाथ=शरदृतूंतील पौर्णिमेचा चंद्र. शरदृतूंतील चांदिणें स्फटिकासारखें अत्यंत शुभ्र असतें, त्याप्रमाणें धर्मराज ताजातवाना होऊन आला–असा भाव. १७. कर्णाला मदत करणाऱ्या सैन्यांचा पाडाव. या गीतींत प्रथमार्ध हें द्वितीयार्धाचें कारण असल्यामुळें **काव्यलिंग.**

करिती अत्युत्साहें युद्ध [1]त्रिदशग्रहेशसंभव ते. ।
कौरवपांडवसैनिक पाहति [2]ठाकोनियां [3]तयां भवते. ॥ ३१
भेदी [4]अयुत शरानीं भीमाला, [5]शौरिला हि साठानीं, ।
ताडी धनंजयाला मर्मस्थानीं च कर्ण आठानीं. ॥ ३२
आच्छादुनि बाणानीं पार्थरथा, सोमकांसि दे वृष [6]भें, ।
[7]पांचाळकटक तेणें विदारिलें, [8]तट जसें महावृषभें. ॥ ३३
[9]पार्थसहाय महाबळ जे युद्धीं [10]धांवले महाशूर, ।
सिंहें श्वान तसे ते कर्णें पांचाळ पळविले दूर. ॥ ३४
दुर्योधनवीरानीं [11]सेनापतिभुजबळप्रकर्षानें ।
निज जय जाणोनि, तदा केले बहु [12]सिंहनाद हर्षानें. ॥ ३५
अर्जुन तेव्हां कोपे [13]क्षालाया [13]शत्रुदारसिंदूर, ।
[14]न्हाणाया [15]निजविजयप्रभवाश्रुकरूनि [16]कुलपतींदूर. ॥ ३६
वातें जेंवि [17]कसपटें, कुरुकटकें दूर उडविलीं पार्थें, ।
[18]भुजलीलासंपादितदुर्घटजंभारिमुखनिर्लिपार्थें. ॥ ३७

---

१. त्रिदश+ग्रह+ईश+संभव=देव आणि गुरुशुक्रादि ग्रह, ह्यांचे अधिपति. अर्थात् देवाधिपति इंद्र आणि ग्रहाधिपति सूर्य; ह्यांच्यापासून जनन झालें आहे ज्यांचें, असे. अर्थात् अर्जुन व कर्ण. २. धीरानें उभे राहून. ३. त्यांच्या सभोंवतीं. ४. दहा हजार बाणांनीं. ५. हे पांडवपक्षीय वीर होते. ६. भीति. ७. पांचाळसैन्याची फळी फोडली. ८. नदीच्या कांठच्या बांधाशीं माजलेला पोळ टकरा मारमारून झुंज खेळत असतो, हें सर्वांच्या माहितीचेंच आहे. 'तट' शब्द पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आहे. ९. अर्जुनाला मदत करणारे. १०. शत्रूवर चालून गेले. ११. कर्णाच्या बाहुबळाच्या उत्कर्षानें. १२. जयघोषाची गर्जना. १३. शत्रूच्या स्त्रियांच्या भांगांतील शेंदूर [दुःखाश्रूंनीं] क्षाळाया=त्यांना पतिमरणाचें दुःख द्याया. कुंकुमाप्रमाणें पूर्वी भालदेशीं सौभाग्यवती स्त्रिया शेंदुराचा उपयोग करीत असत. ('तैसाचि मल्ललाटीं साध्वी सिंदूरतिलक जो लावी'—पंतकृत सीतारामायण.) येथें पर्यायोक्त अलंकार आहे. १४. भिजवून टाकण्याकरितां. १५. आपल्या यशामुळें उत्पन्न होणाऱ्या आसवांनीं (आनंदाश्रूंनीं). १६. कुलपति धर्म हाच कोणी चंद्र, त्याचें उर; किंवा कुलाधिपति (कारण कौरव हे सोमवंशीय होते) चंद्राचें उर. अर्जुनाच्या प्रभावानें रिपुस्त्रियांच्या डोळ्यांत दुःखाश्रु दाटून ते त्यांचे कुंकुमतिलक धुणार, पण त्याच प्रभावानें चंद्राच्या डोळ्यांत आनंदाश्रु येऊन ते चंद्राच्या उरावरील कलंक धुणार ! १७. केरकचरा. १८. भुजलीला+संपादित+दुर्घट+जंभारिमुख+निर्लिप+अर्थ=हस्तकौशल्यानें (अर्थात् बाहुप्रतापानें) संपादिलें आहे इंद्रादिदेवांचें दुर्घट इच्छित ज्यानें. हें 'पार्थें' ह्याचें

जी बाणवृष्टि केली पाडी तत्काळ अंधकारा ती, ।
[1]आम्हीं कां न म्हणावें 'धन्य' म्हणे [2]ज्यासि [3]अंधकाराती ? ॥ ३८
गगनाकडे पहातां झाली बहुतां जनांसि [4]अभ्रमती, ।
तेव्हां पक्षी [5]बाणव्यासाकाशोदरांत [6]न भ्रमती. ॥ ३९
[7]गगनस्थभूतसंघें मंद [8]सुरभि शीत [9]त्यांउपरि वारा, ।
सोडियला; [10]ते त्याला सेव्य, स्वामी जसे सु-परिवारा. ॥ ४०
पार्थें आधीं द्वादश शर मग कर्णासि मारिले सप्त, ।
न्हाला रक्तें, झाला [11]दंडाहत [12]सर्पपति तसा तप्त. ॥ ४१
[13]वृष तीं बाणीं पार्था भेदुनियां, वृष्णिनायकाला ही ।
भेदाया सोडी शर हयसेनप्रहित पांच [14]कालाही. ॥ ४२

---

विशेषण. अर्जुनाच्या अतुल आणि भव्य प्रतापाला साजेसेंच हें प्रौढार्थभारसंपन्न विशेषण आहे. जंभारि=इंद्र; निर्लिप=देव; अर्थ=इष्ट वस्तु.

१. संजय युद्धवार्ता धृतराष्ट्रास निवेदन करीत आहे, हा प्रसंग लक्षांत ठेवावा. २. अर्जुनास. ३. अंधकासुराचा शत्रु, अर्थात् शंकर. येथें अर्थापत्ति अलंकार. ४. मेघ उत्पन्न झाल्याची बुद्धि. भ्रांतिमान् अलंकार. ५. शरांनीं भरून गेलेल्या नभोगर्भांत. ६. न भ्रमती= उडतनासे झाले. ७. स्वर्गस्थ अप्सरादिकांनीं. भूत=(१) जीव, प्राणी; (२) उपदेवविशेष, (३) पिशाच, (४) राक्षस–इत्यादि अर्थ आहेत. ८. सुवासिक, संतोषप्रद. ९. युद्ध करणाऱ्यांवर (कर्णार्जुनांवर). १०. अन्वयः–जसे सुपरिवारा (चांगल्या सेवकसमूहास) स्वामी, [तसे] ते (युद्धकर्ते) त्याला (भूतसंघाला) सेव्य (चाकरी करण्यास योग्य). 'सु' हा उपसर्ग लावून जन-व्यवहार पंतांनीं थोड्यांत मोठ्या मार्मिकपणें व्यक्त केला आहे. ११. मुसळण्याच्या रवीस गुंडाळलेला. १२. शेष. येथें समुद्रमंथनकथेचा संदर्भ आहे. त्या वेळीं शेषाची दोरी केली असून तोंडाकडील भाग दानवांनीं हातीं धरिला होता, व शेंपटाकडील देवांनीं धरिला होता. अशा स्थितींत शेषाचें शेंपटापासून फणेपर्यंत लाल होणें यथार्थ होय. ही कथा 'न्हाला' ह्या शब्दांतील 'नखशिखांत भिजणें' ह्या अर्थाशीं जुळण्याकरितां घेणें जरूर आहे. एरवीं 'दंडाहत=काठीचा घाव लागलेला' आणि 'सर्पपति=मोठा सर्प' असा अर्थ घेतां येईल. १३. अन्वयः–पार्था (अर्जुनाला) तीं बाणीं (तीन बाणांनीं) भेदुनियां (विदारुनियां), वृष (कर्ण), वृष्णिनायकालाही (श्रीकृष्णालाही) भेदाया (मारण्याकरितां) हयसेनप्रहित (अश्वसेनानें प्रेरिलेले) पांच कालाही शर सोडी. संस्कृतांत 'महाहयः तक्षकपुत्रपक्षाः' असें आहे. तक्षक-नामक नाग व कद्रू यांचा पुत्र हयसेन अथवा अश्वसेन. खांडववन जळत असतांना कद्रू याला तोंडांत धरून जात असतां तिला अर्जुनानें मारिलें होतें. (पुढें गीति ५९ ते ७८ पहा). १४. कृष्णसर्परूप.

ते सर्पबाण वेगें [1]पुरुषोत्तमकवचकाय [2]भेदूनीं, ।
[3]पाताळनदीमध्यें न्हाले [4]घटिका हि होउं नेदूनीं. ॥ ४३
त्यां पार्थ दशशरानीं खंडी, करि पंधरा चि ते तुकडे, ।
राहति कसे [6]अखंडित, जे [7]फिरले [8]पक्षिनाथकेतुकडे ? ॥ ४४
सक्षत [9]रुधिरार्द्रवपु प्रभुचें पाहोनि पार्थ तो चित्तीं, ।
क्षोभे, बहु; [10]धनलुब्ध [11]क्षति होतां जेंवि आपुल्या वित्तीं. ॥ ४५
[12]अर्जुन झाला रविसुतमर्मीं वरबाणपंक्ति शिरकविता, ।
ती कांपवी तयाचें, रसिकाचें जेंवि काय शिर कविता. ॥ ४६
दैवानें [13]धैर्यकरें सांवरिला प्राणसंकटीं कर्ण, ।
नाहीं तरि गळतें वपु, वृक्षाचें [14]वातहत जसें पर्ण. ॥ ४७

---

१. श्रीकृष्णाचें चिलखत व शरीर. २. फोडून. ३. पातालगंगेमध्यें. ४. एक घटकाभर सुद्धां वेळ न जाऊं देतां (नेदूनीं). ह्यावरून बाणांचा वेग व गति चांगली व्यक्त होते. **अतिशयोक्ति** अलंकार. ५. बाणांस. ६. न भग्न होतां, सबंध. ७. वळले, चाल करून आले. ८. गरुडध्वजाकडे, श्रीकृष्णाकडे. जो परमेश्वरावर बिथरला, त्याचा नाश न होतां कसा राहील? हें अर्थ सुभाषितरूप आहे. किंवा गरुड हा सर्पशत्रु. तेव्हां गरुडध्वजावर आल्यामुळें सर्पबाणांचा नाश झाल्याशिवाय कसा राहील? हा अर्थ घेऊन, विशेष्यपद साभिप्राय असल्यामुळें **परिकरांकुरा**लंकार. ९. रक्तानें ओलें झालेलें शरीर. १०. कंजूष, लोभी. ११. हानि. १२. अन्वयः—रविसुतमर्मीं (सूर्यपुत्र जो कर्ण, त्याच्या शरीराच्या नाजुक भागांत) अर्जुन वरबाणपंक्ति (उत्कृष्ट अशा बाणांची रांग) शिरकविता झाला (खोंचिता झाला). ती (बाणपंक्ति) जेंवि कविता रसिकाचें [तेंवि] तयाचें (कर्णाचें) शिर (मस्तक) [व] काय (शरीर) कांपवी (हालविती झाली). हा भयाचा परिणाम नसून केवळ पार्थाच्या अंगच्या युद्धकौशल्यास कर्णानें आनंदानें मान डोलविली. गुणीच गुणांची किंमत करितो. गीतीच्या पूर्वार्धांत सर्व मर्मस्थानीं शर लागले, असें सांगितलें आहे. तेव्हां अशा स्थितींत केवळ शिरच हालूं लागलें, असें म्हणण्यापेक्षां सर्व शरीर मस्तकासह हाललें, असा अर्थ घेणें युक्त होईल. कविता जरी उत्तम असली, तरी रसिकांसच काय तो तिचेमुळें आनंद होतो, हें पंतांनीं प्रस्तुत दाखला घेऊन मोठ्या खुबीनें व्यक्त केलें आहे. पंतांच्या काव्यांत असेंच वर्णन अन्य ठिकाणीं आढळतें:— (१) संधानशक्ति माझी कांपवि तद्धृदय, जेंवि शिर कविता. । (उद्योगपर्व, अध्याय १३।७७); (२) ती त्याचें कांपवि, जसि आणुनि नेत्रांसि तोय, शिर, कविता. । (द्रोणपर्व, अध्याय १७।७७); (३) त्याची मिठी, सकळ बळ कंपित करि, जेंवि तज्ज्ञशिर कविता. । (द्रोणपर्व, अध्याय २१।७९). १३. धैर्यरूपी हात देऊन. १४. वाऱ्याच्या सपाट्यांत सांपडलेलें. पर्ण=पान.

जिष्णु वधी कर्णाच्या [1]पार्श्वपुरःपृष्ठचक्रगोपांतें, ।
शरधारानीं पीडी कुरुवीरां, जेंवि शक्र [2]गोपांतें. ॥ ४८
पार्थ क्षणांत तेव्हां [3]विंशतिशतवीरनायकां मारी, ।
पळतां कुरुभट म्हणती, 'यापरिस हि उग्र काय [4]कामारी ?' ॥ ४९
बहु मेले, बहु गेले, जन्हि झालें [5]शून्य [6]युद्धचत्वर तें, ।
[7]नाहीं गणिलें कांहीं श्रीमत्कर्णें प्रशस्तसत्वरतें. ॥ ५०
कौरव फिरोनि आले; अधीर [8]वृषविरह ते [9]सहायास, ।
[10]शरपातस्थळ सोडुनि दूर उभे ठाकले [11]पहायास. ॥ ५१
[12]कर्णवधार्थें पार्थें तेव्हां [13]अत्युग्र योजिलें अस्त्र, ।
रवि झांकिला शरानीं; भीतावरि [14]काय घातलें वस्त्र ! ॥ ५२
[15]तैं कर्ण मनीं चिंती गुरुला, हरिला जसा करीश मनीं, ।
आथर्वणें, मुदित निजजन, विजयास्त्राचिया, करी, शमनीं. ॥ ५३

---

१. कर्णाच्या बाजूस, मागें व पुढें वर्तुलाकार व्यूहरचनेंत राहून संरक्षण करणाऱ्या वीरांस किंवा चक्रगोपांतें=रथचक्रांचें संरक्षण करणाऱ्यांस. २. कथाभागास्तव गीति १२ वी पहा. ३. दोन हजार वीरश्रेष्ठांस. ४. शंकर. हा **व्यतिरेक** अलंकार किंवा **प्रश्नालंकार.** ५. शून्य=शुष्क, निर्जन. ६. रणांगण. ७. अन्वयः-प्रशस्त-सत्व-रतें (उत्कृष्ट प्रभावाचे ठायीं विलीन असणाऱ्यानें, अर्थात् उत्कृष्टप्रभाववान् अशानें) श्रीमत्कर्णें कांहीं गणिलें नाहीं (कशाचीच पर्वा केली नाहीं). तो एकटाच लढत होता—असा भाव. ८. कर्णवियोग. ९. सोसण्यास. १०. बाण जेथपर्यंत येऊन पडतील ती जागा, बाणाचा टप्पा, युद्धाच्या गर्दीचें ठिकाण. ११. ह्याचें कर्णार्जुनयुद्धचमत्कार हें अध्याहृत कर्म. १२. कर्णवध आहे हेतु ज्याचा, अशानें. हें 'पार्थें' ह्याचें विशेषण. १३. जाज्वल्य. १४. जणूं काय. **उत्प्रेक्षा.** मुलें भ्यालीं म्हणजे डोळ्यांवरून पांघरूण घेतात, ही प्रतीति सर्वांस आहेच. सूर्य हा कर्णपिता असल्यामुळें स्वसुत-हननाचें भय त्यास वाटणें हें साहजिक आहे, हें जाणून म्हणजे अर्थात् तो भ्याला आहे असें समजून जसें कांहीं त्याजवर शररूपी पांघरूण पार्थानें घातलें. पार्थबाणांनीं सूर्य आच्छादित झाला—असा भाव. १५. अन्वयः—तैं (तेव्हां) कर्ण गुरुला (परशुरामाला) मनीं चिंती (धांवा केला) जसा करीश (गजेंद्र) मनीं हरिला (श्रीकृष्णाला) [चिंती]. [आणि] आथर्वणें (अथर्वणवेदोक्त अस्त्रानें) विजयास्त्राचिया (अर्जुनाच्या अस्त्राच्या) शमनीं (शांत करून) निजजन (स्वपक्षीय लोकांतें) मुदित (आनंदित) करी (करिता झाला). अथर्ववेदाच्या जोरावर अर्जुनास्त्राची गति कुंठित करून तो स्वपक्षीयांस आनंद देता झाला—असा भाव. ह्या उपवेदांत म्हणजे अर्थात् 'आथर्व-णांत' जारण, मारण, उच्चाटण ह्या गोष्टी सांगितल्या आहेत. तेव्हां 'आथर्वणें' म्हणजे अर्थात् नीच मंत्राच्या द्वारें अर्जुनास्त्राची गति कर्णानें कुंठित केली—असा भाव.

जें[1] सोडी तें अशनिप्रभ[2], भीति ज्यांसि[3] सर्व; शस्त्रा त्या ।
शमवी वृष, न नरा, कीं तो कृष्णा रक्ष्य सर्वशस्त्रात्या. ॥ ५४
शिक्षोत्साहबळानें[4] कोणी कोणांसि[5] त्यांत आटेना[6]; ।
देवां विचक्षणांस[7] हि एक उणा एक अधिक वाटेना. ॥ ५५
योजिति[8] अस्त्रें शस्त्रें एकाहुनि एक अधिकबळ; होती ।
उभयरता विजयश्री, न टिके एकत्र एक पळ हो! ती. ॥ ५६
जेव्हां शरजाळानीं पाडिति दोघे हि अंधकारा ते, ।
भूतें म्हणति, 'अकाळीं प्रलय नसो, पाव[9] अंधकाराते[10] !' ॥ ५७
'साधु' म्हणति त्यां दोघां युद्धचमत्कार पाहतां अमर. ।
कीं नाहीं च कधीं ही त्यांहीं तैसा विलोकिला समर. ॥ ५८
खांडवदाहीं उदरीं[11] भरुनि जया[12] वांचवावया माता, ।
गगनपथें पळवी, तों पार्थ[13] करी हरुनि शिर तिच्या घाता. ॥ ५९
उगवाया[14] तें वैर स्वाहितवधदक्ष[15] तक्षकात्मज या ।

---

१. अन्वयार्थः–[अर्जुन] जें [शस्त्र] सोडी [व] ज्यासि (ज्यास) सर्व (सर्व लोक) भीति (भितात) तें अशनिप्रभ (विद्युल्लतेप्रमाणें भास्वर) [होतें]; त्या शस्त्रा **वृष** शमवी; **नरा** (अर्जुनातें) **न** [शमवी], कीं (कारण) सर्वशस्त्रात्या (सर्वशः+त्राता=सर्व, प्रकारांनीं संरक्षण करणाऱ्या) **कृष्णा** तो (अर्जुन, नर) रक्ष्य (रक्षण करण्यास योग्य) [होता]. २. वज्रासारखें किंवा विद्युल्लतेसारखें तेजस्वी. ३. 'भीति जयासि सर्व' असें पाठान्तर. ४. शिक्षा+उत्साह+बळानें= शस्त्राभ्यास, धमक व सामर्थ्य, ह्यांमुळें. (मागें अध्याय ४६ गीति ४ पहा). ५. 'कोणी कोणांसि' असें पाठान्तर. ६. हार जाईना. ७. शहाण्यांसही, सुज्ञांसही. 'देवा ! विचक्षणासहि' असें पाठान्तर. देवा !=राजा धृतराष्ट्रा ! ८. अन्वयः–एकाहुनि एक अधिकबळ (वरचढ) [अशीं] अस्त्रें [व] शस्त्रें [ते] योजिति; विजयश्री (जयलक्ष्मी) उभयरता (उभयतांवर म्हणजे अर्थात् कर्ण व अर्जुन ह्या दोघांवरही अनुरक्त) होती; हो ! (अहो !) ती (विजयश्री) एक पळ एकत्र न टिके (राहिली नाहीं). क्षणांत एक, व क्षणांत दुसरा विजयी होई–ही कल्पना पंतांनीं मोठ्या मार्मिकपणें वर्णिली आहे. **काव्यलिंगालंकार.** ९. प्रसन्न हो. १०. अंधकासुरशत्रो ! शंकरा ! शंकर हा भूतादिकांचा अंतक आहे. ११. उदरीं भरुनि=पोटाशीं धरून. 'धरुनि' असा पाठभेद. १२. ज्याला, तक्षकसुताला (अश्वसेनाला). १३. अन्वयः–तों (इतक्यांत) पार्थ शिर हरुनि (मस्तक उडवून) तिच्या (तक्षकस्त्रीच्या) घाता करी (नाश करिता झाला). १४. वैर उगवाया=सूड घेण्याकरितां, वैर साधण्याकरितां. १५. स्व+अहित+वध+दक्ष=आपल्या शत्रूच्या हननाविषयीं तत्पर. हें 'तक्षकात्मजा'चें विशेषण.

[1]कर्णाश्रयासि समयीं आला साधावयासि आत्मजया. ॥ ६०
आला होउनि [2]योगें शररूप [3]व्याळपाळ [4]दाव्यानें, ।
[5]ज्या लाभ हानि जेथें, नेतो बांधोनि काळ दाव्यानें. ॥ ६१
[6]तक्षकतनूज [7]तूणीं जेव्हां शिरला [8]तया चि समयांत, ।
[9]सुतवदनघर्म रवि [10]हरि पुसिति करें, [11]होय ताप सम यांत. ॥ ६२
[12]दिव्याप्सरा तयांतें सिंपिति शीतलसुगंधतोयांहीं, ।
[13]वीजिति [14]सुव्यजनांहीं; [15]वरिला सत्कार भव्य तो यांहीं. ॥ ६३
[16]आधिक्य प्रथम दिसे, [17]त्यांवरि त्या जिष्णुसीं दिसे समता, ।
[18]स्वोत्कर्ष मग क्षीण प्रतिपद कर्णासि जाहला गमता. ॥ ६४
[19]क्षतशतहत पतनोन्मुख वपु झालें, फार पीडिलें अहितें. ।

---

१. अन्वयः–आत्म (स्वतःच्या) जया साधावयासि (अर्थात् सूड उगविण्याचा आपला हेतु सफळ करण्याकरितां, आपल्या मनांतील डाव साधण्याकरितां) या समयीं (ऐन प्रसंगीं) कर्णाश्रयासि आला (कर्णाच्या मदतीस आला). २. लबाडीनें. ३. सर्पराज. व्याळपाळ शररूप होऊनि आला–असा अन्वय. ४. द्वेषानें. ५. अन्वयः–ज्या जेथें लाभ [व] हानि [त्या तेथें] दाव्यानें (दोरीनें, पाशानें) बांधोनि काळ (मृत्यु) नेतो. हें सुभाषित आहे. ६. तक्षकपुत्र, अश्वसेन. ७. भात्यामध्यें. ८. तया चि समयांत=त्याच वेळीं, तेव्हां. ९. पुत्राच्या मुखावरील घाम. १०. इंद्र. ११. यांत सम ताप होय=समरांमध्यें जित अथवा जेता ह्या उभयतांस अनुक्रमें पराभव व यशःप्राप्ती होण्यापूर्वीं श्रम सारखेच होतात, तेव्हां कर्ण व अर्जुन ह्या उभयतांच्या मुखावरील घाम त्यांच्या वडिलांनीं पुसला, असें सांगितलें तें योग्यच आहे. ह्या युद्धामुळें कर्ण व अर्जुन ह्या दोघांनाही सारखाच ताप झाला होता–असा भाव. १२. गंधर्वस्त्रिया किंवा देवस्त्रिया. १३. वारा घालीत होत्या. 'वीजिति' व 'सिंपिति' हीं रूपें वर्तमानकाळाचीं असून भूतकालाचा बोध करितात. अशा प्रयोगांस इंग्रजींत Historic Present Tense म्हणतात. १४. उत्तम पंख्यांनीं. १५. अन्वयः–यांहीं (कर्णार्जुनांनीं) तो भव्य (पुढें होणारा–कारण रणांगणीं मरण आल्यास स्वर्गप्राप्ती होते व स्वर्गी गेल्यावर हे सर्व उपभोग मिळावयाचेच. परंतु कर्णार्जुन अद्यापि जिवंत असून लढत होते. अशा स्थितींत देवांगनांनीं त्यांना वारा घातला व सुगंधी शीतल तोय शिंपडलें, तेव्हां पुढें होणारी गोष्ट त्यांस आजच प्राप्त झाली हें दर्शविण्याकरितांच ह्या 'भव्य'पदाची योजना केलेली आहे) सत्कार (सन्मान) वरिला (घेतला). १६. सरशी. येथें वर्णनीय गोष्टीचा क्रमाक्रमानें अपकर्ष झालेला दाखविला आहे, म्हणून येथें **सारालंकार** आहे. १७. नंतर. १८. अन्वयः–मग प्रतिपद, (मग पावलोपावलीं, दरघडीस) कर्णासि स्वोत्कर्ष (आपली सरसी) क्षीण (कमी) गमता जाहला. आपली सरशी क्षणोक्षणीं कमीकमी होत चाललेली कर्णास कळून चुकली–असा भाव. १९. अन्वयः–

कर्णे प्राणविनाशीं आठविता जाहला तया अहितें. ॥ ६५
मग तेणें रणरंगीं भस्म कराया सुदुःसहा अरिला, ।
पाटीरचूर्णपूर्णस्वर्णशरधिशायि सर्पशर धरिला. ॥ ६६
चापगुणीं सर्पशर द्युमणिसुतें जोडितां चि कंपातें ।
पावे क्षिति उल्कांच्या, धारांच्या जेंवि गाय, संपातें. ॥ ६७
पावे सदिगधिपेंद्र हि पुत्रावरि योजितां शर भयातें, ।
'हा! हा भक्षील' म्हणे, नरसिंहातें जसा शरभ यातें. ॥ ६८
पुत्रस्नेहें झाला व्याकुल, चिंता करी पिता महती, ।
'मा भैर्वत्स! जये श्रीः' एवं वाक्यें हरी पितामह ती. ॥ ६९
शल्य म्हणे, 'रिपुकंठीं हा शर लागेल या न संधानें, ।

---

क्षतशतहत (शेंकडों जखमांनीं व्याप्त असें) वपु (शरीर, अर्थात् कर्णाचें) पतनोन्मुख झालें (अगदीं पडण्याच्या बेतांत आलें). अहितें (शत्रूनें, अर्जुनानें) फार पीडिलें. प्राणविनाशीं (प्राणांताच्या वेळीं) कर्णे तया अहितें (त्या शररूप सर्पातें) आठविता जाहला (कर्णास त्या बाणाची आठवण झाली).

१. सहन करण्यास अत्यंत कठीण अशा. २. पाटीर+चूर्ण+पूर्ण+स्वर्ण+शरधि+शायि= चंदनचूर्णानें भरलेला जो सुवर्णभाता, त्यामध्यें निजणारा–असणारा. हें 'सर्पशरा'चें विशेषण. 'सर्पशर धरिला'=सर्परूप बाणास हात घातला. चंदनाच्या झाडाला सर्प विळखे घालून बसतात, कारण त्यांस चंदनाचा सुवास फार आवडतो, अशी प्रसिद्धी आहे. म्हणून सर्पशर चंदनाच्या चूर्णाच्या भात्यांत कर्णानें ठेविला होता. ३. सार्थान्वयः–द्युमणिसुतें (रविपुत्र कर्णानें) चापगुणीं (धनुष्याचे दोरीवर) सर्पशर (सर्पबाण) जोडितां चि (चढवितांच), उल्कांच्या धारांच्या संपातें (आकाशांतून पडणाऱ्या अग्नीच्या लोटानें) जेंवि गाय [तेंवि] क्षिति (पृथ्वी) कंपातें पावे (हालून गेली). उल्का=आकाशांतून अग्निरूप जी जी तारा पडते ती, अग्नीची ज्वाला. संपात= खालीं पडणें, अधःपतन. ४. सार्थान्वयः–पुत्रावरि शर योजितां (अर्जुनावर ह्या बाणाची झालेली योजना पाहून) सदिगधिपेंद्र हि (स+दिक्+अधिप+इंद्र+हि=दिक्पालांसह इंद्र सुद्धां) भयातें पावे. म्हणे, हा! (हाय! हाय!) हा (बाण) यातें नर-सिंहातें (नरश्रेष्ठ अर्जुनास) जसा शरभ [सिंहातें] [तसा] भक्षील. ५. इंद्र. ६. मोठी. ७. अन्वयार्थः–वत्स! मा भैः जये श्रीः (वत्सा!–भिऊं नकोस, अर्जुनाच्याच ठायीं विजय–श्री) [प्रतिष्ठित आहे]. एवं वाक्यें (अशा प्रकारच्या वाक्यानें) पितामह (ब्रह्मदेव) ती (चिंता) हरी (दूर करिता झाला). येथें 'मा भैर्वत्स जयश्रीः' असा पाठ आहे. त्याचा अर्थः–वत्स (हे वत्सा!) मा भैः (भिऊं नको) जयश्रीः [स्यात्] (जयश्री प्राप्त होईल). ८. अन्वयः–शल्य म्हणे 'रिपुकंठीं (अर्जुनाच्या गळ्यास) हा शर (बाण) या संधानें (तूं धरिलेल्या नेमानें) न लागेल (लागणार नाहीं). कर्णा! सत्यसंधानें (बिनचूक आहे नेम ज्याचा त्या) त्वां (तूं) पुन्हां नीट लक्षुनि धरावा.'

कर्णा ! पुन्हां धरावा त्वां लक्षुनि नीट सत्यसंधानें.' ॥ ७०
कर्ण म्हणे, 'धरिला तो धरिला, संधान[1] कर्ण फिरवीना[2], ।
लोकांत कपटयुद्धें यश मादृश[3] धीरवीर मिरवीना[4]'. ॥ ७१
[5]ऐसें वदोनि कर्ण व्यालाशुग सोडितां चि, हाकेला ।
दे, 'पार्थ! हतोऽसि' म्हणे, निश्चय तेव्हां जनें हि हा केला. ॥ ७२
[6]रिपुकंठच्छेदार्थ क्षेपी लक्षूनि[7] कर्ण तक्षकज्या[8], ।
मारील कोण त्यातें रक्षक लोकत्रयैकरक्षक ज्या[9]. ॥ ७३
[10]स्वसख्याचें न हरील व्यसन त्राता करेणुचा कां तें ? ।
प्रभु तत्काळ रथाच्या बुडवी स्वभरें[11] महींत चाकांतें. ॥ ७४
तों [12]कर्णकार्मुकगुणच्युत अहिशर जिष्णुच्या शिरोधीतें[13] ।
चुकला; [14]स्थान [15]तसें प्रियभुज पावे न पटु ही विरोधी तें. ॥ ७५

---

१. नेम. जो बाण धरिला तो धरिला, त्याचें संधान (नेम) मी बदलणार नाहीं–असा भाव. २. बदलणार नाहीं. ३. माझ्यासारखा. ४. गर्व वाहणार नाहीं. ह्या गीतींतील कर्णानें शल्यास दिलेलें उत्तर म्हणजे खऱ्या वीराच्या अंतःकरणाचें हुबेहुब चित्र आहे. ५. अन्वयः– ऐसें वदोनि व्यालाशुग (सर्पबाण) सोडितां चि कर्ण हाकेला दे (गर्जना केली) [व] 'पार्थ! हतोऽसि (अरे अर्जुना! मेलास रे! मेलास) [असें] म्हणे; तेव्हां (त्या वेळीं) जनें हि (प्रेक्षकांनीं सुद्धां) हा [च] निश्चय केला (सर्व प्रेक्षकजनांसही अर्जुन खास मरतो, असें वाटलें.) ६. शत्रूच्या मानेचा तुकडा पडावा म्हणून. ७. लक्षूनि क्षेपी=नेम धरून सोडिता झाला. ८. तक्षकजा= शररूपधारी तक्षकपुत्र जो अश्वसेन त्यास. ९. अर्जुनातें. 'ज्या मनुष्यास' असा सामान्यवाचक अर्थ घेतल्यास हें सुभाषित आहे. 'जया देव तारी । तया कोण मारी ?' ॥ ही तुकारामोक्ति प्रसिद्धच आहे. १०. अन्वयार्थः–करेणुचा त्राता (गजेंद्राचा–हत्तीचा संरक्षणकर्ता) स्वसख्याचें (आपल्या मित्राचें) तें (एवढें मोठें) व्यसन (संकट) कां न हरील ? हरणारच–असा भाव. **प्रश्नालंकार.** ११. आपल्या दाबानें. १२. कर्ण+कार्मुक+गुण+च्युत=कर्णाच्या धनुष्याच्या दोरींतून सुटलेला. हें 'अहिशर=सर्पबाण' ह्याचें विशेषण. १३. कंठातें. हें 'चुकला' ह्या उत्तरार्धांतील क्रियापदाचें कर्म. १४. अन्वयः–प्रियभुज (प्रिय आहे भुज म्हणजे वक्रगति ज्यास तो, अर्थात् सर्प) विरोधी (शत्रु, अर्थात् तक्षकपुत्र) पटु ही (हुषार असून सुद्धां) तें स्थान (अर्जुनाचा कंठ) तसें (ज्या योगें अर्जुनाचा प्राणांत झाला असता अशा रीतीनें) न पावे. केवळ शिरावरील मुकुटास तो सर्पबाण लागला–असा अर्थ. भुज=वक्ररेषाकृति, धनुष्याकार. ह्या गीतींतील 'पटु ही' हें पद फारच समर्पक आहे. त्याचा अर्थ–सर्पजाति अत्यंत लबाड व कपटी असें असून सुद्धां. प्रसिद्ध आंग्लकवि **मिल्टन्** यांनीं आपल्या 'प्यारेडाइज् लॉस्ट' नामक महाकाव्यांत 'सैतानानें' सर्पाचें रूपच घेऊन आपला इच्छित हेतु सफल केला; ह्या कथा-

उडवी किरीट विधिनें जें निर्मुनि यासि वाहिलें होतें, ।
गरळानळें पळांत चि तूलसम समूळ दाहिलें हो ! तें. ॥ ७६
अहिचा जसा किरीटीं, [2]नगशिखरीं न प्रहार [3]अशनीचा; ।
[4]अत्यंत तीव्र म्हणती परि तैसा दृष्टिपात न शनीचा. ॥ ७७
दि[5]व्यमणिकनकखचित [6]द्युमणिप्रभ तें किरीट [7]रागानें, ।
भस्म क्षणांत केलें आठवुनी पूर्ववैर [8]नागानें. ॥ ७८
[9]वेष्टुनि शिर सितवस्त्रें बहु पहिल्याहूनि पावला तो [10]भा; ।
[11]पूर्णेंदुमंडलानें उदयाचल जेंवि पावतो शोभा. ॥ ७९
[12]प्रभुला स्तविती सुर नर रक्षाया स्वाश्रिता असी मरणीं ।
रचितां युक्ति, वृषास हि म्हणति, 'तुझें बळ हि हें असीम रणीं.' ॥ ८०

---

भागाचे वेळीं, ह्या सर्पजातीचें वर्णन मोठें खुबीदार केलेलें इंग्रजी भाषा जाणणाऱ्या आमच्या वाचकांस माहीत आहेच. १५. तर्से=कंठासारखें मर्मस्थान.

१. सार्थान्वयः-हो ! जें किरीट (मुगुट) विधिनें निर्मुनि यासि (अर्जुनासि) वाहिलें होतें, तें [तो अहिशर] उडवी (उडविता झाला) [आणि तें] गरळानळें (विषाग्नीनें) पळांत चि (क्षणांत च) तूलसम (कापसाप्रमाणें) समूळ दाहिलें (भस्म करून टाकिलें). २. पर्वतशिखरावर. ३. वज्राचा. ४. अन्वयः-शनीचा दृष्टिपात अत्यंत तीव्र म्हणती, परि तैसा (तक्षकपुत्राप्रमाणें) [तीव्र] न. **व्यतिरेकालंकार.** शनीची दृष्टि फलज्योतिषांत अनिष्ट म्हणजे खडतर मानतात. शनीच्या उग्र दृष्टिपाताचा उल्लेख पंतांच्या काव्यांत वारंवार आढळतो. (सभापर्व, अध्याय १।८५; द्रोणपर्व, अध्याय १६।३६; शल्यपर्व, अध्याय ३।९१). ५. उज्वलरत्नें व सुवर्ण ह्यांनीं जडित. अर्थात् तें सुवर्णमय असून रत्नजडित होतें. ६. सूर्याप्रमाणें चकचकीत. ७. वर गीति ५९ पहा. ८. अश्वसेन सर्पानें. ९. डोक्यावरील मुगुट गेल्यामुळें अर्जुनानें पांढरें वस्त्र डोक्यास गुंडाळिलें. मुख्य शिरोभूषण काढून ठेविल्यावर धोतर गुंडाळण्याची चाल अद्यापिही रूढ आहे. १०. भा पावला=शोभा पावला. सितवस्त्र गुंडाळल्यानें तो तेजोहीन न दिसतां उलट त्याचा चेहरा त्यामुळें खुलला-असा भाव. ११. ही **उपमा** तर फार बहारीची आहे. 'पूर्णेंदुमंडल' शुभ्र व गोल असतें, त्याप्रमाणेंच अर्जुनानें स्वशिरास बांधिलेलें वस्त्र शुभ्र असून वाटोळें गुंडाळलें होतें. 'उदयाचला'शीं अर्जुनाची तुलना केली, तेंही समर्पकच आहे. कारण उदयाचलाचें गांभीर्य व स्थैर्य ह्यांची अर्जुनाच्या अंगच्या धैर्याशीं चांगली जोडी जमते. १२. सार्थान्वयः- मरणीं (प्राणांवर प्रसंग आला असतां) स्वाश्रिता (आपल्या भक्ताला, अर्जुनाला) रक्षाया (रक्षण करण्याकरितां) असी युक्ति रचितां (अशी युक्ति योजिल्यामुळें) सुर [आणि] नर प्रभुला (श्रीकृष्णाला) स्तविती [व] वृषास हि म्हणति, 'हें तुझें बळ हि रणीं असीम' (अमर्याद) [आहे].

## अध्याय [1]अठ्ठेचाळिसावा.

विफळप्रयत्न[2] झाला, परि पुनरपि, अश्वसेन [3]रविजयाच्या ।
भात्यांत शिरों पाहे[4], गाती सत्कीर्ति[5] फार कवि ज्यांच्या[6]. ॥ १
तूंणीं[7] शिरतां[8] पाहे कर्ण, तया अहि म्हणे, 'अगा धीरा ! ।
योजीं मज नीट पुन्हा[9] यावरि, मारीन पांडवा वीरा.' ॥ २
कर्ण म्हणे, 'तूं कोण?' व्याळ म्हणे, 'अश्वसेन मीं आहें. ।
पार्थे माझी माता वधिली ठावें असे तुला[10] बा ! हें. ॥ ३
हें कार्य[11] तुझें चि नव्हे, माझें हि; करीन आजि हानी[12] च, ।
जन्हि हर्यधिक[13], जळेल चि माझ्या गरळाग्निमाजि हा नीच.' ॥ ४
तेव्हां हास्य करुनि तो रविपुत्र म्हणे तयासि, 'हे भुजगा ! ।
न[14] परबळें विजयार्थी. इच्छिति जय निजबळें चि हे भुज गा ! ॥ ५
एका[15] बाणाचें हा कर्ण महासंकटांत ही नागा ! ।

---

१. यांत मुळांतील अध्याय ९० श्लोक ४४ पासून अखेरपर्यंतचा कथाभाग आहे. २. व्यर्थ गेला आहे प्रयत्न ज्याचा. हें 'अश्वसेन' ह्याचें विशेषण. 'विफळ–प्रयत्न' असें सामासिक पद न घेतल्यास, प्रयत्न विफळ झाला, अर्थात् अश्वसेनाचा यत्न निष्फळ झाला–असा अर्थ. ३. रवीपासून उत्पन्न झालेल्याच्या, कर्णाच्या. ४. शिरण्याच्या प्रयत्नांत होता. येथील 'पाहे' हा शब्द कर्त्याच्या मनाचा कल, इच्छा व ज्या क्रियावाचक शब्दाशीं हा संयुक्त असतो त्या क्रियेचा कांहीं अंशीं आरंभ व्यक्त करितो. जसें 'वैद्याकडे जाऊन पाहतों, येतील कीं नाहीं हें काय सांगूं?' ५. कर्णाच्या अंगच्या अनेक गुणांमुळें त्याच्या सुयशाचे तितके निरनिराळे प्रकार होतात. उदाहरणार्थः–शौर्य, औदार्य, करारीपणा इत्यादि. ह्या प्रत्येक गुणाची थोरवी कवि गातात, म्हणजे अर्थात् कवि ह्याच्या अनेक गुणांचें अनेक प्रकारांनीं वर्णन करितात–असा भाव. ६. कर्णाच्या. ७. भात्यामध्यें. ८. शिरत असतां. ९. अन्वयः–पुन्हा मज यावरि (अर्जुनावर) नीट योजीं (चांगला नेम धरून सोड), वीरा पांडवा (अर्जुनाला) मारीन. १०. कर्णाला. ११. पार्थवध. १२. नाशच. १३. इंद्रापेक्षां ज्यास्त. अर्जुन इंद्रापेक्षांही ज्यास्त बलवान् असला तरी. १४. सार्थान्वयः–गा ! (बाबा रे !) हे भुज (हे माझे बाहु) परबळें (दुसऱ्याच्या जोरावर) विजयार्थी (जय संपादन करण्याचा हेतु धरणारे) न; [हे] निजबळें चि (स्वपराक्रमावरच) जय इच्छिति (जयाची अपेक्षा करतात). ह्यावरून तुझ्या सामर्थ्यानें होणारें पार्थहनन मला मान्य नाहीं, एवढेंच नव्हे, तर मला लाजिरवाणें आहे–असा ह्या कर्णोक्तीचा इत्यर्थ होय. हें भाषण कर्णासारख्या महावीरास उचितच आहे. १५. अन्वयार्थः–[हे] नागा ! (सर्पा ! अश्वसेना !) हा कर्ण महासंकटांत ही (कठीण प्रसंगीं सुद्धां) एका बाणाचें

संधान दोनदां तों नाहीं च करीत, सत्य हें, बा ! गा ! ॥ ६
ए[1]क किती ? जिष्णु असे शत मारील चि रणीं, न भागे हा. ।
हें सु[2]ख ध्यायासि न[3]भा जा, किंवा त्यजुनियां नभा गे[4]हा.' ॥ ७
कर्णोक्तासि न साहे, निज रूप धरूनि वि[5]ष्णुजननाशा ।
धांवे व्योमपथें तो पु[6]रवाया मा[7]तृशत्रुहननाशा. ॥ ८
तेव्हां प्रभुनें सावध पार्थ करुनि वैरमूळ ही कथिलें; ।
मथिलें अहिला विजयें; र[8]जतासीं न पविजे तुळा क[9]थिलें. ॥ ९
भ[10]स्म कराया न लगे दवदहना फार कोप टोळाचें, ।

---

संधान (योजना) दोनदां तों (तर) नाहीं च करीत; बा ! गा ! हें सत्य. (निश्चित, ठाम, पक्के) [आहे, यांत अंतर होणार नाहीं]–असा भाव. सत्य=प्रतिज्ञा, शपथ, सिद्धांत.

१. अन्वयार्थः–एक किती ? (एका अर्जुनाचा पाड काय ?) असे शत (शंभर) जिष्णु (अर्जुन) हा (कर्ण) रणीं मारील चि (खास वधील), [हा] न भागे (थकणार नाहीं). 'रणीं मारील' ह्या पदानें 'हा वीर कपटानें शत्रुहनन करणारा नसून समरांगणीं शत्रूशीं भिडून त्याचा नाश करणारा आहे' असें स्पष्ट व्यक्त होतें. २. पार्थहननसुख. ३. आकाशांत. आकाशांत जाऊन प्रेक्षक ह्या नात्यानें पहात रहा. ४. घरीं. किंवा घरीं जाऊन स्वस्थ बैस–असा भाव. ५. विष्णु+जन+नाशा=विष्णूचा भक्त अर्थात् अर्जुन, त्याच्या नाशाकरितां. ६. सफल करण्याकरितां. ७. आपल्या मातेच्या शत्रूचा वध करण्याची इच्छा. ८. रुप्याशीं. 'रजतासि न पाविजे तुळा कथिलें' असें पाठान्तर. ९. कथिल नामक धातूनें. सकृद्दर्शनीं, रौप्य म्हणजे अर्जुन व कथिल म्हणजे तक्षकपुत्र अश्वसेन असा बिंबप्रतिबिंबाचा भास होतो, व 'मथिलें' ह्या पदावरूनही ती कल्पना बरीशी वाटते; परंतु, रौप्य म्हणजे कर्ण व कथिल म्हणजे तक्षकपुत्र असें घेतल्यास अर्थास गौरव येतें. कारण, कर्ण व अश्वसेन ह्या उभयतांचाही अर्जुनाशीं विरोध होता; व ज्याप्रमाणें, रौप्य व कथिल ह्या उभयतांमध्यें साधारण धर्म म्हणजे शुभ्रताच, बाकी सर्व प्रकारांनीं रौप्य थोरच, त्याप्रमाणें केवळ दोघांचें अर्जुनाशीं वैर येवढेंच काय तें साधारण, बाकी कर्णाच्या अंगचे गुण ह्या तक्षकपुत्राचे अंगीं कोठून असणार ? अर्थात् नाहीं. रुपें अग्नीपुढें कांहीं वेळ तरी टिकतें, पण कथिल तेव्हांच विरघळतें. कर्ण आणि अश्वसेन यांना वरील दोन धातूंची उपमा योग्य आहे. कारण पार्थानें तक्षकपुत्रास सहज मारिलें; पण रविपुत्रानें युद्धामध्यें पार्थाला बराच वेळ दाद दिली नाहीं. हा कथिलाचा दृष्टांत पंतांच्या आवडीचा दिसतो. (भीष्मपर्व, अध्याय ११।४७ पहा). १०. अन्वयः–टोळाचें भस्म कराया (करावयास) [जेंवि] दवदहना (वणव्यास) फार कोप न लगे, तेंवि [अहिचें खंडन कराया] नरास (पार्थास) हि [नलगे]. जेंवि पटोळाचें (पडवळाचें) [तेंवि] तो (पार्थ) अहिचें (सर्पाचें, अश्वसेनाचें) खंडन करि. ह्या ठिकाणीं दिलेली पडवळाची उपमा फारच समर्पक आहे. कारण, पडवळाची लांबी, स्वरूप व गारवा ह्या गोष्टींचें सापाच्या अंगीं असणाऱ्या ह्याच गोष्टींशीं पूर्ण साम्य असतें.

तेंवि नरास हिं[1], अहिचें खंडन करि जेंवि तो पटोळाचें. ॥ १०
प्रभुनें मग उद्धरिला[2] भूमग्नचरण[3] रथ स्वबाहूनीं ।
ज्यांहीं क्षिति उद्धरिली लक्ष्मी भुलली जेयांसि पाहूनीं. ॥ ११
तेव्हां स्वधनुष्याच्या ओढुनि रोषें गुणासि[6] आकर्ण[7], ।
ताडी तीव्रतरांहीं पंक्ति[8] शरांहीं पृथासुता[9] कर्ण. ॥ १२
जिष्णुं[10] हि त्याचा बारा बाणांनीं ताडुनी स्वकाय, दुज्या ।
यम चि अशा नाराचें विंधुनि सुखवी धना स्वका[11] यदुज्या. ॥ १३
नाराच रक्त सेवुनि शिरला[12], भेदूनि काय[12], महिमाजी[13], ।
तन्हि निश्चळ वृष; त्याचा वर्णावा फार काय महिमा जी[14] ! ॥ १४
'द्वादश बाणानीं[15] वृष भेदी त्या शाश्वता[16] अभेद्या[17]' या ।

१. 'तेविं नरास न' असें पाठान्तर. २. वर काढला. ३. पृथ्वीमध्यें गढलेलें आहे पाऊल अर्थात् खालचा भाग किंवा चक्र, असा. हें 'रथा'चें विशेषण. ४. ज्यांहीं (ज्या बाहूंनीं) क्षिति (पृथ्वी) उद्धरिली, [व] जयांसि (ज्यांस) पाहूनीं लक्ष्मी [भगवान श्रीकृष्णावर] भुलली (अनुरक्त झाली) [अशा त्या] स्वबाहूनीं भूमग्नचरण (पृथ्वीमध्यें ज्याचें चाक रुतलें आहे असा) रथ मग (तक्षकास मारिल्यानंतर) प्रभुनें उद्धरिला—असा सार्थान्वय. ५. बाहूंसी. ६. दोरीस. ७. कानापर्यंत. ८. दहा बाणांनीं. पंक्ति=दहा ही संख्या, दशक. ९. अर्जुनास. १०. जिष्णु हि त्याचा स्व-काय (कर्णाचा स्वतःचा देह) बारा बाणांनीं ताडुनी, दुज्या यम चि अशा नाराचें विंधुनि स्वका धना (आपलें स्वतःचें धनच अशा) यदुज्या सुखवी—असा अन्वय. दुज्या=दुजा; यदुज्या=यदुजा. पंत आपल्या लेखनांत 'जा' व 'ज्या' ह्यांत फारशी बारकाई करीत नाहींत. पुढें गीति १६ व ३२ वगैरे पहा. येथें 'जिष्णु हि त्याच्या बाणां बाणांनीं तोडुनी स्वकाय दुजा' असा पाठ आहे. त्यास अनुसरून सार्थान्वयः—त्याच्या (कर्णाच्या) बाणां जिष्णु (अर्जुन)हि बाणांनीं तोडुनी, [जो] दुजा (दुसरा) स्वकाय (आपलें शरीर ज्यानें धारण केलें आहे असा, अर्थात् धृतस्वकाय म्हणजे साक्षात्, मूर्तिमंत) यम चि अशा नाराचें (बाणानें) [कर्णातें] विंधुनि (जखमा करून, कर्णशरीरास क्षतें पाडून), स्वका (आपल्या) धना (ठेवा, अशा) यदुजा (यदुपुत्र श्रीकृष्णास) सुखवी (संतोष देता झाला). ११. स्वका धना=आपल्या आवडत्या व्यक्तीस. कल्पनासादृश्यः—तत्तस्य किमपि द्रव्यं योहि यस्य प्रियो जनः (उत्तररामचरित्र—अंक ६ पद्य ५) ह्याचें रूपान्तरः—'तें त्यास धन विलक्षण जो ज्यास प्रिय असेल जन लोकीं.।' (कै० परशुरामपंत तात्या गोडबोले). १२. शरीरांतून आरपार निघून गेला—असा भाव. १३. पृथ्वीमध्यें, पाताळांत. ह्या अर्थात **कारकदीपकालंकार** आहे. पण उत्तरार्धाशीं अन्वित केल्यास **विशेषोक्ति** होते. १४. हे धृतराष्ट्र ! १५. 'बाणांहीं' असें पाठान्तर. १६. अविनाशी. १७. अविदार्य. हीं दोनही विशेषणें कृष्णाचीं आहेत. अविनाशी व अविदार्य अशा कृष्णातें भेदी—असा भाव.

[1]व्यासोक्ति बहु उदारा आश्चर्योत्कर्ष सत्सभे द्याया. ॥ १५
[2]नवति शरानीं ताडुनि पुनरपि एकें [3]खरें शरें [4]हरिज्या, ।
[5]मर्मीं हाणी, न्हाणी रक्तें भक्तेंद्रतेसि दे हरि ज्या. ॥ १६

ऐसें करूनि, गर्जे, हांसे **कर्ण** प्रताप दावूनीं. ।
तेणें **पार्थ** क्षोभे चित्तीं [6]स्वपराभवासि भावूनीं. ॥ १७

[7]**पार्थ** नवति विशिखानीं मर्मीं भेदूनि शीघ्र **कर्णातें**, ।
चूर्ण करि क्षणमात्रें तन्मुकुटातें हि अर्कवर्णातें, ॥ १८

खंडूनि रत्न[8]कुंडलयुग कवचाचे हि [9]खंडखंड करी. ।
**कर्ण** व्याकुळ झाला जैसा हरिनखरभग्नगंड करी. ॥ १९

मग [10]कालानलदंडप्रतिम शरासि [11]स्तनांतरीं [12]ओपी, ।
**कर्णाच्या** रक्तातें [13]कोपी [14]कालाहिपालसा [15]तो [16]पी. ॥ २०

---

१. सार्थान्वयः—या **व्या**सोक्ति (अर्थात् शाश्वत, अभेद्य इत्यादि व्यासांनीं परमेश्वरास दिलेलीं विशेषणें) सत्सभे (सुज्ञसमूहास, सज्जनांस) आश्चर्योत्कर्ष द्याया बहु उदारा (योग्य, गोड) [असती]. हे उद्गार **पं**तांचे आहेत. २. नव्वद. ३. उग्र. ४. हरिजा=इंद्रपुत्रास, अर्जुनास. ५. अन्वयः—ज्या (ज्या अर्जुनास) **ह**रि (भगवान् श्रीकृष्ण) भक्तेंद्रतेसि (भक्त+इंद्रता=भक्तांमध्यें श्रेष्ठपद) दे [त्या हरिज्या] मर्मीं हाणी [व] रक्तें (रक्तानें) न्हाणी (स्नान घालिता झाला). ६. स्वपराभवासि भावूनीं=आपला पराजय झाला असें समजून, मानून. ७. गीति १८–१९ ह्यांचें युग्मक. अन्वयः—नवति विशिखानीं **पार्थ कर्णातें** मर्मीं शीघ्र (त्वरित) भेदूनि, क्षणमात्रें (निमिषामध्यें) अर्कवर्णातें (सूर्यासारखा रंग आहे ज्याचा अशातें) तन्मुकुटातें हि (त्याच्या म्हणजे कर्णाच्या मुकुटाला सुद्धां) चूर्ण करि (पीठ करी); [व] रत्नकुंडलयुग (रत्नजडित कुंडलांची जोडी) खंडूनि (तोडून) कवचाचे हि खंडखंड (तुकडे तुकडे) करी. [तेणें] जैसा हरि–नखर–भग्न–गंड करी (सिंहाच्या नखांनीं विदारित आहे गंडस्थळ ज्याचें असा हत्ती) [तैसा] **कर्ण** व्याकुळ झाला. वरील तीन ओळींत **कारकदीपकालंकार** आहे; व शेवटच्या चरणांतील **उपमा** फार चांगली आहे. ८. कुंडल=कर्णभूषण, कंठभूषण व हस्तभूषण—असे अर्थ आहेत. ९. तुकडे–तुकडे. 'खंड' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आहे. १०. काल+अनल+दंड+प्रतिम=प्रलयकाळच्या अग्नीच्या लोळासारखे. येथील उपमा एकाच सामासिक पदांत असून 'भयंकर' किंवा 'अनिवार्य' ह्या साधारण धर्माचा लोप झाला आहे, म्हणून ही **लुप्तोपमा**. ११. स्तनद्वयांमधील जागीं, छातींत. १२. अर्पण करिता झाला, अर्थात् छातीवर अशा प्रकारच्या बाणानें प्रहार करिता झाला. १३. कोपलेला. १४. कालसर्पेंद्राप्रमाणें. १५. अर्जुनबाण. १६. प्राशन करिता झाला.

त्या खरशरप्रहारें [१]कश्मल कर्णासि तत्क्षणीं आलें, ।
पार्थें कर आवरिला, मन [२]आर्यव्रतविलंघना भ्यालें. ॥ २१
तेव्हां कृष्ण म्हणे, 'तुज हित कथितों मीं, [३]अयुक्त न गमो हें, ।
[४]व्यसनीं रिपु मारावा; भाग्यें हा विकळ धैर्यनग मोहें. ॥ २२
[५]धर्मज्ञनीतिनिपुणश्रेष्ठ महेंद्रादि, दारुणा अरितें, ।
व्यसनीं वधूनि करिते झाले लोकांत पावनें चरितें. ॥ २३
[६]हा अमर धर्मयुद्धीं, कोण न कर्णासि मानवे [७]शस्त्री ? ।
यासि [८]कसेंतरि मारुनि सुखवावी त्वां [९]स्व-मानवेश-स्त्री.' ॥ २४
[१०]शास्त्रीं वर्णिति ज्याच्या धर्मदयाढ्या अनुग्रहासि कवी, ।
सच्छलकवधार्थ असें साधुसि, जरि हरि अनुग्र हा, सिकवी. ॥ २५
[११]धर्मविरुद्ध हि गमलें, परि गुरुवचनासि साधु अनुसरला; ।

१. झीट, मूर्च्छा. २. मूर्च्छितावर प्रहार न करणें हें आर्यव्रत, या व्रताचा अतिक्रम. येथें **काव्यलिंगालंकार** आहे. ३. अयोग्य. ४. अन्वयः-व्यसनीं (संकटांत सांपडला असतां) रिपु (शत्रु) मारावा [अशी राजनीति आहे, आणि] भाग्यें (सुदैवानें) हा धैर्यनग (धैर्याचल, कर्ण) मोहें (मूर्च्छनेमुळें) विकळ (सामर्थ्यहीन) [झाला आहे]. तेव्हां अशा प्रसंगीं तूं कर्णाला मार-असा भाव. ५. सार्थान्वयः-धर्मज्ञ आणि नीतिनिपुण यांमध्यें श्रेष्ठ [असे जे] महेंद्रादि (इंद्रप्रमुख) [ते] दारुणा अरितें (भयंकर शत्रूंतें) व्यसनीं (संकटसमयीं) वधूनि, लोकांत पावनें चरितें करिते झाले (लोकांमध्यें सुयश संपादिते झाले). येथें **विरोधाभासा**ची छाया आहे. ६. अन्वयः-हा धर्मयुद्धीं अमर [आहे]. कोण शस्त्री (शस्त्राधारी वीर) [ह्या] कर्णासि न मानवे ? (ह्यास कोणता वीर पटत नाहीं बरें ? अर्थात् कोणीही वीर सामना करण्यास आला, तरी ह्याची तयारीच आहे, ना म्हणून कधीं नाहींच. ह्यावरून कर्णाच्या आंगचें सामर्थ्य व पराक्रम व्यक्त होतात). **प्रश्नालंकार.** ७. वीर. कोणता वीर कर्णास मान देणार नाहीं ? कोणत्या वीराला कर्ण हा बलाढ्य वाटत नाहीं ? असा अर्थ घेतला, तरी तो कर्णाच्या बलाचा व शीलाचा प्रकर्षच दर्शवितो. ८. न्यायान्याय न पाहतां. ९. स्व+मानवेश+स्त्री=आपला+राजा+पत्नी=आपल्या राजाची राणी (द्रौपदी) तिला. १०. सार्थान्वयः-ज्याच्या धर्मदयाढ्या (धर्म आणि दया यांनीं पूर्ण) अनुग्रहासि (प्रसादास) कवी (शहाणे) शास्त्रीं (शास्त्रान्तरीं) वर्णिति [तो] हा हरि (श्रीकृष्ण) जरि अनुग्र (शांत, दयायुक्त) [तरी] सच्छलकवधार्थ (साधूंचा छल करणाऱ्यांचा वध व्हावा म्हणून) साधुसि (सज्जनास, अर्जुनास) असें ('व्यसनीं रिपु मारावा' असें) सिकवी (उपदेश करिता झाला). **विरोधाभास.** ११. अन्वयः-[तें] धर्मविरुद्ध (अन्याय्य) हि [असें] गमलें (भासलें); परि, साधु (अर्जुन) गुरुवचनासि (श्रेष्ठ जो कृष्ण त्याच्या वचनास) अनुसरला (वचनाचा आदर केला; तदनुरूप वागला). तरि च (म्हणूनच) हनु धरूनि (हनुवटी

तरि च पुढें [1]जय विजया आलिंगाया धरूनि हनु सरला. ॥ २६
[2]भगवत्प्रोक्तें पार्थें मो[3]हांत हि कर्ण तो [4]महानिकरें, ।
बहु पीडिला शरांच्या नि[5]करें [6]तत्प्राणशक्तिहानिकरें. ॥ २७
[7]तरि हि महातेजस्वी तो पीनायतसुवृत्तबाहु तिहीं, ।
शमला न, पेटला चि; ज्वलन जसा पेटतो घृताहुतिहीं. ॥ २८
सावध होउनि कर्ण छेदी तत्काळ बाणजाळातें; ।
पार्थासि दश शरानीं ताडी, [8]सांनीं च [9]विश्वपाळातें. ॥ २९
क्षोभे पार्थ महात्मा, भेदाया त्या वृषासि कोपानें. ।
अभिमंत्री घोरशरा, [10]असुरास्रांच्या, अतृप्त जो, पानें. ॥ ३०
[11]तों आला वधसमय; द्विजशाप हि भूमुखें चि तो डावें ।

---

धरून, हें प्रेमातिशयाचें चिन्ह आहे) विजया (अर्जुनास) आलिंगाया जय (मूर्तिमंत यश) पुढें सरला. म्हणूनच जयश्री त्यास माळ घालण्यास तयार झाली—असा भाव. **पर्यायोक्त.** अधर्मानें वागणारास यशाची प्राप्ती नसते हें खरें, परंतु वर सांगितलेला व धर्मविरुद्ध दिसणारा उपदेश प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्ण ह्यानें केलेला असल्यामुळें अर्जुनास जय प्राप्त झाला, नाहींपेक्षां अशी गोष्ट कधींच होती ना—हा कवीचा भावार्थ.

१. येथें 'जय' ह्या निर्जीव पदार्थावर सजीव पदार्थाच्या गुणाचा आरोप केलेला असल्यामुळें **'चेतनधर्मारोपोक्ति'** नामक अलंकार आहे. २. भगवंताच्या भाषणानें. ३. मूर्च्छित झाला होता तथापि. ४. फार जोरानें. ५. समुदायानें. ६. तत्+प्राण+शक्ति+हानिकरें=त्याच्या म्हणजे कर्णाच्या प्राणशक्तीचा (प्राणांचा) नाश करणाऱ्या. हें 'निकरें' ह्याचें विशेषण. ७. सार्थान्वयः—तरि हि तो महातेजस्वी पीनायतसुवृत्तबाहु (पीन+आयत+सुवृत्त+बाहु=पुष्ट, दीर्घ व गोल आहेत बाहु ज्याचे असा) तिहीं (त्या पार्थशरांनीं) न शमला (दबला नाहीं), पेटला चि (अधिकच चवताळला); जसा ज्वलन (अग्नि) घृताहुतिहीं (घृत+आहुति=तुपाच्या आहुतींनीं) पेटतो (प्रज्वलित होतो). प्रथमार्ध व 'पेटलाचि' येथपर्यंत **विषमालंकार.** ८. सहा बाणांनीं. ९. श्रीकृष्णातें. १०. दैत्यांचें रक्त पिऊन. अस्र=रक्त. **'अस्रः** कोणे कचे पुंसि क्लीबाश्रुणि च शोणिते' इति मेदिनी. ११. सार्थान्वयः—तों (इतक्यांत) वधसमय आला (कर्णाच्या अंतकाळची वेळा येऊन ठेपली). तो द्विजशाप हि (कथासंदर्भार्थ शांतिपर्व—अध्याय २ पहा) भूमुखें चि डावें रथचक्र गिळवी (रथाचें डावें चाक ब्राह्मणशापामुळें भूमग्न झालें) [आणि] रामास्त्रा! (परशुरामांनीं कर्णास उपदेशिलेल्या अस्त्रा!) त्वां हि प्रेम तोडावें (अर्थात् कर्णाच्या ठिकाणचें प्रेम नाहींसें करावें) [असें] म्हणे. फार दिवसांच्या सहवासानें अस्त्रांच्या मनांत कर्णाविषयीं ममत्व असणें साहजिक आहे. पण द्विजशापाचा प्रताप किती भयंकर आहे, हें कवीनें कथाभंग

गिळवी रथचक्र; म्हणे[1], 'रामास्त्रा ! प्रेम त्वां हि तोडावें.' ॥ ३१
चक्र[2] क्षितिनें गिळितां, न स्मरतां भार्गवास्त्र, रविज्याला ।
स्पर्शे विषाद; म्हणती बळतेजोनाशहेतु कवि ज्याला[3]. ॥ ३२
व्यसनीं[4] पडतां, क्षात्रीं धर्मीं होवूनि तो विरस 'हाय !' ।
कर्ण म्हणे, धर्मास[5] हि मानी कीं, 'हा नव्हे चिर सहाय.' ॥ ३३
"धर्मप्रधान[6] जो, त्या, तज्ज्ञ[7] 'सदा धर्म रक्षितो' म्हणती, ।
म्हणुनि यथाशक्ति, तया भजलों भावें[8] करूनियां प्रणती[9]. ॥ ३४
परि न व्यसन निवारी, हात[10] न दे आजि आजिमाजि[11] मला, ।
यावरुनि, धर्म भक्ता नित्य न रक्षीतसे असा गमला." ॥ ३५
यापरि खरतर नरशर सर्प तसे क्रूर झोंबतां मर्मा, ।
कर्ण व्याकुळ झाला; चित्तीं निंदी[12] पुनःपुन्हा धर्मा. ॥ ३६
मग तीं तीं बाणानीं प्रभुचे क्षतजार्द्रे[13] करुनियां हात, ।
कर्णे पार्थशरीरीं शर, भेदुनि कवच[14], रोविले[15] सात. ॥ ३७
अर्जुन होउनि कोपें तप्त, विशिख[16] सप्त उग्र बरवे घे; ।

---

न होऊं देतां ध्वनित केलें आहे. (कर्णाला परशुराम व एक द्विज यांनीं दिलेल्या शापांचें वर्णन मागें अध्याय २९ मध्यें आलेलें आहे, तें जिज्ञासु वाचकांनीं पहावें).

१. द्विजशाप म्हणे—असा अन्वय. २. सार्थान्वयः—[रथ] चक्र क्षितिनें गिळितां [व कर्णाला] भार्गवास्त्र न स्मरतां (परशुरामापासून प्राप्त करून घेतलेल्या अस्त्राचा मंत्र आठवेनासा झाला असतां) रविज्याला (कर्णाला) विषाद स्पर्शे (खेद झाला); ज्याला (विषादाला) कवि बळतेजोनाशहेतु (सामर्थ्य व धमक नाहींसें करणारें मूलकारण) म्हणती. पंतांनीं येथें विषादाचें स्वरूप कसें असतें, तें चांगलें दाखविलें आहे. ३. विषादाला. ४. सार्थान्वयः—व्यसनीं (संकटांत) पडतां, क्षात्रीं धर्मीं विरस होवूनि (युद्ध करण्यांत निरुत्साह होऊन) तो कर्ण 'हाय !' म्हणे; [व] धर्मास हि (सद्धर्माला सुद्धां) हा चिर सहाय (कायमचा स्नेही) नव्हे [असें] मानी कीं (निश्चयेंकरून मानिता झाला). ५. धर्म हा सतत टिकणारा स्नेही आहे, ह्या शास्त्रोक्तीस बाध आला, असा कर्णाचा समज झाला. ६. धर्म आहे प्रधान (श्रेष्ठ) ज्याला असा; अर्थात् धर्मानुसरण करणारा. ७. तज्ज्ञ=तें जाणणारे, त्याची ज्यांस माहिती आहे, असे. हा 'म्हणती' ह्या क्रियापदाचा कर्ता. ८. मनापासून, भक्तीनें. ९. नमस्कार. १०. साहाय्य करीत नाहीं. हा लोकोक्ति अलंकार. ११. युद्धामध्यें. १२. दोष देता झाला. १३. क्षतज+आर्द्र=रक्तानें भिजलेले. हें 'हातां'चें विशेषण. १४. चिलखत. १५. खोंचिले. १६. बाण.

[१]तन्मोक्षीं [२]सुतशोकानलराशिवरि [३]ग्रहप्रवर [४]वेंघे. ॥ ३८
पीडीं नर, रविचा जो [५]बहिश्चरप्राणसा तया, [६]म्यां तें ।
काय कथावें? हसले क्रौर्यें ते बाण सात [७]याम्यांतें. ॥ ३९
[८]विधि फिरतां [९]जन्हि दिधला व्यसनें त्या फार कंप [१०]दात्यातें, ।
[११]परि परिरंभण देउनि होती शुचिसत्वसंपदा त्यातें. ॥ ४०
अरिवरि [१२]पद्मभवास्त्र [१३]द्युमणिसुतें वीर[१४]वर्ण्यसत्वरतें, ।
ते[१५]व्हां हि योजिलें हो! [१६]प्रकटे [१७]प्रलयाग्निरूप [१८]सत्वर तें. ॥ ४१
[१९]ऐंद्रास्त्र **पार्थ** योजी, आपण चि तयाचिया जळे शमनीं, ।
तेव्हां सुखवी दुखवी स्वहितां अहितांसि कुरुबळेश मनीं. ॥ ४२

---

१. तत्+मोक्षीं=त्यांचें सोडणें होतांच, ते सोडतांच. २. स्वसुत **कर्ण**, त्याचेविषयीं शोक हाच कोणी अग्नि, त्याच्या राशीवर. ३. ग्रहश्रेष्ठ, रवि. ४. चढला. संध्याकाळच्या समयीं क्षितिजावर पश्चिमेचे बाजूस लाली असते, व सूर्य लालभडक गोळा दिसतो. ह्या सृष्टिसौंदर्यावर केलेलें हें **रूपक** फारच सुंदर आहे. ५. बाह्यप्राण, अर्थात् स्वभिन्न पण प्राणासारखा आवडता. ६. मीं संजयानें. ७. यमदूतांना. याम्य=यमासंबंधीं, यमानें केलेला. **व्यतिरेकालंकार.** ८. दैव प्रतिकूळ झालें असतां. ९. व्यसनें (संकटानें) जन्हि त्या दात्यातें (कर्णातें) फार कंप दिधला—असा अन्वय. तो उदार दानशूर कर्ण जरी भ्याला, जरी त्याचें धैर्य सुटलें, तरी—असा अर्थ. १०. 'कर्णासारखा दाता नाहीं' ही प्रचलित असलेली उक्ति सर्वांच्या परिचयाचीच आहे. ११. अन्वयः—परि, शुचि (शुद्ध) सत्वसंपदा (सत्वशीलतारूप लक्ष्मी) त्यातें कर्णातें) परिरंभण (आलिंगन) देउनि होती. अर्थात् त्याचा जरी धीर सुटला, तरी त्याचें शुद्ध सत्वशीलत्व सुटलें नाहीं—असा भाव. १२. पद्मापासून (कमलापासून) उत्पन्न झालेला ब्रह्मदेव, त्याचें अस्त्र; अर्थात् ब्रह्मास्त्र. १३. सूर्यपुत्रानें, कर्णानें. १४. वीरांनीं स्तुति करण्यास योग्य असा जो क्षात्रधर्म, त्याच्या ठिकाणीं अनुरक्त असलेल्या. अर्थात् महायोद्ध्यांनीं प्रशंसा करण्याजोगा ज्याच्या आंगचा शौर्यगुण होता, त्यानें. हें 'द्युमणिसुतें' ह्याचें विशेषण. सत्व=पराक्रम, शौर्यातिशय. '**सत्वं** गुणे पिशाचादौ बले द्रव्यस्वभावयोः' इति मेदिनी. १५. असा कठीण प्रसंग आला असतां सुद्धां. योजिलें हो=योजना करिता झाला बरें. येथें 'हो' अव्यय आश्चर्यद्योतक आहे. १६. भासमान झालें. १७. प्रलयकाळच्या अग्नीप्रमाणें रूप आहे ज्याचें, असें तें ब्रह्मास्त्र. १८. तत्काळ. १९. पर्जन्यास्त्र. सार्थान्वयः—**पार्थ** ऐंद्रास्त्र योजी; [तें ऐंद्रास्त्र] तयाचिया शमनीं (त्या ब्रह्मास्त्राचा परिणाम नाहींसा करतांना) आपण चि (स्वतःच) जळे (जळूं लागलें). तेव्हां कुरुबळेश (कौरवसेनापति कर्ण) मनीं स्वहितां सुखवी [व] अहितांसि दुखवी. कर्णानें स्वपक्षीयांच्या मनास सुख दिलें, व शत्रुपक्षीयांस दुःख दिलें. हा **यथासंख्य** अलंकार. पाण्यानें अग्नि शांत होतो, पण ब्रह्मास्त्राग्नि असा होता कीं, त्याच्यापुढें प्रत्यक्ष पाणीच जळूं लागलें.

कृष्ण म्हणे, 'बापा! हूं[1] बा! पाहूं दे तुझ्या [2]चरित्रास, ।
अस्त्रांतरासि योजीं, पावोत मनीं जनीं अरि त्रास. ॥ ४३
ब्रह्मास्त्रातें योजुनि अर्जुन रविसूनुला [3]अदभ्रानीं ।
शरजालानीं झांकी, [4]वासव रविला जसा [5]सदभ्रानीं. ॥ ४४
[6]गांडिवगुणासि तेव्हां तरणितनय तीव्रतरशरें तोडी; ।
अर्जुन कळों न देतां गांडीवीं [7]सुदृढ अन्य गुण जोडी. ॥ ४५
[8]कर्ण म्हणे, 'शर चुकला जो ज्याछेदार्थ सोडिला पहिला, ।
आश्चर्य थोर झालें! भ्रमला पक्षींद्र खंडितां अहिला ! ॥ ४६
[9]दुसरा तिसरा चवथा [10]ऐसे गांडीवगुण शत छेदी, ।
वरिचेवरि गुण जोडी, कर्णाला जिष्णु तें [11]कळों नेदी. ॥ ४७
[12]गुण जोडितां सुताला बहु कार्मुकवेदपंडितांत रणीं ।

---

१. चालूं दे, त्वरा कर. **लाटानुप्रास.** २. कर्तृत्वशक्तीस; अभ्यासास, अर्थात् शास्त्राभ्यासास. ३. बहुतांनीं. हें 'शरजालांनीं' ह्याचें विशेषण. ४. इंद्र. ५. उत्तम मेघांनीं. येथें पंतांनीं फारच मौज केली आहे. इंद्र मेघजालांनीं सूर्यास आच्छादित करतो, त्याचप्रमाणें इंद्रपुत्रानें रविपुत्रास अस्त्रजालांनीं आच्छादित केलें. पिढीजात वैरभाव आहे, तेव्हां मुलांचें करणें व्यवहारानुरूप असून त्यांत आजपर्यंत ज्या घराण्याची सरशी होत होती, त्याच घराण्यांतील मुलानें आपल्या कुळाचें नांव राखिलें. ६. अर्जुनाच्या चापाच्या दोरीला. येथें पूर्वार्धांत **असंगति** व **विरोधाभास** असे दोन अलंकार आहेत. ७. बळकट, मजबूत. गुण=धनुष्याची दोरी. ८. सार्थान्वयः-कर्ण म्हणे, ज्याछेदार्थ (अर्जुनचापाच्या दोरीला तोडण्याकरितां) जो पहिला शर सोडिला [तो] चुकला, [हें] थोर आश्चर्य झालें. अहिला खंडितां (सर्पाचे तुकडे करितांना) पक्षींद्र (गरुड) भ्रमला (चुकला). अर्थात् त्याचे हातून सर्पाचे तुकडे झाले नाहींत. सर्पाचे तुकडे करितांना पक्षिराज गरुड हा चुकावा, हें मोठें नवल म्हणजे अभूतपूर्व होय; त्याचप्रमाणें माझें शरसंधान चुकावें हा मोठा चमत्कार आहे, असें कर्णास वाटलें. ह्यावरून थोडक्यांत, आपल्या शरसंधानाचा अचूकपणा व तद्विषयीं असणारी कर्णाची खात्री, ह्या गोष्टी चांगल्या व्यक्त केल्या आहेत. **प्रतिवस्तूपमालंकार.** ९. 'गुण'=धनुष्याची दोरी. हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे व पंतांनीं तो तसाच योजिलेला आहे. तेव्हां 'पहिला' 'दुसरा' हीं विशेषणें 'गांडीवगुण' ह्या नामाचीं करावीं. १०. *'ऐसें गांडीवगुणशतच्छेदी'* असें पाठांतर आहे. तो पाठ घेतल्यास, 'ऐसें' हें 'शत' (=शंभर) ह्याचें विशेषण. 'शत'शब्द नपुंसकलिंगी आहे. आणि 'गांडीवगुणशत'=गांडीव चापाच्या शंभर दोऱ्या, हें 'छेदी' ह्या क्रियापदाचें कर्म आहे. ११. कळों नेदी=कळूं दिलें नाहीं. १२. सार्थान्वयः-रणीं, गुण [चापीं] जोडितां शक्र कार्मुकवेदपंडितांत (धनुर्वेदज्ञात्यांमध्यें) [स्व]सुताला (अर्जुनाला) बहु

वर्णी शक्र; तयाहुनि फार, शतगुणांसि खंडितां, तरणी. ॥ ४८
ऐसें न हाणितां ही मर्मी विषदिग्ध[1] बाण तापार्थ, ।
भ्रमवी[2] अरिला लाघव[3] दावुनि बहुयुक्ति जाणता[4] पार्थ. ॥ ४९
कर्ण म्हणे, 'हा[5]! ऐसें झालें नव्हतें कधीं हि संधानीं[6]! ।
गुण देखिला न कैसा शत बाणानीं हि जेंवि[7] अंधानीं?' ॥ ५०
मग नगभित्तनयास्त्रें[8] वारुनि वृष 'धन्य[9]' आपणा म्हणवी, ।
चापगुणझणत्कारें[10] दिग्वारणमस्तकें[11] हि झणझणवी. ॥ ५१
राधापुत्र बहु करी बाधा[12] पार्थासि, तेधवां त्याला[13], ।
राधाहृच्चोर[14] म्हणे, 'बा! धाक[15] प्राप्त कां तुला झाला? ॥ ५२

---

वर्णी (फार वाखाणिता झाला). शतगुणांसि खंडितां (शेंकडों दोऱ्या तोडीत असतां) तरणी (सूर्य) [स्वसुता (कर्णाला)] तयाहुनि (इंद्रापेक्षां) फार [वर्णी]. वरचेवर अति त्वरेनें नव्या दोऱ्या चापास लाविल्या, म्हणून इंद्रानें आपल्या मुलाची (अर्जुनाची) जी वाखाणणी केली, त्यापेक्षां अधिक वाखाणणी सूर्यानें आपल्या मुलानें शेंकडों दोऱ्या अचुक तोडल्या म्हणून केली–असा भाव.

१. विष+दिग्ध=विषयुक्त. २. चकित करिता झाला, मति कुंठित करून सोडली. ३. चापल्य. ४. जाणणारा, शहाणा. ५. हाय! हा दुःखोद्गार आहे. 'हा इति खेदे.' ६. बाणयोजनेमध्यें. कर्णास असें वाटलें कीं, शत्रूच्या धनुष्याची दोरी तोडण्याकरितां नेम धरून मारलेले आपले सर्व बाण नेम चुकून व्यर्थ गेले. म्हणून वाईट वाटून त्यानें 'हाय!' असा उद्गार काढिला, व ह्याप्रमाणें शरसंधान चुकल्याचा प्रसंग आजपावेतों कधींही आला नाहीं असें तो म्हणाला. ७. अन्वयः–जेंवि अंधानीं [तेंवि] शतबाणानीं हि गुण कैसा न देखिला? येथें 'जेंवि' ह्या पदाचा अर्थ 'जणूं कांहीं' असा करावा. म्हणजे गीत्यर्धाचा अर्थ असा होतो–जणूं कांहीं अंध झालेल्या शंभर बाणांनीं सुद्धां, धनुष्याची दोरी कशी पाहिली नाहीं? 'जेंवि' ह्याचा अर्थ 'जसें' असा केल्यास ह्या अर्थाइतकी मजा नाहीं. कारण, 'कसा देखिला नाहीं' असें पद घातलें आहे, म्हणजे अंधास अमुक एक गोष्ट दिसली नाहीं, तर त्यांत आश्चर्य वाटूं नये, पण कर्णाला आश्चर्य तर वाटलें आहे, व त्याचें निरसन 'जेंवि अंधानीं' असें म्हणून केलें आहे. म्हणजे 'जणूं कांहीं अंध झाल्यानें' दिसला नाहीं काय? अर्थात् संधान तर चुकावयाचें नसून, व बाणही शंभर सोडिले असून सुद्धां, जर दोरी तुटली जात नाहीं, तर ते बाण 'जणूं कांहीं' अंधच झाले असावे आणि म्हणून त्यांस दोरी दिसली नाहीं–असा भाव. ८. नगभिद्+तनय+अस्त्रें=पर्वताचें भेदन करणारा जो इंद्र, त्याचा मुलगा अर्जुन, त्याचीं अस्त्रें. येथें 'नगभित्तनयास्त्र' हें नाम साभिप्राय आहे, म्हणून **परिकरांकुर** अलंकार. ९. कृतार्थ, कृतकृत्य. १०. **अतिशयोक्ति.** ११. आठ दिशांस असणारे जे अष्ट दिग्गज, त्यांचीं मस्तकें. १२. पीडा. १३. पार्थाला. १४. राधा+हृद्+चोर=राधेच्या अंतःकरणाचें हरण करणारा, भगवान्

सावध होईं वीरा! पुनरपि अस्त्रासि शीघ्र [1]अभ्यासीं. ।
[2]पावेल कोण खळ जय संगर तुजसीं करूनि सभ्यासीं?' ॥ ५३
देतां धीर प्रभुनें, पार्थ मनामाजि धरुनि कोपातें, ।
[3]अभिमंत्रुनि [4]रौद्रास्त्रें, हस्तीं घे [5]अहिवरोग्ररोपातें. ॥ ५४
तों वृष [6]भूमिग्रस्तस्यंदनचक्रासि [7]उद्धरायातें, ।
उतरे, स्वरथा[8]खालें, करुनि [9]असें तुमुल युद्ध [10]रांया! तें. ॥ ५५
उद्धरण करूं पाहे कर्ण भुजांहीं धरूनि चक्राचें, ।
परि पृथिवी सोडीना, जाणों व्रत घेतलें चि [11]नक्राचें! ॥ ५६
[12]सप्तद्वीपा पृथ्वी वृष उचली च्यार [13]अंगुलें वरती, ।
[14]बडिशासि जसी [15]मत्सी, नुगळी चक्रासि, कांपली पर ती. ॥ ५७
कर्णेन [16]गीर्णचक्रा सप्तद्वीपा धरा [17]सशैलवना, ।
[18]चतुरंगुल[19]मुत्क्षिप्तेत्यूचे भगवान्मुनिर्विशुद्ध[20]मना:. ॥ ५८

---

श्रीकृष्ण. पंतांनीं एके ठिकाणीं श्रीकृष्णाला मोठ्या कौतुकानें व प्रेमानें 'शिनळ' असें म्हटलें आहे. (वनपर्व, अध्याय ४।२५ पहा). शुक, व्यास, नारदादि भागवतोत्तमांनीं तर मोठ्या प्रेमानें सद्गदित होऊन श्रीकृष्णाला 'चोरजारशिखामणि' असें म्हणून त्याच्या क्रीडांचें वर्णन केलें आहे. १५. भीति.

१. योजना कर, प्रयोग सुरू कर. २. अन्वयः—तुजसीं सभ्यासीं (तुझ्यासारख्या सज्जनाशीं) संगर (युद्ध) करूनि कोण खळ (दुष्ट) जय पावेल? अर्थात् कोणीही जय पावणार नाहीं—असा भाव. सभ्य=सभासद, कुलीन, सज्जन. प्रश्नालंकार. ३. समंत्रक योजना करून. ४. रुद्रास्त्रानें, पाशुपतास्त्रानें. ५. सर्पश्रेष्ठाप्रमाणें भयंकर अशा बाणाला. रोप=बाण. ६. भूमि+ग्रस्त+स्यंदन+चक्रासि=भूमीनें गिळिलेल्या रथाच्या चाकास. ७. वर काढण्याकरितां. ८. खालें=खालीं. ९. निकराचें. १०. धृतराष्ट्रा! ११. येथें गजेंद्रमोक्षकथा अनुसंधेय आहे. नक्र ज्याप्रमाणें गजेंद्राचा पाय कितीही बळ केलें तरी सोडीना, तद्वत् पृथ्वी रथचक्र सोडीना. उत्प्रेक्षालंकार. १२. सात आहेत द्वीपें जिच्यामध्यें, अशी. द्वीप=खंड. हीं खंडें चार, सात, नऊ किंवा तेरा, अशीं कल्पिलेलीं आहेत, व तीं सर्व पुराणांवरून पाहतां मेरुपर्वताभोंवतीं आहेत. सप्तद्वीपांचीं नांवें:—जंबु, कुश, प्लक्ष, शाल्मली, क्रौंच, शाक आणि पुष्कर. १३. बोटें. १४. सार्थान्वयः—ती (पृथ्वी) कांपली (कंपायमान झाली, थरारली) पर (परी), मत्सी जसी बडिशासि (गळास) [तशी] चक्रासि नुगळी (न सोडी). न+उगळी=न ओके. १५. मासळी. मत्स व मत्स्य—अशीं ह्या शब्दाचीं रूपें आहेत. १६. गिळिलें आहे चाक जिनें. १७. पर्वत व अरण्यें ह्यांसहवर्तमान असणारी. १८. चतुरंगुलम्=चार बोटें. हा शुद्ध संस्कृत प्रयोग असून तें क्रियाविशेषण आहे. १९. उत्क्षिप्ता+इति+ऊचे=उचलली असें बोलला. ऊचे=बोलला. ह्या क्रियापदाचा कर्ता मुनिः=व्यास. हें सर्व

सद्रसना नामातें कीं सोडी बंधुता न दायातें, ।
तैसी क्षिति चक्रातें; श्रम झाला फारसा तदा यातें. ॥ ५९

काळवदन कायातें, रथचक्रातें तसें क्षितिश्वभ्र, ।
बहुयत्नें हि न सोडी; कर्ण म्हणे, 'मरण यापुढें दभ्र!' ॥ ६०

त्या व्यसनीं तो पाणी आणी नेत्रांसि वृष, म्हणे, 'हाय!' ।
काय करील? न साहे तें, बहु मर्मी हि साहिले घाय. ॥ ६१

स्ववधोद्यतार्जुनातें कर्ण म्हणे, 'बळ तुझें अनंत, रहा ।

---

शुद्ध संस्कृत वाक्य आहे. अन्वयः-कर्णेन गीर्णचक्रा सप्तद्वीपा सशैलवना धरा चतुरंगुलं उत्क्षिप्ता इति विशुद्धमनाः भगवान् मुनिः ऊचे. अर्थः-रथचक्र जिनें गिळिलें आहे अशी, सप्तद्वीपा आणि पर्वत व वनें यांसहवर्तमान असलेली पृथ्वी कर्णानें चार बोटें वर उचलिली, असें शुद्ध अंतःकरणाचे भगवान् व्यासमुनि बोलते झाले. २०. ही गीति ज्या मूळ श्लोकाचें रूपांतर आहे, तो पुढील श्लोक पंतांनीं स्वतः लिहिलेल्या पोथींत ह्या गीतीपुढेंच लिहिला आहे:—सप्तद्वीपा वसुमती सशैलवनकानना । गीर्णचक्रा समुत्क्षिप्ता कर्णेन चतुरंगुलम्. ॥

१. सत्+रसना=साधूंची जिव्हा. ह्या गीतींत **उपमा** हा मुख्य अलंकार आहे. 'पृथ्वी चाक सोडीना' हें उपमेय वाक्य आणि 'सद्रसना नाम न सोडी, बंधुता दायातें न सोडी' हें उपमान वाक्य. 'तैसी' हें साम्यबोधक पद आणि 'न सोडी' हा साधारण धर्म आहे. म्हणून ही **पूर्णोपमा.** उपमानभूत जो ह्या गीतीचा पूर्वार्ध, त्यांत दोन उपमानें आहेत. तीं दोन्ही अप्रकृत होत. 'पृथ्वी चाक सोडीना' हें मुख्य किंवा प्रकृत वस्तु आहे. 'सद्रसना नामातें न सोडी' व 'बंधुता दायातें न सोडी' हीं दोन अप्रकृतें 'न सोडी' ह्या एकवार उक्त अशा 'न सोडणें' ह्या सामान्य धर्मानें जोडलेलीं असल्यामुळें हा **तुल्ययोगिता** अलंकार. हा **उपमा**लंकाराच्या पोटांत आलेला असल्यामुळें येथें अलंकारांचा संकर झाला आहे. २. किंवा. ३. भाऊबंद. भाऊबंदकीच्या खटल्यांतील हट्टवादीपणा व चिवटपणा लोकप्रसिद्ध व अनुभवसिद्ध आहे. ४. विभागातें, हिश्शास. ५. 'श्रम झाला' असाच एकवचनी वाक्प्रचार पंतांच्या वेळीं रूढ असावा. (मागें अध्याय २१।४४ पहा). ६. कर्णातें. ७. मृत्युमुख. ८. [प्राणिमात्राच्या] देहातें. ९. पृथ्वीचें भोंक. श्वभ्र=छिद्र, चीर, भेग. १०. कमी; तुच्छ. यःकश्चित् रथचक्र पृथ्वींतून वर काढतां येईना, त्यापेक्षां मरण बरें-असा भाव. ११. त्याच्या नेत्रांस पाणी येऊन त्यानें 'हाय! हाय!' असे दुःखोद्गार काढिले. १२. येथें 'नेत्रांसि' असा पाठ असणें इष्ट होतें. पण रा० पराडकर यांच्या प्रतींत 'नेत्रासि' असा एकवचनी पाठ आहे. कदाचित् तो मुद्रणदोष असावा. १३. अन्वयः-काय करील? मर्मी हि बहु घाय साहिले [पण] तें (कठीण प्रसंगीं हतबल व हताश होऊन जिवंत राहाणें) न साहे. अर्थः-कांहीं उपाय नव्हता. नाजुक जागीं लागलेले घाय आजपर्यंत त्यानें सोसले, पण रथचक्र ऐन प्रसंगीं काढवेना हा कमीपणा त्यास सहन होईना, म्हणून त्यामुळें त्याच्या डोळ्यांस पाणी आलें. ह्यावरून हताशपणाची परमावधि झाली, हें व्यक्त होतें. १४. स्व+वध+उद्यत+अर्जुनातें=आपल्या वधाकरितां तयार झालेल्या अर्जुनाला. १५. अगाध.

[१]स्वस्थ मुहूर्तभरि, [२]रणश्रद्धा पुरवील गा! [३]अनंतर [४]हां. ॥ ६२
[५]रक्षावा धर्म बुधें, [६]कुशलांचा धर्म हा निधी; राहें ।
स्थिर, जें करिसि निरायुधमथन करिल धर्महानि धीरा! हें. ॥ ६३
रथचक्र उद्धरूं दे; श्रुतिशास्त्रज्ञा! महारथा! [७]कुळज्या! ।
[८]साधु न हाणिति अरिला, पाहति अधृतायुध [९]व्यथाकुळ ज्या. ॥ ६४
[१०]जी कीर्ति पूर्वजांची, वृद्धिमती करिति पुनरपि कवी ती, ।
यश बुडवुनि अयशातें सुकुळक्षेत्रांत कुनर पिकवीती. ॥ ६५

---

१. मुहूर्तभरि स्वस्थ रहा=क्षणमात्र दम धर. मुहूर्त=(१) क्षणात्मक काल व (२) दोन घटिकात्मक काल—असे अर्थ आहेत. यांतील पहिलाच अर्थ घेणें येथें इष्ट आहे. २. युद्धाची हौस. ३. रथचक्र काढिल्यावर. ४. कर्णे. ५. सार्थान्वयः—बुधें (सुज्ञानें) धर्म रक्षावा; धर्म हा कुशलांचा (कल्याणांचा, हितांचा) निधी (ठेवा, संचय) [असे]; जें हें निरायुधमथन (ज्याच्या हातामध्यें शस्त्र नाहीं अशाचा नाश) करिसि [तें] धीरा! (शहाण्या!) धर्महानि करिल; [तेव्हां] स्थिर राहें (स्वस्थ रहा). मी निःशस्त्र आहें, अशा स्थितींत तूं मला मारिल्यास तुझ्या हातून अधर्म घडेल, तेव्हां असें करूं नको—असा कर्णाचा आशय. येथें योजिलेलें 'धीरा!' हें संबोधन फारच मार्मिक आहे. कालिदासानें 'धीर' कोण ह्याविषयी असें म्हटलें आहेः—'विकारहेतौ सति विक्रियंते येषां न चेतांसि त एव धीराः' (म्हणजे, लालसा उत्पन्न होणाऱ्या गोष्टी संनिध असूनही ज्यांचीं मनें डगमगत नाहींत, तेच धीर.) मी निरायुध असून संकटांत सांपडलों आहें, व तुझा शत्रु आहें, तेव्हां शत्रुनाशास ही वेळ बरी, असें एकाद्या यःकश्चित् मनुष्यास वाटलें असतें. पण तूं 'धीर' आहेस, तेव्हां ह्या प्रसंगीं तूं घटकाभर स्वस्थ रहा; नाहींपेक्षां तुझ्या शीलास बट्टा लागेल. 'धीरा!' हें संबोधन देऊन कर्णानें अर्जुनाची किती मनधरणी केली आहे, हें वाचकांच्या ध्यानांत वरील विवेचनावरून सहजच येईल. पुढील पांचही गीतींत केलेलें वर्णन आर्जवप्रसंगीं मनुष्य कसा दीन होतो, ह्याचें चांगलें द्योतक आहे. येथें 'न्याय्यात्पथः प्रविचलन्ति पदं न धीराः' ह्या भर्तृहरीच्या वचनाचें स्मरण होतें. 'सन्मार्ग सोडूनि भले न जाती' हें वरील उक्तीचें रूपान्तर आबालवृद्धांच्या परिचयाचेंच आहे. पूर्वार्ध सुभाषित आहे. ६. 'कुशलाचा' असा पाठ आहे. ७. येथें 'श्रुतिशास्त्रज्ञा' 'महारथा' व 'कुळजा' ह्या तिन्ही विशेषणांत खुबी ठेऊन, अर्जुनाच्या गुणांचें वर्णन केलेलें आहे, म्हणून येथें **परिकरालंकार.** तूं धर्म व शास्त्र यांनीं घालून दिलेले निर्बंध जाणणारा आहेस, मोठा पराक्रमी आहेस व कुलीन आहेस, तेव्हां ज्याच्या हातांत शस्त्र नाहीं त्याच्यावर हल्ला करणें, हें तुला शोभत नाहीं—हा भावार्थ. ८. *अन्वयः—ज्या अरिला (शत्रूला) व्यथाकुळ (संकटांत पडलेला, पीडित झालेला) [व] अधृतायुध (निःशस्त्र) [असा] पाहति, [त्या] (शत्रूला) साधु न हाणिति (मारीत नाहींत).* हें सुभाषित आहे. ९. बाणांनीं जर्जर. १०. सार्थान्वयः—जी पूर्वजांची कीर्ति ती कवी (सुज्ञ लोक) पुनरपि वृद्धिमती (वाढती) करिति (करतात, अर्थात् पूर्वजांची कीर्ति शहाणे लोक

सत्पुरुषा! न करावें कापुरुषाचीर्ण[1] कर्म, थांब केसा;[2] ।
हो राजहंस, होसी मलिनें कर्मे करूनि कां बकसा[3]? ॥ ६६
वर्णिति तुज युद्धीं त्वां केले जे सायकार्त वीर्यानें,[4] ।
म्हणती, 'होउनि केली द्विभुज पृथा माय कार्तवीर्यानें[5]'. ॥ ६७
तूं वेदांतावभृथस्नात[6] ख्यात[7] स्वसत्क्रियायुक्त,[8] ।
दिव्यास्त्रज्ञा! नाहीं स्वगुरूचें विसरलासि तूं उक्त[9]. ॥ ६८
तूं स्वरथीं, क्षितिवरि[10] मीं, तूं सायुध, मीं अशस्त्रकवच[11], रणीं, ।
न वधावें मज, जों मीं[12] रथचरणीं, लाग तूं हि भवचरणीं. ॥ ६९

---

वाढवितात); कुनर (नीच लोक, मूर्ख) यश बुडवुनि सुकुळक्षेत्रांत (उत्तम कुल हेंच शेत, त्यामध्यें) अयशातें (दुर्लौकिकातें) पिकवीती (उत्पन्न करतात). हें सुभाषित आहे.

१. कापुरुष+आचीर्ण=नीच मनुष्यानें आचरण्याजोगें. २. हें क्रियाविशेषण येथें आर्जवदर्शक आहे. ३. बकासारखा=ढोंगी, दांभिक. ४. सान्वयार्थः–त्वां वीर्यानें (आपल्या पराक्रमानें) युद्धीं जे (वीर) सायकार्त (बाणांनीं पीडित) केले [ते] तुज वर्णिति (प्रशंसा करितात) [व] म्हणती, कार्तवीर्यानें (सहस्रार्जुनानें) द्विभुज होउनि (दोन हात आहेत ज्याला असा होऊन) पृथा (कुंती) माय केली. सहस्रार्जुनानें दोन हातांचा होऊन कुंतीच्या पोटीं जन्म घेतला, असें म्हणतात. म्हणजे दोन हातांच्या अर्जुनाचा पराक्रम सहस्रार्जुनाच्या पराक्रमाच्या बरोबरीचा आहे. ५. कार्तवीर्य–महिष्मती नगरीचा राजा कृतवीर्य ह्याचा हा मुलगा. ह्याचें मूळ नांव अर्जुन असें होतें, पण ह्यास हजार हात असल्यामुळें ह्याचें सहस्रार्जुन असें नांव पडलें होतें. ह्यानें जमदग्नी ऋषीची कामधेनु हरण करून नेण्याचा प्रयत्न केल्यामुळें परशुरामाचें व याचें युद्ध होऊन त्यांत ह्याचे सर्व हात तुटून हा मरण पावला. (महाभारत, वनपर्व, अध्याय ११५–११७ पहा). ६. वेदांत+अवभृथ+स्नान=वेदांतरूप पाण्यामध्यें स्नान केलेला, अर्थात् तूं वेदवित् आहेस. अवभृथस्नान=यज्ञसमाप्तीनंतर स्त्रियेसह दीक्षासमाप्तीसाठीं जें स्नान करितात तें. ७. प्रसिद्ध. तूं वेदवित् व कर्तव्यदक्ष आहेस अशी तुझी कीर्ति आहे–असा भाव. ८. आपल्या उत्कृष्ट कर्तव्यामध्यें रत आहेस. समुच्चयालंकार. ९. उपदेश. गुरू कधींही अधर्मयुद्ध करण्यास सांगत नाहीं, तेव्हां तो उपदेश ध्यानांत ठेऊन मी घटकाभर संकटांत आहें तोंपर्यंत मजबरोबर युद्ध न करतां स्वस्थ रहा–असा भाव. कर्णाचें अर्जुनाशीं पक्कें वैर असतांही आपण संकटांत सांपडलों आहों अशा प्रसंगीं आपणास त्यानें मारूं नये म्हणून कर्ण त्याचा कसा स्तुतिपाठ करीत आहे, हें वाचकांच्या सहज ध्यानांत येईल. १०. पृथ्वीवर, जमिनीवर (रथविहीन). ११. नाहीं शस्त्र व कवच (चिलखत) ज्याला असा. विरुद्धगुणन्यासालंकार. १२. अन्वयः–जों मीं रथचरणीं [आहें] (जोंपर्यंत रथचक्र काढण्याकरितां रथाखालीं उतरलेला आहें) [तोंपर्यंत] तूं हि भवचरणीं लाग (यश प्राप्त होवो म्हणून परमेश्वरचरणीं लाग). येथें कर्णानें चांगलाच टोमणा अर्जुनास दिला आहे. कारण परमेश्वराची आराधना केल्यावांचून, केवळ आंगच्या जोरावर सामना करण्यांत मी तुला हार जाणार नाहीं, तेव्हां तुला यश कसें मिळेल?–असा ध्वनि.

[1]भ्यालों न तुज हरिस ही, जो न तुला विमुख काय कातर तो? ।
कथितों यास्तव, कीं जन धर्में भवसिंधु, नायका! तरतो'. ॥ ७०

---

## अध्याय एकुणपन्नासावा.[3]

कृष्ण म्हणे, 'राधेया! भला बरा स्मरसि आजि धर्मातें; ।
नीचें[4] व्यसनीं बुडतां निंदिति देवासि, न स्वकर्मातें; ॥ १
जेव्हां तूं दुर्योधन दुःशासन शकुनि ऐकमति[5] झालां, ।
कैसे कपटद्यूतीं[7] चित्तीं[6] हि न धर्म लंघितां भ्यालां? ॥ २
जेव्हां सभेसि नेली पांचाळी, मानिलें मनीं शर्म[8], ।
तेव्हां गेला होता कोठें राधासुता[9]! तुझा धर्म? ॥ ३
राज्य न देसी, करवुनि वनवासाज्ञातवास ही, जेव्हां, ।
गेला होता कोठें धर्म तुझा सूतनंदना! तेव्हां? ॥ ४
केले दग्ध जंतुगृहीं[10] त्वां पांडव वारणावतीं जेव्हां, ।
गेला होता कोठें धर्म तुझा सूतनंदना! तेव्हां? ॥ ५
चारुनि विषान्न[11] भीमा सर्प डसविले नृपें[12]; असें खोटें ।
कर्म करवितां, कर्णा! होता तव धर्म तेधवां कोठें? ॥ ६

---

१. सार्थान्वयः–तुज, हरिस ही (श्रीकृष्णाला सुद्धां) न भ्यालों. जो तुला विमुख न (ज्यानें तुला पाठ दाखविली नाहीं) तो कातर (भयचंचल) काय? (न–असा भाव). [हे] नायका! (सेनापते!) यास्तव कथितों कीं, जन (मनुष्य) धर्में (धर्माच्या जोरावर) भवसिंधु (संसारसिंधु) तरतो (तरून जातो). ह्याकरितां अधर्म करूं नये. पूर्वार्धांत **प्रश्नालंकार** व उत्तरार्ध सुभाषित आहे. २. मित्रा. ३. या अध्यायांत मुळांतील अध्याय ९१ पासून अध्याय ९५ अखेरपर्यंतचा कथाभाग आहे. ४. सार्थान्वयः–नीच (अधम लोक) व्यसनीं बुडतां (संकटांत पडले असतां) देवासि निंदिति, स्वकर्मातें न [निंदिति]. चांगल्या दिवसांत वाईट गोष्टी करावयाच्या, त्या वेळीं देवाची आठवण ठेवावयाची नाहीं, व सत्कर्म आचरावयाचें नाहीं; व मग कठीण प्रसंग ओढवला म्हणजे देवास दोष लावावयाचा. पण आपण ज्या प्रकारचीं कर्में केलीं त्यांचें हें फळ आहे, असें नीच मनुष्यांस कळत नाहीं. हें गीत्यर्ध सुभाषित आहे. ५. सर्वांचें एकमत झालें. ६. मनामध्यें सुद्धां; मग कृतीची गोष्ट लांबच राहिली. ७. धर्मबाह्य आचरण करितांना. ८. आनंद. ९. ह्या विशेषणांत खोंच असून तूं 'कुलज' नाहींस, असें ह्यांत ध्वनित केलेलें आहे. **परिकरांकुरालंकार.** पुढील दोन गीतींतही याचप्रमाणें 'सूतनंदना!' असें विशेषण मुद्दाम योजिलेलें आहे. १०. लाक्षागृहामध्यें. ११. विषमिश्रित अन्न. १२. दुर्योधनानें.

[1]फेडी वस्त्र सतीचें जेव्हां उघडें करावया आंग, ।
गेला होता कोठें धर्म तुझा तेधवां? [2]वृषा! सांग. ॥ ७
'[3]शाश्वत नरकीं पडले पति पहिले षंढतिल, वरीं अन्या.' ।
बोलुनि असें सभेंत द्रुपदाची गांजिली तुवां कन्या. ॥ ८
[4]खरदुर्वाक्यशरशतें भेदित होतासि जेधवां मर्म, ।
तेव्हां गेला होता कोठें राधासुता! तुझा धर्म? ॥ ९
अभिमन्यु बाळ [5]बहुतीं वधितां त्वां [6]वारिलें न तें कर्म, ।
तेव्हां गेला होता कोठें [7]राधासुता! तुझा धर्म? ॥ १०
पूर्वीं धर्म न रुचला, त्यजिला निर्पटूनि तो जसा [9]कुंचला, ।
[10]आतां चि बरा सुचला! धर्मगृहा, सर्व व्हा परासु, चला. ॥ ११
[11]नळ होय धर्मराजा, [12]कलहोत्सुक [13]पुष्कर हि तुम्हीं सर्व. ।
बळ होतें सत्याचें, खळ हो! तुमचा न चालिला गर्व. ॥ १२
मागें चि तुम्हीं भजतां धर्माला तरि तुम्हांसि वांचवितों[14]. ।

---

१. द्रौपदीचें. (सभापर्व, अध्याय ४।५ पहा). २. वृष=(१) बैल, (२) शूद्र. वृष म्हणजे धर्म असाही अर्थ आहे. तेव्हां तूं आपणास 'वृष' (धर्म) म्हणवितोस, पण वास्तविक तुझें वर्तन नीच कुळांत जन्मलेल्या पुरुषाप्रमाणेंच, अर्थात् अधमपणाचें आहे, असा गर्भितार्थ. ३. सार्थान्वयः— पहिले षंढतिल पति शाश्वत नरकीं पडले (कायमच्या दास्यत्वनरकांत पडले) [म्हणून] अन्या वरीं (दुसऱ्याशीं लग्न लाव). (सभापर्व, अध्याय ६ गीति २२ पहा). ४. खर+दुर्वाक्य+शर+शतें=कठीण अशा अपशब्दरूप शंभर बाणांनीं. ५. अनेकांनीं मिळून. ६. मोडा घातला नाहींस, त्याचें निवारण केलें नाहींस. ७. पंतांनीं येथें कर्णास 'राधासुत' असें म्हणून त्याचा नामर्दपणा ध्वनित केला आहे. वीरास न शोभणारें असें एकादें कृत्य एकाद्या वीराच्या हातून घडलें असतां त्याला बायकांच्या नांवावरून प्राप्त झालेलें उपपद लावून त्याचा उपहास करण्याचा प्रकार पंतांनीं अनेक ठिकाणीं केला आहे. ८. समूळ. 'उपटूनि' असा अन्य पाठ. ९. काजरा, विषविशेष. १०. अन्वयः—[तुला] आतां चि (संकटसमय प्राप्त झाला तेव्हां) [धर्म] बरा सुचला. सर्व परासु (गतप्राण) व्हा व धर्मगृहा (यमसदनास) चला (जा). **पर्यायोक्त.** वरील दहा गीतींत कर्णाला संबोधनपर जीं नांवें दिलीं आहेत, तीं ध्यानांत ठेवण्याजोगीं आहेत. दर वेळेस 'राधासुता' 'सूतपुत्रा' असें म्हणून त्याच्या हलक्या कुळाचा नामनिर्देश करून श्रीकृष्णानें त्याचें वर्म काढिलें आहे, व 'तुजसारख्या कुलहीनास धर्माची गोष्ट योग्य वेळीं कोठून सुचणार?' असें ध्वनित केलें आहे. ११. पंतकृत वनपर्व, अध्याय ४ पहा. १२. कलहप्रिय. १३. नळराजाचा भाऊ. १४. ह्याचा कर्ता 'धर्म.'

[1]आतां मरा, न वांचे दीप्तगृहीं जो न [2]तोय [3]सांचविता. ॥ १३
मागें चि धर्म करितां, जरि देतां राज्य, धर्म [4]वांचवितां. ।
न जगे तो [5]दुर्भिक्षव्यसनापूर्वी न धान्य [6]सांचविता. ॥ १४
[7]आतां रक्षील कसा धर्म, तुम्हीं वित्तमद्यमत्तानीं ।
जो लोटिला दहादां स्वहित हि मानूनि अहित लत्तानीं? ॥ १५
[8]रक्षावा धर्म असा करिसी उपदेश, तरि असे मान्य. ।
[9]रक्षितसों धर्मातें, आम्हांला धर्म ठाउका नान्य. ॥ १६
हा धर्म [10]मूर्तधर्म [11]प्रभु; यातें भजतसों, असा [12]मान्य ।
लोकांत कोण दुसरा? सामान्य नव्हे चि हा, [13]असामान्य.' ॥ १७
[14]आश्रितजनाभिमानी प्रभु बोले जेधवां असें रागें, ।
निश्वास वृषें [15]लज्जावनतमुखें सोडिला जसा [16]नागें. ॥ १८
[17]न वदे कांहीं च, रथीं वेघे, घे सूर्यसूनु चापातें, ।

---

१. जळत्या घरांत. २. पाणी. ३. सांठविणारा. अर्थसादृश्य:–'संदीप्ते भवने तु कूपखननं प्रत्युद्यमः कीदृशः'–हें सुभाषित प्रसिद्धच आहे. (मागें अध्याय ३८।७६ पहा). ४. तुम्हांला वांचविता–असा भाव. ५. दुष्काळरूप विपत्तीपूर्वी. ६. हें सुभाषित आहे. ७. सार्थान्वय:–वित्तमद्यमत्तानीं (लक्ष्मीरूप दारूनें धुंद झालेल्यांनीं) तुम्हीं अहित स्वहित हि मानूनि (अकल्याणास कल्याणच समजून) जो धर्म लत्तानीं दहादां लोटिला (लाथाडून दिलात) [तो] आतां (संकट-काळीं) [तुम्हां] कसा रक्षील? तो तुमचें संरक्षण कसें करील? अर्थात् संरक्षण करणार नाहीं–असा भाव. ८. अन्वयार्थ:–धर्म रक्षावा (धर्म राखावा) असा उपदेश करिसी, तरि [तो उपदेश आम्हां] मान्य (संमत) असे. धर्मातें रक्षितसो (रक्षण करीत आलों), आम्हांला अन्य (दुसरा–धर्मराजाहून इतर) धर्म न ठाउका (माहीत नाहीं). 'धर्म'पदावर श्लेष ठेविला आहे. ९. मागें अध्याय ३५ गीति ६२ पहा. १०. धर्माचा अवतार. ११. समर्थ. १२. सन्मान्य, पूज्य. १३. अलौकिक. १४. आश्रितजनाचा कैवारी. हें 'प्रभु' श्रीकृष्ण ह्याचें विशेषण. १५. लज्जेनें खालीं घातलें आहे तोंड ज्यानें, अशा कर्णानें. १६. सर्पानें. साप सुस्कारा टाकतो त्यांत विष असतें, व कर्णानें सुस्कारा टाकिला त्यांत दुर्घटकर्म करण्याचा संकल्प हें विष होतेंच. ही उपमा देऊन पंतांनीं असें ध्वनित केलें आहे कीं, दुःखोच्छ्वास टाकीत स्वस्थ न बसतां कर्णानें घोर युद्धकर्म आरंभिलें. येथें पंतांनीं थोड्यांत खुबीदार व बहारीची उपमा देऊन पुढील कथाभाग सूचित केला आहे. सत्कवि थोड्यांत पण मार्मिकपणें किती अर्थ दर्शित करितात, ह्याचें हें एक चांगलें उदाहरण आहे. १७. अन्वयार्थ:–[तो] सूर्यसूनु (कर्ण) कांहीं च न वदे; रथीं वेघे (रथावर चढला); [व] सूनुच्या (स्वपुत्राच्या) पातें (नाशानें) शक्रासि (इंद्रास) मूर्च्छित कराया चापातें घे [व] बाण सोडी (बाण सोडिता झाला). 'न वदे कांहींच, रथीं वेंघे, तो सूर्यसूनु, चापातें। जोडी बाण, कराया मूर्च्छित...'असा पाठभेद आहे. वेघे=वेंघे, चढे.

सोडी बाण, कराया मूर्च्छित शक्रासि सूनुच्या पातें. ॥ १९
तेव्हां [1]परपुरुष म्हणे, 'पार्था! दि[2]व्यास्त्रवात सोडावा, ।
झोडावा, मोडावा वै[3]रद्रुमकर्ण; बाण जोडावा.' ॥ २०
[4]कर्णावरि बहु कोपे पार्थ जई तेधवां अनळसाचा ।
देह ज्वाळामाली भासे त्या रणमखीं अनळ साचा. ॥ २१
[5]त्यावरि करि प्रयोग ब्रह्मास्त्राचा चि कर्ण, वाराया; ।
तेणें चि पार्थ शमवी; भेटे अर्णव चि अर्णवा[6] राया! ॥ २२
योजी [7]अनळास्त्र विजय, जें भस्मदशेसि दा[8]रुणा नेतें; ।
कर्णानें नाशाप्रति नेलें तत्काळ [9]वारुणानें[10] तें. ॥ २३
[11]निर्मिति वरुणास्त्रज घन गगन व्यापूनि अंधतमसातें; ।

---

१. परमात्मा श्रीकृष्ण. २. उत्कृष्ट अस्त्ररूपी वारा. ३. वैराचें झाड जो कर्ण. हें **रूपक** नामी आहे. शिवाय येथें **कारकदीपक** अलंकार आहे. ४. सार्थान्वयः–जई (जेव्हां) पार्थ (अर्जुन) कर्णावरि बहु कोपे, तेधवां (तेव्हां) अनळसाचा (आलस्यरहिताचा अर्थात् अर्जुनाचा) देह, त्या रणमखीं (त्या युद्धरूप यज्ञामध्यें) ज्वाळामाली (ज्वालायुक्त) साचा (साक्षात्) अनळ (अग्नि) भासे. वरील गीतींत प्रभूनें अर्जुनास बाण जोडण्यास सांगितलें व त्याप्रमाणें तत्काळ अर्जुनानें केलें, हें 'अनळसाचा' ह्या पदानें व्यक्त होतें. अग्नीला जशी ज्वाला, त्याप्रमाणें अर्जुनदेहास कोप व ज्याप्रमाणें ज्वालायुक्त अग्नि असतो, त्याप्रमाणें कोपयुक्त असा अर्जुनाचा देह होता. यज्ञामध्यें अग्नीची ज्वाला उत्कृष्ट असावयास पाहिजे; त्याप्रमाणें युद्धामध्यें वीराच्या आंगीं कोप पाहिजेच. ५. सार्थान्वयः–त्यावरि (वर सांगितल्याप्रमाणें अर्जुन कोपयुक्त झाला असतां) [त्यातें] वाराया (निवारण करण्याकरितां) कर्ण ब्रह्मास्त्राचा चि प्रयोग करि; पार्थ [तें ब्रह्मास्त्र] तेणें चि (ब्रह्मास्त्रानेंच) शमवी. (अर्थात् अर्जुनानेंही ब्रह्मास्त्रच सोडून कर्णास्त्राचा प्रभाव चालूं दिला नाहीं–असा भाव). राया! (हे धृतराष्ट्रा!) अर्णव चि (समुद्रच) अर्णवा भेटे. **निदर्शना.** ६. समुद्राला. **दृष्टांतालंकार.** ७. अग्न्यस्त्र. ८. जें दारुणा भस्मदशेसि नेतें=जें अगदीं पूर्णपणें भस्म करून टाकतें तें. ९. पर्जन्यास्त्रानें. १०. अग्न्यस्त्र. ११. सार्थान्वयः–वरुणास्त्रज घन (वरुणास्त्रापासून उत्पन्न झालेले मेघ) गगन (आकाशातें) व्यापूनि, अंधतमसातें (गाढ अंधकारातें) निर्मिति (उत्पन्न करिते झाले). तेव्हां डोळस लोक ही तमसातें (अंधकारातें) पाहुनि अंध झाला. डोळस माणसासही कांहीं दिसेना इतका गाढ अंधार होता–असा भाव. अर्थसादृश्यः–'लिम्पतीव तमोऽङ्गानि वर्षतीवाञ्जनं नभः। असत्पुरुषसेवेव दृष्टिर्निष्फलतां गता.॥' (मृच्छकटिक–प्रथमांक). पंतांच्या गीतींत नेहमीं पूर्वार्धातील व उत्तरार्धातील यमकें भिन्नार्थाचीं असतात. पण येथें 'तमसातें' ह्या पदाचा अर्थ 'अंधकारातें' असाच दोनही ठिकाणीं घ्यावा लागतो. आतां 'अंधतमसातें' येवढें यमकपद आहे असें घेऊन त्यापैकीं 'अंध' हें पद खालील

तेव्हां झाला पाहुनि डोळस ही लोक अंध तमसातें. ॥ २४
जलदांधकार[1] हरिला[2] पार्थें योजूनि पावना[3] सारा,[4] ।
भक्तें[5] मोह[6] जसा हरिनामा[7] योजूनि पावना[8] सारा.[9] ॥ २५
वरुणास्त्रतिमिर[10] पार्थें हरिलें तत्काळ पावनें सारें, ।
भक्तें अज्ञान जसें हरिनामें विश्वपावनें सारें. ॥ २६
कर्ण स्वास्त्रविनाशें क्षोभे, काढी महोग्र शर, भाचा ।
शौरीचा[11] माराया, वेगगुणें जो सखा चि शरभाचा.[12] ॥ २७
जन म्हणति, 'पावला या कर्णशरें आजि पार्थ हा हानी.' ।
त्या काळीं नभ भरिती पांडवपांचाळसार्थ[13] हाहानीं.[14] ॥ २८

---

यमकांत तोडून तें 'लोक' ह्या शब्दाचें विशेषण घेतलें आहे, व पूर्वार्धांत 'अंधतमसातें' असा एक शब्द घेतला आहे; अशा रीतीनें यमकाच्या भिन्नार्थाची संपादणी करितां येईल. किंवा उत्तरार्धांत 'अंधतम-सा तें' अशीं पदें पाडून पुढीलप्रमाणें अन्वय करावा:-तें (वारुणास्त्र) पाहुनि डोळस ही लोक अंधतमसा (अत्यंत आंधळ्यासारखा) झाला.

१. जलद+अंधकार=मेघांनीं केलेला अंधकार. २. नाहींसा केला. ३. वायव्यास्त्र. ४. संपूर्ण. हें 'जलदांधकारा'चें विशेषण. ५. भगवद्भक्तानें. ६. माया, अज्ञान. ७. परमेश्वराच्या नामातें. ८. पवित्र करण्याविषयीं. ही चतुर्थी आहे. ९. सारभूत अशा. हें 'हरिनामा'चें विशेषण. भगवद्भक्त देवाचें नामस्मरण करून मायामोह घालवितात. युगायुगाचे ठायीं निरनिराळीं कर्में सांगितलेलीं आहेत. त्यांस अनुसरून कलियुगामध्यें नाममाहात्म्य हें मुख्य म्हणून सांगितलेलें आहे. 'कलियुगीं नाम चि तें सार' हें वचन प्रसिद्ध आहेच. १०. वरुणास्त्रामुळें उत्पन्न झालेला अंधःकार. गीति २५ व २६ ह्या अगदीं एकार्थवाचक आहेत, म्हणजे एकच अर्थबोध पर्यायशब्दांनीं केला आहे, हें सहज ध्यानांत येण्याजोगें आहे. शब्दयोजना, अर्थनिष्पत्ति व प्रयोगसरणी ह्या गोष्टींवरून पाहातां अशा गीति कां याव्यात असा प्रश्न साहजिकच उद्भवतो. ह्यावर अशी कल्पना बसते कीं, पंतांनीं २५ वी गीति प्रथम लिहिली, आणि ती लिहून झाल्यावर ती बैठक आटपली. दुसऱ्या बैठकीस, ही गीति लिहिली गेली आहे, हें लक्षांत न येऊन पुनः तींतील विषयापासून आरंभ होऊन त्याच अर्थाची दुसरी गीति लिहिली गेली. किंवा दुसरी अशी कल्पना करितां येईल कीं, एकाच अर्थाच्या दोन गीति पंतांनीं लिहिल्या व त्यांतील सरस वाटेल ती कायम करावयाची हा हेतु. पण पंतांच्या लक्षांत हें न राहिल्यामुळें त्या दोनही तशाच राहिल्या. ह्यावरून काव्यरचना करितांना पंत मनासारखें पद्य तयार करण्यासाठीं कधीं कधीं दोन दोन प्रयत्न करीत असत, असें वाटतें. (मागें अध्याय ३३ गीति ४१ व ४२ आणि पृष्ट २५८ टीप ७ पहा). ११. वसुदेवाचा भाचा (अर्जुन). १२. सिंहास मारणारा आठ पायांचा हिमालय पर्वतांत राहाणारा प्राणी जो शरभ, त्याच्या तोडीचा. १३. पांडव आणि पांचाल यांचे समुदाय. १४. 'हा हा' 'हाय! हाय!' अशा दुःखोद्गारांनीं

शर जोडितां गुणा[१]तें सुर हाहाकार अं[२]बरीं करिती, ।
[३]कांपे अचला अचलांसह जरि सर्वसहा खरी तरि ती[४]. ॥ २९
[५]शर सोडिला रविसुतें, धीरजनें हि स्वधीर, यामागें ।
जो सोडिला चि नव्हता व्य[६]सनांत कधीं हि; मणि जसा [७]नागें. ॥ ३०
तो शर [८]गरधर-[९]खरसा [१०]पविसा, [११]रविसा, [१२]स्मरारिसायकसा, ।
पार्थभुजांतरिं शिरला [१३]वल्मीकामाजि [१४]नागनायकसा. ॥ ३१
त्या खरशरप्रहारें विव्हल झाला [१५]महेंद्रसुत, [१६]राया ! ।
जरि होता निकट कुशल [१७]मंत्री [१८]प्रभु बाणसर्प उतराया. ॥ ३२
तेव्हां 'मीं को[१९]ण ?' असें अर्जुन, पावोनि कांप, न समजला, ।
[२०]रायाँ ! रोमांचित तद्देह न भासेल कां [२१]पनस [२२]मजला ? ॥ ३३

---

१. 'गुणाशीं' असें पाठान्तर. २. आकाशांत. ३. सार्थान्वयः—अचला (पृथ्वी) जरि खरी सर्वसहा (सर्व सोसणारी) तरि ती अचलांसह (पर्वतांसह) कांपे (कंपायमान झाली, थरारली). **विरोधालंकार.** ४. मागें अध्याय ८ गीति १५ पहा. ५. सार्थान्वयः—रविसुतें (कर्णानें) शर सोडिला. जसा नागें (सर्पानें) मणि (मस्तकांतील रत्न) [कधींही न सोडिलाचि तसा] जो [स्वधीर] यामागें (ह्यापूर्वीं, अर्थात् हा पहिलाच प्रसंग) व्यसनांत (संकटसमयीं) कधीं हि सोडिला चि नव्हता [तो] स्वधीर (स्वतःची हिंमत) धीरजनें हि (धैर्यशीलांनीं सुद्धां) [सोडिला]. हिंमतबहाद्दर सुद्धां लटपटले—असा भाव. 'सोडिला' या क्रियेचे कर्ते 'शर' आणि 'धीर'. पूर्वार्धांत **दीपकालंकार** आहे. ६. संकटांत. 'व्यसनं त्वशुभे सक्तौ' इति मेदिनी. ७. सर्पानें. कित्येक प्राण्यांच्या मस्तकांत मणि अथवा मुक्ताफळें सांपडतात, अशी समजूत आहे:—करीन्द्रजीमूतवराहशंखमत्स्याहिशुक्त्युद्भववेणुजानि । मुक्ताफलानि प्रथितानि लोके तेषां तु शुक्त्युद्भवमेव भूरि. ॥ (कुमारसंभव, सर्ग १ श्लोक ६ टीका पहा). ८. सर्पश्रेष्ठासारखा भयंकर. गरधर=विषातें धारण करणारा. पूर्वार्धांत **अनुप्रास** अलंकार असून रचना फारच कर्णमधुर आहे. ह्या पूर्वार्धांत दिलेलीं विशेषणें मोठीं मजेचीं आहेत. ९. 'गरधर खरसा' असें पाठान्तर. खरसा=कावळ्यासारखा. नेमका व्रण पाहून टोंकी मारणारा जसा कावळा, त्याप्रमाणें नेमकें मर्मस्थान पाहून तेथें लागणारा. १०. पविसा=इंद्राच्या वज्राप्रमाणें—अर्थात् दुर्भेद्य. ११. रविसा=तेजोमय. १२. स्मरारिसायकसा=शंकराच्या बाणाप्रमाणें—अर्थात् अमोघ. ह्या अर्धांत **मालोपमा** व **सार** हे अलंकार आहेत. १३. वारुळामध्यें. १४. सर्पराजाप्रमाणें. १५. इंद्रपुत्र अर्जुन. १६. धृतराष्ट्रा! १७. *मांत्रिक.* उतराया=बाणरूपी सर्पाच्या विषाचा परिणाम दूर करण्यास्तव. सर्पाचें विष मंत्रानें उतरतें, अशी समजूत आहे. १८. कृष्ण. १९. मीं कोण [हें] न समजला=देहभान विसरला. २०. सार्थान्वयः—राया ! (धृतराष्ट्रा !) रोमांचित (पुलकित, अंगावर आलेले आहेत कांटे असा) तद्देह (अर्जुनाचा देह) मजला (संजयाला) पनस (फणस)

हस्तापासूनि स[1]गुण गांडीव हि जिष्णुचें गळोनि पडे, ।
जा[2]णों आपण अक्षत, पाळक सक्षत, म्हणोनि खेद घडे. ॥ ३४
ब[3]हुदूरसूक्ष्मदर्शननिपुणें भ्र[4]मलीं परंतु श[5]रपातीं; ।
जा[6]णों लज्जित नयनें वदन न दाविति करूनि वर पातीं. ॥ ३५
ऐसा निजभुजविक्रम दावुनि सर्वां भ[7]टांसि शु[8]द्धरणीं, ।
उतरे वृष दा[9]वाया भू[10]ग्रस्तरथांघ्रिच्या हि उ[11]द्धरणीं. ॥ ३६
बहु यत्न करी, प्रार्थी, परि धरिलें सोडिना चि चाक र[12]सा, ।
द्वि[13]जशाप मान्य पतिसा गुरु, तीस न कर्ण मान्य चाकरसा. ॥ ३७

---

[असा] कां न भासेल? फणस सकंटक असतो, त्याप्रमाणें अर्जुनाचा देह रोमांचयुक्त झालेला दिसला—असा भाव. **प्रश्नालंकार.** २१. फणस. ह्याच दृष्टांत मागें अध्याय ३१।२ मध्यें योजिलेला आहे. २२. मला (संजयाला). [संजय धृतराष्ट्राला युद्धाचें वृत्त सांगत आहे].

१. दोरीसहवर्तमान. २. सार्थान्वयः—जाणों (जणूं काय), आपण (गांडीव धनुष्य) अक्षत (अविद्ध); पाळक (धारण करणारा अर्जुन) सक्षत (विद्ध); म्हणोनि (ह्याकरितां) खेद घडे (त्या गांडीव धनुष्यास विषाद वाटला). अर्जुनाचें देहभान नाहींसें झाल्यामुळें त्याचे हातून धनुष्य गळून पडलें; यावर केलेली **उत्प्रेक्षा** मोठी मौजेची असून ती 'सगुण' ह्या **सश्लेष** पदानें फारच खुलते. कारण जर गांडीव सगुण नसतें, अर्थात् गुणानभिज्ञ असतें, तर त्यास उत्प्रेक्षित केलेलें ज्ञान कोठून असणार? हें उघड आहे. सगुण=सद्गुणांनीं युक्त; (पक्षीं) ज्यास दोरी आहे असें. ३. अत्यंत लांबचा, अर्थात् दूरवरचा, पदार्थ निरखून पाहाण्यांत तरबेज. हें 'नयनें' ह्याचें विशेषण. ४. मोह पावलीं. अर्थात् नेहमींचें जें पाहण्याचें काम, तें करीतनाशीं झालीं. म्हणजे डोळे नुसते गरगर फिरूं लागले. ५. बाणप्रहार झाल्यावेळीं. ६. पूर्वार्धांतील 'भ्रमलीं' ह्या पदावर **उत्प्रेक्षा** केली आहे. अन्वयः—जाणों लज्जित [अशीं तीं] नयनें पातीं वर करूनि (पापण्या वर करून) वदन (डोळ्यांचा आंतील भाग) न दाविति. अर्जुनाचे डोळे वरील प्रहारामुळें मिटले—असा भाव. ७. योद्ध्यांस, वीरांस, '**भटः** स्यात्पुंसि वीरे च विशेषे पामरस्य च' इति मेदिनी. ८. धर्मयुद्धांत. ९. ह्याचें कर्म 'निजभुजविक्रम' अध्याहृत. १०. पृथ्वीनें गिळिलेल्या रथचक्राच्या खालच्या भागाच्या. ११. वर काढण्याच्या कामीं. १२. पृथ्वी. १३. सार्थान्वयः—गुरु (तीव्र) द्विजशाप (ब्राह्मणशाप) (शांतिपर्व—अ० २ पहा) तीस (पृथ्वीस) पतिसा (पतीप्रमाणें. पृथ्वीचा पति म्हणजे नृप त्याप्रमाणें) मान्य (प्रमाण); **कर्ण** चाकरसा (चाकराप्रमाणें; **कर्ण** सूतपुत्र होता म्हणून 'चाकरसा') न मान्य. ह्या अर्थात पृथ्वीनें केलेली कल्पना मौजेची आहे. ब्राह्मणशाप तिला नृपाज्ञेप्रमाणें मान्य करावा लागला; व **कर्ण** म्हणजे अर्थात् सूतपुत्र, तेव्हां तो चाकराप्रमाणें भासणें हेंच योग्य. कारण, सूत हा राजाचा सारथि म्हणून त्याचा चाकर व पृथ्वी राजाची पत्नी, तेव्हां तिचाही तो चाकरच. तेव्हां चाकराची विनंती 'पृथ्वीस' अमान्य होऊन 'द्विजशापरूप' पतीची आज्ञा तिनें मान्य केली, ही गोष्ट युक्तच आहे. **चेतनगुणोक्ति** अलंकार.

जों वृष करीत होता [1]चक्रोद्धरणप्रयास [2]तापार्थ; ।
[3]राहुविमुक्तार्क तसा झाला [4]गतमोह भासता पार्थ. ॥ ३८
[5]देवें म्हणे, 'पहिलें गुरुनाम, मग स्वधनु, बाण बरवे घे, ।
खंडीं शिर, रिपु पुनरपि जों [6]रथरत्नांचिया न वर वेघे.' ॥ ३९
प्रभुची आज्ञा होतां पार्थ [7]प्रखरेषु सोडुनी त्वरित, ।
[8]रणदक्षा [9]स्वविपक्षा करि [10]कक्षाकेतु [11]खंडुनी [12]ज्वरित. ॥ ४०
तुटला ध्वज चि न केवळ, [13]विजयाचा भरवसा हि तुटला हो ! ।
[14]सुहृदश्रुबिंदुसह तो पडला, [15]बळधैर्यसेतु फुटला हो. ॥ ४१
केतु छेदुनि पार्थ द्युमणिसुताचे हरावया प्राण, ।
जोडी [16]गांडीवगुणीं [17]शक्रहरिहरायुधां-असा बाण. ॥ ४२
[18]त्यातें पूजित होता पार्थ सदा, कीं [19]तसीच भा त्यांत, ।
[20]हरि [21]पंजरीं, करंडीं अहि, वागविला तसा चि भात्यांत. ॥ ४३
[22]जो दुर्निवार्य असुरां देवांस हि, ज्या शरा महावेगा ।

---

१. चाक वर काढण्याची खटपट, परिश्रम. २. आपल्या स्वतःस त्रास व्हावा एतदर्थच-कारण, रथचक्र वर निघून ह्याच्या श्रमाचें सार्थक होणारें नव्हतें. ३. राहु+विमुक्त+अर्क= राहूनें सोडलेला सूर्य; अर्थात् लागलेल्या ग्रहणांतून मुक्त झालेला सूर्य. ४. नाहींशी झाली आहे मूर्च्छेना ज्याची, असा. **परिकरालंकार.** ५. अन्वयः-देव म्हणे, पहिलें गुरुनाम घे (गुरूचें स्मरण कर), [मग] स्वधनु (गांडीव) [व] मग बरवे (चांगले) बाण [घे;] जों पुनरपि रथरत्नांचिया वर रिपु (कर्ण) न वेघे (चढला नाहीं) [तों] शिर (रिपुशिर, कर्णमस्तक) खंडीं (छेदन कर). कोणतेंही काम करण्यापूर्वी कुलगुरु व कुलदेवता ह्यांचें स्मरण करण्याचा परिपाठ अद्यापि प्रचलित आहे. ६. उत्तम रथाच्या वर. 'जातौ जातौ यदुत्कृष्टं तद्रत्नमभिधीयते' **'रत्नं** स्वजातिश्रेष्ठेपि मणावपि नपुंसकम्' इति मेदिनी. ७. प्रखर+इषु=तीव्र बाण. ८. युद्धपटु अशा. ९. आपल्या शत्रूस, कर्णास. १०. रथाच्या बाजूवर असणारा ध्वज. ११. छेदून. १२. पीडित, जर्जर. १३. आपणास जय मिळेल ह्या गोष्टीचा. १४. सुहृत्+अश्रु+बिंदु+सह=मित्रांच्या आंसवांसहवर्तमान. **सहोक्ति.** १५. सैन्याची हिंमत हाच कोणी बंधारा. **रूपकालंकार.** १६. गांडीव नामक चापाच्या दोरीला. १७. इंद्र, विष्णु व शंकर ह्यांच्या शस्त्रांसारखा. १८. त्या बाणातें. 'ज्यातें' असें पाठांतर. १९. तशाच प्रकारचें-अर्थात् अप्रतिम तेज. २०. सिंह. तो बाण सिंहासारखा किंवा सापासारखा भयंकर होता-असा भाव. २१. पिंजऱ्यांत. २२. सार्थान्वयः-जो(बाण) असुरां (दैत्यांस) [व] देवांस हि दुर्निवार्य (निवारण करण्यास कठीण), ज्या महावेगा शरा (बाणाला) लंघाया मन हि पटु न (अर्थात् मनोवेगाहूनही ज्याचा वेग अधिक) त्यास गरुड [व] पवन तुळुनि कां पहावे ? (गरुडाची व वाऱ्याची त्या बाणाशीं

मन हि न पटु लंघाया; गरुड पवन तुळुनि कां पहावे? गा! ॥ ४४
तत्संधानीं कांपे जग[1] नग[2], जगती[3] हि; होय यम हर्षी, ।
'[4]स्वस्त्यस्तु' मात्र म्हणती, उच्चारिति अन्य वर्ण न, महर्षी. ॥ ४५
योजुनि महा[5]स्त्रमंत्रित शर विजय [6]म्हणे, 'जरि स्वगुरु सर्व ।
तोषविले असतील, ज्ञानबळाचा नसेल तिळ गर्व, ॥ ४६
[7]जरि गीत मृगें[8] किंवा जैसें बाळें क्षुधाकुळें स्तन्य ।
म्यां सेविलें असेल प्रेमें सुहृदुक्त सोडुनी अन्य, ॥ ४७
विधिनें[9] जोडुनि नेलें असेल जरि कीर्तनें[10] न तप नाशा ।
तरि या शरें वृष मरो; हरिची च पुरो, पुरो न तपनाशा.' ॥ ४८
[11]ऐसें म्हणोनि पार्थें ओढुनियां सगुण बाण कर्णान्त ।

---

तुलना करण्यांत अर्थ काय ?) कारण त्या बाणाचा वेग मनाच्या वेगाहून सुद्धां अधिक, मग गरुड किंवा वारा ह्यांचा पाड त्याच्या वेगापुढें किती ?–असा भाव. **व्यतिरेकालंकार.**

१. सर्व लोक. 'अग' असें पाठांतर. अग=झाडें. २. पर्वत. ३. पृथ्वी सुद्धां. ४. अन्वयः– महर्षी मात्र 'स्वस्त्यस्तु' (स्वस्ति+अस्तु='कल्याण असो') [असें] म्हणती, अन्य (इतर प्रेक्षक) वर्ण [ही] (एक शब्द सुद्धां) न उच्चारिति. किंवा, महर्षी 'स्वस्त्यस्तु' [असें] मात्र म्हणती, [ते] अन्य वर्ण (इतर दुसरें कोणतेंही अक्षर) न उच्चारिति. ५. महा+अस्त्र+मंत्रित=मोठ्या अस्त्राची प्रतिष्ठा मंत्रानें ज्यावर केली आहे असा. (मागें पृष्ठ ४१२ टीप ११ पहा). हें 'शर' ह्याचें विशेषण. ६. येथून पुढें ४८ व्या गीतीच्या पूर्वार्धाच्या अखेर अर्जुनानें आपण केलेल्या सर्व सत्कृत्यांचें पुण्य एकत्र करून तें कर्णावधार्थ खर्ची घातलें आहे. एकंदर चार गोष्टींचें उच्चारण अर्जुनानें केलें आहे. ७. सार्थान्वयः–(गीति ४७,४८) जैसें क्षुधाकुळें (क्षुधापीडित) बाळें (मुलानें) स्तन्य (स्तनांतून निघणारें दूध), किंवा मृगें (हरिणानें–हरिण हा प्राणी गानप्रिय आहे) [जैसें] गीत (गाणें) [सेविलें असेल=आस्वाद घेतला असेल], [तैसें] जरि म्यां अन्य सोडुनी (इतर गोष्टींचा अव्हेर करून) प्रेमें (मनोभावानें) सुहृदुक्त (मित्रभाषण) सेविलें असेल (अर्थात् मी जर मित्रभाषणाचा आदर केला असेल), जरि विधिनें (शास्त्रोक्त मार्गानें) तप जोडुनि (संचय करून) कीर्तनें (त्याची स्वमुखें फुशारकी मिरवून) नाशा न नेलें असेल, [आपल्यांत, पुण्यकर्माचा उच्चार केल्यानें पुण्यांश जातो–ही समजूत आहेच, व त्यामुळेंच कदाचित् गुप्त–दान करण्याचा प्रघात पडला असावा.] तरि या शरें (बाणानें) वृष (कर्ण) मरो. हरिची च (इंद्राचीच) [आशा] पुरो (पूर्ण होवो); तपनाशा (सूर्याची इच्छा) न पुरो. ८. हरिणानें. 'मृगः पशौ कुरङ्गे च' इति मेदिनी. ९. विधि= यथाशास्त्र जें अनुष्ठानकर्म तो. १०. कीर्तन=वाखाणणी, बढाई. कल्पनासादृश्यः–धर्म अनंत असो, परि तो, करितां कीर्तन, स्वसे! वेंचे.॥ (पंतकृत आदिपर्व, अध्याय १०१५). ११. सार्थान्वयः–ऐसें म्हणोनि पार्थें सगुण बाण (दोरीसुद्धां शर) कर्णान्त (कानापर्यंत) ओढुनियां, कर्णान्त (कर्णाचा नाश) व्हावयास, तसा पाठविला. [जसा] काळें (अंतकानें) निजदूत [पाठविला].

पाठविला काळें निजदूत तसा व्हावयास कर्णान्त. ॥ ४९
नयनाग्निकील[1] नीलग्रीवाचा[2] मीनकेतुवरि[3] जैसा ।
अरिवरि सायकनायक[4] जाय कराया क्षय[5] त्वरित तैसा. ॥ ५०
तो शर कृत्यानळसा[6] दुर्घटचक्रोद्धृतिक्रियानळसा[7] ।
गांठी[8] कुरुबळविजयप्रासादाच्या[9] रविप्रभा[10] कळसा[11]. ॥ ५१
शाणनिशितमुख[12] बाण प्राणभृदीड्यार्कसूनुच्या[13] अमळा[14] ।
खंडी, नाळापासुनि[15] कमळा मारुत तसा, शिरः[16]कमळा. ॥ ५२
हरितां[17] शरें करुनि बहु गरुडापरिस त्वरा शिर, विझाला ।

---

१. नेत्राग्नीची ज्वाला. कील हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी व स्त्रीलिंगी आहे. २. शंकराचा. ३. मदनावर. ४. उत्तम बाण. ५. नाश. नीलग्रीवाच्या (शंकराच्या) डोळ्यांतील अग्नीची ज्वाला जशी मदनास भस्म करावयास गेली, तसा अर्जुनाचा उत्कृष्ट बाण त्याच्या शत्रूचा (कर्णाचा) नाश करावयास मोठ्या वेगानें गेला–असा अर्थ. ह्या गीतींत **उपमा** हा अर्थालंकार असून **अनुप्रास** हा शब्दालंकार आहे. येथें ह्या अलंकारांची संसृष्टि झाली आहे. ६. कृत्या=अभिचारयज्ञानें शत्रुनाशाकरितां होमकुंड वगैरेंतून उत्पन्न केलेली स्त्री. कृत्यारूप अनळ=कृत्यानळ. शराची कृत्याग्नीशीं तुलना करून त्याची अत्यंत तीव्रता दाखविली आहे. कृत्या=असुरी देवता, महामारी, जादुगिरी–असे अर्थ आहेत. पण सध्यां 'कृत्या' म्हणजे जी भांडणतंटे करिते किंवा जिच्यामुळें भांडणतंटे होतात ती स्त्री–असा अर्थ होतो. ह्यासंबंधानें पुढील श्लोक लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे:–*कृते च रेणुका कृत्या त्रेतायां जानकी तथा । द्वापरे द्रौपदी कृत्या कलौ कृत्या गृहे गृहे.* ॥ ७. दुर्घट+चक्र+उद्धृति+क्रिया+अनळसा=चक्र वर काढण्याच्या दुःसाध्य कामामध्यें नाहीं जो आळशी–अर्थात् आहे जो तत्पर, त्याला. 'दुर्घटचक्रोद्धतिक्रियानळसा' असें पाठान्तर आहे. पण 'उद्धृति'च्या ऐवजीं 'उद्धति' असा शब्द लेखकानें चुकीनें लिहिला असावा. उद्धति=औद्धत्य, दांडगेपणा. ८. कळसा गांठी=कळसापर्यंत जाऊन पोंचला, कौरवांच्या नाशाच्या शेवटच्या पायरीपर्यंत गेला. ९. कौरवसैन्याची यशःप्राप्ति हाच वाडा, त्याच्या. १०. सूर्यासारख्या सतेज. ११. शिखरातें, अर्थात् कर्णास. कौरवसैन्याच्या जयाची इमारत कर्णाच्या जिवावरच उभारलेली होती. तो रणांत पडल्यावर मग जयाचें नांव कशाला? कौरवपक्षाकडील नामांकित व ज्यांच्यावर भरंवसा टाकितां येईल असे कोणी वीर उरले नव्हते. हा कर्णच शेवटचा. येथें **रूपकालंकार** आहे. १२. सहाणेवर घांसून तीक्ष्ण केलेलें आहे टोंक ज्याचें असा. १३. प्राणभृत्+ईड्य+अर्कसूनुच्या=प्राणिमात्रांनीं स्तुति करण्यास योग्य असा जो सूर्य, त्याचा पुत्र जो कर्ण, त्याच्या. १४. स्वच्छ. १५. देंठापासून. १६. मस्तकास. १७. सार्थान्वयः–गरुडापरिस (गरुडापेक्षां) बहु त्वरा करुनि शरें शिर हरितां (खंडित झालें असतां) जाणों दीप न्वि विझाला (जणूं दिवाच मालवला); तैं (तेव्हां) रवि जरि सत्वराशि (धीरवान्) [तरी] बहु विव्हळ (अत्यंत दुःखित) झाला. प्राणांस दिव्याची उपमा ठरींव आहे.

जाणों[1] दीप चि; तैं बहु विव्हळ[2] जरि सत्वराशि रवि झाला. ॥ ५३
सासाश्रु[3] शिर वृषाचें प्रथम क्षोणीतळीं[4] गळालें हो ! ।
मग सकुसुमवृष्टि[5] तनू; सधर्मभय शत्रुबळ[6] पळालें हो ! ॥ ५४
कर्णशरीरापासुनि तेज निघालें[7] दिवाकरीं[8] शिरलें, ।
गुरुहृच्छोकतमावरि[9] जाणों सत्पुत्रसत्व तें फिरलें ! ॥ ५५
ऐसा केला असतां कृष्णकृपेनें चि कर्णनाश तदा ।
पांडव पांचाळ करिति विजयाच्या वीर्यवर्णना शंतदा[10]. ॥ ५६
बहु सिंहनाद वाद्यध्वनि जयजयकार करिति धर्मबळें[11], ।
म्हणति, 'युधिष्ठिर तरला दुस्तरकर्णार्णवासि[12] धर्मबळें[13].' ॥ ५७
जैसें[14] स्वमुखींचें जळ खळबळ पळ, पळ न लागतां, काढी, ।

---

जसें:-'प्राणज्योति.' इंग्रजी भाषेंतही ही उपमा (Life's taper) दिल्याचें आढळतें. आयुष्य हें दोरीसारखें मानण्याचा प्रघात विशेष आहे:-'सखे ! तूटली मुख्य आयुष्यदोरी' (अनंत कवि).

१. **उत्प्रेक्षालंकार.** २. 'सुविकळ' असें पाठान्तर. पंतांनीं प्रथम 'बहुत विकळ' असा पाठ लिहिला होता. पण तो खोडून 'बहु विव्हळ' असा पाठ कायम करून तो लिहिला आहे. ३. आप्तजनांच्या अश्रूंसहवर्तमान. अर्थात् शिर पडतांच आप्तजन रडूं लागले—असा भाव. ४. पृथ्वीतलावर. ५. पुष्पवृष्टीसह धड पडलें. धड पडल्यावेळीं त्यावर आकाशांतून पुष्पवृष्टि झाली—असा भाव. ६. धर्मराजाच्या मनांतील भीतीसहवर्तमान शत्रुसैन्य पळालें—अर्थात् शत्रुसैन्य पळालें व धर्मराजाच्या मनांतील भीतीही पण नाहींशी झाली. 'आप्तांचे अश्रु' आणि 'वृषाचें शिर' हीं एकदमच गळालीं, 'कुसुमवृष्टी'बरोबर 'तनु' पडली, आणि 'धर्माच्या भया'-बरोबर 'शत्रुसैन्य' पळालें, असें चमत्कृतिजनक वर्णन पंतांनीं प्रस्तुत गीतींत केलें आहे. येथें अश्रु आणि शिर, कुसुमवृष्टि आणि तनु, तसेंच धर्मभय आणि शत्रुबळ ह्या दोन दोन वस्तु अनुक्रमें गळणें, पडणें आणि पळणें एतद्रूप क्रिया करितात, असें सांगितलें आहे. ह्या गीतींत **सहोक्ति** अलंकाराचीं तीन उदाहरणें आहेत. ह्या गीतीची रचनाही मोठी मौजेची आहे. ७. उत्पन्न झालेलें. ८. सूर्यांत. ९. वरील अर्धांत 'दिवाकरीं शिरलें.' असें म्हटलें आहे, त्यावर हा उत्तरार्ध **उत्प्रेक्षा** आहे. सार्थान्वयः—गुरुहृच्छोकतमावरि (गुरु+हृत्+शोक+तमावरि= दारुण असा जो हृदयांत होणारा शोक अथवा पित्याच्या अंतःकरणांत होणारा जो शोक तोच कोणी अंधकार त्याचेवर) तें सत्पुत्र-सत्व (सुपुत्राचें तेज) फिरलें जाणों. अंधकार हा सूर्याचा शत्रु, तेव्हां शोकरूप अंधकाराशीं झगडण्याकरितांच जणूं काय सत्पुत्र आपल्या बापाच्या पक्षाशीं एकरूप झाला, आणि त्यानें तेजोरूपानें बापाला भेटून त्याचें दुःख कमी केलें—असा भावार्थ. १०. शंभर प्रकारांनीं. ११. धर्मराजाचीं सैन्यें. १२. तरून जाण्यास कठीण अशा कर्णरूप सागरास. १३. पुण्याच्या जोरावर. १४. अन्वयार्थः—कर्ण मरतां चि जैसें (जेव्हां

मरतां चि कर्णे, चिंता भीति हि शिरली मनामधें गाढी. ॥ ५८
बहु भीमें सिंहनादें न सुचे पथ रिपुमृगां असें भुलवी; ।
वज्रें शिळातळेंसीं शत्रूंचीं कठिन काळिजें उलवी. ॥ ५९
भग्नरथें शल्य पळे, क्षितिसि म्हणे, 'क्षोभलीस तूं कां ! गे ?' ।
दुर्योधनासि भेटे, स्वमुखें कर्णान्तवृत्त तो सांगे. ॥ ६०
भूप म्हणे, 'हा ! हा ! असि कसि झाली आजि अंगराजगती ? ।
स्वर्गश्री साधावी मग, आधीं करुनि संगरा जगती. ॥ ६१
तें विपरीत कसें त्वां केलें ? कर्णा ! सख्या ! अगा ! धामीं ।
सुख काय ? तरों कैसा या त्वद्विरहार्णवा अगाधा मीं ? ॥ ६२
हा ! दानशूर ! नाहीं शिवलें त्वन्मुखपयोभव 'न'-कारा, ।

---

किंवा ज्याप्रमाणें) खळबळ पळ न लागतां (तत्काळ) स्वमुखींचें जळ (तोंडचें पाणी, धीर) [व] पळ काढी, [तसें=तेव्हां किंवा त्याप्रमाणें] चिंता [व] गाढी भीति हि मनामधें शिरली. जेवढ्या झपाट्यानें ते सैनिक व त्यांच्या तोंडचें पाणी पळालें, तेवढ्याच झपाट्यानें चितेनें व भीतीनें त्यांच्या चित्ताला ग्रासिलें—हा भाव. पुढें कसें होणार म्हणून चिंता व आपला निभाव कसा लागणार म्हणून भय वाटलें. येथें जळ व पळ हीं बाहेर काढिलीं आणि चिंता व भीति ह्या आंत शिरल्या—ह्या वर्णनांत थोडीशी **परिवृत्ती**ची छाया आहे.

१. गाढ, मोठी, अगाध. २. सार्थान्वयः—रिपुमृगां (शत्रुरूप हरिणांस) **भीम** सिंहनादें (गर्जना करून) पथ न सुचे (वाट सांपडूं नये) असें बहु भुलवी (अशा रीतीनें त्यांची भीमानें फार गाळण उडविली. अर्थात् शत्रूंची इतकी त्रेधा उडविली कीं, त्यांस पळावयास वाट दिसेना). शत्रूंचीं कठिन काळिजें (अंतःकरणें) वज्रें शिळातळेंसीं (वज्रानें शिळातल ज्याप्रमाणें भेदून टाकावें त्याप्रमाणें) [सिंहनादें] उलवी (भेदिता झाला). ३.'बहु भीमसिंह नादें' असा रा० पराडकर यांच्या प्रतींत पदच्छेद केलेला आहे. ४. कर्णाचा शेवट आहे ज्यांत असें वृत्त (वर्तमान). ५. दुर्योधन. ६. सार्थान्वयः—संगरा (युद्धातें) करुनि आधीं (प्रथमतः) जगती साधावी (पृथ्वी मिळवावी), मग स्वर्गश्री [साधावी]. कर्णास उद्देशून ही दुर्योधनाची उक्ति आहे. राज्यप्राप्ती-पूर्वींच तूं कां स्वर्गीं गेलास ?—असा भाव. ह्राच भाव पुढील गीतीच्या आरंभीं स्पष्ट सांगितला आहे. ७. उलटें. ८. अन्वयः—अगा सख्या ! धामीं (गृहीं) काय सुख ? (सुखाचें नांव कशाला ?) या अगाधा त्वद्विरहार्णवा (ह्या खोल अशा तुझ्या विरहरूप समुद्रास) मीं कैसा तरों ? (हा तुझा विरह मला कसा सहन होईल ? तुझा विरह असह्य आहे—असा भाव.) ९. हाय ! हाय ! हा प्रयोग शुद्ध संस्कृत आहे. १०.'दानशूर' हें संबोधन आहे. हे दानशूर कर्णा ! 'दानशूर' हें संबोधन न घेतां, 'त्वन्मुखपयोभव' ह्याचें विशेषण घेतलें तरी चालेल. ११. त्वत्+मुख+पयोभव=तुझें मुखकमल. १२. नकारा नाहीं शिवलें='नाहीं' हे शब्द कधींही तुझ्या तोंडून निघाले नाहींत. कर्णाची दातृत्वशक्ति सर्वविश्रुतच आहे.

द्विंजसंकीर्ण[1] न दिसतां वाटत होतें तुला भवन कारा. ॥ ६३
करितील[2] जागरव्रतराज्याची आजि पारणा राजे ।
सुचिर जया आचरले तुज मारायासि मारणारा जे.' ॥ ६४
ऐसा विलाप करितां शल्यें समजाविला; पुन्हां परते[3]; ।
स्वभटांसि[4] म्हणे, 'परता, मजला न विलंघितील हो ! पर ते. ॥ ६५
कर्णें कृष्ण[5] सुर्जर[6] केले आहेत, कां वृथा पळतां ? ।
'मरणें न सुटे चि' असें कळतां कां अपयशोंजनें[7] मळतां ? ॥ ६६
कर्णाचा उतराई[8] व्हाया वधितों रिपूंसि[9], या, परता. ।
कैंचा जयलाभ खळा अशस्त्रकरवीरघातपापरता[10] ?' ॥ ६७
कितिएक म्हणति, 'कैसें जावें सोडूनि ? राय[11] होकेरितां[12]' ।
किति म्हणति, 'वृष हि मेला तेथें परतोनि काय हो करितां ?' ॥ ६८

---

१. सार्थान्वयः—भवन (गृह) द्विजसंकीर्ण (ब्राह्मणांनीं व्यापिलेलें, भरलेलें) न दिसतां (जर दिसलें नाहीं तर) तुला [तें] कारा (बंदिशाळा) वाटत होतें. नेहमीं याचकांनीं आपलें घर भरलेलें असावें ह्यांतच तुला सौख्य वाटत असे, आणि तेंच गृह याचकशून्य असल्यास तुला तें कारागृह वाटे, अर्थात् त्यांत सुख होत नसे—असा भाव. २. सार्थान्वयः—मारणारा [तूं त्या] तुज मारायासि जे जया [व्रतासि] (ज्या नियमाचरणास) सुचिर (बहुतकालपर्यंत) आचरले, [ते] राजे [त्या] जागरव्रतराज्याची (काळजीनें झोंप न आल्यामुळें होणाऱ्या जागरणरूप व्रतराजाची—उत्तम व्रताची) आजि पारणा (सांगता) करितील, म्हणजे आज त्यांना झोंप येईल. नाशकर्ता जो तूं, त्या तुझा नाश व्हावा म्हणून जे नियमधर्म राजांनीं केले असतील, त्या नियमधर्मांचें उद्यापन आज ते करतील. कारण तूं आज नाहींसा झालास, तेव्हां त्यांच्या व्रताचें साफल्य झालें. ३. माघारा फिरला. ४. सार्थान्वयः—स्वभटांसि (आपल्या वीरांस) म्हणे, 'हो ! ते पर (शत्रु) मजला न विलंघितील (माझा पराभव करणार नाहींत), परता (माघारे फिरा). ५. कृष्ण व अर्जुन. ६. अत्यंत विदीर्ण, जखमी. ७. अपयशोरूप काजळानें. अर्थसादृश्य—'यदि मरणमवश्यमेव जंतोः किमिति मुधा मलिनं यशः कुरुध्वम्' (वेणीसंहार—अंक ३). ८. उतराई व्हाया=उपकाराची फेड करण्याकरितां. ९. शत्रूस (अर्जुनास). 'रिपूंसि' असें पाठान्तर. १०. ज्याच्या हातांत शस्त्र नाहीं, असा जो वीर (कर्ण) त्याचा नाश, त्या नाशाचें जें पाप त्याच्या ठिकाणीं रममाण झालेला जो (अर्जुन) त्यास. अर्थात् अशस्त्र अशा वीराचा नाश करण्याचें पापच ज्यास गोड लागलें अशाला. हें 'खळा' ह्याचें विशेषण. अर्थात् दुष्ट अर्जुनास—असा भाव. स्वतः अधर्माचरण करणाऱ्या दुर्योधनास अर्जुनानें केलेलें अधर्माचरण दिसावें, व त्यास स्वतःच्या अधर्माचरणाची जाणीव असूं नये, हें मनुष्यस्वभावास अनुसरूनच आहे ! ११. दुर्योधन. १२. बोलावीत असतां. ह्या शब्दाचा उपयोग पंतांनीं सभापर्व—अध्याय ६ गीति ३० मध्यें केला आहे.

किंति[1] म्हणति, 'हा न चुकला प्रियबांधवकर्णकाय होमाया[2], ।
पार्थदहनिं सर्वांस हि होमील चि, यासि काय हो ! माया?' ॥ ६९
साधु[3] स्वधर्म म्हणउनि, वीर धरुनि धीर परतले मार्गें. ।
त्यांवरि भीम–धनंजय–धृष्टद्युम्नादि धांवले रागें[4]. ॥ ७०
स्वरथावरूनि उतरुनि कोपावेशें तदा गदापाणी[5] ।
कुरुकटकांत मिसळला[6] तो हि धनंजय धनंजयावाणी[7]. ॥ ७१
कुरुवीर पंचविंशतिसंख्य[8] सहस्र प्रचंड भीम वधी; ।
पार्थें हि फार वधिले. नाहीं च तयाचियां[9] बळा अवधी[10]. ॥ ७२
दुर्योधनें हि तेव्हां केलें निःसीम[11] युद्ध, परि सेना ।
रक्तें न्हाली, भ्याली, झाली विमुख, प्रभूक्त[12] परिसे ना[13]. ॥ ७३
तैं शल्य म्हणे, 'राया ! जातो अस्ताचलासि हा तरणी, ।
जावें शिबिरासि; जयें[14] दिधला अहितांसि आजि हात रणीं. ॥ ७४
बहु वधिले पार्थानें, धरिला[15] पोटांत[15] धाक कटकानीं[16]; ।
वांटे[17] हा तो चि प्रभु, जो केला श्रवण कल्पनट कानीं. ॥ ७५

---

१. सार्थान्वयः–किंति म्हणति, 'हा (दुर्योधन) प्रियबांधवकर्णकाय (आपले प्रियबंधु व कर्ण यांचे देह) पार्थदहनिं (अर्जुनरूप अग्नीमध्यें) होमाया (आहुति म्हणून अर्पण करण्यास) न चुकला. [हा] सर्वांस हि [पार्थदहनीं] होमील चि. हो ! यासि माया काय ? (ह्याला ममता कोठून असणार ?). **रूपक.** २. जाळाया. हें पंतांचे आवडतें यमक आहे. (सभापर्व, अध्याय ३।१४). ३. सार्थान्वयः–वीर धीर धरुनि स्वधर्म साधु (आपलें कर्तव्यच हितकर) [असें] म्हणउनि (मनाची समजूत घालून) मार्गें परतले. ४. रागाच्या भरांत. ५. हातीं गदा आहे ज्याच्या तो (भीम). ६. 'मिळाला' असें पाठान्तर. ७. अग्नीसारखा. ही **उपमा** फार नामी आहे. मनुष्य क्रोधानें लाल होतो, ही गोष्ट आबालवृद्धांमध्यें दृष्टीस पडते. 'वाणी' ह्या साम्यतादर्शक अव्ययाचा उपयोग बहुतकरून अशिक्षित लोकांच्या भाषणांत होतो. परंतु पंतांनीं केवळ यमकाधीन होऊन त्याचा उपयोग केलेला आढळतो. (द्रोणपर्व, अध्याय ४।३६ व अध्याय ७।१४ पहा). ८. पंचवीस संख्या आहे ज्याची असें. हें 'सहस्र' ह्याचें विशेषण. 'पंचविंशतिसंख्यसहस्र'=पंचवीस हजार. ९. अर्जुनाच्या. 'तयांचिया' असें पाठान्तर. तयांचिया=त्यांच्या=भीम व अर्जुन यांच्या. १०. मर्यादा. ११. पराकाष्ठेचें. १२. प्रभु+उक्त=दुर्योधनाचें सांगणें. १३. ऐकेना. **कारकदीपक.** १४. अन्वयः–जयें (विजयश्रीनें) अहितांसि (शत्रूंस अर्थात् पांडवांस) आजि रणीं हात दिधला (त्यांची आज सरशी आहे). हात देणें=साहाय्य करणें. **लोकोक्ति.** १५. दहशत घेतली. १६. सैन्यांनीं. १७. अन्वयः–जो कल्पनट (प्रलयकालीं

आतां सर्वमतें हें, कीं जावें स्वशिबिरा रहायास; ।
यापूर्वी तो ऐसा झाला नाहीं कधीं [1]महायास ? ॥ ७६
[2]प्रातःकाळीं च पुन्हां शत्रूंत जयी, गजांत हरिसा, हो.' ।
वृष जेणें मारविला मित्रक्षयताप तो हि हरि साहो; ॥ ७७
शल्य म्हणे, 'परतावें.' म्हणति द्रोणात्मजादि हि तसेंच. ।
[3]संकोचें मान्य करी मानुनि अपयान तें हि हितसें च. ॥ ७८
माघारा नृप फिरतां बळ परते, अब्धिचें जसें [5]अंबु, ।
[6]कृष्णानीं वाजविले तेव्हां अरिधैर्यभंगिते कंबु. ॥ ७९
शिरला कर्णीं ज्यांच्या नरनारायणदरस्वर क्षण ही ।
त्यांसि पळतां सख्यांचें कैंचें, पतनीं नव्हे स्वरक्षण ही ? ॥ ८०
दूरुनि [10]कंपिकेतु दिसे, शंखरवश्रवण होय जोंवरि तों ।

---

नर्तन करणारा असा—रुद्र) कानीं श्रवण केला (ज्याचें नुसतें नांव ऐकत आलों, पण प्रत्यक्ष कधीं पाहण्याची पाळी आली नव्हती) तो चि प्रभु हा (पार्थ) [असें] वाटे. (अर्थात् त्या सैन्यास हा प्रलयकाळचा रुद्रच आहे असें वाटलें).

१. महा+आयास=मोठा शीण. २. सार्थान्वयः—प्रातःकाळीं च पुन्हां गजांत हरिसा (सिंहाप्रमाणें) [तूं] शत्रूंत जयी हो (विजय संपादन कर). जेणें वृष (कर्ण) मारविला तो हि हरि (श्रीकृष्ण) मित्रक्षयताप (स्नेही जो अर्जुन त्याच्या नाशापासून उत्पन्न होणारें दुःख) साहो (सहन करो). अर्थात् उद्यां सकाळीं अर्जुनास मारून टाकण्याचें सुयश मिळव, पण आतां मात्र शिबिराकडे चल—असा शल्याचा आशय. ३. सार्थान्वयः—तें हि (शल्याचें व अश्वत्थाम्याचें बोलणें) हितसें च (कल्याणकरच) मानुनि अपयान (माघारें फिरणें, रणांगणांतून पाठ दाखवून जाणें) संकोचें (मोठ्या भिडेनें, कष्टानें) मान्य करी (कबूल करिता झाला). शल्याचें व अश्वत्थाम्यादिकांचें बोलणें हितप्रद आहे असें मनास वाटल्यावर सुद्धां तोंड फिरवून रणांगणांतून जाणें दुर्योधनाच्या जिवावर आलें. पंतांनीं 'संकोचें' हा शब्द घालून दुर्योधन अत्यंत मानी असा महायोद्धा होता, हें व्यक्त केलें आहे. ४. पलायन, मागें फिरणें. ५. (समुद्राचें) पाणी. ओहटीच्या वेळीं पाणी फार झपाट्यानें ओसरतें, ह्यावरून कौरवसैन्य रणांगण सोडून किती जलद निघून गेलें, हें स्पष्ट दिसतें. ही उपमा अर्थगांभीर्ययुक्त आहे. ६. अर्जुन व श्रीकृष्ण ह्या उभयतांनीं. ७. शंख. ८. कृष्ण व अर्जुन यांच्या शंखांचे ध्वनी. ९. अन्वयः—पळतां त्यांसि स्वरक्षण ही नव्हे (न होय) [मग] सख्यांचें [रक्षण] पतनीं (ते पडले असतां) कैंचें ? पळते वेळीं ज्याचें त्यालाच संरक्षण करवेना, मग पडलेल्या लोकांस सांभाळण्याची गोष्ट कशाला ? **काव्यार्थापत्ति.** १०. कपि (वानर मारुति) आहे केतूच्या (ध्वजाच्या) ठायीं ज्याच्या, तो (अर्जुन).

भट पळति; [1]म्हणति 'हा जरि न[2]कशा वरितों, दशा कशा वरितों?' ॥ ८१
[3]खळबळपळ पळ पाहत चित्र तसा कार्मुकी शरी राहे, ।
निश्चळ जिष्णु, हरि हि; मग देखति बाणाचिता शरीरा हे. ॥ ८२

---

## अध्याय [4]पंन्नासावा.

आलिंगिलें स्वयें जें [5]स्वाश्रुसुधाबिंदुसिक्त [6]गौरीशें ।
त्या [7]सुहृदंगांतुनि वृषशर काढी सानुकंप [8]शौरी [9]शें. ॥ १
जिष्णु हि [10]शनैः [10]शनैः शर [11]शरणांगांतूनि साश्रु [12]आकर्षी ।

---

१. अन्वयः—हा जरि नकशा (बेत) वरितों, [तरी] दशा (अशा हाल-अपेष्टा) कशा वरितों ? हा बेत म्हणजे अर्थात् पळण्याचा बेत ह्याच्या पूर्वींच योजून त्याप्रमाणें केलें असतें, तर अशी दुर्दशा ओढवून घेण्याचें काय कारण होतें ? अर्थात् पळून गेलों असतों तर ही दुर्दशा टळली असती—असा भाव. नकशा=नकाशा, बेत, मसलत, क्लृप्ति. मागें गीति ७० पूर्वार्ध पहा. २. तोरा, नक्षा (?). येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'हा! जरि नकशा वरितों' असा पाठ आहे व नकशा=तोरा, नक्षा-अशी टीप दिलेली आहे. नक्षा हा शब्द आरबी भाषेंतील आहे. त्याचा अर्थ बेत (Plan) असा आहे. ह्या शब्दापासून 'नकाशा' हा शब्द मराठींत आला. ह्या गीत्यर्धाचा अर्थ समाधानकारक लागला आहे, असें वाटत नाहीं. पंतलिखित पोथींत असाच पाठ आहे, तेव्हां पाठशुद्धीविषयीं शंकेला कांहीं कारण नाहीं, हें उघडच आहे. ३. सार्थान्वयः—खळबळपळ (दुष्ट जो दुर्योधन त्याच्या सैन्याची पळापळ) पळ (पळभर, थोडा वेळ) पाहत, कार्मुकी (धनुष्य आहे ज्याचे जवळ तो, धनुर्धारी) [व] शरी (बाण ज्यानें हातीं घेतला आहे असा. अर्थात् 'कार्मुकी' व 'शरी' म्हणजे धनुष्यबाण सज्ज करून तयार असणारा) जिष्णु (अर्जुन) [जसा] चित्र तसा राहे (अर्थात् तटस्थ होता); हरि हि (श्रीकृष्ण सुद्धां) निश्चळ [राहे]. [पल्=गमन करणें, पळणें] मग हे (श्रीकृष्णार्जुन) बाणाचिता (बाण+आचिता=बाणांनीं व्याप्त अशा) शरीरा देखति. प्रथम अर्जुन व श्रीकृष्ण पळत सुटलेल्या शत्रुसैन्याकडे पाहत चित्रासारखे स्तब्ध होते, व मग कर्णाच्या बाणांनीं भरलेल्या अशा आपल्या शरीरांकडे त्यांचें लक्ष गेलें. (रघुवंश—सर्ग २ श्लोक ३१ पहा, 'चित्रार्पितारंभ इवावतस्थे'). ४. यांत मुळांतील ९६ व्या म्हणजे कर्णपर्वांतील शेवटच्या अध्यायांतील ६५ श्लोकांतील कथा येथें ७१ गीतींत पंतांनीं सांगितली आहे. ५. स्व+अश्रु+सुधाबिंदु+सिक्त=आपल्या अश्रुरूप अमृतबिंदूंनीं ओलें झालेलें, न्हाणिलेलें. हें 'जें' [अंग] ह्याचें विशेषण. ६. श्रीशंकरानें. ७. मित्राच्या अर्जुनाच्या अंगांतून. ८. श्रीकृष्ण. ९. शंभर. १०. हळू हळू, सावकाश. ११. त्राता जो श्रीकृष्ण, त्याच्या शरीरांतून. शरण=संरक्षण करणारा, घर, आश्रयस्थान. 'शरणं गृहरक्षित्रोः' इत्यमरः. १२. ओढून काढिता झाला. 'साश्रु' हें क्रियाविशेषण. अर्थात् ते शर काढतेवेळीं अर्जुनाच्या स्वतःच्या डोळ्यांस पाणी आलें. सहोक्ति.

'ब्रह्म[1] अभेद्यें[2]' म्हणे त्या श्रुतिसि म्हणति[3] 'ते नमोऽस्तु' नाकर्षी.॥ २
भेटोनि म्हणे ऐसें हृष्ट[4] हृषीकेश[5] त्या गुडाकेशा[6] ।
'तुझिया ढका न लागो साधुपिपीलिकचमूगुडा[7] ! केशा[8]. ॥ ३
वृत्रवध कर्णवध हे अद्भुत; गातील यांसि कविराजे ।
परि बा ! त्वद्बाहुपुढें वज्रधराचा[9] हि बाहु न विराजे[10]. ॥ ४
तो वृत्र वासवानें वज्रें वधिला; विचित्र[11] तें काय ? ।
त्याचा[12] हीरगिरिस ही भंगिल बाळें हि घालितां घाय. ॥ ५
त्वां कर्णकंठकृंतन[13] केलें विशिखें[14] विचित्र हें वाटे; ।
माझा तों आजि गळा त्वद्दोर्दंडासि[15] वर्णितां दाटे[16] ! ॥ ६
काय सहावें तवशरमारुतवेगासि[17] कर्णवनदानें[18] ? ।
शंभुप्रसादपात्रा ! जिंकावा केंवि अर्णव नदानें[19] ? ॥ ७

---

१. सार्थान्वयः-[जी श्रुति=वेद] ब्रह्म अभेद्य (न विद्ध होणारें) म्हणे, त्या श्रुतिसि नाकर्षी (देवर्षि) 'नमोऽस्तु ते' (तुला नमस्कार असो) [असें] म्हणति. अर्थात् हें वेदवाक्य यथार्थ नाहीं. कारण, तसें असतें तर परमात्म्याचे शरीरांत बाण शिरावयास नकोच होते-असा भाव. २. भगवद्गीता, अध्याय २ श्लोक २३ व २४ पहा. ३. हें म्हणणें उपरोधिक आहे. ४. आनंदित. ५. श्रीकृष्ण. हृषीक+ईश=इंद्रियांचा स्वामी, मनोविकारांस स्वाधीन ठेवणारा. ६. अर्जुनाला. गुडाका+ईश=निद्रा+स्वामी=निद्रेचा स्वामी, निद्रारूप भ्रांतीचा अथवा अज्ञानाचा नियंता, अर्थात् जो सदासर्वदा सावध (दक्ष) असतो असा जो अर्जुन, त्याला. **परिकरांकुरालंकार.** ७. साधु+पिपीलिक+चमू+गुडा=साधु हेच पिपीलिक (मुंगळे) त्यांची चमू (समुदाय) त्याप्रत गुळासारखा-अर्थात् सज्जनांस प्रिय अशा. ८. केशा ढका (धक्का) न लागो=यत्किंचितही अपाय न घडो. ९. इंद्राचाही. १०. शोभे. **प्रतीपालंकार.** ११. आश्चर्य करण्यासारखें. १२. सार्थान्वयः-त्याचा (वज्राचा) घाय (तडाखा), बाळें हि (मुलानें सुद्धां) घालितां, हीरगिरिस ही (हिऱ्याच्या पर्वतास सुद्धां) भंगिल (फोडील). हिरा अतिशय कठीण असून ऐरणीवर घातला असतांही फुटत नाहीं. अशा कठीण हिऱ्याच्या पर्वताचा सुद्धां इंद्राच्या वज्रानें चूर होतो; मग तें वज्र कोणीही मारो. यावरून हिऱ्याच्या पर्वताचा भंग करण्यांत वज्राचेंच सामर्थ्य असून मारणाऱ्याच्या अंगचें शौर्य कांहींच नाहीं-असा भाव. १३. कर्णाच्या गळ्याचें छेदन. 'कर्णकंठकर्तन' असें पाठान्तर. १४. बाणानें. १५. त्वत्+दोर्दंडासि=तुझ्या प्रबळ बाहूस. (दोः=भुज, बाहु; दंड=काठी, सोटा). १६. गळा दाटे=प्रेमातिशयामुळें गहिंवर येतो. १७. तुझा बाण हाच कोणी वायु, त्याच्या प्रभावास. ही सर्व गीति पंतांनीं स्वप्रतिभाबळानें नवीन रचिली आहे. 'त्वच्छरमारुतवेगासि' असें पाठान्तर. १८. कर्ण हाच वनद (वन+द=जलातें देणारा, मेघ) त्यानें. **रूपकालंकार.** वन=पाणी, जळ. 'क्लीबं स्यात्कानने नीरे निवासे निलये वनम्' इति रभसः. १९. मोठ्या नदीनें. **प्रश्नालंकार.**

हें, चाल, सांग गुरुला[1], तुज जरि संकोच[2] मीं निवेदीन; ।
राजा निवेल वृषवधवृत्तें, निधिनें[3] जसा निवे[4] दीन[5]. ॥ ८
आला होता राजा तुमच्या संगरमखा पहायासी; ।
परि माघारा गेला, क्षतबाधा[6] न शकला सहायासी[7]. ॥ ९
वृषवधकथनोपायन[8] अर्पू, वंदूनि अनृण[9] सांगातें[10] ।
होवूं, म्हणेल धर्म, 'श्रोत्रामृत[11] फिरफिरोनि सांगा तें.' ॥ १०
ऐसें वदोनि हरि अरि[12] वाराया[12] काळरुद्र[13]भीमातें ।
स्थापी[14] सात्यकि धृष्टद्युम्नप्रमुखांसमेत[15] भीमातें. ॥ ११
कटक स्थापुनि मागें, घेउनि पार्थासि जाय शिबिरीं[16] हो ! ।
मुनि म्हणति, 'शरण्य[17] प्रभु, याहुनि तो श्रेष्ठ काय शिबि[18] ? राहो.' ॥ १२
शिबिरीं कांचनशयनीं पडला होता क्षतार्त[19] नरनाथ ।
तच्चरणीं[20] शिर ठेवी ससख शिवशिरीं[21] यदीयपदपाथ[22]. ॥ १३

१. धर्मराजास. २. विनयामुळें वाटणारी भीड. प्रभूनें ह्या एका पदावरून अर्जुनाच्या अंगची शालीनता पूर्णपणें दाखविली आहे. 'इंद्रोऽपि लघुतां याति स्वयंप्रख्यापितैर्गुणैः.' ही गोष्ट प्रत्येकाच्या अनुभवाची आहेच. ३. द्रव्यराशीनें. ४. समाधान पावतो. ५. दरिद्री. **उपमालंकार.** ६. आंगावरील जखमांमुळें होणारें दुःख. ७. सहन करण्यास. ८. वृष+वध+कथन+उपायन=कर्णवधाचें निवेदन हीच भेट. रिक्तहस्तें राजदर्शन घेऊं नये, त्यास कांहींतरी नजराणा घेऊन जावें, असें स्मृतिवचन आहेः–'रिक्तपाणिर्न पश्येत राजानं देवतां गुरुम्.' हा प्रघात अद्यापिही दृष्टीस पडतो. येथील ही कल्पना पंतांची आहे. ९. उतराई. १०. बरोबरच. ११. कानांस अमृतासारखें वाटणारें वर्तमान. १२. शत्रूंचें निवारण करण्याकरितां. १३. प्रलयकाळच्या रुद्रासारखा जो भयंकर, त्याला. हें 'भीमातें' ह्याचें विशेषण. १४. ठेवी, नेमी. १५. समेत=सहवर्तमान. १६. छावणींत. १७. त्राता. प्रभु (श्रीकृष्ण) शरण्य [होय]. तो (प्रसिद्ध) शिबिराजा याहुनि (श्रीकृष्णाहून) श्रेष्ठ [आहे] काय ? राहो (ती शिबिराजाची कथा राहो)–असा अन्वय. श्रीकृष्ण हा खरा त्राता होय, त्याच्याशीं शिबिराजाची तुलना करण्यांत कांहीं अर्थ नाहीं–असा भाव. १८. एक राजा. बहिरीससाण्याच्या रूपानें इंद्र कबुतराचें रूप घेतलेल्या अग्नीच्या मागें लागला असतां ह्या राजानें आपल्या अंगाचें कबुतराच्या भारंभार मांस देऊन अग्नीचें संरक्षण केलें. १९. जखमांनीं पीडित होत्साता. २०. सार्थान्वयः–यदीयपदपाथ (यदीय+पद+पाथ=ज्याच्या पायाचें उदक) शिवशिरीं [तो कृष्ण] ससख (मित्रासहवर्तमान) तच्चरणीं (तत्+चरणीं=त्याच्या, धर्मराजाच्या पायांवर) शिर ठेवी (नमस्कार करिता झाला). **साराालंकार.** २१. शिवाच्या मस्तकावर. समुद्रमंथनसमयीं निघालेलें हालाहल विष शंकरानें लोककल्याणार्थ भक्षण केलें. त्यामुळें त्याच्या शरीराचा दाह होऊं लागला. त्याचें शमन व्हावें

[१]नरनारायण करितां पाय धरुनि त्या [२]नरोत्तमा [३]प्रणती, ।
'[४]आम्ही यादव पांडव कृष्ण तुला वंदितों' असें म्हणती. ॥ १४
नेत्रें उघडुनि त्यांच्या लक्षुनि हर्षासि, मारिलें अरितें, ।
ऐसें समजे राजा. [५]तर्क खरा चित्त साधुचें करितें. ॥ १५
नृप हर्षें गहिंवरला, उठला त्यजुनि स्वयें चि [६]तल्पातें, ।
कृष्णांसि भेटला; [७]हें स्पर्शसुख जगीं अलभ्य अल्पातें. ॥ १६
अंजलि करुनि म्हणे प्रभु, '[८]देवा ! सुखहेतु वृत्त परिसा हो ! ।
[९]स्वर्गीतविषय युष्मद्विक्रम निहतोग्रशत्रु हरिसा हो. ॥ १७
अतुलप्रताप दुःसह वृत्र जसा [१०]अदितिसूनुच्या पविनें ।
वधिला; कर्ण तसा या तुझिया प्रियबंधुनें [११]महाकविनें. ॥ १८

---

म्हणून त्यानें शीतलजलवाहिनी गंगेस आपल्या मस्तकावर धारण केलें—अशी कथा आहे. २२. ज्याच्या पायापासून उत्पन्न झालेलें उदक अर्थात् गंगानदी. वामनावतारीं त्रिविक्रमाच्या द्वितीयपदानें ब्रह्मकटाह फुटून आवरणोदक त्रिलोकांत पसरलें, तीच गंगा होय, असें पुराणांत वर्णिलें आहे. म्हणूनच गंगेला 'विष्णुपदी' असें म्हणतात.

१. अर्जुन व श्रीकृष्ण. २. धर्मराजास. ३. नमस्कार. ४. सार्थान्वयः—'आम्ही [अनुक्रमें] यादव (यदुवंशोत्पन्न), पांडव (पंडुवंशोत्पन्न) [असे] कृष्ण (श्रीकृष्ण व अर्जुन) तुला वंदितों' असें म्हणती. ५. **अर्थांतरन्यास.** हा चतुर्थ चरण सुभाषितरूप आहे. अर्थसादृश्यः—'सतां हि संदेहपदेषु वस्तुषु प्रमाणमन्तःकरणप्रवृत्तयः' (शाकुंतल—अंक १). ह्या पद्यांशाचें रूपांतरः—विमूढ होतां जन साधु मानिती । मनांतली ओढचि मार्ग दावि ती. ॥ (रा० केशवराव गोडबोले). ६. शय्येतें. ७. अन्वयः—हें स्पर्शसुख जगीं अल्पातें (क्षुद्रजनास) अलभ्य [आहे]. ८. धर्मराजा! ९. सार्थान्वयः—निहतोग्रशत्रु (निहत+उग्र+शत्रु=मारला आहे भयंकर शत्रु ज्यानें असा. हें 'विक्रम' याचें विशेषण) युष्मद्विक्रम (तुमचा शौर्यप्रताप) हरिसा (इंद्राप्रमाणें) स्वर्गीतविषय (स्वर्गीं गाण्याचा विषय) हो (होवो). तुमचा पराक्रम इंद्राच्या पराक्रमासारखा आहे, तेव्हां इंद्रपराक्रमाप्रमाणें तुमच्याही पराक्रमाचे पोवाडे स्वर्गीं गाइले जावोत—असा भाव. उत्तरार्धाच्या शेवटीं 'हरि साहो' असा पदच्छेद केल्यास पुढें दिल्याप्रमाणें अर्थ होईलः—हरि (इंद्र) स्वर्गीतविषय (स्वर्गांत अप्सरा व गंधर्व यांनीं गाइलेला) [व] निहतोग्रशत्रु (कर्णासारख्या बलाढ्य शत्रूस मारणारा) युष्मद्विक्रम (तुमचा पराक्रम) साहो (सहन करो). तुमचा हा अद्वितीय पराक्रम स्वर्गांत गाइलेला ऐकून इंद्राला मत्सर उत्पन्न न होवो. कारण इंद्राच्या कीर्तीहून तुमची कीर्ति अधिक भव्य असल्यामुळें त्याला तुमचा हेवा वाटणें अगदीं साहजिक आहे. (ह्यासंबधानें ह्याच अध्यायांतील गीति ४।५ ह्या वाचण्यासारख्या आहेत). ययाति राजाचें स्वर्गांतून पतन, विश्वामित्रमेनका-प्रसंग व शुकरंभासंवाद इत्यादि कथा इंद्राच्या मत्सरी स्वभावाच्या द्योतक आहेत. (पंतकृत आदिपर्व, अध्याय ११।७५ व अध्याय १२।१६ पहा). १०. इंद्राच्या. ११. महाज्ञाता जो अर्जुन, त्यानें.

तुमची[1] आज्ञादेवी निजहस्तगतार्जुनायुधें आजी ।
कर्णमहिष मारुनियां विजयातें पावली रणामाजी. ॥ १९
त्वां[2] इंद्रें प्रेरितसितवाहाशनिनें वृषाद्रिचें पिष्ट ।
केलें, हें यश देवा ! गातील तुझें सदा महाशिष्ट. ॥ २०
तूं नरसिंह महात्मा, बीभत्सु[3] तुझा नखप्रकर[4], देवा ! ।
वृष कनककशिपु, महिमा[5] प्रऱ्हाद तुझी च ज्या रुचे सेवा. ॥ २१
तूं रुद्र, तुझें तिसरें लोचन हें बंधुरत्न[6]; वृष काम; ।
तूं राम, कर्ण हा भव[7], अर्जुनभुजतेज हें तुझें नाम[8]. ॥ २२
कृष्णेसि हांसला जो दुर्द्यूतीं[9] दाखवूनि सितदंत[10] ।
केला त्वत्क्षोभानें, जरि तो दुर्जय[11] बलाब्धि[12] हि, तदंत[13]. ॥ २३
कर्णाच्या रक्ताचें करित्ये, गोडी[14] पहात, पान रसा[15]; ।
या[16] कर्में हर होसी, दिससि जनां तूं महातपा! नरसा. ॥ २४
जगलां तिघे पृथेचे सुत, दोघे साधु ते हि माद्रीचे[17]; ।
लंघावे[18] दवदहनें कूट[19] कसे निजबळें हिमाद्रीचे? ॥ २५

---

१. सार्थान्वयः–आजी (सांप्रत) रणामाजी तुमची आज्ञा-देवी (आज्ञा हीच दुर्गादेवी) निजहस्तगतार्जुनायुधें (आपल्या हातीं असलेल्या अर्जुनरूप शस्त्रानें) कर्ण-महिष (कर्णरूप महिषासुरास) मारुनियां विजयातें पावली. **परंपरितरूपक.** गीति १९, २०, २१ आणि २२ ह्या पंतांच्या उज्ज्वल प्रतिभेची साक्ष देतात. यांस मुळांत आधार नाहीं. २. सार्थान्वयः–त्वां इंद्रें (तूंच कोणी इंद्र त्यानें) प्रेरितसितवाहाशनिनें (योजिलेल्या अर्जुनरूप वज्रानें) वृषाद्रिचें (कर्णरूप पर्वताचें) पिष्ट (पीठ, चूर्ण) केलें. देवा! (धर्मराजा !) हें तुझें यश महाशिष्ट (महाज्ञाते) सदा गातील. **परंपरितरूपक.** ३. अर्जुन. ४. नखसमूह. ५. यश. **परंपरितरूपक.** ६. अर्जुन. ७. संसार. ८. रामनामानें मनुष्य संसारसागर तरून जातो. **परंपरितरूपक.** ह्या चारही गीतींतील **रूपकें** फारच बहारीचीं आहेत. ९. कपटद्यूतामध्यें. १०. सितदंत दाखवूनि=पांढरे दांत विचकून. 'दांत काढणें' हा तुच्छतादर्शक प्रयोग. **लोकोक्ति** अलंकार. ११. जिंकण्यास कठीण. १२. बलसागर. १३. त्याचा, अर्थात् कर्णाचा नाश. १४. गोडी घेत; लज्जतीनें. गीति २४, २५ व २६ ह्या खुद्द पंतांच्या आहेत, यांस मुळांत आधार नाहीं. १५. पृथ्वी. १६. अन्वयः–[हे] महातपा ! तूं जनां नरसा (एकाद्या सामान्य मनुष्याप्रमाणें) दिससि [परि] या कर्में हर होसी. असें कृत्य प्रलयकालीं शंकर करितात तेव्हां तूं शंकराची योग्यता पावतोस; दिसण्यांत मात्र मानव, पण वस्तुतः तूं देवरूप आहेत–असा भाव. १७. माद्रीचे दोघे साधु [सुत] तेही जगले–असा अन्वय. १८. अन्वयः–दवदहनें (दावाग्नीनें) निजबळें (स्वपराक्रमानें) हिमाद्रीचे कूट (हिमालय पर्वताचीं शिखरें) कसे लंघावे! तेथपावेतों

वीरक्षयांत उरले स्वप्राण तुम्हा महाप्रभावांचे ।
दुर्व्यसनराहुगिलिता पुण्यें सज्जनरविप्रभा वांचे. ॥ २६
चाल, पहा कर्ण, नयन निववीं, नरलोकनायका! पूर ।
अमृताचा हि नयनहित न तसा, गतसार काय कापूर?' ॥ २७
धर्म म्हणे, 'सुरभीच्या प्राप्त असे नित्य भव्य नव्य सुता. ।
अमृतनदीमीनाला स्पर्शे संप्रार्थितां हि न व्यसुता. ॥ २८
कल्पद्रुमनिजनीडीं नेणे क्षुत्ताप अलस ही पक्षी; ।

---

प्रभाव दाखविण्याची योग्यताच वणव्याची नाहीं—असा भाव. तेथपर्यंत जर वणवा जाईल, तर मग 'हिमाद्रि' (बर्फाचा पर्वत) हें नांव यथार्थ होणार नाहीं. तेव्हां हिमाद्रीच्या शिखरावर आपला प्रभाव दाखविणें ही गोष्ट दावानलाच्या सामर्थ्याबाहेर आहे. कारण हिमालय हा आपल्या नांवाप्रमाणें बर्फाचा पर्वत असल्यामुळें त्याच्यावरील वणवा आपोआपच विझून जाईल. त्याप्रमाणें तुम्ही ह्या युद्धाग्नीमध्यें निभावलांत हें योग्यच आहे. **दृष्टांतालंकार.** १९. पर्वताचें शिखर. 'कूट' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आहे.

१. अनेक योद्ध्यांचा नाश झाला असतां. २. मोठा आहे पराक्रम ज्यांचा, अशांचे. ३. अन्वयः—दुर्व्यसनराहुगिलिता (संकटरूप राहूनें गिळिलेली) सज्जनरविप्रभा (साधुजनरूपी सूर्याचें तेज) पुण्यें (पुण्याईच्या बळानें) वांचे. सारांश—सज्जन पुण्याईच्या बळावर संकटांतून मुक्त होतात. येथें 'दुर्व्यसनराहु गिळितां' असा पाठ आहे. त्यास अनुसरून अन्वयः—दुर्व्यसनराहु (संकटरूप राहु) सज्जनरविप्रभा (साधुजनरूप सूर्याचें तेज) गिळितां, [ती] (प्रभा) पुण्यें (पुण्याच्या जोरावर) वांचे (कायम राहते). **परंपरितरूपक.** ४. अन्वयार्थः—नरलोकनायका! चाल, कर्ण पहा [व] नयन निववीं, [कारण] अमृताचा हि पूर तसा (कर्णासारखा) नयन-हित (डोळ्यांस निववणारा) न (नाहीं), [मग] गतसार कापूर काय? (क्षुद्र कापुराची ती गोष्ट कशाला पाहिजे?). येथें **अर्थापत्ति** अलंकार आहे. ५. निःसार, निःसत्व, अर्थात् हीन, क्षुद्र. ६. कामधेनूच्या. गीति २८ व २९ यांतील सुंदर कल्पना पंतांच्याच आहेत. ७. वैभव. ह्या पूर्वार्धात कामधेनूच्या मुलाला नेहमीं नव्य (नवें) वैभव प्राप्त होतें, असें म्हटलें आहे तें यथार्थच आहे. कारण, कामधेनूच्या अंगीं इच्छित फल देण्याची शक्ति आहे. ८. नवीन, नवें. ९. सार्थान्वयः—अमृतनदीमीनाला (अमृताच्या नदींतील माशाला), संप्रार्थितां हि (प्रार्थना केली असतांही) व्यसुता (वि+असुता=गतप्राणता) न स्पर्शे. उघडच आहे कीं, मरण नाहींसें करण्याची ज्या अमृताची शक्ति आहे, अशा अमृताच्या नदीचा आश्रय केल्यास माशाला मरण यावें असें वाटलें तरी सुद्धां तें त्यास येणारच नाहीं. कारण मरण व अमृताची शक्ति ह्या दोन परस्पर-विरुद्ध गोष्टी आहेत. जेथें एक असावयाची तेथें दुसरीचा अभाव असलाच पाहिजे. १०. मरण. ह्या गीतींत **अप्रस्तुतप्रशंसा**लंकार आहे. ११. कल्पवृक्षावर बांधिलेल्या आपल्या घरट्यामध्यें. १२. जाणत नाहीं. १३. क्षुत्+ताप=भुकेची बाधा. १४. आळशी

तैसा [1]त्वच्चरणाश्रित जन न [2]बुडे, [3]इच्छिलें पुढें [4]लक्षी. ॥ २९
आम्हांसि तारिलें त्वां, देसी दीना जनासि [5]थोरपण; ।
[6]इतरांचे बहुविध पण, परि लघु ते; हा तुझा चि थोर पण. ॥ ३०
[7]स्वपदाश्रितजनकामप्रमुखाहितषट्कनाशका देवा ! ।
वृषवध काय कठिन तुज ? हरिणाचा हरिपुढें किती [8]केवा ? ॥ ३१
प्याला सिंधुप्रति जो त्यासि श्रम काय [9]कूपजळपानें ? ।
[10]शंश किति सिंहीं, व्हावें हस्तींच्या भस ज्यांत [11]कळपानें ? ॥ ३२
कथिलें 'नरनारायण तुम्हीं' असें नारदें मला [12]कानीं; ।
[13]हरिलें सदुक्तिनीं, [14]दृक्तम वैद्यानें जसें शलाकानीं. ॥ ३३
[15]त्वद्वेणुगीतिस जसी यदुक्तिला चित्तवृत्ति वेधावी ।

---

सुद्धां. हें 'पक्षी' ह्याचें विशेषण. कल्पवृक्षाचा आश्रय केल्यामुळें अशा पक्ष्यास पोटाकरतां श्रम करावे लागत नाहींत.

१. त्वत्+चरण+आश्रित=तुझ्या पायानें ज्याला थारा दिला आहे, असा. २. दुःख, काळजी व यातना यांच्या योगानें संसारांत त्रस्त होत नाहीं. ३. इच्छित, इष्ट, हवें असेल तें. ४. समोर पाहतो. अर्थात् तें त्याजपुढें तयार असतें—असा भाव. ५. रक्षण करणारा एक व थोरपण मलत्यालाच, म्हणून **असंगति** अलंकार. ६. सार्थान्वयः—इतरांचे (दुसऱ्यांचे) पण (प्रतिज्ञा, ब्रीद) बहुविध (अनेक प्रकारचे); परि ते (पण) लघु (कोत्या बुद्धीचे). हा (गरीबांस मोठेपणा देणें हा) थोर (उदार अंतःकरणाचा) पण (ब्रीद) तुझा चि. ही गोष्ट इतरांच्या हातून होणारीच नव्हे—असा भाव. दुसऱ्याच्या अत्यंत अल्प गुणांचा देखील गौरव करणें हें थोरामोठ्यांचें ब्रीदच आहे. 'परगुणपरमाणून्पर्वतीकृत्य नित्यं । निजहृदि विकसन्तः सन्ति सन्तः कियन्तः ॥' हें भर्तृहरीचें वचन (नीतिशतक, श्लोक ७९) प्रसिद्धच आहे. हें अर्ध आणि गीति ३१ व ३२ ही पंतांचीच अस्सल कृति आहे. ७. स्व+पद+आश्रित+जन+काम+प्रमुख+अहित+षट्क+नाशका=आपल्या चरणाचा आश्रय करणाऱ्या जनांच्या कामप्रमुख सहा रिपूंचा नाश करणाऱ्या प्रभो! ८. महत्त्व, किंमत. **अर्थापत्ति** व **प्रतिवस्तूपमा.** ९. विहिरींतील पाणी पिण्यानें. १०. ससा. हस्तींच्या (हत्तींच्या) कळपानें ज्यांत (ज्या सिंहांच्या कळपांत) भस व्हावें, [त्या] सिंहीं (सिंहाच्या बाबतींत) शश किति ?—असा अन्वय. ११. **अर्थापत्ति** व **अप्रस्तुतप्रशंसा.** १२. कानांत, कानामध्यें. अर्थात् एकांतांत कळविलें. १३. सार्थान्वयः—जसें वैद्यानें शलाकानीं (डोळ्यांत औषध घालण्याची सळई किंवा काडी तिनें) दृक्-तम (डोळ्यांतील अंधार म्हणजे सारा) [हरावें] तसें सदुक्तिनीं (चांगलीं वचनें सांगून, उपदेश करून) [माझा मोह किंवा मनोदुःख] हरिलें (घालविलें, नाहींसें केलें). १४. डोळ्यांतील अंधार (सारा वगैरे दृष्टिदोष), (पक्षीं) डोळ्यांवरील मोहपटल. 'तम' शब्दावर **श्लेष** आहे. १५. सार्थान्वयः—जसी त्वद्वेणुगीतिस (त्वत्+वेणु+गीति=तुझ्या मुरलीच्या गाण्याकडे) [तशी] यदुक्तिला (ज्याच्या

वदला असें चि तो हि ज्ञानीश व्यास साधु मेधावी. ॥ ३४
अर्जुन तुझ्या प्रसादें तेजस्वी, त्वां चि तेज निज यातें ।
दिधलें, ज्वलनासि जसें रविनें पावावयासि विजया[1]तें. ॥ ३५
दहनाचा वात सखा, सारथि तूं जिष्णुचा तसा आर्या ! ।
वायुविणें अग्नि जसा, जिष्णु हि असमर्थ तुजविणें का[2]र्या. ॥ ३६
बसलासि रथीं ज्याच्या [3]चक्रधरा ! धरुनियां [4]प्रतोदास ।
परमेश्वरा ! अरिवधें पावेल न कां जयासि तो दा[5]स ?' ॥ ३७
ऐसें बोलत धर्म स्वरथीं बैसे, निघे प[6]हायास, ।
[7]तों गेला सुतशोकाकुळ दिनकर सागरीं नहा[8]यास. ॥ ३८
मग [9]उजळिल्या [10]सुगंधस्नेहें [11]मणिदंड दीपि[12]का [12]शतशा ।
[13]भानुप्रभा जशा त्या करिती तम नाशुनि प्रकाश तशा. ॥ ३९
गेला सबळ [14]सहरि [15]नृपें नि[16]जपरकटका हता पहात रणीं. ।

---

भाषणाकडे) चित्तवृत्ति वेधावी (मन गुंतून जावें, मोहून जावें) तो हि ज्ञानीश, साधु, मेधावी (बुद्धिवान्) **व्यास** असें चि (नारदाप्रमाणेंच) वदला.

१. सर्व स्थावरजंगमांवर जय मिळविण्यासाठीं. अग्नि सर्व वस्तुमात्रास जाळून आत्मसात् करूं शकतो, हें प्रसिद्धच आहे. (मागें अध्याय ४७ गीति ७ व तीवरील टीपा पहा). २. कोणतेंहीं कार्य करण्यास. ३. चक्र (सुदर्शन) धारण करणाऱ्या देवा! सुदर्शनचक्र धारण करणाऱ्याला शत्रूंचा नाश करणें सहज आहे, असा ध्वनितार्थ. विष्णूच्या हातांत गदा, चक्र, शंख व खड्ग हीं आयुधें असतात, हें प्रसिद्धच आहे. **परिकरा**लंकार. ४. चाबकास. ५. भक्त, **अर्जुन.** जयासि कां न पावेल=[त्याला] यशःप्राप्ति कां होऊं नये? अर्थात् झालीच पाहिजे–असा भाव. ६. कर्णाचें शव पाहाण्याकरितां. गीति २७ पहा. ७. सार्थान्वयः–तों (इतक्यांत) सुतशोकाकुळ (पुत्रशोकग्रस्त) दिनकर सागरीं नहायास (स्नान करण्यास) गेला. म्हणजे सूर्यास्त झाला. **पर्यायोक्तालंकार.** ही गीति फारच सरस आहे. ८. मृताशौच (सुतक) कळतांच स्नान करावें, असें शास्त्रांत सांगितलें आहे. तेव्हां कर्णवधवृत्त सूर्यास कळतांच तो स्नान करावयास गेला–असा भाव. ९. पेटविल्या. १०. सुगंधी तैलांनीं. ११. रत्नखचित दांड्याच्या. १२. शेंकडों मशाली. १३. जशा त्या (प्रसिद्ध) भानुप्रभा (सूर्याची कांति, अर्थात् सूर्याचे किरण) तम नाशुनि प्रकाश करिती, तशा (सूर्यप्रकाशाप्रमाणें प्रकाश देणाऱ्या) शतशा मणिदंड दीपिका सुगंधस्नेहें मग (सूर्यास्तानंतर) उजळिल्या–असा अन्वय. १४. श्रीकृष्णासह. १५. धर्मराज. पूर्वी चांगले राजे व सेनापति ह्यांची अशी रीत असे कीं, युद्ध संपतांच रात्रीं रणांगणीं जावयाचें, व जो कोणी तेथें विव्हल होऊन पडला असेल, त्याला आणून औषधोपचार करावयाचे; मग तो कोणत्याही पक्षाचा असो. १६. हता निजपरकटका=स्वपक्षीय व शत्रुपक्षीय जखमी सैन्यास. 'निजपरकटकां हतां' असें पाठान्तर.

वाटे भूवरि आला [1]सुतवधसंजातताप हा तरणी ! ॥ ४०
धर्मासि दाखवी प्रभु [2]शरचितभूशायि-कर्णदेहातें, ।
[3]जैसें तृषार्तपथिका सज्जन दावूनि अर्ण दे हातें. ॥ ४१
[4]शरचितें वृषवपु [5]केसरनिकरवृतकदंबकुसुमसें गमलें ।
[6]भरतकुळप्रवराचें तेथें क्षण नयनमधुप-[7]युग रमलें. ॥ ४२
[8]तेजस्विपणें सहजें कर्ण [9]द्युमणिप्रभा गमे त्याला, ।
पाहे पुनःपुन्हां त्या तो राजा [10]भूरिभाग मेल्याला. ॥ ४३
वाटे धर्माला तो [11]तेजस्विप्रवरकर्णपात रणीं ।
[12]सुकृतक्षयें [13]गळाला क्षितिवरि [14]साक्षात् [15]महातपा तरणी ! ॥ ४४
[16]चोळी पावोनि महासाधु अजातारि ताप हातांतें, ।
'[17]धन्य' म्हणे चित्तीं, जो देव गजा तारिता, पहातां तें. ॥ ४५

---

१. पुत्रवधामुळें उत्पन्न झाला आहे शोक ज्याला, असा. **उत्प्रेक्षालंकार.** ह्या ठिकाणीं दिवट्यांच्या उजेडावर केलेली उत्प्रेक्षा फारच मार्मिक आहे. सूर्यास पुत्रशोक झाल्यामुळें त्याचें वदन म्लान झालेंच असलें पाहिजे, म्हणजे अर्थात् नेहमींपेक्षां त्याची प्रभा कमी झालेली होती. एरवीं कितीही दिवट्या असल्या, तरी त्यांचा प्रकाश कधींही सूर्यप्रभेइतका होणें शक्य नाहीं. २. बाणांनीं व्याप्त व भूमीवर पडलेलें कर्णाचें शरीर. ३. सार्थान्वयः—जैसें सज्जन (भला मनुष्य) तृषार्तपथिका (तहान लागलेल्या प्रवाशास) अर्ण (पाणी) हातें (हातानें) दावूनि दे (दाखवून देतो, दाखवितो). ४. बाणांनीं आच्छादिलेलें. ५. परागाच्या समुदायानें वेष्टिलेल्या कदंबाच्या फुलाप्रमाणें. ६. भरतकुलामध्यें उत्पन्न झालेला थोर पुरुष जो धर्मराज, त्याचें. येथें डोळ्यांस दिलेली भ्रमरांची **उपमा** व शरांनीं व्याप्त होऊन रक्ताळलेल्या कर्णशरीरास कदंबपुष्पाची **उपमा,** या दोन्ही फार समर्पक आहेत. ७. नेत्ररूपी भ्रमरद्वय. **रूपक.** 'मग रमलें' असें पाठान्तर. ८. उपजत असणाऱ्या तेजस्वीपणाच्या योगानें. ९. द्युमणि+प्रभा=सूर्याचें तेज. १०. महाभाग, महाभाग्यवान्. ११. महापराक्रम्यांमध्यें श्रेष्ठ जो कर्ण, त्याचें पडणें. १२. पुण्य संपल्यामुळें. १३. पडला. १४. प्रत्यक्ष. १५. महातेजस्वी. प्रत्यक्ष भगवान् सूर्यनारायण पृथ्वीवर पडलेला दिसणें शक्य नाहीं, परंतु पुण्यक्षय झाल्यामुळें तो भूतलीं पतन पावला असावा, असें धर्मराजास वाटलें. कर्ण सूर्यासारखा तेजस्वी होता—असा भाव. **उत्प्रेक्षा.** १६. अन्वयः—महासाधु अजातारि ताप पावोनि हातांतें चोळी. ('हात चोळणें' ह्या क्रियेच्या योगें मनस्ताप व्यक्त होतो). कर्ण व धर्मराज हे परस्परांचे शत्रु होते, पण धर्म 'अजातशत्रु' असल्यामुळें त्याच्या मनास कर्णवधामुळें मोठें दुःख झालें, असें 'अजातारि' पदाच्या योजनेनें पंतांनीं ध्वनित केलें आहे. **परिकरालंकार.** १७. अन्वयः—जो देव गजा तारिता (गजेंद्राचा उद्धार करणारा) [तो] तें पहातां

मृदुहृदय[1] साधु राजा धर्म म्हणे, 'हंते[2]! हा!' तदा त्यातें, ।
'हे[3] गति शिवली, पसरित होते ज्या संत हात[4] दात्यातें!' ॥ ४६
नृप हळहळे, म्हणे, 'रे कर्णा! केलें बळें[5] चि हें काय? ।
त्यजिला महार्ह[6]शयनोचित धूळींत चि दुराग्रहें[7] काय[8]. ॥ ४७
विद्याभाग्यबळमदें[9] अनयें[10] नयरत[11]-जनासि गांजावें, ।
देउनि[12] शोक स्वजना, जोडूनि जगीं अकीर्ति, कां जावें? ॥ ४८
भीष्मद्रोणव्यासप्रमुखांचे सर्वजनहितीं[13] लोलें[14] ।
बोल परम खोल[15] जयां मोल नसे, मानिले तुवां फोल[16]. ॥ ४९
हा परमेश्वर हि तुम्हां गेला होता प्रियेष्ट[17] सांगाया, ।
खळ हो! सजलां[18] सारे दुष्ट कराया निबद्ध कां गा! यां[19]? ॥ ५०
हरि[20]! हरि! विधवा केल्या स्वपरांच्या कोटिशः[21] स्त्रिया लोकीं, ।
कर्णा! स्वयें बुडोलां[22] बुडवुनि आप्ता[23] जनासि ही शोकीं. ॥ ५१

---

त्त्विर्त्तीं 'धन्य' म्हणे. धर्मराजाचा हा मोठेपणा पाहून त्याचें 'अजातारित्व' यथार्थ झालें असें श्रीकृष्णास वाटलें, व तो आश्चर्यचकित होऊन त्यानें धर्मराजास 'धन्य' म्हटलें.

१. कोंवळ्या मनाचा. येथपासून गीति ५३ अखेरपर्यंत सर्व कल्पना खुद्द पंतांच्या आहेत. २. हाय! हाय! ३. अन्वयः–ज्या दात्यातें (दानशूरातें) संत तदा (तेव्हां, जीवंतपणीं) हात पसरित होते, त्यातें (कर्णातें) हे गति शिवली. ४. गीति ४६ व ४७ यांत विषमालंकार आहे. ५. बुद्ध्या. ६. महा+अर्ह+शयन+उचित=फार मौल्यवान् अशा पलंगावर निजावयास योग्य असा. ७. हट्टानें. ८. देह. ९. विद्या, संपत्ति, सामर्थ्य व गर्व ह्यांच्या योगानें दुर्योधनाची व त्याच्या पक्षांतील कर्णादिकांची स्थिति पुढील सुभाषितांत वर्णिल्याप्रमाणेंच झाली होती, व म्हणूनच त्यांच्या हातून निरनिराळीं दुष्कृत्यें घडलीं:—यौवनं धनसंपत्तिः प्रभुत्वमविवेकिता । एकैकमप्यनर्थाय किमु यत्र चतुष्टयम् ॥ १०. अन्यायानें. ११. न्यायप्रियांस. 'नयरंजनासि' असें पाठान्तर. रंजन=उत्तेजन देणें, मन मोहित करणें. १२. अप्रस्तुतप्रशंसा. १३. सर्व लोकांच्या कल्याणाविषयीं. १४. उत्सुक. १५. अर्थपूर्ण. १६. व्यर्थ. अर्थात् त्यांचें असलें (हितप्रद) भाषण तुच्छ करून हा प्रसंग ओढवून घेतलास–असा भाव. अनुप्रास. १७. स्नेहास योग्य असें. १८. तयार झालांत. १९. श्रीकृष्णास. श्रीकृष्ण कौरवांकडे शिष्टाई करण्यास गेले असतां त्यांस बांधून टाकण्याचा विचार कौरवांनीं केला होता–अशी कथा आहे. (पंतकृत उद्योगपर्व, अध्याय ९ पहा). २०. हे दुःखोद्गार आहेत. ह्या पूर्वार्धांत पर्यायोक्तालंकार आहे. २१. 'कोटिश स्त्रिया' असा पाठ रा० पराडकर यांच्या प्रतींत आहे. २२. [तुम्ही] (दुर्योधनादि कौरव व तत्पक्षीय योद्धे) बुडालां–असा अन्वय. २३. जवळच्या संबंध्यांस. हें 'जनासि' ह्याचें विशेषण.

आकृति तुझी निरुपमा; सर्वा रुचिराकृतींत रुचिरा हे, ।
प्राणरहिता हि शोभे; कोठें हि शवीं न लेश रुचि राहे. ॥ ५२
होतासि दानशूर, ब्रह्मण्य; गुणज्ञ वर्णितील गुणा. ।
सांक म्हणोनि अमृतकर, दे ताप म्हणोनि मित्र काय उणा?' ॥ ५३
ऐसें वदोनि मग तो धर्म प्रभुला म्हणे, 'अगा कवचा ! ।
"नश्यति न मे जनो" या बोल न लागों दिला तुवां स्व-वचा. ॥ ५४
झालों आजि नृपति मीं, केलें त्वां स्वाश्रितामरद्रो ! हें. ।

---

१. सार्थान्वयः–तुझी आकृति (मूर्ति) निरुपमा; हे (ही) सर्वा रुचिराकृतींत (सुंदर मूर्तीमध्यें) रुचिरा; प्राणरहिता हि (प्राण जाऊन प्रेतरूप झाल्यावर सुद्धां) शोभे (सुंदर दिसते आहे); कोठें हि शवीं (इतर कोणाच्या प्रेताचे ठायीं) रुचि (सौंदर्य) लेश (तिलमात्र सुद्धां) न राहे (असत नाहीं, नसतें). २. **विशेषोक्ति.** ३. अत्यंत उदार. ४. ब्राह्मणांविषयीं दयाळू. ५. सार्थान्वयः–अमृतकर (चंद्र) सांक (स+अंक=कलंकासहवर्तमान) म्हणोनि, [व] मित्र (सूर्य) ताप दे म्हणोनि उणा (कमी) [समजावयाचा] काय ? अर्थात् नाहीं. चंद्रसूर्यांना नांवें ठेवणारे लोक आहेत, तसे कर्णाला दोष देणारे असतीलच. पण तेणेंकरून त्याच्या आंगच्या गुणांचें महत्त्व कमी होतें कीं काय ?–अर्थात् त्याच्या गुणांचें महत्त्व कमी होत नाहीं. गुणज्ञ त्याच्या गुणांचें वर्णन करतीलच–असा भाव. येथें 'तत्को नाम गुणो भवेत्स गुणिनां यो दुर्जनैर्नाङ्कितः' ह्या भर्तृहरीच्या उक्तीचें [नीतिशतक–श्लोक ५४] स्मरण होतें. ह्या उक्तीचें पंडितकृत रूपान्तरः– 'ऐसा तो गुण कोणता खलजनीं नाहींच जो निंदिला ? ।'. **दृष्टांता**लंकार. पुढील वचनही प्रसिद्धच आहे:—'एको हि दोषो गुणसन्निपाते निमज्जतीन्दोः किरणेष्विवाङ्कः' (कुमारसंभव–सर्ग १.) ६. चिलखताप्रमाणें रक्षणकर्त्या ! कृष्णाला कवचासारखा न म्हणतां 'कवचरूप' म्हटलें आहे, म्हणून **रूपकातिशयोक्ति.** ७. सार्थान्वयः–'मे जनो न नश्यति' (माझा जन अर्थात् आश्रितजन नाश पावत नाहीं) या स्ववचा (स्वतःच्या वचनाला) तुवां बोल (दोष) लागों न दिला. (हे स्वतःचे शब्द तूं खोटे होऊं दिले नाहींस). अर्थात् आमचें संरक्षण करून तूं आपलें बोलणें खरें केलेंस–असा भाव. ८. 'नश्यति न मे जनः' हें भगवद्गीतेंतील 'न मे भक्तः प्रणश्यति' ह्या वचनाचें रूपान्तर आहे. येथें पुढील वचनांवर कविकटाक्ष आहे:–(१) क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति । कौन्तेय ! प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति. ॥ (अध्याय ९ श्लोक ३१); (२) यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति । तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति । (अध्याय ६ श्लोक ३०). ह्या गीतावचनांचें रूपांतरः–(१) त्याची बुद्धि धर्माकडे त्वरित लागते आणि त्याला सर्व काळची शांति प्राप्त होते. कौंतेया ! निश्चयपूर्वक जाण कीं, माझा भक्त सर्वस्वीं नष्ट होत नाहीं. (२) जो सर्वांच्या ठायीं मला पाहातो आणि माझ्या ठायीं सर्व पाहातो, त्याला मी नाहींसा होत नाहीं आणि मला तो नाहींसा होत नाहीं. ह्या आश्वासनाच्या बळावरच भक्तांच्या हातून मोठेमोठे पराक्रम घडतात. ९. स्व+आश्रित+अमर+द्रु=आपल्या आश्रितांच्या कल्पवृक्षा !

पावेल विजय कोण श्वापद पंचास्यशावकद्रोहें[1] ? ॥ ५५
देहनासि[2] वायु जैसा प्रियसख, वृष त्या[3] सहाय कितवा, हा ।
राज्य हरणार होता या दिव्यास्त्रें[4] वधूनि सितवाहा. ॥ ५६
आजि निराश सुयोधन, गतमद[5] ही जेंवि नाग[6] हतदंत[7]. ।
जो उत्खातखररदननखरनिकर[8] हरि, अशक्य[9] न तदंत. ॥ ५७
होता[10] सुयोधनाचा[11] या राज्यफळीं सहाय हा यजनीं ।
म्हणत असेल सगद्गद आठवुनी यास 'हाय ! हाय !' जनीं. ॥ ५८
कृष्णा ! सुयोधनाची अतुला[12] लोकत्रयांत बालिशता[13]; ।
हीं[14] बहु मान्य कविमतें दशकंठशता तथैव वालिशता. ॥ ५९

---

१. सिंहाच्या बच्चांचा द्वेष करून. भक्त परमेश्वराचीं मुलेंच आहेत. दृष्टांतालंकार. २. अन्वयः—जैसा वायु दहनासि (अग्नीला) प्रियसख (हितकर्ता, स्नेही), [तैसा] वृष (कर्ण) त्या कितवा त्या कपटी (दुर्योधनाला) सहाय (मदत करणारा). हा (वृष) या दिव्यास्त्रें सितवाहा (अर्जुनास) वधूनि, राज्य हरणार होता. ३. त्या जुगारी दुर्योधनाला. ४. कर्णरूपी दिव्यास्त्रानें. ५. ज्याच्या अंगची उन्मत्तता गेली आहे, असा हत्ती. 'मदो रेतसि कस्तूर्यां गर्वे हर्षेभदानयोः' इति मेदिनी. ६. नाग म्हणजे हत्ती व सर्प—असे अर्थ आहेत. ह्या दोन्ही अर्थीं हा शब्द पंतांनीं योजिलेला दिसतो. दुर्योधन निराश झाला. कसा? तर दांत पाडलेल्या सापाप्रमाणें व ज्याची मस्ती जिरली आहे अशा हत्तीप्रमाणें—असा भाव. ७. पाडलेले आहेत दांत ज्याचे, असा सर्प. ८. उत्खात+खर+रदन+नखर+निकर=उपटून टाकिला आहे तीक्ष्ण दांत व नखें ह्यांचा समूह ज्याचा, असा. हें विशेषण 'हरि' (सिंह) याचें आहे. ९. तदंत अशक्य न= त्याचा (हरीचा) नाश कठीण नाहीं. दृष्टांतालंकार. १०. सार्थान्वयः—या (ह्या) राज्यफळीं (राज्य आहे फल ज्याचें, त्यामध्यें) यजनीं (यज्ञामध्यें, अर्थात् समरयज्ञांत) हा (मित्र—कर्ण) सुयोधनाचा सहाय होता. यास आठवुनी जनीं सगद्गद (दुःखानें कंठ दाटून) [हा—दुर्योधन] 'हाय ! हाय !' म्हणत असेल. मला साहाय्य करणारा कर्ण होता, तो मरण पावल्यामुळें, आतां मी असहाय झालों, असें वाटून दुर्योधन 'हाय ! हाय !' म्हणून रडत असेल, असा भाव. किंवा—हा सहाय (हा मला मदत करणारा कर्ण) या राज्यफळीं यजनीं (ह्या राज्य प्राप्त करून देणाऱ्या यज्ञांत) होता (ऋत्विज) [होता]. होता=ऋत्विजविशेष. हा ऋग्वेदी असून त्याचें काम यज्ञांतील देवतांस स्तुतिपूर्वक आव्हान करण्याचें असतें. दुर्योधनानें जो रणयज्ञ आरंभिला होता, त्यांत साहाय्य करणारा 'होता' कर्ण असे—असा अर्थ. गीति ५८, ५९, व ६० यांतील सुंदर कल्पना पंतांच्याच आहेत. ११. 'सुयोधनाच्या' असें पाठान्तर. १२. निरुपमा. १३. पोरखेळ, अविचार. १४. सार्थान्वयः—कविमतें (शहाण्या लोकांच्या मतें) हा (दुर्योधन) दशकंठशता (रावणाच्या शंभरास, अर्थात् शंभर रावणांस) तथैव (त्याचप्रमाणें) वालिशता (शंभर वालींस) बहु मान्य. अर्थात् ह्या दुर्योधनाचा पोरकटपणा वालि व रावण ह्यांच्या

सुग्रीवा[1] राम तसा, आम्हां व्यसनाब्धिसेतु[2] तूं देवा ! ।
परि[3], इच्छिली नसे चि प्रत्युपकृतिरूपिणी तुवां सेवा. ॥ ६०
त्वां जिष्णु धन्य केला, यश वाढविलें, दिली मला धरणी[4], ।
वदला होतासि, "यश लाध[5] रणीं[6], अपयश न लाध[5] रणीं[6]." ॥ ६१
जो[8] प्रभु सीमा अश्वत्थाम्याचा गुरु पिता महत्वांची[9] ।
तो अनुभविला; तो हि प्रौढ कृती कुरुपितामह त्वां ची. ॥ ६२
"धरंवीन[10] चि शस्त्र" असा केला झाला चि सिद्ध पण ज्याचा, ।
कोणासि[11] साहता या प्रतिविंध्याच्या प्रताप पणज्याचा ? ॥ ६३

---

अविचारापेक्षां शंभरपटीनें अधिक होता–असा भाव. ह्या गीतींत केलेली अविचाराची तुलना फारच नामी आहे. **रावण**, **वाली** व **दुर्योधन** ह्या तिघांनींही आपापल्या शत्रूची स्त्री हरण करण्याचा अविचार केला. पण **दुर्योधनानें** शत्रूचें राज्यही हरण करण्याचा यत्न केला. तेव्हां हें उघड दिसतें कीं, **वाली** व **रावण** यांपेक्षां **दुर्योधनाचा** अविचार अधिक होता.

१. ह्या गीतींत **पांडव** व **सुग्रीव** ह्यांची केलेली तुलना फारच योग्य आहे. कारण **वालीनें** **सुग्रीवाचें** राज्य हरण करून त्यास हांकून दिलें होतें, त्याचप्रमाणें **दुर्योधनानेंही** **पांडवांचें** राज्य हरण करून त्यांस हांकून दिलें होतें. **वालीनें** **सुग्रीवाची** स्त्री हरण केली, **दुर्योधनानें** **पांडवस्त्रीची** विटंबना केली, व तिचें हरण करण्याचा यत्न केला होता, पण तो निष्फळ झाला. २. संकटरूप समुद्र तरून जाण्याचा पूल. ३. अन्वयः–परि, प्रत्युपकृतिरूपिणी (उपकाराच्या मोबदल्याच्या स्वरूपाची) सेवा तुवां (त्वां) इच्छिली नसे चि. उपकाराची फेड व्हावी अशी इच्छा केली नाहींस, अर्थात् निरपेक्ष बुद्धीनें आमचें साहाय्य केलेंस. 'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन' (भगवद्गीता, अध्याय २।४७) ह्या तत्वाचा प्रणेता जो भगवान् श्रीकृष्ण, तो अशा प्रकारें वागला, हें योग्यच झालें. ४. पृथ्वी, पृथ्वीचें राज्य. ५. प्राप्त करून घे, मिळीव. ६. समरांगणावर. ७. **आशीरलंकार**. ८. सार्थान्वयः–जो अश्वत्थाम्याचा पिता, [आमचा] गुरु, [निरनिराळ्या प्रकारच्या] महत्वांची सीमा (थोरपणाचा कळस) [व] प्रभु (सामर्थ्यवान्) तो त्वां ची अनुभविला (त्याचा केवढा पराक्रम होता ह्याची समरांगणीं तूंच प्रत्यक्ष प्रतीति घेतलीस) [व जो] **कुरुपितामह** (भीष्माचार्य) प्रौढ (पोक्त, अनुभवशीर, कसलेला) [व] कृती (धन्य) तो हि [त्वांचि अनुभविला.] ह्या दोघांचाही अनुभव तुला आला आहे, म्हणजे ते दोघे केवढे जबरदस्त वीर होते, हें तुला पूर्णपणें माहीत आहे. **भीष्माचार्य** व **द्रोणाचार्य** हे दोघे **कुरुकटकाचे** सेनापती होते. ९. 'महत्वाची' असें पाठान्तर. १०. **भीष्मप्रतिज्ञेची** कथा येथें अनुसंधेय आहे. (पंतकृत भीष्मपर्व, अध्याय ४ पहा). केला=केलेला. ११. त्या **प्रतिविंध्याच्या** (युधिष्ठिरापासून द्रौपदीस झालेला जो पुत्र त्याच्या) पणज्याचा (भीष्माचा) प्रताप कोणासि साहता ? (कोणाला सहन करवता ?). त्याच्या सामर्थ्यापुढें कोणाचा टिकाव लागला असता ? अर्थात् कोणीही त्याच्यापुढें टिकाव धरूं शकला नसता–असा भाव.

या कर्णभयें क्रमिले म्यां तेरा [1]जागरें चि हायन हो ! ।
मजला झाला होता ताप असा शत्रुला हि [3]हाय ! न हो. ॥ ६४
[4]होतों व्याकुळ तैसा मृग हि हरिगुहामुखीं न घोर तमीं. ।
आजि तुझिया प्रसादें बा ! बहुदिवसां निजेन घोरत मीं. ॥ ६५
हें माझ्या हृदयींचें [5]लीलेनें काढिलें [6]महाशल्य. ।
वर्णूं काय प्रभुजी ! [7]मीं [8]त्वत्करुणाकटाक्षकौशल्य.' ॥ ६६
ऐसी करी प्रशंसा धर्म नृपति त्या [9]महाप्रभावाची, ।
[10]तंसि च जया सुर, दानव, मानव मानवति त्या स्व भावाची. ॥ ६७
धृष्टद्युम्न, वृकोदर, सात्यकि, माद्रेय म्हणति, '[11]हा नृप या ।
संश्रितजनकल्पतरोर्जयतितरां यदुशिरोमणेः कृपया.' ॥ ६८
पांडव मग शिबिराप्रति गेले, जैसे [12]स्वगह्वरांसि [13]हरी. ।
कौरव तैसे झाले [14]यूथप वधितां जसे [15]भयार्त [16]करी.' ॥ ६९

संजय म्हणे, '[17]नृपाळा ! [18]झाले भट सर्व सत्य भाट तसे; ।

---

१. निजल्यावांचून, अर्थात् मनःस्वास्थ्य नसल्यामुळें झोंप आली नाहीं–असा भाव. २. वर्षें. ३. दुःखोद्गार. **लोकोक्ति.** ४. सार्थान्वयः–घोर तमीं (भयंकर संकटामध्यें) [जैसा मी] व्याकुळ होतों, तैसा हरिगुहामुखीं (सिंहाच्या गुहेच्या तोंडाशीं) मृग हि न. बा! बहुदिवसां (पुष्कळ दिवसांनीं) आजि तुझिया प्रसादें मीं घोरत निजेन (स्वस्थ निजेन. मला आज स्वस्थ झोंप लागेल). ५. सहज. ६. मोठा कांटा. ७. 'हें' असें पाठान्तर. ८. त्वत्+करुणा+कटाक्ष+कौशल्य=तुझ्या कृपादृष्टीची कुशलता. ९. अचाटशक्ति परमेश्वराची. १०. सार्थान्वयः–जया (ज्या अर्जुनाला) सुर (देव), दानव (दैत्य) [व] मानव मानवति (पसंतीनें मान डोलवितात), त्या स्व भावाची (आपल्या भावाची–अर्जुनाची) तसि च (कृष्णाप्रमाणेंच) [प्रशंसा] (स्तुति) [करी]. ११. सार्थान्वयः–या (ह्या) संश्रितजनकल्पतरोः (आश्रितजनाचा कल्पतरु, अर्थात् आश्रितजनांचें इच्छित पुरविणाऱ्या) यदुशिरोमणेः (यदुश्रेष्ठाच्या) कृपया (कृपेनें) हा नृप (धर्मराज) जयतितरां (उत्कर्षेंकरून वर्ततो). ह्या गीतीचें उत्तरार्ध संस्कृत आहे. पण वाक्य पूर्ण होण्यास पूर्वार्धांतील कांहीं मराठी शब्द घ्यावे लागतात. पंतांच्या काव्यांत अशी संस्कृतमराठी वाक्यरचना क्वचितच आढळते. १२. आपल्या गुहांस. **उपमा**लंकार. १३. सिंह. १४. मोहरक्या, कळपाचा नायक. १५. भयाकुल. १६. हत्ती. **विरुद्धगुणन्यासा**लंकार. १७. धृतराष्ट्रा. १८. सार्थान्वयः–सर्व भट (वीर) सत्य (खरोखर) तसे (६८ व्या गीतींत सांगितल्याप्रमाणें) भाट झाले (स्तुति करूं लागले), किंवा–[जसे] सत्य (खरे) भाट असतात तसे सर्व भट झाले, म्हणजे

वृत्रवधमुदितसुरनुतशतमखसम मज वृषारि वाटतसे.' ॥ ७०
गे[1]ली धृतराष्ट्राच्या संजयवदनेंकरूनि कर्णपथा ।
संताप द्यावयाला हे पार्थहतप्रवीरकर्णकथा. ॥ ७१
ज[2]नमेजयश्रुतिप्रति वैशंपायनमुखें चि हे गेली. ।
मग सू[3]तमुखें शौनकमु[4]ख्यमुनिश्रोत्रमंदिरीं[5] ठेली.' ॥ ७२

श्रीमं[6]तसदाशिवात्मज बाबूजीनायक प्रभु ज्ञानी ।
ध[7]न्य म्हणावें ज्याला शुद्धगुणश्रवणतृप्तसुज्ञानीं. ॥ ७३
दाता वक्ता योद्धा ते[8]जस्वी मा[9]नधन असामान्य ।
अं[10]तुळें पितृप्रसादें मंडित देवव्रता-असा मान्य. ॥ ७४

---

भटांनीं (योद्ध्यांनीं) आपलें भटत्व सोडून देऊन भाटत्व पतकरिलें. वृषारि (कर्णशत्रु, अर्जुन) वृत्रवधमुदितसुरनुतशतमखसम (वृत्रासुराच्या नाशानें आनंद पावलेल्या देवांनीं स्तुति केलेल्या इंद्राप्रमाणें) मज (संजयाला) वाटतसे (भासतो). शतक्रतु=ज्यानें शंभर यज्ञ केले आहेत असा, अर्थात् इंद्र. शंभर यज्ञ केल्याशिवाय इंद्रपद प्राप्त होत नाहीं, अशी समजूत आहे.

१. सार्थान्वयः—हे (ही) पार्थहतप्रवीरकर्णकथा (अर्जुनानें मारलेल्या वीरश्रेष्ठ कर्णाची वार्ता) संजयवदनेंकरूनि (संजयाच्या मुखानें) संताप द्यावयाला धृतराष्ट्राच्या कर्णपथा गेली. संजयानें ही हकीकत धृतराष्ट्रास सांगितली, व त्या योगें त्याला दुःख झालें. २. जनमेजयाच्या कानावर. अर्थात् ही कथा वैशंपायनानें जनमेजयास सांगितली. ३. सूतऋषींनीं शौनकादिक मुनिश्रेष्ठांस निवेदन केली. पर्यायोक्त. ४. शौनकप्रमुख ऋषिजनांच्या कर्णरूपी मंदिरांत. रूपकालंकार. ५. राहती झाली. ६. बाबूजी नाईक बारामतीकर ह्यांच्या पदरीं पंत होते. त्यांच्या वडिलांचें नांव सदाशिव नाईक. ७. उज्ज्वल गुणांच्या श्रवणानें (उज्ज्वल गुण ऐकून) संतुष्ट झालेल्या शहाण्यांनीं ज्याला (बाबूजी नाइकास) धन्य (कृतकृत्य) म्हणावें. ८. करारी स्वभावाचा. ९. कीर्ति हेंच आहे धन ज्याचें, असा. सराफांस मानापेक्षां धनाची योग्यता अधिक वाटते; पण आपल्या आश्रयदात्याला ह्या दुर्गुणाचा लेश देखील शिवला नव्हता, हें दाखविण्यासाठीं पंतांनीं हें विशेषण दिलेलें आहे. १०. सार्थान्वयः—अतुळें पितृप्रसादें (वडिलांच्या लोकोत्तर कृपेनें) मंडित (भूषित झालेला) [बाबूजी नाईक] देवव्रता-असा (भीष्माचार्यासारखा) मान्य (योग्य भासला). भीष्माचार्यांचा पिता शंतनु याची इच्छा सत्यवती नामक धीवरकन्येशीं विवाह करावा, अशी होती. पण तिला होणाऱ्या पुत्रासच शंतनूच्या पाठीमागें राज्यपद प्राप्त व्हावें, अशी तिच्या पित्याची अट होती. ती पूर्ण करण्यासाठीं भीष्माचार्यांनीं आजन्म ब्रह्मचर्यव्रतानें राहाण्याचें मान्य केलें, व नंतर शंतनु व सत्यवती यांचा विवाह झाला. तेव्हां शंतनु भीष्माचार्यांवर प्रसन्न झाला व त्यानें त्यांस 'तूं इच्छामरणी होशील' असा

यो साधुसंगमुदिरें मुदितश्रीरामसुतमयूर कृती ।
नरनारायणविजयग्रंथ करी व्हावया सुखी सुकृती. ॥ ७५

॥ इति श्रीमन्महाभारते कर्णपर्वणि श्रीरामनंदनमयूरेश्वरविरचिते पंचाशत्तमोध्यायः ॥

॥ श्रीरामचंद्रचरणार्पितमस्तु ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

॥ श्रीलक्ष्मीनृसिंहो जयति ॥

---

वर दिला. अशी कथा आहे. (पंतकृत आदिपर्व, अध्याय १३ पहा.) अशा प्रकारें शंतनूचा पूर्ण अनुग्रह होऊन भीष्माचार्य इच्छामरणी झाले. बाबूजी नाइकांवर त्यांच्या वडिलांचें प्रेम होतें, व तेही वडिलांचें 'यः प्रीणयेत्सुचरितैः पितरं स पुत्रः' ह्या न्यायानें समाराधन करण्यांत तत्पर असत—असा भाव.

१. सार्थान्वयः—या साधुसंगमुदिरें (सज्जन जो बाबुराय त्याच्या समागमरूप मेघानें) मुदितश्रीरामसुतमयूर (आनंदित झालेला रामचंद्राचा पुत्र मयूर=मोरोपंत, पक्षीं मोर) [हा आपण] कृती (सद्गुणयुक्त, भक्तिमान्), सुखी व सुकृती (धन्य) व्हावया नरनारायणविजयग्रंथ (कृष्णार्जुनांचा विजय ज्यांत वर्णिला आहे असा) [कर्णपर्वरूपी] ग्रंथ करी (रची).

# सुभाषित.

खालीं दिलेल्या सुभाषिताचा पंतकृत कर्णपर्वाशीं कांहीं संबंध नाहीं. परंतु कर्णाच्या जन्माचें, पराक्रमाचें व पराजयाचें श्लेषयुक्त वर्णन त्यांत असल्यामुळें तें रसिक वाचकांस चमत्कृतिजनक वाटेल, व तें वाचून त्यांस आनंद होईल, असें समजून तें येथें दिलें आहे:—

कन्याप्रसूतस्य धनुःप्रसंगात्
प्रभाविनोऽगाहितवैभवस्य ।
धनंजयाधीनपराभवस्य
शीतस्य कर्णस्य च को विशेषः ? ॥

अर्थः—( दुर्योधनमित्र कर्ण आणि शीत यांवर श्लेष ) कर्णांत आणि शीतांत ( शीत=थंडी ) काय भेद आहे ? दोघांचाही जन्म कन्येपासून ( कर्ण हा कुंतीला कौमारावस्थेंत झालेला पुत्र होय, हें प्रसिद्धच आहे; थंडीला आरंभ कन्याराशीपासून होतो ); दोघांसही धनुःप्रसंगानें ( धनुष्याच्या योगानें, पक्षीं—धनुराशीमुळें ) बळ येऊन त्यांचा प्रभाव अतिशयित प्रगट होतो ); आणि दोघांचाही पराभव धनंजयाच्या ( अर्जुनाच्या, पक्षीं—अग्नीच्या ) अधीन !

# मोरोपंतकृत कर्णपर्वाचीं परिशिष्टें.

## १. अलंकारवैपुल्य.

[ पंतांनीं आपली कविताकन्यका अनेक सुंदर अलंकारांनीं नटविली आहे. अशा बहुविध अलंकारांचा उल्लेख त्या त्या ठिकाणीं मूळ ग्रंथावरील टीपांत केलेला आहे. परंतु कांहीं ठिकाणीं कवितात्मजेला तिच्या प्रेमळ व सहृदय पित्यानें मोठ्या कौतुकानें अगदीं नखशिखान्त भूषविण्याचा प्रयत्न केलेला असून त्यांत त्याला उत्तम प्रकारचें यशही प्राप्त झालें आहे. ह्या आमच्या म्हणण्यास पुष्टि देणारे दोन उतारे पुढें दिले आहेत. ]

(अ.) अलंकारांची 'मिसळ' स्वयंपाकघरांतल्या 'मिसळण्या'सारखी समजावी. 'मिसळ' जशी अर्थालंकारांची असते, तशी शब्दालंकारांचीही असते. आणि जशी शब्दालंकारांची असते, तशी शब्दार्थालंकारांचीही असते. × × × अर्थालंकार व शब्दालंकार यांचा कधीं कधीं असा मिलाफ झालेला असतो कीं, त्यांत अमुकच असा अलंकार स्वतंत्र मानितां येत नाहीं. ही अलंकारांची 'चटणी'. ही 'चटणी' दोन प्रकारची असते—एक 'उघड' व दुसरी 'खुबीची'. × × × कधीं कधीं 'मिसळ' असते आणि 'चटणी'ही असते. ह्या दोहोंचा मिलाफ होतो, त्यास 'पंचामृत' किंवा 'पंचामृती योग' म्हणतात. ( अलंकारमीमांसा ).

ह्या 'पंचामृती योगा'संबधानें 'अलंकारमीमांसा' ह्या पुस्तकाचे कर्ते **पंतभक्त** कै० प्रो० **राजारामशास्त्री भागवत** यांनीं ह्या पर्वातील एका गीतीसंबंधीं अलंकारविषयक जी चर्चा केली आहे, ती अशीः—

अद्भुतकर्णशरासनघनजनितामितविशुद्धशरधारा ।
तापविती, कांपविती, निर्मिति, तटिनी जपासुमाकारा. ॥ अध्याय २।१७.

पहिल्या अर्धांत 'न' काराचा, 'त' काराचा, 'श' काराचा, 'ध' काराचा, 'र' काराचा अनुप्रास; दुसऱ्या अर्धांत 'तापविती, कांपविती' हें यमक. यांस अनुप्रासांची 'चटणी' म्हटल्यास चालेल. पण अनुप्रास व यमक यांची 'मिसळ' आहे. 'तापविती' हा साधारण धर्म जर उपमित समास ठरविण्यास सिद्ध आहे, तर 'कांपविती' 'तटिनी निर्मिति' हे दोन साधारण धर्म रूपक समासही ठरविण्यास सिद्ध आहेत. तेव्हां ही 'खुबीची चटणी' झाली. ''तापविती, कांपविती, निर्मिति'' हें 'कारकदीपक' आहे. या तीन धर्मांपैकीं दाहोंचा 'जलधारे'शीं अन्वय असून एकाचा 'शरधारे'शीं आहे. तेव्हां 'खुबीची चटणी' व कारकदीपक या दोहोंची 'उघड चटणी' आहे. 'जपासुमाकारा तटिनी' ही धर्मलुप्ता उपमा होय; कारण हींत 'तांबड्या' या साधारण धर्माचा लोप झाला आहे. ही कारकदीपकाची आणि लुप्तोपमेची 'उघड चटणी' आहे. 'तटिनी निर्मिती' ही असंबंधीं संबंध लावणारी अतिशयोक्तीही होते. घनांतून चालणाऱ्या 'धारा' 'जपासुमाकारा तटिनी न निर्मिति'; पण या 'कर्णशरासन'रूपी घनांतून चालणाऱ्या ''धारा निर्मिति;'' म्हणून हा 'घन' खरोखरच

'अद्भुत.' अशी 'अद्भुत' पदाची सार्थकता झाली, म्हणजे 'परिकरा'चीही 'चटणी' झाली. हें 'अद्भुत' पद या घनाचा व्यतिरिक्तपणा ध्वनित करीत आहे, म्हणून व्यतिरेकाचा ध्वनीही होतो. 'शर' या शब्दापुढें 'जल' शब्द अध्याहृत मानला म्हणजे एकदेशविवर्ति रूपक किंवा एकदेशविवर्ति उपमा प्रसंगाप्रमाणें म्हणतां येईल. याप्रमाणें या आर्येत जशी 'मिसळ' आहे, तशी 'उघड' व 'खुबीची'ही उभयविध 'चटणी'ही आहे; म्हणून हें अति खमंग 'पंचामृत' समजावें. यांत कर्णाचा वीररस किंवा पराजित झालेल्या दळाचा भयानक रस अलंकार्य असून, 'जपासुमाकारा' हें 'तांबड्या' या पदाच्या ऐवजीं पर्यायोक्त आहे. याप्रमाणें अतिखमंग पंचामृतामध्यें जशी अलंकारांची तशी अलंकार्यांचीही सामुग्री भरलेली असते. या ग्रंथांत जीं उदाहरणें देण्यांत आलीं आहेत, त्यांच्यापैकीं पुष्कळांमध्यें हा 'पंचामृती योग' थोडा विचार केल्यास सहज दृष्टोत्पत्तीस येण्यासारखा आहे. कवीची हातोटी असते, ती 'पंचामृती योग' साधण्यांत असते. (अलंकारमीमांसा–पृष्ठें ५९–६०).

(ब.) रा. रा. विद्याधर वामन भिडे, बी. ए. हे एक नामांकित ग्रंथकार आहेत. त्यांनीं मराठी भाषेंत अनेक उपयुक्त ग्रंथ लिहिले आहेत. त्यांपैकीं 'अर्थालंकारांचें निरूपण' ह्या ग्रंथांत ह्या पर्वांतील एका गीतीसंबंधानें त्यांनीं अलंकारविषयक जें विवरण केलेलें आहे तें:–

तो शर गरधरवरसा, पविसा, रविसा, स्मरारिसायकसा ।
पार्थभुजांतरिं शिरला वल्मीकामाजि नागनायकसा. ॥ अध्याय ४९।३१.

कर्णानें सोडलेला बाण पार्थाच्या छातींत घुसला, मोठा सर्प जसा वारुळांत शिरतो तसा. तो बाण सापासारखा, वज्रासारखा, सूर्यासारखा आणि शंकराच्या बाणासारखा होता.

ह्या आर्येंत चार शब्दालंकार आणि पांच अर्थालंकार आहेत. (१) शर-गर-धर-वर यांत 'र' हें अक्षर मागल्या 'अ' ह्या स्वरासह चार वेळां आवृत्त झालें आहे. हा 'वृत्त्यनुप्रास' नामक शब्दालंकार. (२) पविसा-रविसा यांत 'विसा' ह्या दोन अक्षरांची मागल्या 'अ' ह्या स्वरासह आवृत्ति झाली आहे. हा 'छेकानुप्रास' नामक अलंकार. (३) यकसा-यकसा हें त्र्यक्षरी यमक मागल्या 'आ' ह्या स्वरासह आर्येच्या दोन्ही अर्धांच्या शेवटीं आलें आहे. हा 'अंत्ययमक' नामक शब्दालंकार. (४) 'र' ह्या व्यंजनाची दहा वेळां एकंदर आर्येंत आवृत्ति.

येणेंप्रमाणें ह्या आर्येंत चार शब्दालंकार आहेत; आतां अर्थालंकार किती आहेत तें पाहूं.

(१) 'तो शर वारुळांत श्रेष्ठ सर्प शिरतो, तसा पार्थाच्या छातींत शिरला' ही उपमा आहे. (२–५) 'गरधरवरसा' 'पविसा' 'रविसा' 'स्मरारिसायकसा' ह्या चार उपमा आहेत.

एकंदर पांच उपमा, हे पांच अर्थालंकार आणि वर सांगितलेले चार शब्दालंकार मिळून नऊ अलंकारांचें येथें संमेलन झालें आहे. हे सारे नऊ अलंकार परस्परनिरपेक्ष आहेत, म्हणून ही (अलंकारांची)–'संसृष्टि' होय. ह्या नऊ अलंकारांपैकीं कोणतेही अलंकार नाहींतसे केले, तरी बाकीच्या अलंकारांची कांहीं क्षति होत नाहीं. (अर्थालंकारांचें निरूपण, पृष्ठें १९५–९६).

# २. अपरिचित शब्दांची सूचि.



---

१. ह्या व पुढील तीन परिशिष्टांतील शब्द किंवा शब्दसमुच्चय यांच्या पुढील पहिला अंक अध्याय व दुसरा अंक गीति यांचा दर्शक आहे.

## ३. भाषणसांप्रदायांची सूचि.

## ४. सश्लेष शब्दांची सूचि.

## ५. काव्यरचनेंतील चालढकल.

**१. अग्राह्य समास—**

क्रिया-बेज्या ४११९

गुरु-पाय २७१४४

धेनु-कळप ३०।७७

शर-भाते १७१७

शाप-साप ३०।८८

सुकीर्ति-सेले २९।३२

**२. विसंधि—**

कर्ण-अर्यमा १४।५७

क्रोध-अहि २९।३२

तेज-ओक ३२।९

त्रिपुरदहन-इतिहास २१।४५

भट-आमलक ३९।३०

महा-उग्र ९।२३

यश-तोय २१।७

शर-अहि १६।१५

**३. शब्दांची ओढाताण—**

अरिला=असला ३६।३१

उर्वा=उरवी ८।१५

गुरू=गुरु २९।२

चिखोल=चिखल १२।१५

परिक्षा=परीक्षा ४०।३

पर्तावें=परतावें २८।६

पर्वा=परवा २९।३१, ३८।२१

भील=भिईल ३३।१७

शतशा=शतशः ३३।५

सिमा=सीमा ३६।१०

हिंसा=हिंवसा ४१।४९

त्यांशिवाय आणखी पुढील दोषही आढळतातः—

१. अनुस्वारव्यत्ययदोष ४७।२९

२. पुढें जोडाक्षर असून मागील अक्षर दीर्घ झालेलें नाहीं ६।७

३. 'छ' अक्षराचा 'च्छ' ह्या जोडाक्षराप्रमाणें उपयोग ३५।५३

४. यतिभंग ४१।३३ उतरार्ध व ५३ पूर्वार्ध.

तसेंच ऱ्हस्व अक्षरास्तव दीर्घ व दीर्घ अक्षरास्तव ऱ्हस्व अक्षराची योजना, 'ज्ञ' च्या ठिकाणीं 'ज', व 'ठ'च्या ठिकाणीं 'ट'—असे इतरही दोष क्वचित् आढळतात.

## ६. अधिक टीपा, शुद्धाशुद्ध वगैरे.

| अध्याय | गीति | टीपा | पृष्ठांक |
|---|---|---|---|
| ३ | १० | जयाचा लोभी=आपणास जय मिळावा अशी इच्छा करणारा. | १८ |
| ,, | ३५ | 'नागायुतबल' असा एक शब्द पाहिजे. | २३ |
| ,, | ३८ | भीमभुजाहिपति=भीमबाहुरूप सर्पराज-असा अर्थ करणें चांगलें. | २४ |
| ५. | १ | थितें=व्यर्थ-असा अर्थ आहे. त्याचा स्वीकार करावा म्हणजे गीत्यर्धाचा अर्थ सरळ लागतो. | २९ |
| ६ | १३ | भगवती=संधारूप भगवती. ( मूळांतील टीप रद्द ) | ३६ |
| ८ | ३२ | टीप १६.'उपमान व शब्द' बद्दल 'उपमान व शाब्द' असें पाहिजे. | ६५ |
| ९ | १० | तनुहुनीं=देहापासून, शरीरावरून | ६७ |
| १० | ११ | कळा=कला, अंश. ह्या युद्धाचा सोळावा भाग देखील इतर युद्धांत आढळणार नाहीं. ह्या युद्धाशीं तुलना केली असतां रुपयांत एक आणा देखील त्या इतर युद्धांचें महत्व नाहीं-असा भावार्थ. | ७४ |
| ११ | ४२ | 'आपांक्तेयांतें' बद्दल 'अपांक्तेयांतें' असें पाहिजे. | ८४ |
| ,, | ४६ | टीप ९. 'तें=द्विजा' बद्दल 'तें=द्विजाचें' असें पाहिजे. | ८५ |
| १४ | १२ | 'भद्र' बद्दल 'मद्र' असें पाहिजे. | १०५ |
| ,, | २७ | 'क्रृष्णोरग°' बद्दल 'कृष्णोरग°' असें पाहिजे. | १०८ |
| १९ | १७ | 'आघीं' बद्दल 'आर्वी' असें पाहिजे. | १३५ |
| २२ | ९ | साधु=सुरक्षित (?) | १५८ |
| २८ | २७ | बलिपुष्ट=उष्टें खाऊन माजलेला ( गीति १८,६५ व ७४ पहा. ) बलि=उष्टें-असाही अर्थ आहे. | २०२ |
| ,, | ३१ | वर्ण=जाती-असा अर्थ इष्ट आहे. कारण 'वर्णे समचि' ह्या शब्दांनीं कावळा व हंस यांचा रंग एकच आहे, असें समजावें लागतें पण तें योग्य नाहीं. हंस शुभ्रवर्ण असतो, कावळा काळा असतो. कमळ व पळसाचें फूल हीं फुलेंच, म्हणून तीं एकाच जातीचीं; तसेंच हंस व कावळा हे पक्षी म्हणून ते देखील एकाच जातीचे. | २०३ |
| ,, | ५३ | 'काकखगा' बद्दल 'काकखगा !' असें पाहिजे. | २०७ |
| ,, | ५५ | उत्तरार्ध-'टाकुनि दे सर्व संशय-मळाला' असा पाठभेद आहे, तोच ज्यास्त स्वाभाविक वाटतो. | ,, |
| ३० | २ | टीप १३ वाट (=मार्ग) हा संस्कृत शब्द आहे. ( ह्या टीपेंतील शेवटचें वाक्य रद्द समजावें ). | २२० |
| ,, | १० | 'ज्याचें' बद्दल 'ज्यांचें' असें पाहिजे. | २२१ |

| अध्याय | गीति | टीपा | पृष्ठांक |
|---|---|---|---|
| ३० | ३२ | 'भीमदहन' बद्दल 'भीमदहन' असें पाहिजे. | २२५ |
| ,, | ७१ | असेंच वर्णन पुढें अध्याय ३८ गीति ४५ मध्यें आहे. | २३० |
| ३१ | २८ | 'हरि हरिनें' असा मूळपाठ आहे. पारिजातवृक्ष इंद्राच्या नंदनवनांतून कृष्ण घेऊन जात असतां कृष्ण व इंद्र यांच्यामध्यें झालेल्या युद्धांत कृष्णानें इंद्रास पिटाळून लाविलें होतें. | २३८ |
| ३२ | २ | ह्या गीतीच्या शेवटीं पूर्णविराम पाहिजे. | २४४ |
| ,, | ४ | ह्या गीतीच्या आरंभीं अवतरणचिन्ह पाहिजे. | ,, |
| ३३ | ५६ | टीप १८ 'घोडे' हा शब्द गाळावा. | २६० |
| ३६ | ५० | 'मदेमारी' बद्दल 'मदेभारी' असें पाहिजे. | २८७ |
| ३७ | २३ | टीप १५ 'पाषंढ' बद्दल 'पाषंड' असें पाहिजे. | २९१ |
| ,, | ३८ | पूर्वार्ध—तात्पर्य–अशा रीतीनें कृष्णानें कौतुकानें भक्तीचा अद्भुत पराक्रम वर्णिला. उत्तरार्ध—तात्पर्य–स्वजन म्हणजे आप्त मनुष्य मनामध्यें दयाळू असतो; केवळ वरून मात्र, आपल्या नातेवाईकाचें चांगलें हित व्हावें म्हणून निष्ठुरपणा दाखवितो. येथें पूर्वार्धांत प्रस्तुताचें म्हणजे युद्धप्रसंगाचें वर्णन आहे. उत्तरार्धाच्या आरंभीं 'कीं' हें अव्यय आहे, व पुढील विधान सामान्य असून अप्रस्तुत स्वरूपाचें आहे. या पद्यरचनेवरून येथें अर्थांतरन्यास अलंकार उघड दिसून येतो. पण त्यास जरूर असलेला प्रस्तुताप्रस्तुतांतील विशेष सामान्य संबंध येथें दिसून येत नाहीं. असा संबंध कोणी विद्वान् दाखवून देईल काय ? ( मयूरमंडळ–चर्चा ). | २९४ |
| ,, | ,, | कीं ( कारण ) स्वजन निष्ठुर [ तरी ] वरि ( वरवर ) मात्र [असतो. वस्तुतः ] तो साधुगत्यर्थ मनीं सकरुण [ च ] असतो–असा अन्वय केला तरी चालेल. रा० पराडकरांच्या प्रतींत 'स्वजनमनीं' असा पाठ आहे. | २९४ |
| ४० | ८ | ह्या गीतीच्या शेवटीं पूर्णविराम पाहिजे. | ३२० |
| ,, | २१ | 'शरसमूहानें पीठ केलें' हा प्रयोग बरोबर दिसत नाहीं. शिवाय तो पिष्ट केला, यापेक्षां त्याचें पीठ केलें असेंच म्हणण्याचा प्रघात आहे, ( मयूरमंडळ–चर्चा ). | ३२२ |
| ४१ | १९ | टीप १० अविवेकें=अविचारानें. ( मूळांतील टीप १० च्या ठिकाणीं ११ पाहिजे व टीपेचा अंक ११ हा गाळावयास पाहिजे.) | ३३४ |
| ,, | २१ | ह्या संबंधीं भगवद्गीता, अध्याय ४ श्लोक १६।१७ पहा. | ३३५ |
| ,, | ३६ | पूर्वार्ध–जो सत्याचा वक्ता, तो साधु चि होय–असा अन्वय करणें बरें. | ३३८ |
| ४१ | ८२ | उत्तरार्ध-दाखविती, म्हणती-यांचा कर्ता पुढील पद्यांतील 'कवि'. | ३४५ |

| अध्याय | गीति | टीपा | पृष्ठांक |
|---|---|---|---|
| ४१ | ८३ | टीप १ 'तं खंज्यन्ति' बद्दल 'तं खंडयन्ति' असें पाहिजे. | ३४६ |
| ,, | ८६ | आणिखी=आणिक+ही-यांचें हें रूप बनलेलें दिसतें. | ,, |
| ,, | ८९ | टीप ४ 'देशस्थ ब्राह्मण' बद्दल 'देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण' असें पाहिजे. | ३४७ |
| ४१ | ९० | 'एकदां व्रत घेतलें म्हणजे तदनुरूप वर्तन शहाण्यानें अवश्य केलें पाहिजे', असा अभिप्राय असलेली ही आर्या येथें योग्य दिसत नाहीं. प्रस्तुत प्रसंगीं 'माझ्या धनुष्याचा धिक्कार करणारास मी मारीन' असें व्रत अर्जुनानें केलें होतें व तदनुरूप तो धर्मास मारावयास तयार झाला होता. त्यास असा उपदेश करणें प्राप्त होतें कीं, प्रसंगविशेषीं गुरुजनांचा अतिक्रम टाळण्यासाठीं लहानानें आपल्या व्रताची उपेक्षा करावी, पण प्रस्तुत आर्येंत कृष्ण व्रतपालनाचीच शिफारस करीत आहे. साधावयाचें एक व बोलावयाचें दुसरेंच असा विसंवाद येथें झाला आहे. करितां ह्या आर्येस येथें स्थान योग्य दिसत नाहीं.' ( मयूरमंडळ-चर्चा ) | ३४७ |
| ,, | ९१ | मनुस्मृतींतही अशाच प्रकारचें वचन आहे:-कामिनीषु विवाहेषु गवां भक्ष्ये तथेन्धने । ब्राह्मणाभ्युपपत्तौ च शपथे नास्ति पातकम् ॥ ( अध्याय ८।११२ ) म्हणजे:-स्त्रियांच्या बाबतींत ( पुष्कळ स्त्रिया असतां तूंच मला अधिक प्रिय आहेस असें प्रत्येकीला सांगणें ), विवाहादिकांत, गाई वगैरे पशूंचें चाऱ्यानें रक्षण करण्यांत, अग्निहोत्राला सर्पण पुरविण्यांत आणि ब्राह्मणांच्या रक्षणांत खोटी शपथ वाहिल्यास दोष होत नाहीं. ( मागें गीति ४१ पहा ). | ,, |
| ४२ | १३ | अर्थसादृश्य:-आपुली तहानभूक नेणे । तान्हया निकें तेंचि माउलीस करणें । तैसे अनुसरले मज प्राणें । तयांचें सर्व मी करीं. ॥ ( ज्ञानेश्वरी, अध्याय ९।३४० ). | ३५१ |
| ,, | १६ | कल्पनासादृश्य:-रूपसा उदयलें कुष्ट । संभावितां कुटीचें बोट । तया लाजा प्राणसंकट । होय जैसें. ॥ ( ज्ञानेश्वरी, १६।१७८ ). | ३५२ |
| ४३ | ५० | शर्करारस=काकवी, राब वगैरे. | ३७० |
| ,, | ५७ | टीप २ च्या पुढें-चक्र आणि धनुस् यांपैकीं फक्त धनुस् ह्या एकठ्याच पदास 'सत्' हें विशेषण लाविलेलें योग्य दिसत नाहीं. | ३७१ |
| ,, | ६० | उगवता ( नवा ) सविता, म्हणजे वर्धमान तेजाचा सूर्य. कृष्णानें आपल्या मित्राचे प्रताप वर्णन करून त्याचा प्रतापसूर्य उत्तरोत्तर अधिक ताप देणारा होईल, असें सुचविलें आहे. | ,, |

| अध्याय | गीति | टीपा | पृष्ठांक |
|---|---|---|---|
| ४३ | ७० | भीम हा अंध व धर्म हा त्याची काठी-असें समजणें प्रस्तुत स्थळीं इष्ट दिसतें. | ३७३ |
| ,, | ८० | 'निजर्विन' बद्दल 'निर्जीवन' असें पाहिजे. | ३७४ |
| ,, | ८१ | नीच मत्कृतिला अतुला न म्हणोत [ पण ] देव [ व ] सत्कवि [ मत्कृतिला ] गातील-असा अन्वय. नीच लोक माझ्या पराक्रमाचें वर्णन न करोत, पण माझ्या पराक्रमाची प्रशंसा सज्जन व देव करितीलच-असा भाव. | ,, |
| ४३ | ८३ | टीप २३ च्या पुढें-आतां अर्जुनासह कृष्ण यावा म्हणजे माझा शोक दूर होईल-असा अर्थ. | ३७५ |
| ,, | ८७ | तद्धनुरव-ह्या समासांत धनु असा उकारान्त शब्द घेणें भाग आहे. मूळ संस्कृत शब्द 'धनुस्' असा आहे. | ३७५ |
| ४३ | ८९ | गणितो-हा शब्द 'गणि तो' असा व्यस्त घेतला तरी चालेल. | ,, |
| ४४ | ५ | जीवन्मृतवीरवरचमू=जीवंत आणि मेलेले अशा दोन्ही प्रकारचे मोठमोठे वीर आणि सैन्य. | ३७७ |
| ,, | ६ | माम्याला ह्या प्रयोगावरून मोरोपंतकालीं 'माम्या' सारखीं तालुप्रवण संबोधनें ('य' कारविशिष्ट) ग्राम्य मानलीं जात नसत, असें दिसतें. | ,, |
| ,, | १० | दवानळ=दव+अनळ=अरण्य+अग्नि=वणवा-अशीं पदें पाडून अर्थ केल्यास 'अनळ' शब्दाचें आगंतुकत्व टाळतां येते. दव=अरण्य-असाही अर्थ आहे, तोच येथें घ्यावा. | ,, |
| ,, | २६ | लटके=लुले, शक्तिहीन-असा अर्थ केला तरी चालेल. | ३८० |
| ,, | २८ | 'धैर्याची' बद्दल 'धैर्याची' असें पाहिजे. | ,, |
| ,, | २७ | पूर्वार्ध-ह्याच्या मागील व पुढील अर्धांत शल्य अर्जुनाचेंच वर्णन करीत आहे. तेव्हां कर्णाच्या नांवाच्या उल्लेखाच्या अभावीं येथील धैर्य अर्जुनाचेंच होय, असें वाटणें साहाजिक आहे. पण मूळांतील 'तां धृतिं कुरु राधेय' ह्या वचनावरून तें धैर्य कर्णाचेंच समजलें पाहिजे. | ३८० |
| ,, | ४३ | गळांचि पडले=जणुं काय त्यांनीं गळच घातली. | ३८२ |
| ,, | ५० | ह्या गीतींत **व्यतिरेक** अलंकार साधला आहे. | ३८३ |
| ,, | ५२ | 'चिरभ्रम या पदाचा अर्थ 'मरण' असा येथें विवक्षित आहे, पण हा अर्थ ह्या पदांतून निघणें शक्य दिसत नाहीं. मरणामध्यें सर्व हालचालींचा अभाव असतो व भ्रमाच्या अर्थांतून हालचाल ही कल्पना गाळणें शक्य नाहीं'. ( मयूर-मंडळ-चर्चा ). | ,, |
| ,, | ५५ | *गमति गर्जे काय पद्म तुडवीले*-येथें उत्प्रेक्षा असून तद्वो- | |

| अध्याय | गीति | टीपा | पृष्ठांक |
|---|---|---|---|
| | | धक पदें गमति [ व ] काय अशीं दोन आहेत. पण यांतील एक निरर्थक समजलें पाहिजे. | ३८४ |
| ४४ | ५९ | उत्तरार्ध-येथें सात्यकीवर कलभा व शलभा अशीं दोन रूपकें केलेलीं आहेत. | ,, |
| ,, | ६२ | हुतचि करील-असा अन्वय केला तरी चालेल. | ३८५ |
| ४५ | ८ | 'धोपना' बद्दल 'धोपला' असें पाहिजे. | ३८७ |
| ४५ | २१ | कोण्ही ही-येथें 'ही' हें पद स्वतंत्र असल्यामुळें 'कोण्ही'च्या जागीं 'कोणी' असा पाठ असावयास पाहिजे होता. | ३८९ |
| ,, | २५ | काळाच्या ओटींत घातलें-येथें ओटी हा शब्द पुरुषाच्या नेसण्याच्या भागाला लाविला आहे. आपण तो स्त्रीसंबंधींच वापरितों. यावरून शंका येते कीं, 'काळाच्या'चे स्थानीं 'काळीच्या' असा पाठ असेल काय? ( मयूरमंडळचर्चा ). [ मयूरमंडळाच्या चालकांनीं पंतलिखित पोथीवरून रा० पराडकर यांनीं छापलेली प्रत आधारभूत समजून चर्चा केलेली आहे. असें असतां पाठशुद्धीविषयीं त्यांनीं शंका प्रदर्शित करण्याचें कारण दिसत नाहीं. ] | ३९० |
| ,, | ३३ | टीप १६ मधील 'अकारेणैव' बद्दल 'आकारेणैव' असें पाहिजे. | ३९१ |
| ४६ | ११ | ईशानें=ईश+नें ( तृतीयेचा प्रत्यय ) किंवा ईशान+एं ( तृतीयेचा प्रत्यय )-ह्यांपैकीं कोणताही मूळ शब्द समजावा. | ३९७ |
| ४६ | १६ | 'भीष्माच्या लोकातें' म्हणजे भीष्म हा एक वसु असल्यानें, 'वसूंच्या लोकातें'-असा अर्थ. येथील विवक्षित लोक 'वसूंचा लोक' अशाच अर्थानें प्रसिद्ध आहे. त्याला भीष्माच्या नांवावर मोडणें योग्य नाहीं. त्यामुळें येथील 'भीष्माचा लोक' हा शब्दयोग अनुचित दिसतो. मूळ भारतांतही 'वसूनां समलोकत्वं' असें आहे' ( मयूरमंडळ-चर्चा ). [ अष्टवसूंचीं नांवें पुढीलप्रमाणें आढळतातः-धर, ध्रुव, सोम, आप् किंवा विष्णु, अनिल, अनल, प्रत्यूष आणि विभावसु. किंवा-द्रोण, प्राण, ध्रुव, अर्क, अग्नि, दोष, वसु व विभावसु. ह्यांत भीष्माचें नांव नाहीं, पण द्रोण असें एक नांव आहे. तेव्हां हा मंडळाच्या सभासदांच्या समजुतीचा घोंटाळा दिसतो. ] | ३९८ |
| ,, | १७ | 'देव कृष्णार्जुन शत्रुसंहार कसा करितात हें पहाण्याकरितां अत्यंत उत्कंठित झाले होते; जसे चातक मेघांना पहाण्यास उत्कंठित होतात तसे. ही उपमा फारच एकदेशी दिसते. उपमानामध्यें चातकाचें प्राणधारणच मेघांवर अवलंबून आहे, तर उपमेयामध्यें केवळ चार घटकांची मौज कृष्णार्जुनांना | |

| अध्याय | गीति | टीपा | पृष्ठांक |
|---|---|---|---|
| | | पाहून लाभणारी आहे. अर्थात् ही उपमा अयोग्य दिसते.' ( मयूरमंडळ-चर्चा ). | ३९८ |
| ४६ | २७ | 'मीं निजभुजतेजें वृषा भस्म करीन' हें कृष्णाचें वचन आहे. कृष्ण कर्णाला कसा जाळणार? तेजानें. तेज कशाचें? शस्त्रधारण न करण्याची प्रतिज्ञा असल्यानें, कृष्ण शस्त्र वापरणार नाहीं हें सिद्ध आहे; करितां येथें तेजशब्दानें प्रत्यक्ष तेज न घेतां भुजावर म्हणजे भुजबलावर तेजाचा आरोप करणें भाग आहे. म्हणून निजभुजतेज म्हणजे आपल्या बाहूची शक्ति हाच कोणी अग्नि त्यानें.' ( मयूरमंडळ-चर्चा ). | ३९९ |
| ,, | ६१ | तयांत=( त्यांच्या ) मनांत. | ४०६ |
| ,, | ६२ | 'पार्थीचा' बद्दल 'पार्थाचा' असें पाहिजे. | ,, |
| ,, | ६८ | टीप ८ च्या शेवटीं पडलेला 'यांसारखे' हा शब्द गाळावा. | ४०७ |
| ४७ | १ | संगरीं-निवातकवच इत्यादिकांबरोबर झालेल्या युद्धांत. | ४०८ |
| ,, | २ | उत्तरार्ध-हें अवतरण समजावें. उत्तरार्धातील भाषण बोलून अर्जुन हांसला-असा भाव. | ,, |
| ४७ | १३ | 'अर्थ-मेघ आकाशाला व्यापून घन म्हणजे गंभीर अशी गर्जना करते झाले. त्यांनीं अंधारही घनच म्हणजे निबिड पाडिला. ते धीरांचे अग्रणी अर्जुनादिक यांच्यावर विजांप्रमाणें जलधारांची वृष्टि मेघांनीं केली; पण त्यांना ते कंप देऊं शकले नाहींत. (३) संदर्भाच्या दृष्टीनें ( पुढील कथाप्रसंगाशीं ) हा आर्येचा अर्थ नीट जमत नाहीं; व संदर्भाशीं जुळणारा चांगला अर्थ शब्दांतून निघत नाहीं. तेव्हां कोणास तसा चांगला अर्थ सुचल्यास त्यांनीं तो कृपा करून कळवावा. (४) शंपापरि यांत 'शंपां' असें रूप पाहिजे; तरच तें सामान्यरूप होईल'. ( मयूरमंडळ-चर्चा ) [ आम्ही स्वीकारिलेला व रा० पराडकर यांच्या प्रतींतील पाठ एकच आहे. परंतु मयूरमंडळानें 'शंपापरि'='शंपांपरि' असा पाठ कल्पिला आहे. ] | ४११ |
| ,, | ४६ | कांपवी=( १ ) भयामुळें कंपायमान करी, व ( २ ) पसंती दर्शविण्याकरितां मान डोलवावयास लावी-अशा दोन्ही अर्थीं हा शब्द येथें योजिलेला आहे. | ४१६ |
| ४७ | ४९ | उत्तरार्ध-शंकर इतरांहून भयंकर असेल, पण अर्जुनाहून तो भयंकर कसला असणार? खात्रीनें असणार नाहीं-असा भाव. | ४१७ |
| ,, | ५२ | कर्णवधार्थे=कर्णाच्या वधाच्या उद्देशानें-हा अर्थ सोपा व सरळ दिसतो. | ,, |
| ,, | ६३ | भव्य=सुखकारक. | ४१९ |

| अध्याय | गीति | टीपा | पृष्ठांक |
|---|---|---|---|
| ४७ | ७१ | 'कपटयुद्धें' येथें कर्णानें बाणानें नेम धरल्यावर शल्यानें त्यास फिरून चांगला नेम धरण्यास सांगितलें. तदनुसार कर्णानें पुनः नेम धरला असता तरी त्यांत कपटाचा मुळींच संबंध आला नसता. असें असतांना प्रस्तुत पंक्तींत कर्ण अशा रीतीनें फिरून नेम धरण्यास कपटयुद्ध म्हणतो. मूळांतही असेंच म्हटलें आहे. येथें कपटशब्दाचा निर्वाह कसा करावा?' ( मयूरमंडळ–चर्चा ). | ४२१ |
| ,, | ७४ | येथें 'चाकांतें' असें अनेकवचन आहे. मूळांत एकाच चाकाचा उल्लेख आहे. पंतांनीं पुढें एकवचनीच शब्द योजिला आहे ( अध्याय ४८ गीति ५६।५७ व ६० पहा ). | ,, |
| ,, | ७५ | उत्तरार्ध–अर्जुनाच्या कंठासारखें स्थान कृष्णासारख्या प्रिय मित्राच्या हातालाच आलिंगितां येईल. शत्रु कितीही कुशल असला तरी त्याला तेथें स्पर्श करितां यावयाचा नाहीं–असा सरळ अर्थ. | ,, |
| ,, | ७६ | उत्तरार्ध–समूळ=निःशेष, पूर्णपणें. | ४२२ |
| ,, | ७७ | उत्तरार्ध–शनीचा दृष्टिपात अत्यंत तीव्र असें म्हणतात, पण त्याची तीव्रता कर्णाच्या बाणापेक्षां कमीच–असा अर्थ. **प्रतीपालंकार.** | ,, |
| ,, | ७८ | 'दिव्यमणिकनकखचित' म्हणजे तेजस्वी रत्नांनीं युक्त व सुवर्ण मधूनमधून ज्यांत बसविलें आहे असें हें किरीटाचें वर्णन आहे. किरीट सोन्याचें केलेलें असतें, तें सोन्यानें खचित नसतें. अर्थात् येथील विधान वस्तुविरोधी आहे. करितां दिव्यकनक-मणिखचित किंवा दिव्यमणी-कनकखचित असा पाठ असेल काय?' ( मयूर-मंडळ-चर्चा ). | ,, |
| ४८ | ४ | उत्तरार्ध–माझ्या विषाग्नीमध्यें सांपडला असतांना इंद्राहून बलवान् वीर सुद्धां जळून जाईल. मग अर्जुन हा तर मनुष्यच, अर्थात् इंद्राहून कमी, म्हणून तो खासच जळून जाईल–असा भावार्थ. | ४२३ |
| ,, | ७ | पूर्वार्ध–शत मारील चि, रणीं न भागे हा–असा अन्वय केला तरी चालेल. | ४२४ |
| ,, | ४३ | उत्तरार्ध-'पावोत मनीं जनीं अरि त्रास' म्हणजे शत्रु मनांत तर घाबरोतच, पण लोकांतही त्यांचा भित्रेपणा प्रकट होवो–असा अर्थ. त्रास=भय, भीति. | ४३१ |
| ,, | ४९ | बहु युक्ति–असे निराळे शब्द पाहिजेत. 'बहु' हें 'लाघवा'चें विशेषण समजावें. | ४३२ |
| ,, | ५२ | येथें कर्ण व कृष्ण यांच्या नामनिर्देशांत 'राधा' या शब्दाची | |

| अध्याय | गीति | टीपा | पृष्ठांक |
|---|---|---|---|
| | | योजना कां केली? अशा ह्या युद्धाच्या प्रसंगीं स्त्रीजनाचा उल्लेख अर्थगौरवाची हानि करितो. | ४३२ |
| ४८ | ५३ | 'सभ्यासीं' हें पद सहेतुक आहे. तूं सभ्य असल्यामुळें तुझ्याशीं लढून दुष्टाला जय कसा मिळेल? अर्थात् मिळणार नाहीं-हा भाव. दुर्योधनकर्णादि असभ्य होते, हें पंतांनीं येथें ध्वनित केलें आहे. | ४३३ |
| ,, | ५६ | नक्राचें=कोणत्याही सामान्य नक्राचें-असा अर्थ घेतला तरी चालेल. | ,, |
| ,, | ६१ | उत्तरार्ध-तें=पृथ्वीनें चाक गिळणें. | ४३४ |
| ४९ | १० | 'येथें कर्णास दोष देण्यांत येत आहे, तो एका पोराला पुष्कळ पुरुष घसरून मारीत असतां त्यांचें निवारण न करणें' अशा कृत्याबद्दल. पण हें विधान फारच कोतें आहे. अभिमन्यूला साक्षात् मारणारांमध्यें‌च कर्ण एक होता. करितां अन्याय्य कर्माचें अनिवारण नव्हे, तर त्याचें स्वतः आचरण हाच दोष कर्णावर येऊन पडतो. ( मयूरमंडळ-चर्चा ). | ४३८ |
| ,, | १२ | 'बळ होतें सत्याचें, खळ हो! तुमचा न चालिला गर्व' ॥ येथें 'चालिला'-चे ठिकाणीं 'चालेल' या अर्थाची विवक्षा दिसते. ती विवक्षा 'चालिला' या भूतकालीन रूपानें कशी पूर्ण होणार? याचें उत्तर ज्ञात्यांनीं द्यावें; आह्मी साभार स्वीकारूं.' ( मयूरमंडळ-चर्चा ). | ,, |
| ,, | २० | आपण 'वैराचें मूळ' किंवा 'वैराचें बीज' असें म्हणतों. पंतांनीं 'वैराचा वृक्ष' असें म्हणून 'वैराचा विस्तार' दर्शविला आहे. | ४४० |
| ,, | २१ | 'ज्वालामाली' हें देहाचें विशेषण समजणें इष्ट आहे, कारण मूळांत तसेंच वर्णन आहे. | ,, |
| ,, | २२ | 'त्यावरि' हें कालवाचक क्रियाविशेषण न घेतां तो=अर्जुन, त्याच्यावर-असा अर्थ करावा. | ,, |
| ,, | २४ | उत्तरार्ध-'लोक अंधतमसा झाला=लोकांना अंधतमस देऊन त्यानंतर 'सा' म्हणजे 'सारखा' या प्रत्ययानें पूर्वीच्या तम-भावांत कमीपणा दाखविला आहे.' ( मयूरमंडळ-चर्चा ) | ,, |
| ,, | ३२ | येथें 'मंत्री' ह्या पदावर श्लेष आहे. मंत्री=मांत्रिक, मंत्राच्या योगानें सापाचें विष उतरविणारा; ( पक्षीं ) राजास हितोपदेश करणारा प्रधान, सल्लागार. | ४४२ |
| ,, | ३८ | गतमोह पार्थ भासता झाला-असा अन्वय. भासता=प्रकाशित, देदीप्यमान. | ४४४ |

| अध्याय | गीति | टीपा | पृष्ठांक |
|---|---|---|---|
| ४९ | ४६ | टीप ६ यांतील 'कर्णावधार्थ' बद्दल 'कर्णवधार्थ' असें पाहिजे. | ४४५ |
| ,, | ६० | भग्नरथें=नादुरुस्त झालेल्या रथांतून, रथाची मोडतोड झाली होती, तरी तशा रथांतून. भग्न=अगदीं मोडलेला, बेकाम–असा अर्थ घेणें इष्ट नाहीं. | ४४८ |
| ,, | ,, | 'तो स्वमुखें कर्णान्तवृत्त सांगे' असें पंतांनीं म्हटलें आहे, पण त्याच्या तोंडचे शब्द दिलेले नाहींत, म्हणून स्वमुखें=आपल्या चर्येनें–असा अर्थ घेणें बरें. शल्याचें उतरलेलें तोंड पाहातांच कर्ण रणांत पडला; असा तर्क दुर्योधनानें केला, हा इत्यर्थ. | ,, |
| ५० | ५८ | 'आठवुनी' बद्दल 'आठवुनीं' असें पंतांच्या लेखनपद्धतीस अनुसरून पाहिजे. | ४६३ |
| ५० | ७५ | टीप १ मधील '[ कर्णपर्वरूपी ] ग्रंथ' बद्दल '[ महाभारत-रूपी ] ग्रंथ' असें पाहिजे. 'धन्य तुम्हीं आम्हीं कीं नरनारा-यणचरित्र वदवा जी !' ( अध्याय १४।८ ) ह्या संजयोक्तीवरून 'नरनारायणविजयग्रंथ' म्हणजे महाभारत हें स्पष्ट होतें. | ४६७ |
| | | **सूचना**–ग्रंथांत अशुद्धें राहूं नयेत म्हणून प्रयत्न केला असूनही क्वचित् अशुद्धें राहिलीं आहेत. त्यांपैकीं मूळांतील सर्व व टीपांतील महत्त्वाचीं वर दर्शविलीं आहेत. टीपांतील सहज लक्ष्यांत येण्यासारखे मुद्रणदोष ( उदाहरणार्थ–'गीत्यर्ध' बद्दल 'गीत्यर्थ', टीपांचे चुकलेले आंकडे, वगैरे ) स्थलाभावामुळें परिशिष्टांत दिले नाहींत, याबद्दल वाचकांनीं क्षमा करावी, अशी त्यांस विनंति आहे. | |

